# निवेदन

कित्येक वर्षांपूर्वी सर नारायण चंदावरकर ह्यांचें चरित्र लिहिण्याची जबाबदारी पत्करल्यानंतर मार्गांत अनेक अडचणी आल्या. चरित्रलेखनास प्रारंभ करण्यापूर्वी तरुण मित्र श्री. गणेश लक्ष्मण चंदावरकर ह्यांस बरोबर घेऊन चंदावर, होनावर, कारवार वगैरे भाग पाहून आलों. नारायणरावांचें जन्मस्थान, ज्या घरांत मिशनरींची शाळा होती तें घर, रवींद्रनाथ ठाकूरसारख्या कवीस मोहून टाकणारें कारवार येथील सृष्टिसौंदर्य पाहिलें, आणि परमेश्वराच्या प्रेरणेनें कार्यास प्रारंभही केला. नंतर प्रकृति एकाएकीं ढांसळली व सर्व ग्रंथ तेथेंच संपणार असें सर्वांस वाटूं लागलें. परंतु चरित्रलेखनाचें कार्य पूर्ण व्हावें अशी परमेश्वराची इच्छा होती. मध्यंतरीं **सुबोधपत्रिकेच्या** हीरकोत्सवाचा खास अंक व श्री. बी. बी. केसकर संपादित **संसार** व **धर्मसाधन** हा ग्रंथ ह्यांचें प्रकाशन ह्यामुळें हें काम मागें पडलें व आज ता. १४ मे रोजीं सर नारायण चंदावरकरांच्या चौदाव्या पुण्यतिथीच्या दिवशीं परमेश्वराच्याच प्रेरणेनें सुरू झालेला हा चरित्रग्रंथ त्याच्याच कृपेनें पूर्ण होऊन वाचकांस सादर केला जात आहे.

चरित्रलेखनास अवश्य अशीं सर्व उपलब्ध साधनें श्री. विठ्ठलराव चंदावरकर ह्यांनीं मोठ्या आनंदानें माझ्या स्वाधीन केलीं व वेळोवेळीं चरित्राचीं प्रकरणें वाचून सूचना केल्या ह्याबद्दल त्यांचे मी प्रथम मनःपूर्वक आभार मानतों. त्याचप्रमाणें श्री. सीताराम सुंदरराव पाटकर ह्यांनीं दोन महत्त्वाचीं प्रकरणें फार काळजीपूर्वक तपासलीं व महत्त्वाच्या सूचना केल्या ह्याबद्दल त्यांचे कितीही आभार मानिले तरी ते थोडेच होणार आहेत. तसेंच प्रो. नरहर रघुनाथ फाटक ह्यांनीं अगदीं प्रथमपासून अखेरपर्यंत नानाप्रकारें सहाय्य केलें, वारंवार उत्तेजन दिलें, अनेक विषयांची चर्चा केली, अनेक सूचना आपुलकीच्या भावनेनें केल्या ह्याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें. प्रो. वसंतराव नाईक ह्यांनीं सर नारायण ह्यांचा पत्रव्यवहार मजबरोबर वाचला व चरित्राची रूपरेषा ठरवितांना विचारविनिमय केला ह्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. माझे तरुण मित्र व बंधु श्री. गणेश लक्ष्मण चंदावरकर ह्यांनीं शेवटलीं प्रुफें काळजीपूर्वक वाचलीं व प्रथमपासून अखेरपर्यंत नानाप्रकारें सहाय्य केलें ह्याबद्दल परमेश्वर त्यांचें कल्याण करो व आपली सेवा करून घेवो अशी त्यांचेसाठीं परमेश्वरापाशीं प्रार्थना करितों. कर्नाटक प्रेसचे मालक श्री. मंगेशराव कुळकर्णी ह्यांनीं गेलीं

कित्येक वर्षें चरित्रासंबंधानें वारंवार चौकशी केली; आणि तें लिहून तयार झाल्यावर मोठ्या संतोषानें स्वतःचेंच कार्य असें समजून अल्पावधींत छापून तें प्रसिद्ध केलें ह्याबद्दल त्यांचे मी मनःपूर्वक आभार मानतों. त्यांनीं मनावर घेतलें म्हणूनच चरित्रग्रंथ आज प्रसिद्ध होत आहे एवढें सांगितलें म्हणजे त्यांच्या आस्थेची सर्वांस कल्पना होईल. नारायणराव चंदावरकरांच्या दीर्घ व निकट सहवासाचा ज्यांस लाभ झाला होता, नारायणरावांचें चरित्र अगदीं लहानपणासून तों अखेरपर्यंत ज्यांनीं पाहिलें होतें व स्वतः नारायणरावांच्या ठिकाणीं ज्यांचे संबंधानें अत्यंत आदर होता असे बहु सन्मान्य बंधु श्री. बा. बा. कोरगांवकर ह्यांनीं ह्या चरित्राचीं कांहीं प्रकरणें आस्थेनें वाचून कांहीं सूचना केल्या, आपलें समाधान व्यक्त केलें व आशीर्वाद दिला ह्याबद्दल मीं त्यांच्या चरणांचें वंदन करितों.

श्री. गणेश चंदावरकर ह्यांच्या बरोबर ज्यावेळीं आम्ही कारवार येथें तिकडील प्रांत पाहण्यासाठीं गेलों होतों, त्यावेळीं तेथील म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष रावसाहेब मंजूनाथ विठ्ठल कायकिणी, सर नारायण ह्यांचे मामा व लहानपणचे सहाध्यायी, ह्यांनीं आम्हांस पुष्कळ सहाय्य केलें; आपल्या लहानपणच्या आठवणी ताबडतोड सांगितल्या व आम्हांस उत्तेजन दिलें. रावसाहेब हा चरित्र-ग्रंथ पूर्ण झालेला पहावयास हयात नाहींत ! हा ग्रंथ नुसता पाहूनही त्यांस आनंद झाला असता इतकी सर नारायण ह्यांच्यावर त्यांची भक्ति होती. त्यांस गेल्या मार्च महिन्यांत कारवार येथें देवाज्ञा झाली.

शेवटीं ज्या दयाघन परमेश्वरानें हें चरित्रलेखनाचें कार्य हातीं घ्यावें अशी प्रेरणा केली, गेलीं आठ नऊ वर्षें त्या पुण्यात्म्याच्या विचारांच्या व ध्येयांच्या निकट सहवासांत मला ठेविलें व हें चरित्र पूर्ण करण्याचें सामर्थ्य दिलें त्या परमेश्वराच्या चरणीं अत्यंत नम्रपणें लीन होऊन आधुनिक काळांतील त्याच्या एका खऱ्या सेवकाचें, भक्ताचें हें चरित्र त्यासच अर्पण करितों.

मुंबई,
प्रार्थनामंदिर.
ता. १४ मे १९३७

**द्वारकानाथ गोविंद वैद्य**

# अनुक्रमणिका.

# नारायण गणेश चंदावरकर

## प्रकरण पहिलें

## कांहीं ऐतिहासिक माहिती

### चंदावर

उत्तर कानडा प्रांतांत चंदावर, होनावर व कारवार हे तिन्ही गांव मोडतात व त्यांच्याशीं नारायण गणेश चंदावरकर ह्यांचा कमीअधिक संबंध आलेला आहे. म्हणून ह्यांसंबंधानें प्रथम थोडी ऐतिहासिक व साधारणतः विशेष प्रसिद्ध नसलेली माहिती येथें देतों.

सरकारी रीतीनें १८८१ सालीं ह्या प्रांताची जेव्हां माहिती मिळविण्याचे प्रयत्न झाले त्यावेळीं **चंदावर** गांवासंबंधानें जी माहिती मिळाली ती जरी अपुरी आहे तरी महत्त्वाची आहे. चंदावर हें गांव कुमठ्यापासून सुमारें पांच मैलांवर आहे. १८८१ सालीं तेथें ७४६ लोकांची वस्ती होती. त्यावेळींही गांव सोडून लोक गेले आहेत असें त्याचें वर्णन आहे. १९२९ सालीं नोव्हेंबर महिन्यांत ज्यावेळीं ह्या ठिकाणीं आम्ही गेलों होतों त्यावेळीं तें अगदीं खेडेवजा दिसलें. येथें लहान लहान झोंपड्या आहेत, व ज्या गृहस्थांचीं बरींचशीं शेतें ह्या खेड्याच्या हद्दींत आहेत ते स्वतः येथें रहात नसून जवळच मल्लापूर नामक खेड्यांत रहातात. लोकांमध्यें अशी दंतकथा प्रसिद्ध आहे कीं सरपन मलिक म्हणजे विजापूरचा सेनापति शरीफ उल्मुल्क ह्यानें हा गांव वसविला. शरीफनें उत्तर कानडा प्रांत सोळाव्या शतकाच्या अखेरीस सर केला. परंतु १६०९ सालीं वेंकटेश नाईक नामक सरदाराच्या तो ताब्यांत होता. येथें अद्याप मुसलमानांची वस्ती आहे. मुसलमान धर्माधिकारी येथें राहतो. शरीफ उल्मुल्कच्या काळीं येथें एक किल्ला बांधला गेला असावा. त्याच्या भिंतींच्या खुणा, किल्ल्याभोंवतालचे चर, दरवाजाच्या जागा, आंतील विहिरींच्या खुणा, तळ्यांच्या जागा, निरनिराळ्या दालनांच्या रेषा अद्याप पहावयास सांपडतात.

१६७८ व १७०१ सालीं तेथें पोर्तुगीजांची वखार होती. १६८६ सालीं चंदावरचा अधिपति कोणी मुसलमान होता. तो मेल्यानंतर चंदावर गांवाची हेळसांड होऊं लागली. लोक गांव सोडून गेले व वाड्याचे दगडही लोकांनीं बेधडक उचलून नेले. ह्या ठिकाणीं पोर्तुगीज लोकांचा प्रवेश झाल्यानंतर जें एक ख्रिस्ती भव्य मंदिर संत झेविअरच्या नांवें बांधण्यांत आलें तें तेथें अद्याप असून दरसाल ह्या मंदिराचा मोठा उत्सव होतो. चंदावरच्या आसपास एकदोन ख्रिस्ती माणसें आज जरी रहात आहेत तरी हिंदु लोकच हा उत्सव उत्साहानें साजरा करीत असतात असें कळतें. आसपासच्या लहानमोठ्या गांवांतील शेंकडो लोक ह्या उत्सवास हजर राहतात. उत्सवाचा खर्चही बहुतेक हिंदु लोकच करितात. इतका संत झेविअर व हें मंदिर ह्यांसंबंधानें हिंदुलोकांत आदरभाव आहे. ह्या चंदावर गांवावरून चंदावरकर हें उपनांव प्राप्त झालें. त्या संबंधाची रा. रा. सुब्राव गोपाळ उभयकर ह्या १९३२ सालींच परलोकवासी झालेल्या गृहस्थांनीं प्रसिद्ध केलेली हकीकत थोडी चमत्कृतिपूर्ण आहे. ती साररूपानें येथें दिली असतां अस्थानीं होणार नाहीं.

औरंगाबाद पलीकडील देवगिरि दौलताबाद येथील रमावल्लभदास नामक एक साधुपुरुष सोळाव्या शतकांत फिरत फिरत उत्तर कानडा प्रांतांतील गोकर्ण नामक प्रसिद्ध क्षेत्रीं महाशिवरात्रीच्या पर्वणीच्या वेळीं समुद्रस्नानास गेले असतां तेथें त्यांस स्त्रीपुरुषांचा फार मोठा जमाव आपल्याप्रमाणेंच समुद्रस्नानास आलेला दिसला. पुष्कळ स्त्रिया स्नान करीत असतां लक्ष्मीबाई नांवाच्या एका सारस्वत ब्राह्मण स्त्रीचें कर्णफूल पाण्यांत पडून हरवलें. तें लक्ष्यांत येतांच परम चिंताक्रांत होऊन ती कर्णफुलाच्या शोधास लागली. ती स्वतः फार ओंड पाण्यांत जरी स्नान करीत नव्हती तरी पाण्यांत पडलेलें फूल कसें सांपडावें ? तिच्यासाठीं तिच्याबरोबर असणाऱ्या स्त्रियाही फुलाचा शोध करूं लागल्या, परंतु कोणाच्या श्रमास यश आलें नाहीं व लक्ष्मीबाई दागिना हरवला म्हणून खिन्न होऊन रडूं लागली. ही तिची स्थिति रमावल्लभदासांच्या लक्ष्यांत येऊन त्यांनीं तिला समुद्रदेवाची प्रार्थना करून प्रयत्न करावयास सांगितलें. त्याप्रमाणें प्रयत्न करतांच हरवलेलें कर्णफूल सांपडलें, त्यामुळें लक्ष्मीबाईची साहजिकपणें दासांवर भक्ति जडली व हा कोणीतरी महापुरुष आहे असें मानून ती त्याला शरण गेली व तिनें आपल्या मल्लापूर गांवीं येण्याचा गुरु महाराजांस आग्रह केला. बाईचा भक्तिभाव व शुद्ध अंतःकरण पाहून रमावल्लभदास मल्लापुरीं त्यांच्या येथें गेले. हा मल्लापूर गांव कुमठ्यापासून चार साडेचार मैलांवर असून चंदावर गांव व गांवांतील शेतीजमीन मल्लापूर गांवास लागूनच ओढ्या पलीकडे आहे. लक्ष्मीबाईची परमार्थाविषयीं आवड पाहून महाराज तिच्या येथें गेले, व तिला योग्य तो उपदेश करून तिचें नांव त्यांनीं

आवडी असें ठेविलें व ह्याच नांवानें ती पुढें ओळखली जाऊं लागली. रमावल्लभदास हे श्रीकृष्ण भक्त व त्यांनीं आवडीला श्रीकृष्णोपासनेचें व्रत करावयास सांगून त्यावर्षी चातुर्मास्यांतील कृष्णजयंतीचा उत्सव तिच्याच येथें साजरा केला व पुढेंही हा उत्सव साजरा करण्याचें व्रत चालविण्यास तिला सांगितलें. त्याप्रमाणें हा उत्सव आजही तेथें मोठ्या थाटानें होत असतो. ह्यावेळीं आवडीबाईचे यजमान नारायणाप्पा मल्लापुरीं नव्हते; कांहीं कामानिमित्त ते परगांवीं गेले होते. परत येतांना वाटेंतच आपली पत्नी देवलशी झाल्याचें व आपलें घर एका गोसाव्याचा मठ झाल्याचें वर्तमान त्यांस लोकांकडून कळलें व घरीं येतांच लक्ष्मीबाईची त्यांनीं चांगली संभावना केली. परंतु रमावल्लभदासांच्या साधुत्वाचा व पावित्र्याचा अनुभव येऊन तेहि त्यांच्या भजनीं लागले. अशाप्रकारें हें लक्ष्मीनारायणाचें जोडपें मल्लापूर येथें गुरूपदिष्ट सांप्रदायाप्रमाणें भगवद्गीत गात मोठ्या आनंदानें कालक्रमणा करीत होतें. चंदावर हा गांव मल्लापूर नजीकच ओढ्यापलीकडे असल्याचें वर सांगितलेंच आहे. हा गांव ज्यावेळीं म्हैसूर प्रांतांतील नगर नामक संस्थानांत मोडत होता, त्यावेळीं तेथें मुसलमानांची वस्ती अधिक होती व आजही ती तशीच असून वंशपरंपरा तेथें एक काजीचें घराणें रहात आहे. त्यावेळीं असें घडून आलें कीं, नगरचा राजा व त्याचा बंधु ह्यांच्यांत वितुष्ट आलें व तो आपल्या बंधूची राजधानी सोडून चंदावर येथील किल्ल्यांत येऊन राहिला. हा किल्ला हल्लीं नामशेष झालेला असून जमीनदोस्त झालेल्या त्याच्या भिंतींची कल्पना करून देणारे अवशेष तेथें दिसतात. त्यावरून किल्ल्याची अत्यंत अस्पष्ट कल्पना होते. किल्ल्याचा तट, त्याच्या भोंवतालचा खंदक, आंतील तळीं व विहिरी वगैरेंची कांहींशी कल्पना करून घेतां येते. नारायणाप्पा त्यावेळीं कांहीं गांवांचे कुळकर्णी होते व त्यांस बुद्धिबळांचा फार नाद असे. कर्मधर्मसंयोगानें राजबंधूसही ह्या खेळाचें अत्यंत वेड असल्यामुळें नारायणाप्पा त्यांच्याकडे किल्ल्यांत रोज बुद्धिबळाचे डाव खेळण्यासाठीं जाऊं लागले. त्यामुळें राजबंधूचा व त्यांचा अधिक परिचय झाला. अशाप्रकारें बुद्धिबळाच्या खेळाच्या निमित्तानें राजबंधु व नारायणाप्पा ह्यांचा दृढ परिचय होत असतां एके दिवशीं खेळ ऐन रंगांत आला असतांना वर डोकीवर पाल चुकचुकली. पल्लिकाशब्द व पल्लिकापतन ह्यांवर कांहीं अनुमानें बसविलेलीं आहेत, तीं नारायणाप्पांस चांगल्या रितीनें अवगत होतीं. वरील शब्द ऐकतांच कांहीं काळ नायराणाप्पा डोळे झांकून स्वस्थ बसले व आपल्याशींच म्हणाले कीं, 'राजाला राज्य मिळालें, तरी बटकीचें बटिकपण कांहीं सुटत नाहीं, महाराज चालूं द्या आपला डाव.' राजबंधूंस अप्पांचे हे उद्गार चमत्कारिक वाटले व त्यांच्या अर्थाविषयीं ते पृच्छा करूं लागले. नारायणाप्पा म्हणाले, 'मी म्हणतों तें अक्षरशः खरें आहे. तुम्ही

जर उद्यां राजा झालां तर त्यायोगें माझ्या स्थितींत काय फरक होणार आहे ? मी कुळकर्णी तो कुळकर्णीच. ' एवढ्यानें राजबंधूचें समाधान होईना. त्यानें अधिक खुलासा करण्याची विनंति केली. त्यावर नारायणाप्पा म्हणाले कीं, 'पालीच्या शब्दावरून मला असें कळून चुकलें आहे कीं, नगरचा राजा आपला बंधु मृत झाला असून गादीवर बसण्यासाठीं आपल्याला लवकरच आमंत्रण येईल.' हें ऐकतांच राजबंधु म्हणाला," तुमचें भविष्य जर खरें ठरलें व मी गादीवर बसलों, तर मी तुमची माझ्या कारभाऱ्याच्या जागीं नेमणूक करीन. " कांहीं दिवसांनंतर नारायणाप्पांचें भाकित खरें ठरलें. राजबंधूस बोलावून नेण्यासाठीं छत्रचामर पालखी वगैरे राजचिन्हें घेऊन अधिकारी आले व राजबंधु आपल्या परिवारासह नगरास तांतडीनें निघून गेला. नारायणाप्पांना भजनपूजनाच्या नित्य क्रमांतून मोकळे झाल्यावर ही बातमी लागली, तथापि त्यावेळीं ते स्वस्थ राहिले. मात्र कांहीं दिवसांनीं नारायणाप्पा नगरास राजदर्शनास गेले. तेथें जातांच नवीन राजानें त्यांचा योग्य प्रकारें सत्कार करून त्यांस आपलें मंत्रिपद अर्पण केलें. पुढें कांहीं दिवसांनीं राजगुरू व नारायणाप्पा ह्यांच्यांत बेबनाव झाल्यामुळें त्यांनीं मंत्रिपदाचा त्याग केला व ते परत मल्लापूर गांवीं यावयास निघाले. त्यावेळीं राजानें त्यांस कांहीं जमिनीचीं इनामें करून दिलीं. शिरावर धारण करण्याकरितां सुंदर अक्षरें व वेलबुट्टी कोरलेला एक रुप्याचा पट्टा दिला. त्यावेळीं तो एक बहुमानाचा प्रकार समजला जात असे. त्यावेळेपासून नारायणाप्पांस 'लपट्टे नारायणाप्पा' असें लोक संबोधूं लागले. त्याचप्रमाणें नारायणअप्पा बाहेर निघतेवेळीं त्यांच्या डोक्यावर आबदागिरी धरण्याकरितां होनावर तालुक्यांतील हळदीपूर येथील कांहीं जमीन तोडून दिली. अद्यापि त्या जमिनीला तेथील भाषेंत "पक्के वुंबळी" अबदागिरीची इनाम जमीन असें म्हणतात. ह्याप्रमाणें लपट्टे नारायणाप्पा आपल्या गांवीं येऊन राहिल्यानंतर नगराधिपतीकडून **गेरसप्पा** व **चंदावर** या **उभय** प्रांतांचा त्यांस कारभार मिळाला व त्यामुळें त्यांस **उभयकर** असें लोक संबोधूं लागले. चरित्रनायक नारायणरावांनीं मुंबईस आल्यावर चंदावरकर असें नांव जरी योजिलें व उभयकरांच्या वंशजांत आज चंदावर व चंदावरकर हीं दोन नांवें जरी प्रचारांत आहेत, तरी त्यांच्या कुटुंबांचें मूळ उपनांव उभयकर हेंच असून पुष्कळ कुटुंबें उभयकर ह्या उपनांवाचाच आज उपयोग करीत आहेत. हें ह्या चरित्रास प्रथम शाखेचा जो वंशवृक्ष जोडला आहे त्याचेवरून दिसून येईल. उभयकर कुळाचे मूळ पुरुष नारायणाप्पा व लक्ष्मीबाई होत व येथूनच वंशवृक्षास प्रारंभ झालेला आहे.[१]

---

१ हा वंशवृक्ष पुष्कळ वर्षें मेहनत करून रा. रा. "दास" ऊर्फ शंकर शेषगिरि उभयकर ह्यांनीं तयार केला. वंशवृक्षाच्या तीन शाखा शंकररावांनीं दाखविल्या

ह्या चंदावर गांवच्या हद्दींत सर नारायणरावांच्या तीर्थरूपांकडे वंशपरंपरेनें आलेली जमीन असून तिचें उत्पन्न मल्लापूर येथील श्री आवेडीच्या मंदिराकडे आतां

---

आहेत. नारायण गणेश चंदावरकर हे प्रथम शाखेंतच येत असल्यामुळें दुसऱ्या दोन शाखांचा विस्तार येथें दाखविलेला नाहीं. रा. रा. शंकररावांनीं जुनी माहिती मिळवून देण्याच्या कामीं पुष्कळ सहाय्य केलें. ते आमच्या बरोबर होनावर येथें आले, तेथून मल्लापूर व चंदावर येथेंही त्यांनींच आम्हांस नेलें. मल्लापूर येथें श्री. सौ. आवडीदेवी यांनीं स्थापिलेल्या देवळाचा जीर्णोद्धार रा. रा. शंकररावांनींच वर्गणी जमवून, स्वतः प्रथम मोठा आंकडा घालून व स्वतः अंगमेहनत करून केला. ह्या जीर्णोद्धारासाठीं सर नारायण चंदावरकरांनीं रु. १५०० ची देणगी दिली होती. शंकररावांनीं आम्हांस जें सहाय्य केलें त्याबद्दल त्यांचे जाहीर रीतीनें मनःपूर्वक आभार मानतों.

२ रा. रा. सुब्राव गोपाळ उभयकर, सर नारायण ह्यांचे चुलतबंधु, ह्यांनीं श्री रमावल्लभदासविरचित श्रीकृष्णजयन्तिव्रतोत्सव भजन नामक जें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे व ज्यास त्यांनीं रमावल्लभदासांचें चरित्र जोडलें आहे त्यांत सर नारायण चंदावरकर व सौ. लेडी लक्ष्मीबाई ह्यांच्यासंबंधानें पुढील उल्लेख आहे :—

"येथें प्रेमभरामुळें हेंही लिहावेंसें वाटतें कीं, माझे प्रिय चुलतबंधु सर नारायण-राव चंदावरकर पूर्वीचे न्यायमूर्ति व हल्लींचे (हे पुस्तक लिहिलें गेलें त्यावेळीं सर नारायण इंदूर संस्थानचे मुख्य दिवाण होते.) इंदूरचे दिवाण—हेही ह्याच पवित्र कुळांत जन्मले आहेत. यांचें उपनाम उभयकर, पण प्रवेश परीक्षेच्यावेळीं ह्यांनीं चंदावरकर असें लाविलें होतें तेंच पुढें चालू झालें. भगवद्भक्ति व विशिष्ट तेजस्विता हे गुण लहानपणींच त्यांच्या ठिकाणीं दिसून येत होते. आपण एक विशिष्ट अधिकारी होऊन बाकीच्या लोकांना--आपल्यापेक्षां वडिलांना सुद्धां--हातां-खालीं घेऊन कचेरी भरविण्याचा खेळ हे खेळत असत. देवाची (गोकुळच्या कृष्णाची) घोंगडी म्हणून घेऊन बरोबरच्या मुलांबरोबर भजन करीत नाचत असत. ह्याप्रमाणें भक्तीचें बीज लहानपणींच त्यांच्या मनोभूमिकेंत रुजलें गेलें आहे. त्यांच्या पत्नीही तशाच सुशील व परमार्थाच्या अधिकारी आहेत. परमेश्वर कृपेनें त्यांना ऐहिक संपत्तीची सीमा प्राप्त झाली आहे, त्याचप्रमाणें त्यांचा अव्यभिचार भक्तिवृक्षही प्रफुल्लित होऊन त्याला उत्तम अपरोक्ष--ज्ञानफळ--हृदयभुवनांतील निरतिशयानंद— प्राप्त होवो व हें लक्ष्मीनारायणाचें जोडपें आपल्या पूर्वज लक्ष्मीनारायणाच्या (आवडीबाई व नारायणाप्पा ह्यांच्या) दंपतीप्रमाणें कृतकृत्य व साधुमान्य होवो अशी मी सर्वांतरयामी सच्चिदानंद श्रीकृष्ण परमात्म्याच्या चरणीं अनन्यभावें प्रार्थना करितों."

दिलेलें आहे. जमिनीवरील हक्कही चंदावरकर कुटुंबानें सोडलेला आहे असें मंदिराच्या एका ट्रस्टीकडून कळलें.

## होनावर

साधारणपणें पाउणशें वर्षामागें आपण गेलों तर उत्तर कानडा प्रांताचें होनावर हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असल्याचें दिसून येतें. त्यावेळीं येथें डिस्ट्रिक्ट जज्जाचें कोर्ट होतें, त्याच प्रमाणें एक असिस्टंट कलेक्टरही होता. त्यावेळीं होनावरची लोकसंख्या ११९६८ होती ती १८८१ सालीं ५८१३ वर आली. ह्यावरून त्या शहरास कशी उतरती कळा लागली असली पाहिजे ह्याची कल्पना होते. पूर्वीं होनावर येथें चंदनावरील नाना प्रकारचें नक्षीकाम फार सुंदर होत असे. असें म्हणतात कीं १८६७ सालीं पॅरिस येथें भरलेल्या प्रदर्शनांत कोणा सुबण्णा नांवाच्या कारागिराला चंदनावरील कोरकामासाठीं चांदीचें पदक मिळालें होतें. होनावर हें हल्लीं एक तालुक्याचें ठिकाण झालें असून पूर्वीच्या कोर्टाच्या वगैरे जागा आतां बंदराच्या बाजूला दाखविण्यांत येतात. त्याच प्रमाणें जुन्या किल्ल्याची जागा अद्याप दाखविण्यांत येते. येथें पोर्तुगीज लोकांची वखारही होती. तिची जागाही दाखविण्यांत येते. ह्या जागेस तेथें फिरंगी भाट असें म्हणतात.

परंतु होनावर शहरास ऐतिहासिक दृष्टया फार महत्त्व आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. जैन कवि पंप (इ. स. ९०२–४३) ह्यानें रचलेल्या कानडी रामायणांत हनुवर नांवाच्या बेटाचा उल्लेख असून त्या ठिकाणीं त्यावेळीं एक स्वतंत्र राजा राज्य करीत होता असा उल्लेख आढळतो. गॅझेटियरवरून असें कळतें कीं, अबदुल फिदा (१२७३–१३३१) ह्या अरब भूगोल शास्त्रज्ञानें होनावराचा उल्लेख केलेला आहे. १३४२ सालीं इब्न बटुटा नांवाचा आफ्रिकन प्रवासी ह्यानें होनावर किंवा हिनार (Hinaur) असें नांव घेऊन ह्या ठिकाणीं मोठमोठीं जहाजें लागत असत व येथें विशेषतः अरबांची वस्ती असून ते फार धार्मिक असल्याचें म्हटलें आहे. पुरुष हुषार, दर्यावर्दी, लढवय्ये, स्त्रिया सुंदर व पवित्राचरणी असत असें त्यांचें वर्णन आढळतें. पुरुष व स्त्रियांस सबंध कुराण मुखोद्गत असे. म्हणूनच कदाचित् ह्या लोकांना मोठे धार्मिक असें ह्या प्रवाशानें म्हटलें असावें. एकंदरींत हा प्रांत त्यावेळीं बराच पुढारलेला होता असें दिसतें. कारण येथें मुलांसाठीं २३ व मुलींसाठीं १३ शाळा होत्या. जमालुद्दीन महमद इब्न हसन नांवाचा राजा त्यावेळीं होनावरचा राजा असून तो विजयानगरच्या (१३३६–१३५०) हरिहरअप्पा नामक राजाचा मांडलीक होता. परंतु राजा ह्या दृष्टीनें तो फार चांगला होता. त्याच्या पदरीं ६००० सैन्य होतें. आणि मलबारचे लोक जात्या आपल्या हुषारीबद्दल जरी प्रसिद्ध होते, तरी

ते जमालुद्दिनला भिऊन होते. पुढें १४४४ सालीं पर्शियन वकील अबदुर रझक हा होनावर येथें आल्याचा उल्लेख आढळतो. तो प्रथम विजयानगरपर्यंत जाऊन आला व पुढें इराणांत जावयासाठीं त्याला होनावर येथें जहाज मिळालें व त्याला स्वदेशीं पोंचावयास जवळ जवळ तीन महिने लागले.

पंधराव्या शतकांत होनावर हें व्यापाराचें मोठें प्रसिद्ध ठिकाण होतें. पोर्तुगीज इतिहासलेखक फ्रारिआ डिसोझा ह्याचें असें म्हणणें आहे कीं, १४६९ सालीं बहामणी सेनापति मलिक उल तुजार ह्यानें ज्यावेळीं गोवा हस्तगत केलें त्यावेळीं होनावर येथील मूर लोकच गोव्याचे मालक होते. बहामणी सत्तेखालील गव्हर्न-रानें विजयानगरच्या राज्यांतर्गत सर्व बंदरांविषयीं इतके कडक नियम केले कीं, मूर लोकांनीं होनावर सोडलें व सर्वांनीं गोव्यास येऊन वसाहत केली. त्यावेळीं त्यास नवीन गोवें म्हणत, आतां त्यांच्या वसाहतीस जुनें गोवें म्हणतात, पण त्यावेळीं तें शहर त्यांच्या सन्मानार्थ वसविलें गेलें इतकें त्या लोकांचें त्यावेळीं वर्चस्व व महत्त्व होतें. १४९८ सालीं तिमय्या हा होनावरचा राजा होता. त्यानें आठ लढाऊ जहाजें घेऊन अंजिनदिवाजवळ वास्कोदिगामाचीं जीं जहाजें होतीं त्यांवर छापा घातला; परंतु वास्कोदिगामाच्या आरमारानें तिमय्याच्या जहाजांची दाणादाण केली. पुढें १५०३ सालीं तिमय्याच्या जहाजांचा पाठलाग करून पोर्तु-गीजांनीं त्यांस अडचणीच्या दरींत आणिलें, तेथें जरी त्यांच्यावर हल्ले झाले, तरी अखे-रीस तिमय्याचीं माणसें जहाजें टाकून निसटलीं व तीं पोर्तुगीजांनीं जाळून टाकलीं. नंतर ते दुसऱ्या मार्गानें होनावरास गेले, तेथें त्यांच्यावर हल्ले झाले, पण होनावरच्या लोकांचा पराजय झाला, पोर्तुगीजांनीं शहराला आग लावून दिली.

१५०५ सालीं पहिला पोर्तुगीज व्हाइसराय ह्या नात्यानें आलमीडा होनावर येथें गेला, पण तेथें त्याचें चांगलें आदरातिथ्य झालें नाहीं असें वाटल्यावरून त्यानें होनावरावर हल्ला केला. त्यावेळीं होनावर येथील लोक मोठ्या शौर्यानें लढले. त्यांनीं बाणांचा शत्रूवर सारखा वर्षाव केला. ह्या बाणांपैकींच एक बाण लागून आलमीडा जखमी झाला, त्याच्या जहाजानें पेट घेतला, शहरांतही आग पसरली. त्यावेळीं पोर्तुगीजांना धुराचा फार त्रास झाला असें ग्याझेटिअरमध्यें नमूद केलें आहे. आल-मीडाचा मुलगा लोरेंझो हा शहराच्या मागच्या बाजूस जाण्यासाठीं लांबच्या वाटेनें गेला, पण तेथें त्याला शत्रूच्या सैन्यानें गांठलें. त्या सैन्यानें त्याचा पराभवही केला असता, पण, इतक्यांत त्याचा बाप आलमीडा तेथें आल्यामुळें त्याचा बचाव झाला. हें वर्तमान तिमय्यास कळतांच तो किल्ल्याच्या बाहेर आला व आलमीडाशीं तहाचें बोलणें त्यानें सुरू केलें, व होनावरच्या राजानें पोर्तुगीजांचें प्रभुत्व पत्करावें असें ठरलें. तथापि वरथेमा नांवाच्या इटालिअन प्रवाशानें ह्याच सुमारास होनावरसंबं-

धानें असें म्हटलें आहे कीं, तेथील राजा विजयानगरच्या राजाचा मांडलीक होता. परंतु पुढें होनावरावर पोर्तुगीजांचीच सत्ता झाली व आपल्या प्रभुत्वा-निमित्त सालिना तांदळाचे २००० गोण खंडणीदाखल त्यांस मिळूं लागले. १५४७ सालीं पोर्तुगीजांचे कारखाने होनावर येथें असल्याचा उल्लेख आढळतो आणि १५५४त होनावर व्यापाराचें महत्त्वाचें ठिकाण असून तेथून एडनपर्यंत व्यापार चालत असे. १५६८ सालीं डान लुइ अॅथेड ह्या बाराव्या व्हाइसरायनें होनावर आपल्या ताब्यांत घेतलें व तेथें एक किल्ला बांधला. होनावरच्या राणीनें आदिलशाही सैन्याच्या सहा-य्यानें होनावर परत मिळविण्याचा प्रयत्न केला, पण तिला यश आलें नाहीं. १५७० सालीं अहमदनगर, विजापूर व कालिकत हीं पोर्चुगीजांशीं विरोध करण्यापुरतीं एक झालीं व होनावर, कालिकत व गोवा विजापुराच्या स्वाधीन करण्याचा विचार कायम झाला. गेरसप्पाच्या राणीनें पोर्चुगीजांस तोंड देण्याचें ठरविलें, पण गोव्याहून योग्य वेळीं मदत आल्यामुळें होनावरचा बचाव झाला. दुसऱ्या वर्षीं डान लुइ आरमार घेऊन होनावर येथें गेला, व शत्रूंच्या जहाजांस आग लावून त्यानें त्यांचा नाश केला. ह्या वेळीं होनावर शहर गजबजलेलें होतें. एक आठवडाभर डान लुईशीं लोकांनीं टक्कर दिली, परंतु पुढें लोकांनीं शहर सोडलें व शत्रूंनीं शहरास आग लावून दिली! १५९० सालीं होनावर पुन्हां भरभराटीच्या स्थितींत आढळतें. ह्या वेळीं होनावर येथें मिऱ्यांचें उत्पन्न दांडगें होतें व उत्तम मिरीं येथें तयार होत असे. १५९९–१६००च्या सुमारास भटकळच्या राणीच्या ताब्यांत होनावर होतें. व्यापारावर राणीची सत्ता असे व पोर्तुगीज राणीचें प्रभुत्व मान्य करून होते. पुढें १६२३ सालीं होनावर हें व्यापाराचें एक लहानसें ठिकाण असल्याचें वर्णन एका इटालिअन प्रवाशानें केलें आहे. तो म्हणतो कीं येथें घरांपेक्षां झोंपड्या अधिक होत्या. किल्ला मोठा होता व तो पोर्तुगिजांनीं बांधला होता तरी पूर्वीं हिंदूंच्या सत्तेच्या वेळीं तेथें हिंदूंनीं किल्ला बांधला होता, त्याच्याच पायावर हा किल्ला उभारला गेला होता. किल्ला ज्या टेकाडावर होता, तेथें कप्तान साहेबांची व्यवस्था चांगली होती. बागबगीचा, घोडेप्यादे होते. रस्ते प्रशस्त होते व एका सार्वजनिक चौकामध्यें शत्रूचा त्रास होऊं लागला, म्हणजे गांवचे लोक येऊन जमत असत. पोर्तुगीजांचीं दोन देवळें त्यावेळीं होतीं व जवळच एक ब्राह्मणी शहर वसविलें होतें. विजया-नगराचा राजा वेंकटाप्पा हा १६३१ मध्यें केलेल्या तहाच्या जोरावर होनावरहून जें मिरीं जाई त्यावर कर घेत असे. १६५० च्या सुमारास एका डच प्रवाशानें असें वर्णन केलें आहे कीं होनावर एका काळीं जरी मोठें व्यापाराचें ठिकाण होतें तरी पोर्तुगीजांनीं सर्व व्यापार गोव्यास नेल्यामुळें होनावरचें महत्त्व आतां अगदीं कमी झालें आहे. परंतु पुढें अनेक तह व करारनामे होऊन पोर्तुगीजांचा होनावर येथील व्यापार वाढला.

१७२७ सालीं होनावर येथें इंग्रजांची एक वखार स्थापन करण्यांत आली. मिरीं व चंदन ह्यांचा व्यापार करण्यासाठीं ही वखार उघडली व व्यापाराच्या निमित्तानें कांहीं इंग्रज येथें राहिले. परंतु ह्याच सुमाराला ह्या प्रांतीं मराठ्यांनीं धुडगूस घातल्यामुळें व्यापार बंद ठेवणें भाग पडलें; बदतूर, बिळगी वगैरे प्रांतांतील लोक शेतें वगैरे न करितां घरेंदारें सोडून मराठ्यांच्या लुटालुटीला कंटाळून बाहेर पडले. १७६३ सालीं हैदरअल्ली व होनावरच्या वखारीवरील अधिकारी ह्यांची मुलाखत होऊन व्यापार चालू आहे तो तसाच चालविण्याची परवानगी मिळाली. बुचानननें मिळविलेल्या माहितीवरून असें दिसतें कीं, नऊशें खंडी मिरीं वखारींत येत असे. ह्या वर्षीं हैदरअल्लीनें बदतूर हें आपलें राजधानीचें ठिकाण करावयाचें ठरवून होनावर व मंगलोर येथें गोद्या तयार करविल्या. हैदरअल्लीचें व इंग्रजांचें पुढें १७६६ पासून बनेनासें झालें व १७६८ सालीं इंग्रजांनीं मराठ्यांचें सहाय्य मिळविण्याचा प्रयत्न चालविला. कांहीं जहाजें व ४०० युरोपियन लष्कर देऊन हैदरशीं लढाई करण्यासाठीं पाठविण्यांत आलें. हैदरअल्लीनें आरमाराची तयारी ठेविली होती, परंतु कप्तानांत असंतोष पसरला होता; कारण भलत्याच मनुष्याला आरमाराचें आधिपत्य देण्यांत आलें होतें. त्यामुळें इंग्रजांचा हल्ला होतांच हैदरअल्लीचे कप्तान इंग्रजांस मिळाले; त्यामुळें बसवराज दुर्ग इंग्रजांच्या सहज ताब्यांत आला. व तेथें दुर्गाच्या रक्षणासाठीं इंग्रजांनीं थोडें सैन्य ठेविलें; परंतु इतक्या सहज रीतीनें मिळालेला दुर्ग इंग्रजांच्या ताब्यांत फार दिवस राहिला नाहीं. कांहीं महिन्यांनीं हैदरअल्लीनें आपलें सैन्य रवाना केलें व विशेष रक्तपात न होतां त्याच्या सैन्यानें होनावरचा किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. ओरिएंटल मेमॉयर्सचे कर्ते मि. फोर्ब्स १७७२ च्या सुमारास कर्नाटकाच्या किनाऱ्यानें गेला त्यावेळीं सर्व प्रदेश हैदरअल्लीच्या ताब्यांत असल्याचें त्यास आढळून आलें. घरें वगैरे झोंपडीवजाच होतीं. इंग्रजांची वखारच सर्व घरांत चांगल्या थरांत मोडत होती. तेथें इंग्रजांचे दोन प्रतिनिधी मिरीं व चंदन विकत घेऊन चीनकडे रवाना करण्यासाठीं रहात असत. परंतु फोर्ब्स म्हणतो कीं होनावर व मुंबई ह्यांच्या दरम्यान खाजगी रीतीनें सुपारी व दुसऱ्या वस्तू यांचा मोठा व्यापार चालत असे. सर्व भागांत तांदूळ, सुपारी, नारळ ह्यांचें उत्पन्न असेच, परंतु चंदनाची निपज सर्वांत मोठी व येथून चंदन मोठ्या प्रमाणावर परदेशीं पाठविण्यांत येत असे. फोर्ब्सनें त्यावेळचीं रानें पाहून असें लिहून ठेविलें आहे कीं चंदनाचीं झाडें हल्लीं वाढतात त्यापेक्षां आणखी मोठीं होतील; परंतु चंदनाची मागणी फार असल्यामुळें झाडांची पुरेशी वाढ लोक होऊं देत नाहींत व एक फुटाचा घेर होतांच झाड तोडून टाकतात. चंदनाच्या रंगावरून व आकारावरून त्यांच्या जाती ठरविलेल्या असून त्यांच्या उच्चनीच जातींप्रमाणें

त्यांच्या किंमतींत फरक असतो. फोर्ब्स येऊन गेल्यानंतर सुमारें ४ वर्षांनीं पार्सन्स नांवाचा एक इंग्रज प्रवासी ह्या प्रांतीं येऊन गेला. तो म्हणतो कीं किनाऱ्यापासून एक मैलावर व होनावरच्या उत्तरेकडे चार–पांच मैलांवर बसवराज दुर्ग असून त्याच्याभोंवतीं मजबूत तट असून बुरुजावर सशस्त्र शिपायांचा पहारा होता. दक्षिण टोकाच्या दिशेसही एक किल्ला होता व त्यावर आठ तोफा ठेवलेल्या दिसत होत्या. होनावर येथें वखारीवर इंग्रजांचें निशाण फडकत होतें व किल्ल्यावर हैदरअल्लीचें निशाण दिसत होतें. ही १७७५ तील गोष्ट. ह्यावेळीं तेथें मि. टाऊन्सेंड नांवाचे गृहस्थ आपल्या पत्नीसह कंपनीसरकारच्या वतीनें रहात होते. त्यांच्या येथें एके दिवशीं संध्याकाळीं ४ च्या सुमारास पार्सन्स गेला व त्याचें उत्तम रीतीनें स्वागत झालें. पार्सन्सच्या हें लक्षांत यावयास वेळ लागला नाहीं कीं, मिरीं, चंदन वगैरे वस्तूंचा इंग्रजांचा व्यापार दांडगा होता, तरी मालाच्या निपजेवर हैदरची सर्व सत्ता होती. त्यावेळीं पार्सन्सनें दोन मोठीं लढाऊ जहाजें अर्धवट तयार झालेलीं पाहिलीं. पार्सन्सनें ह्या जहाजांस Frigate असें म्हटलें आहे. हल्लीं ज्यांना क्रूझर्स म्हणतात त्यांनाच पूर्वी Frigate म्हणत असत. ह्यावरून ह्या जहाजांच्या आंतील रचनेची कल्पना करितां येईल. एका जहाजावर ३२ व दुसऱ्यावर २४ तोफा ठेवण्याची व्यवस्था असून जहाजें बांधून तयार झालीं म्हणजे उत्तम लढाऊ गलबतें होतील असें पार्सन्सनें म्हटलें आहे.

१७८३ सालीं ज्यानुआरी महिन्यांत होनावरचा किल्ला इंग्रजांच्या ताब्यांत आला व तेथें सर्व दारूगोळा व सैन्य कॅप्टन टोरिआनो ह्याच्या देखरेखीखालीं ठेवण्यांत आलें. हा किल्ला हस्तगत करतांना स्वतः कॅप्टनला दुखापत झाली होती. त्यावेळीं त्याच्या ताब्यांत ७४३ माणसें असून त्यांपैकीं १०३ युरोपियन होते. २३ ज्यानुआरी रोजीं एक मैलावरील बसवराज दुर्ग त्यानें आपल्या ताब्यांत घेतला व त्यामुळें त्याचें सामर्थ्य प्रत्ययास आलें. मार्चमध्यें जनरल मॅथ्यूज नामक अधिकाऱ्याचा बदतूर येथें पराजय झाला व त्याला तह करावा लागला. कुंदापूर येथें ब्रिटिश सैन्य होतें त्यास तेथून पळ काढावा लागला. त्यांचें टोरिआनोनें रक्षण करण्याचा प्रयत्न केला व कांहीं युरोपिअन व देशी शिपायांना त्यानें होनावरच्या किल्ल्यांत आश्रय दिला. त्याचा परिणाम असा झाला कीं, ता. १० रोजीं बदतूरहून कॅप्टन टोरिआनोला एक हुकुमवजा पत्र आलें कीं, त्यानें प्रथम होनावरचा आपल्या हातांनीं नाश करून होनावर ताबडतोब सोडून जावें. हा विचित्र हुकूम टोरिआनोच्या वरिष्ठांस मान्य आहे असेंहि त्यांत म्हटलें होतें. तथापि टोरिआनोनें हा हुकुम मान्य केला नाहीं व पुढें काय होतें तें पहात तो किल्ल्यांतच राहिला.

ता. १२ मे रोजीं किल्ल्यावर बातमी आली कीं, टिपूचा एक मोठा सरदार

लतीफ अली १०००० फौज घेऊन आपल्यावर चाल करून येत आहे. दहा हजार लष्कर घेऊन जरी तो येत नसला तरी तो मोठ्या तयारीनें येत आहे असें जाणून कॅप्टन टोरीआनो किल्ल्याच्या बाहेर आला व एकंदर परिस्थिति टेहळण्यासाठीं जीं आगाऊ माणसें आलीं होतीं त्यांची त्यानें दाणादाण करून टाकली. परंतु दुसऱ्याच दिवशीं लतीफ अलीचें सैन्य येऊन थडकलें व प्रचंड सैन्यापासून आपल्याला खात्रीनें त्रास होणार अशी कल्पना करून होनावर शहरांतील दोन हजार माणसें किल्ल्यांत आश्रयासाठीं आलीं. ह्याच दिवशीं लतीफ अलीचीं जीं माणसें पुढें लढण्यासाठीं आलीं होतीं त्यांचा पराभव झाला. अशा प्रकारें दोन वेळां पराभव झाल्यामुळें तोफांच्या सहाय्यानें किल्ला उडवून देण्याचा त्यानें विचार चालविला व १० जूनला त्यानें किल्ल्यावर तोफा सोडल्या. किल्ल्याच्या भिंती तीन फूट रुंद असल्यामुळें ह्या मारामुळें आंत त्रास झाला व म्हणून कॅप्टनसाहेब स्वस्थ न बसतां त्यांनीं वरून असा मारा केला कीं, त्यांचा तोफखाना पाडला व त्यांच्या तोफा निरुपयोगी करून टाकल्या! दुसऱ्या दिवशीं लतीफनें किल्ल्यावर हल्ला केला, पण त्यावेळींही त्याचा पराभव झाला. पुढें १ जुलैपर्यंत दोन्ही पक्ष स्वस्थ होते. नंतर वारंवार हल्ले व्हावेत व किल्ल्यांतील लोकांनीं त्यांचा प्रतिकार करावा असा प्रकार चालला होता. किल्ल्यांतील लोक आंत अडकून पडले होते. सामुग्री संपुष्टांत आली होती. त्यांतूनही आंत रोगराई वाढली व आंवेच्या रोगाला पुष्कळ माणसें बळी पडलीं. इतक्यांत टिपू व ब्रिटिश कमांडर ह्यांच्या दरम्यान कांहीं तात्पुरता तह झाला. त्यांत अशीं कलमें होतीं कीं तहांत नमूद केलेल्या अवधींत कोणीही लढाईची नवीन तयारी करूं नये व महिन्यांतून एक वेळ इंग्रजांकडे सामुग्री पोंचविण्याची व्यवस्था व्हावी. परंतु लतीफनेंच ह्या अटीनुसार वर्तन न करण्यास प्रारंभ केला व केवळ धाकदपटशाच्या जोरावरच किल्ल्यावर पाठविण्यासाठीं सामुग्री मिळूं लागली. ह्यानंतर लतीफची उचलबांगडी होऊन त्याच्याजागीं मिरझा खान आले. त्यानें दोन आरमारांचें रक्षण करण्यासाठीं आमचा एक मनुष्य किल्ल्यावर असावा असें बोलणें चालविलें. असली चमत्कारिक अट मान्य करण्याइतका कॅप्टन टोरिआनो भोळसट नव्हता. त्यानें ती मागणी धुडकावून लाविली. नंतर मिरझानें उघडपणें किल्ल्यावर हल्ला करण्याचा विचार केला. किल्ल्यांतील माणसें तयारींतच होतीं, हें कळतांच हल्ला झाला नाहीं. परंतु पुढें किल्ल्यांत आजार फार वाढला, खावयास कांहीं नाहीं, बाहेरून पुरवठा नाहीं, आंतील खाण्यासारखीं सर्व जनावरें एकामागून एक नाहींशीं झालीं व एखाद्या दिवशीं एखाद्याच्या वांट्याला भाजलेली घूस जर आली तर त्यास त्या दिवशीं मिळालेली ती मोठी मेजवानी असें वाटूं लागलें! इतक्यांत मंगलोर ब्रिटिशांच्या ताब्यांतून गेल्याची बातमी आली. १७७४ च्या पहिल्या सहा आठवड्यांत पांचशें

माणसें मृत्युमुखीं पडलीं, व अवघीं ६० माणसें राहिलीं. त्यांतही आजार होताच. अशी अडचणींची पराकाष्ठा झालेली स्थिति असतां मिरझाखान ह्यानें उघड लढाई न करितां बसवराज दुर्ग आपल्या ताब्यांत घेतला. अखेरीस कॅप्टन टोरिआनोस कळलें कीं जनरल मॅक्लाइड ह्यांचा मुक्काम होनावर येथें आहे. त्याबरोबर त्यानें आपल्या केविलवाण्या स्थितीचें वर्णन करून पत्र लिहिलें. रोगराईमुळें आपलें कसें नुकसान झालें, खावयास कांहीं न मिळाल्यामुळें जीव धरून राहिलेल्या माणसांचे कसे हाल होत आहेत ह्याचेंही त्यानें वर्णन केलें. व आपल्याला ताबडतोब मदत करावी अशी विनंति केली. पण मिरजा खानानें हें पत्र मधल्यामध्येंच दाबलें! त्यामुळें किल्ल्यांतील स्थितीचें कांहीं ज्ञान न होतां तो निघून गेला. ह्याच सुमारास वर ज्या फोर्ब्सचा उल्लेख आला आहे तो मि. फोर्ब्स जनरल इलिअट बोटीनें स्वदेशीं होनावरच्याच मार्गें गेला. त्यानें म्हटलें आहे कीं, कॅप्टन टोरीआनोची किती केविलवाणी स्थिति होती याची आम्हांला चांगली कल्पना होती. किल्ल्याला वेढा पडलेला, आंत आजारामुळें मृत्यूचें प्रमाण भयंकर वाढलेलें, अन्नसामुग्री संपलेली, बाहेरून सामुग्री मागितली तर मिळत नाहीं अशी स्थिति, आणि हें सर्व माहित असून किल्ल्यावरून आम्ही गेलों, पण आम्हांला कांहीं मदत करितां आली नाहीं, याचा अनुभव येतांच आम्हांला किती खेद झाला असला पाहिजे याची कल्पनाच केली पाहिजे. ह्यावरून विशेष आश्चर्य वाटतें तें असें कीं, कॅप्टनच्या केविलवाण्या स्थितीची कल्पना फोर्ब्सला असावी, पण खुद्द होनावर येथें येऊन गेलेल्या मेजर जनरलला कांहीं माहिती नसावी अशी स्थिति असतांना १६ मार्च रोजीं कॅप्टन टोरिआनोच्या हातांत मद्रासच्या कमिशनर्सकडून आलेला खलिता पडला कीं, आतांपर्यंत होनावर, कारवार व सदाशिवगड हीं ठिकाणें जर तुमच्याच ताब्यांत असतील तर तीं सोडून तुम्ही मुंबईचा मार्ग धरा! दोन दिवसांनींच, म्हणजे ता. १८ रोजीं होनावरपासून कांहीं अंतरावर हरोके नांवाचें जहाज दिसूं लागलें व त्यांत सामानसुमान, सैन्य सर्व कांहीं घालून मुंबईस निघून येण्याचा दुसरा हुकुम ह्या जहाजाबरोबरही आला. कॅप्टन टोरिआनोनें बरेच आढेवेढे घेतले, परंतु त्याचा कांहीं उपयोग न होतां ता. २६–२७ च्या सुमारास त्यास जीं कांहीं माणसें जगलीं तेवढीं घेऊन कूच करावा लागला. एवढे दिवस आपण टिकाव धरला पण अखेरीस किल्ला सोडावा लागला ह्याबद्दल टोरिओनोला खेद झाला. तथापि मुंबई सरकारनें त्याच्या शौर्याची तारीफ केली व त्यास कॅप्टनचें एकदम मेजर केलें. इकडे सैन्य वगैरे गेल्यावर टिपूनें मोठी बहादुरी केली. होनावर किल्ल्याचा व शहराचा त्यानें आपण होऊन नाश केला. परकीय लोकांस व्यापाराची सवलत दिल्यानें आपला देश मात्र अधिक भिकार होतो आणि परकी-

यांना आपल्या कारभारांत हात घालून लुडबुड करावयास साधन सांपडतें, असा त्यास धडा मिळाला, परंतु १७७२ सालीं बसवराज दुर्ग पुन्हां इंग्रजांच्या ताब्यांत आला. येथें आपलें सर्व आरमार ठेवतां यावें तशी तयारी टिपूनें केली होती. परंतु तीन लढाऊ गलबतें आलीं व त्यांवरील अवघ्या दोनशें माणसांनीं बरोबर आणिलेल्या तोफांच्या जोरावर गड काबीज केला. १८०० सालीं मन्रोला होनावर येथें एकही घर दिसलें नाहीं. चार पांच लहानशीं दुकानें उघडण्यांत आलीं होतीं. सरकारनें मदत केली म्हणून घरें बांधावयास कांहीं लोक पुढें आले. टिपूच्या जुलमामुळें सर्व व्यापाराचें वाटोळें झालें होतें. आतां थोडी शांतता होत आहे असें वाटून आसपासच्या गांवीं गेलेले लोक परत येऊं लागले होते. मुंबई, राजापूर, गोवा येथून ज्या बोटी येत, त्यांतील लोक सुपारी, नारळ, तांदुळ, सुके मासे इ० वस्तु आसपासच्या व्यापाऱ्यां-जवळून विकत घेत असत. परंतु ह्या वेळीं मलबाराकडील चांचे लोक जे समुद्रांत व नदींत जहाजें टाकून राहिले होते त्यांचा इतर जहाजांस फार त्रास होत असे. ते पिजन आयलंडच्या भोंवतालीं असत, म्हणजे होनावरपासून पंचवीस एक मैलांवर राहून त्यांची चांचेगिरी चालत असे. पुढील ४०–५० वर्षांत होनावरची पुष्कळ सुधारणा झाली. होनावर हें जिल्ह्याचें ठिकाण झालें. येथें सब–कलेक्टरचें ठाणें झालें. दिवाणी व फौजदारी कोर्टें झालीं. लोकसंख्या दिवसेंदिवस वाढूं लागली, लोकांत स्वास्थ्य नांदूं लागलें, व्यापार वाढला. सन १८५५ सालीं होनावर मद्रास इलाख्यांत मोडलें जात असे. त्यावेळीं होनावरची लोकसंख्या सुमारें बारा हजार होती. ह्याच सालीं आमचे चरित्रनायक नारायणराव चंदावरकर ह्यांचा जन्म होनावर येथें झाला. सात वर्षांनीं उत्तर कानडा प्रांत मुंबई इलाख्यांत प्रविष्ट करण्यांत आला व त्याबरोबर होनावरचें महत्त्व कमी झालें. होनावर हें जिल्ह्याचें ठिकाण न राहतां कारवार हें जिल्ह्याचें ठिकाण झालें.

## कारवार

उत्तर कानडा प्रांताचें आजही कारवार हें जिल्ह्याचें ठिकाण आहे. परंतु पूर्वी ह्या ठिकाणाला कांहीं महत्त्व नव्हतें हें लक्ष्यांत ठेवण्यासारख आहे. एके काळीं व तेंही साधारणतः एकाएकींच ह्या ठिकाणाला जें महत्त्व आलें तें मोठ्या प्रमाणावरील व्यापाराचें हें केंद्र होईल असें वाटलें म्हणून. वस्तुतः १८६२ च्या पूर्वी कारवार नांवाचें लहानसें शहरही नव्हतें! खरें पहातां कारवार हें नांव हल्लींच्या कारवार पासून तीन मैलांवर असलेल्या **काडवाड** नामक एका खेडेगांवावरून पडलें आहे. आणि आजचें कारवार शहर, समुद्रकाठीं असलेलीं आफिसें, व घरें, त्यांच्या लग-तच बांधलीं गेलेलीं घरें सर्व १८६२ नंतरचीं आहेत. कारवारचें बंदर हें पश्चिम

किनाऱ्यावरील उत्तम बंदर गणलें जातें. अफाट समुद्राला मागें टाकून नैसर्गिक योजनेनें बंदराचें संरक्षण झालें असून, किनारा फार मोठा, नयनमनोहर व रम्य आहे; सभोंवतालची नैसर्गिक शोभा अवर्णनीय आहे. येथील किनाऱ्यासारखा किनारा व सृष्टिसौंदर्य एकत्र असलेलीं ठिकाणें क्वचितच आढळतील. महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर ह्यांचे द्वितीय चिरंजीव सत्येंद्रनाथ कारवारचे डिस्ट्रिक्ट जज्ज असतां ह्या ठिकाणीं रवींद्रनाथ येऊन गेले होते. रवींद्रनाथ त्यावेळीं अगदीं तरुण म्हणजे फक्त २२ वर्षांचे होते. त्यावेळीं त्यांच्या मनावर जो परिणाम झाला, जे नाना विचार आले, जी काव्यस्फूर्ति झाली, त्याची अस्पष्ट कल्पना त्यांच्या आठवणींत "कारवार" ह्या प्रकरणांतील विवेचनावरून होईल. खुद्द बंदरासंबंधानें ते म्हणतात :—

The little harbour, ringed round with hills, is so secluded that it has nothing of the aspect of a port about it. Its crescent shaped beach throws out its arms to the shoreless open sea like the very image of an eager striving to embrace the infinite.

कारवारचें सृष्टिसौंदर्य पाहून त्यांनीं एक लहानशी कविता रचिली. ती प्रथमच त्यांच्या आठवणींत प्रसिद्ध झाली. ती येथें उतरून घेतों :—

Let me sink down, losing myself in the depths of midnight.
Let the Earth leave her hold of me, let her free me from
her obstacle of dust.
Keep your watch from afar, O stars, drunk though you
be with moonlight, and let the horizen hold its
wings still around me.
Let there be no song, no word, no sound, no touch; nor
sleep, nor awakening, but only the moonlight like a
swoon of ecstacy over the sky and my being
The world seems to me like a ship with its countless
pilgrims, vanishing in the far-away blue of the sky.
Its sailor song becoming fainter and fainter in the air,
While I sink in the bosom of the endless night fading
away, from myself, dwindling into a point.

**रविंद्रनाथांना** ही रूपांतरित कविता मूळ बंगालींत रचण्याची स्फूर्ति होण्यास पुढील प्रसंग कारण झाला :—

सत्येंद्रनाथांचा कारवार येथें मुक्काम असतांना एका चांदण्यारात्रीं कांहीं मंडळी

सहल करण्यास बाहेर पडली. कारवारसारखा सुंदर व भव्य समुद्रकिनारा निदान मुंबई इलाख्यांत तरी अन्यत्र नाहीं. किनाऱ्याच्या एका टोकाला दाट झाडी व रान असून त्यांतून डोंगरांतून नाचत–बागडत आलेली काळीनदी वहात येते व समुद्रास मिळते. एकीकडे समुद्राची शोभा, रात्रीच्या प्रहरीं दिसणारी वनश्री, रम्य शीतल चंद्रप्रकाश ह्यांपासून उत्पन्न होणारा आनंद मनमुराद लुटण्यासाठीं सर्व मंडळी गेली होती. प्रथम नदींतून थोडा प्रवास करून जवळच्या किल्ल्यावर सर्व मंडळी गेली व नदीकिनारीं येऊन सर्वांनीं बरोबर आणिलेल्या फराळावर हात मारला! सगळीच मंडळी परत चालत आली. त्यावेळीं सर्वत्र संपूर्ण शांतता होती. तो देखावा इतका सुंदर व रम्य होता कीं तोंडावाटे शब्द काढून त्या शांततेचा भंग करण्याचा विचारही कोणास सुचला नाहीं! आमच्या सावल्या आम्हांस सोबत करीत होत्या असें रवींद्रनाथांनीं म्हटलें आहे! घरीं गेल्यावर त्यांना स्वस्थ बसवेना अगर झोंप येईना, त्यावेळीं ही कविता रचण्याची स्फूर्ति त्यांना झाली!

त्याचप्रमाणें कारवार येथें असतांनाच प्रकृतीवर **प्रतिशोध** नामक काव्यमय नाटिका त्यांनीं रचिली. ह्या नाटिकेविषयीं लिहितांनाच त्यांनीं पुढील उद्गार काढले आहेत :—

The sea beach of Karwar is certainly a fit place in which to realise that the beauty of Nature is not a mirage of the imagination, but reflects the joy of the infinite and thus draws us to lose ourselves in it. Where the universe is expressing itself in the magic of its laws it may not be strange if we miss its infinitude; but where the heart gets into immediate touch with immensity in the beauty of the meanest of things, is any room left for argument ?

अशा प्रकारें सृष्टिसौंदर्यानें मोहित होऊन कारवार शहराची रचना झाली असली पाहिजे अशी जर कोणी कल्पना केली तर ती मात्र अगदींच चुकीची समजावी लागेल! व्यापारी सरकारनें मुख्यतः व्यापाराच्याच धोरणानें कारवार हें जिल्ह्याचें ठिकाण केलें असावें. कारण, १८६३ सालींच कारवारपर्यंत आगगाडी आणण्याचा बूट निघाला. कांहीं वर्षांनीं पहाणी वगैरे झाली, प्लॅन निघाले, सरकारनें पहिल्या तयारीच्यापायीं पाण्यासारखा पैसा खर्चला; कित्येक व्यापाऱ्यांनीं वखारीसाठीं व बंगल्यांसाठीं, दुकानांसाठीं तेथील व मुंबईच्या व्यापाऱ्यांनीं पांचपट दसपट किंमती देऊन जागा घेऊन वखारी व दुकानें बांधलीं देखील! अखेरीस कारवारपर्यंतची रेल्वेची कल्पना सोडून देऊन गोव्यापर्यंतची कल्पना पसंत पडली व ती अमलांत आली! कारवारच्या वखारी ओसाड पडल्या. आज त्यांचीं कांहीं

भिंताडें व मोठमोठीं आवारें पहावयास सांपडतात. आज कारवार शहर जिल्ह्याचें ठिकाण आहे. जिल्ह्याच्या ठिकाणीं असणारे सर्व अधिकारी शहराला लाभले आहेत. शाळा, इंग्रजी हायस्कूल, इस्पितळ, लायब्ररी, म्युनिसिपालिटी वगैरे आहेत. परंतु व्यापार वगैरे कांहीं नाहीं. लोक विशेष उद्योगी नाहींत, आणि भाजीपाला तयार करण्याची उत्सुकता नाहीं, दूध लोणी तूप यांचा भरपूर पुरवठा नाहीं असें हें ठिकाण आहे. ज्या काडवाड खेड्यामुळें कारवार हें नांव प्राप्त झालें तें जुनें खेडें असून त्यास ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्व आहे. सतराव्या शतकांत काडवाडशीं पोर्तुगीज लोकांचा प्रथम संबंध आला, व तेथें अनेक स्थित्यंतरें झालीं. त्यांचें येथें वर्णन करण्याची आवश्यकता नाहीं. आपल्या चरित्रनायकांचा ज्या प्रांतांशीं बाल्यावस्थेंत संबंध आला, त्यांसंबंधानें थोडीबहुत कल्पना व्हावयास ही माहिती पुरेशी आहे.

## प्रकरण दुसरें

# बाळपण व शिक्षण

'उत्कृष्ट बुद्धिमत्ता, अप्रतिम सौजन्य, अतिशयित शुद्ध आचरण, खरी देशभक्ति व वर्णनीय धर्मशीलता हे गुण एका व्यक्तींत एकवटलेले ज्यांना पहावयाचे असतील त्यांनीं नारायणराव चंदावरकरांचें चरित्र पहावें.' असें ज्यांच्या हयातींतच एका चरित्रकारानें म्हटलें, त्या नारायण गणेश चंदावरकरांचा जन्म १८५५ सालीं ता. २ डिसेंबर रोजीं होनावर येथें आपल्या आजोळीं विठ्ठलराव कायकिणी ह्यांच्या येथें झाला. त्यांचे तीर्थरूप श्री. गणेश हे मूळचे चंदावर गांवचे राहणारे. ते धंद्याच्या निमित्तानें शिरसीस आले व तेथें त्यांनीं आपल्या वकिलीचा धंदा सुरू केला. त्यांच्या वेळीं हुशार, तरतरीत व मेहनत घेऊन काम करणाऱ्या वकिलांत त्यांची गणना होत असे. परंतु नारायणास आजोबा विठ्ठलरावांचाच विशेष लळा असल्यामुळें त्याचें प्राथमिक शिक्षण होनावर येथेंच झालें. त्यावेळीं त्या प्रांतीं मराठीचा कांहीं संबंध नसे. प्राथमिक शिक्षण कानडी भाषेंतच होत असे. आज त्यांच्या जातींतील पुष्कळांना मराठी चांगलें लिहितां अगर बोलतां येत नसलें तरी पत्रव्यवहार कोंकणी भाषेंत न होतां, मराठींत होत असतो. परंतु त्यावेळीं होनावर येथें कानडी शिक्षण देणारीही चांगली सरकारी शाळा नसल्यामुळें प्राथमिक शिक्षणासाठीं तेथील मिशनरींच्या शाळेंत त्यांस घालण्यांत आलें. ह्या शाळेंत शिकत असतांना इतर अभ्यासाबरोबर त्यांस बायबलचाही अभ्यास करावा लागे. आपल्या प्रांतांत मराठींत ज्याला 'नवा करार' व 'जुना करार' असें म्हणतात, त्यास कानडींत 'नव निर्धार' व 'पुरातन निर्धार' असें म्हणतात. ह्यावरून असें दिसून येईल कीं, अगदीं लहानपणापासून ख्रिस्ती मिशनरी व त्यांच्या संस्था ह्यांच्याशीं नारायणरावांचा जो संबंध जडला तो कोणत्याना कोणत्या रूपानें तरी अखेरपर्यंत कायम होता. तरी त्यांचें स्वधर्मग्रंथावरील प्रेम नष्ट झालें नाहीं, व येशू व त्याची शिकवण त्यांस आदरणीय वाटत असत, तरी तो एकच धर्म खरा आहे असें त्यांस केव्हांही वाटलें नाहीं. असो.

नारायणराव मिशनरींच्या शाळेंत शिकत असतांनाच होनावर येथील सारस्वत ज्ञातींतील एका अधिकाऱ्याच्या मुलास ख्रिस्ती धर्माची दीक्षा देण्यांत आली! त्यामुळें त्या गांवींच केवळ नव्हे, तर त्या प्रांतांत मोठीच खळबळ उडाली होती. नारायणरावांचे एक मामा मंजुनाथ हे त्यावेळीं साधारणतः त्यांच्याच वयाचे होते. आज ते रावसाहेब कैंकिणी म्हणून कारवारांत प्रसिद्ध आहेत. त्यांचे मधले मामा शेषगिरीराव हे मोठे चौकस होते. मोठे मामा शामराव हे घरांत न पहातां आपल्या कामांत मग्न असत. शेषगिरीराव मुलांच्या शिक्षणासंबंधानें वारंवार विचारपूस करीत व शाळेंत काय काय शिकवितात तें कळावें म्हणून मुलांच्या पाट्या व चोपड्या मधून मधून पहात असत. एके दिवशीं आपल्या नित्याच्या वहिवाटीस अनुसरून आपल्या भावाच्या व भाचाच्या चोपड्या पहात असतां, नारायणरावांच्या चोपडींत येशूख्रिस्तासंबंधानें कांहीं मजकूर लिहिलेला त्यांना आढळला! सारस्वताच्या एका मुलाला ख्रिस्ती धर्माची दीक्षा मिळाल्यामुळें लोकांमध्यें बरीच अस्वस्थता उत्पन्न झालेली व ख्रिस्ती शाळांसंबंधानें मनांत शंका आलेली, तशांत प्रत्यक्ष आपल्या भाचाच्या चोपडींत ख्रिस्ताविषयीं लिखाण पहातांच शेषगिरीराव चवताळले, त्यांनीं नारायणरावांची खूप खरड काढली, ती चोपडी फाडून टाकिली, व आपल्या धाकट्या भावाला व भाचाला शाळेंतून काढून टाकलें! त्यांना असें वाटलें कीं, ह्या मुलांना त्याच शाळेंत ह्या पुढें ठेविल्यास पुढेंमागें ख्रिस्ती मिशनरी त्यांच्यावर झडप घातल्यावांचून रहाणार नाहींत.[1] पण, ह्या काळीं नारायणरावांवर सर्वांहून अधिक त्यांच्या आजोबांचें वजन होतें. हे आजोबा फार धार्मिक वृत्तीचे होते. सकाळ संध्याकाळीं त्यांचें भजन नियमानें होत असे. लहान नारायणरावांस भजन मनापासून आवडे व आजोबांचें भजन सुरू झालें कीं, हा नातू न बोलावतां आजोबाजवळ भजन करण्यासाठीं येऊन बसत असे. आजोबांची साधुवृत्ति, धर्मपरायणता, भक्ति व पवित्र आचरण ह्यांचा बालवयांतच आपल्यावर अत्यंत इष्ट परिणाम झाल्याची ग्वाही पुढें १८९९ सालीं नारायणरावांनीं स्वतः दिली आहे. ती येथें नमूद करण्यापूर्वी बालपणचे त्यांचे खेळ वगैरे पाहिले म्हणजे आजोबांच्या

---

१. ही शाळा बोलून चालून ख्रिस्ती मिशनरींनीं चालविली होती व तेथें रोज उघडपणें ख्रिस्ती धर्माचें शिक्षण दिलें जात असे. परंतु मुंबईत शारदासदनाची स्थापना १८८९ सालीं झाली त्यावेळीं रानडे, भांडारकर, तेलंग, पंडित, डॉ. आत्माराम, लालशंकर, डॉ. काणे, मोडक वगैरे मंडळींच्या नांवांनीं एक पत्रक निघालें होतें व त्यांत "कोणतेंहि विशेष धर्ममत शिकविलें जाणार नाहीं" असें स्पष्ट म्हटलें होतें. तरी सदनांतील विद्यार्थिनींस ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली गेली, व त्यामुळें वरील गृहस्थांनीं शाळेंतून अंग काढून घेतलें.

चरित्राचा त्यांच्या चरित्रावर किती परिणाम झाला असावा त्याची आपल्याला कल्पना होते. त्यांचे आजोबा एकनिष्ठ कृष्णभक्त होते. कुटुंबामध्यें हरिविजय बहुतकरून वारंवार वाचला जात असावा. ह्या लहान वयांत त्यांस कृष्णाच्या घोंगडीचा खेळ फार आवडत असे. बालपणीं गोपाळकृष्ण गुराख्याचें काम करीत असे अशी कथा आहे. हें काम करीत असतांना समवयस्क सवंगड्यांस एकत्र करून त्यांच्यासमवेत तो खेळत असे, व आपल्या गाई त्यांस राखावयास लावीत असे. आजचे गुराखी ज्याप्रमाणें घोंगडी पांघरतात त्याचप्रमाणें त्या वेळचेही गुराखी करीत असतीलच, असें मानून आमचे चरित्रनायक कृष्णाच्या घोंगडीचा खेळ खेळत असावे! गोपाळकृष्णाप्रमाणें सर्व कांहीं त्यांना त्यावेळीं करतां येणें शक्य नव्हतें, तरी त्यांनीं आपल्या बरोबरीचीं लहानमोठीं मुलें जमा करावीं व स्वतः घोंगडी पांघरून ते गोपाळकृष्णाचें रूप घेतल्याचा आविर्भाव आणीत असत! ह्या समवयस्क मुलांमध्यें त्यांचे मामा मंजुनाथ हे असत व त्यांनींच स्वतः आम्हांला ही हकीकत सांगितली आहे. गोपाळकृष्णाच्या सवंगड्यांत त्यावेळीं 'कुत्ना थमाल ले, थमाल अपुल्या दाई, आम्ही दातो अपुल्या घली' असें म्हणणारा बोबडा पेंद्या होता, किंवा नाहीं, नारायणरावांच्या संवगड्यांत मंजूनाथांपेक्षां आणखी कोणकोण होते तें कळावयास आज साधन उपलब्ध नाहीं. त्यांचे दुसरे खेळ म्हणजे मुलांना जमवावें व आपण त्यांचें पुढारी व्हावें व त्यांना व्याख्यानें द्यावींत! आजोबा कोर्टाचे नाझर होते, त्यामुळें वारंवार कोर्टांत जाण्याचे व तेथील परिस्थिति पहाण्याचे प्रसंग येत असत. नारायणरावांनीं जमविलेल्या मुलांना निरनिराळीं कामें वाटून द्यावीं, कोर्ट भरवावें, व आपण स्वतः न्यायाधिशाच्या जागीं विराजमान होऊन न्यायदानाचें कार्य करावें! त्यावेळीं हा लुटुपुटूच्या खेळांतील न्यायाधीश पुढें खराखुरा हायकोर्टाचा न्यायाधीश होईल असें कोणाच्या स्वप्नांतही आलें नसावें! त्या वयांत त्यांनीं गंजीफा किंवा गोट्या, विटीदांडू इ. खेळ खेळण्याकडे प्रवृत्ति दाखविली नाहीं असें त्यांचे मामा आजही सांगतात.

सन १८९९ सालीं डिसेंबर महिन्यांत नारायणराव मंगलोर येथें गेले होते. त्यावेळीं तेथील विद्यार्थ्यांनीं त्यांना एक मानपत्र दिलें. त्या मानपत्राला उत्तर देतांना त्यांनीं लहानपणींच्या आपल्या कांहीं आठवणी सांगितल्या आहेत. त्यावरून नारायणरावांच्या उज्ज्वल धार्मिकतेचा पाया कोणी व कसा घातला त्याची आपल्याला फार चांगली कल्पना होते. त्यावेळीं ते म्हणाले,

"माझ्या आजोबांनीं मला लहानाचें मोठें केलें. हे आजोबा मोठे उदार वृत्तीचे, पाणीदार, धीरोदात्त वर्तनाचे, कनवाळू व देवाला भिऊन वागणारे होते, एवढेंच केवळ नव्हे तर ज्यांचा ज्यांचा म्हणून त्यांच्याशीं प्रत्यक्ष संबंध येत असे

त्यांस माझे हे आजोबा मोठे सत्यनिष्ठ, सत्यवक्ते, व सत्य व्यवहार करणारे असा अनुभव येत असे. ते अगदीं साधे, मनमिळाऊ व भाबड्या स्वभावाचे होते. ते जरी अगदीं जुन्या वळणांतले होते, तरी स्वजातीविषयीं मिथ्याभिमान त्यांच्यांत मुळींच नव्हता. कोणत्याही जातीचा भक्त भेटला कीं, त्यांनीं त्याला आपल्या घरीं आणावें, त्यास जेवूं घालावें व मोठ्या आनंदानें त्याच्याबरोबर भजन करीत अगर संभाषण करीत बसावें! एकदोनदां त्यांनीं आपल्याबरोबर एका धोबी वारकरी संताला आणिलें. वारकरी भजन करूं लागला व आजोबाही भजनांत रंगून गेले. तो वारकरी तन्मय झालेल्या स्थितींत नाचूं लागला व माझे आजोबाही देहभाव विसरून त्याच्याबरोबर नाचूं लागले! दुसऱ्या एका प्रसंगीं आजोबांची कुलदेवता असलेल्या कैकिणी गांवीं गेल्यानंतर ते भजनानंदांत मग्न असतांना त्यांना जमिनीवर गडबडां लोळतांना मीं पाहिलें. जेव्हां ते भजनांत मग्न होऊन नाचूंबागडूं लागत, किंवा जमिनीवर लोळण घेत त्यावेळीं त्यांच्या त्या वेळच्या आचरणाचा माझ्या मनावर असा परिणाम होत असे कीं, मी देखील त्यांच्याबरोबर नाचूं लागें, व मीही जमिनीवर गडबडां लोळण घेत असें! रोज पहाटे व रात्रीं नियमानें ते भजन करीत. रात्रीं तर त्यांच्याबरोबर मी प्रार्थना करीत असेंच, परंतु पहाटे ४ वाजतां ते उठत त्यावेळीं मलाही उठवीत. त्यावेळीं ते मोठ्या आनंदानें व उत्साहानें तुकारामाचे जे अभंग म्हणत ते मीही म्हणत असें.[२] प्रथम प्रथम मी नियमानें पहाटेस उठावें

२. नारायणरावांची अगदीं लहानपणीं पहाटे उठण्याची व भजन करण्याची संवय अखेरपर्यंत कायम होती. प्रार्थनेनंतर ते आपल्या नित्याच्या कार्यास लागत. आपल्या एका व्याख्यानांत ते म्हणतात :—"It is a great thing for a man to cultivate the habit of prayer in the morning so that he may know what his resolutions for the day are. Any work started after ten minutes of prayer in the morning is resolutely done." ही पहाटे उठण्याची संवय नारायणरावांस प्रथम आजोबांनीं लावल्यानंतर त्यांच्या ती इतकी अंगवळणी पडली कीं, पहांटेच्या ४ च्या नंतर त्यांस झोंपच लागत नसे. चारपासून साहापर्यंतचा वेळ फार आनंदांत व मनाच्या प्रसन्न स्थितींत जात असे. १९१६ सालीं लिहिलेल्या एका पत्रांत ते म्हणतात :—"I cannot sleep after 4 A. M. but between that and 5 A. M. I find life beautiful because of the sweet sensation of God." वरील सर्व माहितीवरून नारायणरावांस पहांटे उठण्याची संवय सेंट मेरीच्या शाळेंत आल्यानंतर फादर विलीमुळें लागली हें एका वृत्तपत्रानें केलेलें विधान किती असत्य आहे तें निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

म्हणून रात्रीं ते थोडासा खाऊ जवळ ठेवून घेत, व पहाटे उठून देवाचें भजन केल्याबद्दल देवाचा प्रसाद म्हणून भजन संपल्यावर मला तो देत! त्याचप्रमाणें होनावर येथें दोन सारस्वत संत होते. त्यांचें माझ्यावर फार प्रेम असे व मला त्यांचें भजन फार आवडत असे. त्यांपैकीं एकाचा आवाज अत्यंत मधुर होता. दोघेही मोठे धर्मनिष्ठ व खरेखरे भक्त होते. त्यांच्या येथें रात्रौ भजन होई व मी त्यांच्या येथें रात्रीच्या-रात्रीं भजन करीत घालविल्या आहेत."[३] ह्यावरून नारायणरावांच्या धर्मनिष्ठेचें बीज होनावर व कारवार येथेंच पेरलें गेलें होतें हें उघड होतें. आजोबांच्या पवित्र सहवासांत राहून, त्यांच्या एकंदर शीलाचा व चारित्र्याचा नारायणरावांच्या कोवळ्या मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम झाला होता. आपले आजोबा कसे बोलतात, कसा उपदेश करितात, सत्याविषयीं कशी निष्ठा दाखवितात, विशेष प्रसंग आले असतां ते कसे वागतात इकडे त्या बालवयांतही त्यांचें लक्ष असे. एकदां त्यांची मावशी फार आजारी होती. परंतु आप्तेष्ट व आसपासचे लोक तिची ती स्थिति अवलोकून कष्टी झालेले कां दिसत होते हें कळण्याचें त्यांचें वय नव्हतें. ते म्हणतात, "एके दिवशीं आम्हां मुलांना शाळेंतून लवकर आणविलें व आम्हांला शेजाऱ्याच्या घरांत बसविलें. त्यावेळीं शेजारच्या घरांतून चाललेला आक्रोश मात्र आमच्या कानीं येत होता. त्यावरून इतके दिवस आजारी असलेली आमची मावशी मेली असा मीं तर्क केला. आम्हांला बाहेर येऊं दिलें नाहीं म्हणून मीं दाराच्या फटींतून प्रेतयात्रा पाहिली. माझे आजोबा राधेकृष्ण राधेकृष्ण असें म्हणून मोठमोठ्यानें गजर करीत होते. आजोबांनीं प्रेताला खांदाही दिला होता. हा सर्व देखावा पाहून मला असें वाटलें कीं, आजोबा कन्याविरहाचें दुःख मोठ्या धैर्यानें सहन करीत आहेत[४]" आजोबांच्या ह्या आध्यात्मिकतेचा व सहन-शीलतेचा नारायणरावांस केव्हांही विसर पडला नाहीं. इतका आजोबांच्या चारित्र्याचा त्यांच्या कोवळ्या मनावर त्यावेळीं परिणाम झाला होता.

नारायणराव ज्यावेळीं होनावर येथें शिकत होते, त्यावेळीं तें जिल्ह्याचें ठिकाण होतें. मोठमोठे अधिकारी त्यावेळीं तेथें असत. त्या लोकांची टापटीप, व्यायामा-कडील त्यांचें लक्ष, रोज फिरावयास जाणें, त्यांची शिस्त ह्यांचा त्यांच्या मनावर त्यावेळींच परिणाम झाला होता. ते नित्य त्यावेळीं फिरावयास जाऊं लागले. ही

---

३. They were fond of me and I was fond of them and nights after nights have I passed with them at Honavar singing and praying to God.

४. " It showed to me even then that struggling as he was with his sorrow, he was trying to put it down and bear it with fortitude. "

सहल करण्याची आवड लहानपणीं प्रथम होनावर येथें जी उत्पन्न झाली, ही त्यांच्यांत शेवटपर्यंत होती. मुंबईस, लोणावळ्यास अगर खंडाळा,[५] महाबळेश्वर, बंगलोर, पुणें, कलकत्ता ह्यांपैकीं कोठेंही नारायणराव असले तरी तेथें नियमानें फिरावयास जात. सृष्टिशोभा, वनश्री, सूर्योदय व सूर्यास्त, पक्षांचा विहार व मंजूळ गाणें, खेड्यापाड्यांतील लोक, लहानसहान व्यापारी, मुलेंबाळें, मजूरवर्ग, व त्यांच्या स्त्रिया, फकीर, साधू, वारकरी, महारमांग ह्या सर्वांचें त्यावेळीं निरीक्षण चाले. त्यांच्या अनेक लेखांत ह्या त्यांच्या क्रमाचा उल्लेख आढळतो. असो. अशा प्रकारें बालवयांत फिरावयास जात असतां त्या वयांतच त्यांनीं कांहीं युरोपिअ-नांच्या ओळखी करून घेतल्या होत्या. त्यांचे मामा श्री. मंजुनाथ असें सांगतात कीं एखाद्या साहेबाजवळ जावयास आपल्याला भय वाटे, पण नारायणराव बेधडक त्याच्याशीं बोलूं लागत !

पुढें कांहीं दिवसांनीं होनावर येथील मुख्यमुख्य कोर्टें व हपिसें कारवार येथें आणण्यांत आलीं. नारायणरावांचे आजोबा विठ्ठलराव कोर्टाचे नाझर होते म्हणून त्यांनाही कारवार येथें जावें लागलें, त्यामुळें सर्व मुलेंही कारवारास आलीं व त्यांना कारवार येथील इंग्रजी शाळेंत घालण्यांत आलें. त्या शाळेवर त्यावेळीं

---

५. १९१० सालाच्या मे महिन्यांत सर नारायण खंडाळा येथें होते व त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव अभ्यासासाठीं विलायतेंत होते. त्यांस लिहिलेल्या एका पत्रांत सर नारायण म्हणतातः—

I find unalloyed pleasure in the songs of birds, in the sights of the hills, the beauty of the morning and the glory of the setting sun here at Khandala. There is happiness and there is peace spread out by God for us to enjoy ever from the sight of what we suspose are trivial objects and common sights and things. The wild flowers that grow on the road-side or in the fields at this time of the year; the wild turf growing almost everywhere and showing itself and showing as a painted landscape in miniature. These are sights that enthral and give comfort nay elevation to the heart and I feel glad.

त्याच वर्षीं पुन्हा एकदां ते लिहितात :—

Listened to the notes of a bird singing from a tree on a raised ground. It brought calm to the mind. Life a song. The trees and plants were standing still. There was chirping of birds all around, wild flowers here and there. Oh Nature ! Thy beauty is soothing.

रा. रा. त्रिंबक नारायण कीर्तने ह्या नांवाचे गृहस्थ हेडमास्तर होते. नारायणराव कारवारच्या शाळेंत जाऊं लागतांच कीर्तने मास्तरांचें त्यांच्याकडे लक्ष वेधलें. त्यांचे पाणीदार डोळे व चेहरा, कुशाग्र बुद्धि, शिकण्याची हौस, अभ्यासाकडील लक्ष, व त्यांची तडफ पाहून—नारायणरावांवर त्यांचा लोभ जडला व कीर्तने-मास्तर त्यांच्याकडे विशेष लक्ष पुरवूं लागले.[६] अशा प्रकारें कारवारास त्यांचें शिक्षण चालू असतांना त्यांचे मामा शेषगिरीराव वकिलीचा अभ्यास करण्यासाठीं मुंबईस आले. १८६९ सालीं वकिलीची परिक्षा पास होऊन ते कारवार येथें वकिली करूं लागले. त्यांचे मोठे मामा शामराव हे मोठे तरतरीत, कुशाग्र बुद्धीचे होते. त्यांनीं १८६० च्या सुमारास सर वुइल्यम वेडर्नबर्न ह्यांच्या हाताखालीं रेव्हिन्यू खात्यांत नोकरी पतकरली. त्यावेळीं सर वुइल्यम ह्यांच्या हें लक्षांत येऊन चुकलें कीं, शामराव ह्यांच्यांत विशेष गुण आहेत. त्यावेळेपासून शामरावांकडे त्यांचें विशेष लक्ष वेधलें व त्यांच्या कल्याणासाठीं ते पुष्कळ झटले, व पुढें तर त्यांच्याविषयीं सर वुइल्यम ह्यांस आदर व प्रेम वाटूं लागलें असें V. L. U ह्यांनीं लिहिलेल्या त्यांच्या लहानशा चरित्रांत म्हटलेलें आहे. १८६४ सालीं शामराव कारवार सोडून मुंबईस आले व प्रसिद्ध वकील शांताराम नारायण ह्यांच्या येथें त्यांनीं कारकुनी पत्करली. कांहीं महिनेच त्यांनीं हें काम केलें व पुन्हां मुल्की खात्यांतील नोकरीवर ते रुजू झाले. १८६६ च्या सुमारास सर रेमंड वेस्ट हे कारवार येथें डिस्ट्रिक्ट जज्ज होते. शामराव ह्यांच्या विशेष गुणांची त्यांस माहिती झाल्यावरून सर रेमंड ह्यांनीं त्यांना आपल्या कोर्टांत घेतलें. त्यामुळें त्यांच्या उत्कर्षास प्रारंभ झाला. त्यावेळीं कारवारकडील कांहीं अपिलें प्रिव्ही कौन्सिलपुढें चालवावयाचीं होतीं. कित्येक महत्त्वाच्या कागदपत्रांचें भाषांतर करावयाचें होतें. सर रेमंड वेस्ट ह्यांच्या शिफारसीनें शामराववर तें काम सोंपविण्यांत आलें, व त्यासाठीं त्यांस मुंबईस यावें लागलें. हें भाषांतराचें काम त्यांनीं इतक्या उत्तम रीतीनें व बिनचूक केलें कीं, हायकोर्टानें त्यांस कानडी ट्रॅन्सलेटरच्या जागेवर नेमलें व त्यांचा नोकर या नात्यानें कारवारशीं असलेला संबंध कायमचा सुटला. परंतु हायकोर्टांत नोकरी करून स्वस्थ बसणारे शामराव नव्हते. नोकरींत असतांनाच त्यांनीं हायकोर्टाच्या वकिलीचा अभ्यास केला व १८७०-७१ सालीं ते वकीलीची

---

६. ह्या कीर्तने मास्तरांविषयीं नारायणरावांस फार आदर असे. न्यायमूर्ति झाल्यावर ह्या आपल्या शिष्यवराची कीर्तने मास्तरांनीं गांठ घेतली. नारायणरावांनीं आपल्या गुरुजींच्या चरणांचें वंदन केलें, व त्यांचें योग्यप्रकारें आदरातिथ्य केलें. कीर्तने मास्तरांना आपल्या शिष्यवराचा उत्कर्ष पाहून फार आनंद झाला.

परीक्षा उत्तीर्ण होतांच त्यांनीं नोकरीचा राजीनामा दिला व ते स्वतंत्रपणें वकिली करूं लागले.

कारवार सोडून कायमचे मुंबईस आल्यानंतर शामरावांस असें वाटूं लागलें कीं, नारायणरावांसारख्या तैलबुद्धीच्या मुलाच्या शिक्षणाची सोय मुंबईस होणें इष्ट आहे. म्हणून त्यांनीं १८६९ सालीं नारायणरावांस पुढील अभ्यासासाठीं मुंबईस आणिलें, व त्यांच्याबरोबर आपले कनिष्ठ बंधू मंजुनाथ ह्यांसही त्यांनीं आणिलें. मुंबईस आल्यानंतर नारायणरावांच्या खऱ्या शिक्षणास सर्व बाजूंनीं प्रारंभ झाला. शामराव हे मोठे चौकस, विद्याव्यासंगी व उद्योगप्रिय गृहस्थ होते. आपल्या भाचानें केवळ पुस्तकी विद्या संपादन केली म्हणजे झालें असें त्यांस वाटत नसे. नारायणरावांस आधींच फिरावयाची व बाहेर जें कांहीं दिसेल तें निरीक्षणपूर्वक पाहाण्याची आवड, त्यांत स्वतः शामराव आपल्या भाचास बरोबर घेऊन बाहेर फिरावयास जाऊं लागले. त्यावेळीं ते त्यांस निरनिराळीं माणसें, त्यांनीं स्थापन केलेल्या, अगर त्यांचा संबंध असलेल्या संस्था, कांहीं विशेष प्रसंग ह्यांची त्यांस माहिती सांगत असत. त्यामुळें ह्या लहान वयांतच त्यांस प्रार्थनासमाज ह्या संस्थेची माहिती मिळाली. स्वतः शामराव प्रार्थनासमाजाचे सभासद नव्हते; तथापि प्रार्थनासमाजाशीं त्यांचा संबंध असे व पुढें थिइस्टिक ॲसोशिएशन नामक जी संस्था स्थापन झाली तिचे शामराव सभासद होते. समाजाच्या उपासनांसही ते वारंवार जात. एके रविवारीं ते आपल्या भाचाला बरोबर घेऊन उपासनेस गेले. त्यावेळीं समाजाच्या उपासना डॉ. आत्माराम पांडुरंग ह्यांच्या घरीं कांदेवाडींत होत असत. ह्या प्रसंगाची आठवण सर नारायण ह्यांस शेवटपर्यंत होती. त्या प्रसंगास उद्देशून स्वतः नारायणराव लिहितात:[७]

" आतां (१९१३) त्या गोष्टीला चाळीसाच्या वर वर्षें होऊन गेलीं. त्यावेळीं मी लहान होतों व आपल्या विद्याभ्यासासाठीं नुक्ताच मुंबईस आलों होतों. एके रविवारीं सायंकाळीं माझे प्रिय मामा प. वा. शामराव विठ्ठल मला शिक्षण मिळावें ह्या हेतूनें प्रार्थनासमाजांत घेऊन गेले; त्यावेळीं गाइलेलीं पदें, किंवा त्यावेळच्या प्रार्थना अगर उपदेश ह्यांची मला आतां चांगलीशी आठवण नाहीं व मी अगदीं पोरवयाचा असल्यामुळें मला त्यांचा अर्थही कळला नाहीं. परंतु त्यावेळीं डॉ. आत्माराम पांडुरंग ह्यांच्या घराच्या दिवाणखान्यांत उपासनेच्या पूर्वी जमलेलीं तीं तेजस्वी

---

७. डॉ. भांडारकरांचे धर्मपर लेख व व्याख्यानें ह्या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीस सर नारायण ह्यांनीं उपोद्घात लिहिला आहे. तो लिहीत असतांना त्यांस वरील प्रसंगाची आठवण झाली.

चेहऱ्याचीं सतेज माणसें व सर्वांमध्यें बसलेल्या त्या मिस मेरी कारपेंटर[८] हा देखावा पाहून माझ्या मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम झाला व त्यांची ओळख होऊन त्यांचे पासून ज्ञानप्राप्ति करून घेण्याची संधि कधीं येईल असा विचार माझ्या मनांत येऊन गेला. हे असे विचार माझ्या मनांत घोळत असतांना जणूंकाय माझ्या मनांतील विचार जाणून व माझी जिज्ञासा तृप्त करण्याच्या हेतूनें माझे मामा म्हणाले, " ते पहा डॉ. आत्माराम पांडुरंग, नारायण महादेव परमानंद, प्रो. रामकृष्ण गोपाळ भांडारकर, बाळ मंगेश वागळे, महादेव गोविंद रानडे, मोरोबा विनोबा, भास्कर हरि भागवत व वासुदेव बाबाजी नवरंगे, ही सर्व एकेश्वरी मंडळी आहे. " मोठ्या शहरांत आलेला एखादा नवीनच माणूस अशा प्रसंगीं मोठ्या उत्सुकतेनें व आदरानें आपल्या भोंवतीं असलेल्या मंडळीकडे पहात असतो, त्याप्रमाणें मीही माझे मामा ही माहिती देत असतांना ह्या लोकांकडे पहात होतों. पुढें त्या गृहस्थांचा व माझा झालेला समागम, त्यांच्याशीं झालेलीं संभाषणें, त्यांचे उपदेश, त्यांचीं एकंदर चरित्रें ह्यांपासून मला सर्वांत मोठा धडा मिळाला तो हा कीं, व्यक्तीची काय किंवा राष्ट्राची काय, उन्नति होण्यासाठीं सत्य व न्याय ह्यांचा प्रवाहच जणूंकाय अंतःकरणांतून वाहूं लागला पाहिजे. "

मुंबईस आणिल्यानंतर शामरावांनीं, मुंबईतल्या सर्व शाळा टाकून, माजगांवांतील सेंट मेरी स्कूलमध्यें नारायणरावांस घातलें. वडील बंधूंनीं चोपडीमध्यें ख्रिस्त व ख्रिस्ती धर्मासंबंधानें कांहीं तरी लिहिलेलें पाहून नारायणरावांस होनावर येथील शाळेंतून काढलेलें माहीत असतां, धाकट्या भावानें आपल्या भाचास मुंबईस शाळेंत घालतांना ख्रिस्ती शाळाच कां पसंत केली असावी ? एक तर ही शाळा त्यावेळीं फार प्रसिद्धीस आली होती. त्या शाळेचे मुख्याध्यापक डॉ. विली ह्यांची उत्तम शिक्षक अशी कीर्ति झालेली होती. व स्वतः नारायणरावांचें इंग्रजी भाषेकडे विशेष लक्ष असल्यामुळें शामरावांनीं त्यांस सेंट मेरी स्कूलमध्यें दाखल केलें असावें. कोणत्याही कारणामुळें नारायणराव त्या शाळेंत गेलेले असोत, आणि तेथें ते अल्प काळच होते असें जरी आहे, तरी तेथें असतांना त्यांचा गेलेला काळ अत्यंत महत्त्वाचा होता ह्यांत कांहीं संशय नाहीं. त्यावेळीं त्यांचे समवयस्क हिंदी साहाध्यायी कोण होते तें कळावयास आज मार्ग नाहीं; तथापि नारायणरावांचें इंग्रजी भाषेवरील जें प्रभुत्व त्याचा पाया सेंट मेरीमध्यें घातला गेला ह्यांत कांहीं संशय नाहीं. येथें डॉ. विली ह्यांच्या देखरेखीखालीं त्यांच्या शिक्षणास आरंभ झाला. नारायणरावांची तरतरी, सतेज चेहरा, शिकण्याची उत्सुकता व अभ्यासाची आवड पाहून डॉ.

---

८. ह्या बाई त्यावेळीं हिंदुस्थानांत होत्या.

विली ह्यांचें त्यांच्याकडे लक्ष वेधलें व ते स्वतः त्यांस इंग्रजी व लॅटिन हे विषय शिकवूं लागले. थोड्याच काळांत शाळेंतील उत्तम विद्यार्थि अशी नारायणरावांची ख्याति झाली. पुढील आयुष्यांत त्यांच्यांत जे अनेक विशेष गुण आढळून आले, त्यांपैकीं त्यांची निरीक्षीण शक्ति व शिस्तीची आवड ह्या दोन गुणांचा परिपोष ह्या शाळेंत असतांना झाला असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. शिस्तीच्या बाबतींत एक विशेष गोष्ट त्यांच्या निरीक्षणक्षेत्रांत आली, ते ती योग्य प्रसंगीं अखेरपर्यंत मोठ्या आवडीनें सांगत. सेंट मेरींतील सर्व शिक्षकांत शिस्त असामान्य आहे, हें त्यांनीं पाहिलें होतें. आज वरच्या वर्गांतील मुलांचा वरिष्ठ शिक्षक म्हणून परिचित असणारा इसम दुसऱ्या दिवशीं इतर शिक्षकांचा नोकर बनतो,[९] किंवा अगदीं खालच्या वर्गांतील मुलांचा शिक्षक बनतो; पण त्यामुळें आपापसांत कोणी त्याचा तिरस्कार करीत नाहीं, किंवा त्याच्या विषयींचा आदरभाव तिळमात्र कमी होत नाहीं असें त्यांच्या लक्षांत आलें. तेथें सर्व शिक्षकांना सर्व प्रकारच्या स्थितीचा अनुभव घ्यावा लागे व सर्वांनीं एका शिस्तीनें वागलें पाहिजे ह्याचें ते आपल्याला वळण लावून घेत असें ते वारंवार सांगत.[१०] इतकें होतें तरी नारायणराव सेंट

९. नारायणराव सेंट मेरीमध्यें असतांना वरील वर्गावरील एक 'फादर' इतर 'फादरां'ची खोली व चढावयाचा जिना झाडतांना त्यांनीं पाहिला. प्रथम त्यांस आश्चर्य वाटलें, नंतर शाळेंतील हा एक शिस्तीचा प्रकार असावा असें त्यांच्या ध्यानांत आलें.

१०. फादर झिमरमन ह्यांनीं लिहिलेल्या टाइम्स ऑफ इंडियाच्या ता. २२ जून १९२३ च्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या आठवणी आमच्या अवलोकनांत आल्या. त्यांत फादर झिमरमन सर नारायण ह्यांच्या सेंट मेरीमधील काळासंबंधानें एके ठिकाणीं म्हणतात. :—

It was Father Willy of St. Mary's High School, Magazaon, young Narayan came under the influence of, that remarkable educationist, between 1869–73 at the age of about fiteen. Willy's personality appealed so strongly to master Chandavarkar that he copied some of his teacher's habits such as rising early, ( हें म्हणणें कितपत बरोबर आहे त्याचा वाचकांनीं स्वतः विचार करावा. कारण पहाटे उठण्याची संवय लहानपणींच आजोबांनीं लावल्याचें नारायणरावांनींच आपल्याला सांगितलें आहे. व त्यासंबंधानें सविस्तर वर्णन वर आलेंच आहे. ) clock like regularity in life and work. Chandavarkar was at the school for a very short time, but during that short

मेरीमध्यें वर्षदीडवर्षापेक्षां अधिक काळ राहिले असें वाटत नाहीं. कारण, १८६९ मध्यें त्यांना मुंबईस आणिलें व १८७० मध्यें सेंट मेरीमधून काढून त्यांस एल्फिन्स्टन हायस्कूलमध्यें घालण्यांत आलें. त्यावेळचे सर्व चांगले चांगले विद्यार्थी एल्फिन्स्टन हायस्कूल मध्येंच जात व पुढील शिक्षणही एल्फिन्स्टन कॉलेजांतच व्हावयाचें म्हणून त्यांस सेंट मेरींतून काढलें असावें असा समज आहे.[११]

पण त्यांना सेंट मेरींतून काढण्यास त्यांचे मामा म्हणतात तसाच प्रकार कारण झाला ह्यांत कांहीं संशय नाहीं. लहानपणीं चोपडींत येशूसंबंधानें कांहीं वाक्यें पाहून एका मामानें ख्रिस्ती मिशनरींनीं चालविलेल्या शाळेंतून त्यांना काढलें हें आपण जाणत आहों. सेंट मेरी स्कूलमध्यें सभोंवतीं सर्व क्याथलिक वातावरण, येशू व त्याची शिकवण ह्या संबंधानें वारंवार व्याख्यानें व्हावयाचीं. त्यामुळें ख्रिस्तासंबंधानें अत्यंत आदर व त्याच्या शिकवणीकडे विशेष लक्ष पाहून मामा शामरावांनीं नारायणरावांना सेंट मेरींतून काढलें. ह्या शाळेंत शिकत असतांना सगळेच शिक्षक फादर विलीच्या योग्यतेचे असत असें नाहीं. कांहीं फादर अगदीं अहंमन्य व हिंदी लोकांविषयीं अनादरच नव्हे तर तिरस्काराची भावना असणारे असत. असले एक फादर वर्गांत सहज म्हणाले "It is a sin to be born in Asia." एशिया खंडांत जन्मास येणें हें एक पापच आहे! हे उद्गार अनेक हिंदी विद्यार्थ्यांसमोर एका

---

period and for ever after there was a close link between pupil and master; a certain affinity of mind had brought the two together, differ though they might in nation, age, condition, life, religion. Sir Narayan very rarely, if ever, missed an opportunity of showing his admiration for the character, work and ways of the teachers of his boyhood. ...The oneness of purpose, the noisiced as well as the endurance in his character may very well have cast their first root during the contact between the soul of that master and that of his pupil.

११. सेंट मेरीस्कूलसंबंधानें नारायणरावांस जसा अभिमान असे, त्याचप्रमाणें St. Mary's Ex-students' Union ह्या संस्थेला नारायणरावांविषयीं आदरयुक्त अभिमान असे. १९०६ सालीं ता. १७ नोव्हेंबर रोजीं ह्या संस्थेनें नारायणरावांस एक मानपत्र देऊन त्यांचा गौरव केला. त्यावेळीं नारायणराव ह्या यूनिअनचे पेट्रन झाले.

नारायणरावांचे मामा रावसाहेब मंजुनाथ कायकिणी ह्यांचें म्हणणें असें आहे कीं, फादर विलीचें नारायणरावांकडे विशेष लक्ष होतें तें लक्षांत घेऊनच शामरावांनीं त्यांस सेंट मेरीमधून काढलें.

गुरूनें काढलेले पाहून नारायणरावांस फार वाईट वाटलें व त्यांनीं ताबडतोब म्हटलें, " Sir, was not Christ born in Asia ? " "महाराज, ख्रिस्ताचा जन्म एशिया खंडांतच झाला, हें खरें ना ? " आपल्या एका विद्यार्थ्यानें आणि त्यांतही हिंदु विद्यार्थ्यानें आपणांस पूर्णपणें चीत करणारें उत्तर दिलेलें पाहून फादर खवळले व आपल्या स्वतःच्या अविचाराबद्दल पश्चात्तप्त न होतां त्यांनीं उलट नारायणरावांसच शिक्षा केली ! हेंही एक कारण त्यांना त्या शाळेंतून काढावयास झालें असावें. असो.

पूर्वीच्या शाळेंतील एक उत्तम विद्यार्थि अशी त्यांची कीर्ति त्यांच्याबरोबरच ह्या शाळेंत आल्यामुळें येथेंही शाळेंतील शिक्षकांचें त्यांचेकडे विशेष लक्ष वेधलें. त्यावेळीं पुढें अध्यापक झालेले आबाजी विष्णु काथवटे शाळेंतील वरच्या वर्गावरील एक शिक्षक होते. नारायणरावांनीं इंग्रजींत लिहिलेले निबंध त्यांच्याकडे तपासावयास येत असत. इंग्रजी भाषेवरील त्या वयांतील त्यांची सत्ता, आपल्या विचारांची सुलभ रीतीनें केलेली व्यवस्थित मांडणी पाहून अशा हुषार मुलाचें शिक्षण आपल्या हातून व्हावें असें त्यांस वाटूं लागलें ! पण पहातात तों नारायणरावांची दुसरी भाषा लॅटिन आणि श्री. काथवटे तर संस्कृत भाषेचे नाणावलेले शिक्षक ! त्यांनीं सेंट मेरी स्कूलमध्यें लॅटिन भाषा घेणें हेंच योग्य होतें, पण ह्या शाळेंत संस्कृत भाषा घेणें अधिक फायदेशीर आहे, असें नारायणरावांस पटवून दिलें. नारायणरावांनीं लॅटिनचा अभ्यास सोडून दिला व श्री. काथवटे ह्यांच्या देखरेखीखालीं ते संस्कृत भाषेचा अभ्यास करूं लागले. एका वर्षांत मॅट्रिक्युलेशनपर्यंत संस्कृत श्री. काथवटे ह्यांनीं संपविलें; व नारायणरावांनीं आपल्या शिक्षकांच्या सूचनेप्रमाणें कसून अभ्यास केला व १८७१ सालीं संस्कृत ही दुसरी भाषा घेऊन ते उत्तम रीतीनें मॅट्रिक्युलेशनच्या परिक्षेंत उत्तीर्ण झाले. नारायणरावांनीं एक वर्षाच्या अल्प अवधींत हा अभ्यास संपविला व परिक्षेंत सुयश मिळविलें हें पाहून त्यावेळीं पुष्कळांस आश्चर्य व प्रो. काथवटे ह्यांस आपल्या श्रमाचें चीज झालें हें पाहून समाधान वाटलें.

## उच्च शिक्षण व कॉलेजांतील अनुभव

एल्फिन्स्टन हायस्कुलांतून प्रवेश परीक्षा उतरल्यानंतर नारायणरावांनीं साहजिकच आपलें नांव १८७२ सालीं एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें दाखल केलें. त्यावेळच्या स्थितींत व आजच्या स्थितींत जमीनअस्मानाचें अंतर पडलें आहे. मुंबई शहरांत त्यावेळीं जितकीं कॉलेजें होतीं तितकींच आज आहेत, तरी विद्यार्थ्यांच्या संख्येचें मान किती तरी पटीनें वाढलें आहे. नारायणरावांच्या वेळीं तिन्ही कॉले-

जांतील सर्व वर्ग मिळून जितके विद्यार्थी असत त्यापेक्षां पुष्कळ अधिक विद्यार्थि आतां पहिल्या वर्षाच्या झेविअरसारख्या कॉलेजाच्या वर्गांत असतात! तथापि त्यावेळचे विद्यार्थि विशेष हुषार अगर तैलबुद्धीचे असत, आणि आजच्या विद्यार्थ्यांत तसे विद्यार्थि नसतात असें म्हणण्याचा भाग नाहीं. पूर्वी विद्यार्थ्यांची संख्या लहान असल्यामुळें अध्यापक व विद्यार्थि ह्यांचा निकट संबंध येत असे. इच्छा असल्यास प्रत्येक विद्यार्थ्याची पात्रता अध्यापकांस अजमावतां येत असे. एवढें जरी झालें नाहीं तरी प्रत्येक विद्यार्थ्याची व अध्यापकाची ओळख होत असे, त्यांच्यांत अधिक दळणवळण असे व विद्यार्थ्याविद्यार्थ्यांत अधिक निकट भाव असे. त्याचप्रमाणें अध्यापकांविषयीं विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं आदरभाव असे. त्यावेळीं आलेले अध्यापकही उच्च वर्गांतील असत, विद्यार्थ्यांचा यांच्याशीं जितका निकट संबंध येई तितका त्यांचा अधिक परिचय होऊन त्यांच्याविषयीं आदरयुक्त प्रेमभाव जागृत होत असे. अशी स्थिति असतांना नारायणरावांच्या कॉलेजांतील उच्च शिक्षणास प्रारंभ झाला.

कॉलेजांत जाण्यापूर्वी आपल्या कॉलेजासंबंधानें प्रत्येक विद्यार्थ्याच्या मनोरम कल्पना असतात व स्वतःच्या चरित्रासंबंधानेंही तो स्वकपोलकल्पित इमले उठवीत असतो. नारायणरावांचा एल्फिन्स्टन कॉलेजांत प्रवेश होण्यापूर्वी कॉलेजची इभ्रत, कॉलेजांतून पास होऊन गेलेले विद्यार्थि, प्रिन्सिपाल ह्यांसंबंधानें त्यांच्या मनांत अनेक विचार आले असले पाहिजेत. शिवाय कॉलेजांतून पास होऊन गेलेली व थोरपदाच्या मार्गावर असलेली पुष्कळ मंडळी त्यांच्या भोंवतीं त्यावेळीं होती. नारायणराव कॉलेजांत दाखल झाले त्यावेळीं एल्फिन्स्टन कॉलेज हल्लींच्या भव्य इमारतींत भरत नव्हतें. परळ येथें सर कावसजी जहांगीर रेडिमनी ह्यांच्या बंगल्यांत भरत असे. " ह्या इमारतीसंबंधानें कदाचित् असें म्हणतां येईल कीं ज्या ठिकाणीं हिंदी तरुणांची बुद्धि प्रगल्भ व्हावयाची, ज्या ठिकाणीं विद्वान माणसें तयार व्हावयाचीं तें ठिकाण जसें भव्य, सुंदर, मनोहर असावयास पाहिजे तसें नव्हतें. तथापि त्या काळाचा व त्यावेळच्या परिस्थितीचा विचार करितां, कॉलेजाच्या आवारांत दाखल होतांच, आपण आतां एल्फिन्स्टोनिअन म्हणजे कोणी तरी मोठे होणार आहोंत असें वाटावयास लावणारी त्यावेळची ती इमारत होती यांत कांहीं संशय नाहीं आणि ज्या काळीं आमचीं नांवें कॉलेजच्या हजेरीपटांत दाखल करण्यांत आलीं त्यावेळीं जुने विद्यार्थि व पूर्वीचे अध्यापक ह्यांच्यासंबंधाच्या आठवणी इतक्या ताज्या होत्या कीं त्यांवरून एल्फिन्स्टन कॉलेजचा विद्यार्थि होणें ही एक माननीय गोष्ट समजली जात असे ह्यांतही कांहीं संशय नाहीं. तशांतून ज्यांनीं आपलें जबाबदारीचें काम उत्तम रीतीनें केलें असें सर्वांचें म्हणणें

होतें अशा थोर मुत्सद्दी व विद्वान गृहस्थाचें–मानस्टुअर्ट एल्फिन्स्टन ह्यांचें–[१२] कॉलेजला नांव दिलेलें, आणि सर अलेक्झांडर ग्रँटसारखे थोर तत्त्वज्ञ व विद्वान गृहस्थ कॉलेजला प्रिन्सिपाल ह्या नात्यानें लाभलेले, असा योग जुळून आल्यामुळें कॉलेजचें नांव महनीय झालें होतें. त्याचप्रमाणें ज्यावेळीं आम्ही कॉलेजांत दाखल झालों त्यावेळींसुद्धां प्रत्येक एल्फिन्स्टोनिअनच्या तोंडीं महादेव गोविंद रानडे[१३]

---

१२. The College consecrates the memory of a life and bears the name of a man, who in several spheres of duty to which he was called by his Queen and his country, proved one of the most cultured, hard-working, high-minded Britons that gave of their best for India's good and England's glory... He was a man of thought and of action, a soldier, statesman, scholar and student.

१३. महादेव गोविंद रानडे हे सर्वच बाबतींत असाधारण होते असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. बी.ए.च्या ऑनर्स परीक्षेचा अभ्यास आपण कोणत्या प्रकारें केला तो त्यांनीं स्वतःच्या १८६२–६३ सालच्या कामाच्या रिपोर्टांत दिला आहे. तींत ते म्हणतात:– "आनर्सच्या परीक्षेसाठीं मीं ठोकळमानानें अंदाजानें माफक आकाराचीं २५,००० पंचवीस हजार पानें वाचलीं आणि अवघड पुस्तकांचा सारांश लिहून व एकाच विषयावरील निरनिराळ्या पुस्तकांतील तुलनात्मक टिपणांचे १०० कागद लिहिले. रात्रीच्या पूर्वभागांत किंवा उत्तरभागांत मी लिहिण्याचें व घोकंपट्टीचें काम करीत होतों. एकूण चौदा तास प्रमाणें अभ्यास चालत असे." ( फाटक कृत रानडे चरित्र ) त्याचप्रमाणें कॉलेजचे प्रिन्सिपाल सर अलेक्झांडर ग्रँट ह्यांनीं डायरेक्टरकडे पाठविलेल्या रिपोर्टांत माधवरावांच्या कामाच्या रिपोर्टासंबंधानें म्हणतात:–

I would bring to your notice the remarkable report submitted by Mr Mahadev Govind of his work during the past year. This report represents the efforts and achievements of a Hindu student of superior calibre.

रानड्यांच्या संबंधानें त्यांचे एक विद्यार्थि मि. सयानि ( पुढें प्रसिद्धीस आलेले सॉलिसिटर व राष्ट्रीय सभेचे पुरस्कर्ते ) म्हणतात :—

"मी ज्या वर्षी मॅट्रिकची परीक्षा दिली त्याच वर्षी रानडे एम. ए.च्या परिक्षेंत उत्तीर्ण झाले व मला त्यांच्या हाताखालीं शिकण्याची संधी मिळाली. कॉलेजमध्यें सुखाचे दिवस घालवीत असतांनाच रानडे आपल्या समकालीन पिढींत सर्वांहून श्रेष्ठ आहेत व समाजाला प्रगतीच्या मार्गावर नेऊन सोडण्याकरितां परमेश्वर

ह्यांचें नांव असे. वास्तविक पहातां असिस्टंट प्रोफेसर ह्या नात्यानें रानडे ह्यांचा कॉलेजशीं असलेला संबंध सुटल्याला पुष्कळ वर्षें झालीं होतीं. तथापि त्यांनीं नेपोलिअन, फ्रेडरिक धि ग्रेट, क्रॉमवेल, शिवाजी ह्यांच्यावर दिलेल्या व्याख्यानांचा त्यांच्या विद्यार्थ्यांच्या मनावर असा कांहीं परिणाम झाला होता कीं, या संबंधाच्या आठवणी आमच्यापर्यंत सहज चालत आल्या होत्या."[१४] त्याचप्रमाणें फेरोजशहा मेथा, काशिनाथ त्रिंबक तेलंग, हे आपल्या कॉलेजचे अत्यंत श्रेष्ठ दर्जाचे विद्यार्थि म्हणून त्यांच्या विषयीं विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं असामान्य आदरभाव जागृत असे. त्या वेळचे प्रिन्सिपाल सर अलेक्झांडर ग्रँट हे नांवाजलेले तत्त्वज्ञ होते व त्यांच्या विचारांवर ॲरिस्टाटल व प्लेटो ह्यांच्या विचारांचा छाप होता. त्यांचें व्यक्तित्व, शील, आचारविचार ह्यांचा परिणाम साहजिकपणें त्यांच्या विद्यार्थ्यांवर होऊन त्या काळीं ॲरिस्टाटल व प्लेटो ह्यांच्या विचारांचेंच वातावरण कॉलेजांत निर्माण झालें होतें असें म्हणतात.

ज्यावेळीं नारायणराव व त्यांच्या बरोबरीचे दुसरे विद्यार्थी ह्यांचा एल्फिन्स्टन कॉलेजांत प्रवेश झाला, त्यावेळीं ह्या विद्यार्थ्यांच्या कानीं वरील गोष्टी नित्य पडत. त्यामुळें ज्या कॉलेजची अशी ख्याति आहे, त्याचा विद्यार्थि म्हणवून घेणें ही एक बहुमानाची गोष्ट होय असें त्या वेळच्या विद्यार्थ्यांस वाटत असे. त्यावेळीं त्यांना असेंही वाटत असे कीं, हें कांहीं केवळ चार पुस्तकें वाचून, घोकंपट्टी करून, किंवा पुस्तकी विद्या शिकून विद्यापीठाच्या परीक्षा पास होण्याची पात्रता आपणामध्यें आणण्याचें ठिकाण नसून, हें एक ज्ञानसाधनाचें खरेंखुरें स्थान असून, प्राप्त ज्ञानाच्याद्वारें शीलसंवर्धनास साधनीभूत होणारें, त्याचप्रमाणें भावी जबाबदारीची कल्पना करून देऊन, त्या जबाबदारींतून योग्य रीतीनें पार पडण्याचा मार्ग दाखविणारें विद्यामंदिर आहे.

एकीकडे कॉलेजांत प्रवेश करणाऱ्या विद्यार्थ्यांच्या आपल्या कॉलेजासंबंधानें ह्या अशा भावना, आणि दुसरीकडे स्वतः नारायणरावांसंबंधानें हायस्कुलांत असतांना इंग्रजी हा विषय चांगला असलेला विद्यार्थि ही जी त्यांची कीर्ति ती लक्षांत

---

वेळोवेळीं ज्या महापुरुषांची योजना करितो, त्या महापुरुषांत पुढें रानड्यांची गणना होईल असा आमच्या बालबुद्धीप्रमाणें आम्हांस विश्वास व भरंवसा वाटत असे." ह्या एकाच उताऱ्यावरून विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं माधवरावांसंबंधानें कसा आदरभाव जागृत होता त्याची स्पष्ट कल्पना होते.

१४. सुमारें तीस वर्षांपूर्वी नारायणरावांनीं एल्फिन्स्टोनिअन त्रैमासिकासाठीं आपल्या कांहीं आठवणी पाठविल्या होत्या, त्यांचा उपयोग वरील अवतरणांत केला आहे.

घेऊन बरोबरीच्या विद्यार्थ्यांनीं त्यांच्याविषयीं कॉलेजांत प्रवेश होतांच ही माहिती पसरविली असावी. तिकडे नारायणरावांनीं विशेष लक्ष पुरविलें नाहीं. कॉलेजामध्यें जें शिकविलें जातें तेवढ्यावरच तृप्त न राहातां बाहेरचें व आपल्याला उपयुक्त वाचन त्यांनीं श्रमपूर्वक चालू ठेविलें होतें. त्यांचे मामा शामराव विठ्ठल हे मोठे अभ्यासू व विद्वान गृहस्थ होते. त्यांनीं वारंवार काळकादेवीच्या रस्त्यावरील राधाबाई आत्माराम ह्यांच्या दुकानांत नारायणरावांस बरोबर घेऊन जावें व तेथून उपयुक्त व नवीं पुस्तकें खरेदी करावीं. पुस्तकें खरेदी केल्यानंतर ते तीं स्वतः वाचीत व वाचलेल्या पुस्तकांचें हृद्गत आपल्या भाषेंत लिहून ठेवीत. नारायणरावांनीं ही वाचनाची आवड व वाचलेल्या पुस्तकांतील महत्त्वाचा भाग अगर त्याचें हृद्गत लिहून ठेवण्याची संवय मामांपासून घेतली, पण आपल्या स्वतःच्या मुलांना ही संवय लागली नाहीं याचें त्यांना पुढें आश्चर्य वाटे.[१५] असो. विकत घेतलेलीं पुस्तकें आपल्या भाचानेंही वाचावीं अशी शामरावांची इच्छा असे व त्यांनीं तीं वाचलीं किंवा नाहीं याविषयीं ते चौकशी करीत. ह्याचा परिणाम असा झाला कीं, मामांच्या टेबलावर कोणतेंही चांगलें पुस्तक दिसलें कीं नारायणरावांनीं वेळांत वेळ काढून तें वाचून टाकावें. एकदां मामांनीं मंडलिकांकडून स्वतःच्या वाचनासाठीं नेपोलि-यनचें चरित्र आणिलें व ते स्वतः तें वाचावयाचें विसरले, पण नारायणरावांनीं तें वाचून त्यावर टिपणें घेऊन तें ठेवून दिलें होतें असें मामांच्या ध्यानांत येऊन चुकलें होतें !

उमरावतीचे प्रसिद्ध वकील दादासाहेब खापर्डे हे नारायणरावांस समकालीन होते. कॉलेजांत प्रवेश मिळण्यासाठीं कॉलेजच्या आवारांत पाय ठेवतांच प्रथम नारा-यणरावच त्यांना भेटले व त्यांनीं त्यांना सांगितलें कीं यावयास उशीर झाल्यामुळें आतां खोली मिळेलसें वाटत नाहीं ! खापर्डे ह्यांना आपल्याला खोली मिळणार अशी खात्री होती ! आणि त्याप्रमाणें त्यांना खोली मिळाली, एवढेंच नव्हे तर चंदावरकर व खापर्डे हे पुष्कळ वेळां एकत्र अभ्यास करूं लागले ! चंदावरकर हुषार व त्याचप्रमाणें कसून अभ्यास करणारे विद्यार्थि आहेत अशी त्यांची खात्री झाली. त्यावेळीं कित्येक गोष्टींत त्यांचें मतैक्य व्हावें व कित्येक गोष्टींत मतभेद व्हावा. दादासाहेब म्हणतात कीं, विद्यार्थि ह्या नात्यानें मतभेद व मतैक्याचा जो प्रकार सुरू झाला तो पुढील आयुष्यांतही तसाच राहिला.

---

१५. I do not know how it is but I am surprised neither of my sons has inherited my habit of taking notes in writing of whatever I read.

–From a letter to his son V. N. C. in 1909.

अशा प्रकारें अभ्यासास प्रारंभ झाल्यानंतर त्यांचे निबंध व अभ्यासाची तयारी पाहून कॉलेजच्या अध्यापकांचें व विशेषतः प्रिन्सिपाल वर्डस्वर्थ व सीनिअर फेलो काशिनाथपंत तेलंग ह्यांचें त्यांच्याकडे लक्ष वेधलें ह्यांत कांहीं नवल नाहीं.[१६]

सर नारायणराव कॉलेजांत येण्यापूर्वी, म्हणजे सर अलेक्झांडर ग्रँट हे प्रिन्सिपाल असतांना, कोणत्या प्रकारचें वातावरण तेथें होतें त्याचें वर्णन वर आलें आहे. त्यावेळीं ॲरिस्टॉटल व प्लेटो ह्यांच्या विचारांचें वर्चस्व दिसे, पण नारायणरावांच्या वेळीं सर्व विद्यार्थ्यांच्या तोंडीं जॉन स्टुअर्ट मिलचें नांव असे! तर्कशास्त्रावरील त्याचें पुस्तक व त्याचेंच अर्थशास्त्र हीं दोन पुस्तकें त्यावेळीं विद्यार्थ्यांस अभ्यासावीं लागत, म्हणूनही कदाचित् तसें असेल. कॉलेजच्या आवारांत अध्यापक व विद्यार्थि ह्यांच्यावर त्याच्या विचारांचें वर्चस्व होतें ह्यांत कांहीं संशय नाहीं. मिल त्यावेळीं आपल्या कीर्तिवैभवाच्या शिखरावर इंग्लंडमध्यें पोंचला होता. तो मोठा बुद्धिवान, अज्ञेयवादाचा पुरस्कर्ता, स्वातंत्र्याचा कैवारी म्हणून त्याची कीर्ति पसरली होती. स्वातंत्र्यावरील त्याचे विचार तरुणांना फार मोहक वाटत व एकंदरींत मिलनें तरुणांवर आपल्या विचारांची छाप पाडिली होती यांत कांहीं संशय नाहीं. मात्र त्याच्या विचारांचें व तत्त्वज्ञानाचें रहस्य समजण्याइतकें त्याचें तत्त्वज्ञान तरुणांस कळलें होतें किंवा नाहीं हा एक प्रश्नच आहे! स्वतः चंदावरकर म्हणतात कीं, "तें सर्व समजण्याची आम्हांमध्यें पात्रता आलेली नसावी! परंतु एवढें मात्र खरें कीं मिलच्या मतांचा व विचारांचा सढळ रीतीनें आम्ही उपयोग करीत असूं व जेव्हां जेव्हां आम्ही आपलीं मतें व विचार ठांसून सांगण्याचा प्रयत्न करीत असूं तेव्हां तेव्हां 'स्वातंत्र्य, समता व बंधुभाव' ह्यांच्या द्वारेंच जीविताचें उच्च ध्येय साध्य होणें शक्य आहे असें आम्ही प्रतिपादीत असूं. मिल हा अज्ञेयवादी होता हें आम्हांला

---

१६. On entering its precincts the first person I met was Chandavarkar, who was then like me one of the most recent entrants. He asked me who I was and what I wanted and I told him. He thought I would not get a room to live in. I thought I would. So in our first coming together, we agreed in some matters and differed in others, and it strikes me as a very strange coincidence that this little incident typifies all our relations through the many years that followed. We soon became friends and passed much time in each other's company. I found him very industrious and intelligent.

He soon attracted notice and became known to Principal Wordsworth–a very great honour in those days.–*G. S. Khaparde.*

माहित होतें. त्यामुळें आमच्या कॉलेजाचें सगळें वातावरण अज्ञेयवादास अनुकूल झालें होतें. असें व्हावयास दोन गोष्टी विशेषतः कारण झाल्या होत्या. पहिली, त्यावेळीं तेलंग आमचे दक्षिणा फेलो होते आणि ते स्वतः इतके मिलमय झाले होते कीं, त्यांच्याशीं संभाषण करतांनाही आमचा असा ग्रह होत असे कीं, परमेश्वरावरील विश्वास व आत्म्याचें अमरत्व ह्यांविषयीं तेलंगांचे विचार निश्चित नाहींत.[१७] दुसरी गोष्ट अशी कीं, त्यावेळीं प्रो. वर्डस्वर्थ हे आमचे प्रिन्सिपाल होते. त्यांचीं निरनिराळ्या वर्गांत जीं व्याख्यानें होत व त्यावेळच्या दैनिकांमध्यें धर्मविषयक चाललेल्या वादाविषयीं त्यांचीं जीं पत्रें वारंवार प्रसिद्ध होत असत, त्यांवरून, सकारण म्हणा अगर अकारण म्हणा, आमचा तरी असा ग्रह होऊन गेला होता कीं, ते देखील अज्ञेयवादीच असावेत. ह्या दोघांसंबंधानें आमचे जे ग्रह झाले होते व त्यांच्या विचारांचें आम्हांवर जें वजन असे, त्यामुळें आम्हां विद्यार्थ्यांचें तत्त्वज्ञान जर संशयवादास अनकूल बनलें असलें तर त्यांत नवल तें काय? [१८]इतकें असूनही ह्याच काळीं विद्यार्थ्यांच्या बुद्धीस व नीतीस योग्य तें वळण लावण्याच्या हेतूनें Butler चे Analogy व Sermons हे ग्रंथ शिकविले जात असत हें विसरून चालावयाचें नाहीं.

अशा प्रकारचें कॉलेजचें वातावरण असतांना English Monasteries and their dissolution ह्या विषयावर सर्व विद्यार्थ्यांप्रमाणें नारायणरावांसहि एक निबंध लिहिण्याची संधि मिळाली. इतिहास हा विषय त्यांच्या आवडीचा. त्यांतून धर्मसंस्था व बहुजनसमाज ह्या विषयाकडे त्यांचा ओढा असल्यामुळें त्यांनीं प्रस्तुत विषयाची चांगली तयारी करावयाची असा विचार करून ते उद्योगास लागले. निबंधलेखना-

---

१७. "Telang, then senior fellow of the college, was full of Mill and in his conversation with students gave the impression of one who held his belief in God and immortality in suspense"—*Chandavarkar's Article in the Elphinstonian.*

१८. हा परिणाम ध्यानांत घेऊन डॉ. रामकृष्णपंत भांडारकर ह्यांनीं आपल्या कुटुंबांत दैनिक कौटुंबिक उपासना सुरू केली. त्याविषयीं स्वतः वासुदेवराव भांडारकरांची सुबोधपत्रिकेंत पुढील आठवण प्रसिद्ध झाली आहे :–" दादांनीं (डॉ. भांडारकरांनीं) कौटुंबिक उपासना आपल्या कुटुंबांत सुरू केली त्याची माहिती मनोरंजक व बोधपर आहे. मी त्यावेळीं कॉलेजांत शिकत होतों. साधारणतः तो काळ मिल व स्पेन्सरचा होता. माझा कल मिल व स्पेन्सरकडे जाणार असें पाहून व हाच कल वाढूं दिला तर आपला भाऊ प्रार्थनासमाजास मुकणार असें वाटून त्यांनीं कौटुंबिक उपासनांस १८७३ सालीं सुरवात केली ती शेवटपर्यंत चालू होती." (१९२५)

पूर्वी ह्या विषयाची चर्चा त्यांनीं आपल्या मामांपाशीं केली असावी असें मानावयास जागा आहे. आपल्या निबंधांत त्यांनीं विषयाचें सांगोपांग विवेचन केलें होतें. त्यांचा निबंध वाचून प्रिन्सिपाल वर्डस्वर्थ ह्यांस पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें व त्यांस निबंध-लेखनाबद्दल बक्षिस मिळालें. दादासाहेब खापर्डे म्हणतात कीं "नारायणरावांनीं आपला निबंध मला वाचून दाखविला होता.[१९] त्यांना बक्षिस मिळालें हें पाहून आम्हांला फार आनंद झाला." जो निबंध वाचून प्रिन्सिपाल वर्डस्वर्थ ह्यांसही अत्यंत आश्चर्य वाटलें तो तयार करण्यासाठीं नारायणरावांनीं पुष्कळच श्रम केले असले पाहिजेत हें उघडच आहे. त्यांनीं नारायणरावांस बोलावून निबंधाची कशी तयारी केली तें त्यांस कुतूहलबुद्धीनें विचारलें. नारायणरावांनीं ग्रंथांची माहिती सांगितली, व त्यांस असेंही कळविलें कीं, आपल्या मामांच्या लायब्ररीमध्यें Edinburgh Review चे जुने अंक आढळले. ते अंक वाचीत असतां ह्या विषयावरील चर्चा आपल्या वाचनांत आली होती. त्यांतील माहिती व विचार आपण टिपून ठेविले होते, त्यांचाही आपल्याला चांगला उपयोग झाला.

मिलच्या विचारांचें दडपण विद्यार्थ्यांच्या मनावर असतांनाच तो परलोकवासी झाला व नंतर त्याचें आत्मचरित्र व धर्मावरील तीन निबंध ( Autobiography and Mill's Three Essays on Religion) हे दोन ग्रंथ प्रसिद्ध झाले. आत्मचरित्र ग्रंथानें सर्व विद्यार्थ्यांचे चांगलेच डोळे उघडले ! कारण जो ग्रंथकार केवळ कोरड्या ज्ञानाचा व शुष्क बुद्धीचा उपासक अशी विद्यार्थ्यांची समजूत होती, त्याच मिलच्या ठिकाणीं अखिल मानुषतेविषयीं आदर असल्याचें व प्रबल विश्वास असल्याचें दिसून आलें ! पाण्याचा प्रचंड धबधबा, पर्वतावरील निरतिशय सौंदर्य इ. सृष्टिसौंदर्याचा तो उपासक असल्याचें विद्यार्थ्यांस कळून चुकलें. मिलचें आत्मचरित्र वाचून विद्यार्थ्यांना असें दिसून आलें कीं, वर्डस्वर्थचें काव्य व येशूचें चारित्र्य ह्यांच्यायोगें अखिल विश्वाकडे पहाण्याच्या मिलच्या दृष्टींत फरक पडला होता.

## Prelude काव्यानें केलेलें कार्य

नारायणराव म्हणतात कीं, "ह्याच वेळीं बी. ए. च्या परीक्षेसाठीं लावलेलें Prelude ह्या काव्याच्या अध्यापनास प्रो. वर्डस्वर्थ ह्यांनीं प्रारंभ केला. त्यावेळीं आमच्या

---

१९. ह्या निबंधसंबंधानें दादासाहेब खापर्डे ह्यांनीं पुढील विधान केलें आहे:— We read the essay together and he gained a prize for it and we rejoiced together. ( निबंधाची तयारी आम्ही दोघांनीं मिळून केली व बक्षिस मात्र त्यांना मिळालें असा अर्थ ह्या वाक्यांत ध्वनित होतो काय ? )

पैकीं पुष्कळांस हें काव्य समजण्यास जरा बिकटच होतें." हें पाहून प्रो. वर्डस्वर्थ ह्यांस बरेंच आश्चर्य वाटलें. कारण ज्या ह्या देशांत सृष्टिसौंदर्याविषयीं सर्वत्र आवड दिसून येत आहे, ज्या देशांतील कवींनीं व संतांनीं सृष्टिसौंदर्याचीं मनोहर वर्णनें जागोजाग केलीं आहेत, ज्यांचें काव्य व तत्त्वज्ञान अद्वैतपर आहे त्या ह्या देशांतील सुशिक्षित तरुणांस ज्या कवीनें त्यांच्या कवींप्रमाणें सृष्टिसौंदर्याचें वर्णन केलें आहे, त्याचें काव्य समजण्यास अवघड जावें ह्याचें त्यांस राहून राहून आश्चर्य वाटे. हें काव्य प्रिन्सिपाल वर्डस्वर्थ शिकवीत असतांना विद्यार्थ्यांच्या मनोवृत्ती ते आपल्याकडे ओढून घेत व कांहीं ओळींचें सहज स्पष्टीकरण करीत असतांना मनावर असा गंभीर परिणाम होत असे कीं, त्याचा विद्यार्थ्यांस केव्हांच विसर पडत नसे. सर नारायणराव म्हणतात[२०] :—

"मी स्वतः विद्यार्थि असतांना एकदां एक प्रसंग घडला. प्रिन्सिपालसाहेब Prelude हें काव्य शिकवीत होते, त्यावेळीं

The grandeur which invests
The mariner who sails the roaring sea
Through storm and darkness

ह्या ओळींचा संबंध जेव्हां आला, तेव्हां आमच्या वर्गांतून समोरच दिसणारें तें सागराचें भव्य पात्र, सर्व बाजूंनीं क्षितिजापर्यंत दिसणारा तो महासागर दाखवून त्यांनीं त्यावेळीं संसारांत वागत असतांना वाइटाशीं झुंजण्याचें, नानाप्रकारचीं संकटें सहन करण्याचें सामर्थ्य मनुष्यामध्यें जें येतें त्याच्या योगें मनुष्यामध्यें दैवी गुणांचा कसा विकास होत असतो हें ते सांगत असतांना प्रिल्यूडचे निर्मिते त्यांचे आजोबाच तेथें अवतरून आपलें काव्य आम्हांस विशद करून सांगत आहेत असा आम्हांस भास झाला! सुमारें अर्धातासपर्यंत ह्या ओळींचें गांभिर्य व त्यांतील गूढार्थ ह्यांविषयीं त्यांचें स्पष्टीकरण चालू असतांना, मला तर असें वाटलें कीं, माझ्या नैतिक व मानसिक वाढींत निःसंशय भर पडली! त्यावेळीं माझ्या स्वतःच्या अनधिकारित्वाबद्दल माझी खात्री झाली व कॉलेजाच्या द्वारें मला एका महात्म्याचेंच दर्शन झालें असें वाटलें! तो प्रसंग, त्या ओळी, माझ्या प्रिन्सिपालचा तो सतेज चेहरा, त्यावेळेचा तो एकंदर गंभीर प्रसंग ह्यांची आठवण आजतागायत ताजी आहे इतकेंच नव्हे, तर त्या प्रसंगाची आठवण करून त्यापासून मी स्वतः स्फूर्ति प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न केला आहे." एकंदरींत प्रिल्यूड ह्या काव्याच्या अध्ययनानें विद्यार्थ्यांच्या मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम झाला ह्यांत कांहीं शंका नाहीं. "आपलें कॉलेज

२०. १९१० सालीं नारायणरावांनीं एल्फिन्स्टन कॉलेजांत दिलेलें व्याख्यान पहा.

म्हणजे साधी राहाणी व उदात्त विचार ह्यांचा संगम करून देणारें ठिकाण होय असें आम्हांस पटलें. फ्रेंच राज्यक्रांतीचे परिणाम पाहून कवि वर्डस्वर्थ निराशेच्या गर्तेत पडत असतांना त्याच्या बहिणीनें त्याला सांवरलें, ह्यावरून विद्यार्थ्यांनीं असा बोध घेतला कीं, साधारणतः पुरुषाची उन्नति व उद्धार स्त्रीच्या द्वारें होत असतो. प्रकृति व सृष्टिसौंदर्य हीं अल्पकाळ डोळ्यांचे चोजले पुरविण्यासाठीं किंवा क्षणिक सुखासाठीं नसून, जें जें कांहीं सृष्टिसौंदर्य व वैभव आपल्याला दिसतें त्यांत नैतिक जीवन आहे असें त्यांना पटलें. पक्षी, पुष्प, सागर, नदी, चंद्रसूर्य, तारे, पर्वतांच्या रांगा, सुंदर भव्य पुरातन इमारती ह्या सर्वांस वाचा आहे व माणसें जरी त्यांच्याशीं बोललीं नाहींत, तरी तीं नित्य आपल्याशीं बोलत असतात, एखाद्या नांवाजलेल्या वक्त्यापेक्षांही त्यांचें वक्तृत्व दांडगें असतें" हा बोध निदान नारायण-रावांसारख्या विद्यार्थ्यांनीं तरी त्यावेळीं घेतला, असें त्यांच्या स्वतःच्या लेखावरून स्पष्ट होत आहे.[२१]

प्रो. वर्डस्वर्थ मोठ्या गांभिर्ययुक्त व वक्तृत्वपूर्ण वाणीनें आपलीं व्याख्यानें देत असत अशी त्यांची ख्याति असे. Geometry च्या अभ्यासासंबंधानें कवि वर्डस्वर्थ ह्यानें असा स्वानुभव सांगितला आहे कीं, There I found both elevation and compound delight. त्यासंबंधानें एकदां प्रो. वर्डस्वर्थ ह्यांनीं स्पष्टीकरण केलें तें ऐकून आपल्या मनावर नवीनच प्रकाश पडला असें विद्यार्थ्यांस वाटलें. आपलीं व्याख्यानें देत असतांना आपले आजोबा कवि वर्डस्वर्थ ह्यांना सृष्टिसौंदर्यच पर-स्पर परमेश्वराचें ज्ञान कसें करून देत असे ह्याची फोड नातू प्रो. वर्डस्वर्थ करून देत; ह्याचा परिणाम असा झाला कीं, "अज्ञेयवाद किंवा केवळ बौद्धिक ज्ञान ह्यांच्या योगें आमच्या कोंवळ्या मनावर वैराग्याचा पगडा बसण्याचा जो संभव होता तो नाहींसा झाला; आम्हांला ज्ञानाचें व अनुभवाचें एक नवीनच दालन उघडलें गेल्यासारखें झालें; एकंदर जीवनाकडे योग्य दृष्टीनें आम्ही पहावयास लागलों, उच्च विचारांच्या वातावरणांत आम्ही वागूं लागलों व पवित्र विचार, पवित्र आकांक्षा ह्यांचा लाभ करून देण्याचें ठिकाण म्हणजे आमचें एल्फिन्स्टन कॉलेज असें आम्हांस अभिमानपूर्वक वाटूं लागलें. मिलनें विद्यार्थ्यांना आयुष्यां-तील खऱ्या पुरुषार्थाची कल्पना करून दिली, तर वर्डस्वर्थनें जीवनाची

---

२१. नारायणरावांच्या मनावर Prelude व डॉ. वर्डस्वर्थ ह्यांनीं केलेलें स्पष्टीकरण ह्यांचा इतका परिणाम झाला होता कीं आपल्याला झालेला लाभ तरुणांसही व्हावा ह्या उद्देशानें त्यांनीं Students' Brotherhood च्या विद्यार्थ्यांकरितां Prelude वर स्पष्टीकरणार्थ अनेक व्याख्यानें दिलीं. त्यांचा सारांश प्रसिद्ध झाला आहे.

योग्यता किती थोर आहे तें सांगितलें. आणि हें सर्व प्रो. वर्डस्वर्थ ह्यांच्या विद्वत्ता व वक्तृत्वपूर्ण गभीर व्याख्यानांच्या द्वारें साध्य झालें असें सर्व विद्यार्थ्यांस वाटत असे. पण एवढ्यानेंच त्यावेळच्या विद्यार्थ्यांवरील हितकर परिणामांची हकीकत संपली असें समजण्याचें कारण नाहीं. मिल व वर्डस्वर्थ ह्यांनीं मानवी जीवनकलहांत तत्त्वज्ञानाचें महत्त्व विद्यार्थ्यांच्या निदर्शनास आणून दिलें. परंतु नेहमींचा अनुभव असा आहे कीं, तत्त्वज्ञानाचे कोरडे सिद्धान्त पुढें ठेविले, व त्यांस दृष्टान्तांची जर जोड दिली नाहीं तर तत्त्वज्ञानाचें महत्त्व मनावर बिंबण्याचा संभव कमी. म्हणून खरें पहातां इतिहासाचें महत्त्व आहे. शाळांत व कॉलेजांत इतिहास शिकवितात. पण यांत विद्यार्थ्यांचें मन रिझेल अशी विशेष घडामोडीपासून विशेष बोध दाखविण्याची खटपट होते कोठें? राजांचे पराक्रम, राजे व राण्या ह्यांचा सुष्टपणा व दुष्टपणा, तारखांचा सुकाळ, लोकांतील कट, दुही, भाऊबंदकी हा आमचा इतिहास! परंतु प्रो. वर्डस्वर्थ ह्यांनीं Prelude वरील आपलीं व्याख्यानें द्यावयास सुरुवात केली, त्याच वेळीं ग्रीनची Short History of English People हा ग्रंथ प्रसिद्ध झाला होता. या ग्रंथानें इतिहास व त्याची शिकवण ह्या संबंधाच्या कल्पनेंत एकदम क्रांति करून सोडली. ग्रंथ स्वतः वाचून प्रो. वर्डस्वर्थ ह्यांना इतका आनंद झाला कीं, त्यांनीं तो आपल्या प्रत्येक विद्यार्थ्यास अवश्य वाचावयास सांगितला. कारण, ह्या ग्रंथाच्या वाचनानें आपल्या विद्यार्थ्यांच्या हें मनांत बिंबावें अशी त्यांची इच्छा होती कीं, लोकांची उन्नति अगर अवनति ही राजे अगर राण्या ह्यांच्यावर अवलंबून नसते. तर ती बहुतांशीं लोकांवरच अवलंबून असते. त्याचप्रमाणें मुत्सद्दी व राजकारणी पुरुष मात्र जनतेचें भविष्यकालचें वैभव अगर अधःपतन ह्यांस कारण होतात असें नव्हे, तर कवि, तत्त्ववेत्ते, साधुसंत हेही देशाच्या उन्नतीस अगर अधोगतीस कमीअधिक प्रमाणानें कारण होतात हा महत्त्वाचा धडाही आपल्या विद्यार्थ्यांनीं शिकावा."[२२]

अशा प्रकारच्या शिकवणीचा जो परिणाम होणें शक्य होतें तोच कसा झाला हें नारायणरावांचें चरित्र दाखवीत आहे. प्रिन्सिपाल वर्डस्वर्थविषयीं त्यांच्या ठिकाणीं अत्यंत आदर असे व त्यांच्या शिकवणीचा मनावर जो परिणाम झाला त्याचा त्यांना केव्हांही विसर पडला नाहीं. फर्ग्युसन कॉलेजच्या विद्यार्थ्यांस उद्देशून त्यांनीं एकदां जें व्याख्यान दिलें त्यावेळीं त्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं, "आमच्या वेळीं तत्त्वज्ञानासंबंधानें

---

२२. Elphinstonian चा १९०६ चा फेब्रुआरीचा अंक पहा.

आम्ही जें कांहीं बडबडत असूं तें सर्व मिलच्या आधारें! पण, आम्हांला त्याच्या तत्त्वज्ञानाचा शेंडा बुडखा कांहीं कळत असे किंवा नाहीं ह्याचा संशयच आहे! ते मिलच्या उपयुक्ततावादाचे ( Utilitarian ) दिवस होते, स्पेन्सर पुढें येत होता, त्यामुळें आमचा तिकडे ओढा असे. पण, पुढें प्रिन्सिपाल वर्डस्वर्थ मिलचेंच पुस्तक शिकवितांना त्याचा एकेक मुद्दा खोडून काढूं लागले, व जेव्हां मिल देखील वर्डस्वर्थच्या काव्याचा भोक्ता होता हें आम्हांस कळलें तेव्हां तत्त्वज्ञानविषयांतील निरनिराळे वाद, त्यांतील मतभेद ह्यांविषयीं माहिती असलेली कांहीं वाईट नाहीं, हें आम्हांस पटलें; पण वर्डस्वर्थसाहेबांच्या शिकवणीमुळें सर्वांत श्रेष्ठ गोष्ट आमच्या ही लक्षांत येऊन चुकली कीं, परोपकारापेक्षांहि स्वतः शीलवान होणें हाच जीवनाचा मुख्य हेतु आहे." ह्या काळांतील आपला अनुभव दृष्टीपुढें ठेवून आपल्या कॉलेजांतील तरुणांस उद्देशून १९०६ सालीं त्यांनीं म्हटलें कीं, "बौद्धिक, नैतिक, व आध्यात्मिक बाबतींत नेहमीं उच्च दृष्टी असूं द्या. तुमची ह्या बाबतींत वाढ झाली पाहिजे. खुजट राहून उपयोगाचें नाहीं. कोणता तरी एखादा तत्त्ववेत्ता मार्गदर्शक म्हणून योजून ठेवा. जोंपर्यंत तुम्ही सत्यान्वेषणबुद्धीनें मनःपूर्वक मार्गक्रमण करीत रहाल, तोंपर्यंत तुमचें पाऊल भलत्याच दिशेला पडण्याची भीति नाहीं. तसेंच एखादा कविही तुम्ही आपलासा करा असें माझें तुम्हांला सांगणें आहे. तत्त्ववेत्ता तुमच्या बुद्धीच्या विकासास सहाय्य करील, तर कवि तुमच्या अंतःकरणाच्या विकासाकडे दृष्टि पोंचवील. विकसितबुद्धि व कोमल अंतःकरण हीं आयुष्यांतील मोठीं साधनें होत. एकाच्या सहाय्यानें विवेकसामर्थ्य वाढतें, दुसरें प्रेमराज्यांत प्रवेश करवितें, आणि विवेक व प्रेम ह्यांच्या द्वारेंच जीवनास महत्त्व प्राप्त होतें, वैभव प्राप्त होतें. ह्यांबरोबर इतिहासकारास विसरूं नका! इतिहास आजपर्यंतच्या घडलेल्या गोष्टींच्याद्वारें जीवनाच्या खऱ्याखुऱ्या बाजूचें ज्ञान करून देतो. उत्तम शिक्षणसंस्थेचें ध्येय केवळ विद्वान माणसें तयार करणें हें नसावें, ती शिक्षणसंस्था आपल्या उन्नतीचें स्थान झालें पाहिजे." असो.

अशा प्रकारें उच्च शिक्षणाचा लाभ होत असतांना सर्व परीक्षांत इंग्रजींत त्यांचा नंबर पहिला असे.[२३] बी. ए. साठीं त्यांनीं इतिहास व तत्त्वज्ञान हे ऐच्छिक विषय

---

२३. दादासाहेब खापर्डे आपल्या एका पत्रांत लिहितात कीं, नारायणरावांनीं पहिल्याच वर्षी सफाईदार इंग्लिश लिहिणारा अशी कीर्ति मिळविली. ते उत्तम लेखक होते, त्याचप्रमाणें उत्तम वक्तेहि होते, हें कॉलेजांत विद्यार्थ्यांत जे वादविवाद होत त्यावेळीं अनुभवास येत असे. अशा वेळीं मी नेहेमीं चंदावरकरांच्या उलट पक्ष घेत असें व त्यांच्यावर सडकून टीका करीत असें! मी त्यांना कॉलेजांत

घेतले होते. इतिहास व अर्थशास्त्र ह्या विषयांत ते पहिले आल्यामुळें त्यांस त्यावेळीं जेम्स टेलर प्राइझ मिळालें. नारायणराव १८७६ सालीं झालेल्या परीक्षेंत बी. ए. ची परीक्षा पहिल्या वर्गांत पास झाले. ह्याच वर्षी पहिल्या वर्गांत जे दुसरे विद्यार्थि आले त्यांत वासुदेव गोपाळ भांडारकर, मनोहर विष्णु काथवटे, रावजी भवानराव पावगी, बाळ गंगाधर टिळक हे होते. दुसऱ्या वर्गांत विष्णुपंत भाटवडेकर, गोविंद-राव कानिटकर, जीवनजी जमशेटजी मोदी, गणेश गोपाळ पंडित, घनश्यामपंत पंडित, शिवराम सीताराम वागळे, गंगाराम बापसोबा रेळे इ० मंडळी होती. ही सर्व मंडळी महाराष्ट्राच्या चांगल्या परिचयाची असून प्रत्येक गृहस्थ लोकसमुहापुढें आलेला असून प्रत्येकाच्या हातून निरनिराळ्या प्रकारची सेवा झाली आहे, ही एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट असल्यामुळें नांवांची यादी वर दिली आहे. अशा-प्रकारें बी. ए.च्या परीक्षेंत त्यांस उत्तम यश प्राप्त झाल्यानंतर त्यांस दक्षिणा फेलो नेमण्यांत आलें व त्यामुळें प्रिन्सिपाल डॉ. वर्डस्वर्थ व प्रो. कर्खोम ह्यांचा व त्यांचा विशेष परिचय झाला.

परीक्षा पास झाल्यानंतर वर्डस्वर्थसाहेबांनीं नारायणरावांना जें प्रशस्ति पत्र दिलें तेंही विशेष प्रकारचें होतें. त्यांत त्यांनीं त्यांच्या हुशारीचा उल्लेख केला असून त्यांच्या उच्च शीलाबद्दल त्यांची स्तुति केली आहे. त्याचप्रमाणें नारायणराव मेहनत घेऊन निष्ठेनें काम करणारे आहेत व त्यांनीं पुष्कळ वाचन करून आपल्या ज्ञानांत भर घातली असून त्यांचे निबंध इतर विद्यार्थ्यांच्यापेक्षां निःसंशय उच्च प्रतीचे असत, व ह्यांच्या ठिकाणीं अहंतेची भावना मुळींच नाहीं असें स्पष्ट म्हटलें आहे.[२५]

---

**विद्यावाचस्पति** ही पदवी दिली होती. मीं विरोध केला म्हणजे आम्ही भांडलों आहों असा विद्यार्थ्यांचा ग्रह होत असे! परंतु आम्ही चांगले मित्र होतों. We were great friends and kind feelings prevailed to the last, though they were put to the severe test of political and social oppositions.

२४. कॉलेजमध्यें अभ्यास चालू असतांनाच १८७५ सालीं हुबळीचे श्री. शिरूर ह्यांच्या कन्येशीं नारायणरावांचा विवाह झाला.

२५. डॉ. वर्डस्वर्थ ह्यांनीं दिलेल्या प्रशस्तिपत्रांत पुढील भाग आहे:—

"I was very favourably impressed with the abilities and high moral character of Narayan Ganesh Chandavarkar whom I found remarkably pains-taking and industrious: His original compositions were distinctly above the average merit. He is a person of considerable literary culture but singularly free from presumption or vanity."

ह्यावरून वर्डस्वर्थसाहेबांच्या मनावर त्यांच्या एकंदर वर्तनाचा किती इष्ट परिणाम झाला होता त्याची कल्पना होते. कॉलेज सुटल्यानंतर हा संबंध कमी न होतां अधिक दृढ झाला. पुढें अनेक कार्यांत ह्या दोघांस एकत्र होऊन कार्यें करावीं लागलीं. वर्डस्वर्थसाहेब प्रकृतीच्या स्वास्थ्यासाठीं इटलीमध्यें जरी जाऊन राहिले होते तरी नारायणरावांस ते मधूनमधून पत्रें लिहीत व मुंबईची त्यांना चांगली आठवण असे. अखेरपर्यंत आपल्या हिंदी मित्रांचें त्यांना स्मरण होतें व प्रत्येक पत्रांत प्रेमानें तेलंग, भांडारकर व मलबारी ह्यांच्याविषयीं ते विचारपूस करीत.

नारायणराव फेलो असतांना प्रो. कर्खाम हेच इंग्रजीचे अध्यापक होते. त्यांच्या हाताखालीं त्यांस काम करावें लागे; विषय शिकविणें, परीक्षेचे पेपर काढणें, विषयांच्या मर्यादा ठरविणें वगैरे कार्यें करीत असतां नारायणरावांचें इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व, त्यांचें विचारगांभिर्य, टेनिसन व वर्डस्वर्थविषयीं त्यांची आवड हीं ज्याप्रमाणें त्यांच्या लक्षांत आलीं, त्याचप्रमाणें त्यांचें उत्कृष्ट शील व चारित्र्य ह्यांमुळें नारायणरावांवर प्रो. कर्खाम ह्यांचा लोभ जडला व पुढें इंदुप्रकाशचे संपादक असतांना व वकिली करीत होते तेव्हां त्यांचा परिचय वाढला. मिसेस कर्खामचीही ओळख झाली. धर्मपर विषयांवर संभाषणें होऊं लागलीं व डॉ. मार्टिनो ह्यांच्या ग्रंथांचा परिचय नारायणरावांनीं मि. कर्खाम ह्यांस करून दिला व त्यानंतर ते डॉ. मार्टिनोचे मोठे एकनिष्ठ भक्त बनले.[२६] अशाप्रकारें कॉलेजांत शिक्षकाचें कार्य करीत असतांनाच नारायणरावांकडे इंदुप्रकाश पत्राच्या इंग्रजी बाजूचें संपादकत्व आलें.

---

२६. I send you by this mail a special issue of Inquirer consisting of a fine portrait of Dr. Martineau which I am sure you would be glad to have. Do you remember that you were the first to introduce me to that wonderful book "Endeavours after Christian Life" and the " Hours of Thought?" It was Bhandarkar's copy I actually borrowed.—*From Prof. Karkham's letter.* ( 1900 )

प्रकरण तिसरें

# संपादक व लेखक

"Ah what a powerful redressor of people's wrongs! What a potent incentive to all kinds of goodness! What a terror unto kings and unto those who feed upon ignorance of the people! What powerful engine in man's hands!"[1]

—*Ranade.*

Under his (Chandavarkar's) editorship the paper (Indu Prakash) acquired the reputation of a first class journal While there was an agreeable variety of subjects in the articles appearing in the paper, each one of them was generally the result of considerable thought and information. Few native papers have been edited with ability and knowledge displayed by Mr. Chandavarkar during the time that he was in charge of that paper. Its opinions received their due weight in the highest quarters where it was looked upon as a leading liberal organ of educated native thought.

—*Eminent Indians.*

वर्तमानपत्र ही संस्था आपल्या देशांत पूर्वी नव्हती. इंग्रजांशीं संबंध आल्यानंतर वर्तमानपत्र अगर मासिक ह्यांची आपल्या लोकांना कल्पना येऊं लागली. केवळ मुंबई इलाख्याचा विचार केला तरी इ. स. १७८९ पूर्वी इलाख्यांत वर्तमानपत्र नव्हतें. त्यासालीं बॉंबे हेरल्ड नांवाचें इंग्रजी पत्र निघालें. १८३७ सालीं बाळशास्त्री जांभेकर ह्यांनीं "दिग्दर्शन" नांवाचें मासिक काढलें व त्याच्याद्वारें ते उदार विचारांचा प्रसार करूं लागले. १८४० सालीं रा. भाऊ महाजन ह्यांनीं "प्रभाकर" ह्या नांवाचें मराठी पत्र सुरू केलें. वर्तमानपत्राच्या बाबतींत रानडे नेहमीं

---

१. माधवराव रानडे कॉलेजांत शिकत असतांना कॉलेजांतील अभ्यासक्रमांत लिहिलेल्या एका निबंधांतील हा उतारा असून तो श्री. फाटककृत चरित्रांत पृष्ठ १३३ वर त्यांनीं उध्दृत केला आहे.

२. हे बाळशास्त्री १७ मे १८४६ रोजीं वयाच्या ३५ व्या वर्षी वारले.

म्हणत कीं, अनेक बाबतींत युरोपिअन लोक आम्हांला गुरुस्थानीं आहेत. वर्तमानपत्र ही संस्था आम्ही राजकर्त्यांपासून घेतली आहे. वर्तमानपत्रांचें महत्त्व कॉलेजांत शिकत असतांनाच त्यांना किती वाटत होतें व ह्या संस्थेकडे ते कोणत्या दृष्टीनें पहात होते त्याची अस्पष्ट कल्पना प्रारंभींच अवतरलेल्या त्यांच्या उद्गारांवरून होऊं शकते. ज्यावेळीं अवतरणांतील वाक्यें त्यांनीं आपल्या निबंधांत लिहिलीं त्यावेळीं लवकर एका साप्ताहिकाच्या इंग्रजी बाजूचे संपादक होण्याचा आपल्याला योग येणार आहे हा विचार त्यांच्या स्वप्नांतही आला नसेल. पण, इंदुप्रकाश पत्र काढावयाचें, व त्याला इंग्रजी बाजू असूं द्यावयाची असें ठरवितांच संस्थापकांनीं महादेव गोविंद रानडे ह्यांना इंदुप्रकाशचे पहिले इंग्रजी संपादक करावयाचें असा निश्चय केला. व माधवरावांनीं हें काम पत्करलेंही. खरें पहातां आपलें कॉलेजचें अध्यापनाचें काम संभाळून त्यांनीं इंदुप्रकाश चालविला. आणि ते इंदुप्रकाशाचे कांहीं महिनेच संपादक होते, तरी तेवढ्या अवधींत त्यांनीं तें कार्य इतक्या कसोशीनें व उत्तमप्रकारें केलें कीं अल्पावधींतच इंदुप्रकाशचें नांव सर्वतोमुखीं झालें. नंतर संपादक ह्या नात्यानें असलेला संबंध त्यांस सोडणें जरी भाग पडलें, तरी पुढें कांहीं वर्षें ते मधूनमधून इंदूसाठीं लेख पाठवीत व संपादकांस मार्गदर्शनाचें कार्यही करीत असत.

वर्तमानपत्रें व त्यांचे संपादक ह्या विषयाचा विचार करीत असतांना एक गोष्ट आपल्या विशेष रीतीनें लक्षांत येते ती अशी कीं, राजकर्त्यांपासून वर्तमानपत्र ही संस्था आम्हीं घेतली खरी, परंतु विलायतेंत संपादकाचें कार्य करूं इच्छिणारा जी पूर्वतयारी करितो ती मात्र आम्हीं पूर्वी केली नाहीं व आजही करीत नाहीं. अशा प्रकारची तयारी न करतांही आमच्या येथें लोकांनीं एकदम संपादनकार्यास प्रारंभ केला व त्यांपैकीं कित्येकांस उत्तम प्रकारची यशःप्राप्ति झाली. जांभेकर, रानडे, परमानंद, विष्णुशास्त्री पंडित, चिपळूणकर, टिळक, आगरकर ह्या सर्वांनीं एकदम संपादनकार्यास प्रारंभ केला व तें कार्य करीत असतां येणाऱ्या अडचणींस तोंड देतदेत त्यांनीं मार्गक्रमण केलें. नारायणराव चंदावरकरांचें असेंच झालें. कॉलेजांतून बाहेर पडतांक्षणींच त्यांना इंदुप्रकाशच्या इंग्रजी बाजूची जबाबदारी पत्करावी लागली. त्यांनीं ज्यावेळीं संपादकत्व पत्करलें त्यावेळीं इंदुप्रकाशच्या इंग्रजी बाजूचे हालच होत होते. काशिनाथपंत तेलंग मधून मधून लेख लिहीत पण ते संपादक नव्हते, आणि त्यांच्याच सूचनेवरून चंदावरकरांकडे हें काम आलें होतें. त्यांच्या आधीं जे. एस. कीर्तिकर ह्या नांवाचे एक गृहस्थ सुमारें ४ वर्षें इंदुप्रकाशचे इंग्रजी बाजूचे संपादक होते; १८७८ सालीं त्यांनीं राजीनामा दिला व पालिटाणा संस्थानांत नोकरी पत्करली. रान-

ज्यांनीं ज्या कामास प्रारंभ केला तें आपल्या हातून कसें पार पडेल याची काळजी नारायणरावांस वाटली नाहीं. तेलंगांचें त्यांना पाठबळ होतें व योग्य वेळीं ते आपणास मार्ग दाखवितील ह्याची त्यांस खातरी होती. त्यांनीं हें काम पत्करलें त्यावेळीं रानड्यांची व त्यांची तोंडओळखही नव्हती. पण, रानड्यांचें इंदुप्रकाशांतील इंग्रजी लेखांकडे लक्ष होतें. नारायणराव संपादक झाल्यानंतर इंदुप्रकाशांतील इंग्रजी लेखांत त्यांना कांहीं विशेष गुण आढळले. इकडे नारायणरावांस असें वाटूं लागलें कीं, जरी काशिनाथपंतांची आपल्या कामावर देखरेख आहे, तरी इंदुप्रकाशाच्या पहिल्या संपादकांची म्हणजे माधवराव रानडे ह्यांची व आपली ओळख होऊन त्यांच्या सल्लामसलतीचाहि आपल्याला लाभ मिळावा, म्हणून नारायणरावांनीं रानड्यांस पत्र लिहून आपल्या कामाची माहिती दिली व आपल्या कामाबद्दल त्यांचा अभिप्राय विचारला. रानड्यांनीं चंदावरकरांना कळविलें कीं मी तुमचीं आर्टिकलें व स्फुट लेख वाचीत असतों. मला तुमचीं आर्टिकलें फार लांबलचक वाटतात. आपल्याला जें कांहीं लिहावयाचें तें सर्व मुद्देसूद तर असलेंच पाहिजे, पण आपला आशय सर्व मुद्दे कायम ठेवून वाचकांस थोडक्यांत समजावून देण्याची कला तुम्ही साध्य करून घेतली पाहिजे.[३] ह्या सूचनेस अनुसरून नारायणरावांनीं आपलें काम पुढें चालविलें, तथापि स्वतः रानड्यांचें लिखाण जर पाहिलें, तर त्यांचे लेख थोडक्यांत लिहिले जात असत असें कांहीं म्हणतां यावयाचें नाहीं. त्यांच्या लेखांतील विचारगांभिर्य, भाषामाधुर्य, व अधिकारयुक्त विवेचन ह्यांच्यायोगें वाचणारांच्या विचारांस लेख वाचून चेतना मिळत असे. आतां नारायणरावांनीं ज्यावेळीं संपादनकार्यास प्रारंभ केला, त्यावेळीं कोणत्या प्रकारच्या परिस्थितीशीं त्यांस टक्कर द्यावयाची होती व कोणत्या प्रकारचें वातावरण येथें तयार झालें होतें त्याचा प्रथम विचार केल्यानंतर त्यांनीं स्वतः संपादक ह्या नात्यानें बजाविलेल्या कामगिरीचा विचार करावयास बरें पडेल.

विष्णुशास्त्री चिपळूणकर ह्यांनीं आपल्या निबंधमालेंत ज्या प्रकारच्या लिखाणास सुरुवात केली, तशा प्रकारचें लिखाण पूर्वी मराठींत नव्हतें असा सर्व साधारण समज आहे. त्यांचें प्रतिपक्षावर अगर लोकप्रिय पुढाऱ्यांवर बेमुर्वतीनें तुटून पडणें,

---

३. Avoid prolixity in your articles, and bestow more attention and energy on your editorial notes, because this is a busy age and people have no time to read long articles. Let your editorial notes be short, terse and crisp; let them be parthian shots.

त्यांची व्याजोक्ति, त्यांच्या भाषेंतील तिखटपणा, स्वतः खोल पाण्यांत न जातांही ते आणीत असलेला सर्वज्ञत्वाचा आविर्भाव, इ० गुण अगर अवगुण त्यांच्या लेखांत जे दिसतात त्यांस त्यांच्याच लिखाणापासून प्रारंभ झाला असा सर्वसाधारण समज आहे. तो खरा आहे, असें धरून चाललें तरी स्वतः चिपळूणकरांनीं ही तऱ्हा कोठून उचलली हा प्रश्न राहतोच! मेकालेच्या लेखन व विवेचन शैलीचा चिपळूणकरांवर पुष्कळ परिणाम झाल्याची साक्ष त्यांचे कित्येक निबंध देत आहेत. तथापि मासिक अगर वर्तमानपत्र ह्यांतील वरील स्वरूपाच्या टीकेचा पायंडा कोणी घातला याचा खुलासा नारायणरावांनीं एका लेखांत केला आहे तो लक्षांत घेण्यासारखा आहे.[४]

नारायणराव शाळांत व कॉलेजांत शिकत असतांना त्यांच्या बरोबरीच्या तरुणांस मुंबईतील रोजचीं इंग्रजी पत्रें वाचण्याची चटक लागली होती. टाइम्स आफ इंडिया व बॉंबे गझेट हीं दोनच दैनिक वृत्तपत्रें त्यावेळीं अस्तित्वांत होतीं. ज्या काळास उद्देशून नारायणरावांनीं माहिती पुरविली आहे त्यावेळीं टाइम्सचें संपादकत्व मि. राबर्ट नाइट ह्यांनीं सोडलें होतें व तें मि. मार्टिन वूड ह्यांच्याकडे आलें होतें. मि. वूड ह्यांचे लेख भारदस्त व विचारपूर्वक लिहिलेले असत. पण त्या भारदस्त व विचारपूर्वक लिहिलेल्या लेखांकडे तरुणांचें लक्ष नसे, ते त्यांकडे ढुंकून पहात नसत. त्यांना तिखट मीठ लावून लिहिलेले, व्यक्तींवर तुटून पडणारे, चुरचुरीत भाषेंत लिहिलेले लेख हवे होते. आणि त्यावेळचा बॉंबे गझेट हें काम उत्तम रीतीनें करीत असे! त्यावेळीं मि. जॉन मॅक्लीन हे बॉंबे गझेट पत्राचे मालक व संपादक होते. त्यांच्या लेखांत बेमुर्वतपणा भरपूर असे. प्रतिपक्षावर तुटून पडणें, त्याचा उपहास करून त्याच्या संबंधानें अनादराची भावना जागृत करणें, कुत्सित टीकेच्या जोरावर आपले लेख एकदम लोकांच्या लक्षांत येतील असें करणें ही कला त्यांस उत्तम साधली होती, व त्यामुळें त्यांच्या लेखांवर तरुणांची भक्ति असे व बॉंबे गझेटवर त्यांच्या उड्या पडत. खरें पहातां, तरुणांच्या आकांक्षांच्या ते अगदीं विरुद्ध होते. हिंदी सुशिक्षितांच्या हक्कांचें बोलणें निघालें कीं, तें त्यांस मुळींच खपत नसे. कॉलेजांत शिक-

४. At any rate I can vouch for this that Mr. Maclean's style supplied the model for the Native Editor by first catching the minds of our young students and teaching them to go and write likewise. The learned Shastri possessed a fascinating Marathi style and I have always thought that so far as I could judge, it was Mr. Maclean's Bombay Gazette that must have inspired its formation.

णाऱ्या तरुणांस ते विषारी साप ( Vipers ) असें म्हणत असत, एवढेंच केवळ नव्हे, तर कॉलेजच्या अध्यापकांवरही त्यांचा डोळा असे ! ते म्हणत कीं, सरकार ह्या प्रोफेसरांना लठ्ठलठ्ठ पगार जें देत असतें, तें दुसऱ्या तिसऱ्या कामासाठीं नसून त्यांनीं वर्षातून सहा महिने येथें राहावें व तेवढ्या अवधींत अराजनिष्ठ पोरें (Sedition mongers) तयार करावीं व बाकीचे सहा महिने रजेंत चैनींत घालविण्यासाठीं होय! अशाप्रकारें हिंदी लोकांच्या, विशेषतः सुशिक्षितांच्या, आकांक्षांस त्यांचा विरोध आहे हें माहित असूनही त्यांच्याच पत्रावर आमच्या तरुणांच्या उड्या पडत! आणि ह्याचें कारण त्यांच्या लेखांचा तिखटपणा व त्यांतील बेमुर्वतपणा होय! एखाद्या सार्वजनिक विषयाचा विरोधक पक्ष त्यांनीं उचलला म्हणजे गव्हर्नरांच्या विरुद्धहि व्यक्तिविषयक टीका करावयास ते मागें पहात नसत. अशाप्रकारची कुत्सित टीका दोघां गव्हर्नरांवर केल्याचा उल्लेख नारायणरावांनीं True Nationality ह्या आपल्या लेखांत केला असून त्यांत त्यांनीं असेंही म्हटलें आहे कीं, आतांचीं[५] इंग्रजी पत्रें त्या पद्धतीचें जरी अनुकरण करीत नाहींत, तरी त्याकाळीं तसें अनुकरण होत असे व त्यांच्या लेखांचा, विचारांचा, भाषेचा व विवेचनपद्धतीचा तरुणांच्या मनावर अनिष्ट असा परिणाम होत असे ह्यांत कांहीं संशय नाहीं. मॅक्लीनसारखें लिहितां येणें, त्यांच्याप्रमाणें थोरांमोठ्यांवर लेखांत तुटून पडणें हेंच तरुणांचें ध्येय झालें व त्यांच्याप्रमाणें बेलगाम, कुत्सित, निंदाप्रचुर, बेजबाबदार लिखाण निर्माण करणें स्वातंत्र्यप्रीतीचें व स्वातंत्र्याचें लक्षण ठरलें. म्हणून नारायणरावांनीं असें स्पष्ट नमूद करून ठेविलें आहे कीं, आपल्या ह्या मुंबई इलाख्यांत तरी वर्तमानपत्रांतील बेजबाबदार लिखाणाचें बीज इंग्रज वर्तमानपत्रकारांनींच पेरून ठेविलें आहे.[६] सारांश काय कीं, एकीकडे अध्यापनाची आवड नसलेले, अध्यापनाचे नांवानें वेठ वळणारे, शिस्तीसंबंधानें बेदरकार असलेले व विद्यार्थ्यांस केवळ परीक्षार्थी बनविणारे व त्याच हेतूनें त्यांस शिकविणारे अध्यापक व दुसऱ्या बाजूला अध्यापकांचें पाणी जोखलेले, वर्तमानपत्रांतील लेख अधाशाप्रमाणें वाचणारे, मॅक्लीनसारख्यांची लेखनशैली उचलण्यासाठीं हपापलेले विद्यार्थि असा प्रकार होता. त्यामुळें १८७८ च्या सुमारास मॅक्ली-

५. हा लेख १९०८ सालीं लिहिलेला आहे व बॅांबे गझेटसंबंधाची माहिती त्याच लेखाच्या आधारें येथें लिहिली आहे.

६. Confining myself to this Presidency, I think it is no exaggeration to say that this wild writing is due to the training, so to say, in the school of some of the Englishmen who edited news papers in the past.

नसारख्या लेखकांस, उघडपणें नाहीं तर प्रच्छन्नपणें, गुरुस्थानीं मानून स्पष्टोक्तीच्या नांवावर पूज्य, मान्यवर, विद्वान, लोकहितदक्ष पुढाऱ्यांवर अवास्तव, सत्याचा अपलाप करणारी टीका करणारी, खोट्या राष्ट्राभिमानाचें प्रदर्शन करणारी मंडळी पुढें येऊं लागली.[७] अशा वेळीं नारायणरावांनीं इंदुप्रकाश पत्राची इंग्रजी बाजू आपल्याकडे घेतली. व नंतर जवळ जवळ पंधरा वर्षें इंग्रजी संपादक ह्या नात्यानें त्यांचा इंदुप्रकाशाशीं संबंध होता. तेवढ्या अवधींत त्यांनीं इंदुप्रकाशाची इभ्रत पुष्कळ वाढविली व इंदुप्रकाशाच्या मतांविषयीं सर्वत्र आदर वाटूं लागला. ह्या दीर्घ काळांत त्यांनीं लिहिलेल्या सर्व लेखांची सविस्तर माहिती, इंदुप्रकाश पत्राच्या सर्व फायली उपलब्ध नसल्यामुळें देतां येणें शक्य नाहीं व एकार्थी त्याची आवश्यकताही नाहीं. म्हणून उपलब्ध लेखांचें अवलोकन करून, नारायणरावांनीं बजाविलेल्या कामगिरीचें साधारण स्वरूप ध्यानांत येण्यासाठीं पुढील विवेचन केलें आहे. ह्या पंधरा वर्षांच्या काळांत ज्या विशेष घडामोडी झाल्या त्यावेळीं इंदुप्रकाशानें जें धोरण स्वीकारलें व जे लेख लिहिले त्यांपैकीं कांहींची माहिती दिली असतां नारायणरावांच्या कामगिरीची कल्पना वाचकांस सहज होईल.

इंदुप्रकाशांत येणारा प्रत्येक लेख सर्व माहिती मिळवून पूर्ण विचारांतीं लिहिलेला असतो असा सर्वत्र अनुभवानें समज झाला. इंदुप्रकाशाचें मत म्हणजे विचारांत घेण्याचें मत असें लोकांस वाटूं लागलें. सरकारदरबारांत, त्याचप्रमाणें सुशिक्षितांत इंदुप्रकाशाच्या विचारांस महत्त्व प्राप्त झालें. एकदां तर प्रो. कर्खाम ह्यांनीं एका बाबतींतील खरा प्रकार नारायणरावांस कळविला व इंदुप्रकाशानें हें काम हातीं घ्यावें असें सुचविलें.

## आधीं सामाजिक कीं राजकीय ?

इंदुप्रकाश हें पत्र विशेषतः सामाजिक सुधारणेच्या कार्यास सहाय्यभूत होण्यासाठीं निघालें व त्याच्या मराठी बाजूचे पहिले संपादक विष्णुशास्त्री पंडित ह्यांनीं तें ध्येय आपल्यापुढें ठेवून कार्य केलें हें सर्वश्रुत आहे. परंतु इंदूच्या दोन्ही बाजूंस प्रचलित विषयांची चर्चा होत असे. आधीं सामाजिक कीं प्रथम राजकीय सुधारणा हा विषय आजच्या पिढीला अगदीं शिळा वाटतो व कित्येकांस असा विषय निघण्याची त्यावेळीं आवश्यकता कां वाटली असावी याची कल्पना होत नाहीं. परंतु

७. The soil was, as it were, favourable for a school preaching gospel, if one may call it, of irreverence and such a school... appeared on the scene in this Presidency in about the year 1878.

हा विषय आज जरी कोणास शिळा वाटत असला, तरी नारायणरावांच्या वेळीं तो अगदीं ताजा होता व इंदूनें त्यांत महत्त्वाचा भाग घेतला होता हें विसरून चाला-वयाचें नाहीं. आपण राजकीय चळवळीच्या मागें न लागतां, सामाजिक सुधारणाच प्रथम हातीं घेतली पाहिजे, आपल्या स्वतःचें घर व्यवस्थित केल्यावांचून सरकारकडे जाऊन राजकीय हक्कांची याचना करणें चुकीचें आहे असें निक्षून सांगणारा वर्ग त्यावेळीं आपल्यामध्यें होता. उलटपक्षीं पुष्कळांस हा युक्तिवाद पटत नसे. त्यांचें म्हणणें असें असे कीं, सामाजिक सुधारणेचा प्रश्न हा घरगुती प्रश्न आहे. त्याच्यासंबंधानें आज एक मत नाहीं. पुष्कळांस सुधारणेची आवश्यकताच वाटत नाहीं. कित्येकांना सुधारणा काळ घडवून आणील असें वाटत आहे. परंतु राजकीय सुधारणेचें तसें नाहीं. सर्व जातींच्या, सर्व धर्मांच्या लोकांना राजकीय विषयांचा विचार करितांना, सामाजिक व धर्मविषयक बाबतींतील आपले मतभेद विसरून एक होतां येतें. सर्वांना राजकीय बाबतींत सारख्या अडचणी आहेत व सर्वांना ह्या अडचणी दूर होऊन नवेनवे हक्क प्राप्त व्हावेत असें वाटत असतें. म्हणून सामाजिक सुधारणेचा घरगुती प्रश्न तूर्त मागें ठेवून सध्यां आपण सर्वांनीं एकमतानें राजकीय चळवळच नेटानें चालविणें अगत्याचें आहे. अशाप्रकारें हिंदी सुशिक्षित लोकांत दोन पक्ष झालेले पाहून हिंदी लोकांनीं सामाजिक सुधारणांतर्गत अनेक प्रश्नांस प्रथम महत्त्व देऊन ते प्रथम हातीं घेतले पाहिजेत, राजकीय हक्क मिळविण्याची पात्रता त्यांनीं प्रथम आपणांत आणिली पाहिजे आणि ती पात्रता सामाजिक सुधारणा घडवून आणल्यावांचून येणें नाहीं, म्हणून सामाजिक सुधारणाच प्रथम झाली पाहिजे असा फुकटचा उपदेश कांहीं अँग्लो इंडिअन लोक करूं लागले.[९] नारायणरावांनीं त्यावेळीं असें दाखवून दिलें कीं, इंदुप्रकाश पत्राला सामाजिक सुधारणेची आवश्यकता वाटत आहे हें सर्वांस माहीत आहे, परंतु सर ऑकलंड कालव्हिन् व त्यांच्यासारखीं इतर माणसें त्यांनीं हिंदी लोकांनीं आधीं सामाजिक सुधारणाच हातीं घेतली पाहिजे ह्या मताचा पुरस्कार करतांच त्या विचारांच्या लोकांनीं आपल्या मतांचा हा मोठा पुरस्कर्ता सांपडला असें समजून हुरळून जाण्याची आवश्यकता नाहीं. कारण, आमच्या भाबड्या लोकांनीं हें ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं, आमची सामाजिक हीन स्थिति पाहून व आमचा कळवळा येऊन सर ऑकलंड अगर त्यांच्या विचारांचीं माणसें सामाजिक सुधारणेचा पुरस्कार करीत

---

८. त्यावेळीं राजकारणांत जातिभेदाचा प्रवेश झाला नव्हता!

९. There ought to be total cessation of political activity and that all our energies should be directed to removing the anomalies in our social system.

नसतात. त्यांचा अंतस्थ हेतु निराळाच असतो! सामाजिक सुधारणाविषयक प्रश्नांकडे सर्व हिंदी लोकांचें लक्ष वेधलें गेलें म्हणजे अर्थातच सरकार व त्यांचे प्रतिनिधी ह्यांचेवर टीका करून लोकांमध्यें उत्पन्न होणारा असंतोष टाळतां येईल; लोकांमध्यें राजकीय हक्क व स्वातंत्र्य ह्यांसंबंधानें होणारी जागृति होणार नाहीं व त्यामुळें आहे ती व्यवस्था बिनबोभाट चालेल! केवळ सामाजिक सुधारणेचाच पुरस्कार केला तर त्या सुधारणांतर्गत असणाऱ्या अनेक बाबी कांहीं चुटकीसरशा अमलांत येण्यासारख्या नाहींत. सतत दीर्घकाळपर्यंत सामाजिक सुधारणेसंबंधानें लोकांत जागृति करीत रहावें लागणार. तोंपर्यंत राजकीय बाबतींत काय हात जोडून बसावयाचें? म्हणून आमचे प्रयत्न दोन्ही बाजूंनीं चालले पाहिजेत, असें त्यावेळीं इंदूनें प्रतिपादिलें. ह्याच सुमारास काशिनाथपंत तेलंग ह्यांचें एक व्याख्यान झालें होतें, त्यानें बरीच खळबळ उडवून दिली होती. किंबहुना ह्या विषयाची ही अशी चर्चा होत असतांनाच तेलंगांचें व्याख्यान झालें होतें. Lines of least resistance ह्या शब्दांवरून तेलंग हे सामाजिक बाबतींत सुलभ, बिन अडचणीचा तेवढा मार्ग सुचविणारे आहेत, असा लोकांचा समज झाला होता. वस्तुतः तेलंगांनीं आपल्या व्याख्यानांत असें दाखविलें होतें कीं, आम्हांला सामाजिक व राजकीय अशा दोन्ही सुधारणा हव्या आहेत व दोन्ही चळवळी आम्हांस चालू ठेवावयाच्या आहेत. परंतु सामाजिक सुधारणेच्या मार्गांत पुष्कळ अडथळे आहेत. सामाजिक सुधारणा सर्वांस प्रिय नाहीं. दोन्ही चळवळी चालू ठेवावयाच्या हें जरी खरें आहे तरी एकीच्या बाबतींत पूर्ण ऐक्य नाहीं, आमच्यांतच मतभेद आहेत, त्यामुळें आपापसांत भांडणें होण्याचा संभव आहे, म्हणून तसा वेळ येत असतां, कमी अडचणींचा धोपट मार्ग जो राजकीय चळवळीचा तो पत्करणें वावगें होणार नाहीं.[१०]

---

१०. तेलंगांनीं ह्या आपल्या व्याख्यानांत जे तीन मुद्दे पुढें आणिले होते ते साररूपानें नारायणरावांनीं इंदुप्रकाशांत पुढीलप्रमाणें मांडले होतेः—

(1) In the case of Political Reform we have a Government which is ready to grant our wishes if we show ourselves worthy of its trust; in the case of Social Reform we have a mass of ignorance, tradition and unwillingness to operate upon. The opposing forces in two cases are therefore differently constituted. Mr. Telang compares the Government and the Hindu population to two forts against which the army of reform has to fight and asks, can there be any doubt that the wisest course for that army is to take first the fort represented by the Government where we have numerous and powerful friends among the garrison and which

हें व्याख्यान झाल्यावर बरीच खळबळ उडाल्याचें वर आलेंच आहे. दादाभाई नौरोजी, फेरोजशहा मेथा, डोसाभाई फ्रामजी वगैरे गृहस्थांनीं वर्तमानपत्रांत आधीं राजकीय कीं आधीं सामाजिक ह्या प्रश्नाचा उहापोह केला. फेरोजशहांनीं जेव्हां असें पाहिलें कीं, तेलंगांच्या विचारांचा विपर्यास होत आहे, त्यावेळीं पुढें येऊन त्यांनीं असें दाखवून दिलें कीं, सामाजिक सुधारणेला विरोध करावा, किंवा केवळ राजकीय चळवळीचीच तळी लोकांनीं उचलावी असें सांगण्याचा तेलंगांचा हेतु नव्हता. परंतु आपल्या देशाच्या राजकीय व्यवहारांत एतद्देशीय लोकांना अधिकाधिक भाग मिळाला पाहिजे असें मुख्यतः तेलंगांचें म्हणणें आहे व इंदुप्रकाशानें त्यासच दुजोरा दिला. ह्यावेळीं उलट पक्ष मि. डोसाभाई फ्रामजी कराका ह्यांनीं घेतला होता. दादाभाईनीं असें दाखवून दिलें कीं, शरीराचे दोन अवयव सडले असतांना एकाकडेच सर्व लक्ष देणें व दुसरा खुशाल सडूं देणें हें जितकें सयुक्तिक, तितकेंच सामाजिक सुधारणेच्या मागें आज लागा, राजकीय सुधारणेचें मागाहून पहातां येईल असें म्हणणें हें आहे. पायोनिअर सारखीं पत्रें व मि. डोसाभाई फ्रामजी ह्यांनीं केवळ सामाजिक सुधारणेची तळी उचलून धरली म्हणून नारायणरावांनीं त्यांचा चांगलाच समाचार घेतला. त्यांनीं त्यावेळीं असें प्रतिपादिलें कीं, डोसाभाई फ्रामजीसारखीं माणसें, किंवा पायोनिअर सारखीं पत्रें सामाजिक सुधारणेचा जो पक्ष घेतात तो त्यांना सामाजिक सुधारणेचें तितकें उत्कट प्रेम असतें म्हणून नव्हे, तर राजकीय चळवळीपासून लोकांनीं परावृत्त व्हावें म्हणून ! त्याचप्रमाणें त्याच-वेळीं पायोनिअरला मलबारी शेट संबंधानें जो प्रेमाचा उमाळा आला होता तो

---

is held against us only in order to test first whether we shall be able properly to use any larger powers that may be conceded to us then. As to the other, soldiers of the old garrison are not in the least ready to give up, in some respects we have got even to forge and to learn to wield the weapons by which we have to fight them.

(2) On the side of Government we have to fight against reason and intellect, whereas in the case of the population, feeling and sentiments have to be overcome which is a much tougher fight than the first.

(3) In the case of political reform it is much easier to unite and we do as a matter of fact unite under a sense of common grievances, whereas in the other case there is no common platform on which to meet.

केवळ तेलंगांची निंदा करावयाची होती म्हणून ! तेलंगांना ह्या पत्रानें शाळेंतला फडाफड बोलणारा वक्ता Schoolboy orator असें म्हटलें होतें ! व मलबारी शेटला असामान्य कोटींतील पुरुष बनविलें होतें. हें पाहून नारायणरावांनीं पायोनिअरची चांगली हजेरी घेतली. त्यांनीं हें दाखवून दिलें कीं मुंबई इलाख्यांतील लोक मलबारी शेट व तेलंग ह्या दोघांचीहि योग्यता जाणून आहेत, व दोघांच्याही सेवेची लोकांना चांगली कल्पना आहे. तेव्हां ह्या दोघांना विरुद्ध पक्षी बनवून त्यांच्यांत सामना लावावयास व ती मौज पहावयास ते तयार व्हावयाचे नाहींत.[११] सुधारक म्हणविणारे पुष्कळ लोक बोलबोल बोलतात व कृति करून दाखविण्याची वेळ आली म्हणजे ते माघार घेतात, ह्या डोसाभाईच्या, मामुली टीकेस नारायणरावांनीं असें उत्तर दिलें आहे कीं, बोलाप्रमाणें कृति करून दाखविणारे हे श्रेष्ठ पुरुष होत ह्यांत कांहीं शंका नाहीं, परंतु बोलाप्रमाणें कृति होत नसली, आणि ती मुळींच होत नाहीं, हें नारायणरावांस मान्य नव्हतें, तरी सामाजिक सुधारणेसंबंधानें भाषणें करणें, चर्चा करणें, पुस्तकें लिहून प्रसिद्ध करणें ह्यांचा कांहींच उपयोग नाहीं असें कसें म्हणतां येईल ? आज सामाजिक सुधारणेच्या बाबतींत जी थोडीबहुत प्रगति झालेली दिसत आहे, ती अशा चर्चेचें फळ नाहीं काय ? पहा आमच्या जातींत सामाजिक सुधारणारूपी वृक्ष कसा फोफावत आहे असें डोसाभाई शेट मोठ्या अभिमानानें प्रतिपादूं लागले त्यावेळीं नारायणरावांनीं त्यांना असा उलट सवाल केला कीं, पारशी समाजाचा इतिहास तुम्हीं स्वतःच लिहिला आहे. तेव्हां ज्यांचे प्रयत्न पारशी समाजांत सामाजिक सुधारणा घडवून आणावयास कारण झाले त्यांनीं त्यावेळीं राजकीय बाबतींतले आपले प्रयत्न थांबवून धरले होते काय ? ज्यांनीं सामाजिक बाबतींत पुढाकार घेतला होता तेच राजकीय बाबतींतही पुढाकार घेणारे होते.[१२] राजकीय

---

११. The Pioneer may flatter Mr. Malbari by calling him a prophet and may denounce Mr. Telang as a schoolboy orator but they both know each other too well to be led by the judgment of the Pioneer and the people at large, at least in Western India, know how to value the services of each in their respective spheres of activity. We need not, therefore, trouble ourselves with the sage advice of the Pioneer.

१२. In fact the men who have been the foremost champions of Social Reform among Parsis have also been their best political leaders.

सुधारणा व सामाजिक सुधारणा ह्या दोन्ही एकाच वेळीं साधल्या पाहिजेत व त्या तशा साधतां येतात हेंच पारशी समाजाच्या आजपर्यंतच्या इतिहासावरून शिकण्या-सारखें आहे. नारायणरावांनीं ह्यावेळीं आणखी एक विचार लोकांपुढें ठेविला होता. केवळ राजकीय बाबतींत प्रयत्न करणारांस असें काय यश प्राप्त झालें आहे, कीं केवळ सामाजिक सुधारणेचा पुरस्कार करणारांस त्यांचा हेवा वाटावा? राजकीय बाबींचा बराच गवगवा होतो, बराच डंका वाजतो, एवढेंच. वास्तविक पहातां दोन्ही बाबतींतल्या प्रयत्नांस नुक्तीच सुरवात झाली आहे. दोन्ही सुधारणां-संबंधानें संघटित व दीर्घ प्रयत्न झाले पाहिजेत व ते प्रयत्न एकाच वेळीं झाले पाहिजेत. एक गोष्ट विशेष लक्षांत ठेविली पाहिजे. आम्ही इकडे आधीं सामाजिक कीं आधीं राजकीय हा वाद काढून आपापसांत भांडत बसूं व त्याचा फायदा पायोनिअरसारखीं पत्रें अगर आमचे इतर हितचिंतक घेऊन आपापसांत अधिक बेबनाव उत्पन्न करण्याच्या त्यांच्या प्रयत्नांस सहज यश मात्र यावयाचें! हा त्यांचा डाव लक्षांत घेऊन आपण आज वागण्याची जरूरी आहे हें नारायण-रावांनीं डोसाभाई[१३] शेट व त्यांच्यासारखे इतर मित्र ह्यांस स्पष्टपणें दाखवून दिलें.

आधीं सामाजिक कीं आधीं राजकीय ह्या प्रश्नाचा उहापोह चालू असतां तेलंगांचें Line of least resistance अशा विषयावर झालेल्या भाषणामुळें विषयाची चर्चा कशी झाली व इंदूनें त्यावेळीं कसें कार्य केलें ह्याची माहिती वर दिली आहे. झालेला सर्व वाद लक्षांत घेऊन १८८७ सालीं माधवराव रानडे ह्यांनीं प्रार्थनासमाजाच्या उत्सवांत जें व्याख्यान दिलें त्यांत आधीं राजकीय-वाल्यांचा त्यांनीं चांगला समाचार घेतला. त्यांतील कांहीं भाग येथें मुद्दाम घेतला आहे:—

---

१३. इंदुप्रकाशचे संपादक ह्या नात्यानें नारायणरावांनीं डोसाभाई फ्रामजी ह्यांचे-वर जरी इतकी कडक टीका केली तरी १८९७ सालीं नारायणराव युनिव्हर्सिटीतर्फे कौन्सिल निवडणुकीसाठीं जेव्हां उभे राहिले तेव्हां प्रकृति नादुरुस्त असतांही मत देण्यासाठीं डोसाभाई शेट युनिव्हर्सिटीपर्यंत गेले. त्यास उद्देशून लिहिलेल्या पत्रांत नारायणराव म्हणतात:—

You have showered on me what I am inclined to call a blessing and the blessing of a distinguished, experienced and revered gentleman like you is indeed most welcome and encouraging. I can only assure you, in return, that I shall conscientiously endeavour to prove worthy of your very kind support by acting my part well and wisely.

"लोकांना राजकारणांत भाग घेण्याची अतिशय हौस वाटते. जबाबदार राज-पद्धतीबद्दल आज सारखी वाचाळता सुरू आहे. पण सामाजिक सुधारणेचा प्रश्न निघाला कीं, सगळें गाडें फिरतें. राजकारणाविषयींचा दिसणारा ताव मावळून सामाजिक सुधारणेचें नांव निघालें कीं, अगदीं थंडगार मामला अनुभवास येतो. राजकारणां-तल्या वाचाळांची समाजसुधारणेच्या दर्शनानें दांतखीळ बसते. ते ह्या विषयाला नाकें मुरडतात आणि फार पाठीस लागलें तर नाना प्रकारचे बहाणे लढवून 'हा प्रश्न जाऊं द्या, आपोआप जें होईल तें होईल' असें म्हणतात. ही झाली राजकारणाच्या आवडीची सामान्य स्थिति. लोकांच्या प्रवृत्तींतही असाच विचित्र विसंगतपणा पसरला आहे. राजकारणांत कोणाला यश मिळालें कीं, मग तें लवमात्र कितीही क्षुद्र असो—ताबडतोब अशा यशस्वी माणसाला लोक डोक्यावर घेऊन नाचतात, त्याचे देव्हारे माजायला उशीर लागत नाहीं. राजकारणांतल्या माणसाला वाटेल त्या सवलती द्यायला आणि त्याच्या लहानमोठ्या सर्व दोषांकडे शक्य तितकी डोळेझांक करावयाला लोकांची तयारी आहे. सुधारकाला मात्र अगदीं क्षुल्लक बाबतींतसुद्धां गय करायला त्यांची तयारी नाहीं. त्याच्या तोंडांतून निघणाऱ्या व हातून घडणाऱ्या प्रत्येक गोष्टीची कसून परीक्षा केली जाते. ढोंगी, धर्मबुडव्या, अशा नानाविध कुशब्दांची त्याच्यावर वृष्टि करण्याला लोक तत्पर असतात. कोठेंही जा, 'परमेश्वराकरितां तरी सामाजिक प्रश्न उपस्थित करूं नका, जी स्थिति आहे ती सर्वथैव योग्य आहे,' असेंच बहुतेक सर्वजण तुम्हांला कळव-ळ्यानें सांगतील." (फाटककृत न्या. मू. रानडे ह्यांचें चरित्र पृ. ४०३)

आधीं सामाजिक सुधारणा कीं प्रथम राजकीय चळवळ हा वाद रंगांत आला असतांनाच काशिनाथपंत तेलंगांचें Line of least resistance च्या तत्त्वावर सुधारणा व्हावी असें म्हणणें आहे असा लोकांनीं गैरसमज करून घेतला व त्याचा परिणाम असा झाल्याचें नारायणरावांनीं पाहिलें कीं, सामाजिक सुधारणेचा एखादा प्रश्न निघाला कीं, सुशिक्षित मंडळी त्यावर मनसोक्त वादविवाद करतात, "पण समाजसुधारणेचें कोणतेंही कृत्य करून दाखविण्याची पाळी स्वतःवर आली कीं तें करून दाखविण्याची वेळ पुढें पुढें ढकलून आपल्या टाळाटाळीस तेलंगांच्या राजमार्गाची पुष्टि देतात!" नारायणरावांनीं इंदुप्रकाशचें संपादकत्व सोडल्या-नंतरच्या आपल्या एका लेखांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, "मला अशींही कांहीं उदाहरणें माहित आहेत कीं, तेलंगांच्या ह्या विधानाच्या पांघरुणाखालीं कित्येक लोकांनीं आपलीं कृष्णकृत्यें झांकण्याचा प्रयत्न केला आहे. आपल्या समाजाचा बुद्धिरूपी जठराग्नि मंद झालेला आहे व त्याच्या आध्यात्मिक यकृताला विकृति झालेली आहे अशा सध्यांच्या काळीं जर कांहीं लोकांनीं तेलंगांच्या विधानाचा

विपर्यास केला तर त्यांत फारसें आश्चर्य मानावयास नको."[१४] तेलंगांचें हें व्याख्यान झाल्यानंतर कांहीं महिन्यांनीं नारायणरावांची व माधवराव रानड्यांची पुण्यास गांठ पडली त्यावेळीं माधवरावांनीं त्यांजपाशीं असे उद्गार काढले कीं, "तेलंगांनीं जें तत्त्व प्रतिपादिलें आहे त्याच्याबद्दल लोकांमध्यें गैरसमज होण्याचा बराच संभव आहे. आपल्या लोकांना सुधारणेच्या विषयावर लांबलांब गप्पा मारण्याची संवय आहे, परंतु कृति करून दाखविण्याची वेळ आली कीं, त्यांपैकीं बरेच जण कर्तव्यविन्मुख होतात! अर्थातच ज्यांना स्वतःच्या उदाहरणानें समाजांतील व्यंगें दूर करण्याचें धैर्य नाहीं, अशा प्रकारच्या लोकांना तेलंगांसारख्यांनीं प्रतिपादिलेलें हें तत्त्व म्हणजे आपल्या जबाबदारींतून निसटण्यास आयतीच पळवाट मिळाल्यासारखें होणार आहे!" पुण्याहून मुंबईस परत आल्यावर रानड्यांचे विचार नारायणरावांनीं तेलंगांस कळविले. त्यावेळीं तेलंगांनीं केलेला खुलासा फार महत्त्वाचा आहे. ते म्हणाले, "माझ्या व्याख्यानांत मला विशेष सांगावयाचें होतें तें हेंच कीं, व्यक्तीची किंवा समाजाची साधारणतः अशी प्रवृत्ति असते कीं, शक्य तेवढें करून विरोध आणि गैरसोई चुकवून सुधारणा घडवून आणतां येईल तर आणावयाची. परंतु माझें स्वतःचें असें मुळींच मत नाहीं कीं, सुधारणा ह्या तत्त्वाबरहुकूमच झाली पाहिजे." ह्यावर नारायणरावांनीं त्यांना उलट असा प्रश्न केला कीं, "जे लोक विरोधास किंवा अडचणींस न जुमानतां प्रतिकारास मागें टाकून, व साधारण लोकांच्या पुढें जाऊन आपल्या ठाम समजुतींप्रमाणें चालण्यास डगमगत नाहींत ते लोक आपल्या वेळेचा व सामर्थ्याचा दुरुपयोग करीत आहेत असें म्हणण्याचा आपला उद्देश आहे काय? व्यक्तींनीं आपली उन्नति घडवून आणल्याशिवाय समाजाची उन्नति सहसा होत नसते हा जो समाजोन्नतीचा सर्वमान्य नियम आहे तो आपल्याला संमत नाहीं काय?" त्यावर तेलंगांनीं नारायणरावांस सांगितलें कीं, "कोणत्याही बाबतींत ज्यांनीं सुधारणा घडवून आणिलेली आहे, अशा थोर पुरुषांचें व्यक्तिशः समाजावर वजन पडतें आणि अशा व्यक्तींच्या उदाहरणांमुळें सामाजिक किंवा अन्य कोणत्याही प्रगतीस फार उपयोग होतो हें तत्त्व मला पूर्णपणें मान्य आहे."[१५] अशाप्रकारें आधीं सामाजिक कीं आधीं राजकीय ह्या विष-

१४. And in these days, when we have enough of "intellectual dyspepsia and spiritual liver complaint" to get rid of,...it is no wonder that men are to be met who have grievously misunderstood Mr. Telang's expression about "Reform running along the line of least resistance."—*Telang School.*

१५. He fully believed in the individual force of great reformers and the force of individual example as a factor of social or any other reform.—*Telang school.*

याचा खल चालू असतां, प्रतिकारास तोंड न देतां सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न करणें हें तत्त्व तेलंगांस कसें किंवा कोठपर्यंत मान्य होतें व सुधारणेच्या बाबतींत त्यांचे स्वतःचे विचार काय होते ह्याचा नारायणरावांनीं स्वतः खुलासा करून घेतला ही सामाजिक सुधारणेच्या इतिहासाच्या दृष्टीनें मोठी कामगिरी त्यांनीं बजाविली ह्यांत कांहीं संशय नाहीं. कारण, स्वतः नारायणरावांच्या ठिकाणीं तेलंगा-संबंधानें जरी अत्यंत आदर होता, त्यांची त्यांच्यावर भक्ति होती, तरी त्यांनीं असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, " तेलंग हे कर्ते सुधारक नव्हते ही गोष्ट नाकबूल करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. म्हणून त्यांचें वास्तविक स्वरूप लपवून त्यांचे ठिकाणीं नसलेले गुण त्यांच्या माथीं लादल्यानें सुधारणापक्षाचें कांहीं कार्य होत नाहीं, किंवा असें लोकांस भासविल्यानें तेलंगांची बाजू सांभाळली असेंही होत नाहीं. ह्या बाबतींतील आपला दुबळेपणा तेलंग पूर्णपणें जाणून होते. एवढेंच नव्हे, तर आपलें कर्तव्य करण्याचें धैर्य आपल्यामध्यें नाहीं ही गोष्ट ते प्रांजलपणें कबूल करीत असत, ही गोष्ट येथें मुद्दाम स्पष्टपणें नमूद केली पाहिजे. ज्यांच्या अंगीं समाजव्यंगें सुधारण्याइतकें धैर्य किंवा सामर्थ्य नाहीं अशा कित्येक लोकांचा असा समज झालेला आहे कीं, लोकाराधने-साठीं स्वमतास गुंडाळून ठेवण्याचे कामीं आपण तेलंगांच्या आवडत्या तत्त्वाचें अनुकरण करीत आहोंत; परंतु वस्तुस्थिति अगदींच भिन्न आहे. आपण जें केलें पाहिजे होतें तें करण्याइतकें धैर्य आपल्यांत नाहीं, म्हणून आपल्या कर्तव्याभावावर पांघरूण घालण्याचा प्रयत्न तेलंगांनीं कधींही केला नाहीं. उलटपक्षीं आपलें व्यंग ते पूर्णपणें जाणून होते व त्यांच्याशीं ज्यांचा निकट संबंध असे त्यांचेपाशीं ते असें स्पष्ट कबूल करीत कीं, कोणतेंही मोठें कार्य घडविण्याच्या किंवा ज्या कार्याविषयीं लोकांच्या मनांत निरुत्साह उत्पन्न झाला आहे तो घालविण्याच्या कामीं माझ्या-सारख्या निरुत्साही व हिशेबी माणसाचा तादृश उपयोग नाहीं.[१६] तेलंगांसंबंधानें एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, ज्यांच्या ज्यांच्याशीं त्यांचा परिचय होई त्यांना त्यांना ते प्रिय होत. याचें कारण ते शांत, बहुश्रुत व स्वतःचे दोष जाण-णारे व आपण चुकलों असें समजल्यावर आपली चूक मोकळेपणानें कबूल करणारे होते आणि दांभिकपणा किंवा खोडसाळपणा ह्यांचें त्यांना वारेंही नव्हतें."

## सामाजिक सुधारणा व कायदा

नारायणराव इंदुप्रकाशाचे संपादक असतांना ज्याप्रमाणें आधीं सामाजिक कीं आधीं राजकीय सुधारणा हा विषय वादास निघाला व त्यावर भरपूर चर्चा झाली,

---

१६. Cold and calculating natures such as his, could not be trusted to lead any great cause or forlorn hope.

त्याचप्रमाणें सामाजिक सुधारणेच्या बाबतींत सरकारनें हात घालावा किंवा नाहीं हाही विषय वादास निघाला. स्टूडंटस लिटररी सायंटिफिक सोसायटीच्या विद्यमानें त्यावेळीं महत्त्वाच्या विषयांवर व्याख्यानें होत व त्यावेळचीं मोठीं माणसें व्याख्यानें देण्यांत व वादविवाद करण्यांत पुढाकार घेत असत. पहिल्या विषया-वरील वादास काशिनाथपंत तेलंगांचें व्याख्यान कारण झालें व दुसऱ्या विषयावर प्रथम वासुदेवराव भांडारकरांनीं व्याख्यान देऊन विषयाच्या चर्चेस प्रारंभ केला. त्यांनीं त्यावेळीं केवळ एक बाजू म्हणून आपल्या श्रोत्यांपुढें ठेविली कीं स्वतःचे त्या विषयावरील विचार पुढें मांडिले तें आज नक्की सांगतां येत नाहीं. परंतु The lecturer seemed to be for non-interference on the part of the State in the regulation of our soical customs[१७] ह्या इंदुप्रका-शांतील वाक्यावरून असें दिसतें कीं, सरकारनें सामाजिक बाबतींत कायद्याच्या रूपानें ढवळाढवळ न करणें हेंच योग्य असें आपलें मत वासुदेवरावांनीं त्या सभेंत जाहीर केलें. आणि फक्त एका गृहस्थावांचून सर्वांनीं वासुदेवरावांच्याच मताला दुजोरा दिला आणि हे एकटे गृहस्थ नारायणराव असून त्यांनीं सर्वांच्या विरुद्ध आपले विचार प्रदर्शित करण्याचें धैर्य दाखविलें. आज आपल्या देशांत आधीं सामाजिक चळवळ कीं प्रथम राजकीय हा वाद अस्तित्वांत नाहीं. पण, सरकारी कायद्याच्या सहाय्यानें सामाजिक सुधारणा घडवून आणाव्यात किंवा कसें हा वाद आजही आपल्यापुढें आहे व तो तीव्र स्वरूपांत असून सामाजिक बाबतींत नवेनवे कायदे मागण्याकडे प्रवृत्तीही अधिकाधिक होत असलेली आपण पहात आहों. त्यावेळीं नारायणरावांनीं एक फार महत्त्वाचा मुद्दा लोकांपुढें विचारासाठीं ठेवला. सामाजिक सुधारणेच्या बाबतींत सरकारनें हात घालूं नये व कायदे करून सुधारणा होऊं नयेत असें तुम्ही म्हणतां, पण आज कायद्याची काय स्थिति आहे त्याचा प्रथम विचार करावयास नको काय? तो जर केला तर असें आढळून येईल कीं, सरकारनें हिंदूंच्या सामाजिक व्यवस्थेच्या बाबतींत कायदा करणें, किंवा कांहीं अहितकारक बाबी कायद्यानें बंद करणें ह्यांत नवीन असें कांहींच नाहीं. नारायणराव म्हणतात, सरकारचें Non-interference ह्याचा अर्थ असा कीं, समाजांत कांहीं रूढी चालू असून त्यांस कायद्याचें स्वरूप आलें असतां, त्या रूढ चाली अनिष्ट

१७. १८८४ सालीं मलबारी शेट ह्यांनीं बालविवाहासंबंधानें बरीच चळवळ करून खळबळ उडवून दिली होती. त्यांनीं देशांतील सर्व पुढारी लोकांचीं मतें मागवून तीं प्रसिद्ध केलीं व सरकारनें कायदा केल्यावांचून बालविवाह बंद व्हावयाचे नाहींत असें त्यांचें म्हणणें होतें, त्या चळवळीस उद्देशून हें व्याख्यान झालें होतें.

आहेत असा प्रवाद निघाला म्हणजे लोकांनींच आपल्या मतभेदांचा निकाल लावावा व सरकारनें तटस्थ असावें. पण आज तसा प्रकार खरोखर आहे काय? एखाद्या बापानें आपल्या सात वर्षांच्या मुलीचें लग्न करून दिलें[१८] व ती मोठी झाल्यावरही त्यानें तिला नवऱ्याच्या येथें पाठविलें नाहीं, तर सरकारी कोर्ट त्याला तसें करावयास भाग पाडतें. दुसरें उदाहरण घ्या. एक बायको जिवंत असतांना एखाद्यानें दुसरें लग्न केलें. त्यानंतर आपल्या नवऱ्यानें दुसरी बायको घरांत आणिली म्हणून ती नवऱ्याकडे येऊन नांदावयाचें नाकारूं लागली, तर नवरा कायद्याच्या मदतीनें तिला घरीं आणून नांदावयास लावील. अशा प्रकारचीं किती तरी उदाहरणें देतां येतील. आणि म्हणूनच आपल्यांतील दिवाण बहादुर रघुनाथराव, नामदार रानडे, राजा सर टी. माधवराव ह्यांच्यासारखीं कित्येक माणसें कांहीं बाबतींत सुधारणा घडवून आणण्यासाठीं सरकारचें सहाय्य घेणें अगत्याचें असतें असें आज प्रतिपादीत आहेत. आज कोर्टांच्याद्वारें सरकार हिंदूंच्या समाजव्यवस्थेंत ढवळाढवळ करीत आहे, मग त्याच्याविरुद्ध ही आमची चळवळ कां असूं नये? परंतु आपल्यापुढें खरा प्रश्न आहे तो असा:—आजपर्यंत ज्या रूढींना कायद्याचें स्वरूप आलें आहे व सरकार तसे निकाल देत आहे, अशा रूढींत सरकारला कायदा करून केव्हां फेरफार करणें रास्त होईल? दोन अटींवर ही गोष्ट अवलंबून राहील. जेव्हां एखाद्या समाजांतील **बहुसंख्याक** लोकांना कायद्यामध्यें फेरफार होण्याची आवश्यकता वाटत असून, तो फरक अनीतिपर, गैरकायदा, लोकहितघातक नसला, तर सरकारनें अशा वेळीं त्या समाजाला कायद्याचें सहाय्य अवश्य दिलें पाहिजे; म्हणजे बहुसंख्याकांना हवा तसा कायदा केला पाहिजे. **सर्व** लोकांना तो फरक मान्य आहे असें जेव्हां कळेल तेव्हांच आम्ही हात घालूं असें म्हणणें हा मूर्खपणा होईल. नाहींतर आज ज्यांना कायद्याचें स्वरूप प्राप्त झालें आहे अशा पुष्कळ गोष्टी सर्वांस त्या मान्य नाहींत ह्या मुद्यानुसार त्याज्य ठरतील! म्हणून मताधिक्य कोणत्या बाजूला आहे त्याचा विचार करून कायदा करणें जरूर आहे व आजपर्यंत सर्वत्र ह्याच पद्धतीस अनुसरून नवे कायदे होत आले आहेत.[१९] आणखी एका

---

१८. हे विचार १८८६ सालीं व्यक्त केले होते, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

१९. Laws must be made and have been in fact made in every civilized country in accordance with the wishes of the majority and that is the principle on which all public transactions are conducted because no other principle humanly speaking is practical.

प्रकारच्या परिस्थितींत सरकारला हात घालून कायदा करतां येतो. ज्यावेळीं एखादी रूढी सर्व प्रकारें रानटी, सारासारविचार व मानुषता ह्यांच्या उलट आहे, असें आढळून येतें, अशा वेळीं बहुसंख्याक लोकांना ती रूढी नसावी असें वाटत असो अगर नसो, सरकारनें ती ताबडतोब बंद केलीच पाहिजे.[२०] ह्याच तत्त्वावर सती व बालहत्त्या ह्या रूढी कायद्यानें बंद करण्यांत आल्या. परंतु बालविवाहासारख्या रूढीच्या बाबतींत हिंदूंतील बहुसंख्याक लोक केव्हांही कायदा मागावयास पुढें येतील किंवा कसें हा एक प्रश्नच आहे.[२१] सरकार सामाजिक बाबींबाबत कायदे करूं शकत नाहीं, किंवा आजपर्यंत तसे कायदे केलेले नाहींत हा जो आज पुष्कळ लोकांचा समज झाला आहे, तो जर वेळींच दूर केला नाहीं, तर आपल्यांतील बहुसंख्याक लोक ह्या विषयाच्या बाबतींत कायदा मागावयास केव्हांच पुढें येणार नाहींत. कायदे हे सर्व समाजांस आवश्यक आहेत आणि कायद्याच्या किंवा नियमांच्या अभावीं कोणत्याही समाजाची उन्नति होणें शक्य नाहीं. वाईट रूढींना बंधनकारक कायदे असले म्हणजे असल्या रूढी मोडल्या तर कायदा शिक्षा करतो व जे त्या रूढीप्रमाणें चालतात त्यांचें कायदा संरक्षण करतो. परंतु हा प्रकार आतां फार दिवस चालावयाचा नाहीं. इतर धर्मांचे लोक आमच्या पुढें जात आहेत, हें पाहूनही आमचे डोळे जर वेळींच उघडले नाहींत, तर आमची तरुण पिढी आमच्या डोळयांत अंजन घालील! लहानपणींच लग्न करून बसणें ही कांहीं सहज सुलभ गोष्ट नव्हे असें आतांच आमच्या तरुणांस वाटूं लागलें आहे. उपजीविकेचीं साधनें कमी झाल्यामुळें लहानपणीं लग्न करून बसल्यानें काय काय अडचणी येतात त्याची त्यांस कल्पना होऊं लागली आहे.[२२] आणि उद्यां बाळपणीं लग्न झालेल्या व वयांत आल्यावर नवऱ्याकडे जावयास तयार नसलेल्या मुलींना हें कळून चुकेल कीं, अशा वेळीं सहा महिन्यांची साध्या कैदेची शिक्षा देण्यापलीकडे कोर्टाला कांहीं करतां यावयाचें नाहीं, तर त्या तशाच हट्ट धरून राहतील व समाजास नमतें घ्यावें लागेल. आज नाहीं उद्यां कित्येक बाबतींत कायद्याचें सहाय्य आम्हांला

---

२०. Where a social custom is grossly of a perverse nature, opposed to all sense of decency and humanity, whether a majority wishes for a change in it or not, the State ought to put it down.

२१. संमतिवयाचा कायदा व शारदा कायदा हे दोन्ही कायदे नंतरचे आहेत.

२२. Hard pressed for means of ;subsistence they areal ready beginning to feel the misery of the thing.

घ्यावें लागेलच लागेल.[२३]

ह्याच सुमारास नारायणराव आणखी एका मार्गानें लोकजागृतीचें कार्य करीत होते. इंदुप्रकाश पत्र सर्वांच्या वाचण्यांत येत नसे. म्हणून सामाजिक व इतर कांहीं महत्त्वाच्या विषयांवर ते इंग्रजी दैनिकांसाठींही लेख लिहून लोकांच्यापुढें असणाऱ्या विषयांची जागृति करून देत असत. १८८६–८७ सालीं टाइम्स ऑफ इंडिया पत्रासाठीं Forces at Work ह्या सदराखालीं लिहिलेले त्यांचे कांहीं लेख ह्याचपैकीं होत. त्यावेळीं राष्ट्रीयसभेला नुकताच प्रारंभ झाला होता. जिकडे तिकडे राजकीय विषयांकडेच लोकांचा कल होता. टीकाकार नेहमीं म्हणत कीं, कांहीं कळत नसतां राजकीय बाबतींत बोबडे बोल काढणारी मंडळी गाडाभर आहेत, पण सामाजिक सुधारणेविषयीं विचार करावयास कोणी पुढें येत नाहींत. सर्वत्र सामाजिक सुधारणेच्या विरुद्ध गिल्ला करणाऱ्या लोकांचा सुकाळ झालेला होता.[२४] कॉलेजांत शिकलीसवरलेली मंडळी सरकारनें विधवाविवाहाचा कायदा केला ही मोठी चूक केली असें मोठ्या दिमाखानें प्रतिपादीत; मुलींच्या शिक्षणासाठीं पैसा खर्च करणें हें अत्यंत गैर आहे, तोच पैसा मुलांच्या शिक्षणासाठीं खर्च झाला पाहिजे, कारण, शिक्षण हें मुलींसाठीं नाहींच, मुलेंबाळें होण्यासाठीं आणि चूल सांभाळण्यासाठीं त्यांचा जन्म आहे असें प्रतिपादण्यांत त्यांना कमीपणा वाटत नसे.[२५] परदेशांतील जे स्त्रीपुरुष स्त्रीशिक्षणाविषयीं आस्था दाखवून त्या दिशेनें थोडेबहुत प्रयत्न करीत, त्यांस चक्क सांगण्यांत येत असे कीं, तुम्ही ह्या उठाठेवी[२६] कशाला करतां ? तुम्ही आपल्या स्वतःच्या समाजाच्या उन्नतीकडे लक्ष पुरवा व हें लष्करच्या भाकरी भाजण्याचें सोडून द्या ! परंतु प्रथम शिक्षणास जी सुरवात करण्यांत आली ती स्वार्थबुद्धीनें नव्हती, ह्याचा विसर आज सर्वांना पडला आहे.

---

२३. १८९२ सालीं ज्यावेळीं संमतिवयाचें बिल वरिष्ठ कौन्सिलपुढें चर्चेसाठीं गेलें, त्यावेळीं नारायणरावांनीं एक माहितीनें भरपूर भरलेला लेख लिहून बॉंबे गॅझेटमध्यें प्रसिद्ध करविला होता. त्यांत वॉरन हेस्टिंग्सच्या वेळेपासून ज्या ज्या वेळीं अखिल देशाच्या कल्याणाचा प्रश्न निघाला त्या त्या वेळीं सामाजिक बाबतींत सरकारनें कायदे कसे केले आहेत तें साधार दाखविलें आहे. हा लेख नारायणरावांच्या लेखसंग्रहांत छापलेला आहे (पृ. ३१३-३२८ पहा.)

२४. There a is wave of reaction running all over the country.

२५. Women were made not to be educated, but to bear children.

२६. हा टोमणा सर वुइल्यम वेडरबर्न ह्यांस उद्देशून असे.

मॉन्स्टुअर्ट एल्फिन्स्टन ह्यांनीं १८२४ मधल्या आपल्या मिनिटमध्यें असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, लोकांच्या शिक्षणाची व्यवस्था जी करावयाची आहे, ती सार्वजनिक कचेऱ्यांमधून कारकुनांची व्यवस्था व्हावयास पाहिजे म्हणून नव्हे, तर त्यांच्यांत ज्ञानाचा प्रसार करावा, व आज जीं युरोपियन राष्ट्रें पुढें आलीं आहेत त्यांच्या बरोबरीनें त्यांना आणावें हा मुख्य हेतु आहे. आणि हें कार्य फक्त शिक्षणच करूं शकणार आहे. अज्ञानरूपी अंधकार नष्ट करणें, ज्या वेड्या समजुतींचा पाया दृढ होऊन बसला आहे तो ठिसूळ करणें हें काम शिक्षणच करण्यास समर्थ आहे. ह्यासाठीं प्रथम प्रथम मोठमोठ्या स्कॉलरशिप्स देणें, हिंदी लोकांसाठीं जागा राखून ठेवणें आणि शिक्षणाच्या प्रसाराच्या बाबतींत ज्याज्या अडचणी येत असतील त्या ताबडतोब दूर करणें ह्यांकडे सरकारचें लक्ष असे. १८४४ सालच्या एज्युकेशन बोर्डाच्या रिपोर्टांत ह्या देशांतील लोकांना इतक्या दिवसांच्या झोंपेंतून जागृत करणें व त्यांच्यांत पाश्चात्य शिक्षण, ज्ञान व सुधारणा पचनीं पाडण्याची योग्यता आणणें असाच सरकारचा हेतु आहे असें आम्ही समजतों असें म्हटलें आहे.[२७] त्याचप्रमाणें प्रथम वरच्या वर्गाच्या लोकांचें शिक्षण हातीं घेतलें, त्यांचीं मनें उदार केलीं, त्यांना शिक्षणाचें महत्व कळूं लागलें, म्हणजे त्याचा परिणाम खालच्या लोकांवर होईल, त्यांच्यांतही शिक्षणाचा प्रसार होऊं लागेल व एकंदरींत ह्या पद्धतीचा अवलंब केल्यानें अधिक फायदा होईल असें म्हटलें आहे. सारांश, नैतिक व सामाजिक सुधारणांस सहाय्य करणारीं माणसें तयार करण्याच्या पवित्र हेतूनें शाळा व कॉलेजें ह्यांची स्थापना झाली. पण ह्या शिक्षणाचा उपयोग जर जुनें तें सोनें असें केवळ अभिमानानें प्रतिपादण्यांत होत असेल, आपल्या जुन्या वेडगळ आचारविचारांत कांहींही फेरफार होण्याची मुळींच आवश्यकता नाहीं असें हट्टानें प्रतिपादणें हाच असेल तर ज्या उच्च हेतूनें शिक्षणास प्रारंभ ह्या देशांत करण्यांत आला तो हेतु मूलतः फुकट गेला असें वाटून निराशा वाटणें साहजिक आहे. अशी विचारांची स्थिति पाहून नारायणरावांनीं पुढें येऊन अशी पृच्छा केली आहे कीं, निराशेस खरोखर कांहीं जागा आहे काय ? ह्या विषयाचा थोडा खोलवर विचार केला, तर निराशेस मुळींच जागा नाहीं व निरनिराळ्या बाजूंनीं जे हल्ले होत आहेत त्यांचा परिणाम

२७. The object of Government we take to be perfectly distinct and intelligible *viz.* to make as vigorous an impression upon the Asiatic mind as possible to rouse from the torpor into which it has subsided for some hundred years past and to place it in a condition for receiving and digesting the results of European progress.—*Board of Education 1844.*

मतपरिवर्तन व आचारपरिवर्तन ह्यांच्या रूपानें होत आहे असेंच आढळून येईल असें त्यांनीं अनेक उदाहरणें देऊन दाखवून दिलें आहे. तीस[२८] वर्षांपूर्वी सोडा-वॉटर पिणें हें मोठें पाप समजलें जात असे. कोणी सोडावॉटर पिण्याचें पातक केलें तर जातगंगेकडून त्याचा जाब विचारला जात असे व त्याला जबर शिक्षा होत असे. पण (एका वृद्ध गृहस्थांनीं आपल्या एका युरोपिअन मित्राला सांगितलें कीं ) आतां जें पेय पूर्वी निषिद्ध मानलें होतें तेंच पेय कोणीही पितो ! सारांश, आम्ही हिंदू लोक कितीही कर्मठ असलों, तरी आम्ही एकंदरींत प्रगमनशील आहोंत हेंच खरें. हें विधान कोणाला आश्चर्यकारक वाटेल. पण थोडा सूक्ष्म विचार केला तर वस्तुस्थिति तशी असल्याचें कबूल करावें लागेल. कधीं कधीं अजाणतेपणें उदार विचारआचारांचा आम्ही स्वीकार करितों, कधींकधीं खुषीनें आम्ही पत्करितों, कधीं कधीं उघड उघड आम्ही ते उचलतों. आतां पहाना, आज १८८६ सालीं आपण विलायतेहून परत आलेल्यांना जातींत घ्यावयाचेंच किंवा नाहीं, किंवा घ्यावयाचेंच तर कोणत्या प्रकारची शिक्षा देऊन घ्यावयाचें याचा मोठ्या गांभिर्यानें विचार करीत आहोंत. परंतु आपणा-मध्यें असा एक वेळ होता कीं, पुण्याचा मनुष्य मुंबईस आला व तो परत पुण्यास गेला कीं, जातीचे लोक त्याला जातीबाहेर टाकीत ! १८२१ सालीं गंगा-धर दीक्षित फडके नांवाचा इसम मुंबईस आला व येथें चांगला सहा वर्षें राहिला. मरीन डिपार्टमेंटमध्यें मराठी शिकविण्याचें पंडिताचें काम तो करीत असे. पुण्यास गेला तेव्हां त्यानें समुद्र ओलांडला एवढ्याच सबबीवर त्याला जाती-बाहेर टाकलें ! नंतर दोन तट झाले, एका तटांतील लोकांनीं त्याच्या रहाण्याची खाण्यापिण्याची वगैरे चौकशी करून त्याला जातींत घेतलें व दुसरा तट तसाच सोंवळा राहिला ! आज १८८६ सालीं त्या प्रसंगाला ४५ वर्षें झालीं व आतां ती गोष्ट आपल्याला हास्यास्पद वाटते, पण त्यावेळीं त्या प्रसंगावर रणें माजलीं ! दुसरें एक उदाहरण पहा. १८१८ सालीं पेशवाई बुडाली व ब्रिटिश सर्वसत्ताधारी झाले. त्यावेळीं जे ब्राम्हण सर्वस्वी पेशव्यांवर अवलंबून होते त्यांना लहान मोठीं पेन्शनें द्यावीं असें सरकारनें ठरविलें. प्रथम म्लेंच्छांच्या द्रव्याला स्पर्श करणें निषिद्ध होय अशा सबबीवर कांहींनीं पेन्शन घेण्याचें नाकारलें ! पण पोटापाण्याचा प्रश्न असल्यामुळें नंतर जें मिळेल तें ते घेऊं लागले ! ज्या कॉलेजाचें नंतर डेक्कन कॉलेजांत रूपांतर झालें, तें संस्कृत कॉलेज जेव्हां स्थापन करण्याचें ठरलें, त्यावेळीं कॉलेजाच्या मुख्याध्यापकाची जागा कोणी लायक शास्त्री प्रथम पत्करेना ! बऱ्याच खटपटीनंतर ती नेमणूक झाली. प्रथम तेथें फक्त ब्राम्हणांचा

२८. १८८६ मध्यें लिहिलेल्या लेखांत हें म्हटलें आहे.

प्रवेश होत असे; नंतर सर्व जातींच्या लोकांना कॉलेजांत प्रवेश मिळणार असें जाहीर झालें, तेव्हां तीनचार शास्त्र्यांखेरीज सर्वांनीं कॉलेज सोडलें व जे राहिले त्यांस जातिबहिष्कृत करण्यांत आलें! आणि संस्कृत बरोबर इंग्रजी शिकविलें जाईल असें जेव्हां ठरलें तेव्हांही असाच अनुभव आला; पण थोडाच अवधि लोटल्यानंतर ब्राह्मणांपैकीं वाटेल तितके विद्यार्थि ह्याच कॉलेजांत प्रवेश मिळण्यासाठीं धडपड करूं लागले! तसेंच हिंदुधर्मशास्त्र समजावून देण्यासाठीं पूर्वींच्या सदर अदालत कोर्टांमध्यें प्रत्येक न्यायाधिशाबरोबर धर्मशास्त्रपारंगत एकेक शास्त्री असावा असें ठरलें. त्यावेळीं विद्वान शास्त्री मिळावयास सरकारला फार अडचणी आल्या असें म्हणतात. ह्या सर्व बाबतींत प्रथम विरोध झाला, पण तो फार वेळ टिकून राहिला नाहीं, व प्रथम जें धर्मबाह्य व नीतिबाह्य असें वाटत होतें तें आवश्यक होऊन बसलें![२९] आणि पुढें १८५०–५१ व ५१–५२ सालचे बोर्डाचे रिपोर्ट पहाण्याची तसदी जे कोणी घेतील त्यांस शिक्षणप्रसारामुळें लोकांची कशी प्रगति होत आहे त्याचें वर्णन तेथें केलेलें आढळेल. ज्यांना उच्च शिक्षणाचा लाभ झाला त्यांनीं मुलींच्या शिक्षणासाठीं शाळा स्थापणें, शास्त्रीय माहिती देणारीं पुस्तकें देशी भाषांतून प्रसिद्ध करणें, शास्त्रीय व कठीण विषयांवर मराठी व गुजरातींतून व्याख्यानें देणें हे सर्व उद्योग जे एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमधून बाहेर पडलेली मंडळी करीत होती त्यांस त्या रिपोर्टांत धन्यवाद दिले आहेत. सर अर्स्किन पेरी ह्यांनीं ५१–५२ सालच्या रिपोर्टांत पुण्याविषयीं अशीच स्तुति केली आहे. १८४८ सालीं जूनच्या तेराव्या तारखेस स्टूडंटस् लिटररी अँड सायंटिफिक सोसायटीची स्थापना झाली. तेव्हांपासून त्या संस्थेनें वरील सर्व कार्यास प्रारंभ केला. ह्या संस्थेच्या साप्ताहिक सभांतून निरनिराळ्या सामाजिक विषयांवर वाद होत, पण स्त्रियांची स्थिति सुधारणें, त्यांस शिक्षण देणें अशा विषयांवरच बराच वाद होत असे.[३०] स्वतः

---

२९. In each of these cases the opposition of Hindu orthodoxy did not last long, and what at first had been denounced as irreligious and immoral was subsequently accepted as a matter of course.

३०. In the numerous essays on the social condition of India which were read before this society the position of women and the necessity of education as a means of raising them in the social scale occupied prominent place.—*Prof. Patten of the Elphinstone Institute.*

सोसायटीनेंसुद्धां सामाजिक उन्नति व शिक्षणप्रसार हेंच आपलें ध्येय असल्याचें कबूल केलें आहे. मुलींच्या शिक्षणासाठीं सोसायटीनें अगर तिच्या सभासदांनीं शाळा काढाव्या व १०–१२ वर्षांचें वय झालें नाहीं तों त्यांस विवाहासाठीं शाळेंतून काढावें ह्याचा त्यावेळच्या लोकांना राग येत असे. त्यावेळची तरुण मंडळी हें जें कार्य करीत होती त्यांस एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटच्या प्रोफेसरांकडून उत्तेजन व सहाय्य मिळत असे. प्रो. पॅटन ह्यांचे उद्गार टीपेंत आले आहेतच. दुसरे डॉ. रीड नांवाचे एक प्रोफेसर होते. त्यांनीं एकदां ह्या तरुणांना सांगितलें कीं, "तुम्ही नेटानें, अज्ञ, व अप्रबुद्ध निंदेकडे लक्ष न देतां, धीर धरून आपलें कार्य चालविलें पाहिजे. नेहमींच्या रुळलेल्या सडकेची वाट न पाहातां, त्रासाचा असा हा घाटाचा रस्ता तुम्ही श्रम करून धैर्यानें चढून जावयास पाहिजे. आणि दुसरी एक गोष्ट तुम्ही लक्षांत ठेवावयास पाहिजे ती ही कीं, तुम्ही नित्य पुढें पुढें पाऊल टाकलें पाहिजे. आणि जर तुमचें पाऊल पुढें पडलें नाहीं, तर तुम्ही मागें मागें जात आहां असें निःसंशय समजून असा.[३१] स्त्रियांना शिक्षण द्यावयाचें असलें मोघम ध्येय संस्थेनें आपल्या पुढें ठेविलें नव्हतें. तर त्या त्या वर्गांतील पुरुषांना जितकें शिक्षण मिळतें तितकें त्या त्या वर्गांतील स्त्रियांनाही मिळालें पाहिजे.( The women of a class must be educated to the same extent as the men of the class ) आणि ह्या उच्च ध्येयाबद्दल सर बार्टल फ्रेअर ह्यांनीं १८६२ सालीं संस्थेचें मनःपूर्वक अभिनंदन केलें. त्यावेळीं सर बार्टल ह्यांनीं असें बोलून दाखविलें कीं, सरकारला असें वाटत होतें कीं, नेटिव्हांना उत्तम प्रकारचें शिक्षण दिलें कीं, ते नंतर आपल्या बायका व मुली ह्यांना केवळ शिक्षणच देतील असें नाहीं, तर आपल्या बरोबरीचें शिक्षण त्यांना जर मिळालें नाहीं तर तें त्यांना कमीपणाचें वाटल्यावांचून राहाणार नाहीं.[३२]

---

३१. " You must endure for a long day the reproaches and the sneers of the ignorant and the heartless. Instead of sauntering quietly along the broad high way of usage you must brace your loins for a toilsome journey and climb many a *Ghat*...Before all and above all, remember you must always be *advancing*. If you move not forward, you are going backward. "

३२. Government felt assured that the first effect of giving a really sound education to native gentlemen would be that they would not only feel desirous to have their wives and daughters

सर बार्टल फ्रेअर ह्यांनीं सुशिक्षित लोकांसंबंधानें अशी उज्वल आशा प्रदर्शित केल्यानंतर पंचवीस वर्षांच्या आंत निराळाच अनुभव येऊं लागला! ज्यावेळीं नारायणराव ही लेखमाला लिहीत होते त्यावेळीं विश्वविद्यालयाच्या पदव्यांनीं विभूषित झालेली मंडळी स्त्रियांना उच्चप्रतीचें शिक्षण देणें हें फार धोक्याचें आहे असें गर्जून सांगत होती! म्हणजे शिक्षणाच्या बाबतींत आपल्या बायकांचा व मुलींचा दर्जा कमी असण्यांत त्यांना कमीपणा वाटत नव्हता, इतकेंच नव्हे, तर तो कमीच असला पाहिजे असें ते आढ्यतेनें पुकारीत होते! परंतु जुन्या पिढीनें ह्या बाबतींत पुष्कळ कार्य केलें ह्यांत कांहीं संशय नाहीं. विधवाविवाहाची चळवळ ह्याच काळांतील आहे. सतत वीस वर्षेंपर्यंत संस्थेनें मोठ्या धडाडीनें कार्य केलें यांत कांहीं संशय नाहीं. संस्थेच्या वतीनें ह्या एवढ्या वीस वर्षांच्या अवधींत पुष्कळसे पुनर्विवाह जरी झाले नाहींत, हें खरें आहे, तरी अगदीं जुन्या वळणांतल्या लोकांनीं बालपणीं विधवा झालेल्या गतभर्तृकांच्या विवाहास हरकत नसावी असें म्हणणें म्हणजे ह्या संस्थेला प्राप्त झालेला अपूर्व विजयच होय ह्यांत कांहीं संशय नाहीं. ह्या वीस वर्षांच्या अवधींत संस्थेच्या कर्तृत्वासंबंधानें लोकांत दराराही कमी नव्हता. दक्षिणी मंडळींतले पहिले आय. सी. एस्. ह्याच काळांत विलायतेहून परत आले व त्यांना प्रायश्चित्त देऊन जातींत घ्यावें व घेऊं नये असे दोन पक्ष झाले! प्रायश्चित्त देऊन जातींत घ्यावें असें म्हणणारांनीं एक मुद्दा असा पुढें आणला कीं, आम्ही जर ह्यांना जातींत प्रायश्चित्त देऊन घेतलें नाहीं, तर पुनर्विवाहास अनुकूल असणारी मंडळी त्यांना आपल्यामध्यें घ्यावयास तयार होती. पण आज मनु पालटला आहे यांत कांहीं संशय नाहीं. सुधारणेला दिवस वाईट आले आहेत व लवलव चालणारी जीभ तिची शत्रू झाली आहे हेंही खरें! आपल्यांतील सामाजिक व्यंगें दूर करण्यासंबंधानें प्रयत्न होत नाहींत, एवढेंच केवळ नव्हे, तर उलट त्यांची तरफदारी करण्यांत येत असून स्त्रियांच्या उच्च शिक्षणाविरुद्ध चाललेले प्रयत्न सकृद्दर्शनीं अत्यंत निराशाजनक वाटतात ह्यांत कांहीं संशय नाहीं. परंतु असें जरी आहे तरी आपण निराश व्हावयास नको. दोन पक्ष झाल्यामुळें सुधारकांचा पाडाव करण्यासाठीं केवळ विरुद्धपक्ष विरोधी विचार लोकांपुढें ठेवीत असतो. कांहीं महिन्यांपूर्वीं कांहीं बंगाली बाबू एकत्र जमले व बालविवाहच झाले पाहिजेत असें अघळपघळ भाषणें करून

---

educated, but that they would feel absolutely ashamed to let them remain in a state inferior to themselves as regards educational advantages. —*Sir Bartle Frere.*

त्यांनीं ठरविलें. पण थोड्याच वेळानें हळुहळु सुधारणा झाली पाहिजे हें तत्त्व आपल्याला मान्य असल्याचेंही त्यांनीं जाहीर केलें! आपल्या महाराष्ट्रांत देखील तत्त्वें मान्य आहेत, पण तपशील मागाहून सांगूं असें सुधारकविरोधी पक्ष म्हणूं लागला आहे! हुजूर पागेंतील शाळेच्या विरुद्ध जरी इतका गिल्ला केला, तरी मुलींना उच्च शिक्षणच नको असें म्हणण्याची लाज वाटते म्हणून म्हणा, अगर तें प्राप्त शिक्षणास कमीपणा आणणारें आहे असें वाटतें म्हणून म्हणा, मुलींचें पुढलें शिक्षण घरींच व्हावें असें लोक म्हणूं लागले आहेत;—तरुणीशिक्षण नाटिका हें वस्तुस्थितीचें यथार्थ चित्र आहे असें म्हणावयास कोणी तयार होत नाहीं व त्या नाटिकेचे प्रयोग पहावयासही हे लोक जात नाहींत. शिवाय ह्या पक्षाच्या पुढाऱ्यांनीं धांवत्या काळाबरोबर जाण्यासाठीं एक ब्राम्हणसंस्था काढण्याचा जो बूट काढला आहे तोही एकंदर वारा कोणत्या दिशेनें वहात आहे त्याची साक्ष पटवीत आहे. सारांश काय कीं, प्राथमिक व उच्च शिक्षण आपलें कार्य करीत आहे, लोकांचीं मनें अस्थिर झालीं आहेत, निरनिराळ्यासामाजिक विषयांसंबंधानें वाद उपस्थित झाले आहेत, पक्ष प्रतिपक्ष स्थापन होत आहेत आणि ह्यांच्यायोगेंच सामाजिक प्रगति हळुहळु होत आहे. शास्त्राधारावर लोकांचा विश्वास नाहीं असें नाहीं, पण, शास्त्री सांगेल तो शास्त्राधार असाच प्रकार नाहीं. थोड्या दिवसांपूर्वीं ह्या मुंबईशहरांत शास्त्री-पंडित, उपाध्ये, ह्यांची एक सभा झाली (१८८६) तींत कांहीं बाहेरची मंडळीही आली होती. पंडित गट्टूलालजी हे सभेमध्यें वादविवादांत प्रमुख भाग घेत होते. अशाप्रकारें वाद रंगांत आला असतां, एक गृहस्थ मध्येंच उठून विचारता झाला, "पंडितजी, वेदांमध्यें प्राणिहत्येस आधार आहे का हो?" प्रश्न अगदीं साधा होता. होय किंवा नाहीं, असें उत्तर दिल्यानें भागलें असतें; पण असला प्रश्न विचारला जाईल अशी पंडितजींची अपेक्षा नव्हती व त्यांच्यामनांतून सरळ उत्तर द्यावयाचें नव्हतें. म्हणून कांहीं मिनिटें थांबून पंडितजी म्हणाले, "ह्या प्रश्नाला तुम्हांला उत्तर पाहिजे, नाहीं? तर मग तुम्ही प्रथम काशीवास कांहीं वर्षें केला पाहिजे. तेथें प्रायश्चित्त घेऊन परत आल्यावर मग तुमच्या प्रश्नाला काय उत्तर द्यावयाचें त्याचा विचार करतां येईल!" असलें उत्तर मिळाल्यावर त्या इसमानें पंडितजींची चांगली हजेरी घेतली व नंतर पंडितजींनीं असें कबूल केलें कीं कांहीं प्रश्नच मुळीं असे असतात कीं, त्यांना उडवाउडवीचीं उत्तरें देणें आम्हांला भाग पडतें!

अशा प्रकारें सामाजिक बाबतींत विरोध होत असूनही, प्रगतीचीं स्पष्ट चिन्हें जीं त्यावेळीं दिसत होतीं त्यांची मीमांसा नारायणरावांनीं केली. वासुदेवराव भांडारकरांनीं सामाजिक सुधारणेच्या बाबतींत कायद्याचें सहाय्य घ्यावें किंवा

नाहीं ह्या विषयावर आपले विचार सोसायटीच्या सभेपुढें ठेविले, त्यावेळीं आजपर्यंत कायद्याचें सहाय्य समाज घेत आला आहे असें नारायणरावांनीं कसें सिद्ध केलें तें आपण पाहिलें आहे. परंतु Forces at Work ह्या लेखमालेंतील एके ठिकाणीं त्यांनीं हा मुद्दा विशेष रीतीनें स्पष्ट केला आहे. निरनिराळ्या घटना सामाजिक सुधारणेस प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें मदत करीत आहेत, हें तर दिसत आहेच, पण सामाजिक सुधारणेच्या बाबतींत इंग्रज न्यायाधिशांचें सहाय्य किती होत आहे याची किती जणांना जाणीव आहे? हे न्यायाधीश शांतपणें, संथपणें आपलें कार्य करीत आहेत. पण तें करीत असतांना हिंदु विधवा, हिंदु पत्नी ह्यांच्या हक्कांच्या संरक्षणासाठीं ते दक्षतेनें निकाल देत असतात असें कायद्याचे रिपोर्ट वाचणारांस दिसून येईल. थोड्या दिवसांपूर्वी कलकत्त्यास एका हिंदु गृहस्थानें म्हटलें कीं जोंपर्यंत आपल्या समाजांत अविभक्त कुटुंबपद्धति आहे तोंपर्यंत बालविवाहाची रूढी नष्ट होण्याची आशा व्यर्थ आहे. हा विचार बरोबर असो अगर नसो, पण आमचीं कोर्टें विभक्त होण्याच्या बाबतींत उत्तेजन देत आहेत एवढें खरें. दहा वर्षांपूर्वी असा समज असे कीं, अविभक्त कुटुंबांतील एखाद्या इसमाला शिक्षण मिळून पैसे मिळाले कीं त्यावर अविभक्त कुटुंबांतील सर्वांचा हक्क! पण, पांच वर्षांपूर्वी मेलव्हिल साहेबांनीं असें ठरविलें कीं, ज्या धंद्यावर पैसा मिळाला त्याचें शिक्षण जर अविभक्त कुटुंबांतील पैशानें झालें नसेल, तर त्या पैशावर त्या माणसाच्या विधवेचा पहिला हक्क आहे असें समजावें. जस्टिस स्कॉटनीं एका खटल्यांत सांगितलें कीं, स्त्रियांचा दर्जा वाढविणें व त्यांना स्वातंत्र्य मिळवून देणें हाच विचार अलीकडल्या निकालांत सर्वसाधारणपणें आढळून येतो. हिंदु स्त्रीला तिच्या कर्जाबद्दल तुरुंगांत पाठवितां येत नाहीं हा निकाल इंग्रजी कायद्यास अनुसरूनच दिला गेला आहे. त्याचप्रमाणें बापाकडून मिळालेल्या मिळकतीवर मुलीचा अबाधित हक्क कोर्टांनीं मान्य केला आहे. ना. वेस्ट ह्यांनीं दिलेला एक निकाल फार महत्त्वाचा आहे. एका मुलीचे आईबाप वारल्यावर तिचें पालन तिच्या मामांनीं केलें. ती १२ वर्षांची झाल्यावर मामानें तिच्यासाठीं नवरा शोधला. इतक्यांत चुलत्यानें फिर्याद केली कीं ती जरी मामाच्या घरीं वाढली असली, तरी आमच्या पसंतीनें तिचें लग्न झालें पाहिजे. कायदा चुलत्याच्या बाजूला आहे असें पाहून डिस्ट्रिक्ट जज्जानें निकाल दिला कीं, चुलत्यानें नवरा निवडावा, पण कोर्टाची संमति मिळाली तरच त्याच्याशीं लग्न लागावें. अखेरीस पुष्कळ मुलांतून एक मुलगा कोर्टानें पसंत केला. हा मुलगा एका संस्थानांत राहणारा होता. मामांनीं अपील केलें. हायकोर्टात वेस्ट व बर्डवूड ह्यांनीं ठरविलें कीं संस्थानांतला रहि-

वाशी वर नको! कारण, एकदां मुलगी संस्थानांत गेली म्हणजे ती अज्ञान आहे तोंपर्यंत ब्रिटिश कोर्टांना देखरेख ठेवतां येणार नाहीं. म्हणून वर चुलत्यानें खालसांतून शोधावा, व डिस्ट्रिक्ट जज्जानें संमति द्यावी; परंतु ही संमति देण्या-पूर्वी मुलीला तो पसंत आहे किंवा नाहीं, अगर जुलमानें त्याच्याशीं तिचें लग्न लाव-ण्याचें घाटत आहे ह्याची खात्री करून त्यानें संमति द्यावी! अशीं अनेक उदाहरणें दाखवितां येतील कीं ज्यांवरून कोर्टें आपल्या निकालांच्या द्वारें सामाजिक सुधारणेस प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणें सहाय्य करीत आहेत. एकदां एका नामांकित वकिलानें आपल्या एका कुणबी अशीलाला विचारलें कीं "हल्लींचें इंग्रजी सरकार तुम्हांला कसें काय वाटतें?" "आम्हांला काय वाटा-यचं महाराज, ह्या राज्यांत सगळं ठीक आहे, दंगाधोपा नाहीं, पण ह्या राज्यांत एक गोष्ट वाईट आहे. पूर्वीच्या राज्यांत आपल्या बायकोवर आपली सत्ता असे, पण आतां बायकोला मारलं बिरलं तर ती तडक जाते मॅजिस्ट्रेट साहेबाकडे!" हें अगदीं बरोबर आहे. स्त्रियांना देखील त्यांना कांहीं हक्क आहेत याची जाणीव ह्या राज्यांत होऊं लागली आहे.

पण, हें सर्व जरी मान्य केलें, तरी बालविवाह नाहींसा करणें, स्त्रियांचें उच्च शिक्षण व विधवा विवाह यांची वाट काय? आतां स्त्रीशिक्षणाला जो विरोध झाला व होत आहे तो निर्जीव आहे. विरोध करणाऱ्यांपैकींच एकानें परवा सांगि-तलें कीं, मी कांहीं स्त्रीशिक्षणाच्या व इतर सुधारणांच्या विरुद्ध नाहीं, पण मी एक पक्ष घेतल्यामुळें तो उचलून धरणें हें माझें कर्तव्य आहे![१५] आणि जे लोक स्त्री शिक्षणाच्या विरुद्ध गिल्ला करीत आहेत त्यांना शिक्षित बायकोपेक्षां अशिक्षित बायको पसंत पडेल कीं काय हा प्रश्नच आहे! बरें, शिक्षणाविरुद्ध इतका गिल्ला करून निष्पन्न काय होत आहे? तीस-चाळीस वर्षांपूर्वी जेथें शाळेंत जाणाऱ्या दहाबारा मुली मिळणें मुष्किल असे तेथें आतां शेंकड्यानें शाळेंत जाणाऱ्या मुली आढळतात. सहा वर्षांची मुलगी झाली म्हणजे घरांत तिचा त्रास नको म्हणून तरी तिला शाळेंत अडकविण्यांत येतेंच! अशा रीतीनें आज ह्या इलाख्यांत जवळ जवळ ५३ हजार मुली शाळेंत जात आहेत. पुण्याचें हायस्कूल चालू आहे व थोड्या दिवसांपूर्वी दोघां ब्राम्हण गृहस्थांनीं आमच्या पंढरपूर ऑर्फनेजमध्यें वाढलेल्या व पुण्यास शिक्षण मिळा-

---

१५. He was not really opposed to reform movements, but he had taken a particular side and he wished to support it. —*Forces at Work.*

लेल्या दोन मुली, त्या शिकलेल्या होत्या म्हणूनच, पसंत केल्या. सुशिक्षित हिंदु आज वरून विरोधकाचा आव आणीत असला तरी त्याला सुशिक्षित स्त्रियांची वास्तविक योग्यता कळत नाहीं, अगर कुटुंबांत सुशिक्षित स्त्री असणें म्हणजे तेथें अज्ञान व अंधकार नसणें व कुटुंबामध्यें एक देवताच नांदत आहे असा अनुभव येणें होय हें त्यांस अस्पष्टपणेंही कळत नाहीं असें नाहीं.[१६] आतां विधवाविवाहाच्या प्रश्नासंबंधानें आपण विशेष काळजी करणें नलगे. सरकारनें विधवाविवाह कायदेशीर ठरविलाच आहे व त्यासंबंधानें लोकांचे दुराग्रह कमी होत आहेत. विधवांचा जो छळ होत असतो त्यापासून त्यांची मुक्तता झाली पाहिजे. वपनाची चाल मागें पडत आहे, कित्येक जातींत तरुणपणींच विधवेला सोवळें करीत नाहींत, म्हणून तिचें जीवन अधिक सह्य होईल ह्या दिशेनें प्रयत्न झाले पाहिजेत. आतां राहिला एक प्रश्न. तो म्हणजे पुरुषांनीं स्त्रियांना आपल्याबरोबर कोठें नेणें, अगर त्यांस बरोबर घेऊन बाहेर फिरावयास जाणें, अगर गाड्यांतून बसून जाणें हें इंग्रजांचें अनुकरण होय असें म्हणून त्याच्या संबंधानें बराच गिल्ला माजविण्यांत येत आहे! ही चळवळ स्त्रियांना नेहमीं पडद्यांत डांबून ठेवणाऱ्या बंगाल्यांनीं केली असती तर ती त्यांच्या नेहमींच्या रिवाजाविरुद्ध असलेल्या वर्तनास उद्देशून आहे असें मानावयास जागा होती. पण आमच्या महाराष्ट्रियांना हे प्रकार हरकत घेण्यासारखे वाटावे हें फार आश्चर्याचें आहे.[१७] एखाद्या समारंभाला स्त्रियांना बरोबर घेऊन जाणें हें जर त्याज्य, तर मग त्यांस कथाकीर्तनाला बरोबर नेणें हें देखील निंद्यच! स्त्रियांना नोकरचाकर बरोबर न घेतां देवदर्शनास, कथापुराणास अगर आपल्या मत्रिणींकडे अगर आप्तांकडे जाऊं देणें हें देखील तर मग गैरच! आणि खुद्द पुण्यांत रोज तुळशीबागेंत स्त्रीपुरुषांचा जमाव असतो, पण त्यासंबंधानें कोठें टीका झालेली ऐकिवांत नाहीं. आमच्या महाराष्ट्रीय भगिनींना अद्याप पुष्कळ गोष्टी शिकवावयाच्या आहेत व पुष्कळ विसरावयाच्या

---

१६. The educated Hindoo, however reactionery he may be, is feeling, at present feebly, the value of educated wives and mothers, and he has enough of shrewdness to enable him sooner or later to realise that a well educated woman is an angel of light and blessing.

१७. जुन्या केसरीकारांनीं सुधारकांविरुद्ध ही चळवळ केली होती. त्यांस उत्तर देण्यासाठीं डॉ. रामकृष्णपंत भांडारकर ह्यांनीं लिहिलेले 'केसरी व प्रार्थनासमाज' आणि 'केसरीच्या उद्दाम उड्या' हे त्यांचे **धर्मपरलेख व व्याख्यानें** ह्यांत संग्रहित केलेले लेख अवश्य वाचण्यासारखे आहेत.

आहेत. प्रसंग आला म्हणजे त्यांस धैर्य येतें हें इतिहासावरून स्पष्ट होत आहे.[१८] आणि हें ऐतिहासिक सत्य विसरून केवळ पक्षभेदास बळी पडून महाराष्ट्रांतील लोक स्त्रियांच्या उन्नतीच्या विरुद्ध गिल्ला करीत आहेत ! परंतु स्त्रियांनीं भिण्याचें मुळींच कारण नाहीं. विरोधकांनीं कितीहि गिल्ला केला तरी एकंदरींत स्त्रियांना अनुकूल अशीच परिस्थिति येत आहे. आमच्या स्त्रियांचें पाऊल दिवसेंदिवस पुढेंच पडत राहणार, सध्या गति मंद असेल, परंतु लवकरच बौद्धिक, नैतिक दृष्ट्या त्यांचें वजन अखिल समाजास भासल्यावांचून राहाणार नाहीं. त्यावेळीं आज त्यांच्याविरुद्ध गिल्ला करणारे लेखणीबहाद्दर कालाच्या प्रवाहांत वाहून गेलेले आढळतील. जोंपर्यंत ब्रिटिशसरकार आपल्या सत्तेचा सदुपयोग करीत आहे, तोंपर्यंत त्यांच्या उन्नतीला सर्वत्र अनुकूल वातावरण तयार होत असल्याचा अनुभव येत जाईल ह्यांत कांहीं शंका नाहीं.

## दादाजी विरुद्ध रखमाबाई

[ इंदुप्रकाश पत्रामध्यें नारायणरावांच्या कारकीर्दीत ज्या अनेक सामाजिक विषयांचा खल झाला त्यांत दादाजी विरुद्ध रखमाबाई हा खटला होता. ह्या खटल्याची हकीकत थोडक्यांत नमूद केल्यावांचून इंदुप्रकाशपत्रांतील विचारांच्या योग्यायोग्यतेसंबंधानें वाचकांस कल्पना होणार नाहीं. डॉ. सखाराम अर्जुन ह्या मुंबईतील प्रसिद्ध डॉक्टरांचें ज्या एका तरुण गतभर्तृकेशीं लग्न झालें तिची रखमाबाई ही पूर्वगृहींची मुलगी. डॉ. सखाराम ह्यांनीं तिचें स्वतःच्याच मुलीप्रमाणें लालनपालन केलें व तिला शिक्षण दिलें. रखमाबाईचें सर्व शिक्षण घरींच झालें होतें. त्या काळच्या पद्धतीप्रमाणें दादाजी नांवाच्या एका मुलाशीं रखमाबाईचें लहानपणींच लग्न झालें. परंतु विशेषतः ज्या कुटुंबांत दादाजी राहात असे तेथील नैतिक वातावरण डॉ. सखाराम ह्यांच्या दृष्टीनें आपल्या मुलीनें तेथें रहावें असें नसल्यामुळें त्यांनीं आपल्या मुलीला केव्हांच सासरीं पाठविलें नाहीं. पुढें ती वयांत आल्यावर दादाजी तिला आपल्या घरीं पाठविण्यासंबंधानें आग्रह करूं लागला. डॉ. सखाराम ह्यांनीं दादाजीस सुचविलें कीं तूं निराळें बिऱ्हाड केलेंस तर तेथें रखमाबाईस पाठविलें जाईल. दादाजीस हें नको होतें. त्यांच्या ज्ञातींत त्यावेळीं दोन परस्पर विरोधी पक्ष होते. त्यापैकीं एका पक्षानें दादाजीची बाजू घेतली व नवरेपणाच्या हक्काच्या जोरावर फिर्याद करावयाची फूस त्याला दिली. ह्या फिर्यादीचा सर्वत्र गवगवा झाला. पहिल्याप्रथम न्या. मू. पिन्हे ह्यांच्यापुढें हा

---

१८. मुळांत नारायणरावांनीं अहल्याबाई होळकर व धारची मीनाबाई पवार ह्यांचीं उदाहरणें दिलीं आहेत.

खटला चालला तेव्हां रखमाबाईची आपल्या नवऱ्याकडे जाण्याची जर इच्छा नाहीं, तर जबरदस्तीनें तिला नवऱ्याकडे पाठविणें रास्त नाहीं अशा प्रकारचा निकाल त्यांनीं दिला होता. हा निकाल रखमाबाईला सर्वस्वी अनुकूल जरी होता तरी अपिलामध्यें तो कायम राहील असें रखमाबाईच्या बाजूच्या तेलंगांसारख्या वकिलांस वाटत नव्हतें. कारण, पिन्हेसाहेबांचा निकाल अगदीं अनपेक्षित होता. पहिल्या खटल्याच्या निकालावर दादाजीनें अपिल केलें, इतक्यांत पोलीस कोर्टांत बेअब्रूच्या खटल्याचें पिळूं उत्पन्न झालें. खटला चालू असतांना रखमाबाईच्या वतीनें ज्या कुटुंबांत दादाजी रहात होता त्या कुटुंबासंबंधानें किंवा दादाजीच्या प्रत्यक्ष मामासंबंधानें जीं विधानें करण्यांत आलीं होतीं तीं आपणास कमीपणा आणणारीं आहेत असें वाटल्यामुळें दादाजीच्या मामानें ही फिर्याद पोलिस कोर्टांत दिली होती. ह्या पोलिस कोर्टाच्या फिर्यादींत दादाजीपक्ष हरला. नंतर दादाजीपक्षानें जज्ज पिन्हे ह्यांच्या निकालाविरुद्ध अपील केलें. त्यांत पिन्हे ह्यांचा निकाल कायद्याबरहुकुम नसल्यामुळें खटला फेरतपासणीसाठीं परत पाठविण्यांत आला. त्यानंतर हा खटला फॅरनूसाहेबांपुढें आला व त्यांनीं पूर्वीचा निकाल फिरविला व रखमाबाईनें अमुक मुदतीच्या आंत दादाजीच्या घरीं नांदावयास गेलें पाहिजे, असा निकाल दिला. ह्यावर रखमाबाईपक्षानें अपील केलें. येथें पुढील माहिती लक्षांत येण्यासाठीं असें सांगितलें पाहिजे कीं, दादाजीनें जेव्हां हा खटला मांडला त्याच वेळीं डॉ. सखाराम अर्जुन ह्यांनीं असें सुचविलें होतें कीं, दादाजीला आपण कांहीं एक रक्कम देऊं, त्यानें हा खटला कायमचा काढून घ्यावा. त्यावेळीं दादाजीपक्षानें डॉ. सखाराम ह्यांच्या ह्या म्हणण्याकडे पूर्ण दुर्लक्ष केलें व खटला निकालांत येण्यापूर्वीच डॉ. सखाराम परलोकवासी झाले. फॅरनूसाहेबांनीं वरील निकाल दिल्यानंतर अपील केल्यावर रखमाबाईपक्षानें पैसे देऊन आपसांत समजूत घडवून आणण्याचे प्रयत्न चालविले व त्यांस यश आलें. कोर्टापुढें अपील निघण्याच्या वेळीं कांहीं एक रक्कम घेऊन दादाजी हें प्रकरण मिटविण्यास तयार असल्याचें सांगण्यांत आलें व कोर्टाच्या अनुमतीनें सगळ्या हिंदुस्थानभर खळबळ उडवून देणारा हा खटला काढून टाकण्यांत आला.

हे खटले चालू असतांना उभयपक्षाकडून लहान लहान पत्रकें प्रसिद्ध होत असत. एक रखमाबाई Defence Fund निघाला होता व त्याचें धुरीणत्व प्रिन्सिपाल वर्डस्वर्थ ह्यांनीं आपल्याकडे घेतलें होतें. त्यामुळें ह्या फंडाविषयीं सर्वांना कळकळ वाटली व रखमाबाईचा सर्व खर्च परस्पर भागला गेला. दुसऱ्या लग्नासाठीं पैसे मिळण्यापूर्वी दादाजीनें आपल्या वतीनें एक चोपडें प्रसिद्ध केलें

होतें. त्यास उद्देशून नारायणरावांनीं लिहिलेल्या लेखांत ह्या खटल्यांतील तत्त्वाचा सुंदर विचार केला होता. त्या लेखांतील विषय आजही महत्त्वाचा असल्यामुळें त्यांतील कांहीं मुद्यांची ओळख पुढें करून देण्याचा प्रयत्न केला आहे. ]

"दादाजींचें म्हणणें असें आहे कीं, आपल्या संबंधानें लोकांनीं खोट्यानाट्या बातम्या पसरवून सर्वत्र गैरसमज करून दिले आहेत. ह्याबद्दल आम्हांलाही खरोखर फार वाईट वाटतें. परंतु दोन पक्ष कोर्टांत भांडावयास उभे राहिले म्हणजे कमी-अधिक प्रमाणानें हे असे प्रकार व्हावयाचेच. त्याकडे लक्ष न देतां आम्हांला ह्या खटल्यांतील तत्त्वाकडे लक्ष द्यावयाचें आहे. दादाजींचें म्हणणें आहे कीं, रखमा-बाईच्या पैशावर तिच्या आजोबांचा डोळा आहे, म्हणून ते तिला आपल्या-कडे येऊं देत नाहींत, आणि केवळ तिच्याच इच्छेप्रमाणें सर्व कांहीं चाललें असतें तर ती केव्हांच मजकडे आली असती. तिचे नातेवाईक तिला चिथवीत आहेत व ती त्यांच्या तंत्रानें चालत आहे. पण दादाजींना हा मुद्दा आतां आठ-वला हें जरा चमत्कारिकच म्हणावयाचें ! कारण, आजपर्यंत लोक म्हणत होते कीं, रखमाबाईचा पैसा दादाजीकडे जाऊं नये म्हणून डॉ. सखाराम आपल्या मुलीला दादाजीकडे पाठवीत नव्हते ! ह्यांत खरें कोण ? कारण, रखमाबाईच्या आप्तांना तिचा पैसा हवा आहे व रखमाबाई केवळ आप्तांच्या हातचें बाव्हलें आहे ह्या म्हण-ण्यांत अर्थ काय आहे ? खरें पहातां कायद्याची बाजू अशी आहे कीं, जो पैसा अगर घरदार रखमाबाईला तिच्या वडिलांकडून मिळालें आहे तें तिचें स्वतःचें आहे, ती जिवंत आहे तोंपर्यंत त्यावर तिचा हक्क आहे व आज ती आपल्या नवऱ्याकडे असती तरीसुद्धां आपल्या सर्व मिळकतीचा ती आपल्या स्वतःच्या इच्छेनुसार व्यवहार करण्यास पूर्ण अखत्यार होती. आज खरोखर उभय पक्षांच्या विचारांचें सार असें आहे : दादाजी पक्ष म्हणत आहे कीं, रखमाबाईच्या आईला व आजो-बाला रखमाबाईचा पैसा हवा आहे; रखमाबाईच्या आईचें व आजोबांचें म्हणणें आहे कीं रखमाबाईच्या नांवें पैसा घरदार नसतें, तर बायकोचा ताबा मिळावा अशी फिर्यादच झाली नसती ! दादाजीला बायकोपेक्षां तिचा पैसाअडकाच हवा आहे ! आणि ही गोष्ट दादाजीनें नकळत कबूल केली आहे ! रखमाबाई बजावून सांगत आहे कीं, मी तुझ्याकडे येणार नाहीं, दादाजी म्हणत आहे कीं मला तूंही पाहि-जेस व तुझें डबोलेंही हवें आहे ! पण ह्या बाबतींत हिंदुधर्मशास्त्राचें काय म्हणणें आहे ? बायकोची इच्छा नसतांना नवऱ्याकडे तिनें जावें काय ? नवऱ्यानें बायकोला बळजबरी करून आपल्या घरीं न्यावें असें हिंदुधर्मशास्त्र सांगतें काय ? ह्या खटल्यांत जर असें आढळून आलें कीं, कांहीं तरी सबबी सांगून रखमाबाई नवऱ्याकडे जावयास तयार नाहीं असें नसून, ती पूर्ण विचार करून स्वतःच्या अक्कल हुषारीनें

व सबळ कारणें आहेत म्हणून तिनें तसा विचार ठरविला आहे, तर सहजच तिच्याविषयीं लोकांच्या ठिकाणीं सहानुभूति उत्पन्न होईल. आणि जेव्हां परकी कायदा बायकोला तिच्या इच्छेच्या विरुद्ध नवऱ्याच्या घरीं जावयास लावतो, त्यावेळीं हा प्रकार हिंदु धर्मशास्त्रास अमान्य आहे असें एखाद्या अत्यंत जुन्या विचारांच्या हिंदु इसमास म्हणतां येईल. आणि बंगाल्याकडील एका खटल्यांत असला प्रकार हिंदुधर्मशास्त्राच्या दृष्टीनें तिरस्करणीय आहे असें न्या. मू. मार्कबी ह्यांनीं म्हटलें आहे. बंगालच्या खटल्यांत असेंही म्हटलें आहे कीं, ह्या देशांत असा समज अद्याप आहे कीं, नवऱ्याच्या घरीं न जाणाऱ्या बायकोला जुलमानें तेथें धाडतां येतें. अशीं उदाहरणेंही कोर्टापुढें मांडण्यांत येतात. पण बायको टाकणाऱ्या नवऱ्याला बायकोकडे जबरीनें कोर्टानें पाठविल्याचें एखादें उदाहरण कोणी सांगत नाहीं! आणि जेव्हां बायकोला तिच्या इच्छेच्या विरुद्ध नवऱ्याकडे जावयास कोर्ट लावतें त्यावेळीं बायकोला त्यानें विकत घेतलें आहे, बायको ही त्याची property–मिळकत आहे ही भावना असल्यामुळें, हा विचार जगामध्यें पुष्कळ ठिकाणीं जरी प्रचलित असला तरी हिंदुधर्मशास्त्रास अगदीं तिरस्करणीय वाटतो ह्यांत कांहीं संशय नाहीं.[१९] पण ह्यावर आमच्या इकडल्या लोकांचें असें म्हणणें पडतें कीं जर बायको अगर नवरा ह्यांच्या विरुद्ध होणाऱ्या हुकुमांची अंमलबजावणी झाली नाहीं, तर हिंदुसमाजांत मोठीच क्रांति झाल्यावांचून राहणार नाहीं व हिंदु समाजाची सर्व घडी खालपासून वरपर्यंत विस्कटली जाईल! जणूं काय सिव्हिल प्रोसिजिर कोडमधील २६० कलमामुळेंच हिंदुसमाजांतील जोडपीं एकत्र रहात असतात! **लिबरल** म्हणविणारें एक पत्र म्हणतें कीं, रखमाबाईच्या वतीनें जे मुद्दे पुढे आले आहेत ते मान्य केले तर मग अतृप्त असलेल्या प्रत्येक विवाहित स्त्रीला नवऱ्याचा आश्रय सोडून जाण्याला कसलाच प्रत्यवाय राहाणार नाहीं! त्यावर नारायणराव विचारतात कीं, आजही तसें करावयास तिला कसली आडकाठी आहे? जी विवाहित स्त्री नवऱ्याच्या घरीं सुखासमाधानानें रहावयास तयार नाहीं, ती काय कैदेंत घातल्यानें सुखासमाधानानें राहूं लागेल? आणि जुलूम जबरदस्तीचे कायदे अमलांत आणिल्यानें नवराबायकोंत प्रेम उत्पन्न होणें शक्य आहे ही कल्पनाच अगदीं रानटी होय. असल्या जोडप्यांना जुलमानें एकत्र रहावयास लावण्यापेक्षां त्यांनीं परस्परांपासून वियुक्त राहणें हेंच योग्य. हेंच तत्त्व आमच्या पूर्वजांनीं मान्य केलें होतें व आजचीं कोर्टें ह्याच तत्त्वानुसार वागतील तर बरें. वास्तविक पहातां हिंदुधर्मशास्त्रानें पतिगृहीं रहावयास तयार नसलेल्या

१९. Widely as this notion has prevailed in the world, we need scarcely say that it is wholly abhorrent to the Hindu Law.

स्त्रीला योग्य ती शिक्षा सांगून ठेविली आहे. ती शिक्षा म्हणजे तिला पुनर्लग्न करण्याची परवानगी नसणें ही होय. आणि बायकोला टाकून देणाऱ्या नवऱ्यालाही त्यानें तिच्या पोटगीची व्यवस्था केली पाहिजे ही शिक्षा ठेविली आहे. ह्याच्या-पलीकडे समाजस्वास्थ्य व नीति ह्याविषयीं भलत्याच कल्पना करून घेऊन जाण्याची आवश्यकता नाहीं. आतां आपल्या समाजांत २६० कलमाखालीं अधिक खटले होत नाहींत याचें खरें कारण असें आहे कीं, ज्या दोन माणसांचें जमणें शक्य नाहीं, त्यांस कायद्याचें सहाय्य घेऊन एकत्र आणणें हा रानटीपणा आहे असें लोकांना वाटतें, म्हणून नवऱ्यानें बायकोवर हक्क सांगण्याचे अधिक खटले होत नाहींत. खरें पहातां नवरा आवडत नाहीं म्हणून त्याच्याबरोबर रहाण्याचें नाकारणें हा कांहीं गुन्हा नाहीं (Positive offence). कायद्यानें अशा गुन्ह्यांनाच शिक्षा सांगाव्या.[२०] कायदा व धर्मशास्त्र ह्यांतील हा लढा आहे. ज्या हिंदु पेट्रिअट पत्रानें रखमाबाईच्या विरुद्ध टीका केली तेंच पत्र आतां स्पष्टपणें म्हणूं लागलें आहे कीं सि. प्रो. कोडनें जो मार्ग सुचविला आहे तो हिंदुधर्मशास्त्रास संमत नाहीं. त्यावरून असें दिसून येईल कीं तत्त्वाचा विचार करितां—वर्डस्वर्थ कमीटीला आतांपर्यंत ( १८८७ ) बरेंच यश आलें आहे.

## लॉर्ड रिपन

नारायणराव इंदुप्रकाशचे संपादक असतांना लॉर्ड रिपन हिंदुस्थानचे व्हायस-रॉय म्हणून निवडून आले व ते संपादक असतांनाच रिपनसाहेब आपली कारकीर्द संपवून स्वदेशीं प्रयाण करते झाले. त्यापूर्वी लिटनसाहेबांची कारकीर्द त्यांनीं पाहिली होती. रिपनसाहेबांनीं आपल्या अमदानींत हिंदी लोकांच्या कल्याणासाठीं सर्व परिस्थिति लक्षांत घेऊन जें कांहीं करणें शक्य होतें तें सर्व करून दाखविलें. हिंदी लोकांच्या आकांक्षांविषयीं त्यांनीं पूर्ण सहानुभूति दाख-विली व लोकांच्या जीवनाशीं समरस होण्याचा प्रयत्न केला, त्यामुळें त्यांच्या-विषयीं सर्वत्र अत्यंत आदराची भावना जागृत झाली व सर्व प्रांतांत त्यांची स्तुति होऊं लागली. ही गोष्ट कांहीं अँग्लो इंडिअन पत्रांना आवडली नाहीं, व देशी पत्रें कांहीं न कळतां रिपनसाहेबांवर स्तुतीचा वर्षाव करूं लागलीं आहेत, वस्तुतः त्यांच्या हातून हिंदुस्थानच्या कल्याणाचें कांहींच झालेलें नाहीं, असें तीं पत्रें बरळूं लागलीं! त्यावेळीं नारायणरावांनीं रिपनसाहेबांनीं लोकांसाठीं काय

---

२०. Refusal to live with a person you do not like is not a positive offence; and it is only positive offence which the law ought to punish.

काय केलें आहे तें एका लेखांत उत्तम रीतीनें दाखविलें असून, दुसऱ्या एका लेखांत जाण्यापूर्वी रिपनसाहेबांचा जो अभूतपूर्व सन्मान झाला तो कां हें त्यांनीं स्पष्ट[२१] केलें आहे. ह्या दोन्ही लेखांत जागजागीं त्यांनीं रिपन साहेबांच्या टीकाकारांचा कडक शब्दांनीं निषेध करून त्यांचा समाचार घेतला आहे. लॉर्ड रिपन ह्यांनीं केलें तरी काय असें जे विचारतात व त्यांची योग्यता कमी करण्याचा प्रयत्न करितात, त्यांच्या समाधानासाठीं नव्हे, तर थोडक्यांत त्यांचें कार्य लक्षांत यावें ह्या उद्देशानें ते म्हणतातः–"लार्ड रिपन ह्यांस "थोर" (Great) व्हाइसराय असें कां म्हणतात ह्याचें उत्तर अगदीं सरळ आहे. व्हर्न्याक्युलर प्रेस ॲक्ट रद्द करणें, मिठावरील कर कमी करणें, स्वदेशी उद्योगधंद्यांस मदत, म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें ह्यांची स्थापना, हिंदी व ॲंग्लो इंडिअन्स ह्यांचे हक्क सारखेच आहेत अशी घोषणा, पोस्ट ऑफिस सेव्हिंग बॅंकांची स्थापना व दुसऱ्या अनेक गोष्टी लॉर्ड रिपन ह्यांनीं करून दाखविल्या आहेत. ह्याशिवाय त्यांनीं हातीं घेतलेल्या कित्येक गोष्टी तशाच अपूर्ण स्थितींत राहिल्या आहेत. त्यांनीं हातीं घेतलेल्या कार्यांना वारंवार इतका विरोध झालेला आहे कीं, त्यास तोंड देण्यांतच त्यांचा कितीतरी वेळ गेला. परंतु त्यांनीं अमुक अमुक कार्यें केलीं म्हणून त्यांची योग्यता थोर असें नव्हे, तर त्यांनीं आपल्या एकंदर कारकीर्दीत जी सत्यप्रीति, न्यायनिष्ठुरता व लोकहिताविषयीं कळकळ दाखविली त्यामुळें ते आदरास पात्र झाले आहेत. आपल्या सदाचारानें राष्ट्र थोरपदास पावतें ह्या म्हणीचा केवळ पुरस्कार न करितां, तदनुसार त्यांनीं आचरण ठेविलें. ज्यांचा ज्यांचा त्यांच्याशीं संबंध आला त्यांच्यावर त्यांच्या पवित्र शीलाचा व सोज्वल आचरणाचा परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. आणि विशेषतः मागच्या कारकीर्दीचा विचार मनांत आला म्हणजे रिपनसाहेबांच्या कारकीर्दीचें एकंदर धोरण उदार, प्रामाणिक व वातावरण पवित्र होतें असेंच म्हणावें लागतें. त्यांच्या कारकीर्दीत मोठमोठ्या तत्त्वांची कोरडी घोषणा होत नव्हती, तर त्या घोषणेबरोबर प्रामाणिकपणें आचरण ठेवण्याचा कसून प्रयत्न होत होता. आजपर्यंत केव्हांही

२१. हा चरित्रलेखक त्या वेळीं वयानें लहान होता. तरी त्याला त्या वेळच्या मुंबईतील रोशनाईची चांगली आठवण आहे. तीर्थरूपांनीं ती मौज पहावयास मार्किटाच्या बाजूला त्याला नेलें असावें. त्यावेळची जुम्मा मशिदीसमोरील शोभा अद्याप त्याला दिसत आहे. मिठाईच्या दुकानवाल्यांनीं जिलब्या व घीवर ह्यांच्या माळा टांगल्या होत्या! व्यापाऱ्यांनीं आपापल्या व्यापाराच्या जिनसांच्या द्वारें रोशनाईंत भर घातली होती.

हिंदी मनुष्याला बंगालच्या हायकोर्टाच्या चीफ जस्टिसची कामचलाऊ जागाही देण्यांत आली नव्हती. चीफ जस्टिस हा बॅरिस्टर असला पाहिजे हा नियम बाजूस ठेवून त्यांनीं हिंदी मनुष्याची नेमणूक केली. वस्तुतः ह्या नियमाचा फायदा घेऊन त्यांनीं युरोपिअन बॅरिस्टरची नेमणूक केली असती तर तें अगदीं सरळ झालें असतें व त्यांना कोणी दोष दिला नसता. पण लायक इसम असतांना, तो केवळ बॅरिस्टर नाहीं म्हणून त्याला बाजूस सारून, ती जागा युरोपिअनास देणें त्यांना योग्य वाटलें नाहीं. त्याचप्रमाणें ब्रिटिश इंडिया ॲसोसिएशन व मुंबई सरकार ह्यांस एकेक हिंदी मनुष्य वरिष्ठ कौन्सिलांत पाठविण्यास सांगणें ही गोष्ट त्यांच्या उदार धोरणाची साक्ष पटवीत आहे. त्यांच्या कारकीर्दीची मुदत जर वाढली असती तर आणखी किती तरी गोष्टी त्यांच्या हातून झाल्या असत्या आणि आतां ते स्वदेशीं जावयास निघाले असतांना हिंदुस्थानच्या एका टोंकापासून तों दुसऱ्या टोंकापर्यंत त्यांचा जो सन्मान होत आहे, कधीं कोणी दाखविला नाहीं इतका आदर त्यांच्याविषयीं दाखविला जात आहे, त्याचा विचार करितां हिंदी प्रजा स्वयंस्फूर्तीनें आपल्या ह्या प्रिय व्हाइसरायचा सन्मान करीत आहे असेंच दिसून येतें. एकदां असें वाटलें होतें कीं बंगालच्या टेनन्सी बिला-मुळें बंगालचे जमीनदार ह्या सन्मानाच्या बावतींत कांहीं भाग घेणार नाहींत. पण तेंही खोटें ठरलें व त्यांनींहि मोठ्या उदार बुद्धीनें सन्मानाच्या चळवळींत भाग घेतला. आजपर्यंत हिंदुस्थानच्या कोठल्याही व्हाइसरायचा अशा प्रकारचा एकमतानें सन्मान झालेला नाहीं, किंवा कोणाविषयीं इतकें प्रेम हिंदी लोकांनीं दाखविलेलें[२२] नाहीं. विशेषतः हिंदी लोकमताला धाब्यावर बसविणें, अगर त्याला कांहींच महत्त्व न देणें याचा पायंडा लिटनसाहेबांच्या कारकीर्दींत पडला असतांना, त्या धोरणास लॉर्ड रिपन ह्यांनीं आळा घातला व हिंदी लोकांच्या संबंधानें असा अन्याय व्हावयाचा नाहीं असें आश्वासन देऊन तदनुसार ते वागले. त्याचप्रमाणें लोकमत धाब्यावर बसविण्याचें अनैतिक कार्य त्यांनीं केलें नाहीं, एवढेंच केवळ नव्हे तर कोणतेंही महत्त्वाचें कार्य करण्यापूर्वी लोकमत काय आहे तें अजमावण्याचा त्यांनीं प्रयत्न केला; सर्वांचें म्हणणें काय आहे तें त्यांनीं ऐकून घेतलें, व त्यायोगें सार्वजनिक संस्थांचा दर्जा वाढविला ह्याबद्दल ते स्तुतीस पात्र आहेत. आजपयत अशी पद्धत होती कीं, कायदेकौन्सिलांनीं पास केलेल्या कायद्याला व्हाइसरायनें संमती ही द्यावयाचीच. त्याचप्रमाणें प्रांतिक गव्हर्नरांना सर्व कार्यांत टेकू देणें हें पूर्वीचें धोरण होतें. लॉर्ड रिपन ह्यांनीं अशा वेळीं आपली अनु-

२२. Never was an Indian Viceroy so unanimously and enthusiastically honoured and loved.

मति न देण्याचें धैर्य दाखविलें! ह्यांच्यापेक्षां कमी धैर्याचा कोणी इसम असता तर चार निरनिराळ्या प्रसंगीं प्रांतिक सरकारांना नकार देण्याचें धैर्य त्यानें दाखविलें नसतें. सारांश, लॉर्ड रिपन ह्यांच्या कारकीर्दीत सर्व कारभार लोकांच्या हितासाठीं होत आहे असें धोरण सर्वांस दिसून येत होतें. हिंदी लोकांना कःपदार्थ समजून वागविण्यांत येत नसे. त्यांचे विचार, त्यांच्या आकांक्षा ह्यांचा विचार मनांत घेऊन राज्यकारभारांत त्यांच्या विचारांस महत्त्व देणें भाग आहे अशी भावना स्पष्टपणें दिसून येत होती. म्हणून लोकांच्या मनांत त्यांच्याविषयीं आत्मभाव जागृत झाला असून त्यानें प्रेरित होऊन त्यांनीं त्यांचा अभूतपूर्व असा सन्मान केला आहे"

## सर वुइल्यम वेडरबर्न

१८८७ सालीं, पंचवीस वर्षें इमानें इतबारें मुंबई इलाख्यांतील लोकांची सेवा बजाविल्यानंतर, सर वुइल्यम वेडरबर्न ह्यांनीं स्वदेशीं प्रयाण केलें. ह्या दीर्घकाळांत सर वुइल्यम हे केवळ अधिकारी ह्या नात्यानें मुळींच वागले नाहींत. ते हिंदी लोकांत मिळून मिसळून वागले. त्यांच्या आकांक्षा व आशा ह्यांच्याशीं समरस झाले. त्यांनीं योजिलेल्या कार्यांमध्यें मनःपूर्वक भाग त्यांनीं घेतला व जनतेचें कल्याण साधण्यासाठीं जें कांहीं करणें शक्य होतें तें त्यांनीं केलें. सरकारी नोकर असतांना लोकांच्या राजकीय आकांक्षांशीं त्यांनीं उघड उघड सहानुभूति दाखविली व त्यामुळें झालेला त्रास सहन केला.[२३] पुण्यास ज्यावेळीं मुलींच्या शिक्षणासाठीं हायस्कूल स्थापण्याचें ठरलें त्यावेळीं सर वुइल्यम ह्यांचें मोठें सहाय्य झालें व त्यांनीं आपल्या बंधूंच्या स्मरणार्थ दहा हजार रुपयांची देणगी दिली. त्यांच्या सन्मानार्थ टाऊनहॉलमध्यें सर जमशेटजी जीजीभाई ह्यांच्या अध्यक्षतेखालीं जंगी सभा भरली. त्या सभेंत ना. तेलंग, फेरोजशहा मेहता, चंदावरकर, सयानी वगैरेंचीं भाषणें झालीं. सर्वांनीं सर वुइल्यम हे प्रजेचे हितकर्ते, संकटाच्या वेळीं सहाय्यास धांवून जाणारे, सहानुभूति व स्वार्थत्यागपूर्वक सहाय्य करणारे थोर मनाचे मित्र असें त्यांचें वर्णन केलें. सर वुइल्यमसंबंधानें इंदुप्रकाशांत लिहिलेल्या लेखांत नारायणराव म्हणतातः—

"ह्या पंचवीस वर्षांच्या दीर्घ काळामध्यें आमच्या सर्व रास्त आकांक्षांशीं ते इतके समरस झाले होते व त्यांच्या परिपूर्तीसाठीं, लोकांसाठीं, लोकांमध्यें मिळून मिसळून, लोकांपैकींच एक आपण आहोंत असें कल्पून मोठ्या चिकाटीनें व

---

२३. १८८५ सालीं मुंबई इलाख्याच्या वतीनें विलायतेंत चळवळ करण्यासाठीं कोणास पाठवावें त्याचा विचार सर वुइल्यम करीत होते.

धैर्यानें त्यांनीं इतकें कार्य केलें आहे कीं, एकाही सुशिक्षित इसमाला ते परके आहेत असें वाटत नाहीं, एवढेंच नव्हे, तर ते एक आपल्यापैकींच आहेत असें त्यांस वाटतें[२४] आहे. इतकीं वर्षे लोकांमध्यें मिळून मिसळून राहिल्यामुळें त्यांच्याविषयीं सर्वांच्या ठिकाणीं अत्यंत आदर वास करीत असून ते आपले खरे हितचिंतक आहेत अशी भावना त्यांच्या ठिकाणीं जागृत आहे. ही आदराची भावना केवळ सुशिक्षितांतच आहे असें नसून पुण्यांतील अगदीं जुन्या वळणाचे शास्त्री, व इतर साधारण जन ह्या सर्वांस सर वुइल्यम हे आपले खरे मित्र व हितचिंतक आहेत असें वाटत आहे. दक्षिणेमध्यें त्यांचें नांव सर्वतोमुखीं आहे. त्यांच्या स्मारकाच्या चळवळीस अल्प काळांत आलेलें यश हें त्यांच्याविषयीं लोकांच्या मनांत जो आदर व प्रेम वसत आहे त्याचें दर्शक आहे. त्यांच्या स्मारकास अनेक संस्थानिकांनीं सढळ हातानें साहाय्य केलें आहे ही गोष्टही त्यांच्या लोकप्रियतेची साक्ष पटवीत आहे. त्याचप्रमाणें आपली कृतज्ञताबुद्धि व्यक्त करण्यासाठीं टाऊनहॉलमध्यें सर जमशेटजी जीजीभाई ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेली जाहीर सभा व त्यावेळीं झालेलीं भाषणें सर वुइल्यम ह्यांच्याविषयीं लोकांच्या मनांत जो उत्कट आदरभाव वसत आहे व त्यांनीं बजाविलेल्या सेवेविषयीं जी कृतज्ञताबुद्धि सुशिक्षितांच्या ठिकाणीं वसत आहे त्याची जाणीव लोकांत उत्पन्न करण्यास पुरेशीं आहेत. ना. तेलंग ह्यांनीं आपल्या भाषणांत सर वुइल्यम ह्यांनीं राजकीय शिक्षण व शेतकी विषयक बाबतींत मन घालून कोणत्या प्रकारें सेवा बजाविली तें दाखविलें. फेरोजशाहा मेथा ह्यांनीं आपल्या वक्तृत्वपूर्ण भाषणानें सर्वांस पटविलें कीं, सर वुइल्यम हा देश सोडून स्वदेशीं जात आहेत म्हणून आम्हांस खेद तर होत आहे, परंतु त्यांतल्या त्यांत स्वदेशीं गेल्यावरही हिंदुस्थानच्या कल्याणासाठीं तेथें ते झटणार हें ऐकून त्यांच्याविषयींचा आदर द्विगुणित वाटल्यावांचून राहात नाहीं. गरिबांपासून श्रीमंतांपयत सर्वांना सर वुइल्यम हे आपले खरेखरे हितचिंतक व मित्र आहेत असें वाटत असे; त्यामुळें अडीअडचणीच्या वेळीं ते त्यांचा सल्ला घेत असत. इकडे नोकरीनिमित्त जे इंग्रज ( ह्यांत

---

२४. He has during all this time so closely indentified himself with the legitimate aspirations of the people and so steadily and unflinchingly worked for them, with them and by them that there is not one educated native who does not feel in Sir William's departure that we are losing from this country not a stranger but one whom we have all along been accustomed to regard as one of us.

स्कॉचमेनही येतात. ) येतात, त्यांची साधारणतः अशी प्रथा आढळून येते कीं, नोकरीच्या पलीकडे लोकहिताच्या एखाद्या बाजूकडे ते विशेष लक्ष पुरवितात. ह्या दृष्टीनें पहातां विद्यापीठाच्या क्षेत्रांत सर रेमंड वेस्ट ह्यांनीं केलेलें कार्य अत्यंत प्रशंसनीय व लोकादरास प्रात्र झालेलें आहे. सर वुइल्यम ह्यांनीं राजकीय बाबतींत लोकांबरोबर व लोकांच्या हितासाठीं झटण्याचा निश्चय केला.[२५] ह्याबद्दल ते विशेष स्तुतीस पात्र आहेत. कारण, ह्या दिशेनें ते कार्य करीत होते म्हणून पुष्कळ दिवसपर्यंत त्यांना स्वतःला त्रास होत असे, तरी त्याकडे पूर्ण दुर्लक्ष करून मोठ्या निर्धारानें लोकांच्या हितासाठीं, लोकांच्या खांद्यास खांदा लावून, लोकांमध्यें मिळून मिसळून राजकीय व सामाजिक उन्नतीसाठीं ते झटले. सर वुइल्यम ह्यांनीं स्वार्थत्यागपूर्वक हिंदी लोकांच्या हितासाठीं कसें झटावयाचें तें आपल्या स्वतःच्या उदाहरणानें दाखवून दिलें आहे व त्यांच्याविषयींचा खरा आदर व कृतज्ञताबुद्धि त्यांचें अनुकरण करून दाखविल्यानेंच व्यक्त होणार आहे."

## स्त्रियांचें उच्च शिक्षण

हल्लींच्या काळीं स्त्रियाचें उच्च शिक्षण म्हणजे त्यांच्या कॉलेजांतील शिक्षणाचा प्रश्न आपल्यापुढें उभा राहातो. परंतु १८८४ सालीं ज्यावेळीं दसऱ्याच्या मुहूर्तावर पुण्यास मुलींना इंग्रजी शिकविण्यासाठीं शाळा स्थापन झाली त्यावेळीं Higher Education चा अर्थ प्राथमिक शिक्षणानंतर मिळणारें इंग्रजी शिक्षण असा होत असे. असें शिक्षण देणारी शाळा स्थापण्याचा विचार जेव्हां लोकांपुढें आला त्यावेळीं अशा शिक्षणाच्या विरुद्ध येथें व पुणें येथें जो टीकेचा भडिमार झाला त्याचा विचार मनांत आला व आजची स्थिति पाहिली म्हणजे शिक्षणाच्या बाबतींत आपण किती प्रगति केली आहे तें आपल्याला दिसून येतें. नारायणराव स्त्रीशिक्षणाचे कट्टे कैवारी होते. १८८४ सालीं व त्यापूर्वी ह्या विषयावर चर्चा होत असतां लोक किती क्षुद्र मनोवृत्ति दाखवून आपलें हंसें धर्माभिमानाच्या नांवावर करून घेत होते ह्याचा त्यांनीं स्वतः अनुभव घेतला होता. शाळा स्थापण्याचा प्रश्न उपस्थित झाला, तेव्हां त्यांनीं नेटिव्ह ओपिनिअन व इतर पत्रांची उत्तम हजेरी घेतली होती. इंदुप्रकाशसारख्या पत्राच्या मराठी बाजूकडे स्त्रियांच्या इंग्रजी शिक्षणाविरुद्ध

---

२५. Sir William chose for his labour of love the noble work of co-operating with the natives in **political** work and in so doing he entitled himself to their special gratitude because his cooperation worked for a long time to his personal disadvantage.

आलेले बाष्कळ लेख त्यांनीं पाहिले होते. म्हणून इंदुप्रकाशमध्यें अनेक लेख लिहून इंग्रजी शिक्षण मुलींना दिल्यानें कोणत्याही प्रकारें मुलींचें अकल्याण होणार नाहीं असें त्यांनीं दाखवून दिलें व शाळेच्या चालकांस उत्तेजन दिलें. अशा प्रकारें स्त्रियांच्या उच्च शिक्षणास प्रारंभ कसा झाला, त्या शिक्षणाचा प्रसार कसा झाला, व स्त्रीशिक्षणसंस्था भरभराटीस कशा आल्या हें त्यांनीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलें होतें. जेथें इंग्रजी शिकावयास पूर्वी एकही हिंदु मुलगी ह्या मुंबई शहरांत मिळत नसे तेथें हातांत पुस्तकें घेऊन मुलींच्या झुंडीच्या झुंडी शाळेंत जातांना, अगर शाळेंतून परत येतांना त्यांनीं पाहिल्या कीं, त्यांचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून येत असत. स्त्रीशिक्षणावरील आपली निःसीम भक्ति व त्या कार्याविषयींचा आपला अभिमान व्यक्त करण्याच्या हेतूनें न्यायमूर्ति असतांना कित्येक वर्षेंपर्यंत नारायणराव दर शनिवारीं स्टूडंट्स लिटररी अँड सायंटिफिक सोसायटीच्या शाळेंत म्याट्रिक्युलेशनच्या वर्गांत जाऊन इंग्रजी शिकवीत असत! कोठल्याही हायकोर्टाच्या जज्जानें आवडीनें कित्येक वर्षेंपर्यंत हें स्त्रीशिक्षणाचें कार्य केलेलें आढळून येणार नाहीं. हें कार्य आपलीं इतर सर्व सार्वजनिक कामें संभाळून मोठ्या आनंदानें, प्रेमानें व उत्साहानें एकट्या नारायणरावांनींच केलें आहे. ह्यावरून त्यांच्या कळकळीची आपल्याला अस्पष्ट कल्पना होते. अशी त्यांच्या विचारांची स्थिति असल्यामुळें १८८४ सालीं पुण्याच्या मुलींच्या शाळेचा प्रश्न जेव्हां उपस्थित झाला व मुलींच्या इंग्रजी शिक्षणाविरुद्ध चर्चा होऊं लागली त्यावेळीं इंदुप्रकाशानें, म्हणजे नारायणरावांनीं, मोठीच कामगिरी केली व लोकांचे गैरसमज दूर करून स्त्रीशिक्षणाची खरी बाजू लोकांपुढें ठेविली. त्यावेळीं इंदुप्रकाशसारख्या भारदस्त पत्रांतही दुसरी बाजू दाखविण्यासाठीं कोणत्या प्रकारचीं पत्रें प्रसिद्ध होत असत त्याची कल्पना पुढील लहानशा उताऱ्यावरून होईल. तथापि ह्या बाबतींत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे कीं, १८८४ सालीं केसरीचें संपादकत्व श्री. आगरकर ह्यांच्याकडे असल्यामुळें स्त्रियांच्या उच्च शिक्षणास **पूर्णपणें** अनुकूल लेख केसरींत प्रसिद्ध होत असत व केसरी व नेटिव्ह ओपिनिअन ह्यांची चांगलीच जुंपत असे. नेटिव्ह ओपिनिअननें केसरीला "उल्लू" म्हणावें, व केसरीनें शेलक्या शिव्या त्यास अर्पण कराव्या असा प्रकार चाले. असो. आतां आक्षेपांचा नमुना पहा :—

(१) "एकदां स्त्रियांस शिक्षण मिळालें म्हणजे त्या शिक्षकिणी, डॉक्टरिणी, इन्स्पेक्टरिणी होऊन **इस्टाकिनी बूट** घालून फिरूं लागल्या म्हणजे साहेबलोकांशीं दळणवळण वाढून कधींनाकधीं अधिक प्रसंग आल्याखेरीज राहाणार नाहीं. त्यांतून त्यांची अब्रू रक्षण करण्यास जावें तर आमच्यांत त्राण नाहीं. "स्प्लीन" फुटून फुकट जीव जाण्याची मात्र धास्ती. सरकारांत जाऊन न्याय

मिळेल म्हणावें तर तें बोलूंच नका. रत्नागिरीस गतवर्षी एका साहेबानें एका बाईची हुर्मत घेतली, परवां एका कोळणीवर तिच्या नवऱ्याच्या व आप्तांच्या समक्ष एका साहेबानें जुलूम केला. हल्लीं कलकत्त्यास दुसऱ्या एकानें एका बाईस विहिरींत लोटून ठार मारलें, परंतु न्याय असा चोख झाला कीं, हे तिन्ही गुन्हेगार सुटून गेले ! अशी आमची दुःसह स्थिति आहे. आजपर्यंत ज्या कित्येक स्त्रिया असली दूषित विद्या संपादून स्वतंत्र धंद्यास लागल्या, त्यांतील कित्येकींच्या दुष्कीर्तीचा डंका गाजत आहेच. कलकत्त्यांत एका **मैत्रेयीनें** आपल्या वकील मामासच मित्र करून त्यास दुनियेंतून उठविलें आणि आपल्या व आपल्या आईबापांच्या तोंडांस काळिमा आणिला. महाराष्ट्रांतल्या **वडवाप्राचीथेयीनें** मुंबईच्या एका शूद्राशीं पुनर्विवाह करून स्त्रीस्वातंत्र्याचा आणि विद्येचा प्रकाश पाडला. उच्च यातीच्या बाबूशीं लग्न करणाऱ्या आमच्या **गार्गेयीनें** तर सर्वांवर कमाल करून सोडली. बाबुसाहेब स्वर्गवासी झाल्यावर ही गार्गेयी येथें आली आणि इनें सर्व महाराष्ट्रभर पिंगा घातला आणि शेवटीं इंग्लंडास जाऊन बाईनें असें उत्तम वर्तन केलें कीं, तेणेंकरून ती येथें असतां जे **शाकल बाष्कल** तिच्यामागून " अहोरूपं अहोरूपं " म्हणून फिरत होते त्यांची बालंबाल खात्रीच झाली. " म्हणून अट्टाहास हा चालला होता कीं, आमच्या मुलींना इंग्रजी शिक्षण देणें अगदीं धोक्याचें ! वेडर्नबर्न साहेब डेक्कनच्या सरदारांचे सरदार, " त्यांनीं नेत्रसंकेत केला कीं रुपयांच्या थैल्यांच्या थैल्या येऊन पडतील आणि पैशाचें आमिष दाखविल्यावर विद्यार्थिनींचे कळपच्याकळप धांवत येतील. त्यांत " रानडे पंडित मानकरां " सारखे पुढारी, आणि केसरीकारासारखे ' सवाई पुढारी, ' मग हें काम मागें पडणार कसें ? उलटपक्षीं नारायणरावांनीं असें दाखवून दिलें कीं ज्या संस्थेचा पुढाकार रानडे, भांडारकर, पंडित इ. विद्वानांनीं घेतला आहे, त्यांनीं पुढलामागला विचार न करितां ही शाळा स्थापण्याचें ठरविलें असें म्हणणें म्हणजे त्यांचें शिक्षण व त्यांचा अनुभव ह्यांचा उपमर्द करण्यासारखें आहे. नारायणरावांनीं मुलींचें उच्च शिक्षण व पुण्याची शाळा ह्या विषयांवर १८८४ सालीं जे अनेक लेख लिहिले त्यांचें साधारण स्वरूप पुढीलप्रमाणें होतें :—

पुण्यास ही शाळा स्थापन होणार याबद्दल आतां कांहीं संशय उरलेला नाहीं. आतांपर्यंत ( ८-९-८४ ) पाऊण लाख रुपये जमले आहेत, कायमचा खर्च सरकारनें चालविण्याचें कबूल केलें आहे व आणखी भरपूर आश्रय मिळण्याचा पुष्कळ संभव आहे. परंतु शिक्षणाचें माध्यम, एकंदर विषयांची निवड, कोणत्या वर्गांतून मुली येणार, त्यांची तेथें कशी व्यवस्था होणार, विवाहासाठीं मुलींना शाळेंतून न काढतां त्यांचें शिक्षण तसेंच चालू ठेवणें वगैरे गोष्टींवर शाळेचें यश

अवलंबून राहील. मुलींची संख्या वाढविणें, अगर त्यांचा विवाह न करतां, अगर विवाह झाल्यानंतरही त्यांस शाळेंत शिकूं देणें या गोष्टी चालकांच्या हातीं नाहींत. लोकांमध्यें जसजशी जागृति होत जाईल, मुलींच्या लग्नाची वयोमर्यादा जसजशी वाढत जाईल तसतसें शाळेला यश येत जाईल. परंतु मुलींना कोण-कोणते विषय शिकवावयाचे, ते कोणत्या भाषेंतून शिकवावयाचे, व त्यांच्या शिक्षणाचें ध्येय काय असूं द्यावयाचें, ह्या गोष्टींचा चालकांस निकाल लावतां येण्यासारखा आहे. एज्युकेशन कमिशनचा गेला रिपोर्ट ज्यांनीं पाहिला असेल त्यांस हें माहीत आहे कीं, मुलींच्या प्राथमिक शिक्षणाचा जो तक्ता तयार केला तो मुलांच्या तक्त्याबरहुकूम आहे आणि हें कमिशनला पसंत नाहीं. त्या रिपोर्टांत स्पष्ट म्हटलें आहे कीं, त्या पद्धतीप्रमाणें मुलींना मुलांप्रमाणें शिकविलेले विषय येतील, पण त्यांना पुढें जें जीवन कंठावयाचें आहे त्या दृष्टीनें ह्या शिक्षणाचा त्यांना कितपत उपयोग होईल याचा विचार झालेला नाहीं. ज्याअर्थी प्राथमिक शिक्षणासंबंधानें हे असे विचार कमिशननें प्रदर्शित केले आहेत, त्याअर्थी मध्यम प्रतीच्या व उच्च शिक्षणाचा अनुक्रम जर विचारांत घेतला असता तर याहीपेक्षां कडक टीका कमिशननें केली असती. पण सध्यां स्त्रियांच्या उच्च शिक्षणाचा प्रश्नच पुढें नाहीं. आतां आपल्या इलाख्यांत मुलांचें बहुतेक सर्व विषयांचें शिक्षण इंग्रजीच्या द्वारें होत असतें. त्याचा परिणाम असा होतो कीं, आमचें बोलणें, लिहिणें व विचार करणेंही इंग्रजींतून चालतें ! आपल्या स्वतःच्या मातृभाषेपेक्षां इंग्रजीशीं आमचा अधिक परिचय होतो व आमचें संभाषण, आमचा पत्रव्यवहार इंग्रजींत चालतो. तुकाराम व मोरोपंतांपेक्षां आम्हांला शेक्सपिअरची अधिक विश्वसनीय माहिती असते. आमच्या लायब्र्यांतून मराठीपेक्षां इंग्रजी पुस्तकांचाच अधिक भरणा असतो, आणि मातृभाषेपेक्षां इंग्रजी पुस्तकेंच वाचणें आम्हांला अधिक आवडतें. अशा प्रकारें आपल्या लिहिण्यावाचण्यांत अराष्ट्रीयत्व इतकें दिसून येत आहे कीं, हाच क्रम पुढें चालला तर आमची मातृभाषा नष्ट होण्याचा संभव आहे![२६] इंग्रजी शिक्षणाचें महत्त्व कमी करण्याच्या हेतूनें आम्ही हें लिहीत आहों अशी कोणी समजूत करून घेऊं नये. इंग्रजीमध्यें जें ग्रंथभांडार व ज्ञानभांडार आहे त्यांचें महत्त्व आम्ही कमी मानतों, अगर त्याविषयीं आम्हांस अभिमान नाहीं अशी कोणी आपली कल्पना करून घेऊं नये. आज इंग्रजीच्या ज्ञानाची अत्यंत आवश्यकता आहे हें आम्हांला मान्य आहे, मात्र मातृभाषेची जी अवहेलना होत आहे ती आम्हांला फार चमत्कारिक वाटते. अशा प्रकारें मुलांचें शिक्षण व तें

२६. So completely are we being denationalized that there is fear of our Vernacular being extinct one day.

देण्याची पद्धत जर दोषार्ह आहे, तर त्याच धोरणानें मुलींचें शिक्षण होणें हें इष्ट नाहीं हें तर उघडच झालें. मुलींच्या शिक्षणक्रमांत मातृभाषांकडे विशेष लक्ष पुरविलें गेलें पाहिजे. त्यांना मराठी माध्यम ठेवून शिक्षण द्यावें व इंग्रजी दुसऱ्या भाषेप्रमाणें शिकवावें. मुलींना व स्त्रियांना इंग्रजी अवश्य शिकवावें असेंच आमचें मत आहे; तसेंच मराठींत ग्रंथसंग्रह जितका व जसा असावयास पाहिजे तितका व तसा आज नाहीं हेंही आम्हांस कबूल आहे. म्हणून आम्ही असें म्हणतों कीं, आमच्या मुलींना व स्त्रियांना इंग्रजी अवश्य शिकूं द्या, पण आमचें एवढेंच म्हणणें आहे कीं मातृभाषेविषयीं तिरस्कार वाटूं लागणें हा त्या शिक्षणाचा परिणाम होऊं नये! त्यांचें शिक्षण मातृभाषांतून झालें व इंग्रजी ही दुसरी भाषा म्हणून त्या शिकूं लागल्या, म्हणजे त्यांना मातृभाषेंतील उत्तम ग्रंथांची ओळख होईल, इंग्रजी भाषेचें ज्ञान होईल, व आज पुरुषांच्या बाबतींत जें सर्व इंग्रजीकरण झालें आहे तें व्हावयाचें नाहीं. सारांश, त्यांच्या बुद्धीची वाढ होईल, नैतिक दृष्ट्या त्यांची उन्नति होईल व कन्या, भगिनी, पत्नी व माता हीं विविध नातीं योग्य प्रकारें पार पाडण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत येईल.

आज आपल्या समाजांत स्त्रियांना उच्च शिक्षण द्यावें असें म्हणणारे लोक आहेत, व तें देण्याची कांहीं आवश्यकता नाहीं असें म्हणणारेही लोक आहेत. पण जेथें मुलींना अगर स्त्रियांना कोणत्याही प्रकारचें–प्राथमिकही–शिक्षण देण्याची आवश्यकता नाहीं असें म्हणणारे जुने रूढिप्रिय व अशिक्षित लोक आहेत, तेथें लोकांनीं स्त्रियांच्या उच्च शिक्षणासंबंधानें सहानुभूति दाखविली नाहीं तर तें आश्चर्याचें नाहीं. कांहीं लोकांना असें वाटतें कीं, एका ठराविक मर्यादेपर्यंत स्त्रियांचें शिक्षण व्हावें, त्याच्या पुढें जाणें हें धोक्याचें आहे. कित्येकांस पुण्यास जी मुलींसाठीं हायस्कूलची कल्पना निघाली आहे तिच्यापासून खरोखर फायदा किती होईल याची शंका आहे. दुसरा एक वर्ग आहे. त्यांतील लोकांना स्त्रियांना उच्च शिक्षण मिळालें तर तें चांगलें असें वाटत आहे, पण त्यांना असेंही वाटत आहे कीं, आज देशाच्या हिताच्या दृष्टीनें दुसऱ्या फार महत्त्वाच्या गोष्टींची अधिक आवश्यकता आहे, म्हणून हा विषय मागें पडल्यानें कांहीं नुकसान व्हावयाचें नाहीं! नेटिव्ह ओपिनिअनकारांचें असें म्हणणें आहे कीं पटापट इंग्रजी बोलतां येणें व इंग्रजी लिहितां येणें, किंवा ज्याच्यायोगें परक्यांचा दिखाऊपणा त्यांच्यांत येईल असलें शिक्षण आम्हांला नको, पण ज्याच्यायोगें त्या उत्तम गृहिणी होतील असलें शिक्षण त्यांस मिळावें असें त्या पत्राचें म्हणणें आहे. परंतु पुण्याची शाळा काढणाऱ्यांच्या मनांत आमच्या मुलींना ऐटबाज पोशाख करावयास व छानछोकी करावयास शिकवावयाचा विचार आहे हें कशावरून ? तसेंच आजच्या इंग्रजी

शिक्षणांतील व युरोपिअन बायांच्या शिक्षणांतील जेवढे दोष आहेत तेवढेच पुण्याच्या अभ्यासक्रमांत येतील असें मानावयास तरी काय कारण आहे? विशेषतः भांडारकर, रानडे, नूलकर, पंडित ह्यांच्यासारख्या लोकांनीं ज्या संस्थेच्या बाबतींत पुढाकार घेतला आहे त्या संस्थेंत भलतेंच, अगर जें नको तेवढेंच शिकविलें जाईल असें मानावयास कोठें जागा आहे? त्यांना संस्था स्थापूं द्या, तेथें कोणत्या प्रकारचें व कसें शिक्षण दिलें जातें तें पहा, मग त्याची चिकित्सा करा व दोष द्याव-याचा असेल तर तो द्या. परंतु ज्यांना उच्च स्त्रीशिक्षणाचें तत्त्व मान्य आहे, व जेथें तपशिलासंबंधानें मतभेद आहे त्यांच्याविषयीं आज विशेष भानगड नाहीं. ज्यांना ही उच्च शिक्षणाची गोष्ट तत्त्वतःच मान्य नाहीं त्यांच्या विचारांचा थोडा विचार होणें जरूर आहे. ह्या विरोधकांना असें वाटत आहे कीं, ( १ ) केवळ इंग्रजांचें अनुकरण करण्याची प्रबळ इच्छा ह्या चळवळीच्या मुळाशीं आहे. ( २ ) आज ह्या उच्च शिक्षणावांचून कोणाचें कांहीं अडलेलें नाहीं. ( ३ ) आपले लोक मूळ-चेच गरीब आहेत, आणि त्यांच्या मुलींना हें उच्च शिक्षण मिळालें म्हणजे मग त्या गृहकार्याला निकामी होतील. ( ४ ) आज मुलांच्या धंदेशिक्षणाची व्यवस्था होणें, किंवा अशा इतर गोष्टींची अधिक आवश्यकता आहे, त्याविषयीं प्रथम विचार होऊन जो पैसा मिळण्यासारखा असेल तो त्या कार्याकडे खर्च केला पाहिजे. केवळ अनुकरण करण्याच्याच बुद्धीनें ह्या शाळेची स्थापना होणार असून इंग्लिशांचें अनुकरण करणें हें वाईट आहे व त्यांचें अनुकरण करण्याइतकीही पात्रता आमच्यांत नाहीं वगैरे मुद्दे शाळेविरुद्ध असणारांनीं आणिले आहेत. आतां प्रथम अनुकरण करण्याशाठीं शाळा स्थापण्यांत येत आहे हें खरें नाहीं. आमच्यामध्यें अनुकरणशील वृत्ति आहे, व कपडेलत्ते, व कांहीं संवयींच्या बाबतींत इंग्रजांचें कमीअधिक अनुकरण होत आहे ह्यांत संशय नाहीं. पण ह्यांत आश्चर्याचें असें काय आहे? हा आमच्या शिक्षणाचा व राजकीय परिस्थितीचा परिणाम आहे. आणि हें आजच होत आहे असेंही समजावयास नको. ज्यावेळीं आमच्यावर मुसलमानांची सत्ता होती त्यावेळीं आमच्या रहाणींत, पोषाखांत व रीतिरिवाजांत त्यांच्या पद्धति आल्या होत्याच कीं नाहीं? त्याच अनुभवाची आतां पुनरावृत्ति होत आहे. परंतु हल्लींचे पुरुष बूट-स्टाकिंग्स घालूं लागले, टेबलें—खुर्च्या वापरूं लागले, म्हणून इंग्रजांच्या बायका शिक-लेल्या असतात त्याप्रमाणें आपल्याही बायका शिकलेल्या असाव्यात असें सुशि-क्षित लोकांना वाटूं लागलें असें समजण्याचें कारण नाहीं. त्यांना स्वतःला इंग्रजी शिक्षण मिळालें, त्या शिक्षणापासून होणारे फायदे, ज्ञानार्जनाचीं साधनें ह्यांचें ज्याप्रमाणें ज्ञान झालें, त्याचप्रमाणें हे सर्व लाभ, फायदे आपल्या पत्नींना मिळ-ण्याचीं साधनें त्यांस उपलब्ध करून द्यावीं असें जर वाटलें तर त्यांत वावगें तें

काय आहे? दुसरें असें कीं, अनुकरण करणें हें सर्वस्वीं त्याज्य आहे, व चांगल्या गोष्टींचेंही अनुकरण करणें गैर होय हें आम्हांस मान्य नाहीं. आमच्या व इंग्रजांच्या समाजरचनेंत जमीन अस्मानाचें अंतर असलें, तरी आम्ही इतके मुर्दाड आहोंत, कीं त्यांच्या चांगल्या हितकर गोष्टीचेंही आम्हांला अनुकरण करतां येणें शक्य नाहीं असें मानावयास आम्ही तयार नाहीं. इंग्रजांचे जे गुण आहेत, ते आपल्यामध्यें आणिल्यावांचून त्यांची व आमची बरोबरी आहे असें म्हणणें हा मूर्खपणा होय. त्यांचा निश्चय, त्यांची उद्योगप्रियता, त्यांची चिकाटी, मर्दानी खेळांविषयींची त्यांची आवड, त्यांची सचोटी, त्यांचा सरळपणा ह्यांचें अनुकरण करण्याची आम्हांस लाज वाटतां नये. ह्या बाबतींत त्यांचें अनुकरण करण्याची जर आमची तयारी नसेल, तर आम्हांस मिळालेलें शिक्षण सर्व फुकट गेलें असें समजावें! आणि त्यांच्या गुणांचें आम्ही अनुकरण करीत गेलों व ते आमच्यांत मुरले, तर आम्हांला त्यांची बरोबरी कां करतां येऊं नये तें आम्हांस समजत नाहीं. प्रथम आपण आपल्यापुढें उच्च ध्येय ठेविलें पाहिजे आणि नंतर तें गांठण्यासाठीं सतत झटलें पाहिजे. आपणच आपल्याकडे दुबळेपणा, हलकेपणा घेतला व आपल्याला त्यांची बरोबरी करितां येणें शक्य नाहीं असें रडगाणें गात बसलों, तर मग आम्ही नेहमींच असे खिचपत राहाणार! आपण सतत आपलें उच्च ध्येय गांठण्यासाठीं प्रयत्नशील राहिलें पाहिजे. आतां स्त्रियांच्या उच्च शिक्षणासंबंधानें जे आक्षेप घेण्यांत येत आहेत त्यांत अतिशयोक्ति पुष्कळ आहे. फार तर अशा शिक्षणाची आवश्यकता सर्वत्र भासत नसेल. पण, मुलांच्या उच्च शिक्षणास जेव्हां प्रारंभ करण्यांत आला तेव्हां तरी त्या शिक्षणाची सर्वत्र आवश्यकता भासत होती काय? मुलींच्या प्राथमिक शिक्षणाचा जितका प्रसार व्हावयास पाहिजे तितका तो झालेला नसला तरी जेवढा झाला आहे तो पाहून त्यांच्या उच्च शिक्षणास प्रारंभ करण्याची वेळ आली आहे असेंच आम्हांस वाटतें. प्रारंभ लहान प्रमाणावरच होईल; इमारत होईल, पण मुलीच येणार नाहींत, अशी जी विरोधकांनीं भीति पाडली आहे, ती अगदींच अस्थानीं आहे एवढें खरें![२७]

आतां ह्या संस्थेला इतक्या लोकांनीं जें द्रव्यसहाय्य केलें आहे तें त्यांना ह्या अशा शिक्षणाची आवश्यकता न पटतां केलें आहे असें ह्या विरोधकांनीं कां

---

२७. ता. २८ सप्टेंबर १८८४ रोजीं दसऱ्याच्या मुहूर्तावर पुण्यास मुलींच्या हायस्कूलची स्थापना झाली. त्यावेळीं रा. ब. शंकरराव पंडितांनीं सांगितलें कीं, सर्व मुलींची आजच सोय करितां येत नसल्यामुळें कितीएक मुलींस नको म्हणून म्हणावें लागलें! त्याच दिवशीं वर्गणी ५८,४२० रुपये जमल्याचें जाहीर करण्यांत आलें.

समजावें ? तसेंच आम्हांला इंग्रजांचें भलत्याच गोष्टींत अनुकरण करावयाचें नाहीं हें पूर्वी सांगितलेंच आहे. त्यांचा पोषाख, त्यांचें खाणेंपिणें ह्यापेक्षां त्यांचा धाडशी स्वभाव, त्यांची चिकाटी, त्यांची सचोटी हे गुण आम्हांला हवे आहेत. मग हे स्पृहणीय गुण त्यांना कोठें प्राप्त झाले ? कोणाही इंग्लिशमनला विचारा, तो सांगेल कीं, ह्या गुणांचें बीज बाळपणीं घरींच पेरलें गेलें आहे. तर ह्या सर्व गुणांचें आरोपण जर घरीं मातांच्याद्वारें व्हावें अशी इच्छा असेल, तर त्यांस उच्च शिक्षणाची अत्यंत आवश्यकता आहे हें निःसंशय आहे. पुस्तकी विद्येनें जें कार्य फार तर महत्प्रयासानें होतें तेंच कार्य मातेच्या शिक्षणानें सहज होऊन जातें. परंतु आमचे टीकाकार म्हणत आहेत कीं स्त्रियांना हें असलें शिक्षण देण्याची मुळीं जरूरच नाहीं. त्यांचा जन्म घरांत राबण्यासाठीं आहे. आणि ज्यांचा जन्म पुरुषांची गुलामगिरी करण्यांत व त्यांचीं खेळणीं बनण्यांत जाणार आहे, त्यांना हें शिक्षण आणि उच्च शिक्षण कशाला पाहिजे ?[२८] फार तर त्यांना लिहावयास व वाचावयास शिकवा, पण त्याच्या पलीकडे जाणें हें अगदीं धोक्याचें आहे! कारण, त्यांना तुम्ही अधिक शिक्षण दिलेंत म्हणजे त्या गर्विष्ठ होतील, घरकामाला निकामी होतील, घरचा खर्च वाढेल, आणि घरांत सुखाच्या ऐवजीं दुःख नांदूं लागेल! आम्हांला तर हा सगळा उलटा न्याय वाटत आहे. आम्ही तर असें म्हणतों कीं, स्त्री अज्ञानी असली म्हणजे तिला आपल्या एकंदर स्थितीचें ज्ञान नसतें व ती भलताच हट्ट घेऊन बसणें शक्य असतें. ज्ञानसंपन्न स्त्रीला आपली जबाबदारी कळते, आपल्या घरीं कोठें काटकसर केली पाहिजे तें तिला समजतें, कोणत्या बाबतींत आपल्या पतीला आपल्याला सहाय्य करितां येण्यासारखें आहे, हें तिच्या ध्यानांत येतें व आपल्या स्वतःच्या मागण्या न वाढवितां अनेक बाबतींत ती आपल्या पतीची सहकारी होऊं शकते. अशा प्रकारें सुशिक्षित स्त्री आपल्या घरांत आनंदाचें, प्रसन्नतेचें व समाधानाचें वातावरण प्रयत्नेंकरून उत्पन्न करूं शकेल. शिक्षणाचा लाभ होऊनही कधीं कधीं पुरुषांमध्यें जे गुण यावयास पाहिजेत ते आलेले नाहींत असा आपल्याला अनुभव येतो. ज्ञान हें मनुष्यास बिघडवीत नाहीं, सुधारतें, त्याच्यांत कर्तव्याची जाणीव उत्पन्न करते हें आपण जाणतों. पण, ह्याच्या उलट अनुभव आला तर आपण ज्ञानाला दोष देत नाहीं, शिक्षणाला दोष देत नाहीं, तर व्यक्तीला दोष देतों. तोच नियम स्त्रियांच्या बाबतींतही ध्यानांत ठेवला पाहिजे. स्त्रियांच्या बाबतींतही क्वचित् ज्ञानाचा

---

२८. What necessity is there of enlightening creatures meant to be slaves and toys of men ? Teach them to read and write, but beyond that it is perilous to venture.

व शिक्षणाचा दुरुपयोग झालेला आढळणें शक्य आहे. पण त्याच्यायोगें स्त्रियांस ज्ञानसंपन्नच करूं नये, अज्ञानांतच ठेवावें, हें योग्य होय असें होत नाहीं. आम्हांला मुळीं असेंच बाळकडू पाजलेलें असतें कीं मुलीचा जन्म हा कष्ट करण्यासाठीं, राबण्यासाठीं, पुरुषांच्या सेवेसाठीं असतो. ही समजूत दृढमूल झालेली असल्यामुळें मुलीच्या शिक्षणाचा विचारच मुळीं पुष्कळांना कसा-साच वाटतो. एखादा मनुष्य स्वतः शिकलेला असला, राजकारणांत पडलेला असेल, किंवा विचारस्वातंत्र्य व भाषणस्वातंत्र्य ह्यांसाठीं भांडणारा असला, तरी स्त्रियांना ज्ञानसंपन्न करण्याची गोष्ट काढतांच, त्याचें ज्ञान, विद्वत्ता, त्याची स्वातंत्र्यप्रीति कुठल्याकुठें निघून जातात व जान्सननें म्हटल्याप्रमाणें जे लोक स्वातंत्र्याविषयीं फार गप्पा मारीत असतात तेच लोक स्वातंत्र्य देण्यास तयार नसतात, ह्याचा अनुभव येतो. म्हणून आमच्या हाडींमासीं खिळलेली जी ही स्त्रियांसंबंधानें कनिष्ठतेची भावना आहे ती नष्ट झाल्यावांचून आमचे स्वातंत्र्याचे बोल असेच फोल ठरणार.

अशाप्रकारें नारायणरावांनीं इंदुप्रकाशाच्याद्वारें नानाप्रकारच्या विषयांचा ऊहापोह केला. सर्व विषयांची चर्चा करितेवेळीं दूरदृष्टि व समतोलपणा कायम ठेविला व वर्तमानपत्राचा आदर्श संपादक कसा असावा त्याची कल्पना आपल्या स्वतःच्या कार्याच्याद्वारें सर्वांस पटवून दिली.

इंदुप्रकाशाचे संपादक असतांनाच नारायणरावांस इंग्लंडास जाण्याचा योग आला. तो कसा आला व इंग्लंडांत गेल्यावर त्यांनीं कशी कामगिरी बजाविली याचें वर्णन पुढील प्रकरणांत केलेलें वाचकांस आढळून येईल.

प्रकरण चौथें

# इंग्लंडांतील अनुभव व कामगिरी

इंदुप्रकाश पत्र कोणत्या प्रकारें देशसेवा करीत होतें याची कल्पना संपादक व लेखक ह्या प्रकरणांतील विवेचनावरून वाचकांस होईल. तें काम चालू असतांनाच १८८५ सालीं पार्लमेंटची पुनर्घटना होण्याची वेळ आली. त्यावेळीं हिंदुस्थानाविषयीं खरीखुरी माहिती इंग्लंडांतील मतदारांस करून द्यावी, हिंदुस्थानच्या मागण्या काय आहेत, व त्या किती न्याय्य आहेत हें तेथील मतदारांस दाखवावें; इंग्लंड व हिंदुस्थान हे देश जरी निरनिराळे असले, लोकस्थिति, समाजव्यवस्था, सांपत्तिक स्थिति जरी सारखी नसली, तरी ह्या दोन देशांचे हितसंबंध कसे सारखे, नव्हे, एक झाले आहेत, हें तेथील मतदारांस पटवून द्यावें; त्याचप्रमाणें, इंग्लंडनें हिंदुस्थानाविषयीं आपलें जें कर्तव्य त्याची जागृति ठेविल्यानें इंग्लंडच्या इभ्रतींत कशी भर पडणार आहे तें सांगण्यासाठीं हिंदुस्थानांतून निरनिराळ्या भागांतील नांवाजलेले पुढारी विलायतेस पाठविण्याचा विचार जेव्हां मुकरर झाला, त्यावेळीं मुंबई इलाख्याच्या वतीनें नारायणरावांस पाठविण्याचें ठरलें.[1] बंगालच्या वतीनें मनमोहन घोष व मद्रासतर्फे मि. मुदलियार गेले होते. ह्या तिघांनीं तेथें जी कामगिरी बजाविली, तिची योग्यता फार थोर होती. आज इंग्लंडांतील कांहीं लोकांना हिंदुस्थानांतील लोकस्थितीसंबंधानें थोडीबहुत माहिती

---

१. नारायणराव त्यावेळीं मुंबईइलाख्याच्या वतीनें निवडून येण्याइतके प्रसिद्धीस आलेले नव्हते. त्यामुळें त्यांचीच निवड कां झाली हें पुष्कळांस गूढच होतें. एकदां सर वेडरबर्न ह्यांनीं हा विषय मामा परमानंदांपाशीं काढला होता. त्यावेळीं मामांनीं नारायणराव हे विलायतेस प्रतिनिधी म्हणून पाठविण्यास सर्वतोपरी योग्य आहेत असें सांगितलें होतें. ही माहिती मामांच्या दीर्घ सहवासाचा लाभ झालेले श्री. बा. बा. कोरगांवकर ह्यांच्याकडून आम्हांस मिळाली.

झालेली आहे असें म्हणतां येतें. तथापि आजही तेथील सुखवस्तु लोकांच्या हिंदुस्थानासंबंधानें अगदीं विपरीत कल्पना आहेत असें तेथें राहून आलेले पुष्कळ लोक सांगतात. अशी जर आज स्थिति आहे, तर १८८५ सालीं तेथें सर्वसाधारण जनतेस हिंदुस्थानासंबंधानें कांहींच माहिती नसणें ह्यांत कांहीं नवल नाहीं. ती ह्या तिघांनीं करून दिली. ह्या तिघांनीं तेथें जी कामगिरी केली तिच्यासंबंधानें **पालमाल गॅझेटनें** आपल्या ता. ८ डिसेंबर १८८५ अंकांत पुढीलप्रमाणें उल्लेख केला आहे:—

A campaign which it is only the barest justice to say that the representatives of the native educated class have conducted amidst disgraceful insults and slanders, with a dignity and magnanimity which is itself one of the best possible testimonies to the justice of their appeal.

नारायणरावांनीं आपल्याला त्यावेळीं आलेले अनुभव व त्यांवरून सुचलेले विचार इंदुप्रकाशपत्रासाठीं लिहिलेल्या अनेक लेखांत नमूद केले आहेत. ते लेख आतां उपलब्ध नाहींत व ते एकत्र करून त्यावेळीं छापलेलें पुस्तकही आतां दुर्मिळ झाल्यामुळें नारायणरावांस तेथें आलेल्या अनुभवांची कल्पना त्यांच्या चरित्राच्या वाचकांस करून देणें अगत्याचें आहे. परंतु तसें करूं लागण्यापूर्वीं नारायणराव विलायतेस गेले त्यावेळच्या येथील स्थितीसंबंधानें दोन शब्द लिहिणें अवश्य आहे. आज पुष्कळ हिंदी लोकांना इंग्लंड व अमेरिका हे देश घराच्या मागील परसाप्रमाणें झाले आहेत. पण १८८५ सालीं तशी स्थिति नव्हती. त्यावेळीं परदेशगमनास लोकमत अनुकूल झालेलें नव्हतें. आतां तर अगदीं जुन्या वळणाच्या म्हणून गाजलेल्या कुटुंबांतील तरुण पत्नींसह सहज परदेशीं जातात व परत आल्यावर त्यांस समाजाकडून कांहींही त्रास होत नाहीं. दुसरें असें कीं, त्यावेळपर्यंत नारायणरावांच्या सारस्वत ज्ञातींतून कोणीही परदेशीं गेलेलें नव्हतें. त्यांच्या मातापितरांची व कुटुंबाची संमति मिळण्याची मुळींच अपेक्षा नव्हती, म्हणून त्यांच्या जाण्याची बातमी घरांत न कळवितां प्रवासाची सर्व तयारी बाहेरच्याबाहेर करण्यांत आली ! त्यांच्या कुटुंबाला १८८५ सालीं नारायणराव विलायतेस जाणार हें कळविणेंही इष्ट वाटलें नाहीं, पण पुढें जवळजवळ २५ वर्षांनीं म्हणजे १९०८ सालीं त्यांनीं आपल्या ज्येष्ठ पुत्रास अभ्यासासाठीं आपण होऊन विलायतेस पाठविलें, ह्यावरून वरील काळांत सौ. लक्ष्मीबाईच्या विचारांत किती फरक पडला होता त्याची कल्पना होते.

मंगळवार ता. ८ सप्टेंबर १८८५ रोजीं Parramatta बोटीनें ब्रिंडीसीच्या मार्गानें विलायतेस जाण्यासाठीं नारायणराव निघाले. त्यांच्या रोजनिशीवरून

असें कळतें कीं, त्यांच्या जाण्यासंबंधाची तयारी डॉ. गामा ह्यांच्या कुटुंबांत झाली होती. त्या कुटुंबांत नारायणरावांच्या जाण्यासंबंधानें जितकी गडबड होती तितकेंच त्यांच्या स्वतःच्या कुटुंबांत सामसूम होतें ! त्यांच्या कुटुंबांत त्यावेळीं त्यांची मातुश्री, पत्नी, बहीण, व त्यांची लहान मुलगी सुंदराबाई एवढीं माणसें होतीं. सकाळीं बहिणीचा मुलगा उमेश व आपली कन्या ह्यांस त्यांनीं खेळविलें व योग्य वेळीं नित्याप्रमाणें पोशाख करून ते बाहेर पडले. योग्यप्रकारें निरोप न घेतां परदेशीं जाण्यासाठीं घर सोडतांना डोळे पाण्यांनीं भरून आले तर आपले बेत फुकट जाण्याची नारायणरावांस भीति होती ! बाहेर पडल्यावर दादाभाई नवरोजी, डॉ. आत्माराम पांडुरंग, मामा परमानंद ह्यांचे निरोप घेऊन नारायणराव डॉ. गामांच्या येथें गेले. तेथें जाऊन पहातात तों विलायतेस जाण्याची सर्व जय्यत तयारी, जणूं काय डॉ. गामांचा मुलगाच विलायतेस जावयास निघाला आहे ! नारायणरावांचे मामा शामराव ह्यांच्या सल्ल्यानेंच डॉ. गामांच्या येथें सर्व तयारी झाली होती. डॉ. गामांच्या सर्व कुटुंबानें ही जी कळकळ दाखविली ती पाहून नारायणरावांस गहिंवरून आलें. वास्तविक पहातां त्यांस बोटीवर पोंचवावयास गेली होती त्यापेक्षां आणखी पुष्कळ मंडळी गेली असती, परंतु लोकांमध्यें फारशी प्रसिद्धि न होऊं देतां ते गेले त्यामुळें पुष्कळ लोकांस वेळ वगैरे कळला नाहीं. तरीपण, डॉ. गामा, नारायणरावांचे मामा शामराव, घनश्यामपंत नाडकर्णी, माधवराव बर्वे, डॉ. आत्माराम पांडुरंग, वामनराव मोडक, वीरचंद दीपचंद व त्यांचा मुलगा, धरमसी (बाबासाहेब) मोरारजी, नरोत्तम मोरारजी, विष्णुपंत भाटवडेकर, भास्करराव राजवाडे, इ० मंडळी त्यांस बोटीवर पोंचविण्यास गेली होती. शेट मोरारजीचा वृद्ध भय्याही नारायणरावांस पोंचविण्यासाठीं बंदरावर गेला होता.

## बोटीवरील अनुभव

बोटीवर नारायणरावांस निरनिराळ्या प्रकारचे अनुभव आले, पण ते सर्व येथें नमूद करण्याची आवश्यकता नाहीं. मात्र एक दोन मौजा येथें नमूद करण्यासारख्या आहेत. बोटीवर नारायणराव हे एकटेच हिंदी गृहस्थ होते. त्यांचे सहकारी त्यांच्या बरोबर गेले नाहींत. ते इंग्लंडला कां जात आहेत त्याची बातमी युरोपिअन उतारूंमध्यें पसरली असावी. पहिल्या दिवशीं जेवणाच्या वेळीं प्रत्येकानें आपापल्या नांवाच्या चिठ्ठीप्रमाणें खुर्चीवर बसावें अशी सूचना झाली. नारायणराव टेबलापाशीं गेले, तों त्यांच्या नांवाची चिठ्ठीच कोठें दिसेना ! मग अधिकाऱ्यांच्या दृष्टीस ही गोष्ट आणून दिल्यावर जेथें रिकामी जागा होती तेथें ते एकटेच बसले.

पुढें नारायणरावांना ऐकूं जाईल अशा रीतीनें हिंदी राजकारणासंबंधानें बोलणें निघालें. नारायणरावांना तर भाषण ऐकूं जावें, पण त्यांना उद्देशून बोलावयाचें नाहीं अशा थाटानें तें चाललें होतें. नारायणराव सर्व कांहीं ऐकत होते. संभाषणांत भाग घ्यावयाचा नाहीं असा त्यांचा निश्चय होता. भाषण रंगांत आल्यावर एक गृहस्थ म्हणाला, "माझी तर खात्री आहे कीं, नेटिव्ह[2] लोक हिंदुस्थानावर सत्ता चालविण्यास अपात्र आहेत !" हें ऐकून दुसऱ्या एकानें पोक्तपणाचा आव आणून म्हटलें, "अहो, एक सहा महिनेपर्यंत ह्या नेटिव्हांना सर्व हिंदुस्थानचें राज्य चालविण्याची संधि द्यावी आणि मग काय घोटाळा होतो तो पाहावा !" जवळच एक मिशनरी गृहस्थ बसले होते. त्यांनीं वरील उद्गार ऐकून मुक्ताफळें गाळलीं: "तुम्हांला हें माहित नाहीं वाटतें कीं, ह्या राजकीय चळवळी शाळांतलीं मुलें चालवीत असतात !" दादाभाई नवरोजी, काशिनाथपंत तेलंग, फेरोजशहा मेथा, बद्रूद्दिन तय्यबजी हीं शाळांतलीं मुलें, आणि हे मिशनरी स्वदेशीं गेल्यावर हीच माहिती आपल्या देशबांधवांना देऊन हिंदुस्थानच्या लोकस्थितीविषयीं त्यांना कल्पना करून देणार !

## पहिले कटु अनुभव

नारायणराव लंडन येथें ता. २७ सप्टेंबर १८८५ रोजीं सुखरूप पोंचले. त्या दिवशीं रविवार असल्यामुळें लंडन शहरांत जिकडेतिकडे सामसूम दिसत होतें. हॉटेलमध्यें सर्व व्यवस्था लावून नारायणराव मि. मार्टिन वूड ह्यांच्या येथें जाण्यासाठीं निघाले. मि. वूड ह्यांचे घरीं जात असतांना बायकामुलें घाईघाईनें रस्ता चालतांना पाहून थंडीमुळें लवकर चालण्याची आवश्यकता भासते ही गोष्ट त्यांच्या लक्ष्यांत आली. दुसरें, उगाच रस्त्यांत रेंगाळत न बसण्याचीही त्या लोकांची संवय त्यांच्या अनुभवास आली. मि. वूडकडे जातांना नारायणरावांनीं फेटा घातला होता त्यामुळें त्यांच्याकडे सर्वांचें लक्ष लागे व कांहीं लोक तर रस्त्यांत थांबून टेहेळणी करूं लागत. त्याच दिवशीं एका मंदिरांत नारायणराव ईश्वरोपासनेस[3] गेले होते. तेथेंही त्यांना अनुभव तसाच आला. ज्याचें त्याचें अगर जिचें-तिचें त्यांच्या फेट्याकडे लक्ष्य जाई व हा काय नवीन प्रकार म्हणून जो तो

---

२. त्यावेळीं नेटिव्ह हा शब्द Indian ह्या अर्थानें वापरीत व तो एतद्देशियांना कमीपणा वाटणारा मानला जात नसे. नाहींतर मंडलिकांनीं आपल्या पत्राला नेटिव्ह ओपिनिअन हें नांव दिलें नसतें.

३. होतां होईल तों प्रार्थनामंदिरांतील ईश्वरोपासना चुकवावयाची नाहीं असा त्यांचा निश्चय असे.

मोठ्या कुतूहल बुद्धीनें फेट्याचें व तो घातलेल्या माणसाचें निरीक्षण करी! मि. वूड व त्यांच्या कुटुंबाची ओळख करून घेऊन नारायणराव डिग्बी साहेबांकडे गेले. तेथें त्यांच्या कुटुंबाची व मुलांची ओळख झाली. नंतर एके दिवशीं नारायणराव डिग्बी साहेबांच्या ऑफिसांत गेले असतांना तेथें त्यांची व मि. ए. ओ. ह्यूम[४] ह्यांची अचानक भेट झाली. पण ह्यूमसाहेबांनीं नारायणरावांची पूर्ण निराशा केली! हिंदी प्रतिनिधींनीं हिंदुस्थानासंबंधानें लोकमत जागृत करण्यासाठीं विलायतेस जाणें व तिघां प्रतिनिधींनीं डिग्बीसाहेबांच्या साहाय्यानें कामास लागणें ह्या दोन्ही गोष्टी त्यांना पसंत नव्हत्या! मुळांतच मतभेद उत्पन्न झाल्यामुळें पुढें बोलणें चालविणें अवघड गेलें. तरी पण नंतर कांहीं वेळानें ते जरा मोकळ्या मनानें बोलूं लागले. त्यावेळीं त्यांनीं जें कांहीं सांगितलें त्याचें सार असें होतें कीं, हिंदी प्रतिनिधींनीं जी चळवळ करावयाची किंवा हिंदुस्थानासंबंधानें जागृति उत्पन्न करण्यासाठीं जें कांहीं कार्य करावयाचें त्यास प्रारंभच मुळीं पार्लमेंटच्या निवडणुकी झाल्यानंतर करावा. कारण, निवडणुकीच्या पूर्वीचा कडवेपणा, पक्षाभिमान, स्वार्थपरता त्यावेळीं नसेल व लोकांची बाहेरच्या लोकांचीं व्याख्यानें ऐकण्याची तयारी असेल. ग्लॅडस्टन, मॉरले, ब्राइट वगैरे ज्या ज्या पुढाऱ्यांशीं बोलणें झालें त्यांचेही विचार असेच आहेत असें जेव्हां ह्यूमसाहेबांनीं सांगितलें तेव्हां नारायणरावांपुढें निराळाच प्रश्न उभा राहिला! ज्या लोकांच्या सहाय्यावर आपली भिस्त तेच जर ऐनवेळीं असा अवसानघात करूं लागले तर मग कार्यास लागावयाचें कसें व कार्य तरी काय करावयाचें? म्हणून नारायणरावांनीं ह्यूम साहेबांना निक्षून सांगितलें कीं, मि. वूड व मि. डिग्बी ह्यांच्या सहाय्यानें निवडणुकीच्या पूर्वी काम करण्यासाठीं आम्हांला येथें पाठविलें आहे. त्या बाबतींत आतां फेरफार व्हावयाचा नाहीं. हें पाहून ह्यूमसाहेब म्हणाले कीं, मि. ग्लॅडस्टन ह्यांची तुम्ही मुलाखत घ्यावी व त्यांस विनंति करावी कीं, तुम्ही जर निवडून येऊन प्राइम मिनिस्टर झालांत तर लॉर्ड रिपन ह्यांस सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिआ करावें. हें होणें शक्य नव्हतें हें ह्यूमसाहेब जाणून होते. कारण, व्हाइसरॉय झालेल्या इसमास स्टेट सेक्रेटरी करण्याची वहिवाट नाहीं. असो. मि. ह्यूम गेल्यानंतर बराच वेळ विचार करून नारायणराव व मि. घोष ह्यांनीं असें ठरविलें कीं, आपण सर्वांचें म्हणणें शांतपणें ऐकून घ्यावें व फार थोडें बोलावें. त्याच दिवशीं म्हणजे ता. ५ आक्टोबर रोजीं पुढील कार्याची

४. हिंदुस्थानांत असतांना ह्यूमसाहेबांचें नारायणरावांकडे पुष्कळ लक्ष असे व १८८६–८७ सालांत पुन्हां हिंदुस्थानांत आल्यावर मि. ह्यूम ह्यांचा नारायणरावांशीं दृढ परिचय होऊन बराच पत्रव्यवहार झालेला आहे.

दिशा ठरविण्यासाठीं नॅशनल लिबरल क्लबमध्यें पाचारित मंडळीची लहानशी सभा झाली. हिंदुस्थानाच्या कल्याणाची आस्था असणाऱ्या कांहीं मित्रांना मि. डिग्बी ह्यांनीं बोलाविलें होतें. ह्या सभेचें अध्यक्षस्थान मि. ह्यूम ह्यांसच देण्यांत आलें होतें. ह्या सभेंत मि. डिग्बी ह्यांनीं हिंदी प्रतिनिधींनीं तेथें नेलेलें पत्र वाचून दाखविलें व निरनिराळ्या ठिकाणीं सभा भरविण्यासाठीं कमिटीची नेमणूक करून घेतली. साधारणपणें कोणत्या विषयावर बोलावयाचें त्याचा ह्या सभेंत खर्डा ठरला व येथून नारायणरावांच्या कामास प्रारंभ झाला. ह्या सभेंत ह्यूमसाहेबांनीं आपलें खाजगी मत प्रकट करून नारायणरावांच्या कार्यास अडथळा आणण्याचा प्रयत्न केला नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ह्यावरून आपलें स्वतःचें मत बाजूस ठेवून अशा बाबतींत आपल्या मित्रांशीं सहकार्य करावयास ते कसे सिद्ध असत तें सिद्ध होतें.

येथें एका गोष्टीचा उल्लेख करणें अवश्य आहे. ता. ४ आक्टोबर रोजीं मि. वूड नारायणरावांस बरोबर घेऊन मिसेस वेब्स्टर ह्या बाईच्या घरीं गेले. ह्या बाई त्या वर्षीं लंडन स्कूल बोर्डाच्या सभासद होण्यासाठीं पुढें आल्या होत्या व स्कूल बोर्डाकडून होणाऱ्या निवडणुकीसाठीं अनाठायीं खर्चाबद्दल त्यांनीं बराच बोभाटा केला होता. त्याचप्रमाणें पूर्वीं स्त्रिया आपलीं मतें द्यावयास येत नसत. मत देण्याच्या ठिकाणीं आपली दाद लागणें शक्य नाहीं अशी त्यांची कल्पना होती. त्यांच्या सर्व अडचणी लक्षांत घेऊन त्यांना सहज मतें देतां यावीं अशी व्यवस्था मिसेस वेब्स्टर ह्यांनीं करविली. त्यामुळें स्त्रियांना आतां मतें द्यावयास जाण्याचें जीवावर येत नाहीं वगैरे हकीकत त्यांनीं सांगित-ल्यानंतर मि. वूड ह्यांनीं हिंदी प्रतिनिधी, त्यांचा लंडन येथें येण्याचा मुख्य हेतु, त्यांचें कार्य ह्याविषयीं त्यांस माहिती करून दिली. त्यांना हिंदुस्थानाच्या कल्या-णाची कळकळ होतीच. हिंदी प्रतिनिधींना सर्व प्रकारें मदत करण्याचें त्यांनीं आश्वासन दिलें. त्यांनीं सांगितलें कीं, "तुम्ही प्रथम कामगार लोकांच्या क्लबांची सहानुभूती संपादा. त्यांच्या क्लबांच्या विद्यमानें व्याख्यानें द्या. हिंदुस्थानाविषयीं येथील लोकांत अनास्था असल्यामुळें हिंदुस्थानाचें कसें अकल्याण होत आहे हें त्यांच्या लक्षांत आणून द्या. ह्या कामगार लोकांची व त्यांच्या पुढाऱ्यांची हिंदु-स्थानासंबंधानें सहानुभूति आहे असें पार्लमेंटच्या मेंबरांना कळून चुकलें कीं मग ते हिंदुस्थानची खरी स्थिति काय आहे त्याची माहिती मिळवूं लागतील व नंतर त्यांच्यांत हिंदुस्थानाच्या हितासंबंधानें कांहीं आस्था उत्पन्न होईल." ह्या बाईनें ही जी सूचना केली तिचा नारायणरावांस फार उपयोग झाला. कामगार लोकांकडे नारायणरावांचें अधिक लक्ष्य लागलें व त्यांच्यामध्यें हिंदुस्थानाच्या कल्याणा-

संबंधानें जागृति उत्पन्न करण्याचा त्यांनीं कसा प्रयत्न केला व कामगार लोकांच्या बुद्धिमत्तेविषयीं त्यांना जो अनुभव आला त्याच्या अनुरोधानें त्यांनीं आपले विचार कसे प्रदर्शित केले हें पुढील विवेचनावरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल.

## पुढील कामगिरी

हिंदुस्थानाच्या वतीनें इंग्लंडला गेलेले प्रतिनिधी तेथें पार्लमेंटच्या निवडणुकीच्या ऐन धामधुमीच्या वेळींच गेले हें वर आलेंच आहे. त्याच वेळीं त्यांनीं तेथें लोकमत जागृत करावयाचें असा मूळ उद्देश होता. पार्लमेंटच्या निवडणुकीच्या वेळची गडबड म्हणजे निवडणुकीसाठीं उभे राहिलेले उमेदवार, त्यांच्यासाठीं खटपट करणारे त्यांचे मित्र एवढ्यांचीच गडबड नव्हे. आपल्या येथें म्युनिसिपालिटीच्या सभासदांच्या निवडणुकीचा हक्क आतां पुष्कळ लोकांस मिळाला आहे खरा, परंतु सर्व मतदारांमध्यें कांहीं उमेदवारांसंबंधानें आपलेपणा, अगर कांहीं विषयीं तीव्र विरोधाचा भाव उत्पन्न झालेला नसतो. म्हणजे उमेदवार व त्याचा पक्ष ह्याविषयीं जागृत अभिमान अगर तिरस्कार मतदारांत उत्पन्न झालेला असतोच असें नाहीं; निदान १८८५ सालीं तरी अशी स्थिति होती. विलायतेंत तसें नसतें. प्रत्येकाला आपण एक स्वतंत्र व्यक्ति आहों याची जाणीव असते. निवडणुकीच्या धामधुमीच्या वेळीं कुठेंही गेलें तरी कोणत्या पक्षास जय मिळेल, कोणता उमेदवार योग्य आहे, कोणास यश आलें पाहिजे ह्यासंबंधानें गप्पा चाललेल्या असतात. त्याचप्रमाणें मोठमोठ्या दुकानांच्या खिडक्यांत "अमक्या अमक्या लिबरल उमेदवाराला मतें द्या" किंवा "अमुक कॉन्झरव्हेटिव व सनदशीर पद्धतीनें पसंत केलेल्या उमेदवारास मतें द्या" अशा ठळक अक्षरांच्या मोठ्या जाहिराती आढळतात आणि कधीं कधीं लोकांच्या घरांवरही अशा मोठ्या अक्षरांनीं लिहिलेल्या जाहिराती दिसतात. श्रीमंत, गरीब, व्यापारी उदमी, दुकानदार, धर्मोपदेशक, बायका पोरें ह्या निवडणुकीच्या दंगलींत भाग घेत. अर्थात् कांहीं सोंवळे लोकही नारायणरावांना आढळलेच. हे लोक कोठल्या सभेला जात नसत, कोणाशीं वाद घालीत न बसतां आपल्या कामांत नेहमीं दंग असल्याचें दाखवीत व कोणी त्यांच्यापाशीं मतांची याचना करावयास गेलेंच तर अखेरपर्यंत "वचनबद्ध न होण्याचा मीं निश्चय केला असून शेवटल्या दिवशीं मीं एकंदर रूपरंग पाहून मत देणार आहें." असें सांगत. परंतु असल्या लोकांची संख्या फारच थोडी आढळली. नारायणरावांना असा अनुभव आला कीं, सर्व लोक पक्षबद्ध असतात. खेड्यापाड्यांतूनसुद्धां पक्षबद्ध कोणी नाहीं असें सहसा आढळून आलें नाहीं. फार काय सांगावें? पक्षसूचक

रंगाचे कपडे घालून मुलें रस्त्यानें उनाडतांना व आपल्याला इष्ट असणाऱ्या उमेदवाराच्या नांवानें टाळ्यांचा कडकडाट करीत असतांना आढळत ! ह्या निवडणुकीच्या वेळीं सर्व दर्जाचे लोक इतके बेफाम झालेले असतात कीं निवडणुकी संबंधाच्या सभांतून भाषणें केल्यावर, किंवा मोठ्या दंगलींत घुसून स्वतःच्या आवडीच्या उमेदवाराला मतें देऊन आल्यावर जमिनीवर धाडकन् पडून प्राणोत्क्रमण झाल्याचीं उदाहरणें आहेत. कधीं कधीं मतें देऊन आल्यावर हुडहुडीभरून ताप आल्याचीं उदाहरणें लोकांच्या स्मरणांत आहेत. डॉक्टरांनीं ह्या तापाचें ( Election fever ) असें नामकरणहि केलें आहे !

पार्लमेंटच्या निवडणुकीच्या वेळीं इंग्रज लोक वेडे होतात असें जें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. ह्या निवडणुकीच्या धामधुमीची ज्याला कल्पना नाहीं, विरुद्ध पक्षाच्या उमेदवाराची भर सभेंत बदनामी करावयाची, जाणूनबुजून त्याच्यासंबंधानें धडधडीत खोटीं विधानें करावयाचीं ह्याची ज्यांना माहिती नाहीं त्यांना हा सर्व मूर्खांचा बाजार आहे व भांडखोरांचाच देश आहे कीं काय असें क्षणभर वाटल्यावांचून राहणार नाहीं ! एका पक्षांतील मुत्सद्दी म्हणून समजलेले पुढारी विरुद्ध पक्षाच्या मुत्सद्दी पुढाऱ्या विरुद्ध वाटेल तीं विधानें करीत. कॉन्झरव्हेटिव्ह पक्षांच्या सभेंत ग्लॅडस्टन म्हणजे एक अट्टल ढोंगी, अट्टल थापाड्या ( Arch-humbug ) आहे असें सांगितलें जाई ! उलट पक्षीं लिबरल पक्षाच्या सभेंत मि. चेंबरलेन नास्तिक व दुसऱ्याची मालमत्ता लुटणारा ( Plunderer of other people's property ) ठरे ! कॉन्झरव्हेटिव्ह पक्षांतील माणसें लिबरल पक्षांतील माणसांची थट्टा करीत, आणि लिबरल पक्षाचे लोक स्वस्थ बसत नसत. हें चर्चिलची जी बोळवण करीत त्यावरून स्पष्टच होत आहे. पण, ह्याच्याही पलीकडे ते जात. १८८५ सालीं लॉर्ड रॅन्डल्फ चर्चिल हे कॉन्झरव्हेटिव्ह पक्षांतील उगवते पुढारी होते. स्टेट सेक्रेटरी फॉर इंडिआ ह्या हुद्यावर ते होतेच. त्यामुळें कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचे ते लाडके होते. त्यांच्यावर लिबरल पक्षांतील माणसें टीकेचा वर्षाव करीत. लिबरलांच्या एका सभेंत त्यांना सत्यासत्याची क्षिति न बाळगणारा ( A politician with a very elastic conscience ) ठरविलें व कित्येकांनीं अनेक सभांत त्यांना खाल्ल्या घरचे वासे मोजणारा ( Given to stealing their coats ) असें म्हटलेलें नारायणरावांनीं स्वतः ऐकिलें होतें. विशेष माजेची गोष्ट ही कीं, केवळ सभांतूनच हा प्रकार चाले असें नव्हे, तर धर्मोपदेशकांच्या उपदेशपर भाषणांत, नाटक्यांच्या नाटकांतील संवादांत पक्षाभिमान दिसून येई ! एक नाटक पहाण्यास नारायणराव गेले होते त्यावेळीं त्यांना असें आढळून आलें कीं, प्रेक्षकांच्या मताचा

कल पाहून एखादा नट निवडणुकींतील एखाद्या प्रसिद्ध उमेदवाराची रेवडी उडवून लोकांचें रंजन करण्याचा प्रयत्न करी! चेंबरलेनची चेष्टा करण्याचा त्याचा विचार होता, पण त्यांचें नांव घेतांच त्यांची थट्टा रुचणार नाहीं असा रंग दिसतांच, नटानें पगडी फिरविली व उलट पक्षांतील पुढाऱ्याची थट्टा केली! त्याबरोबर टाळ्यांचा कडकडाट झाला! धर्मोपदेशक आपल्या भाषणांत देवाच्या नांवानें चालविलेल्या मंदिरांतील उपासनेंत उपदेशाच्या वेळीं सांगत कीं, लिबरल लोक चर्चिसचा नाश करण्यास निघाले आहेत. अशा रीतीनें ख्रिस्ती चर्चच जर नाहींसें झालें तर आपली काय अवस्था होईल याचा विचार करा; तुम्ही मेल्यानंतर ख्रिस्ती धर्मानुसार तुमचें दफन होणार नाहीं; तुमचीं प्रेतें उकीरड्यावर फेंकून दिलीं जातील व मग गिधाडें येऊन त्यांवर ताव मारतील! मग तुम्हांला स्वर्ग कसा लाभणार! अशा प्रकारें धर्मोपदेशकांनीं तारे तोडल्यामुळें धर्म बुडणार ह्या भीतीनें धर्माच्या रक्षणासाठीं कित्येक लोकांनीं कॉन्झरव्हेटिव्ह पक्ष पत्करला! ह्या बाबतींत लोक किती चिडले होते ह्याचें एक उदाहरण लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. एकदां ग्लॅडस्टन साहेब चालत चालत येऊन एका जुन्या पुस्तकांच्या दुकानांत शिरले, तें कोणी तरी पाहिलें. ताबडतोब Grand old man दुकानांत शिरला आहे म्हणून परततांना त्यांचें दर्शन घेण्यासाठीं दुकानाच्या बाहेर लोकांची खूप गर्दी जमली! ग्लॅडस्टन साहेबांनीं हवें होतें तें पुस्तक तर विकत घेतलेंच, पण ही माणसांची गर्दी शांतपणें आपल्याला चालत घरीं जाऊं देणार नाहीं हें पाहून लोकांना टाळावें कसें ह्या विवंचनेंत असतांना एक व्यापारी आपल्या गाडींत बसून त्याच दुकानांत पुस्तक खरेदी-साठीं आला. ग्लॅडस्टन साहेबांची ही अडचण पाहून त्यानें आपल्या गाडींतून त्यांस त्यांच्या घरीं पोंचविलें! झालें, ही बातमी सर्वत्र पसरली. ती एका चर्चच्या अधिकाऱ्याच्या कानांवर गेली; त्याबरोबर हा सोंवळा ब्राम्हण त्या दुकानदाराच्या दुकानांत गेला व "तुम्ही आपली गाडी ग्लॅडस्टन साहेबांस दिली असें मीं ऐकिलें तें खरें काय" असें विचारता झाला! व्यापाऱ्यानें "होय, अगदीं खरें" असें सांगतांच "बरें तर आजपासून तुमच्या गिऱ्हाइकांच्या यादींतून माझें नांव काढून टाका" असें म्हणत चर्चचा अधिकारी पाय आपटीत निघून गेला. पुढें लिबरलांच्या एका सभेंत एका लिबरल व्याख्यात्यानें ही गोष्ट सांगतांच सर्व लोक एकदम खवळले व नांव सांगा नांव सांगा असा एकच गोंधळ त्यांनीं चालविला व त्याचें नांव सांगितल्यावांचून पुढलें व्याख्यान देऊं देईनात! अखेरीस अगदीं विनयपूर्वक त्यांना असें सांगावें लागलें कीं, "ज्यानें मला ही हकीकत सांगितली त्यास त्या चर्चच्या अधिकाऱ्याचें नांव मी जाहीर करणार नाहीं असें आश्वा-

सन दिलें आहे. शिवाय मी कांहीं टोरी नाहीं! तसा जर मी असतों तर आपल्या वचनाची एवढी दरकार केली नसती! परंतु मी लिबरल पक्षाचा आहें व तुम्हीही लिबरलच आहांत, तेव्हां नांव जाहीर करण्याचा तुम्ही आग्रह धरणार नाहीं अशी मला खात्री आहे." ही मात्रा बरोबर लागू पडली व मग त्या गृहस्थास पुढील भाषणास परवानगी मिळाली! ह्या धामधुमीच्या वेळीं अनेक गोष्टी नारायणरावांच्या लक्ष्यांत आल्या. निरनिराळ्या पक्षांतील माणसें विरुद्ध पक्षांतील माणसांचा भाषणांत जरी वाटेल तसा समाचार घेत व त्यांचेविषयीं शक्य तितकें वाईट मत बनविण्याचा प्रयत्न करीत, तरी त्यांत खासगी द्वेष अगर अप्रेमाचा भाग नसे व सर्व पक्ष देशकल्याणासाठीं मनःपूर्वक झटत. कडवेपणा दिसला तरी तो तेवढ्या पुरताच. चेंबरलेन व चर्चिल ह्यांच्यांत कोण कोणाची अधिक निंदा करितो अशी जरी अहमहमिका जणूं काय लागलेली असे, तरी ते दोघे चांगले मित्र होते! दुसरें, प्रथम प्रयत्नांची शिकस्त करावयाची, पण अपयश आलें तरी हतबल व्हावयाचें नाहीं, रडवें तोंड करून हातपाय गाळून बसावयाचें नाहीं हा इंग्रजांचा फार मोठा गुण एकदम मनांत भरल्यावांचून राहात नाहीं. दोन्ही पक्ष अखेरपर्यंत निराश झालेले नसतात. जरी एका ठिकाणीं आपल्या पक्षाला अपयश आलें, तरी दुसऱ्या ठिकाणीं यश येऊन मागचें नुकसान भरून निघेल असें त्यांस वाटत असतें. आणि दोन्ही पक्षांतील लोक आपल्याच पक्षाच्या उमेदवारास यश हें ठेवलेलें असें धरून चालत असतात. तसेंच, एकदां निवडणुकीसाठीं उभें रहावयाचें असें ठरल्यावर मग आपल्याला कोणाशीं सामना करावयाचा आहे इकडे ते लोक लक्ष देत नाहींत. १८८५ सालीं मि. चेंबरलेन ज्या जागेसाठीं उभे राहिले होते त्याच जागेसाठीं उमेदवार असलेला मनुष्य बरमिंगहॅम येथें लोकांस फारसा माहीतही नव्हता. ग्लॅडस्टन साहेबांशीं हात करावयास कोणी डाल रिंमपल नांवाचा गृहस्थ पुढें आला होता. चर्चिलनें मि. ब्राईटशीं सामना केला होता व चर्चिल स्टेट सेक्रेटरी फॉर इंडिया असतांना स्किनर नांवाचे गृहस्थ त्यांच्याशीं सामना करावयास पुढें आले. कधीं कधीं आपल्याला अपयश येईल याची पूर्ण जाणीव असूनही प्रसिद्ध माणसांस विरोध करण्यांत येतो. नारायणरावांना एका गृहस्थानें सांगितलें कीं मला यश मिळणार नाहीं, हें पूर्णपणें मला माहीत असूनही मी उमेदवार राहिलों आहें. तो म्हणाला, आमच्या भागांत मोठमोठे जमीनदार, घरवाले व श्रीमंत लोक यांचें फार प्रस्थ माजलें आहे. बिचारा कामकरी व शेतकरी वर्ग त्यांच्या जुलमास अगदीं कंटाळून गेला आहे. त्यामुळें ह्या गृहस्थानें कामकरी लोकांची बाजू उचलली व म्हणून बडेलोकांची त्यांचेवर पूर्ण इतराजी झाली. तरी तिकडे पूर्ण दुर्लक्ष्य करून शेवटपर्यंत आपल्याला जणूं काय

यश येणार आहे अशा भावनेनें त्यानें आपलें काम चालविलें व अखेरीस अपेक्षे-प्रमाणें अपयश जरी आलें तरी त्याचा मनावर कांहींही परिणाम झालेला न दाखवितां तो निवडणुकीच्या धामधुमींत सर्वत्र वावरत होता.

ह्या माहितीवरून आम्ही हिंदी लोकांनीं बोध घेण्यासारखा आहे. आम्हांला आपल्या देशाच्या कल्याणाची जर कळकळ असेल तर इंग्रज लोकांप्रमाणें उत्कट भाव आमच्यांत आला पाहिजे. त्याचप्रमाणें जीं तत्त्वें एकदां स्वीकारिलीं त्यांस अनुरूप वर्तन कशाही अडचणी असल्या तरी करावयास आम्हीं शिकलें पाहिजे. अपयश आलें तरी हताश न होतां आम्हीं आमचे प्रयत्न सारखे चालू ठेविले पाहिजेत, म्हणजे अडचणींतून पार पडून आपल्या तत्त्वांचा विजय झाल्याचा आपल्याला अनुभव येईल. तसेंच आपल्याला जें कांहीं योग्य वाटतें तें सर्व जनतेला कळवून, जनतेची खातरी करून तीस आपल्याबरोबर घेण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. ( राजकीय चळवळ चार सुशिक्षित लोकांची चळवळ असें होतां नये. ) स्त्रिया व मुलें ह्यांच्यांतही राजकीय भावना उद्दीपित झाली पाहिजे. पुढाऱ्यांच्या अगर केवळ चळवळ करणाऱ्या लोकांच्या ओंजळीनें पाणी न पितां लोकांना स्वतःला स्वतःसाठीं विचार करण्याची संवय लागली पाहिजे. त्याचप्रमाणें जितक्या बाबतींत दुसऱ्याशीं आपलें पटेल तितक्यापुरतें त्याच्याशीं सहकार्य करावयास शिकलें पाहिजे. आपल्या ठरलेल्या तत्त्वांविषयीं चिकाटी, त्यांचा जागृत देशाभिमान व इच्छित कार्य तडीस नेण्यासाठीं आटोकाट प्रयत्न करण्याची त्यांची तत्परता, त्यासाठीं कितीही खर्च झाला तरी तो करण्याची त्यांची सिद्धता, व आपल्या तत्त्वांचा विजय होण्यासाठीं त्यांची चाललेली खटपट इत्यादि त्यांचे गुण पाहून त्यांच्याविषयीं मनांत आदर उत्पन्न होतो.*

निवडणुकीच्या आठवड्यांतील खळबळ तर कांहीं विचारावयासच नको ! कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचा एकंदरींत फार जोर दिसून येत होता. पार्नेलनें ग्लॅडस्टन-साहेबांच्या पक्षाला नामशेष करण्याचा विडा उचलला होता. मि. चेंबरलेन ह्यांनीं एकदां म्हटल्याप्रमाणें पांच P नीं[५] लिबरल पक्षाचा संपूर्ण पाडाव करण्याचा निश्चय केला होता. तरीसुद्धां लिबरलपक्ष हताश झालेला नव्हता. कॉन्झरव्हेटिव्ह पक्षांत श्रीमान् लोकांचा भरणा अधिक होता. निवडणुकीच्या दिवसांत जर धुकें अधिक फार पडलें, पाऊस पडला, तर लिबरल पक्षाचें नुकसान व्हावयाचें. म्हणजे कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाच्या उमेदवारांस गाड्याघोड्यांचें भरपूर सहाय्य असे. लिबरल

*१८८५ सालीं हे विचार प्रदर्शित केले होते हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे.

५. ( 1 ) Parnelites, (2) Protectionists, (3) Parsons, (4) Priests and ( 5 ) Publicans.

पक्षाला तितकें सहाय्य नसल्यामुळें गरीब मतदार मतें द्यावयास येण्याचा कंटाळा करीत व त्यामुळें मतांचा तुटवडा पडे. ह्याचा प्रत्यक्ष अनुभव घेण्यासाठीं नारायणराव निवडणुकीच्या निरनिराळ्या ठिकाणीं गेले. तेव्हां त्यांस असें आढळून आलें कीं टोरी पक्षाच्या लोकांच्या गाड्या पुष्कळ होत्या, एवढेंच नव्हे तर त्या मोठ्या, सुंदर व दिखाऊ होत्या, तर लिबरल पक्षाचीं मतें देणारांसाठीं उघड्या गाड्या व टांगे यांचा उपयोग केला जात असे. एक दोन ठिकाणीं तर व्यापारी लोकांच्या मालवहातुकीच्या गाड्या व खटारे ह्यांचा उपयोग केलेला आढळला! टोरी पक्षाकडील गाड्यांची रेलचेल, वरील पांच वर्गांत मोडणाऱ्या लोकांची जूट ह्यांमुळें टोरी पक्षाचा विजय होत होता, इतक्यांत ग्लॅडस्टनसाहेबांची निवडणूक चार हजार अधिक मतांनीं झाल्याचें कळतांच लिबरल पक्षांत हुषारी आली! अखेरच्या दिवशीं जिकडे तिकडे फारच गडबड दिसत होती. मोठमोठ्या जाहिराती लावून लोकांचीं मनें आकर्षून घेण्याचा प्रयत्न केला जात होता. वांकडीं तिकडीं चित्रें दाखवून विरुद्ध पक्षाचा पाडाव करण्याचा प्रयत्न होत होता. सर्वांनाच गाड्याघोडे मिळत नसत, पण होतां होईल तों आपलें मत फुकट जाऊं नये असें प्रत्येकाला वाटत असे. त्यामुळें त्यावेळीं नारायणरावांनीं असें पाहिलें कीं, म्हाताऱ्या माणसांना धट्टींकट्टीं माणसें पाठुंगळीस मारून मतें देण्यासाठीं घेऊन येत. एके ठिकाणीं नारायणराव उभे असतांना एका उमेदवारापाशीं एक इसम सांगूं लागला कीं एक मतदार तापानें फार आजारी आहे, पण मत देण्याची त्याची तर फार इच्छा आहे. त्याला गाडींत घालून आणिलें व मग त्यानें आपलें मत दिलें. आंधळे, लुलेपांगळे ह्यांचे हात धरून त्यांस मतें देण्याच्या जागीं आणण्यासाठीं बायका व मुलें पुढें येत व त्यांचा ह्या कामीं पुष्कळच उपयोग होई. अशा रीतीनें संध्याकाळीं आठ वाजेपर्यंत मतें देण्याची धामधुम चालली. त्यावेळीं गर्दी फार होतीच, पण मतें मोजावयाचें काम सुरू झाल्यावर गर्दी अधिकाधिक वाढूं लागते. ह्या प्रचंड जमावांत सर्व प्रकारचे लोक असतात. बायका पुरुष, मुलें तेथें येतात व स्वस्थ बसत नाहींत. कोणी आपल्या पक्षाच्या उमेदवारांच्या नांवानें टाळ्या वाजवितो, त्याबरोबर विरुद्ध पक्षाचे लोक नापसंती दर्शवितात. अशाप्रकारें कांहीं वेळ गेल्यावर मतें मोजावयास लागतेवेळीं बंद केलेले दरवाजे उघडण्यांत येतात, त्याबरोबर जिकडे तिकडे शांतता होते व जो तो आपापल्या पक्षाच्या उमेदवाराचें नांव येण्याच्या अपेक्षेनें वाट पहात रहातो. मतें सांगून विजयी उमेदवाराचें नांव जाहीर करण्यांत आलें कीं टाळ्यांचा प्रचंड कडकडाट होतो, त्याचप्रमाणें तितक्याच जोरानें निषेधदर्शक निरनिराळे आवाज होत असतात. अखेरीस विजयी उमेदवारास भाषण करावयाचा आग्रह होतो. आपण

मोठाच जय मिळविला आहे याची जागृति ठेवून मोठ्या उत्साहानें हा विजयी उमेदवार येऊन भाषण करून जातो. पण ह्यानंतर ज्याच्या वांट्याला अपयश आलें असेल त्यालाही भाषण करण्याचा आग्रह होतो! विशेष गोष्ट ही कीं त्यावेळीं त्याला नाहीं म्हणण्याची सोय नसते! त्याला पुढें येऊन आपल्या पक्षाच्या लोकांचे आभार मानावे लागतात. तो जर अगदीं हताश झाला, अपयश आल्यामुळें निरुत्साह होऊन तोंड वांकडें करून बसला, तर त्याला नामर्द समजण्यांत येतें, हें माहीत असल्यामुळें सर्व निराशा विसरून तो बाहेर येतो व ह्यावेळीं जरी अपयश आलें तरी तुमच्या आश्रयाच्या जोरावर पुढल्या खेपेस यश आल्यावांचून राहाणार नाहीं असें त्यास म्हणावें लागतें!

## कामगार वर्गासंबंधाचे अनुभव

ज्याला इंग्लंडांत कामगार वर्ग अगर मजूर वर्ग म्हणतात त्या वर्गांतील लोकां-संबंधानें नारायणरावांस फार मजेदार अनुभव आले. अगदीं अलीकडे मजूरपक्ष सत्ताधारी होता. पण त्यावेळीं मजूरपक्ष असा स्वतंत्र पक्ष नव्हता. आपल्या इकडे खरें हिंदुस्थान लहान लहान खेडीं मिळून झालेलें आहे असें अलीकडे वारंवार म्हणण्यांत येतें. पंचेचाळीस वर्षांपूर्वी मि. जॉन ब्राइट ह्यांनीं एकदां म्हटलें होतें कीं "The nation dwells in the cottages, राष्ट्राचें खरें स्वरूप झोंपड्यांत राहणाऱ्या लोकांवरूनच लक्षांत येतें." याचा अनुभव नारायणरावांसही आला. ज्यांना तेथें खालच्या वर्गांतील लोक म्हणतात व मजूर वर्गांतील लोक यांच्यांतील एकंदर हुषारी, त्यांची बुद्धि, त्यांचा चाणाक्षपणा, आणि त्यांचा विनोदी स्वभाव यांचा परदेशांतून आलेल्या माणसावर इष्ट परिणाम झाल्यावांचून राहात नाहीं. नारायणराव लंडन येथें गेल्यावर पहिल्याच दिवशीं ह्या मजूर वर्गापैकीं ज्या एकाशीं त्यांना बोलण्याचा प्रसंग आला, तो केंस कापण्याचा धंदा करणारा होता! त्याला एकंदर राजकीय वातावरण, परिस्थिति व पुढारी ह्यांची बरीच माहिती असलेली पाहून नारायण-रावांस फार आश्चर्य वाटलें. एवढेंच केवळ नाहीं तर ग्लॅडस्टन साहेबांच्या मागील कारकीर्दीवर तो जेव्हां टीका करूं लागला, तेव्हां तर नारायणराव अगदींच थक्क झाले! तो स्वतः मतदार आहे अशी प्रथम त्यांनीं खात्री करून घेतली आणि मग त्यास विचारिलें, "बरें, मग आतां तूं कोणत्या पक्षाच्या उमेदवारास आपलें मत देणार हें मीं तुला विचारिलें तर राग नाहीं ना येणार?" "पहा, महाराज, हल्लींच्या कारकीर्दींत (लॉर्ड सॅल्सबरीच्या कारकीर्दींत) चांगलें काम झालें आहे यांत कांहीं संशय नाहीं, पण माझा ओढा म्हाताऱ्या ग्लॅडस्टनकडे आहे हेंही खोटें नाहीं!

तेव्हां मी जरा बुचकळ्यांत पडलों आहें, !" नारायणरावांना दुसरा एक न्हावी भेटला, तो फार बडबड्या होता. त्याला आपण टोरी पक्षाचे आहों याचा फार अभिमान असे व मि. चेंबरलेनची मनसोक्त निंदा करून हें तो दाखवीत असे. परंतु हे लोक किती धोरणी, दूरदर्शी व स्वतः विचार करणारे असतात याची साक्ष तिसऱ्या केंसकर्तनकाराची गांठ पडली तेव्हां पटली. सर जान पील हे लिबरल पक्षातर्फे उमेदवार होते. ज्या भागातर्फे ते उमेदवार होते तेथील त्यांच्या एजंटांस व त्यांच्या पक्षाच्या पुढाऱ्यांस सर जान ह्यांना निवडणुकींत यश येण्याचा कितपत संभव आहे असें विचारतां त्यांनीं फार आशाजनक उत्तर दिलें. नंतर तोच प्रश्न ह्या न्हाव्याला करतांच तो म्हणाला, "सर जान निवडून येतील असें मला कांहीं वाटत नाहीं! कारण, ज्या भागातर्फे ते उमेदवार आहेत तेथें टोरी पक्षाचें वर्चस्व आहे, सर जान ह्यांचा प्रतिस्पर्धी मोठा वजनदार मनुष्य आहे आणि गेलीं सोळा वर्षें ह्या भागातर्फे तो पार्लमेंटचा सभासद असून त्याला मतें देणारांची त्याच्या विरुद्ध कांहीं तक्रार नाहीं. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें सर जान ह्यांस यश येण्याची आशा करणें व्यर्थ आहे." आणि शेवटीं तेंच खरें ठरलें. पण, ह्यावर कदाचित् कोणी असें म्हणण्याचा संभव आहे कीं न्हाव्याची जात सगळीकडे सारखीच! त्यांचा संबंध नानाप्रकारच्या लोकांशीं येतो त्यामुळें त्यांना प्रथम पुष्कळ गोष्टी सहजगत्या कळतात, मग ते जिकडे जातील तिकडे आपली बडबड चालू ठेवितात. परंतु नारायणरावांस एका हॉटेलच्या नोकरासंबंधानें आलेला अनुभवही असाच मासलेवाईक आहे. तिकडल्या वरच्या दर्जाच्या नोकरांनासुद्धां प्रचलित राजकीय चळवळीची चांगली माहिती असते. एके दिवशीं संध्याकाळीं नारायणराव व इतर प्रतिनिधी यांचीं भाषणें झालीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं नारायणरावांनीं आपल्या खिदमतीस असणाऱ्या नोकरास सकाळचीं त्या ठिकाणचीं वृत्तपत्रें आणावयास सांगितलीं. त्यानें मि. मॅक्लीन ह्यांचें **वेस्टर्न मेल** नांवाचें पत्र त्यांच्या हातांत दिलें व म्हणाला, "साहेब, ह्यांत आपल्या कालच्या सभेची हकीकत आहे." आतां वेस्टर्न मेल कॉन्झरवेटिव्ह पक्षाचें पत्र होतें, त्यांत लिबरल पक्षाच्या सभांची हकीकत कशी यावी, अशी नारायणरावांस शंका आली असावी हें जाणून खरोखरच त्यांना आलेल्या शंकेचें, त्यांनीं पृच्छा न करितांच, त्या नोकरानें उत्तर देऊन टाकलें! "पण, महाराज, आपली सभा कांहीं राजकीय स्वरूपाची नव्हती." नारायणराव, "अरे बाबा, तूं म्हणतोस तरी काय? आमची सभा राजकीय स्वरूपाचीच होती, नाहीं कसें?" "तसें नव्हे साहेब, आपली सभा आमच्या इकडल्या एकाद्या पक्षाची नव्हती." "म्हणजे, कोणत्या तरी एका पक्षाची सभा असली तरच ती राजकीय असें समजावयाचें

कीं काय ?" "होय साहेब, Political meeting ह्याचा अर्थ आम्ही असाच समजतों." त्या नोकरानें 'पोलिटिकल' ह्या शब्दाला चिकटविलेला अर्थ प्रथम नारायणरावांस कसासाच वाटला व त्यालाच कदाचित् तो नीट समजला नसेल अशी त्यांनीं आपली समजूत करून घेण्याचा प्रयत्न केला. पण, थोड्या दिवसांनीं हा खुलासा आपोआपच झाला व त्या नोकरानें केलेला अर्थच बरोबर होता असें नारायणरावांस कळून चुकलें. हा संवाद झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं एका सभेचें अध्यक्षस्थान सर चार्लस डिल्क नांवाचे गृहस्थ स्वीकारणार होते. ह्या सभेंत हिंदी प्रतिनिधींचीं भाषणें व्हावयाचीं होतीं. त्यावेळीं कोणकोणत्या संस्थांनीं प्रतिनिधींना येथें पाठविलें होतें याची त्यांनीं चौकशी केली. अमुक अमुक पोलिटिकल संस्थांच्या वतीनें आम्ही आलों आहोंत असें सांगतांच सर चार्लसूनीं ज्या अर्थी ह्या संस्था 'लिबरल' किंवा 'कॉन्झरव्हेटिव्ह' पक्षाच्या नाहींत त्याअर्थी त्यांस 'पोलिटिकल' म्हणतां येत नाहीं असें सांगितलें !

परंतु ज्यांचें वर्णन करितांना स्वतः ग्लॅडस्टन साहेबांनीं ज्यांस (The huge toiling masses of the community) समाजांतील रोजमुऱ्यावर गुजारा करणारा प्रचंड समूह असें म्हटलें आहे व जे निरनिराळ्या कारखान्यांत व गिरण्यांत वगैरे कामें करून पैसा मिळवितात त्यांची बुद्धि व सारासार विचार ह्यांचा नारायणरावांच्या मनावर संस्मरणीय परिणाम झाला. बरमिंगहॅमसारख्या ठिकाणीं सभा झाल्या व त्या ठिकाणीं मजूर लोकांचा पुष्कळसा भरणा असला म्हणजे सभेला येणारा रंग व ज्या ठिकाणीं वरच्या वर्गांतील लोकांचा समूह हजर असतो तेथील उत्साह पाहिला कीं दोहोंतील फरक लक्ष्यांत येतो. वरच्या वर्गांतील लोकांच्या सभांत उत्साह नसतो, अगर त्या सभांत पुढाऱ्यांचीं नांवें निघालीं असतां टाळ्यांचा गजर होत नाहीं, अगर विरुद्ध पक्षाची थट्टा होत नाहीं असा त्याचा अर्थ नव्हे; तर मजूर लोकांचा भरणा असलेल्या सभेला जो रंग येतो तो विशेष असतो एवढें मात्र खरें. बरमिंगहॅम येथें दोन सभांस नारायणराव हजर राहिले. एका सभेंत मि. चेंबरलेन यांचें भाषण झालें व दुसरींत मि. जान ब्राइट हे बोलले. दोन्ही सभांमध्यें मजूर लोकांचाच विशेष भरणा होता. पहिली सभा ग्रँड थिएटरमध्यें भरली होती व तींत अजमासें तीन एक हजार माणसें हजर होतीं व सर्व ठिकाणीं बसण्यास मुळींच जागा नव्हती. मि. चेंबरलेन सभागृहांत येतांच नाटकगृहांतील सर्व लोकांनीं उभें राहून त्यांचा सत्कार केला व एकसारखा कांहीं वेळ टाळ्यांचा कडकडाट चालू होता. हाच प्रकार चेंबरलेन साहेबांच्या भाषणाच्या सुरवातीला झाला. ते नाटकगृहाच्या स्टेजच्या मध्यभागीं उभे राहून बोलूं लागले, तें पसंत न पडून एकजण आवेशानें ओरडला 'जो! जरा पुढें येऊन बोला' (Step a little to the front,

Joe.)[६] भाषण करावयाचें तर त्यांत प्रतिपक्षाकडील उमेदवाराच्या विरुद्ध टीका असलीच पाहिजे. पण ही अशी टीका होत असतांना सभागृहांतील लोक त्यांत मध्येंच भर घालीत! चेंबरलेन ह्यांचें "लॉर्ड रँडाल्फ हा मोठा हुशार, विद्वान, दूरदृष्टीचा व–" इतकें वाक्य होतांच एकानें "Cheek" म्हणजे लबाड असें म्हणून त्यांचें वाक्य पुरें करून टाकलें! चेंबरलेन साहेबांनीं त्या माणसाकडे बोट करून "धीट" (Bold) ह्या शब्दाचा उपयोग जरी केला, तरी त्यांच्या पहाण्याचा व चर्येचा अर्थ असा होता कीं, तूं म्हणतोस तेंच बरोबर आहे, मलाही तेंच सांगावयाचें आहे, पण त्याला धीट ठरवून वेळ भागविणें भाग आहे! दुसरी सभा बर्मिंगहॅमच्या टाऊनहॉलमध्यें झाली. टाऊनहॉलमध्यें चार हजारांहून अधिक लोक हजर होते. मजूरवर्गामध्यें मि. ब्राइटसंबंधानें किती आदर वसत होता त्याची कल्पना नारायणरावांस व त्यांच्या मित्रांस त्यावेळीं झाली. मि. कॉब्डन बरोबर अतिशय परिश्रम घेऊन त्यांची "रोटी" (Bread) स्वस्त मिळण्याची व्यवस्था यशस्वी झाली होती. त्यामुळें अर्धपोटीं राहाण्याची वेळ आली असतां पोटभर भाकर मिळण्याची व्यवस्था ज्यांच्या श्रमामुळें झाली त्यांच्याविषयीं अत्यंत आदर व प्रेम मजूरवर्गांत होतें. वरील दिवशीं ब्राइटसाहेब सभागृहांत येतांच हॉलमधील सर्व माणसें उभीं राहिलीं, टाळ्यांचा प्रचंड कडकडाट त्यांनीं पुष्कळ वेळ सुरू ठेविला व प्रत्यक्ष आपलें भाषण सुरू करणार तों सर्व लोक इतक्या उत्साहानें निवडणुकीवर रचलेलें (इलेक्शन साँग) एक गाणें गाऊं लागले, कीं तसला उत्साह नारायणरावांनीं त्यावेळपर्यंत अनुभविला नव्हता. ब्राइटसाहेब बोलावयास उठले तेव्हां त्यांच्या बरोबर सर्व लोक उठले व पुन्हा एक गाणें सर्वांनीं गाइलें! त्यांचें भाषण प्रथम चांगलें ऐकूं येईना तेव्हां Speak up, Johnny असें म्हणून एका मजुरानें मि. ब्राईट वरील आपला हक्क स्थापित केला. त्यांचें भाषण झाल्यानंतर एका वक्त्यानें त्यांचे आभार मानतांना सांगितलें कीं, मि. ब्राइट हे मानाला हपापलेले नाहींत. एकदां ग्लॅडस्टनसाहेब मुख्य प्रधान असतांना मि. ब्राइट ह्यांचें व कॅबिनेटमधील सभासदांचें मतैक्य होत नसे, म्हणून त्यांनीं आपल्या जागेचा राजीनामा दिला. त्याबरोबर सभागृहांतील एका मजुरानें Honest John असे उद्गार काढून मि. ब्राइट ह्यांची थोरवी आम्ही जाणून आहों असें दाखविलें. मजूरवर्गांतील लोक किती हुषार असतात, त्यांना आपला हितकर्ता कोण हें कसें चांगलें अवगत असतें याचा अनुभव नारायणरावांस आणखी एकदां आला. एकदां मजुरांच्या एका सभेंत कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचा एक उमेदवार भाषण करीत होता. त्या सभेंत

---

६. जोसेफ शब्दाला घरगुती प्रचारांत प्राप्त झालेलें रूप.

सुमारें ८०० माणसें हजर होतीं. ह्या उमेदवाराचें भाषण सर्वांनीं शांतपणें ऐकून घेतलें, सभेंत कांहीं दंगाधोपा अगर गडबड केली नाहीं, त्यावरून सभेच्या चालकांस आपली सभा मोठी यशस्वी झाली व व्याख्यात्यानें सर्वांवर आपल्या मतांची छाप बसविली असें वाटूं लागलें, म्हणून अध्यक्षांनीं आजचे व्याख्याते पार्लमेंटच्या उमेदवारीस ज्यांस लायक वाटत असतील त्यांनीं हात वर करावे असें म्हणतांच आठशेंपैकीं ६५० स्वस्थ बसले व त्यायोगें त्यांनीं आपली नापसंती दाखविली! मजुरांच्या दुसऱ्या एका सभेंत विरुद्ध पक्षाचा एक उमेदवार एक भिकारडा आहे ( A man of no means ) असें स्वतः उमेदवार असणारानें दर्शविलें. त्याबरोबर सर्व मजुरांत खळबळ उडाली व एकजण म्हणाला, "तुम्हांला त्याच्या सांपत्तिक स्थितीशीं काय करावयाचें आहे? तुमची निवडणूक जर झाली तर तुम्ही आपल्या पैशाच्या थैल्या आम्हांमध्यें वांटून टाकणार आहांत काय?" लोक त्यावेळीं इतके चिडले कीं, ते त्यास पुढें एक शब्द बोलूं देईनात. त्यानें पुष्कळ प्रयत्न केले, आपला मुद्दा समजाऊन सांगण्याचा आव आणिला, परंतु लोकांनीं त्याला बोलूं द्यावयाचें नाहीं असा निश्चय केला असल्यामुळें बिचाऱ्यास अखेरीस खालीं बसावें लागलें! चेंबरलेन साहेबांच्या विरुद्ध भाषण करणारे एक गृहस्थ एकदां रंगांत आले व म्हणाले कीं, "सभेंत गोंधळ करण्यासाठीं विरुद्ध पक्षानें कांहीं लोकांना येथें मुद्दाम पाठविलें आहे." हें लोकांना आवडलें नाहीं. कारण खरा प्रकार तसा नव्हता. त्यांनीं इतका गोंधळ केला, भाषण करणाराच्या मार्गांत इतके अडथळे आणिले कीं, अखेरीस सभा एकाएकीं बंद करणें भाग पडलें! मजूरवर्गांत बुद्धि, समयसूचकता व विनोद करण्याचे गुण आहेत हें दर्शविणारा एक प्रसंग नारायणरावांनीं पाहिला. एका गत मनुष्याच्या स्मरणार्थ एक सभा भरली होती. त्याच्या गुणांचें खूप वर्णन झालें, त्याची स्तुति करतां करतां वक्त्यानें त्याला मोझेस किंवा खिस्त शिष्य ह्यांच्या बरोबरीला नेऊन ठेविलें व ह्यांच्या जोडीला बसणारा तो मनुष्य होता असें त्यानें म्हटलें व गुणवर्णन पुन्हां सुरू केलें व आतां आपण ह्याला **कोणती जागा** देणार ( What place, I ask you gentlemen, are we to give him? ) अशी त्यानें पृच्छा केली, व तो फार थोर होता असें दाखविलें; पण त्याच्या चर्पटपंजरीला लोक कंटाळले होते, त्यांतून प्रत्येक पांच मिनिटांनीं 'कोणती जागा देणार' ह्या त्याच्या प्रश्नाचा लोकांना वीट आला होता. शांतपणें हा भाषणाचा जुलूम बराच वेळ सहन केल्यावर एक मजूर उभा राहिला व म्हणाला "महाराज, त्याबद्दल आपल्याला एवढी चिंता कशाला लागून राहिली आहे? ही पहा माझ्याच शेजारीं जागा रिकामी पडली आहे, तेवढी त्याला देऊन, आमची मुक्तता करा ना!" हें ऐकून सर्व लोकांत हंसा पिकला, भाषण

करणारा मध्येंच अशा प्रकारचा अडथळा आलेला पाहून अगदींच गोंधळून गेला व मटकन् जागच्या जागीं बसून गेला !

अशाप्रकारें आपल्या बुद्धीची, ज्ञानलालसेची, समयसूचकतेची साक्ष मजूर वर्ग पटवून देत असतां त्यांना अडाणी, रानटी, स्वतः विचार न करणारे, पुढाऱ्यांच्या मागें मेंढरांप्रमाणें जाणारे असे कांहीं लब्धप्रतिष्ठित लोक म्हणत असत. परंतु नारायणरावांना ह्या लोकांसंबंधाचा अनुभव तसा आला नाहीं. एखाद्या माणसाच्या थोरपणाची जाणीव ह्या मजूर वर्गांत मोडणाऱ्या लोकांना झाली म्हणजे त्यांच्या मनाची उदारता कशी दिसून येते त्याचें एक जुनें उदाहरण नारायणरावांनीं सांगितलें आहे. १८६५ सालीं पार्लमेंटसाठीं मिल उमेदवार राहिला. त्यावेळीं त्याच्या विरुद्ध पक्षानें तो नास्तिक आहे, धर्माची त्याला कांहीं जरूरच वाटत नाहीं, व मजूर लोक खोटे बोलणारे आहेत असें तो म्हणतो असें म्हणून त्याच्या विरुद्ध लोकमत तयार करण्याचा प्रयत्न चालू केला. त्यांच्यातर्फे होणाऱ्या एका सभेमध्यें एका मजुरानें तुम्ही आमच्या संबंधानें असें कधीं म्हटलें होतें काय असा प्रत्यक्षच प्रश्न विचारिला! मि. मिल ह्यांनीं अगदीं निर्भीडपणें सांगितलें कीं, होय, मीं तसें एकदां म्हटलें होतें! ह्याचा परिणाम काय झाला ? मिलची लोकांनीं हुर्यो उडवली काय ? त्यांचा अनादर करून त्यांना मतें द्यावयाचीं नाहींत असें ठरविलें काय ? नाहीं. मिलच्या त्या स्पष्टोक्तीचा लोकांच्या मनावर इतका इष्ट परिणाम झाला कीं, त्यांनीं आपलीं मतें मिललाच देण्याचें ठरविलें व विरुद्ध पक्षाच्या उमेदवारापेक्षां किती तरी अधिक मतें मिळून मिलचा विजय झाला[७] ! लोकांना त्यावेळीं असें वाटलें कीं, हा सच्चा मनुष्य आहे, आपल्याला जें खरें वाटतें तें बोलून दाखवावयास न भिणारा हा मनुष्य आहे, त्याचेवर सर्वस्वी विश्वास टाकावयास कांहीं हरकत नाहीं. म्हणून वरील उत्तर मिळतांच सर्वांनीं टाळ्यांचा मोठा गजर केला. अशा लोकांना आडमुठे असें कसें म्हणावें ? ब्राइटसाहेबासंबंधीं एक सभा झाल्यानंतर मजुरांनीं हिंदी प्रतिनिधींभोंवतीं गराडा घातला व त्यांच्यावर हिंदुस्थानासंबंधाच्याच प्रश्नांचा वर्षाव केला ! विशेषतः हिंदुस्थानांतील नुकत्याच स्थापन झालेल्या म्युनिसिपल राज्यपद्धतीसंबंधानें त्यांनीं

---

७. The boldness and frankness of the reply struck home to the manhood of the working men who listened to him. Here they saw a leader who would never shrink from telling them the truth. They greeted his answer with vehement applause and Mr. Mill was returned to Parliament by a majority of some hundreds over the Conservative candidate.

— *Mr. Justin Mc Carthy.*

जे प्रश्न केले व प्रतिनिधींचीं उत्तरें ऐकून त्यांची जी समजूत पटल्याचा अनुभव आला त्याचेवरून त्यांच्या बुद्धिमत्तेची साक्ष नारायणरावांस चांगली पटली. एकानें येऊन नारायणरावांस सांगितलें कीं, तुमच्या भाषणांतील दोन गोष्टी आपल्याला आवडल्या नाहींत. तुम्ही ब्रिटिश राज्यसत्तेपासून जे कांहीं फायदे झाले त्यांचीं फार स्तुतिस्तोत्रें गाईलीं व भाषण करते वेळीं आम्हांस उद्देशून बोलतांना तुम्ही Our rulers असें म्हणालांत, त्याऐवजीं Our fellow subjects असें म्हणावयास हवें होतें. हे त्याचे विचार सवानाच पसंत पडले नाहींत हा भाग निराळा. मि. ब्रॉडहर्स्ट नांवाचे एक मजूर गृहस्थ मजुरांच्या वतीनें पार्लमेंटचे सभासद होते. त्यांचें वक्तृत्व, त्यांची बुद्धिमत्ता, त्यांची आपल्या विषयाची माहिती, त्याची मांडणी करण्याची पद्धत, वगैरे पाहून नारायणरावांस त्या गृहस्थाविषयीं फार आदर वाटला. स्वतः मजूरवर्गापैकीं असून ह्या गृहस्थास अशा प्रकारें विषयाची तयारी करितां येते हीच गोष्ट त्याच्या बुद्धिमत्तेची, ज्ञानार्जनाच्या आवडीची, व व्यवस्थितपणाची साक्ष पटवावयास पुरेशी होती. त्याचप्रमाणें जॉन ब्राइट क्लबच्या एका सभेंत एका मजुराचें इजिप्तच्या मनोऱ्यांसंबंधानें भाषण झालें. त्याचें भाषण माहितीनें इतकें भरलेलें व बारीकसारीक गोष्टींचा त्यानें इतका सोपपत्तिक विचार केलेला दिसला कीं, इजिप्त येथें कांहीं काळ राहून त्यानें सर्व माहिती मिळवून मोठ्या व्यवस्थितपणें आपलें भाषण लिहून काढलें असावें असें नारायणरावांस वाटलें. परंतु अधिक चौकशी करतां कळलें कीं हें सर्व पुस्तकी ज्ञान होतें! त्यानें इजिप्त मुळीं पाहिलेंही नव्हतें; पण, त्या विषयावरील अनेक ग्रंथ वाचून त्यानें आपल्या विषयांत पारंगतता मिळविली होती. सारांश, ज्या देशांत अशी वस्तुस्थिति आहे, मजूर लोक जेथें असे हजरजबाबी, हुषार, जिज्ञासु, खुल्या दिलाचे, उद्योगी व बुद्धिमान् आहेत तेथें त्यांस इंग्लिश समाजाचे आधारस्तंभ म्हटलें तर त्यांत आश्चर्याचें तें काय आहे? मजूर लोक अशा रीतीनें पुढें येत आहेत, असें पाहून व पुढें त्यांचेंच वजन वाढणार हें लक्षांत घेऊन कांहीं लोक मजूर वर्गाचे प्रतिनिधि असें लटकेच आपणच आपणास म्हणवून घेऊं लागले होते. एक गृहस्थ हिंदुस्थानांत असतांनाच उच्चवर्ण, नीचवर्ण, उच्च जाती व नीच जाती असा भेदाभेद करण्यांत प्रसिद्ध होता. पण, विलायतेंत गेल्यावर आपण होऊनच आपल्याला मजूर वर्गाचा प्रतिनिधि म्हणवून घेऊं लागला व खिशांत कांहीं पैसा नसतांना जगांत जाऊन वर आल्याचें सांगूं लागला! दुसरा एक गृहस्थ सभांतून लोकांस सांगूं लागला कीं मनमोहन घोष हे उच्चवर्णीय हिंदु आहेत, तेव्हां त्यांस हिंदुस्थानांतील गोरगरिबांचे पुढारी असें कांहीं म्हणतां यावयाचें नाहीं! शेवटीं मनमोहन बाबूंस असें जाहीर करावें लागलें कीं

आपल्याला हें सांगावयास मला अभिमान वाटतो कीं, माझे पूर्वज गवळ्याचा म्हणजे दूध विकणारांचा धंदा करीत होते ! ”

नारायणराव ज्या बोटीनें विलायतेस गेले त्याच बोटींत एक युरोपिअन गृहस्थ होता. हिंदी प्रतिनिधी ऐन निवडणुकीच्या धामधुमींत तेथें हिंदुस्थानासंबंधानें जागृति उत्पन्न करावयास जात आहेत असें जेव्हां त्याला कळलें त्यावेळीं “लंडन येथील बदमाष लोक व सडकीं अंडीं ह्यांच्यापासून तुम्ही आपला बचाव करावयास शिका” ह्या त्या गृहस्थानें दिलेल्या सूचनेचा त्यांस त्यावेळीं चांगलासा अर्थ समजला नव्हता, परंतु तिकडला अनुभव जसजसा येत गेला तसतसें वरील सूचनेचें महत्त्व त्यांस कळून चुकलें.[८] आतांपर्यंतच्या वर्णनावरून एकदां राजकीय दोन पक्षांचा संबंध सभेमध्यें आला म्हणजे तेथें टाळ्या, छी, छी, मधूनमधून गाणें, कांहीं निवडक वाक्यें ह्यांचा कसा वर्षाव होतो ह्याची कांहींशी कल्पना झालीच आहे. परंतु ह्यापेक्षां अधिक दांडगाई राजकीय सभांतून होते. मारामाऱ्या होणें, बाकें खुर्च्या मोडणें, व्याख्यात्यांनीं माराच्या भीतीनें जीव घेऊन निसटून जाणें इ० गोष्टींचीं वर्णनें नारायणरावांच्या वाचनांत येत. गोशेन नामक गृहस्थाला एडिंबरो येथील एका सभेंत भाषण करावयाचें होतें. परंतु विरुद्ध पक्षानें सगळें सभागृह जणूं ताब्यांत घेतल्यामुळें त्याला लोकांच्या नजरेसही न पडतां भलत्याच रस्त्यानें जावें लागलें ! दंगेखोर लोकांची ज्या रस्त्यानें तो जाईल अशी अपेक्षा होती, त्याच रस्त्यानें तो गेला असता तर त्याचा पुरताच समाचार त्या लोकांनीं घेतला असता ! एकदां मि. मॅक्लीन साहेबांना असाच अनुभव आला होता आणि सर रिचर्ड टेंपल ह्यांच्या सर्व सभांचा बोजवारा झाला व एकदां तर निरनिराळे प्रश्न विचारणारांनीं त्यांना इतकें भंडावून सोडलें कीं त्यामुळें ते एकदम चिडले व मी आतां तुमच्या एकाही प्रश्नाला उत्तर देणार नाहीं असें त्यांनीं सांगितलें !

मँचेस्टर येथें हिंदी प्रतिनिधींचीं भाषणें ज्या दिवशीं व्हावयाचीं ठरलीं होतीं, त्याच्या एक दिवस आधीं प्रतिनिधी त्या ठिकाणीं गेले. त्या दिवशीं एका आयरिश् गृहस्थांच्या निवडणुकीसंबंधानें सभा व्हावयाची होती. हा गृहस्थ सर जेम्स फर्ग्युसन ह्यांस विरोध करीत होता व त्याच्या वर मँचेस्टर येथील सर्व आयरिश् लोकांचा राग होता. तो आपल्याला नॅशनलिस्ट म्हणवून घेत नसे व त्यानें पार्नेलची

---

८. लॉर्ड सॅल्बरी संबंधाच्या एका सभेंत मुद्दाम अडथळे करण्यासाठीं भल्या मोठ्या छत्र्या घेऊन कांहीं लोक आले होते व त्या छत्र्या उघडून त्यांवर लिहिलेले शब्द लोकांच्या ध्यानांत आणून सभेंत गोंधळ उडवीत होते. हें पाहून त्यांच्यावर सडक्या अंड्यांचा व मेलेल्या मांजरांचा वर्षाव झाला हें नारायणरावांनीं स्वतःच पाहिलें !

बाजू न धरितां तो स्वतंत्रपणें वागत होता म्हणूनच सर्व आयरिश् लोक त्याचे कट्टे शत्रू बनले होते. ह्या निवडणुकीच्या धामधुमींत हें वैर इतकें विकोपास गेलें होतें कीं, त्या गृहस्थाच्या व त्याच्या पत्नीच्या जिवासही केव्हां अपाय होईल याचा नियम नव्हता. वरील दिवशीं नारायणराव सभागृहीं गेले. गर्दी मनस्वी होती. अगदीं पुढें आयरिश् गृहस्थाच्या तर्फेचीं कांहीं माणसें होतीं. सभागृहांत आयरिश् लोकांचाच विशेष भरणा होता. सभोंवतालीं पोलिसच्या शिपायांचा गराडा होता. त्यावरूनच पुढल्या गडबडीची कल्पना होत होती. अध्यक्ष, व्याख्याते व हिंदी प्रतिनिधी आंत येतांच थोड्याशा टाळ्या पडल्या व नंतर तिरस्कारदर्शक आरोळ्या सुरू झाल्या. 'देशद्रोही' 'पळपुट्या' 'देश बुडवा' अशा आरोळ्या ऐकूं आल्या व एकानें 'तुला मी गोळी घालून मारणार,' 'तुझे दिवस भरले' अशा वाक्यांनीं त्याचा सत्कार केला! अध्यक्ष बोलावयास उठतांच गोंधळ वाढला व तो आयरिश् गृहस्थ बोलावयास उठतांच लोकांनीं सभागृह डोक्यावर घेतलें! त्याला बोलावयास द्यावयाचें नाहीं असा लोकांनीं निश्चय केला होता. कोणी त्याला शिव्या देऊं लागले, कोणी ठोसे देण्यास तयार असल्याचें सांगूं लागले, कोणी म्हणावयास लागले कीं गडबड करणारास बाहेर घालवा. हा वेळपर्यंत पोलिस स्वस्थपणें सर्व मौज पहात होते, परंतु आतां स्वस्थ बसल्यास सभास्थानीं रक्तपात होईल असें पाहून ते आंत शिरले, कांहीं माणसांना लाथाबुक्क्या मारून त्यांनीं घालवून दिलें, पण एक आयरिश् माणूस कोणास दाद देईना; त्यानें खूप मार खाल्ला, तो रक्तबंबाळ झाला, दहा-पंधरा मिनिटें पोलिसांशीं तो झगडला, अखेरीस त्याला ताब्यांत घेऊन प्लॅटफॉर्मवर नेऊन बसविलें व नंतर भाषणें झालीं. शेवटीं प्रो. मन्रो, व्याख्याते, त्यांची पत्नी, दुसऱ्या कांहीं स्त्रिया व हिंदी पाहुणे ह्यांच्यासाठीं एक बस आणावी लागली. हीं सर्व माणसें रस्त्यांतून चालत जाणें शक्य नव्हतें, त्यांस चोप मिळाला असता; बसवर कित्येक पोलिसचे शिपाई बसले व अशा थाटानें बंद गाडींत बसून ही मंडळी बाहेर पडली व अमुक अमुक रस्त्यानें गाडी नेऊं नको, असें गाडीवाल्यास बजावूनही त्याच रस्त्यानें तो गाडी नेऊं लागला! ही मंडळी इकडे आंत सभेसंबंधानें व एकंदर निवडणुकीसंबंधानें गप्पा मारूं लागली, तों धाडकन् गाडीचें एक चाक मोडलें, वरचे पोलिस रस्त्यावर आले, आंतल्या माणसांना बाहेर उड्या मारून निसटून जावेंसें वाटूं लागलें, पण आंतल्या पोलिसांनीं तसें करूं दिलें नाहीं. त्यावेळीं गाडीबाहेर पडल्यास आपल्या भोंवतीं खवळलेल्या लोकांचा गराडा जमेल व त्यांचेकडून चोप खावा लागेल असें वाटूं लागलें. अखेरीस पोलिसांनीं कांहीं मंडळीला धरलें त्यामुळें जमलेल्या तमासगिरांचें कांहीं चाललें नाहीं. नंतर दुसरी गाडी मागवून सर्वांस त्यांच्या बिऱ्हाडीं पोंचविण्यांत आलें.

दुसऱ्या एका अशाच सभेच्या वेळीं हिंदी प्रतिनिधींचा अपमान करण्यासाठीं कांहीं बदमाष लोकांना सभागृहीं पाठविण्यांत आलें होतें. सर लुइ पेली ह्यांनीं हिंदी प्रतिनिधींसंबंधानें कांहीं निंदाव्यंजक उद्गार काढले होते. त्यांस ह्या सभेंत उत्तर द्यावयाचें होतें. हें जाणून सभेंत बखेडा उत्पन्न करण्यासाठीं गुंडांची आगाऊ व्यवस्था करण्यांत आली होती. त्यांनीं सभेमध्यें "हिंदी प्रतिनिधी आहेत तरी कोण" "त्यांना इकडे पाठविलें कोणी" असा ओरडा चालविला. त्यांच्याकडे दुर्लक्ष करून सभेचें काम चालूं द्या असें हिंदी प्रतिनिधी म्हणूं लागले, सभेस हजर असलेले गृहस्थ ह्या गुंडांना बाहेर घालवा, बाहेर घालवा, असा गिल्ला करूं लागले. इतक्यांत एका गृहस्थानें उठून कळकळीनें सांगितलें कीं, "हिंदी प्रतिनिधी हे आपुले पाहुणे आहेत, त्यांस सन्मानपूर्वक वागविणें हा आपला धर्म आहे. त्यांचा अनादर झालेला आम्हांस सहन व्हावयाचा नाहीं. करितां गुंडांना बाहेर घालविलें पाहिजे." ह्या वाक्यांचा सर्वांवर इष्ट परिणाम झाला, विशेष दंगल करणाऱ्या इसमाला आपल्या जवळ अध्यक्षांनीं आणून बसविलें, त्यामुळें त्याचें तोंड बंद झालें. नंतर मि. मनमोहन घोष ह्यांनीं जोरदार भाषण करून हिंदी प्रतिनिधीं-विरुद्ध झालेल्या टीकेस सरळ व खात्री पटविणारीं उत्तरें दिलीं. मि. मुदलियार ह्यांनीं सर लुई पेलीच्या टीकेचा शांतपणें समाचार घेतला. नंतर नारायणरावांचें भाषण झालें. सभा एका चर्चमध्यें भरली होती. नारायणरावांनीं समोरील भिंती-वरील "Glory to God in the highest, peace on Earth, and Good-will unto men" हें वाक्य लक्ष्यपूर्वक पाहिलें होतें. तेव्हां भाषणास सुरवात करितांना वरील वाक्याचा गंभीरपणें उच्चार करून म्हटलें कीं "आज आपण आपल्या कार्याकरितां देवाच्या मंदिरांत जमलों आहों हें ध्यानांत वागविलें पाहिजे. जे कोणी सभेमध्यें विघ्नें उपस्थित करावयास आले आहेत, त्यांनीं हें वाक्य लक्ष्यांत ठेवून ख्रिस्ती माणसास शोभेल असेंच वर्तन ठेविलें पाहिजे." ह्या वाक्याचा श्रोतृजनावर तात्काळ परिणाम झाला व संमतिदर्शक टाळ्यांचा गजर करून सभागृहांत शांतता पसरली. नंतर नारायणरावांनीं सांगितलें कीं, सर लुइ पेली ह्यांनीं आम्हां हिंदी प्रति-निधींवर अन्यायमूलक कडक व असत्य टीका केली आहे, व त्यांच्याचप्रमाणें त्यांच्या भाषणावर तशाच प्रकारची टीका आम्हांलाही जरी करतां येण्यासारखी आहे, तरी सभ्यतेचा व सरळ मार्ग सोडून टीका करण्याची आमची इच्छा नाहीं; 'आम्ही इंग्लिश जंटलमेन' जरी नसलों, तरी "जंटलमेन" आहों व आम्हांला इंग्रजी शिक्षणाचा लाभ झाला आहे, त्यायोगें आम्हांस हें कळून चुकलें आहे कीं आपल्या विरोधकास जरी उत्तर द्यावयाचें असलें तरी तें देतांना आपण सभ्य गृहस्थ आहों याची जाणीव ठेविली पाहिजे. ह्या उद्गारांचा अत्यंत इष्ट असा परिणाम

झाला. विरुद्ध पक्षास उत्तर देण्याची नारायणरावांची रीत जमलेल्या लोकांस फार पसंत पडली.[१]

दुसऱ्या एका प्रसंगीं चेंबरलेन साहेबांच्या वतीनें सभा भरली होती. त्यावेळीं जमलेल्या लोकांस नारायणरावांनीं सांगितलें कीं, बर्मिंगहॅमजवळच्या एका भागांतून कॉन्झरव्हेटिव पक्षातर्फे उमेदवार म्हणून पुढें आलेल्या एका गृहस्थानें अशी बातमी पसरून दिली आहे कीं, लॉर्ड रिपन ह्यांची बदनामी करणारी जी एकंदर कारकीर्द हिंदुस्थानांत झाली तिचेवर सारवण खालण्यासाठीं (किंवा तिचे डाग धुवून टाकण्यासाठीं) लॉर्ड रिपन ह्यांच्याच सांगण्यावरून हिंदी प्रतिनिधींना येथें आणिलें आहे." हे शब्द ऐकतांच अतिशय गडबड उडाली व जिकडून तिकडून "शेम शेम" ह्या शब्दांचा आवाज येऊं लागला. नारायणराव आपलें भाषण पुढें रेटूं लागले, तेव्हां लोकांमधून ध्वनि निघाला "त्या माणसाचें नांव सांगा, नांवा सांगा," "छे छे मला नांव सांगतां येत नाहीं" "नाहीं नाहीं, तुम्हीं नांव सांगितलें पाहिजे" "मला क्षमा करा" "तें कांहीं नाहीं, नांव सांगा, पुढें भाषण नको, आधीं नांव पाहिजे" नारायणरावांपुढें मोठा बिकट प्रश्न आला! तेव्हां त्यांनीं धिटाईनें सांगितलें "हें पहा, त्या माणसाचें नांव सांगण्यास मी भीत नाहीं. पण तो एक अप्रसिद्ध इसम आहे. त्याचें नांव तुम्हांला कळलें कीं, त्याच्या नांवाला प्रसिद्धि मिळेल आणि त्या माणसाला भलत्याच वेळीं नसतें महत्त्व येईल. म्हणून मी त्याचें नांव जाहीर करीत नाहीं व व तुम्ही आग्रह करूं नये अशी माझी विनंति आहे." हें ऐकून ते शांत झाले, टाळ्यांचा मोठा गजर झाला, मोठा हंशा पिकला व नारायणरावांचें भाषण नंतर सर्वांनीं शांतपणें ऐकून घेतलें.

एके दिवशीं ग्रीनस्टेड येथील लिबरल पक्षाच्या सभेस जाण्यासाठीं नारायणराव निघाले. त्यावेळीं आजच्या सभेंत गोंधळ माजणार आहे व एकंदर सभा अव्यवस्थित होणार आहे असें आगगाडींत त्यांना कळलें. त्याचें कारण असें होतें कीं, ग्रीनस्टेड येथें कान्झरव्हेटिव्ह पक्षातर्फे भरलेल्या सभेंत लिबरल पक्षाच्या लोकांनीं गुण पाघळले होते. त्यामुळें लिबरलांच्या सभेंत जशास तसेंचा

---

१. नारायणराव म्हणतात:—

I can hardly give an adequate description of the enthusiastic manner in which the audience recieved this. They seemed to appreciate the spirit in which we were inclined to notice the attacks against our mission. —*English Impressions.*

प्रकार व्हावयाचा होता. ही सभा नाटकगृहांत मि. हील्ड नामक लिबरल उमेदवाराच्या तर्फे भरली होती. तें सर्व नाटकगृह माणसांनीं चिकार भरून गेलें होतें व बाहेर प्रचंड समूह जमलेला होता. म्हणून बाहेरच्या लोकांस स्वस्थ करण्यासाठीं बाहेर एक सभा ( overflow ) भरवावी व तेथें नारायणरावांनीं भाषण करावें असें ठरलें. त्यासाठीं मागच्या बाजूच्या दरवाजानें बाहेर पडून त्यांनीं बाहेर तिष्ठत असलेल्या लोकांपुढें व्याख्यान देऊन त्यांस शांत केलें व आल्या मार्गानें परत जावयासाठीं मागें गेले तों तें दार बंद! पुढल्या दरवाज्याच्या तोंडाशीं गुंडांचा भरणा, मार बसावयाची भीति; तथापि आंत गेलेंच पाहिजे हें जाणून एका मित्रासह नारायणराव मुख्य दरवाजांतून आंत जाऊं लागले. सुदैवानें त्या दिवशीं त्यांनीं फेटा बांधलेला नव्हता. नखशिखांत साहेबी पोषाखांत ते होते. व्याख्यान ऐकावयास आलेले एक गृहस्थ असें वाटून न ओळखतां त्यांस आंत जावयास मिळालें. अर्ध्या रस्त्यावर आल्यावर त्यांच्या तोंडावर प्रकाश पडतांच कोणी तरी त्यांस ओळखलें, टाळ्यांचा गजर केला, Welcome शब्दानें त्यांचें स्वागत केलें! ते भाषण करूं लागतांच दरवाजावरील गुंडांस दंगा करण्याची बुद्धि झाली, त्यांची चूक त्यांच्या लक्षांत आली, कित्येकांनीं हिसहिसाट केला, परंतु लोकांना नारायणरावांचें भाषण ऐकावयाचें होतें, त्यांनीं उत्तेजनपर टाळ्या वाजवून, त्यांच्याकडे तुम्ही लक्ष देऊं नका, चालूं द्या असें म्हटलें व नंतर भाषण शांतपणें पार पडलें.

इंग्लंडांत क्लब्स ही एक फार लोकप्रिय व वजनदार संस्था गणिली जाते. नारायणराव विलायतेस ऐन निवडणुकीच्या धामधुमीच्या वेळीं गेले, व त्यावेळीं एका भाषणांत खुद्द ग्लॅडस्टन साहेबांनीं क्लबसमध्यें जाणाऱ्या लोकांसंबंधानें त्वेष येण्यासारखे उद्गार काढले होते. तेथें निरनिराळीं राजकीय मतें असणारांचे निरनिराळे क्लब्स आहेत. व त्या त्या पक्षांत ह्या क्लब्समधील लोकांचा बराच वरचष्मा असतो. एकाच मताचीं माणसें येथें जमतात, एकाच पक्षाच्या आकांक्षांचा येथें विचार होतो; परस्परांत दळणवळण अधिक वाढतें, अनेक सार्वजनिक विषयांचा आपल्या पक्षाच्या दृष्टीनें येथें विचार होतो. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें ग्लॅडस्टन साहेबांनीं क्लब म्हणजे आळशी उडाणटप्पू लोकांचें कुटाळकी करण्याचें ठिकाण होय असें जेव्हां म्हटलें ( The clubs were the rendezuous of idlers ) तेव्हां लोकांचीं मनें बरींच बिथरलीं होतीं. कारण त्यांच्याविषयीं ग्लॅडस्टन साहेबांचे उद्गार अगदीं चुकीचे होते. लंडन येथें रहाणारांस ह्या क्लबांपासून पुष्कळ लाभ होतो. ज्यांना स्वतःचें घरदार नसतें, त्यांना अशा क्लबमध्यें रहातां येतें व विशिष्ट राजकीय मतें असणाऱ्यांच्या क्लबांच्या द्वारें त्यांच्या मतांचा प्रसार व्हावयास सहाय्य होतें, असा

नारायणरावांस अनुभव आला.[१०] त्याच प्रमाणें त्यावेळीं लंडन येथें केवळ पुरुषांचे व केवळ स्त्रियांचे निरनिराळे क्लब्स होते. ॲलेक्झांड्रा व सामरव्हील क्लब हे केवळ स्त्रियांचे क्लब होते. व्हिक्टोरिया राणीसाहेबांच्या मेजवान्यांस हजर राहण्याचा मान असणाऱ्या स्त्रियांसच अलेक्झांड्रा क्लबच्या सभासद होतां येत असे. सामरव्हील क्लबचें तसें नव्हतें. त्याच्याविषयीं माहिती व अनुभव पुढें देण्यांत येईल. ज्याप्रमाणें राजकीयपक्ष दर्शविणारे क्लब असतात, त्याचप्रमाणें कोणत्याही पक्षास न चिकट-णारेही क्लब असतात. येथें सर्व पक्षांच्या लोकांना सभासद होतां येतें. पालमाल, सॅलिसबरी, सवाइल हे अशा प्रकारचे क्लब होत; तसेंच अथीनिअन, ॲरंडेल, आरट्स इ. क्लब विद्वानांचे, कलाभिज्ञांचे म्हणून समजले जातात. १८८५ सालीं एक अविवाहितांचा क्लब (Bachelors' club) असल्याचें नारायणरावांस आढळलें. एखाद्या सभासदाचा विवाह झाल्यानंतर त्यास कांहीं अटींवर येथें रहातां येत असे. कॉबडन व ब्राइट ह्यांच्या नांवानें जे क्लब्स स्थापन झाले आहेत त्यांचा फायदा त्यावेळीं विशेषत: मजूर लोक व त्यांचे पुढारी घेत. कॉबडन क्लबचा एक मोठा हॉल असून तेथें नानाप्रकारच्या विषयांवर वाद होत असत. लंडन येथें त्यावेळीं एक प्रवाशांचा क्लब होता! लंडनहून एका लाइनीनें ज्यांनीं पांचशें मैलांचा तरी प्रवास केला असेल त्यांसच ह्या क्लबाचें सभासद होतां येत असे!

परंतु लंडन शहरांत निरनिराळ्या राजकीय पक्षांच्या लोकांचे जे क्लब्स आहेत ते फार महत्त्वाचे समजले जातात. त्यांचें लोकांवर चांगलें वजन असतें. आपा-पल्या पक्षापुढें जे वादग्रस्त प्रश्न असतील त्यांचा येथें खल होतो, आस्थेनें विचारविनिमय होतो, व ह्या ठिकाणीं आपापल्या सिद्धान्तांचें दृढीकरण होतें. १८८५ सालीं लिबरल पक्षाचे तीन क्लब होते, (१) नॅशनल लिबरल, (२) डेव्हनशायर व (३) रिफार्म क्लब. कान्झरव्हेटिव्ह पक्षाचेही तीन क्लब असत. (१) कार्लटन, (२) कॉन्स्टिट्यूशनल व (३) सेंट स्टीफन क्लब. रिफार्म व कार्लटन हे पालमालमध्यें जवळजवळच असत. रिफार्म क्लबमध्यें लिबरल पार्टीचीं बडींबडीं धेंडें आलेलीं दिसत. परंतु नॅशनल लिबरल हा क्लब लोकप्रिय होता व ह्याचें वजनही दिवसेंदिवस लोकांत वाढत होतें. लिबरल पक्षाचीं पुष्कळशीं माणसें येथेंच संध्याकाळीं जमत. नारायणराव तेथें असतांना मि. विल्यम् डिग्बी हे ह्या क्लबचे सेक्रेटरी होते. त्यावेळीं क्लबचे सभासद पांच हजार असून

१०. They ( the Clubs ) form as it were the Londoners' Home and as of them as are political are the chief organs through which public opinion of the metropolis vents itself.

—*English Impressions.*

रोज ह्या संख्येंत भर पडत होती. त्यावेळची क्लबची इमारत अपुरी पडत होती म्हणून एक मोठी इमारत बांधण्याचें काम चालू होतें. ह्याशिवाय नार्थब्रूक क्लब, मँचेस्टर रिफार्म क्लब, न्यूकॅसल लिबरल क्लब वगैरे क्लब्स निरनिराळ्या ठिकाणीं होतेच. ह्या क्लबांतील सर्व व्यवस्था नांवाजण्यासारखी असते, त्यामुळें कांहीं विशेष गोष्ट करावयाची असली तर ती सर्वानुमतें ताबडतोब करण्यांत येते. दोन गोष्टी नारायणरावांनीं मुद्दाम नमूद केल्या आहेत. मँचेस्टर येथें हिंदी प्रतिनिधी जाणार असें कळतांच मँचेस्टर रिफार्म क्लबचे अध्यक्ष घाईघाईनें क्लबमध्यें सकाळींच गेले व ' सजेशन बुक'मध्यें हिंदी प्रतिनिधींच्या सन्मानार्थ एक खाना करावा व ज्यांस यावयाची इच्छा असेल त्यांनीं अमुक वर्गणी भरावी अशी सूचना केली. झालें; थोड्याच अवधींत शंभरावर सह्या झाल्या व भोजनसमारंभ जुळवून आणावयास कांहींही त्रास पडला नाहीं. दुसरी गोष्ट. निवडणुकीच्या धामधुमीच्या वेळीं असें आढळून आलें कीं, धाकदपटशा व धमक्या देऊन लिबरल पक्षांतील कांहीं अज्ञान व गरीब मतदारांस आपल्याकडे वळविण्याचा प्रयत्न विरुद्ध पक्षाकडून झाला. एके दिवशीं संध्याकाळीं या विषयाची चर्चा झाली, तिसऱ्या दिवशीं सकाळीं मतदार-संरक्षक फंड ( Voters Protection Fund ) स्थापन होऊन कित्येकांनीं आपली वर्गणी भरून काम सुरू झाल्याचें जाहीर झालेंही ! म्हणजे मतदारांस होणारा त्रास दोन दिवसांपूर्वी लक्ष्यांत आला व निवारणाच्या उपायाची योजना नक्की ठरून एक दिवसांतच ती अमलांतही येऊन गेली !

परंतु ह्या क्लबांच्या कामगिरीचें खरें स्वरूप निवडणुकीच्या धामधुमीच्या दिवसांतच उत्तम प्रकारें दिसून येतें. नारायणराव लंडन येथें नॅशनल लिबरल क्लब-मध्येंच रहात असत. त्यामुळें निवडणुकीच्या दिवसांत रात्रंदिवस क्लब कसा फुललेला असे व तेथें कशी धामधूम चालत असे ह्याचा त्यांस प्रत्यक्ष अनुभव आला. पहिल्या दिवशीं कांहीं विशेष गडबड दिसली नाहीं. त्या दिवशीं बिनभानगडीची निवडणूक होती. म्हणजे जितक्या जागा तितकेच उमेदवार असल्यामुळें त्यांच्या निवडणुकींत कांहींच भानगड नव्हती. दुसऱ्या दिवशीं पुष्कळशा रोजच्या निवडणुकीचे निकाल लागावयाचे होते. प्रेस अॅसोशिएशनमुळें क्लबनें अशी व्यवस्था केली होती कीं जसजसे निकाल लागतील तसतशी निकालाची बातमी क्लबमध्यें यावी. त्यामुळें निकाल ऐकण्यासाठीं तरुण वृद्ध अशीं शेंकडों माणसें क्लबमध्यें मोठ्या आतुरतेनें येऊन बसत. लोक गप्पागोष्टी मारीत, हंसतखिदळत, सोडावाटरचे व ब्रँडीचे डोझ मारीत बसत, पण सर्व लक्ष विद्युत्संदेशाकडे असावयाचें. कर्मधर्मसंयोग असा कीं, दुसऱ्या दिवशीं पुष्कळसे निकाल लिबरल पार्टीच्या विरुद्ध लागत होते ! त्यामुळें जिकडे तिकडे औदासिन्य पसरलें होतें. वृद्ध माणसें एकमेकांच्या तोंडाकडे पहात

सोब्याचे घोट घशाखालीं उतरवीत होते, पण तरुण पिढींतले लोक स्वस्थ बसत नसत. लिबरल पक्षाचा पराजय झाला असें कळतांच Down with Parsons and Priests अशी ओरड ते करीत. धर्मोपदेशक व निरनिराळ्या चर्चचे अधिकारी हे आपलें वजन खर्च करून लिबरलांच्या विरुद्ध लोकमत तयार करीत होते त्यामुळें जिकडेतिकडे त्या दिवशीं कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचा विजय होत होता.

तिसऱ्या दिवशीं मि. ब्राइट ह्यांच्या निवडणुकीचा निकाल व्हावयाचा होता. ब्राइट साहेबांचे प्रतिस्पर्धी लार्ड रँडाल्फ चर्चिल हे होते हें वर आलेंच आहे. तशांतून ते त्यावेळीं सत्ताधारी होते म्हणजे स्टेट सेक्रेटरी फॉर इन्डिया होते. त्यामुळें हा निकाल ऐकण्यासाठीं रोजच्यापेक्षां अधिक गर्दी झाली होती व लोकांमध्यें आतुरताही पुष्कळच दिसून येत होती. अखेरीस एकदांचा तारेंतून संदेश आला, व त्यांतही ब्राइट साहेबांचें नांव प्रथम व चर्चिल साहेबांचें त्यांच्या-मागून असें आलें! अर्थात् ब्राइट साहेबांचा विजय झाला असें झालें, पण तो किती मतांनीं तें कळेना. आंकडे स्पष्ट उठले नव्हते, त्यामुळें लोकांमध्यें अधिकच अस्वस्थता पसरली. जो तो जिकडेतिकडे धांवत सुटला; कोणी रिफार्मक्लबकडे पळत सुटले, कोणी ग्रँड होटेलकडे गेले, हेतु हा कीं, ब्राइटसाहेब निवडून आले खरे, पण किती मतांनीं चर्चिल साहेबांचा पराजय झाला हें आतां कळावयास पाहिजे होतें! सातशें मतांनीं ब्राइट साहेबांचा विजय झाला असें कळतांच जिकडेतिकडे स्वस्थता झाली. चवथ्या रात्रीं जिकडेतिकडे फार उत्साह दिसत होता. लिबरल पक्षाच्या पुष्कळ सभासदांस ह्या दिवशीं जय मिळाला होता व ग्लॅडस्टन साहे-बांना चार हजार अधिक मतें मिळालीं होतीं. त्यांचा जय झाल्यामुळें सर्वत्र अत्यंत उत्साह व आनंदीआनंद दिसून येत होता. ह्या दिवशीं राजकीय विषयांची चर्चा होऊन भाषणें वगैरे झालीं.

सामरव्हील क्लब हा केवळ स्त्रियांचा क्लब असल्याचें वर आलेंच आहे. ह्याची स्थापना १८८० सालीं झाली. १८८५ सालीं ह्या क्लबच्या ८०० स्त्रिया सभासद होत्या. येथें महिन्यांतून एकदां व्याख्यान होतें, त्यावेळीं सभासदांना आपल्याबरोबर पुरुष नेतां येतात. व्याख्यान देण्यासाठीं पुरुषांसही विनंति करण्यांत येते. येथें व्याख्यानां-नंतर वादविवादही होतो. परंतु कोणत्याही धर्मपर विषयावर व्याख्यान अगर वाद येथें होत नाहीं. ह्या क्लबच्या विद्यमानें नारायणरावांचें एक व्याख्यान झालें. व्याख्यानाचा विषय आगाऊ ठरलेला नव्हता, त्यामुळें हिंदुस्थानांतील सामाजिक सुधारणा अशा विषयावर नारायणरावांनीं व्याख्यान दिलें व त्यांत बंगाल व मुंबई येथील विधवाविवाहाच्या चळवळीचा इतिहास, मुंबईतील त्याच्या पूर्वीची परमहंस-सभा, स्टूडंट्स लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी, ब्राह्म व प्रार्थनासमाज वगैरे

संस्थांची माहिती व त्यांच्याद्वारें होणारें काम ह्यांविषयीं त्यांनीं वर्णन केलें. त्यानंतर विचारलेल्या प्रश्नांस आपण उत्तरें द्याल काय असें अध्यक्षबाईनीं विचारतांच नारायणरावांनीं ती विनंति मान्य केली. त्यावेळीं नारायणरावांस विचारलेल्या प्रश्नांचें स्वरूप साधारणपणें पुढील प्रमाणें होतें. ( १ ) तुमच्यांत साधारणपणें मुलींचीं लग्नें केव्हां होतात ? ( २ ) हिंदुस्थानांत स्त्रियांना गुलामाप्रमाणें वागवितात असें म्हणतात, तें खरें काय ? ( ३ ) हिंदुस्थानांत विधवांची कशी काय व्यवस्था आहे ? ( ४ ) हिंदी स्त्रियांना व्याख्यानांस व सभांमध्यें हजर राहतां येतें काय ? ह्या प्रश्नांवरून नारायणरावांना असें स्पष्ट आढळून आलें कीं, सामाजिक सुधारणेसंबंधानें हिंदी वर्तमानपत्रांत जी चर्चा होत असे ती चर्चा अर्धवट कानीं पडल्यामुळें हे प्रश्न त्यांना सुचले असावे. हिंदी स्त्रियांच्या उन्नतीसंबंधानें त्यांना कळकळ वाटत होती; परंतु त्यांची माहिती तुटपुंजी असे त्यामुळें त्यांनीं वरीलसारखे प्रश्न विचारिले. ह्याच वेळीं Times of India पत्रांत A Hindu lady अशा सहीनें कांहीं पत्रें आलीं होतीं. त्यांचा सारांश वाचून एका बाईनें पृच्छा केली कीं, अशा प्रकारचे इंग्रजी लेख लिहिणाऱ्या स्त्रिया हिंदुस्थानांत आणखी पुष्कळ आहेत काय ? हे लेख हिंदु विवाहित स्त्रियासंबंधाचे होते, व त्यांत रखमाबाईच्या खटल्याचें वर्णनही आलें होतें. त्या लेखांवरून रखमाबाईच्या खटल्यासंबंधानें लंडन येथें बरीच सहानुभूति उत्पन्न झालेली होती. हिंदुस्थानांत रखमाबाईसंबंधानें कोठें कोठें सहानुभूति जरी दाखविली जात असे, तरी सर्व प्रांतांतून त्यांच्यावर कडक टीका झाली होती. टाइम्समधील लेख स्वतः रखमाबाईनींच लिहिले होते हें नारायणरावांस मागाहून कळलें.

## पुढाऱ्यांच्या भेटी व संभाषणें

नारायणरावांनीं ह्यावेळीं कांहीं व्याख्यानें देणें, कांहीं सभांस हजर राहाणें, कांहीं व्याख्यानें ऐकणें इतकींच कामें केलीं असें नाहीं. त्यांनीं त्यावेळच्या कित्येक पुढाऱ्यांच्या भेटी घेतल्या व त्यावेळीं काय काय झालें त्याचा वृत्तांत त्यांनीं लिहून काढला व प्रसिद्धही केला. आज ह्या मुलाखतींच्या महत्त्वाचें मापन सहज करितां येण्यासारखें नाहीं. तें करावयाचें तर त्या काळच्या परिस्थितीचा विचार केला पाहिजे. म्हणजे नारायणरावांनीं मुलाखती लिहून काढण्याच्या योगें किती महत्त्वाची कामगिरी केली ह्याची कल्पना होण्यासारखी आहे. हिंदुस्थानच्या हितासंबंधानें इंग्लंडांतील लोकांमध्यें जागृति करावी, हिंदुस्थानच्या लोकांच्या कल्याणाची जबाबदारी आपल्यावर आहे ह्याची जाणीव त्या लोकांत उत्पन्न करावी ह्या हेतूनें बंगाल, मुंबई व मद्रास प्रांतांच्या वतीनें प्रतिनिधी गेले होते. त्यावेळीं

हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी लॉर्ड रँडडॉल्फ चर्चिल हे होते. हिंदुस्थानांत येऊन त्यांनीं हिंदुस्थानची सफरही केलेली होती. त्यामुळें आपल्याला हिंदुस्थानचें प्रत्यक्ष ज्ञान आहे असा त्यांना अभिमान होता. मि. चेंबरलेन व मि. ब्राइट हे लिबरल पक्षाचे पुढारी म्हणून प्रसिद्ध होते व हिंदुस्थानच्या कल्याणाविषयीं त्यांची जागरूकता सर्वांस माहित होती. असें असतां ह्यांच्यासारख्या प्रमुख गृहस्थांचा परिचय करून न घेतां जर ते परत आले असते तर तें योग्य झालें नसतें व त्यांच्यावर तशी टीकाही झाली असती. त्यांनीं ह्या मुलाखती घेतल्या, त्यांची हकीकत प्रसिद्ध केली व कांहीं पुढाऱ्यांविषयीं आपलें झालेलें मत त्यांनीं प्रसिद्ध केलें म्हणूनही एका विशेष चळवळीच्या वेळीं त्यांची एका पत्रानें थट्टा केली! असो. नारायणरावांना इंग्लंडांत जे अनुभव आले त्यांची योग्य कल्पना व्हावयास कांहीं मुलाखतींची त्रोटक हकीकत वाचकांपुढें ठेवणें अगत्याचें आहे.

नारायणराव विलायतेंत असतांना नाना प्रकारच्या लोकांशीं त्यांचा संबंध आला. तथापि कांहीं लोकांशीं झालेल्या त्यांच्या सहवासाचा त्यांच्या मनावर जो परिणाम झाला तो त्यांस लाभदायक वाटला. सर्वांविषयींचे अनुभव आले ते त्यांनीं नमूद केले नाहींत. कारण ते कंटाळवाणे झाले असते. नारायणराव लंडन येथें असतांना सतत अडीच महिने त्यांस मि. वुइल्यम डिग्बी यांचा सहवास झाला. डिग्बी साहेब त्यावेळच्या हिंदी लोकांच्या चांगले परिचयाचे होते. त्यांनीं हिंदुस्थानांत असतांना १८७६–७७ च्या दुष्काळाच्या वेळीं दक्षिण प्रांतीं स्वार्थत्यागपूर्वक जनसेवा बजाविली होती. हिंदुस्थानाच्या खऱ्या कल्याणाविषयीं त्यांस अत्यंत आस्था होती, व हिंदी लोकांच्या योग्य आकांक्षांविषयीं त्यांस सहानुभूति होती. त्यामुळें त्यांचा सहवास नारायणरावांस लाभदायक झाला. डिग्बी साहेबांची हिंदी लोकांच्या कल्याणाविषयीं आस्था सर्वांस माहीत झाल्यामुळें त्यांचे विचार क्रांतिकारक आहेत असें वाटून कित्येक नाजूक प्रकृतीचे लोक त्यांच्यापासून दूरदूर रहात. परंतु डिग्बी साहेब धीराचे गृहस्थ होते. आंत एक, व बाहेरचें अगदीं निराळें असा त्यांचा प्रकार नसून, मनास जें पटलें, विवेकास जें मान्य झालें, तें लोकांपुढें ठेवून त्याचा पुरस्कार करायास ते कचरत नसत. नारायणराव विलायतेस असतांना डिग्बी साहेब नॅशनल लिबरल क्लबचे चिटणीस होते. नारायणराव दोन अडीच महिने ह्या क्लबमध्येंच राहिल्यामुळें त्यांचा व डिग्बीसाहेबांचा दाट परिचय झाला. नैतिक व धार्मिक विषयांवर डिग्बी साहेबांचे निश्चित विचार असून त्यांच्या एकंदर आचरणांत नैतिक व धार्मिक वळणाकडे विशेष लक्ष आढळतांच नारायणरावांस ते अधिक प्रिय झाले. ह्याचें कारण 'समानशीलव्यसनेषु सख्यम्' हेंच होय. ज्यांचें आचरण नीतिबद्ध व धर्मशील असतें त्यांनीं कोणतेंही कार्य हातीं घेतलें तरी त्यावर ते आपली छाप

पाडतात हा नारायणरावांचा सिद्धान्त डिग्बीसाहेबांच्या आचरणाकडे पाहून त्यांस पुन्हां पटला. डिग्बीसाहेब मोठे धैर्यवान होते. त्यांनीं स्वतः १८७६-७७ सालच्या दुष्काळाचा हिंदुस्थानांत अनुभव घेतलेला असल्यामुळें त्यांनीं निवडणुकीच्या पूर्वी लॉर्ड जार्ज हॅमिल्टन ह्यांच्याशीं कडाक्याचा वाद चालविला होता. डिग्बीसाहेबांचें असें म्हणणें होतें कीं, हिंदुस्थानचें कल्याण व्हावयाचें असलें तर तें त्यावेळच्या लिबरल पक्षाकडूनच होणें शक्य होतें. सर जॉर्ज बर्डवुड ह्या वादांत पडले होते. त्यांचें म्हणणें असें पडलें कीं, हिंदुस्थाननें लिबरल पक्षावर अवलंबून राहूं नये. आणि जर विश्वासच ठेवावयाचा तर तो दोन्ही पक्षांवर सारख्याच प्रमाणानें ठेवावा. डिग्बीसाहेब स्वतः लिबरल, हिंदुस्थानच्या कल्याणाची त्यांना अतिशय कळकळ, हिंदी लोकांच्या हिताची जबाबदारी आपल्यावर आहे ही त्यांच्याठिकाणीं जाणीव झालेली पाहून नारायणरावांनीं ते हिंदुस्थानचे खरेखरे हितसाधक आहेत अशी खूणगांठ बांधून ठेविली.

नारायणराव विलायतेस हिंदुस्थानासंबंधानें विलायतच्या लोकांत जागृति उत्पन्न करावयास जरी गेले होते तरी तेथील कर्त्या व्यक्तींपैकीं दीनांच्या कैवाऱ्यांच्या चारित्र्याकडे त्यांचें विशेष लक्ष असे. डॉ. स्पेन्स वाट्सन् नांवाचे गृहस्थ अशा वृत्तीचे असल्याचा त्यांना अनुभव आला. प्रत्येक ब्रिटिश माणसानें हिंदुस्थानच्या कल्याणासाठीं झटलें पाहिजे असें त्यांचें म्हणणें असे, व कोणत्याही पक्षास न मिळतां गोरगरिबांच्या कल्याणासाठीं झटणें हें त्यांस आवडत असे व त्याप्रमाणें त्यांचें स्वतःचें वर्तन असे. फ्रँको–जर्मन लढाई चालू असतांना शेतकऱ्यांस सहाय्य करण्यास सोसायटी ऑफ फ्रेन्डस ह्या संस्थेनें त्यांना पाठविलें होतें. त्यांची सर्व सत्कार्यास आनंदानें सहाय्य करण्याची प्रवृत्ति, त्यांचें शील व आनंदी वृत्ति पाहून नारायणरावांचें मन फार प्रसन्न झालें. डॉ. वाट्सन् हे स्वतः बॅरिस्टर, पण आपला धंदा सोडून दीनांच्या सहाय्यास ते धांवून जात हें पाहून नारायणरावांचें मन त्यांच्याकडे वेधलें. विलायतेंत असतांना दोन वेळां नारायणरावांनीं फ्लॉरेन्स नाइटिंगेल ह्या बाईची भेट घेतली. ह्या बाई त्यावेळींही जरी अगदीं वृद्ध झाल्या होत्या, फारशा घराबाहेर पडत नसत, एवढेंच नव्हे, तर घरीं त्यांनीं बहुतेक बिछानाच धरिला होता, तरी बाई निरुद्योगी नसत. वर्तमानपत्रांसाठीं लेख लिहावयाचे, किंवा पुस्तकांचें परीक्षण करावयाचें हा त्यांचा क्रम नित्य चालू असे. दीन, अनाथ; पंगू ह्यांच्याकडे त्यांचें नेहमींच विशेष लक्ष असे, त्यांच्या कल्याणासंबंधानें त्यांचा नित्य विचार चालू असे. नारायणराव त्यांच्या भेटीस गेले त्यावेळीं हिंदुस्थानांतील खालच्या वर्गांतील लोक, त्यांची उन्नति, त्यांची स्थिति ह्याविषयींच त्यांचें बोलणें निघालें. हिंदुस्थानांतील गरीब लोकां-

विषयीं माहिती करून घेण्यास त्या अति उत्सुक दिसल्या. शेतकरी व कामकरीवर्गा-संबंधानें नारायणरावांनीं त्यांना माहिती वगैरे सांगितल्यावर मिस् नाइटिंगेल ह्यांनीं पुढीलप्रमाणें प्रश्न विचारून आपली आस्था व्यक्त केली. "त्यांची राहाणी कशी असते?" "त्यांना कोणत्या प्रकारचें शिक्षण मिळतें?" "त्यांचा पोषाख कसा असतो?" "त्यांना निदान लिहितां वाचतां तरी येतें काय?" याचप्रमाणें हिंदुस्थानच्या वतीनें विलायतेस प्रतिनिधि पाठवून त्यांनीं तेथील लोकांना जागें करावयाचें ही कल्पना फ्लॉरेन्स नाइटिंगेल ह्यांस फार पसंत पडली. "तुम्ही येथें येऊन आमच्या कानींकपाळीं ओरड केल्यावांचून आम्ही हिंदुस्थानाच्या कल्याणासंबंधानें विचार करावयास लागणार नाहीं."[११] १८८५ सालच्या निवड-णुकींत हिंदुस्थानासंबंधीं थोडीबहुत आस्था असणारांच्या वांट्यास पराजय आला होता ह्याबद्दलही त्यांनीं अत्यंत खेद प्रदर्शित केला व हा पराजय पाहून हिंदी लोकांनीं निराश होतां नये असें त्यांनीं निक्षून सांगितलें व म्हणाल्या, "हल्लीं एकंदरींत वेळ आणीबाणीचाच आहे. आयरिश स्वातंत्र्याचा एकच प्रश्न घेतला तरी त्याच्यायोगें देशांत अस्वस्थता उत्पन्न झालेली आढळून येईल. अशा वेळीं निवडणुकी हिंदुस्थानाच्या दृष्टीनें अत्यंत निराशाजनक झाल्या ह्यांत मला स्वतःला कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. परंतु तुम्ही मात्र निराश होऊं नका. तुमचे प्रयत्न चालू ठेवा, अंतीं सर्व कांहीं ठीक होईल." ( Work on and it will be all right. ) दुसऱ्या खेपेस ह्या बाईस नारायणराव जेव्हां भेटावयास गेले तेव्हां हिंदी लोकांस उद्देशून तिनें हा संदेश दिला. स्वतः मिस् नाइटिंगेल ह्यांनीं दीनांच्या कल्याणासाठीं, संकटांत सांपडलेल्यांच्या सहाय्यासाठीं, व पीडितांच्या समाधाना-साठीं जो स्वार्थत्याग केला आहे तो लक्ष्यांत घेतला म्हणजे बाईचा संदेश कर्त्या माणसांनीं ध्यानांत ठेवण्यासारखा आहे असें वाटल्यावांचून राहणार नाहीं.

नारायणराव विलायतेस गेल्यानंतर हिंदी प्रतिनिधींसंबंधानें लंडन येथील कित्येक वृत्तपत्रांत कांहीं माहिती प्रसिद्ध झाली. कोणी असें उठविलें कीं हे गृहस्थ लिबरल पक्षाच्या वतीनें निवडणुकीच्या बाबतींत खटपट करण्यासाठीं आले आहेत. कोणी तर असें जाहीर केलें कीं, लॉर्ड रिपन ह्यांच्या कारकीर्दीवर सफेती चढवि-ण्यासाठीं ह्या त्रिकुटाला पाठविलें आहे. अशा बातम्या ऐकून मि. ब्लंट ह्यांनीं हिंदी प्रतिनिधींसंबंधानें विश्वसनीय माहिती मिळविण्यासाठीं पत्र लिहिलें. त्यांनीं तें पत्रच ह्या तिघांच्या स्वाधीन केलें व तें पत्रच घेऊन मि. मुदलिआर व नारायणराव ब्लंट साहेबांच्या भेटीस गेले. दि. ब. रघुनाथराव व मि. ब्लंट ह्यांची ओळख

---

११. "We English people will not learn to take interest in India unless you seriously press Indian questions on our attention."

होती व त्यांचें पत्र घेऊन मि. मुदलिआर आलेही होते. मि. ब्लंट ह्यांना नारायण-रावांनीं आपला येण्याचा हेतु सांगितला व कोणत्याही पक्षापासून आपण दूर राह-ण्याचा प्रयत्न करूं असें त्यांनीं सांगितलें हें ऐकून ब्लंटसाहेबांनीं सांगितलें कीं, लॉर्ड रिपन ह्यांनीं हिंदुस्थानाच्या कल्याणासाठीं जें जें कांहीं केलें आहे तें सर्व मला मान्य आहे. परंतु माझा असा पूर्ण विश्वास आहे कीं, लॉर्ड रिपन ह्यांच्या हातून ह्या ज्या गोष्टी झाल्या आहेत त्या ते लिबरल आहेत म्हणून नव्हे, तर ते लॉर्ड रिपन आहेत म्हणून! म्हणजे लॉर्डसाहेब स्वतः इतके सज्जन आहेत कीं, त्यांनीं कोणताही राजकीय पक्ष स्वीकारिला तरी त्यांच्या आचरणाची दिशा बद-लणें नाहीं. परंतु लिबरल पक्षावर भिस्त ठेवून हिंदुस्थानाचें कल्याण व्हावयाचें नाहीं. लिबरल पक्षांतील पुष्कळ लोकांना आय. सी. एस्. ही परीक्षा येथेंच व्हावी असें वाटत आहे. कारण त्यांच्यापैकीं पुष्कळांचा व्यापाराच्या निमित्तानें हिंदुस्थानाशीं संबंध आलेला आहे. कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाची गोष्ट ह्यापेक्षां निराळी आहे. आणि सिव्हिल सर्विसच्या बाबतींत जर कांहीं सुधारणा होणें शक्य असेल, तर ती कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाकडूनच शक्य आहे असा आपला विश्वास असल्याचें मि. ब्लंट ह्यांनीं सांगितलें. कोणत्याही पक्षाशीं एकजीव न होण्याचें आश्वासन दिल्यामुळें लिबरल पक्षाच्या एका सभेंत मि. ब्लंट ह्यांनीं भाग घेतला; हिंदी प्रतिनिधींस उद्देशून स्तुतिपर भाषण केलें व लंडन टाइम्स पत्रांतही हिंदी प्रतिनिधींसंबंधानें मि. ब्लंट साहेबांनीं लिहून पाठविलेला मजकूर प्रमुख ठिकाणीं प्रसिद्ध होत असे. त्यामुळें हिंदी प्रतिनिधींच्या उद्देशासंबंधानें सर्वत्र चांगली माहिती झाली व अखेरीस मि. ब्लंट ह्यांच्याच खटपटीनें व मध्यस्थीनें हिंदुस्थानचे त्यावेळचे स्टेट सेक्रेटरी लॉर्ड रँडाल्फ चर्चिल ह्यांच्या मुलाखतीचा योग जुळून आला, एवढेंच केवळ नव्हे तर स्टेट सेक्रेटरींची मुलाखत घेण्याची कल्पनाही त्यांचीच. नारायणरावांना त्यांनीं सांगितलें कीं, "हिंदी प्रतिनिधींना मुलाखत द्यावी असें मी लॉर्ड चर्चिल साहेबांना सुचविलें व त्यांनीं अगदीं आढेवेढे न घेतां मुलाखत देण्याचें कबूलही केलें आहे!" आणि ही बातमी जेव्हां इंडिया कौन्सिलच्या बाकीच्या सभासदांना कळली तेव्हां ते अगदीं फिक्के पडल्यासारखे झाले! हिंदुस्थानांतून तीन माणसें येतात काय, हिंदी लोकांचे प्रतिनिधी अशीं तीं आपल्याला म्हणवितात काय, आणि स्टेट सेक्रेटरीसारखे जबाबदार अधिकारी त्यांना मुलाखतीचें आश्वासन देतात काय? अशा प्रकारें मुलाखती देणें कौन्सिलच्या इतर सभासदांना इष्ट वाटलें नाहीं. पण भेट देण्यापूर्वी ब्लंटसाहेबांचा उत्साह विशेष होता. मि. ब्लंट ह्यांनीं नारायणराव व त्यांचे दोघे मित्र ह्यांना तर असेंही सांगितलें कीं लॉर्ड चर्चिल म्हणताहेत कीं, मी जर स्टेट सेक्रेटरी आणखी राहिलों तर राणीसाहेबांच्या जाहीरनाम्यांत दिलेलीं वचनें

पूर्ण करण्याचा प्रयत्न करणार ! त्यांचा हिंदुस्थानाच्या हिताचा विचार सारखा चाललेला असतो.[१२] हें ऐकून नारायणराव वगैरे मंडळी अगदीं स्तंभितच झाली. शेवटीं मि. मुदलिआर ह्यांनीं मि. ब्लंट ह्यांना विचारलेंच कीं, ''लाटसाहेब हिंदुस्थानचे मोठे हितचिंतक आहेत, आणि हिंदुस्थानच्या कल्याणाची त्यांच्या इतकी चिंता वाहणारे दुसरे कोणी नाहीं असें आपण म्हणतां खरें, पण मग लाट साहेबांनीं लॉर्ड रिपन ह्यांचेवर टीकेची जी झोड उडविली होती, त्याचा काय खुलासा?'' त्यास मि. ब्लंट ह्यांनीं दिलेलें उत्तर लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. ते म्हणाले, ''लॉर्ड रिपन ह्यांचे विरुद्ध लॉर्ड रँडाल्फ ह्यांनीं केलेली टीका वाचून मला फार वाईट वाटलें, माझें मन दुखवलें व मीं तसें लाट साहेबांना बोलूनही दाखविलें ! हा केवळ पक्षाभिमानाचा प्रश्न होता. लॉर्ड रिपन ह्यांची ''डोमेस्टिक पॉलिसी'' लॉर्ड रँडाल्फ ह्यांना पसंत होती, परंतु ते विरुद्ध पार्टीचे असल्यामुळें लॉर्ड रिपन ह्यांची अशा प्रकारें हजेरी घेणें त्यांना क्रमप्राप्तच होतें!'' असो. नारायणरावांनीं लॉर्ड रँडाल्फ ह्यांच्याशीं झालेल्या मुलाखतीचें जें वर्णन केलें आहे त्याचा सारांश पुढें दिला आहे :

'' गुरुवार ता. १५ ऑक्टोबर १८८५ रोजीं मि. ब्लंट ह्यांनीं आम्हांला इंडिया ऑफिसमध्यें नेलें. इंडिया ऑफिसची इमारत म्हणजे अनेक इमारती मिळून झालेली एक इमारत आहे. आणि ह्यांत नाना वळणें असल्यामुळें नवीन मनुष्य अगदीं गोंधळूनच जावयाचा; तथापि स्टेट सेक्रेटरीसाहेबांची खोली—म्हणजे जेथें ते स्वतः बसतात व जेथें त्यांनीं आमचें स्वागत केलें—साधारण मोठी असून पुस्तकांचीं एक दोन कपाटें, कांहीं खुर्च्या, एक टेबल व हिंदुस्थानचा एक भला थोरला नकाशा एवढेंच तेथें पाहिल्याचें मला आठवतें. लॉर्ड रँडाल्फ ह्यांनीं आदरपूर्वक आमचा सत्कार करून आमच्याशीं हस्तांदोलन केलें. त्यांचा चेहरा रुबाबदार असून डोळे पाणीदार आहेत. त्यांना पहातांक्षणीं मनावर प्रथमच अनुकूल परिणाम होतो. त्यांची बोलण्याची ढब परिणामकारक आहे. इंग्लंडांत रुबाबदार चेहरा लोकांस आकर्षितो व ह्या दृष्टीनें पहातां मि. ब्राइट किंवा मि. चेंबरलेन ह्यांचेसंबंधानें असें म्हणतां येत नाहीं. त्याचप्रमाणें त्यांचा आवाजही मधुर व वक्तृत्वशक्ति निर्दोष असल्यामुळें ते बोलूं लागले म्हणजे गोड शब्दांचा सारखा प्रवाह सुरू आहे असें वाटून मन रमून जातें. मि. ब्लंट ह्यांनीं प्रथमतःच लाटसाहेबांना सांगितलें कीं, ह्यांनीं कोणत्याही पक्षाशीं एकजीव न होतां अगदीं तिऱ्हाइतपणें रहावें असा मीं त्यांना उपदेश केला आहे. हें ऐकून लाट-

---

१२. A more sincere well-wisher of India, he (Mr. Blunt) said, than Lord Randolph, he had not met. His Lordship was full of India, his heart was in his work.

साहेबांनीं मान हालविल्यारखें केलें. मनमोहन घोष ह्यांनीं आम्ही तसेंच करणार आहों असें सांगितलें, तेव्हांही उत्तरादाखल मानच हालली ! त्यावरून असें दिसलें कीं, प्रत्यक्ष कांहीं न सांगतां, आपला हेतु कळावा इतकाच लाटसाहेबांचा हेतु असावा. त्यानंतर हिंदुस्थानासंबंधानें बोलणें निघालें. आपण हिंदुस्थानांत जें पाहिलें तें आपल्याला फार आवडलें असें ते म्हणाले. काशीचे राजा शिवप्रसाद हे फार चांगले गृहस्थ असल्याचें त्यांनीं सांगितलें. नंतर राजकीय विषयावर बोलणें सुरू झालें. त्यावेळीं ते म्हणाले कीं पार्लमेंटच्या तर्फे हिंदुस्थानच्या एकंदर स्थितीसंबंधानें चौकशी व्हावी अशी जी माझी सूचना आहे ती पार्लमेंटला मान्य व्हावी अशी माझी फार इच्छा आहे. जुलैमध्यें पार्लमेंटपुढें हिंदी बजेट आणण्यापूर्वी कॅबिनेटमधील दुसऱ्या सभासदांशीं ह्या विषयासंबंधानें बोलणें झालें आहे. त्यांना ही कल्पना पसंत आहे. परंतु आतां लिबरल पक्ष जर सत्ताधीश झाला तर काय होईल हें मात्र सांगतां येत नाहीं. ते सत्ताधीश झाले तरी आपली सूचना आहे तशी त्यांस मान्य होण्याचा संभव आहे; पण, तींत छाटाछाटही होण्याची भीति आहे. माझें स्वतःचें मत असें आहे कीं, पूर्ण चौकशी व्हावी व हिंदुस्थानाची राज्यव्यवस्था कशी चालविली जात आहे त्याची पूर्ण माहिती मिळवावी व अशा चौकशीच्या द्वारें हिंदुस्थानास हितकर अशी योजना व्हावी. त्याचप्रमाणें जी कमिटी नेमावयाची तींत पार्लमेंटमधील उत्तम माणसांचा समावेश व्हावा. मोरले साहेबांनीं माझ्या सूचनेस कसून विरोध केलेला आहे, पण तो केवळ पक्षाभिमानामुळें ! त्यांचें भाषण ऐकून आपल्याला फार सखेदाश्चर्य वाटलें असेंही लाटसाहेबांनीं सांगितलें. आमच्या निरनिराळ्या प्रांतांसंबंधानें कांहीं कमीअधिक सांगण्यासारखें असलें व तें जर कळविलें गेलें तर आपल्याला आनंद होईल असेंही ते म्हणाले. अशा प्रकारें प्रथम भेट चांगल्या प्रकारें झाली; परंतु पुढें हाच संबंध टिकून राहिला नाहीं."

लॉर्ड रँडाल्फ चर्चिल ह्यांची व नारायणराव आणि इतर प्रतिनिधी यांची जेव्हां प्रथम भेट झाली त्यावेळीं जो सलोखा दिसून आला तो पुढें कायम राहिला नाहीं. नंतर हिंदी प्रतिनिधींसंबंधानें लाटसाहेबांच्या मनांत शंकाही आल्या असाव्यात. नारायणरावांनीं हिंदी प्रतिनिधींच्यातर्फे आपण कोणत्याही एका पक्षाशीं एकजीव होण्याचें टाळणार आहों असें लॉर्ड रँडाल्फ ह्यांना सांगितलें होतें. पण, पुढें लिबरल पक्षाच्या लोकांकडूनच त्यांना सहाय्य झाल्यामुळें व लिबरल पक्षानेंच हिंदुस्थानच्या आकांक्षांसंबंधानें सहानुभूति दाखविल्यामुळें लिबरलपक्षाच्या लोकांमध्येंच ह्या प्रतिनिधींचें हिंडणें-फिरणें फार झालें. तशांतून बर्मिंगहॅम येथें मि. ब्राइट ह्यांचेसंबंधानें झालेल्या सभांमध्यें हिंदी प्रतिनिधींनीं पुढाकार घेऊन भाषणें केलीं. नारायणरावांच्या एका भाषणाच्या वेळीं तर खुद्द मि. ब्राइट साहेब अध्यक्ष होते.

हिंदी प्रतिनिधी लिबरल पक्षाशीं एकजीव झाले असें वाटून लॉर्ड रँडाल्फ ह्यांची मर्जी खप्पा झाली तर त्यांत नवल काय ? नंतर त्यांनीं तर नारायणराव, मि. घोष व मि. मुदलिअर हे हिंदुस्थानचे प्रतिनिधी आहेत हीच गोष्ट मुळीं नाकबूल केली ! व रॅडिकल पुढाऱ्यांच्या हातचीं हे तिघे बाव्हलीं आहेत असें त्यांनीं जाहीर केलें ! ह्यास हिंदी प्रतिनिधींनीं समर्पक उत्तर दिलें व तें सर्व मोठमोठ्या वर्तमानपत्रांत त्यावेळीं प्रसिद्ध झालें होतें.

## मि. जॉन ब्राइट.

१८६६ सालीं अगर त्या सुमारास ग्लॅडस्टन साहेबांनीं एकदां म्हटलें होतें कीं, मीं माझीं मतें पुष्कळवेळां बदललीं आहेत, आणि मला पुष्कळ धडेही मिळाले आहेत. परंतु मि. जॉन ब्राइट ह्यांच्या कारकीर्दीकडे पाहिलें तर मतांतर ही गोष्ट त्यांना माहित नाहीं असें म्हणावें लागेल. त्यांचीं मतें न बदलतां इतरांचीं मतें मात्र त्यांच्या मतांस अनुकूल होत असत. मि. चेंबरलेन ह्यांनीं एकदां त्यांचेविषयीं बोलतांना म्हटलें होतें कीं, “चालू काळाचा विस्तृत इतिहास जेव्हां लिहिला जाईल त्यावेळीं मि. ब्राइट ह्यांच्यापेक्षां राजकीय मतांच्या बाबतींत अधिक संबद्धता दुसऱ्या कोणाच्या चरित्रांत क्वचितच सांपडेल.” आणि ह्यासंबंधानें स्वतः मि. ब्राईट ह्यांनीं एकदां म्हटलें आहे कीं, कित्येक मतांचा अगर विषयांचा मीं पुरस्कार केला कीं प्रथम लोक मला मूर्खांत काढतात, पण नंतर लोक हळुहळू त्याच विचारांचा स्वीकार करितात व अखेरीस सगळा देश व सरकार ह्यांच्या मी कितीतरी पुढें होतों हें पाहून मला संतोष होतो. अशाप्रकारें त्यांच्या राजकीय मतांचा एकसूत्रीपणा, त्यांचें नैतिक सामर्थ्य ह्यांयोगें त्यांच्याविषयीं सर्वत्र आदर, प्रेम व अभिमान दिसून येत असे. लिबरल पक्षाच्या सभांमध्यें ग्लॅडस्टन, ब्राइट व चेंबरलेन हीं तीन नांवें निघालीं कीं जिकडे तिकडे मोठा उत्साह दिसे. तरी त्यांतल्या त्यांत ह्या तिघांसंबंधानें सारखा आदर, सारखा ओढा किंवा सारखा अभिमान होता, असें म्हणतां येत नसे. ग्लॅड-स्टनसंबंधानें वृद्ध व तरुण सर्वांत सारखा आदरभाव दिसून येई. परंतु त्यांची दीर्घ काळपर्यंतची सेवा, त्यांनीं केलेलें कार्य, त्यांची असाधारण बुद्धि, पुढारी ह्या नात्यानें त्यांनीं जनतेवर पाडलेली छाप, ह्यांमुळें लोकांत त्यांचें असामान्य वजन असे व लहान थोर सर्वांत लिबरल पक्षापुढें त्यांच्याविषयीं आदरयुक्त प्रेम दिसून येत असे. चेंबरलेनसंबंधानें निराळाच अनुभव येई. वृद्ध माणसांचा त्यांच्या-वर इतका विश्वास नव्हता. त्यांचें म्हणणें असें असे कीं, ह्यांनीं गाडी भरधांव सोडलेली आहे. पण, ते नवीन पिढीचे लाडके होते ! हा आपला भावी पुढारी होय अशी त्यांनीं खूणगांठ बांधली होती. मि. ब्राइटसंबंधाचा अनुभव ह्यापेक्षां

पुष्कळच निराळा होता. सर्व पक्षांच्या लोकांमध्यें त्यांच्यासंबंधानें आदर असे. हें एक सच्चें नाणें आहे अशी सर्वांची खात्री झाली होती. ते जरी लिबरल पक्षास धरून होते, तरी त्यांच्यामध्यें पक्षाभिमानामुळें उत्पन्न होणारा कडवेपणा नव्हता. त्यामुळें ते सर्वांस हवेसे वाटत. फार काय सांगावें, जरी लॉर्ड रँडाल्फ चर्चिल हे त्यांच्याविरुद्ध निवडणुकीसाठीं उभे राहिले होते तरी ते म्हणत कीं, मि. चेंबरलेन ह्यांच्या धोरणाचा कट्टा शत्रू जर कोण असेल तर ते मि. ब्राइट हेच होत. कारण, चेंबरलेन ह्यांचें धोरण अत्यंत देशहितविघातक आहे असें ते म्हणत. उलटपक्षीं चेंबरलेनची धडाडी व नवीन नवीन विषय हातीं घेऊन त्यांविषयीं चर्चा करण्याची आतुरता मि. ब्राइट ह्यांत नसल्यामुळें तरुण मंडळी जरी जरा नाकें मुरडत व नाखुष असत तरी त्यांचें नैतिक बल व त्यांचें श्रेष्ठत्व कोणासही नाकबूल नसे. एका सभेंत नारायणरावांनीं जें भाषण केलें त्यांत ब्राइटसाहेबांची ही बाजू त्यांनीं विशेष स्पष्टपणें लोकांपुढें मांडिली. ती पुष्कळांस फार आवडली. आणि एक गृहस्थ सभेनंतर नारायणरावांपाशीं येऊन म्हणाला, " तुम्ही ब्राइटसंबंधानें जें बोललांत तें ऐकून मला फार समाधान वाटलें. ग्लॅडस्टन व चेंबरलेन ह्यांना मी विशेष महत्त्व देत नाहीं. हे दोघेहि कार्यसाधू आहेत असें माझें मत आहे ! " ब्राइटविषयीं लोकांत किती प्रेम असे ह्याची निदर्शक म्हणून एक गोष्ट नारायणरावांनीं नमूद करून ठेविली आहे. एकदां मनमोहन घोष आपल्या मतदार संघासमोर व्याख्यान देत असतांना ग्लॅडस्टन व चेंबरलेन ह्यांच्याविषयीं स्तुतिपर भाग भाषणांत आला. तो ऐकून एका इसमानें उठून 'ब्राइटसंबंधानें कां नाहीं बोलत ?' अशी पृच्छा केली. घोष महाशय ब्राइटसंबंधानें पुढें बोलणार होते. पण ह्या माणसाचा हा प्रश्न ऐकून ते थोडे गोंधळले व मागील संदर्भाची साखळी सुटली; तरी पण, ह्या पृच्छकानें ब्राइटविषयीं कां नाहीं बोलत हा प्रश्न सारखा चालूच ठेवला व त्यामुळें शेवटीं मनमोहनांस ब्राइटसंबंधानें मध्येंच बोलावें लागलें.

मि. ब्राइट ह्यांचेविषयीं लोकांमध्यें आपलेपणा, प्रेम व अभिमान किती असे ह्याची कल्पना त्यांच्या संबंधींच्या सभांवरून चांगली होत असे. बर्मिंगहॅम येथील टाऊन हॉलच्या सभेस जाण्यासाठीं सभेच्या वेळेपूर्वीच शनिवार ता. २१ नोव्हेंबर रोजीं नारायणराव निघाले. तेथें ज्या खोलींत प्रथम ब्राइटसाहेब येणार होते तेथें त्यांना नेऊन बसविलें. ब्राइट बरोबर सात वाजतां आले. अगदीं साधा पोषाख केलेला एक म्हातारा गृहस्थ ते ब्राइटसाहेब असें नारायणरावांनीं ओळखलें. प्रथमदर्शनींच त्यांचा आपल्यावर इष्ट परिणाम झाल्याचें त्यांनीं नमूद केलेलें आहे. त्यांचा हंसतमुख चेहरा पाहून सर्वांशीं मिळून मिसळून ह्यांस वागतां येईल असा ग्रह होई. परंतु

ब्राइटसाहेब लोकांत आले म्हणजे त्यांचें तें हंसतमुख, प्रसन्न मुद्रा वगैरे सर्व कांहीं जाई व त्याठिकाणीं गंभीर मुद्रा धारण केलेली व्यक्ति दिसे! त्यांना पहातांच असें वाटे कीं हा कोणीतरी पाणीदार, सच्चा मनुष्य असून कोणाची लटपट चालूं न देणारा गृहस्थ आहे. हिंदी प्रतिनिधींची व त्यांची ओळख करून दिल्यावर पाहुण्यांस बरोबर घेऊन त्यांनीं टाऊन हॉलमध्यें प्रवेश केला. त्या ठिकाणीं पहातात तों तीन, चार हजार माणसांचा प्रचंड जमाव मि. ब्राइटचें व्याख्यान ऐकावयास हजर होता. सर्व हॉल चिकार भरून गेला होता, कोठें उभें रहावयासही जागा नव्हती. वरील ग्यालऱ्यांमध्येंही माणसांची विलक्षण दाटी होती. वरील ग्यालरींतील कित्येक स्त्रीपुरुषांनीं आपल्यापाशीं दुर्बिणी आणिल्या होत्या. हेतु हा कीं ब्राइट बोलत असतांना त्याला मनमुराद पहातां यावें! ह्या ठिकाणीं आणखी एक विशेष गोष्ट नारायणरावांच्या लक्ष्यांत आली. लंडन येथें गेल्यापासून पुष्कळ सभांस ते हजर राहिले. ज्या सभांमध्यें राजकीय विषयांचा खल होत असे तेथें शाळांत शिकणारे मुलगे अगर मुली हजर राहिलेल्या नारायणरावांनीं पाहिल्या नव्हत्या. पण, ह्या सभेंत कित्येक मुलगे व मुली मि. ब्राइट ह्यांस केवळ पहाण्यासाठीं अगर ते कसे बोलतात तें ऐकण्याची आलेली संधी दवडूं नये म्हणून आल्या होत्या. ह्यावरून मि. ब्राइटसंबंधानें लोकांमध्यें किती आदर वसत होता त्याची कल्पना होईल. परंतु तळमजल्यावरील देखावा विशेष प्रेक्षणीय होता. ह्या ठिकाणीं मजूर-वर्गापैकीं पुरुष व स्त्रिया आलेल्या होत्या. हीं सर्व माणसें अगदीं दाटी करून, एकाला एक चिकटून, उभीं होतीं. सभागृहाच्या टोंकापासून तों व्यासपीठापर्यंत चिकटून हीं माणसें उभीं होतीं. त्यामुळें बाहेर जरी थंडी होती तरी आंत कडक उष्मा भासूं लागला. हें पाहून जवळच बसलेल्या एका गृहस्थानें नारायणरावांकडे पाहून म्हटलें, "हा असा उष्मा आपल्याला आवडतच असेल, नाहीं?" "आम्हांला देखील हा उष्मा असह्य वाटतो." हें उत्तर ऐकून त्याला आश्चर्य वाटलें! मि. ब्राइट व्यासपीठावर येतांच सर्व लोक उभे राहिले व एकसारखा टाळ्यांचा गजर होत राहिला; आणि ते जेव्हां खुर्चीवर बसले, तेव्हां लोक बसले. भाषणास सुरुवात होण्यापूर्वी मजूर लोकांनीं निवडणुकीसंबंधानें एक गाणें मोठ्या उत्साहानें गाइलें व जॉन ब्राइटच्या नांवानें त्रिवार टाळ्यांचा गजर झाला. ह्या नंतर लॉर्ड चर्चिलच्या नांवानें तीन वेळां धिक्कारप्रदर्शक आवाज (Groans) करण्यांत आला! हा सर्व प्रकार चालू असतांना ब्राइटसाहेब अगदीं स्तब्ध बसले होते. हा प्रकार डोळ्यांपुढें होत असून त्यांची चर्या पूर्णपणें निर्विकार दिसत होती. चर्येवर हास्य, क्रोध, आनंद, किंवा असमाधान कांहीं दिसत नव्हतें. अध्यक्षांनीं भाषण करितांना मि. ब्राइट ह्यांची स्तुति केली व त्यांच्या सेवेचें स्वरूप निवेदिलें

व ज्यांनीं अशा प्रकारें लोकहिताविषयीं जागरूकता दाखविली, त्यांना सोडून तुम्ही आतां चर्चिलसाहेबांस मतें देऊन आपली कृतघ्नता दाखविणार काय? अध्यक्षांच्या तोंडून असें वाक्य निघतांच "नाहीं" "नाहीं" ह्या शब्दांच्या आवाजानें सगळा हॉल दणाणून गेला! त्यानंतर मि. मुदलिआर ह्यांचें भाषण झालें. ते भाषण करावयास उठतांच त्यांचा उत्साहानें सत्कार करण्यांत आला. त्यांनीं आपल्या लहानशा पण गोड सुंदर भाषणांत मि. ब्राइट ह्यांनीं हिंदुस्थानाच्या हिताविषयीं वेळोवेळीं कशी आस्था दाखविली तें सांगितलें. त्यामुळें वारंवार टाळ्यांचा कडकडाट झाला. नंतर मि. ब्राइट हे स्वतः भाषण करावयास उठले. ते उठतांक्षणींच सर्वच लोक उठून उभे राहिले व कांहीं मिनिटें एकसारख्या टाळ्या पडत राहिल्या. त्या थांबल्यानंतर मि. ब्राइट भाषण करूं लागले. त्यांच्या ह्या वेळच्या भाषणांत त्यांच्या असामान्य वक्तृत्वाचा नमुना दिसला नाहीं. एकतर त्यांनीं १८८०-८५ ह्या पांच वर्षांत लिबरल पक्षानें जी कामगिरी केली तिचें वर्णन लिहून आणिलेल्या टांचणाच्या आधारें केलें. दुसरें, निवडणुकीसाठीं होणाऱ्या नेहमींच्या भाषणाप्रमाणें तें होतें. परंतु जेव्हां त्यांनीं म्हटलें कीं, "आम्हीं हा मिळविलेला जय कोणत्याही प्रकारें रक्तपात न होऊं देतां मिळविला आहे (Ours has been a victory that has been without bloodshed), तेव्हां लोकांनीं टाळ्यांच्या कडकडाटानें सर्व हॉल दणाणून टाकला. ह्यावेळीं नारायणरावांच्या जी एक विशेष गोष्ट लक्षांत आली ती अशी कीं, सबंध भाषणांत लॉर्ड चर्चिल ह्यांच्या नांवाचा उल्लेखही त्यांनीं केला नाहीं. जणूं काय लॉर्डसाहेब ह्यांचीं बर्मिंगहॅम येथें भाषणेंच झालीं नाहींत व ते आल्याचें आपल्याला माहीतही नाहीं असें त्यांनीं दाखविलें. खरें पहातां लॉर्ड साहेब ह्यांचे प्रतिस्पर्धी, त्यामुळें त्यांचे संबंधानें निंदाव्यंजक भाषण करणें हें नित्याच्या व्यवहारानुरूप झालें असतें, पण मि. ब्राइट ह्यांनीं त्यांच्या नांवाचा उल्लेखही न करितां आपल्या पक्षाचा विचार तेवढा लोकांपुढें ठेविला. ह्याचा लोकांवर जो अत्यंत इष्ट परिणाम झाला तो इतरांच्या भाषणांत दिसून आला. एकानें तर असें म्हटलें कीं, "ज्यांनीं आपली भाकर स्वस्त करून दिली, त्या मि. ब्राइटना पाठ दाखवून तुम्ही लाटसाहेबांकडे वळणार काय?" हें वाक्य लोकांनीं शांतपणें ऐकून घेतलें, पण तें संपतांच एका बाईनें "Hear Hear" असें म्हणतांच त्या दोन शब्दांचा इतका परिणाम झाला कीं, मि. ब्राइट ह्यांची कामगिरी लोकांपुढें उभी राहिली. हजारों बायांना स्वतः काम करून मुलाबाळांना पोसावें लागतें. पावावरील कर उतरल्यामुळें तो स्वस्त झाला व त्यामुळें चिल्यापिल्यांना भरपूर पाव मिळूं लागला. आणि ह्या बाबतींत मि. ब्राइट ह्यांचा पुढाकार होता. ह्याच वेळीं दुसरी एक फार महत्वाची गोष्ट घडून

आली. ह्या दिवसाच्या सभेंत हिंदी प्रतिनिधि बोलणार किंवा सभेस येणार ह्याची मि. ब्राइट ह्यांना कल्पना नव्हती. त्यामुळें भाषणांत हिंदी प्रतिनिधींविषयीं अगर हिंदुस्थानासंबंधानें कांहींही उल्लेख झाला नाहीं. म्हणून अध्यक्षांचे आभार मानण्याच्या ठरावास अनुमोदन देण्याची परवानगी घेऊन मि. ब्राइट ह्यांनीं दुसरें स्वतंत्र भाषण केलें, तें त्यांच्या कीर्तीस साजेसें झालें व त्याच्यापुढें त्यांचें पहिलें भाषण अगदीं फिकें पडलें. खरें वक्तृत्व म्हणजे काय व त्याचा ऐकणाराच्या मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम कसा होतो, ऐकणारे स्वतःस विसरून कसे जातात हें नारायणरावांस ह्या उपव्याख्यानाच्या वेळीं अनुभवावयास मिळालें. ब्राइट साहेबांचें पहिलें व्याख्यान पुष्कळ मंडळी खुर्चीवर लोळत लोळत ऐकत होती. पण दुसरें व्याख्यान सुरू होतांच सर्व माणसें तटस्थ झालीं, खुर्च्यांवर कशीं तरी बसलेलीं माणसें ताठ बसलीं व पुढें वळून ऐकूं लागलीं! हें व्याख्यान चालू असतांना शांतता तरी किती पसरली होती! एकादी टांचणी जरी पडली असती तरी तिचा आवाज सहज ऐकूं आला असता इतकी शांतता त्यावेळीं अनुभवावयास सांपडली. एकेक पायरी वर चढत चढत त्यांच्या वक्तृत्वानें शिखर गांठलें आणि लोकसेवेच्या महत्त्वासंबंधानें बोलतां बोलतां ते जेव्हां म्हणाले कीं, मी जर आणखी वीस वर्षें वयानें कमी असतों तर आजच्या वयापर्यंत येईतों सर्वकाळ ज्यांना माझ्या सेवेपासून उपयोग होण्यासारखा आहे त्यांच्या सेवेंत हा काळ घालविला असता. (I could almost hope that I was twenty years younger and could give some help to those who are likely to take up this cause.) आतांपर्यंत ब्राइटसाहेबांच्या वक्तृत्वानें सर्व लोक भारले गेले होते, पण २० वर्षांनीं तरुण होण्याची इच्छा ब्राइटसाहेब प्रदर्शित करीत आहेत असें पहातांच सर्व लोक खडबडून जागे झाले. व एकसारखा टाळ्यांचा कडकडाट सुरू झाला. रुमाल, टोप्या लोक उडवावयास लागले व अशा रीतीनें आपला आनंद व आदर ह्यांचें कितीतरी वेळ लोक प्रदर्शन करीत होते. अशा प्रकारचा उल्हास, आनंद व उत्साह अनुभवून ह्या वेळींही ब्राइटसाहेबांच्या मनावर कांहीं परिणाम झाला नाहीं, असें मात्र नव्हे. हें त्यांचें उपव्याख्यान औपचारिक नव्हतें. प्रत्येक शब्द अंतःकरणाला पीळ पडून निघत होता. त्याचा परिणाम असा झाला कीं, भाषण संपलें त्यावेळीं मि. ब्राइट कांपत होते, पाण्याचें ग्लास पाणी पिण्यासाठीं वर उचलतांना तें हातांत सारखें धरवेना, हात सारखा कांपत होता व नंतर ते आपल्या जागेवर जरी बसले, तरी त्यावेळींही त्यांचें सर्व शरीर कांपत होतें असें त्यांच्या जवळच बसलेल्या एका गृहस्थानें नारायणरावांस सांगितलें. व्याख्यान संपल्यानंतर मि. ब्राइट ह्यांच्याशीं

दोन शब्द बोलावयास मिळावे, निदान त्यांच्याशीं हस्तांदोलन तरी करितां यावें म्हणून त्यांच्या भोवतीं कोण गर्दी ! कोणाशीं दोन शब्द बोलणें, कोणाशीं हस्तांदोलन करणें, कोणाशीं हसून सहानुभूति दाखविणें असे प्रकार चालले असतां तेवढ्या गर्दीतून एक वृद्ध बाई पुढें आलेली नारायणरावांनीं पाहिली. सहज रीतीनें पुढें येऊन मि. ब्राइट ह्यांच्याशीं दोन शब्द बोलावयास सांपडणें शक्य नव्हतें, गर्दीमुळें पुढें येऊन हस्तांदोलन करणेंही तिला शक्य दिसेना. पण तिच्या ठिकाणीं ब्राइट संबंधानें इतका अभिमान होता कीं कांहीं वेळ तिष्ठत उभी राहून ती पुढें आली व कांहीं नाहीं तरी मि. ब्राइट ह्यांच्या हाताला स्पर्श करून पुढें चालती झाली ! गाडींत बसतां बसतां हिंदी प्रतिनिधींस उद्देशून ते म्हणाले, " मी जर पार्लमेंटमध्यें निवडून आलों तर हिंदुस्थानच्या वतीनें मी भांडेन याचें आश्वासन देतों. " हें ऐकून मनमोहन घोष थोडे हांसले व म्हणाले, " आपण तर खात्रीनें निवडून येणार ! " " छे छे, असें कसें म्हणतां ? भरंवशाचे म्हशीला टोणगा असें व्हावयाचें कदाचित ! "

ही सभा शनिवारीं झाली हें वर आलेंच आहे. दुसऱ्याच दिवशीं हिंदी प्रतिनिधींची व मि ब्राइट ह्यांची मुलाखत झाली. ती नारायणरावांस तरी चिरस्मरणीय झाली. सारखे दोन तासपर्यंत परस्पर संभाषण व प्रश्नोत्तरें चाललीं होतीं. हा अलभ्य लाभ नारायणरावांस झाला असें वाटून एक बाई त्यावेळीं त्यांस म्हणालीही कीं, मि. ब्राइट ह्यांच्याशीं कांहीं मिनिटें भाषण करावयास मिळालें तर त्यामुळें आपणांस धन्य मानणारीं माणसें आज येथें कितीतरी आहेत. ह्या दोन तासांच्या संभाषणांत अनेक विषय आले होते. परंतु प्रथमतःच नारायणरावांस एका गोष्टीचें मोठें कौतुक वाटलें. आदल्या दिवशीं मि. ब्राइट अगदीं मितभाषी व गंभीर दिसले. व्याख्यानांत विनोद भरपूर, पण तोंडाकडे पहातां ते गंभीर दिसत. पण घरीं ते अगदींच निराळे दिसले. ते हसतमुख, प्रसन्नचित्त, विनोदपूर्ण व आनंदी असल्याचा अनुभव नारायणरावांस आला. हिंदुस्थानांत चाललेल्या चळवळींसंबंधानें त्यांना सहज ज्ञान असलेलें आढळून आलें. सर वुइल्यम वेडरबर्न ह्यांनीं त्यावेळीं शेतकऱ्यांसाठीं ब्यांका ( Agricultural Banks ) असाव्यात अशी सूचना केलेली होती. ही सूचना अमलांत आणून ती कशी काय सोइस्कर होते हें अनुभवानें अवश्य पहाण्यासारखें आहे असें त्यांनीं म्हटलें. त्याचप्रमाणें नारायणराव ज्यावेळीं लंडन येथें गेले त्यावेळीं मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड रे होते. लॉर्ड रे ह्यांच्या सहानुभूतिपूर्ण वर्तनामुळें ते इकडे चांगले लोकप्रिय होऊं लागले होते हें मि. ब्राइट ह्यांस माहित होतें व ह्याबद्दल त्यांनीं संतोष व्यक्त केला. ह्यावेळीं सिव्हिल सर्विस, इलबर्ट बिल, थिबा राजाचें उच्चाटन वगैरे विषयांवर

संभाषण झाल्यावर, त्यावेळीं लोकांपुढें असलेल्या लॉर्ड रिपन ह्यांच्या कारकीर्दी-संबंधानें संभाषण झालें. त्यावेळीं ब्राइट ह्यांनीं स्पष्टपणें बोलून दाखविलें कीं, लॉर्ड रिपन ह्यांनीं हिंदुस्थानांत कीर्ति मिळविली, ते अत्यंत लोकप्रिय झाले व त्यांचा लोकांनीं बहुमान करून त्यांच्याविषयीं आदर व्यक्त केला ही गोष्ट अभिमानास्पद होय ह्यांत कांहीं संशय नाहीं. त्यांना स्वदेशीं परत आल्यानंतर राणीसाहेबांनीं Duke केलें नाहीं हें पाहून हिंदी लोकांस फार वाईट वाटलें व हिंदी लोकांस जे सन्माननीय वाटले ते लॉर्ड रिपन राणी-साहेबांस तसे वाटले नाहींत हें पाहून हिंदी लोकांस सखेदाश्चर्य वाटलें असें नारा-यणरावांनीं म्हणतांच मि. ब्राईट म्हणाले, "ऊंः त्यांत काय आहे? लॉर्ड रिपन ह्यांस ड्यूक बनविलें नाहीं ह्यांत विशेष कांहींच नाहीं. हल्लीं जे ड्यूक आहेत ते कमी होतील तितके बरे; कारण त्यांच्या इतमामाप्रमाणें त्यांस रहातां येत नाहीं, असेंच हल्लीं वाटूं लागलें आहे. स्वतः लॉर्ड रिपन सुद्धां ह्या पदवीला इतकें महत्त्व देत असतील असें मला वाटत नाहीं." हिंदुस्थानाच्या कल्याणाविषयीं मि. ब्राइट ह्यांस कळकळ होती हें ते आपल्या आचरणानें दाखवीत असत. मि. नारीस न्यायाधीश ह्या नात्यानें हिंदुस्थानांत येण्याच्या पूर्वीं त्यांची व मि. ब्राइट ह्यांची एके ठिकाणीं भेट झाली असतां, हिंदी लोकांशीं आदरपूर्वक प्रेमानें वागण्याचा त्यांनीं उपदेश केला. शेवटीं हिंदी प्रतिनिधींना त्यांनीं सांगितलें कीं हिंदुस्था-नाला पुढले दिवस चांगलेच यावयाचे आहेत असें मला वाटतें. तुम्ही नेमस्त-पणाचें धोरण स्वीकारिलेंत व आम्ही समजूत धरून वागूं लागलों, तर हिंदुस्था-नाचें राज्य चालवितांना कांहीं भानगडी उपस्थित होतील असें वाटत नाहीं. (If you are moderate and we are reasonable, no difficulty is ever likely to arise in the government of that country.)

अशा प्रकारें सुमारें दोनतास संभाषण झाल्यानंतर तेथेंच असलेल्या एका गृहस्थांनीं म्हटलें, "आपली ही निवडणुकीची धामधूम संपली म्हणजे पुन्हा एकदां बर्मिंगहॅम येथें ह्या गृहस्थांनीं यावें व व्याख्यान द्यावें असें आम्ही सुचवीत आहों." ब्राइट-साहेब म्हणाले, "फारच उत्तम. त्यांनीं अवश्य येथें येऊन लोकांसाठीं व्याख्यान द्यावें ही सूचना अगदीं उत्तम आहे यांत कांहीं संशय नाहीं." "पण, त्यांनीं येथें यावयाचें व व्याख्यान जर द्यावयाचें, तर त्यांचे व्याख्यानाच्या वेळीं आपण प्रत्यक्ष हजर असलें पाहिजे हेंही अगत्याचें आहे." सर्वांनींच त्यावेळीं त्यांस आग्रह केला व मि. ब्राइट ह्यांनीं अध्यक्ष होण्याचें कबूल केलें.

इंग्लंड हें पुढारलेलें राष्ट्र, निवडणुकीच्या वेळीं येथें पक्षाभिमान कळसास जाऊन पोचतों, व त्यामुळें नानाप्रकारचे अनिष्ट प्रकार चालतात, एवढेंच केवळ

नव्हे, तर सर्व व्यवहार सचेपणानें होतो असेंही नव्हे. कारण आपल्या येथें निरनिराळ्या प्रकारच्या निवडणुकींच्या वेळीं आज जे अनिष्ट प्रकार होत असतात व सरकार दरबारांत जाऊन जे धिंडवडे निघतात, त्यांचे मूळ धडे विलायतेंतील लोकांचे व्यवहार पाहून आमच्या लोकांनीं घेतले असावेत. १८८५ सालीं नारायणरावांनीं असें नमूद करून ठेविलें आहे कीं, प्रथमतः मतें देण्यासंबंधानें आश्वासनें देऊन निरनिराळ्या कारणांवरून उलट पक्षाच्या उमेदवारांस मतें देण्याचा प्रकार थोडा झाला नाहीं. मोठ्या हुद्यावर असलेल्या इसमानें आपल्या अधिकाराच्या जोरावर आपल्या हाताखालील माणसांस आपल्या पक्षाच्या उमेदवारांस मत द्यावयास लावणें, उमेदवाराच्या पत्नीनें एखाद दुसऱ्या शाळेंत जाऊन मुलांना सांगणें कीं, तुम्ही आपल्या घरांतल्या माणसांना माझ्या नवऱ्यालाच मतें द्यावयास सांगा; दुसरीनें, माझ्या नवऱ्याला जर तुम्ही मतें देणार नाहीं तर मग येत्या नाताळांत तुम्हांला घोंगड्याही बक्षिस मिळणार नाहींत अशी धमकी देणें वगैरे प्रकार पुष्कळ चालत. वजन पडल्यामुळें इच्छेच्या विरुद्ध जे कामगार लोक वचनभंग करीत त्यांना असें वाटे कीं मतें ballot पद्धतीनें द्यावयाचीं आहेत, तेव्हां आपण वचनभंग केल्याचें उघडकीस यावयाचें नाहीं! हिंदुस्थानांत नाना प्रकारच्या निवडणुकींत आज अशाच प्रकारचे अनुभव येऊं लागले आहेत.

पार्लमेंटच्या निवडणुकीच्या वेळीं निरनिराळ्या पक्षांचे लोक ईर्षेला चढतात व आपल्या विरुद्ध पक्षाचा पाडाव करण्याचे प्रयत्न कसून करतात, त्यावेळीं काय अनुभवास येतें त्याचें वर्णन वर अनेक ठिकाणीं निरनिराळीं उदाहरणें देऊन दाखविलें आहे; पण त्यांवरून इंग्लिश लोकांसंबंधानें वास्तविक कल्पना होते असें मात्र नाहीं. साधारण स्थितींतील इंग्लिश मनुष्याच्या एकंदर स्थितीची योग्य कल्पना करून घ्यावयाची तर एरव्हींच्या वेळच्या त्याच्या चरित्राकडे पाहिलें पाहिजे. मध्यम स्थितींतील इंग्लिशमनला एखाद्या यंत्राप्रमाणें रहावें लागतें असें म्हटलें म्हणजे त्याच्या एकंदर राहाणीची साधारण कल्पना होईल. यंत्र चालू केलें म्हणजे त्याच्याद्वारें होणारें कार्य एका निश्चित पद्धतीनें होत जातें. त्याप्रमाणें इंग्रजाचें होत असतें. त्याच्या सर्व व्यवहारांत कृत्रिमता फार दिसून येते. शिष्टाचार, निरनिराळ्या वेळीं वागण्याच्या पद्धती, निरनिराळ्या वेळांसाठीं निरनिराळे पोषाख करण्याचा जुलूम, बोलण्याच्या, वागण्याच्या पद्धती इत्यादि सर्व नियमबद्ध असतात. आम्ही हिंदुस्थानांत रूढीच्या जुलमाला कंटाळलों आहों, तर तिकडे फॅशनच्या जाचानें लोक बेजार झाले आहेत! रूढी चिरस्थायी जरी नसली तरी बहुत काळ चिकटणारी आहे, पण फॅशन हरघडी बदलत असते.

आणि प्रचलित फॅशनच्या दृष्टीनें दुसऱ्या मनुष्याची किंमत ठरत असते! म्हणजे तुमच्या अंगरख्याचा ' कट, ' तुमची एकंदर ढब, तुमच्या रीतीभाती, तुमच्या पायांतील जोडे, ह्यांवरून व एकंदर आचरणावरून किंमत ठरावयाची असते. हिंदी माणसाला हें सर्व चमत्कारिक वाटतें, आणि हिंदी मनुष्य नवीनच विलायतेंत गेला, म्हणजे जपून जपून वागण्यांतच त्याचा कोंडमारा होतो. आपल्या पोषाखांत, आपल्या शब्दांच्या उच्चारांत, आपल्या आवाजांत, आपल्या बोलण्याच्या पद्धतींत, ओळख करून घेण्याच्या रीतींत, ओळख व आपलें वर्तन ह्यांतील प्रमाणांत, कांहीं कोठें चूक होत नाहींना, ह्याविषयीं दक्षता ठेवतां ठेवतां त्याच्या नाकीं नऊ येतात! परंतु इंग्लिश लोक स्वतः जरी अशा प्रकारें जखडलेले असले, तरी सभ्य लोकांमध्यें परकीयांकडे पहाण्याची दृष्टि निराळी असते. एखाद्या परकीयास भोजनास बोलाविलें व त्याला कांट्या चमच्याचा चांगल्या रीतीनें अगर मुळींच उपयोग करितां आला नाहीं, तर तो एक रानटी माणूस आहे अशी सहसा ते आपणाशीं कल्पना करून घेणार नाहींत. देशाचारांत बहुतकरून भिन्नता असते हें त्यांस माहीत असतेंच. तथापि इंग्लिश मनुष्याचें घर हें त्यांचें वैभवस्थान होय. घरांतील नीटनेटकेपणा, व्यवस्थितपणा, नियमितपणा, प्रत्येक वस्तु योग्य ठिकाणीं ठेवण्याची व सर्व कार्यें वेळच्यावेळीं करण्यांतील दक्षता, नोकराचाकरांशीं प्रेमाचें वर्तन, मुलांनीं इतरांशीं कसें बोलावें व कसें वागावें ह्याविषयीं मिळणारें शिक्षण इ० गोष्टी अनुभविल्या म्हणजे असें वाटूं लागतें कीं, आरोग्यविषयक सुधारणा, सामाजिक व राजकीय सुधारणा, ह्यांचा उगम इंग्लिश लोकांच्या गृहांत, कुटुंबांत होतो हेंच खरें. सर्व बाबतींत शिस्तीचे धडे—ज्यांची सर्वांना विशेषतः राजकारणी जनांना अत्यंत आवश्यकता असते–शाळांतील अगर कॉलेजांतील पुस्तकांतून मिळत नाहींत; तर हे धडे व्यवस्थित व सदाचारसंपन्न कुटुंबांतूनच मिळतात. येथेंच शिस्त लागते; सत्ता मानणें व सत्ता गाजविणें यांचे धडे येथेंच मिळतात. ज्या कुटुंबांत नारायणराव राहिले होते तेथें त्यांस असें कळलें कीं मद्यपाननिषेधाच्या चळवळीस यश येत आहे. पंधरा वर्षांपूर्वीं म्हणजे १८७०–७१ सालीं लोक हल्लींच्या मानानें अधिक दारुडे होते. म्हणजे याचा अर्थ असा कीं, इंग्लंड या व्यसनापासून स्वतःची मुक्तता करून घेत आहे, पण ही ब्याद त्यानें हिंदुस्थानांत पाठविली आहे! (It would seem that the evil has been transferred to India from England ).

दुसरी एक गोष्ट नारायणरावांच्या विशेष लक्ष्यांत त्याच वेळीं आली ती अशी कीं, इंग्लंडचे लोक बरेच उदार व कमी दुराग्रही आहेत. १८८५ सालची ही गोष्ट. पण, त्यापूर्वींचा दहापंधरा वर्षांचा काळ घेतला, तर हिंदुस्थानांतून तेथें गेलेल्या एखाद्या हिंदी मनुष्याला इंग्लिश लोकांच्या तर्फे पार्लमेंटमध्यें निवडून येण्यासाठीं

इंग्लिश लोकांनीं उभें राहूं दिलें असतें काय ? त्याला प्रथमतः तूं ख्रिस्ती धर्माचा अनुयायी आहेस काय, असा प्रश्न विचारला असता व अशाच प्रकारचे प्रश्न विचारून त्याला भंडावून सोडलें असतें ! पण नारायणराव तेथें असतांना स्थिति बदलली होती. लोक उदार झाले होते. तथापि कांहीं लोकांत हा परधर्मीय आहे ही भावना होतीच. मनमोहन घोष ह्यांच्या निवडणुकीसंबंधाच्या एका सभेंत श्रोत्यांपैकीं एका इसमानें "आपण खिस्ती धर्मानुयायी आहांत काय" असा प्रश्न केलाच ! प्रश्न विचारला आहे तेव्हां त्याला उत्तर हें द्यावयास पाहिजेच असें वाटून बाबू मजकूर उत्तर देऊं लागणार तोंच श्रोत्यांनींच "उत्तर देऊं नका" "उत्तर देऊं नका" असा ओरडा केला ! त्यांनीं आपलें हें पालुपद सारखें चालविलेंच होतें. अखेरीस बाबू महाशयांना उत्तर देण्याचा नाद सोडावा लागला. ह्यावरून हें उघड होतें कीं, मनमोहन ह्यांच्या निवडणुकीच्या बाबतींत नवें विघ्न उपस्थित व्हावें अशी मतदारांची इच्छा नव्हती. असो. आपल्या घरीं वर वर्णन केल्याप्रमाणें सर्वत्र व्यवस्था ठेवणारीं हीं मध्यम स्थितींतील माणसें एकदां घराबाहेर पडलीं म्हणजे मग त्यांची धांदल पहावी. रस्त्यावर आल्यावर येणारीं जाणारीं माणसें पहातांच तीं अत्यंत उद्योगी असल्याचें दिसून येतें. कोणी रेंगाळत आहे, किंवा उगीच बसून राहिलें आहे, किंवा रस्त्यावर उभें राहून चकाट्या पिटीत आहे, असें सहसा दिसून येत नाहीं. पुरुष व बायका अगदीं घाईघाईनें रस्ते चालत असल्याचें दिसून येतें, जणूं काय त्यांस हळूहळू चालतांच येत नाहीं ! परंतु एखादा हिंदी गृहस्थ आपलें राष्ट्रीय शिरस्त्राण डोक्यावर ठेवून रस्त्यानें जाऊं लागला कीं एवढ्या लगबगीनें चालणारे लोक क्षणभर त्या माणसाची टेहेळणी केल्यावांचून पुढें पाऊल टाकावयाचे नाहींत ! आणि राष्ट्रीय शिरस्त्राण घरीं ठेवून युरोपिअन पद्धतीची एखादी टोपी डोक्यावर ठेवून रस्त्यानें चालूं लागल्यास कोणाचें लक्ष जात नाहीं ! [१३]

आतां स्वतः नारायणरावांनीं ह्या धामधुमीच्या दिवसांत कित्येक व्याख्यानें दिलीं. एका व्याख्यानाच्या वेळीं स्वतः मि. जॉन ब्राइट अध्यक्ष होते. त्यांनीं दिलेलीं सर्व व्याख्यानें उपलब्ध नाहींत, जीं आहेत त्यांवरून त्यांच्या कामगिरीचें साधारण स्वरूप लक्ष्यांत यावयास कांहीं हरकत नाहीं. शिवाय आपण हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, हिंदी प्रतिनिधि एका विशिष्ट हेतूनें गेले होते. तो हेतु पूर्ण करण्यासाठीं त्यांस व्याख्यानें द्यावयाचीं होतीं, म्हणजे त्यांचें कार्य मर्यादित होतें. हिंदुस्थानासंबंधानें तेथील लोकांस माहिती देऊन ह्या देशाच्या कल्याणाची त्यांचेवर कोणत्या प्रकारची जबाबदारी आहे ह्याची जागृति त्या लोकांत उत्पन्न

१३. प. वा. सदाशिव पांडुरंग केळकर ह्यांनाही आपल्या फेऱ्यासंबंधानें असाच अनुभव १९०० सालीं आला होता.

करावयाची होती. हें कार्य नारायणरावांनीं अत्यंत समाधानकारक रीतीनें केलें ह्याविषयीं त्यावेळीं कोठेंही दुमत नव्हतें. त्यांनीं स्त्रियांच्या क्लबमध्येंही येथील सामाजिक स्थितीसंबंधानें व्याख्यान दिल्याचें वर आलेंच आहे. राजकीय सभांतून व्याख्यानें देतांना ते एकदम विषयास आरंभ करीत नसत. आपण परदेशांत आलों आहों, आपण परदेशीय आहों, आपली मातृभाषा वेगळीच, इतरांच्या ज्या भाषेंत आपल्याला आपले विचार प्रदर्शित करावयाचे आहेत त्या भाषेचें आपलें ज्ञान तुटपुंजें आहे, तेव्हां आपल्याला सांभाळून घ्यावें अशा अर्थाची विनंति ते प्रारंभीं श्रोत्यांस करीत असत व त्याचा नेहमीं इष्ट परिणाम होत असे. अशा प्रकारची प्रस्तावना केल्यावर एका व्याख्यानाच्या वेळीं ते म्हणाले, आम्ही येथें आपल्याला जी विनंति करीत आहों ती आपण स्वस्थ चित्तानें ऐकून घेतां हें खरें, परंतु कोणी सहज असा प्रश्न करण्याचा संभव आहे कीं, आपण आपल्या स्वतःच्या भानगडींत मग्न असतां, हे एवढ्या दूर देशीं रहाणारे लोक ऐन गडबडीच्या वेळीं येथें येऊन लुडबुड कां करीत आहेत ? आमची आमच्या पार्लमेंटची निवडणूक व ह्यांचा देश व त्यांचें कल्याण यांचा काय संबंध आहे ? हिंदी लोकांना अगर हिंदुस्थान देशाला पार्लमेंटच्या निवडणुकींत मताधिकार नाहीं, निवडणुकीवर हिंदुस्थानचें हिताहित अवलंबून नाहीं, तर मग ह्याच वेळीं आपल्या देशाचें रडगाणें घेऊन ही मंडळी येथें कां आली आहे ? नारायणराव म्हणाले, 'ह्याचा खुलासा मी जो करणार आहें तो आपणां सर्वांस मान्य होईल अशी आशा आहे. ह्या बाबतींत पहिली जी गोष्ट आपण लक्ष्यांत ठेविली पाहिजे ती ही कीं, हिंदुस्थान देशाच्या एकंदर राज्यव्यवहारामध्यें, आम्हां हिंदी लोकांना कांहीं सत्ता नाहीं. (...In the Government of India the people of India have no voice) हिंदुस्थान सरकारचें कौन्सिल, किंवा तुमच्या येथलें इंडिया ऑफिस ह्यांत हिंदी लोकांचे प्रतिनिधी नाहींत.[१४] ह्या दोहोंस जाब विचारण्याचा अधिकार पार्लमेंटला आहे व पार्लमेंटला जाब विचारण्याचा अधिकार तुम्हांला आहे. तुम्ही जी ब्रिटिश जनता, त्यांच्यापुढें पार्लमेंट नमून आहे, म्हणून आम्ही तुमच्यापाशीं दाद मागण्यास आलों आहों. तुम्ही आतां निवडणुकीच्या गडबडींत आहां, त्यावेळीं केवळ आपल्या हितापुरती दृष्टि ठेवूं नका. केवळ ब्रिटिश मतदार म्हणून तुम्ही मतें न देतां हिंदुस्थानाच्या वीस कोटी प्रजेचें कल्याण करण्याची जबाबदारी तुमच्यावर आहे हें लक्ष्यांत ठेवून तुम्ही निवडणूक करा. तुम्हांला तुमच्या पार्लमेंटचा अभि-

१४. १८८५ सालीं तशी स्थिति होती. इंडिया ऑफिसचे पहिले हिंदी सभासद सर सय्यद हुसेन बेलग्रामी व मि. बी. एल्. गुप्त ह्यांच्या नेमणुका १९०६ नंतर झाल्या.

मान आहे, व हिंदुस्थान देश हा तुमचा आहे ह्याबद्दलही तुम्हांला अभिमान वाटत आहे. आम्ही दयाळू राणीसरकारची प्रजा आहों, याचा आम्हांस अभिमान आहे. आतां तुमचा-आमचा हितसंबंध एकच झाला आहे हें तुम्ही लक्ष्यांत वागविलें पाहिजे. आणि हें सांगण्यासाठींच आम्हीं येथें आलों आहों. हिंदुस्थानच्या हिता-संबंधीं ज्यांना कळकळ असेल, अशांचीच तुम्ही पार्लमेंटमध्यें निवडणूक करा. पार्ल-मेंटच्या सभासदांनीं ज्या विशेष गोष्टींकडे लक्ष द्यावें असें आम्हांस वाटतें त्यांपैकीं कांहींविषयीं मी आपल्याला थोडी माहिती देतों. हिंदुस्थानांत दरवर्षी कोठल्याना कोठल्या भागांत लहान अगर मोठ्या प्रमाणावर दुष्काळ हा आपला ठेवलेलाच आहे, हें लक्षांत घेऊन दुष्काळाचे परिणाम टाळण्यासाठीं कांहीं योग्य उपाय-योजना होणें जरूर आहे हें जाणून लॉर्ड लिटन ह्यांनीं १८७८ सालीं ' लायसेन्स टॅक्स ' ह्या नांवाचा एक नवीनच कर बसविला. ह्या कराचा विशेष असा होता कीं, तो मोठमोठ्या अधिकाऱ्यांवर, वकील-डॉक्टरांवर (Professional classes) बसविलेला नव्हता. तो उद्योगधंदे करणारांवर बसविला होता. लहानसहान प्रमाणा-वर धंदे करणारांवरही तो बसला होता. त्यावेळीं हा कर सर्वांवर सारखा बसला नव्हता म्हणून सर्वत्र मोठमोठ्या सभा झाल्या, हा अन्याय आहे, केवळ कांहीं लोकांवर कर लादणें हें गैर आहे असें त्यावेळीं प्रतिपादण्यांत आलें, परंतु त्यावेळीं सरकारनें असें आश्वासन दिलें कीं, ह्या कराचा उपयोग दुष्काळ टाळण्या-साठीं उपाययोजना करण्याकडे होईल व ज्यांच्यायोगें पैदास होईल असे कारखाने काढण्यासाठीं ह्या कराचा उपयोग केला जाईल, त्यावेळीं ही चळवळ मंदावली. आतां हिंदुस्थान सरकारनें हें आपलें वचन पाळलें काय असें आपण सहज विचा-राल ! याचें उत्तर हें आहे कीं हिंदुस्थान सरकारनें हें आपलें वचन मुळींच पाळलें नाहीं, एवढेंच केवळ नाहीं तर तो फंडच मुळीं गडप झाला ! त्यावेळीं तर असें म्हणत असत कीं, हा फंड कोठें गडप झाला ह्याची सरकारलाही माहिती नाहीं ! (The phrase as it then went was that "the Famine Insurance Fund had disappeared without the knowledge of Government.) वास्तविक पहातां दुष्काळ टाळण्यासाठीं, किंवा हिंदुस्थानास दुष्काळासारखी आपत्ति सहन करण्याचें सामर्थ्य यावें ह्यासाठीं काढलेला हा फंड अफगाणा-विरुद्ध लढलेल्या लढाईंत गडप झाला ! (श्रोत्यांनीं ह्यावेळीं आपली पूर्ण नाप-संति दाखविली हें पाहून,) आपल्याला माझे विचार मान्य होत आहेत हें पाहून मला संतोष वाटतो. कारण त्यावरून हिंदुस्थानासंबंधानें आपल्या ठिकाणीं जागृति होत आहे हें उघड होत आहे. सारांश, एकदां हा फंड गडप झाला त्याप्रमाणें पुन्हाही गडप होण्याचा संभव आहे. कोणाला कदाचित् असें वाटण्याचा

संभव आहे कीं कांहीं चुकीमुळें हा प्रकार झाला असावा; पण मला वाटतें हें नेहमींच असें व्हावयाचें. परवां स्टेट सेक्रेटरीसाहेबांनीं अगदीं पार्लमेंटमध्यें सांगितलें कीं, हा फंड गट्ट केला गेला आहे! पूर्वीं सरकारची भाषा गडप झाला अशी होती, आतां तो गट्ट केला गेला असें म्हटलें जात आहे! ( The phrase some years ago was that the Famine Insurance Fund had disappeared and the phrase now is that it has been eaten up.) आतां तो तिसऱ्यांदा आणि चवथ्यांदा खाल्ला जाणार नाहीं कशावरून? पण मी आपल्याला विचारतों, आपण इंग्लंडमध्यें एक क्षणभर तरी असला प्रकार चालूं दिला असता काय? ('मुळींच नाहीं' अशी गर्जना!) मुळींच नाहीं, खरें ना? मग मी असें म्हणतों कीं, ज्याप्रमाणें एक क्षणभरही हा असा प्रकार आपण इंग्लंडमध्यें चालूं दिला नसता, त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतही तुम्ही हा असा प्रकार एक क्षणभरही चालूं देतां नये. आम्हांला आमच्या देशाच्या राज्यव्यवस्थेंत कांहीं अधिकार नाहीं, आम्हांला कोणी विचारीत नाहीं, आमच्या हातीं कांहीं सत्ता नाहीं; पण तुमचें तसें नाहीं, म्हणून मी आपल्याला विनंति करितों कीं हिंदुस्थानच्या जमाखर्चाच्या प्रश्नामध्यें आपण मन घाला व असे प्रकार पुन्हां न होतील अशी खबरदारी घ्या. दुसऱ्या एका प्रश्नाकडे आपलें लक्ष वेधावें अशी आमची इच्छा आहे. हा प्रश्न म्हणजे लष्करी खर्चाचा. १८५७ सालच्या बंडानंतर लॉर्ड मेयोनीं असें ठरविलें कीं हिंदुस्थानचा लष्करी खर्च सालीना १२$\frac{1}{2}$ लक्ष पौंडांवर जातां नये. असा नियम असून हा खर्च वाढतां वाढतां १७ लक्षांपर्यंत गेला आहे. पुढें १८७९ सालीं लॉर्ड लिटन ह्यांनीं लष्कर कमिशन नेमलें व ह्या कमिशननें खर्च कमी करावा, जिकडे तिकडे काट-कसर करावी व कमींत कमी दीड लक्ष पौंडाची खर्चांत काट करावी असें सुचविलें. ह्या सूचना केव्हांही अमलांत आणिल्या गेल्या नाहींत, एवढें चकेवळ नव्हे तर हिंदुस्थानसरकार, व इंडिआ ऑफिस ह्यांनीं संगनमत करून पूर्वी कांहीं मागमूस न लागूं देतां एकाएकीं दरवर्षी दोन लक्ष पौंडांनीं लष्करी खर्च वाढवावयाचा असें ठरवून टाकलें! आतां आपणच विचाराल कीं एवढें आर्मी कमिशन मुद्दाम नेमलें आणि त्या कमिशननें इतका इतका खर्च कमी करावा असें स्पष्ट रीतीनें सुचविलें, तरीही कमिशनची निश्चित सूचना अमलांत आली नाहीं, हें कसें? ह्याचें एकच उत्तर आहे. तुम्ही ब्रिटिश लोकांनीं हिंदुस्थानच्या हिताहिताच्या प्रश्नांत आजपर्यंत मन घातलें नाहीं, त्याचा हा परिणाम आहे. तुम्ही जर ह्या किंवा अशा विषयांत मन घालूं लागलां, तर इंडिया ऑफिस किंवा हिंदुस्थान सरकार ह्यांस लष्करावर अवा-सवा खर्च करून लोकांवर त्याचें ओझें लादण्यापूर्वी त्यांस चांगलाच विचार करावा लागेल. हे जे विषय आहेत ते तुमच्या पार्लमेंटच्या सभासदांनीं विचारांत घेतले

पाहिजेत; कारण, हिंदुस्थान देश हा तुमचा झालेला आहे, तेव्हां पार्लमेंट हिंदुस्थान सरकार किंवा इंडिया ऑफिस ह्यांच्या ठिकाणीं त्यांच्यावरील जबाबदारीची जाणीव उत्पन्न करूं शकेल. हा लष्करी खर्च एवढा वाढविण्याची जरूर काय? किंवा दुष्काळ टाळण्यासाठीं काढलेल्या फंडाचा लष्कराच्या तैनातीकडे कां व्यय करावयाचा? खरें पाहतां रशिया हिंदुस्थानवर स्वारी करील ही भीति ह्या अवाढव्य खर्चाच्या मुळाशीं आहे! आपण इंग्रज लोक आमचे मित्र आहां. तेव्हां आपल्याला रशियानें हिंदुस्थानावर स्वारी करूं नये असें ज्या प्रमाणें वाटतें, त्याचप्रमाणें आम्हां हिंदी लोकांना देखील असेंच वाटत आहे कीं, आमचा व रशियाचा कांहींही संबंध येऊं नये. असें आम्हांला कां वाटत असावें असा विचार तुमच्या मनांत सहजच येईल. आमचें उत्तर अगदीं साधें व सरळ आहे. तुमच्या स्वातंत्र्याच्या तत्त्वावर चाललेल्या संस्था, तुमचें न्याय्य काय आहे तें प्रथम शोधून काढणें, व नंतर तें घडवून आणणें, जर कोठें कांहीं अन्याय झाला असला, कांहीं गैर गोष्ट झाली असली, तर त्याचा पाठलाग करून न्याय प्राप्त करून देणें, न्याय्य परिणाम घडवून आणणें हें जेथें अंगवळणीं पडलें आहे तेंच राष्ट्र, तेच लोक आमचा अभ्युदय करूं शकतील आणि जें राष्ट्र आपल्याच लोकांवर जुलूम करीत आहे तें दुसऱ्या देशाला औदार्यानें आणि प्रेमानें वागवील हें संभवनीय नाहीं. ह्यासाठींच आमचें असें स्पष्ट मत आहे कीं रशियाचा आमच्या हिंदुस्थानशीं कांहीं संबंध असूं नये व हिंदी लोकांवर ब्रिटिशांचीच सत्ता असावी. परंतु तुम्ही ही साधी गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, हिंदुस्थानामध्यें पैशासंबंधानें बिकट परिस्थिति उत्पन्न करून रशियाला पाऊल पुढें टाकतां येणार नाहीं असें नाहीं, तर हिंदुस्थानांत व सरहद्दीवर जीं साधनें आहेत त्यांचा योग्यरीतीनें उपयोग करून घेतला पाहिजे. उदाहरणार्थ, वायव्य प्रांताकडील सरहद्दीवरील सुलेमान पर्वतांची रांग घ्या. ह्यांचें जर चांगल्या रीतीनें इंग्लंड व हिंदुस्थान ह्यांनीं संरक्षण केलें, तर रशियाची सर्व धडपड व्यर्थ होईल. इंग्लंड व हिंदुस्थान ह्या बाबतींत एक व्हावयास वेळ लागावयाचा नाहीं, मात्र हिंदुस्थानच्या पैशाची उधळपट्टी झाली नाहीं म्हणजे झालें. संरक्षणासाठीं अवश्य तेवढें सैन्य ठेवा, पण गरीब हिंदी लोकांवर निष्कारण कराचा बोजा लादूं नका, एवढेंच आमचें सांगणें आहे. ही गोष्ट ज्यावेळीं पार्लमेंटचे सभासद हिंदुस्थानच्या कल्याणासंबंधानें दक्षता दाखवितील तेव्हांच होणें शक्य आहे आणि म्हणूनच हिंदुस्थानच्या कल्याणाविषयीं आस्था असणारांसच तुम्ही निवडून द्या असें आमचें आग्रहाचें सांगणें आहे. ह्या देशांत आल्यानंतर एक जो आल्हाददायक अनुभव येतो तो असा कीं, तुमचा-

आमचा देश जरी एक नाहीं, भाषा एक नाहीं, विचार एक नाहींत, रीतीभाती एक नाहींत, तरी तुम्हांपैकीं कांहीं लोकांनीं आमच्या हितासंबंधानें नेहमीं दक्षता दाखविली आहे, त्यांनीं आमच्या गरजा काय आहेत त्या प्रथम जाणून ते आमच्यासाठीं भांडले आहेत, आमची खरी स्थिति काय आहे ती तुमच्या ध्यानीं आणून देण्यासाठीं ते झटले आहेत. जॉन ब्राइटसंबंधानें अत्यंत आदर वाटत नाहीं असा कोण हिंदी मनुष्य आढळेल! हिंदुस्थानांत सर्वत्र त्यांच्याविषयीं पूज्यभाव वसत आहे. त्यांनीं जरी हिंदुस्थान देश पाहिलेला नाहीं, हिंदी लोकांना पाहिलेलें नाहीं, त्यांच्यापासून ते जरी हजारों कोसांवर आहेत, तरी हिंदी लोकांच्या कल्याणाविषयीं त्यांस खरी कळकळ आहे व ब्रिटिश लोकांपुढें त्यांची खरी स्थिति आणण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. फासेटसारख्या अंध गृहस्थांनीं आमच्या देशाच्या सांपत्तिक स्थितीची प्रत्यक्ष माहिती करून घेण्यासाठीं केलेल्या श्रमाची कल्पना झाली, म्हणजे त्यांचेसंबंधानें आदरावांचून दुसरी कोणती भावना उत्पन्न होणें शक्य आहे? त्याचप्रमाणें तुम्ही लॉर्ड लॉरेन्स, लॉर्ड मेयो व ते थोर व उदार मनाचे गृहस्थ लॉर्ड रिपन ह्यांच्या सारखे व्हाइसरॉय हिंदुस्थानांत पाठवून इंग्लंडची इच्छा हिंदुस्थानचें सात्त्विक कल्याण साधणें हीच आहे याची खातरी पटवून देतां. ह्यांच्यासारखे व्हाइसरॉय हिंदुस्थानांत आले म्हणजे आम्हांला इंग्लंडच्या सत्तेचा अभिमान वाटूं लागतो. म्हणून आम्हां हिंदी लोकांची आपल्याला अशी विनंति आहे कीं ब्राइट, फासेट, लारेन्स, रिपन ह्यांच्याप्रमाणें हिंदुस्थानच्या कल्याणाचा विचार मनांत वागवावयास पार्लमेंटच्या सभासदांस भाग पाडा; हिंदुस्थानच्या हिताच्या प्रश्नांचा त्यांना अभ्यास करावयास लावा, हेंच आमचें तुमच्यापाशीं मागणें आहे आणि आमची ही विनंति तुम्ही इतक्या शांतपणें लक्ष लावून ऐकिली ह्यावरून आमच्यासंबंधानें तुमची सहानुभूति आहेच असें आम्हांस वाटूं लागलें आहे.

नारायणराव स्वदेशीं यावयास निघण्याच्यापूर्वी सर चार्लस् डिल्क ह्यांच्या अध्यक्षतेखालीं तिघांही हिंदी प्रतिनिधींचीं नॉर्थ केन्सिंग्टन ह्या भागांत व्याख्यानें झालीं. त्यावेळीं तेथील एका पत्रानें नारायणरावांसंबंधानें लिहितांना म्हटलें कीं, “नंतर (दुसऱ्या दोघांचीं भाषणें झाल्यानंतर) मि. एन्. जी. चंदावरकर ह्यांचें सर्वांस थक्क करून सोडणारें भाषण झालें. चंदावरकर हे अजमासें तीस एक वर्षांचे तरुण गृहस्थ आहेत. ह्यांचा रंग जसा आहे तसा जर नसता तर ते एखाद्या सुंदर इंग्लिशमनसारखे दिसले असते. आपल्या भाषणाच्या ओघांत ते म्हणाले कीं, आम्ही हिंदी प्रतिनिधींनीं आमच्या शीलासंबंधानें हिंदुस्थानचे खरे व उत्तम मित्र जे सर रोपर लेथब्रिज ह्यांचेकडून एखादा दाखला आणलेला नाहीं हें खरें.

परंतु हें लक्षांत ठेविलें पाहिजे, जो कोणी लॉर्ड रिपनसारख्या पूज्य व प्रिय व्हाइसरॉयची नालस्ती करण्यास पुढें येतो त्यास आम्ही हिंदी लोक हिंदुस्थानचा मित्र समजावयास मुळींच तयार नाहीं. मला तर आतां असें वाटूं लागलें आहे कीं, तुम्ही इंग्रज लोक ब्रिटिशांस भूषणीभूत झालेले जे जॉन ब्राइट त्यांच्या विचारांचे हळूहळू होणार. तुम्ही आपल्या भागातर्फे आमच्या एका देशबंधूला प्रागतिक पक्षाचा उमेदवार म्हणून पार्लमेंटच्या निवडणुकीसाठीं पुढें केलें आहे, हें ऐकून मला फार आनंद वाटतो. मला तर असें वाटतें कीं इंग्लंड व हिंदुस्थान ह्यांच्यांतील प्रेमग्रंथि अशा रीतीनें इतकी दृढ होणार आहे व हे दोन्ही देश सारख्या हितसंबंधामुळें इतके निगडित होणार आहेत कीं, चढेलपणा करून येणारा रशिया, किंवा इतर कोणताही परकीय सत्ताधीश यांना ही ग्रंथि तोडणें अशक्य होणार आहे. हिंदुस्थानच्या लोकसंख्येपैकीं तीनचतुर्थांश लोक शेतकरी आहेत. १८७९ सालच्या कमिशननें हें कबूलच केलें आहे कीं, अमेरिकेंतल्या गुलामाच्या संस्थानांतील निग्रोंची स्थिति हिंदुस्थानांतील शेतकरी वर्गापेक्षां आठ पटीनें चांगली आहे! आंकडेशास्त्रज्ञ डॉ. हंटर ह्यांनीं असें म्हटलें आहे कीं, वर्षाच्या प्रारंभापासून शेवटपर्यंत चाळीस लक्ष लोकांस पोटभर अन्न एक दिवसही मिळत नाहीं. १८६७ सालीं स्वतः लॉर्ड लॉरेन्स ह्यांनीं म्हटलें कीं, हिंदुस्थानांतील प्रजा कशी तरी जीव धरून आहे! १८८१ सालीं लॉर्ड रिपन ह्यांच्या कारकीर्दींत सरकारी रीतीनें असें जाहीर झालें कीं, हिंदुस्थानांत दर माणशीं दोन पौंड उत्पन्न पडलें, तर इंग्लंडमध्यें हें प्रमाण माणशीं ३५ पौंड पडतें! पस्तीस व दोन ह्यांतील फरक क्षणभर लक्षांत घ्या. आमच्या अँग्लो-इंडियन मित्रांपैकीं एखादा ह्यावर म्हणेल कीं, हिंदी लोकांचा कोठा हलका असतो, त्यांना खावयास अधिक अन्नाची मुळींच जरूरी नाहीं! दुसरा एखादा तुम्हांला सांगेल कीं, त्यांना कपड्यालत्त्याची कांहीं जरूरी नसते. तिसरा म्हणेल, ह्या लोकांची जिव्हा रोगट बनलेली असते. चौथा सांगेल, नेटिव्हांना मुळीं आत्माच नाहीं! पण ह्या लोकांनीं आपल्याला कांहीं सांगितलें तरी आपण हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे कीं, गेल्या ४५ वर्षांत (१८८५) २८ वर्षें सरकारला तूट आलेली आहे. खर्चापेक्षां उत्पन्न फक्त १८ वर्षें अधिक झालेलें आहे. त्याचप्रमाणें ४० वर्षांत ७५ लक्षांची सूट देणें भाग पडलें, तसेंच आमचें कर्ज पूर्वीं जें फक्त ३९ लक्ष होतें तें आतां (१८८५) एक कोटी एकुणसाठ लक्ष पौंड झालें आहे! लष्करी खर्च १७ लक्ष पौंडांवर आला होता तोही आतां २½ लक्ष पौंडांनीं म्हणे वाढणार आहे. आपल्या आजच्या सभेच्या अध्यक्षांनीं म्हटलें आहे कीं, लष्करासाठीं होणारा एवढा अवाढव्य खर्च पुरा पाडण्यासाठीं जगांतील सर्वांत जो कंगाल देश हिंदुस्थान

देश त्यांतील लोकांवर जबर कर बसवावा लागतो. इकडल्या कलोनिअल ऑफिसचा सालिना खर्च ४० हजार पौंड आहे, इंडिया ऑफिसचा खर्च हिंदुस्थानांतील लोकांकडून घ्यावयाचा असतो म्हणून तो दोन लक्ष तीस हजार पौंड आहे ! एका वर्तमानपत्राचा संपादक ह्या नात्यानें मी असें स्पष्ट सांगतों कीं, त्या मुस्कुटदाबी कायद्यान्वयें एखाद्या जुलमी अधिकाऱ्याच्या तावडींत सांपडून त्याच्या हुकमान्वयें माझी सर्व मालमत्ता सरकारजप्त करून घेण्यापेक्षां जज्ज व ज्युरी ह्यांच्यापुढें माझी योग्य रीतीनें चौकशी होऊन माझें सर्व म्हणणें शांतपणें ऐकून घेतल्यानंतर मला शिक्षा होऊन तुरुंगांत पाठविलें तरी तें मी पत्करावयास तयार होईन ! लॉर्ड लिटन व सर रोपर लेथब्रिज ह्यांनीं येथें येऊन हिंदुस्थानांतील आपल्या कृत्यांवर सारवण घालण्याचा प्रयत्न करणें, किंवा आपण जें कांहीं केलें तें योग्य व अवश्यच होतें असें भासविण्याचा प्रयत्न करणें, म्हणजे ब्रिटिश लोकांना स्वतःपुरता विचार करण्याचें व सत्यासत्य शोधून काढण्याचें सामर्थ्य नाहीं असें गृहीत धरून चालण्यासारखें आहे. परंतु येथल्या लोकांना सत्य प्रिय आहे, त्यांना एकदां हिंदुस्थानांतील वस्तुस्थितिसंबंधानें खरीखरी माहिती झाली म्हणजे त्यांची दिशाभूल करणें हें फार अवघड काम आहे, असें लवकरच लॉर्ड लिटन व सर रोपर लेथब्रिज ह्यांस आढळून आल्यावांचून रहाणार नाहीं.

हिंदी प्रतिनिधी विलायतेंतील लोकांमध्यें हिंदुस्थानांतील लोकांची काय स्थिति आहे, त्यांच्या मागण्या काय आहेत, सरकारचा व त्यांचा संबंध कोणत्या प्रकारचा आहे, राज्यकारभारांत प्रजेचा हात किती आहे याची माहिती देण्यासाठीं गेले होते. आपला हेतु हा असा आहे असें त्यांनीं अनेक ठिकाणीं वारंवार सांगितलें व त्याची पुनरावृत्ति वर्तमानपत्राच्या प्रतिनिधींस आपल्या हेतूंची माहिती देतांना व हिंदुस्थानची खरी माहिती सांगतांना केली होती; असें असून लिबरल पार्टीच्या लोकांनीं ह्यांना आणविलें, कॉन्झरव्हेटिव्ह पार्टीचा पाडाव करणें हा यांचा हेतु आहे अशा प्रकारचे गैरसमज कां झाले ह्याचें स्पष्टीकरण स्वतः नारायणरावांनींच केलें आहे तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ते म्हणतात कीं आम्ही आमच्या भाषणांत लॉर्ड लिटन ह्यांच्या राज्यकारभारासंबंधानें नापसंती दर्शवीत होतों आणि लॉर्ड लिटन कान्झरव्हेटिव्ह होते. तसेंच लॉर्ड रिपन ह्यांची कारकीर्द अत्यंत यशस्वी झाली होती म्हणून साहजिकच आम्ही त्यांची स्तुति करीत असूं. आणि लॉर्ड रिपन हे लिबरल पक्षाचे होते ! आतां ह्या दोघांच्या कारकीर्दीविषयीं बोलतांना एक कान्झरव्हेटिव्ह आहे व दुसरा लिबरल आहे असा उल्लेख जरी आम्ही करीत नव्हतों, तरी कोणत्या तरी एका पक्षाच्या चष्म्यांतून अशा विषयांकडे पहाण्याची संवय झालेले लोक एकाची स्तुति व दुसऱ्याविषयीं असमाधान अनुभवून आम्हांस लिबरल पक्षाचे

समजत व त्यांची समजूत करण्याचे प्रयत्न व्यर्थ जात. आणखीही ह्याला एक कारण झालें. लष्करी खर्च कमी झाला पाहिजे असें आम्ही निक्षून सांगत होतों. आणि लॉर्ड रँडाल्फ चर्चिल खर्च वाढविला पाहिजे असें म्हणत होते व ते कान्झरव्हेटिव्ह होते! ह्यामुळें जो तो आम्हांला लिबरल पक्षाचे म्हणूं लागला. त्यामुळें टोरी पेपर्सनीं आमच्या विरुद्ध गोंगाट करावयास सुरवात केली आणि हिंदुस्थानांत राहून पेन्शन घेत आलेले लोकही त्यांची री ओढूं लागले व लोकांचा गैरसमज करूं लागले. एका उदारधीनें तेथें उठविलें कीं हे लोक नीच जातींपैकीं असून त्यांनीं पूर्वेकडील संस्कृतीच्या व चालीरीतींचा त्याग केलेला आहे. ("Low caste men" who had "cast off the religious and social traditions of the East"). एकानें ह्या तिघांना जहाल ठरवून हे आपण होऊनच हिंदुस्थानचें प्रतिनिधित्व आपल्याला चिकटवून घेत आहेत असें म्हटलें. दुसऱ्या एकानें हा निवडणुकीच्या वेळचा डाव आहे असें जाहीर केलें. एका महाभागानें असा शोध लावला कीं, लॉर्ड रिपनची हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेच्या बाबतींत पूर्ण फटफजिती झाली आहे, तेव्हां त्यावर लॉर्ड रिपन ह्यांच्या इच्छेवरूनच ही मंडळी सफेती फांसण्यासाठीं इकडे आली आहे. ह्याहीपेक्षां घाणेरडे आरोप करून कुत्सितपणाची अतिकोटी केलेले व सभ्यपणा गुंडाळून ठेवून लिहिलेले लेख वर्तमानपत्रांतून त्यावेळीं प्रसिद्ध झाले. हे लेख हिंदी प्रतिनिधींची नाचक्की करण्यासाठीं जरी प्रसिद्ध झाले, तरी हा सर्व प्रकार हिंदी प्रतिनिधींस लाभदायक व त्यांच्या एकंदर योजनेस फलदायकच झाला! त्यांना व त्यांच्या विचारांस अधिक प्रसिद्धी मिळाली व जो तो, कोणत्याही हेतूनें कां होईना हिंदी लोकांचें म्हणणें तरी काय आहे तें कळण्याविषयीं उत्सुक झाला. हिंदी प्रतिनिधींनाही हेंच हवें होतें!

आतां, ह्या हिंदी प्रतिनिधींच्या कामगिरीसंबंधानें तिकडल्या वर्तमानपत्रांनीं कोणत्या प्रकारचे अभिप्राय प्रकट केले हा मुद्दा राहिला. त्याचा विचार करितांना तेथील बहुतेक सर्व वर्तमानपत्रें कोणत्या तरी एका पक्षास चिकटलेलीं असतात ही गोष्ट प्रथम लक्षांत ठेविली पाहिजे. लंडन टाइम्ससारख्याप त्राच्या कलकत्त्याच्या बातमीदारानें गैरसमज पसरविण्याचे प्रयत्न केले. त्याचा परिणाम असा झाला कीं, हिंदी प्रतिनिधींना टाइम्सद्वारें आपली बाजू लोकांपुढें मांडतां येईना. मि. घोष ह्यांनीं पाठविलेल्या पत्रास त्या पत्रांत स्थळ मिळालें नाहीं. हा प्रकार पहाट होऊं नये म्हणून म्हातारीनें आपला कोंबडा झांकून ठेवण्यासारखा होता. टाइम्सचा आश्रय मिळाला नाहीं, तरी दुसऱ्या पत्रांनीं प्रतिनिधींचें अभिनंदन केलें व त्यांच्या विचारांचा अनुवाद करून लोकांस जागें केलें. **मँचेस्टर गार्डिअन** पत्रानें म्हटलें कीं हिंदी प्रजेसंबंधानें इकडल्या लोकांचें कसें

प्रेम आहे, त्यांच्या कल्याणाविषयीं कशी आस्था आहे, एवढें जरी हिंदी प्रतिनिधींच्या येथील कार्यामुळें सर्वांस कळून चुकलें तरी त्यांच्या येथें येण्यानें पुष्कळच कामगिरी झाली असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. आतां जे कोणी असें म्हणत आहेत कीं हे लोक आपण हिंदुस्थानचे प्रतिनिधी आहोंत असें लटकेंच भासवीत आहेत, व संपूर्णपणें प्रातिनिधिक तत्त्वावर त्यांची निवडणूक झालेली नाहीं, त्यांस हेंच चोख उत्तर आहे कीं आजच्या स्थितींत कोणत्याही संस्थेस हिंदुस्थानच्या सर्व प्रजेचें प्रितिनिधित्व आपल्याकडे घेतां यावयाचें नाहीं, हें जाणूनच नुक्त्याच येऊन गेलेल्या प्रतिनिधींचें आम्ही स्वागत केलें; परंतु वरील आक्षेप घेणारांनीं हिंदुस्थानच्या प्रजेच्या वतीनें कोणत्या प्रकारें निवड केली असतां ती प्रातिनिधिक होईल हें सांगितलेलें नाहीं." आतां हिंदुस्थानच्या प्रतिनिधींचें स्वागत सर्व पक्षांकडून सारख्या रीतीनें होणें शक्य नव्हतें हें सर्वांस माहीत होतें व कांहीं वृत्तपत्रांनीं तसे उद्गार काढलेही. **एको** नामक पत्रानें म्हटलें कीं ह्या हिंदी प्रतिनिधींचीं भाषणें सर्व पक्षांचे लोक ऐकून घ्यावयाचे नाहींत. कांहीं लोक, विशेषतः अधिकारी व कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचे लोक, त्यांची थट्टा करितील, अँग्लो इंडिअन लोकांचीं हिंदुस्थानांतील पत्रें त्यांच्यावर औपरोधिक टीका करितील. परंतु त्यांच्या भाषणांच्या योगें एकंदरींत हितच होईल. ते आज जें बीज पेरितील तें पुढें उगवल्यावांचून राहावयाचें नाहीं. खरें पाहिलें तर हिंदुस्थानच्या पैशावर आमची चैन चाललेली आहे. आणि आतां आम्हीं जर काटकसर केली नाहीं तर आमचा कारभार हिंदुस्थानास लाभदायक न होतां त्या देशास क्लेशकारकच होईल. आमच्या हातून ही चूक विचाराच्या अभावामुळें होत आहे, हिंदुस्थानचें अकल्याणच करावयाचें हा कांहीं आमचा हेतु नाहीं. "इव्हिनिंग एक्सप्रेस" पत्रानें त्यावेळीं म्हटलें होतें कीं, निवडणुकीच्या ऐन धामधुमीच्या वेळीं हिंदुस्थानची खरी स्थिति व तेथील प्रजेची इच्छा येथील मतदारांस कळविण्यासाठीं जे प्रतिनिधी आले होते, त्यांस येथील लोकांपुढें व्याख्यानें देण्याचे अनेक प्रसंग आले. आयर्लंडच्या लोकांच्या प्रथमच्या मागण्या माफकच होत्या. त्याही न मिळाल्यामुळें तें प्रकरण आतां जोईजड झालें आहे. तेथील असमाधान आज इतकें वाढत्या प्रमाणावर आहे कीं, येथील कायदेकानूंतील सुधारणा त्यामुळें होत नाहीं व आयर्लंड म्हणजे मार्गांतील कांटा होऊन बसला आहे. हिंदुस्थानच्या बाबतींत ह्यावरून आम्ही धडा घेतला पाहिजे. आज हिंदुस्थानांतील लोकांच्या मागण्या अगदीं माफक आहेत. म्युनिसिपालिट्यांची सर्वत्र स्थापना व कायदे करणाऱ्या कौन्सिलची पुनर्घटना एवढ्याच त्यांच्या निकडीच्या मागण्या आहेत. ह्या मागण्या लवकरच पूर्ण झाल्या तर ब्रिटिश सत्तेवरील निष्ठा बळावेल. कॉन्झरव्हेटिव्ह

पक्षाच्या लोकांना आपला बडेजाव वाढावा असें नेहमीं वाटत असतें. त्यांनीं नारायण गणेश चंदावरकरांचे पुढील उद्गार लक्षांत ठेवावे: "परकीय लोकांस जिंकणें व त्यांचेवर करडा अंमल चालविणें हें कार्य सोपें आहे. असें करणें भूषणावहही मानलें जाण्याचा संभव आहे. परंतु पराभूत लोकांना ज्ञानामृत पाजणें व त्यांच्या उन्नतीसाठीं झटणें हें भूषण चिरकाल टिकणारें आहे." "आतां नवी पार्लमेंट झाली म्हणजे पार्लमेंटनें हिंदी लोकांच्या न्याय्य मागण्यांचा विचार केला पाहिजे. हिंदी लोकांची समजूत करण्यासाठीं नांवाला इकडे तिकडे थोडी काटकसर केल्याचें दाखवून भागावयाचें नाहीं. आतां एकंदर राज्य करण्याच्या पद्धतींत बदल झाला पाहिजे. (There must be a change of policy.) आमची एकंदर पद्धत नव्या, उदार व कमी खर्चाच्या योजनेनुसार चालू झाली पाहिजे," असें दुसऱ्या एका पत्रानें लिहून एकंदर परिस्थिति आपल्या लक्षांत आल्याचें निदर्शनास आणून दिलें. हिंदी प्रतिनिधी ज्यावेळीं लंडन येथें गेले तेव्हां पुष्कळ व्यक्तींनीं व वृत्तपत्रांनीं त्यांच्याविषयीं शंका उत्पन्न करावयास सुरवात केली. कोणी म्हणावें ह्यांना लिबरल पार्टीनें येथें आणिलें आहे, कोणी म्हणावें लॉर्ड रिपन ह्यांनीं आपली कीर्ति उज्वल करून घेण्यासाठीं हीं भाडोत्री माणसें पैदा केलीं; कोणी म्हणावें हे मुळीं हिंदुस्थानचे प्रतिनिधीच नव्हत, ह्यांना हिंदुस्थानच्या गरीब लोकांच्या वतीनें बोलण्याचा हक्कच नाहीं इत्यादि प्रकारच्या हरकतींची वाचकांस ह्यापूर्वीच कल्पना झालेली आहे. कांहीं व्यक्तींची व वर्तमानपत्रांची ही कारवाई हिंदी प्रतिनिधींस जाचक होण्याचा संभव आहे, हें जाणून कित्येक वर्तमानपत्रांनीं लोकांस प्रतिनिधींच्या कार्याविषयीं योग्य कल्पना करून देण्याचा प्रयत्न केला हें येथें कृतज्ञतेनें कबूल केलें पाहिजे. त्यांच्या साहाय्यामुळें मार्ग पुष्कळ खुला झाला. हिंदी प्रतिनिधींसंबंधाचा गैरसमज दूर करितांना एक पत्रानें म्हटलें कीं "हिंदी प्रतिनिधींच्या हेतूंविषयीं आमची पूर्ण सहानुभूति आहे व त्यांचें येथें येणें हें आम्हांस पूर्णपणें मान्य आहे. त्यांचा मुख्य हेतु हिंदी लोकांच्या रास्त आकांक्षांसंबंधानें येथील लोकांस खरीखरी माहिती देऊन त्यांची सहानुभूति प्राप्त करून घेणें हा आहे. ह्यांत वावगें काय आहे? इंग्लंड व हिंदुस्थान ह्यांच्यांत अधिक प्रेमाचें नातें उत्पन्न व्हावें व परस्परांत मैत्री नांदावी असे त्यांचे हेतु आहेत व त्यांत कांहींहि गैर नाहीं." असो.

अशा प्रकारें अल्पावधींत नारायणरावांनीं इंग्लंडांत संस्मरणीय कामगिरी केली. त्यांच्यासंबंधानें लोकांमध्यें आदर उत्पन्न झाला, ते जीं विधानें करितात तीं संपूर्ण माहितीच्या व अनुभवाच्या जोरावर करितात अशी खात्री झाली व त्यामुळें हिंदुस्थानांत येण्यासाठीं निघण्याच्या दिवसापर्यंत त्यांना व्याख्यानें द्यावीं

लागलीं. ता. ७ डिसेंबर १८८५ रोजीं मि. जॉन ब्राइट ह्यांच्या अध्यक्षतेखालीं संस्मरणीय सभा झाली, व नंतर ते तेथून निघाले व मुंबईस ता. २८ डिसेंबर रोजीं येऊन दाखल झाले. त्यावेळीं इंदुप्रकाश पत्राच्या इंग्रजी बाजूनें आपल्या संपादकाचें पुढीलप्रमाणें स्वागत केलें:—

"मुंबईचे प्रतिनिधि म्हणून विलायतेस गेलेले रा. रा. नारायण गणेश चंदावरकर आज सकाळीं (ता. २८ डिसेंबर १८८५) मुंबईस येऊन दाखल झाले. बाकीचे प्रतिनिधि पुढल्या मेलनें येथें येऊन पोंचण्याचा संभव आहे. नारायणराव सुखरूप परत आपल्या देशीं, आपल्या लोकांत, व आपल्या निकटच्या माणसांत आले, म्हणून आम्ही त्यांचें मनःपूर्वक स्वागत करितों. त्यांनीं विलायतेंत जी मोठी व बिकट कामगिरी केली व जें अपूर्व यश संपादिलें त्याबद्दल आम्ही त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करितों. त्यांनीं इंग्लंड येथें जी अपूर्व कामगिरी केली तिचेबद्दल सगळ्या हिंदुस्थान देशास त्यांनीं ऋणी करून ठेविलें आहे. त्यांच्या कामगिरीकडे पहातां त्यांचेवर लोकांनीं जो विश्वास टाकला होता तो योग्यच होता हें आतां सिद्ध झालें आहे. त्यांच्या ह्या कामगिरीवरून नारायणराव हिंदुस्थानच्या राजकीय चळवळींत पुढाकार घेणारांतील एक उत्तम कार्यकारी असे ठरतील असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं."

नारायणराव परत आल्यानंतर त्यांच्या कामगिरीची माहिती सर्वत्र अधिक प्रमाणावर झाली. त्यांस अनेक ठिकाणांहून अभिनंदनपर पत्रें आलीं. अनेक वर्तमानपत्रांनीं त्यांच्या कामगिरीची प्रशंसा केली व इंदुप्रकाश पत्राकडे त्यांच्या कार्याची स्तुति करणारीं पत्रें पुष्कळच आलीं. तीं सर्व न छापतां फेब्रुआरी महिन्याच्या ८ व्या तारखेच्या अंकांत एक पत्र छापलें गेलें, तें असें:—

रा. रा. नारायण गणेश चंदावरकर, हायकोर्ट वकील, मुक्काम मुंबई, यांस,

वि. वि. आपण ह्या आपल्या विस्तीर्ण देशांतील लोकांची दैनावस्था इंग्लिश लोकांच्या कानांवर घालण्याकरितां त्या देशीं गेलां. इंग्लंड हा देश फारच दूर असून तेथील हवापाणी भिन्न प्रकारचें आहे. जो देश आज अगदीं सुधारणेच्या कळसास पोंचलेला असून, जेथील लोक विद्येनें व ज्ञानानें श्रेष्ठत्व पावले आहेत, जेथील धर्म, भाषा आपल्याहून निराळी असून, जेथील रिवाज व मनोधर्म आपल्याशीं जुळत नाहींत अशा पाश्चिमात्यांच्या जमलेल्या मोठ्या जनसमूहांत, त्यांच्या भाषेंत आपण सुरस व्याख्यानें देऊन त्यांचीं मनें अगदीं थक्क करून दिलींत, इतकेंच नाहीं, आपल्या हेतूंचा त्यांच्या अंतःकरणांत आपण पूर्ण ठसा पटवून दिलात यांत संशय नाहीं! तेव्हां ही गोष्ट आज सामान्य आहे असें कोण म्हणेल?

आपल्या ह्या अपूर्व कृत्यावरून आपल्या अंगीं धैर्यादि गुणांचा पूर्णत्वें वास

असल्याचें दिसत असून आपल्या ह्या दीन झालेल्या देशबांधवांविषयीं आपल्या मनांत फारच कळकळ उत्पन्न झाली आहे असेंच स्पष्टपणें दिसून येत आहे.

आपला व आमचा परिचय नाहीं, व नेवासें हा गांव लहान असून येथें वसतीच्या मानानें साधारण समंजस लोकांची संख्याही अर्थातच कमी आहे. तथापि वर दर्शविलेल्या आपल्या उदार कृत्यांवरून आपल्या ठिकाणीं आमचा जो प्रेमभाव उत्पन्न झाला आहे तो व्यक्त केल्याशिवाय आमच्यानें राहावेना. यास्तव हें लहानसें पत्र लिहून आपल्यास तसदी दिली आहे. अशींच वारंवार सत्कृत्यें करून आपल्या देशबांधवांस सुखवाल अशी आम्हांस उमेद आहे.

आपल्याकरितां मकरसंक्रांतीचे तीळ पाठविले आहेत त्यांचा स्वीकार करून आपल्या ह्या हतभाग्य देशाच्या नेहमीं तिळीं याल अशी आम्ही आशा करितों. श्रम दिल्याची माफी असावी.

ह्या पत्रास सार्वजनिक महत्त्व आहे. अशा संबंधानें इंदुप्रकाशांत अगर दुसरे एखादे वर्तमानपत्रांत हें पत्र छापण्यास दिलें असतां त्यास आमची मान्यता आहे. कळावें, लोभ करावा, हे विनंति.

आपले सेवक,

त्र्यंबक कृष्ण जोशी वकील
रामचंद्र धोंडदेव बडवे
नारायण भिकाजी देशपांडे
दादा महिपत देशमूख पाटील
विनायक जयराम, सरकारी वकील

बळवंत दाजी भोवटे कुळकर्णी
आनंदराव मोहिते
यसराव दयारामभाई गुजराथी
किसनदास बाबाजी गुजराथी
शमसुद्दिन खतीब

नेवासे, जि. अहमदनगर,
ता. २ फेब्रुवारी १८८६.

## प्रकरण चौथें (अ)

# वकील व न्यायाधीश

नारायणरावांनीं १८८१ सालीं एल्‌एल्‌. बी.ची पदवी घेतली. १८८० च्या नोव्हेंबर महिन्यांतील परीक्षा ते पहिल्या वर्गांत पास झाले. पुढें हायकोर्टाचे पुढारी वकील म्हणून प्रसिद्धीस आलेले दाजी आबाजी खरे हेही त्याच वर्षी यांच्याबरोबर पहिल्या वर्गांत पास झाले होते. त्याच वर्षी उमरावतीचे मुधोळकर, मुंबईचे नामांकित वकील व ज्ञानेश्वरीचा मनःपूर्वक अभ्यास केलेले गंगाराम बापसोबा रेळे, हायकोर्टाचे रजिस्ट्रार व नंतर ऑफिशिअल असायनी म्हणून प्रसिद्ध असलेले आर्. डी. सेठना, तसेंच पुढें मुन्सफ म्हणून प्रसिद्धि पावलेले शिवराम सीताराम वागळे हेही त्याच वर्षी ती परीक्षा पास झाले. त्यांच्या पूर्वीच्या वर्षी वासुदेवराव व शिवरामपंत भांडारकर, विष्णुपंत भाटवडेकर, गोविंदराव कानिटकर, मनोहरपंत काथवटे, गणपत सदाशिव राव, बळवंतराव टिळक व उपासनी इ. मंडळी एल्‌एल्‌. बी. झाली होती. हे सर्व गृहस्थ निरनिराळ्या क्षेत्रांत पुढील आयुष्यांत नांवालौकिकास चढले. त्यांतच आमचे चरित्रनायक नारायणराव असणें हें अगदीं योग्यच झालें. वास्तविक पहातां नारायणरावांच्या भोंवतीं एक प्रकारचें वकिली वातावरण होतें. त्यांचे तीर्थरूप जुन्या काळचे वकील होते. ज्यांनीं त्यांस शिक्षणासाठीं मुंबईस आणिलें ते शामराव विठ्ठल जरी प्रथम हायकोर्टांत नोकरीस होते, तरी वकील ह्या नात्यानेंच ते पुढें प्रसिद्धीस आले व त्यांचें उदाहरण रात्रंदिवस नारायणरावांपुढें होतेंच. त्यांचे दुसरे मामा शेषगिरीराव कारवार येथें वकिली करीत होते व त्यांची प्रसिद्ध व नांवाजलेल्या वकिलांत तेथें गणना होत असे. अशा प्रकारें वकिली–वातावरणांत असतांना त्यांनीं आपल्या धंद्यास प्रारंभ केला. नारायणरावांच्या काळीं देशहिताचीं कार्यें करण्याचा भार देशांतील बहुतेक वकील बॅरिस्टरांनींच उचललेला होता. खरें पहातां १८७७ साला-

पासूनच नारायणरावांच्या देशसेवेस प्रारंभ झाला होता. इंदुप्रकाश पत्राचे इंग्रजी बाजूचे संपादक ह्या नात्यानें सार्वजनिक चळवळींशीं त्यांचा प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें संबंध येऊं लागला होता. इंदुप्रकाश पत्राच्याद्वारें त्यांनीं जी सेवा केली तिचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें हें स्वतंत्र प्रकरणांत दाखविलें आहेच. ह्या प्रकरणांत वकील व न्यायाधीश ह्या नात्यानें त्यांच्यांत जे विशेष गुण आढळून आले व न्यायासनावर असतांना त्यांनीं जें विशेष कार्य केलें त्याविषयीं विचार करणें आहे.

नारायणरावांनीं वकिलीस प्रारंभ करतांच त्यांचा धंदा बऱ्या रीतीनें चालूं लागला व पुढें पुढें तर त्यांची गणना धंद्याच्या दृष्टीनेंही अगदीं पहिल्या प्रतीच्या वकिलांत होऊं लागली होती. याला कोणकोणत्या गोष्टी कारण झाल्या त्यांचा प्रथम विचार करूं. सर्वसाधारण समजूत अशी आहे कीं, चांगला वकील उत्तम वक्ता असला पाहिजे. हें जरी अंशतः खरें आहे तरी सर्वांशानें तें खरें नाहीं. उत्तम वक्ते नसूनही उत्तम वकिलांत गणना झालेले कितीतरी वकील दाखवितां येतील. खटल्याची सर्व माहिती मिळवून अनुकूल आधारांची पूर्ण ओळख करून घेणें; प्रतिस्पर्धी जे कांहीं विशेष मुद्दे पुढें आणील त्यांचा जाब काय द्यावयाचा तें पुढें पहातां येईल, हा प्रकार सर्वसाधारण आहे; परंतु जे कांही मुद्दे पुढें उलट बाजूकडून आणले जाण्याचा संभव आहे त्यांची आधींच कल्पना करून उत्तरें तयार करून ठेवणें, सर्व खटला आपलासा करून त्याची योग्य प्रकारें मांडणी करणें, कोर्टांत धिटाईनें तर खरेंच, पण उद्दामपणानें काम न चालवितां व्यवस्थितपणें आपली केस कोर्टापुढें ठेवणें, इ० गोष्टी दिवाणी बाजूकडे वकिलीमध्यें यश यावयास कारण होतात. वकिलाच्या शीलाचा व चारित्र्याचा त्याच्या अशीलावर व न्यायाधिशावरही परिणाम होत असतो. कदाचित् हा परिणाम तितका स्पष्ट नसेल; परंतु वकिलाचें शील व चारित्र्य ह्यांविषयीं प्रत्यक्ष माहिती नसली तरीही मनावर इष्ट असा परिणाम होतोच होतो. नारायणराव एका अब्रूनुकसानीच्या खटल्यामध्यें ठाण्यास एका मॅजिस्ट्रेटपुढें खटला चालविण्यास जात होते. ह्या खटल्यांत जनार्दन दामोदर दीक्षित हे आरोपी होते. हे गृहस्थ पुढें मुन्सफ होऊन डिस्ट्रिक्ट जज्जाच्या हुद्यापर्यंत चढले होते. नारायणराव दीक्षितांच्या बचावाचें काम करीत होते. कोणतीही गोष्ट खरी असली तरी तिची प्रसिद्धी सार्वजनिक हितासाठीं आहे किंवा नाहीं ह्या मुद्यावर विशेष जोर दिला गेला व नारायणराव ही केस हरले. आरोपी माझे परिचित व शेजारी असल्यामुळें तो खटला ऐकण्या-साठीं मी कोर्टांत जात असें. त्यावेळीं नारायणरावांची खटला चालविण्याची पद्धत, त्यांचें वक्तृत्व, त्यांची भव्य व तेजस्वी चर्या, त्यांची तरतरी, भलतेंच विधान मॅजिस्ट्रेट अगर वकील ह्यांच्या तोंडून बाहेर पडतांच त्यांच्या चर्येंत होणारा

फरक, त्यांची हट्टी मॅजिस्ट्रेटशीं होणारी लढाई वगैरे पाहून हे एक विशेष सामर्थ्यवान् वकील आहेत असा माझा समज झाला. वरील सर्व गुण त्यांच्यांत असून त्यांचें वक्तृत्व विशेष परिणामकारक असल्यामुळें त्यांची छाप तात्काळ बसे. आपली लंगडी बाजू झांकण्यासाठीं पुष्कळ प्रसंगीं वकील आपल्या वक्तृत्वावर भिस्त ठेवीत असतात, पण त्याचा परिणाम चाणाक्ष न्यायाधिशाच्या मनावर झालाच तर प्रतिकूळ होण्याचा संभव असतो. ह्यासाठीं नारायणरावांची केवळ वक्तृत्वावर केव्हांही भिस्त नसे. वादविवादपटुत्व हा नारायणरावांचा एक विशेष गुण असे. त्यामुळें त्यांचीं कोर्टांतील भाषणें तर्कशास्त्रास धरून असत. कोर्टांत केस चालू असतां प्रतिपक्षाचे सर्व मुद्दे त्यांच्या आधींच लक्षांत येत असत व त्याच्यावर योग्य वेळीं तुटून पडण्याची त्यांची तयारी असे. वासुदेव गोपाळ भांडारकर ह्यांच्याशीं वादविवादपटुत्व हा जो नारायणरावांचा विशेष गुण त्याचेविषयीं बोलणें निघालें असतांना ते म्हणाले, कोणत्याही आवडीच्या विषयावर वाद करितांना त्यांचें वादविवादपटुत्व तर अनुभवास येतच असे, पण त्याबरोबरच त्यांच्या विस्तृत वाचनाचा अनुभव येई, व आपण एका खऱ्या खऱ्या विद्वान माणसापुढें आहों असें वाटल्यावांचून रहात नसे. प्रथमप्रथम ते अनेक सार्वजनिक कामांत विशेष मन घालीत असत. १८८५ सालीं त्यांनीं विलायतेस जी कामगिरी बजावली त्याची कल्पना मागें केलेल्या विवेचनावरून झालीच आहे. १८८८ सालीं गिरगांव वार्डातर्फे ते म्युनिसिपल कार्पोरेशनचे मेंबर निवडून आले होते. त्यावेळीं त्यांनीं निवडून देणारांची उत्तम सेवा केली. परंतु पुन्हां ते निवडणुकीस उभेच राहिले नाहींत. याचें मुख्य कारण असें होतें कीं, त्यावेळीं त्यांचा वकिलीचा धंदा चांगल्या प्रकारें चालूं लागला होता. इंदुप्रकाश हातीं होताच. अशा परिस्थितींत म्युनिसिपालिटीच्या कामांत मन घालणें त्यांस सोईचें नव्हतें. कोणतेंही काम एकदां हातांत घेतलें कीं मग त्याच्यासंबंधानें टंगळमंगळ करावयाची नाहीं असा त्यांचा स्वभावच असल्यामुळें केवळ मोठेपणासाठीं कार्पोरेशनची एक जागा अडवून बसणें त्यांस बरें वाटलें नाहीं. म्हणून त्यांनीं आपल्या धंद्यांतच विशेष मन घालण्याचें ठरविलें. खरें पाहातां, वकिलीचा धंदा उत्तम रीतीनें चालूं लागला म्हणजे मग आजूबाजूला पहावयास अगर इतर व्यवसायांत मन गुंतविण्यास फारसा अवकाश सांपडत नाहीं. तसेंच नारायणरावांचें झालें. त्यांचें विस्तृत वाचन, त्यांचें संस्कृत मन, त्यांचा अनुभव त्यांस त्यांच्या धंद्यांत वारंवार सहाय्यभूत होत असे. ज्याला इंग्रजींत Synoptic Talent [1] असें म्हणतात तशा प्रकारची त्यांची बुद्धि होती.

---

१. ह्या **सिनाप्टिक टॅलंट** संबंधानें स्वतः नारायणरावांनीं वर्डस्वर्थ वरील आपल्या पांचव्या व्याख्यानांत पुढील प्रमाणें वर्णन केलें आहे :—

नारायणरावांच्या एकंदर चरित्राकडे पहातां ह्याच विहग दृष्टीचा त्यांनीं वारंवार उपयोग केलेला आढळून येतो. वकील ह्या नात्यानें त्यांचें काम वाढत होतेंच, परंतु शांताराम नारायण व महादेव चिमणाजी आपटे ह्यांच्या मृत्यूनंतर त्यांचें

---

It is the talent which enables a man to take a general view of the details of a subject on which he is thinking, and in this world of action and life, to act as a man of principle and not as a man of expediency. Lord Curzon once contrasted the synoptic talent with what he called the " departmental mind ". A man brought up as a man of business only may and often does become an expert in that business, but what he gains in depth he loses in the breadth. His views are coloured by all he knows about the business ; and he talks and acts what in slang is called " shop ". Such men are like the man described in the *Ecclesiastes* " the man that holds the plough and gloweth in the goad " "whose talk is of bullocks." Such men, says the *Ecclesiastes,* "shall not be sought for in public counsel nor sit high in the congregation." Wordsworth in his Essay on Poetry has pointed out the narrowing influence of specialism. " " A Savant " he said " who is also not a poet in soul, religionist in heart is a feeble and unhappy creature. " According to him man is endowed with imagination, the power to create a whole out of details, and command a vision.

( आपल्या समोर असलेल्या बारीकसारीक गोष्टींचा पूर्ण विचार करून...असा मनुष्य केवळ मारून न नेतां आपल्या तत्त्वानुसार वागतो. विहगदृष्टीनें वागणारा व आकुंचित दृष्टीचा माणूस (डिपार्टमेंटल माइंड) ह्यांच्यांतील भेद एकदां लॉर्ड कर्झन ह्यांनीं दाखविला आहे. एखाद्या व्यापारांत पडलेला मनुष्य त्या व्यवहारांत सर्वप्रकारें दक्ष होईल. परंतु अशाप्रकारें त्यास आपल्या धंद्यांत जरी प्राविण्य मिळालें तरी एकंदरींत तो आकुंचित दृष्टीचा होण्याचा संभव आहे. तो आपल्या धंद्यांतील अनुभवाच्या दृष्टीनें प्रत्येक विषयाचा विचार करूं लागणार. अशा मनुष्याचा सार्वजनिक हिताच्या कार्यामध्यें कांहीं उपयोग होण्यासारखा नाहीं. वर्डस्वर्थ कवीनें म्हटल्याप्रमाणें थोर पुरुष हा अव्यक्त रूपें एक प्रकारचा कवि असतो, म्हणजे त्याची कल्पनाशक्ति चांगली प्रगल्भ झालेली असते व आपल्यापुढें असलेल्या बारीकसारीक गोष्टी एकत्र करून त्यांच्या आधारें एखादें आदरणीय तत्त्व सादर करण्याचें सामर्थ्य त्याच्यांत असतें. )

काम अधिकच वाढलें व मोठमोठ्या खटल्यांचीं अपीलें हायकोटात चालविण्यासाठीं त्यांच्याकडे येऊं लागलीं, व खटले चालविण्यासाठीं त्यांस वारंवार बाहेरगांवीं जावें लागत असे.

साधारणपणें असें म्हणतां येईल कीं १८९५ सालापासून अपिलेट साइडच्या वकिलांत त्यांनाच सर्वांहून अधिक काम असे. इकडे वकिली चांगल्याप्रकारें चालत असतांही त्यांनीं कायद्याच्या निरनिराळ्या शाखांचा अतिशय श्रमपूर्वक अभ्यास चालविला. नारायणरावांचा एक विशेष गुण मुळीं हा होता कीं एकदां त्यांनीं कोणतीही गोष्ट हातीं घेतली म्हणजे ते ती सहसा[1] अर्ध्यावर टाकीत नसत. ज्या खटल्यांचे रिपोर्ट प्रसिद्ध झालेले असत त्यांचे ते रिपोर्ट मनःपूर्वक वाचीत. त्यांत ज्या दुसऱ्या खटल्यांचीं नांवें वगैरे येत तीं ते आपल्या स्मरणवहींत काळजीपूर्वक टिपून ठेवीत. अशा प्रकारें आस्थापूर्वक कायद्याच्या अभ्यास करण्याचा धडा त्यांनीं आपल्या मामांपासून घेतला होता. त्यामुळें कायद्याचा अभ्यास ते आपल्या अशीलासाठीं न करितां, आपलें कायद्याचें ज्ञान बिनचुक असावें ह्या हेतूनें त्यांचा हा अभ्यास चालू असे. त्यांच्या ह्या स्मरणवहींत अगदीं नवीन खटल्यांचीही माहिती असे. त्यामुळें उलट बाजूच्या वकिलानें एखादा नवीनच मुद्दा एकाएकीं पुढें आणिला तरी त्यास योग्य तें उत्तर देण्यास लागणारा आधार आपल्या स्मरणवहींतून ताबडतोब काढून तेथल्यातेथेंच ते विरुद्ध पक्षाच्या वकिलास गप्प करीत असत. केवळ वकिली करीत असतांनाच ते ही स्मरणवही ठेवीत असत असें नव्हे, तर न्यायासनावर आरूढ झाल्यानंतर अगदीं इंदुरास जाईपर्यंत त्यांचा हा क्रम चालू होता. त्यांचें कायद्याचें ज्ञान अशा प्रकारचें ताजें असल्यामुळें वकिलांमध्यें त्यांचा एक प्रकारचा वचक असे. त्याचें कारण असें कीं, खटला चालू असतांना जर त्या खटल्यास लागू असणारे योग्य आधार आपण वेळच्यावेळीं दाखविले नाहींत, किंवा लागू न पडणारे अगर मागें पडलेले आधार दाखवून वेळ मारून नेण्याचा प्रयत्न केला, तर न्यायाधीशच मुळीं सर्व आधार पुढें करतील व त्यायोगें आपण आपल्यावर सोंपविलेल्या खटल्याची योग्यप्रकारें तयारी केली नाहीं, किंवा भलतेच आधार पुढें करून न्यायाधिशाला

---

१. "सहसा" असें म्हणण्याच्या कारणाचा येथेंच खुलासा केलेला बरा. नारायणरावांनीं काशिनाथपंत तेलंगांचें चरित्र लिहिण्याचें पतकरलें व तसें त्यांनीं वर्तमानपत्रांतूनही जाहीर केलें होतें. एवढेंच केवळ नव्हे, तर सर रेमंड वेस्ट वगैरे गृहस्थांना त्यांनीं पत्रेंही लिहिलीं होतीं; पण इतकें झाल्यानंतर त्यांना काय अडचणी आल्या त्याची आतां कल्पनाच करीत बसलें पाहिजे. तें कार्य त्यांच्या हातून पूर्ण झालें नाहीं एवढें मात्र खरें.

चकविण्याचा प्रयत्न केला असा समज होण्याचा संभव आहे अशी त्यांस भीति वाटत असे.

कायदेपंडिताला कार्य करण्याचे अनेक मार्ग मोकळे असतात. वकील, लेखक, वक्ता, न्यायाधीश इ०. नारायणरावांना ह्या सर्वच मार्गांनीं कार्य करून दाखविण्याची संधि प्राप्त झाली. एखादा गृहस्थ कायदेपंडित असला तरी वक्ता असतोच असें नाहीं, किंवा लेखनकला त्यास साध्य झालेली असते असेंहि नाहीं; तसेंच सर्वच कायदेपंडितांना न्यायाधीश होण्याची संधि येत नाहीं. एकाच व्यक्तीनें निष्णात कायदेपंडित, उत्तम लेखक व वक्ता होणें व त्याचप्रमाणें प्रख्यात न्यायाधीश होणें हा योग असामान्य होय ह्यांत कांहीं संशय नाहीं. नारायणरावांना ह्या सर्व दिशांनीं कार्य करण्याचे प्रसंग आले व कायदेपंडित, लेखक, वक्ते, न्यायाधीश अशी कोणतीही दिशा घेतली तरी त्यांनीं तींत विशेष कीर्ति मिळविल्याचें ध्यानांत येईल. चांगला वकील किंवा बॅरिस्टर हा उत्तम वक्ता असलाच पाहिजे, किंवा असतोच असें जरी नाहीं, तरी तो कायदेनिष्णात असून उत्तम वक्ताही असला, तरदु धांत साखर टाकल्याप्रमाणें होतें ह्यांत कांहीं संशय नाहीं. कारण, वकिलाला आपल्या अशिलाची बाजू संभाळावयाची असते, ती जरी दुबळी असली तरी ती तशी न दाखवितां आपली बाजू त्यास सांवरून धरावयाची असते. ह्या कामीं वक्तृत्वाचा चांगला उपयोग होतो. मागें म्हटल्याप्रमाणें उत्तम वकील हा वक्ता असतोच असें नाहीं. त्याचें शील, विचारांची साखळी, आपला पुरावा काळजीपूर्वक पुढें मांडण्याची पद्धत, आणि शांत व सरळपणें आपली बाजू कोर्टापुढें मांडणें इतक्या गोष्टी त्याच्यांत असल्या तरी त्याला आपल्या धंद्यांत यश येतेंच. हे सर्व गुण नारायणरावांत असून त्यांत त्यांच्या असामान्य वक्तृत्वाची भर पडली होती. असें म्हणतात कीं, एकदां नारायणराव सर चार्लस् सार्जंट व न्या. मू. तेलंग ह्यांच्यापुढें एका खटल्याचें काम चालवीत होते, त्यावेळीं ते आपल्या वक्तृत्वाच्या[१] भरांत होते. त्यावेळचें त्यांचें तें आवेशयुक्त वक्तृत्व पाहून सर चार्लस् काशिनाथपंतांना म्हणाले कीं, "चंदावरकर जणूंकाय राष्ट्रीय सभेमध्येंच

१. वक्तृत्वासंबंधानें स्वतः नारायणराव म्हणतात :

The art of public speaking has its uses and the orator has always been a force beneficent or otherwise, to reckon with and " in these days " the late Lord Salisbury remarked some years ago, "whether we like or not, power is with the tongue, power is with those who can speak." " But it is a power which must, like all powers, be carefully cultivated or else its uncontrolled cultivation cannot but have a demoralising influence on a young

ज्याप्रमाणें भाषण करावें त्याप्रमाणें भाषण करीत आहेत." ही गोष्ट पुढें तेलंगांकडून लोकांस कळली. त्यांच्या आवाजांत नैसर्गिक माधुर्य असून अस्खलितपणा होता, त्यामुळें ते ऐकणाराचें लक्ष आपल्याकडे सहज वेधून घेत असत. दुसरें असें कीं त्यांच्या ह्या असामान्य वक्तृत्वांत त्यांचें प्रगल्भ ज्ञान, त्यांची अव्याहत उद्यमशीलता, त्यांची तर्कशुद्ध मांडणी ह्यांची भर पडल्यामुळें त्यांस त्यांच्या धंद्यांत असामान्य यश प्राप्त झालें.

वकिलीच्या धंद्यांत पडल्यावर सत्याचा कांटा हातांत धरून वागतां येत नाहीं अशी साधारण समजूत आहे, आणि कधीं आपल्या स्वतःच्या कल्याणासाठीं, तर कधीं आपल्या अशीलाच्या बऱ्यासाठीं खऱ्याचें खोटें व खोट्याचें खरें सहजासहजीं करणारे वकील सांपडतात. कधींकधीं नामांकित म्हणून प्रसिद्ध असलेल्या कायदेपंडितांनीं जाणूनबुजून असत्य व्यवहार केल्याचें प्रसिद्ध असून अशा प्रकारच्या वर्तनांत पुष्कळ कायदेपंडितांना व नेहेमीं खटले लढणारांना कांहीं वावगेंही वाटत नाहीं. नारायणरावांनीं आपल्या वर्तनानें व नेहमींच्या संभाषणाच्याद्वारें असले प्रकार आपल्याला मुळींच पसंत नाहींत असें दाखविलें व अशाप्रकारें आपल्या धंद्याचा एकंदर दर्जा वाढविण्यासाठीं ते नित्य झटले. त्याचप्रमाणें वकिलांनीं कोणत्याही प्रकारें आपल्या पवित्र धंद्यास न शोभण्यासारखें वर्तन केल्याचें त्यांच्या ध्यानांत आलें, तर ते आपली नापसंती शक्य तितक्या तीव्र शब्दांनीं दाखवीत असत. वकील ह्या नात्यानें सरळपणें वागून आपल्या अशीलाचें काम करावयाचें असा त्यांचा बाणा असे. इतकेंच केवळ नव्हे, तर विरुद्ध पक्षाच्या वकिलानें आपल्या अशीलाची बाजू कोर्टापुढें नीट मांडली नाहीं असें जर त्यांना वाटलें, तर त्याच्या दुबळेपणाचा अगर चुकीचा फायदा न घेतां, आपली स्वतःची बाजू कोर्टापुढें मांडतांना विरुद्ध पक्षाचें एकंदरींत म्हणणें काय आहे तें सांगून त्याची बाजू प्रथम सावरून धरून नंतर ते आपल्या पक्षाचें म्हणणें कोर्टापुढें मांडीत असत. तसेंच आपल्या खटल्यांत जो कांहीं खरा प्रकार असेल तो ते स्पष्टपणें कोर्टापुढें ठेवीत असत. त्यांनीं अशा प्रकारें आपल्या फॅक्टस् कोर्टापुढें ठेविल्यामुळें अशा वकिलावर कोर्टाचा सहजच विश्वास बसत असे. विरुद्ध बाजूच्या वकिलांशीं त्यांचें वर्तन नेहमीं सभ्यपणाचें व विनयशील असे. आपल्याकडे जे लोक खालच्या कोर्टांतील

---

man, making a mere wind-bag of him, living on the breath of popular applause, caring more for wordy rhetoric than depth of thought and solidity of convictions." –*Chandavarkar's speeches and writings* ( P. 372 )

कागदपत्र घेऊन येत त्यांस आपल्या विचारास जो पटेल तोच सल्ला ते देत असत. म्हणजे सर्व कागद वाचून झालेला निवाडा बरोबर आहे आणि अपील देण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें जर त्यांना वाटलें तर ते तसा स्पष्ट अभिप्राय देत असत. कधींकधीं असा अभिप्राय देऊनही अशीलांच्या आग्रहासाठीं त्यांस खटला घ्यावा लागे, मग ते आपल्या अशीलाची बाजू ध्यानांत धरून अपीलाचें काम करीत व पुष्कळ वेळां अशा खटल्यांतही त्यांस यश येत असे! वकिलाचा धंदा सुरू केल्यापासूनच त्यांनीं आपल्याला ही अशी संवय लावून घेतली होती. कांहीं वृद्ध मंडळींना भेटून त्यांच्याकडून कांहीं माहिती मिळविण्यासाठीं आम्ही कांहीं वर्षांपूर्वीं जेव्हां फिरत होतों, तेव्हां कारवार येथें राहाणाऱ्या रा. रा. गोपाळ सुब्राव कोप्पिकर[1] ह्या वृद्ध गृहस्थांनीं सांगितलें कीं, पुष्कळ वर्षांपूर्वीं देवीच्या प्रसादासंबंधाचा एक खटला नारायणरावांनीं पुण्यास चालवावा म्हणून त्या खटल्याचे सर्व कागद नारायणरावांना दाखविण्यांत आले. ते पाहून अपील देऊं नये असा स्पष्ट अभिप्राय नारायणरावांनीं दिला; पण तो अभिप्राय त्यांच्या अशीलांस पसंत पडला नाहीं, आणि अपील देऊं नका असें स्पष्ट सांगणाऱ्या वकिलाचा नाद सोडून देऊन दुसरा वकील करण्याऐवजीं अपील द्या व तें नारायणरावांनींच चालवावें असा आग्रह त्यांनीं धरिला! त्यामुळें अशीलांच्या समजुतीसाठीं त्यांनीं तो खटला हातीं घेतला व अखेरीस त्यांत त्यांना यशही आलें! अशा वेळीं नारायणराव दोन गोष्टी बहुतकरून लक्षांत ठेवीत असावेत असें वाटतें. वकील हा ज्याप्रमाणें आपल्या अशीलाची बाजू पुढें मांडण्यासाठीं कोर्टांत येतो, त्याचप्रमाणें कोर्टाच्या कामांत कोर्टाला मदत करणारा तो एक कामगार असतो. आपल्या अशीलाची बाजू संभाळणें हें ज्याप्रमाणें त्याचें कर्तव्य असतें त्याचप्रमाणें जाणूनबुजून कोर्टाचा गैरसमज न करणें हें त्यांचें कर्तव्य असतें. ह्यासाठीं प्रथमच अप्रीय असा अभिप्राय देऊन ते आपल्या अशिलास जागें करीत असत. नारायणराव आपल्या अशिलांपासून वाजवी तेवढीच फी मिळण्याची अपेक्षा करीत असत. एखादा अशील अगदीं अडचणींत आहे व संपन्न आहे असें पाहून कित्येक वकील अशा अशिलास पिळून काढीत असतात हें सर्वत्र महशूर आहे. पण नारायणरावांनीं आपल्या फीचा अयोग्य आकार केव्हांही केला नाहीं. अशिलाची गरीबी पाहून ते पुष्कळ वेळां कमी फी घेऊन काम करीत व अनेक प्रसंगीं त्यांनीं कांहीं एक फी न घेतां कामें चालविलेलीं आमच्या आठवणींत आहेत. स्वतः नारायणराव फीसंबंधीं घासाघीस कधीं करीत नसत. तें काम ते आपल्या कारकुनावर सोंपवीत व त्यासही ठरलेल्या नियमाबाहेर फीची आकारणी करावयाची नाहीं अशी सक्त

१. हे गृहस्थ १९३४ सालीं परलोकवासी झाले.

ताकीद असे. एकदां त्यांनीं बाहेरगांवचा एक खटला चालविला व त्यांत त्यांना यश आलें. विरुद्ध पक्षानें अपील केलें. आतां नारायणरावांसारख्या हायकोर्टांत वकिली करणाऱ्या प्रसिद्ध वकिलास जिल्ह्याच्या ठिकाणीं एखादा खटला चालविण्यास नेल्यानंतर व त्यांस त्या खटल्यांत पूर्ण यश आल्यानंतर अपिलाचे वेळीं दुसराच एकादा वकील त्या अशिलावर झडप घालील, हा विचार नारायणरावांना सुचला नाहीं व सुचला असता तरी त्यांनीं त्या बाबतींत कांहींही केलें नसतें. आणि खरोखर प्रकार तसाच झाला; तें अपील कोणाच्या तरी खटपटीनें दुसऱ्या एका खटपट्या वकिलाकडे गेल्याचें नारायणरावांस कळलें व ते स्वस्थ राहिले. कांहीं दिवसांनीं त्या अशिलासच आपण केलें तें गैर केलें असें वाटून तो नारायणरावांकडे आला व आपल्या अविचाराबद्दल त्यांची क्षमा मागून वाटेल ती फी घेऊन अपील आपणच चालवा असा त्यानें आग्रह चालविला. आतां एकदां आपला झालेला पक्षकार विनाकारण दुसरीकडे जाऊन परत आपण होऊन आपल्याकडे चालत आल्यानंतर कित्येक वकील अशावेळीं अडचणीचा फायदा घेऊन पक्षकारास अडवून फाजील फी मागतात; परंतु नारायणरावांस हा विचार शिवला नाहीं व झालेला प्रकार आपल्याला माहीतच नाहीं असें दाखवून त्यांनीं तें अपील चालविलें व योग्य तीच फी आकारली.

अशा प्रकारें मोठ्या बाणेदारपणें व आपल्या उच्च ध्येयास अनुरूप ते वकिली करीत असतां १८९२ सालीं येवल्याचा दंगा झाला व तो मि. हेवर्ड, आय्. सी. एस्. ह्यांच्यापुढें चालविण्यासाठीं सरकारतर्फे नारायणरावांस वकील नेमण्यांत आलें. पुढें सर नारायण चंदावरकर ज्यावेळीं कौन्सिलचे अध्यक्ष होते त्याच वेळीं सरकारच्या कार्यकारी कौन्सिलचे हे एक सभासद होते. १८९३–९४ सालापासून त्यांना बाहेरगांवीं खटले चालविण्यासाठीं वारंवार जावें लागे. १८९७ सालीं युनिव्हर्सिटीतर्फे त्यांची कौन्सिलमध्यें निवडणूक झाली.[1] ते एकीकडे

---

१ ह्या निवडणुकीच्या वेळीं आपल्या मामांस लिहिलेल्या पत्रांत ते म्हणतात :—

What you say about my professional business in the event of my election to the Council is true to some extent. At present, my practice is enough to occupy my mind; and if I am elected, I shall have to work harder. But duty is duty and it must be done; and God in whom I have hitherto reposed all my trust and Who has so graciously stood by me and mine hitherto and given me courage and faith and hope and enabled me not to swerve from the straight path, will, I know and feel sure, lead me on as He hitherto led me and will enable me to live so as to be useful to my country.

सार्वजनिक कामांत अधिक प्रमाणांत मन घालीत असतां त्यांचें हायकोर्टांतील व बाहेरगांवचें काम अधिकाधिक वाढूं लागलें व ह्या सर्व कामांत कोणत्याही प्रकारें हयगय होऊं न देतां त्यांनीं तीं सर्व समाधानकारक रीतीनें पार पाडलीं. हायकोर्टांतील वकिलांच्या खोलीची ज्यांस थोडीबहुत माहिती आहे त्यांस हें सांगण्याची आवश्यकता नाहीं कीं, ह्या ठिकाणीं सुट्टीच्या वेळीं किंवा काम नसेल तेव्हां वकीलमंडळी जमत असतात. निरनिराळ्या वकिलांचे लहान लहान समूह जिकडे तिकडे फांकलेले असतात व तेथें नाना प्रकारचे विषय निघतात व नाना विषयांवर तेथें चर्चा होत असते. हा प्रकार नारायणरावांच्या वेळींही होताच; परंतु त्यांच्या संबंधानें विशेष गोष्ट अशी असे कीं ते कधीं वायफळ गप्पा मारीत बसत नसत, किंवा कोणाची निंदा करीत बस किंवा कोणाचीं ऐकलेलीं न्यूनें काढून त्यांचें पिष्टपेषण करीत बस हा प्रकार त्यांस मुळींच पसंत नसे. ते कांहीं ठराविक माणसांच्या कंपूमध्यें बसत-उठत व तेथें सामाजिक, राजकीय, तत्त्वज्ञानविषयक किंवा धर्मविषयक चर्चा चालत असे. अशा वेळीं आपल्या विस्तृत ज्ञानाचा व नाना प्रकारच्या विषयांवर मिळविलेल्या माहितीचा ते इतरांस लाभ देत असत. तेथें टीका वगैरे जी होत असे तीही गंभीर स्वरूपाचीच असे.[1]

---

१. ज्या वकिलांशीं त्यांचें विशेष संघटण असे ते पुढील गृहस्थ होत :—

वासुदेवराव भांडारकर, विष्णूपंत भाटवडेकर, बाळासाहेब चौबळ, नारायणराव समर्थ, पुरुषोत्तमपंत खरे, गंगाराम बापसोबा रेळे, शामराव माणिकजी रेळे, घनश्यामपंत नाडकर्णी, माणेकशा तालयारखान, गोकुळदास पारेख इत्यादि.

न्यायमूर्ति होण्यापूर्वी व नंतरही भाजेकर वकिलांशीं त्यांचें बरेंच संघटण असे. ते सोशल रिफार्म ॲसोशिएशनचे कर्ते चिटणीस होते. एके काळीं पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर-पुण्यतिथि मुंबई शहरांत ते मोठा गाजावाजा करून पार पाडीत असत. भाजेकरांचे व त्यांचे नाना विषयांवर वादविवाद होत असावे. नारायणरावांच्या रोजनिशींत दोन ठिकाणीं पुढील उल्लेख आढळतात :—

(A) Mr. Bhajekar in Court advises me to read our Shastras, especially the Mahabharat. I tell him my tastes are catholic. He does not know I love our own ancient books...But English literature of which Mr. Bhajekar seems to think so lightly is invigorating—it is the literature of the Anglo-Saxon who wishes and does.

(B) Mr. Bhajekar spoke of the letter signed "Truth" appearing in today's (20—4—1899) Times of India anent campaign

पुष्कळ वेळां असें होत असे कीं, एका पक्षाला मामा शामराव विठ्ठल तर विरुद्ध पक्षाला नारायणराव वकील ह्या नात्यानें काम करीत. १८९८ सालीं सप्टेंबर महिन्यांत खुद्द कारवार येथें आरोपी तर्फे खटला चालविण्यासाठीं शामराव विठ्ठल हे गेले. आरोपीचा बचाव करण्यासाठीं शामराव येणार म्हणून आपल्या वतीनें सरकारनें नारायणरावांस निवडलें कीं, सरकार नारायणरावांस आणणार म्हणून आरोपीनें शामरावांची निवड केली तें कळावयास आज मार्ग नाहीं. पैसे खाल्ल्याच्या आरोपावर जंगल-खात्यांतील एका नोकरावरील हा खटला सेशन्स कोर्टांत चालावयाचा होता. दोन्ही पक्षाचे वकील सारस्वत आणि आरोपीही सारस्वत. मात्र न्यायाधीश[१] हे युरोपिअन होते. श्री. वामन मंगेश दुभाषी हे ह्या खटल्यांत एक असेसर होते. त्यांनीं ह्या खटल्यासंबंधाची आपली आठवण पुढीलप्रमाणें दिली आहे: ––

"हा मामा व भाचा ह्यांच्यामधील सामना पहाण्यासाठीं सबंध गांव लोटत असे. नारायणरावजींची 'नाण्णी' वकील ह्या नांवानें प्रसिद्धि होती. सुदैवानें मला ह्या कज्जांत असेसर म्हणून नारायणरावजींच्या वक्तृत्वाचा लाभ घेण्याची तीन चार दिवस संधि मिळाली. तिसऱ्या कीं चौथ्या दिवशीं संध्याकाळीं दोन वाजल्यापासून ६ वाजेपर्यंत (नारायणराव म्हणतात २–३० वाजल्यापासून साडेपांच वाजेपर्यंत) श्री. शामराव विठ्ठल ह्यांनीं आरोपीच्या वतीनें मुद्देसूद भाषण केलें. त्यानंतर सरकारच्या वतीनें भाषण करण्यास अवसर नाहीं हें जाणून न्यायाधिशांनीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं नारायणरावांचें भाषण व्हावें असें ठरविलें. हा दिवस शनिवार होता. हायस्कूलमधील वरच्या इयत्तेंतील मुलांना त्यांच्या वक्तृत्वाचा लाभ मिळावा म्हणून ८ वाजतांच सुट्टी देण्यांत आली. सुमारें दीड तासपर्यंत चाललेल्या वक्तृत्वाच्या ओघांत सर्व मंडळी वाहून गेली व आरोपीचीं शंभर वर्षे

---

of calumny against Dr. Bhandarkar. He liked the letter. They (some pleaders) said, prejudice against Dr. Bhandarkar, Justice Ranade, Mr. Jathar and Mr. Gokhale in Poona was "ferocious." Bhajekar also said that someone over his own signature ought to write to the papers and remove the prejudice. I told him that such attacks deserved only contempt. Bhajekar did not agree. He said there was a limit to everything.

१. ह्याचें नांव मि. हारवे. नारायणरावांनीं आपल्या रोजनिशींत मि. हारवेसंबंधानें पुढील अभिप्राय लिहून ठेवला आहे:—I was struck by Mr. Harvey's intelligence and quickness of perception and searching way of examination.

भरलीं असेच सर्वतोमुखीं उद्गार निघाले.

नारायणरावांस अशा प्रकारें खटले चालविण्यासाठीं वारंवार जरी परगांवीं जावें लागे, तरी अशा वेळीं ते व्याख्यानें वगैरे देण्याचें टाळीत. परंतु कारवारला तरुणांच्या वतीनें व्याख्यान देण्याविषयीं पुष्कळ आग्रह करण्यांत आला व तरुणांचा निरुत्साह करावयाचा नाहीं असें त्यांचें धोरण असल्यामुळें त्यांनीं 'सामाजिक सुधारणेचीं तत्त्वें' अशा विषयावर व्याख्यान दिलें. ह्या व्याख्यानांत स्वतःसंबंधानें त्यांनीं असें सांगितलें कीं, मी स्वतः सुधारक असें म्हणवून घेण्यास पात्र नाहीं. ही पदवी राजा राममोहन राय, पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांना शोभते व ते खरे सुधारक होत. मी आपला त्यांनीं दाखविलेल्या मार्गानें जाण्याचा प्रयत्न करणारा एक अल्पशक्ति इसम आहें. आज सुधारकाचें मुख्य लक्षण म्हणजे त्याच्या कार्यावरील त्याची निष्ठा व त्याची सत्यप्रीति. कारण, कोणताही समाज जर टिकून रहावा व तो कार्यक्षम व्हावा असें आपणास वाटत असेल तर तो सत्यनिष्ठ असला पाहिजे. समाजाची घडी नीट बसण्यासाठीं सत्यनिष्ठा व नीति ह्यांचें वर्चस्व असलें पाहिजे. आंत एक बाहेर निराळें असला ढोंगीपणा सामाजिक बाबतींत बिलकुल उपयोगाचा नाहीं. आज आपला समाज हा परिवर्तनाच्या (Transition) च्या स्थितींत आहे. आमच्या विचारांत क्रांति होत आहे. आमचीं ध्येयें बदलत आहेत. अशा वेळीं ढोंगी वृत्ति उघडकीस आणिली नाहीं तर एकंदर समाजाची हानि होणार आहे. सुधारकाचें दुसरें ध्येय हें असावें कीं, जुनी संस्कृति व नवी संस्कृति ह्यांची त्यानें सांगड घालून दिली पाहिजे. ख्रिस्ती धर्म हा ज्यू, ग्रीक व रोमन संस्कृतीचें फळ आहे. आणि आज ख्रिस्ती धर्माचा हिंदु, बौद्ध, पारशी, इस्लाम वगैरे धर्मांशीं संबंध येत आहे. नवी संस्कृति ही ह्या संबंधाचा परिणाम होय. अशा वेळीं आम्ही हिंदु ह्या संस्कृतीला कोठलें व कसें वळण लावणार ? जेथें फ्रेंच व डच ह्यांचा पराभव झाला तेथें राज्यस्थापनेच्या कामीं इंग्रजांना कां यश आलें तें आपण विचारांत घेतलें पाहिजे.

सुधारकाचें आणखी एक कर्तव्य म्हणजे गृह-सुधारणा—कौटुंबिक सुधारणा. बाहेरच्या लोकांच्या सुधारणेच्या गोष्टी चटपट बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. सर्व सुधारणांस स्वतःच्या कुटुंबापासून प्रारंभ झाला पाहिजे. हिंदू स्त्रियांची सुशीलतेविषयीं व सद्गुणांविषयीं पूर्वीपासून ख्याति आहे. त्यांची बुद्धिमत्ता उच्च असते व साधारणतः त्या प्रगमनशील वृत्तीच्या असतात. परंतु ह्या सर्व गुणांचा विकास होण्यास आम्हीं अवसर दिला पाहिजे. आपल्या उच्च ध्येयाची त्यांना कल्पना करून दिली व त्यांना तें पटलें म्हणजे पुरुषांपेक्षां स्त्रियाच ध्येयनिष्ठा अधिक दाखवितात असा अनुभव आहे. परंतु आज आम्ही मुलींच्या शिक्षणाकडे द्याव-



न्या. मू. नारायण गणेश चंदावरकर [इ. स. १९०१]

यास पाहिजे तितकें लक्ष देत नाहीं.[1] त्याची हेळसांड करीत आहों. त्याचप्रमाणें लहान मुलांच्या शिक्षणाची आबाळ होत आहे. पण आम्हांला खरें गृहसौख्य जर हवें असेल तर ह्या सर्व गोष्टी आम्हीं केल्या पाहिजेत.

अशा रीतीनें १९०० सालपर्यंत त्यांचा क्रम चालला होता. राजकीय कामकाज जसें वाढलें होतें त्याचप्रमाणें कोर्टाचें कामही वाढलें होतें. असें म्हणतात कीं, त्या वेळीं कोर्टाच्या कामांत त्यांचा पहिला नंबर होता. अशा प्रकारें ते आपल्या कामांत गढून गेलेले असतांना १९०० सालीं दोन फार महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. पहिली गोष्ट म्हणजे त्यांची राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षपदीं नेमणूक होणें ही होय. त्या वर्षी ही त्यांची निवडणूक जरा उशिरांच झाली होती, तरीपण हें राष्ट्राकडून आलेलें बहुसन्मानाचें आमंत्रण आहे, अशावेळीं आपण आपल्या कर्तव्यास जागून त्या आमंत्रणाचा स्वीकार करणें हा आपला धर्म आहे हें ध्यानांत वागवून ह्या आमंत्रणाचा त्यांनीं स्वीकार केला. राजकीय चळवळींत कमीअधिक भाग घेणारांपैकीं कोणासही राष्ट्रीय सभेचें अध्यक्षपद अर्पण झालें म्हणजे लोकांच्या हातीं असलेलें अत्युच्च पद त्यास प्राप्त झालें अशी समजूत असे व आहे; पण, नारायणरावांना एकाच वेळीं शिक्षित लोकांकडून, त्याचप्रमाणें सरकारकडूनही अत्युच्च मानाचीं पदें प्राप्त झालीं. म्हणजे लोकांनीं त्यांना १९०० सालीं भरणाऱ्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष निवडलें व सरकारनें त्यांस हायकोर्ट जज्जाच्या जागीं नेमिलें. ही हकीकत थोडीशी मनोरंजक आहे. लाहोरच्या राष्ट्रीय सभेचें अध्यक्षपद स्वीकारल्यानंतर चीफ जस्टिस ह्यांनीं त्यांना आपल्या खोलींत बोलाविलें. त्यावेळीं न्या. मू. रानडे हे कांहीं महिन्यांच्या रजेवर गेले होते. त्यांच्या जागीं तुम्ही काम करावें अशी सरकारची इच्छा आहे असें सर लॉरेन्स जेंकिन्स ह्यांनीं नारायणरावांना सांगितलें. त्याच वेळीं त्यांनीं असा खुलासा केला कीं, तुम्ही राष्ट्रीय सभेचें अध्यक्षपद स्वीकारिलें आहे हें सरकारला माहित आहे. डिसेंबरच्या अखेरीस तुम्ही राष्ट्रीयसभेच्या अध्यक्षाचें काम करा व तेथून परत आल्यावर हायकोर्टाच्या न्यायाधिशाच्या जागीं रुजू व्हा म्हणजे झालें! आपली ह्या जागीं नेमणूक होईल अशी नारायणरावांची कल्पना नव्हती, त्यामुळें आपली नेमणूक सरकार करूं इच्छित आहे हें पाहून त्यांस प्रथम आश्चर्यच वाटलें, परंतु विचार करावयास थोडा वेळ घेऊन त्यांनीं ही जागा पत्करली.[2] पुढें सरकारनें

१. ह्यावेळीं येथील सोसायटीच्या शाळांची स्थिति असमाधानकारक होती.

२. रानड्यांच्या जागेवर आपली नेमणूक झाल्यामुळें त्या जागेस विशेष पावित्र्य आलें आहे असें नारायणरावांस वाटत असे. आपल्या एका मित्राला लिहिलेल्या पत्रांत ते म्हणतात:—

आपल्यावर फार मोठी जबाबदारी घातली आहे असें त्यांस वाटलें व त्या हुद्याचें पावित्र्य लक्षांत घेऊन त्यांनीं परमेश्वराची प्रार्थना केली. न्या. मू. रानडे ह्यांच्या आकस्मिक मृत्यूनंतर त्यांस त्या जागीं कायम करण्यांत आलें. त्या जागीं आपली नेमणूक व्हावी अशी एका प्रसिद्ध वकिलांची खटपट होती; परंतु त्यांच्या खटपटीस यश आलें नाहीं व नारायणरावांचीच नेमणूक कायम झाली.[१]

मुंबईच्या हायकोर्टामध्यें जे न्यायाधीश न्यायदानाचें काम करीत असतात, त्यांपैकीं एक वकिलांतून निवडलेला असला पाहिजे असा नियम आहे. ह्या नियमानुसार नानाभाई हरिदास ह्यांना न्यायाधीश नेमलेलें होतें. परंतु त्यांच्या मृत्यूनंतर दोन नेमणुका करितांना सरकारला ह्या नियमाची अंमलबजावणी करितांना थोडें निराळें धोरण स्वीकारावें लागलें होतें, असें म्हणावें लागतें. नानाभाई हरिदासांनंतर त्यांच्या जागीं काशिनाथपंत तेलंग ह्यांची नेमणूक सरकारनें केली. पण वस्तुतः काशिनाथपंत कांहीं वकील नव्हते. वकिलांना अपिलेट साइडला स्वतंत्रपणें काम करितां येतें. तेलंग एल्एल्. बी. होते, परंतु ते ॲडव्होकेटची परीक्षा पास झालेली असल्यामुळें त्यांस बॅरिस्टरचे हक्क होते, त्यामुळें एखाद्या

---

It is a great honour, but also a great responsibility and is rendered all the more onerous by the fact that I succeed one whose mental and moral attainments invest the place with something of special sanctity.

When I received intimation from Government that I had been selected for the office, I did feel the responsibility and sanctity of the new situation and my praying heart did go up to God. —*From a letter to Mr. Raghunath Rao.*

१. लोकांमध्यें असा एक चुकीचा समज आहे कीं, नारायणरावांस न्यायमूर्तींची जागा देऊं केल्यानंतर राष्ट्रीय सभेचें अध्यक्षस्थास देण्यांत आलें व तें स्वीकारण्यासंबंधानें त्यांना परवानगी घेण्यासाठीं गव्हर्नरांच्या बंगल्यावर जावें लागलें. परंतु हा समज अगदींच चुकीचा आहे. नारायणराव राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होणार आहेत हें पूर्णपणें माहीत असून लॉर्ड नार्थकोट ह्यांनीं त्यांची नेमणूक केली; लाहोरला जावयास निघण्यापूर्वीं नारायणरावांस जेवावयास बोलविलें; प्रवास सुखकर होवो अशी इच्छा प्रदर्शित केली व पुढें कायम होण्याच्या वेळीं जेव्हां मागलें राष्ट्रीय सभेचें अध्यक्षपद त्यांच्या आड येऊं लागलें व दुसरें नांव परस्पर सुचविण्यांत आलें, त्यावेळीं पूर्वींची नेमणूकच योग्य आहे, व तीच कायम झाली पाहिजे असा आग्रह लॉर्ड नार्थकोट ह्यांनीं धरिला.

वकिलाबरोबर त्यांस अपिलेट बाजूला काम चालवितां येत असे व सॉलिसिटरानें खटल्याची माहिती दिल्यानंतर एखाद्या बॅरिस्टराप्रमाणें ओरिजिनल साइडलाही काम चालवितां येत असे. परंतु ज्याअर्थी ते अपिलेट साइडकडेही खटले चालवीत असत त्याअर्थी ह्या नेमणुकीपुरते त्यांस वकीलच समजून त्यांची नेमणूक केली होती. महादेव गोविंद रानडे हेही वकील नव्हते. त्यांनीं स्वतः कोठल्याही कोर्टांत एकही केस केव्हांही चालविली नव्हती. ते प्रथमपासूनच सरकारी नोकरींत होते व ते सरकारी नोकरींत असतांनाच हायकोर्टांतील न्यायाधिशाच्या जागीं त्यांची नेमणूक झाली होती. ह्या दृष्टीनें पाहातां नानाभाई हरिदासांच्यानंतर नारायणरावांची नेमणूक ही हायकोर्टाच्या नियमांनुसार झालेली पहिली नेमणूक होय. ह्या नेमणुकीनंतर मात्र सरकारनें वरील नियम आतांपर्यंत झालेल्या नेमणुकींच्या वेळीं दक्षतेनें पाळला आहे. १८८९ पासून १९०० सालापर्यंत कोणत्याही कारणामुळें कां होईना ह्या नियमाची सरकारकडून अंमलबजावणी झाली नव्हती.

न्यायाधिशाच्या जागीं नेमणूक झाल्यानंतर थोड्याच दिवसांत नारायणरावांची उत्तम कायदेपंडित व आपलें कामकाज योग्य प्रकारें करणारे जज्ज अशी कीर्ति होऊं लागली. त्यांची भाषाशैली, इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व, त्यांचा ज्ञानसंग्रह व ज्ञानलालसा, त्यांचा दीर्घोद्योग, त्यांचें कायद्याचें असाधारण ज्ञान, त्यांचें पवित्र शील ह्यांयोगें ते न्यायाधिशाच्या जागेस सर्वपरि लायक होते हें त्यांनीं सर्वांच्या अनुभवास आणून दिलें. वकिली करीत असतांना त्यांच्या हें लक्षांत येऊन चुकलें होतें कीं, एकदां वकिली चांगल्या रीतीनें चालूं लागली कीं, कायद्याचा अभ्यास करण्याची संवय कमी होत जाते. त्यांच्यासारखे कायद्याचा अभ्यास कायम ठेवून वाढती वकिली कुळांस समाधानकारक रीतीनें चालवून, सार्वजनिक कार्यांत मन घालणारे वकील फारच थोडे. जज्ज झाल्यावर वकील लोक सार्वजनिक कार्यांत मन घालतात कीं नाहीं, ह्याच्याशीं त्यांना कांहीं कर्तव्य नव्हतें; परंतु वकील मंडळी हिंदु लॉचा प्रश्न आला असतांना मूळ ग्रंथांतील वचनांचा आधार देण्याच्या भानगडींत सहसा पडत नाहींत, कारण मूळ ग्रंथांचें त्यांचें अध्ययन झालेलें नसतें ही गोष्ट नारायणरावांच्या चांगलीच लक्षांत असल्यामुळें न्यायासनीं बसल्यावर थोड्याच कालावधीनंतर संस्कृत भाषेंतील हिंदु कायद्याच्या ग्रंथांच्या अध्ययनास त्यांनीं प्रारंभ केला. मिताक्षरा, मयूख व इतर स्मृति हे ते ग्रंथ होत. हें अध्ययन उत्तमप्रकारें व्हावें म्हणून ते एका प्रसिद्ध शास्त्रीबोवांबरोबर मूळ ग्रंथ वाचूं लागले. त्याचा परिणाम असा झाला कीं, हिंदु कायद्याचे प्रश्न जेव्हां त्यांच्यापुढें निकालासाठीं येत असत व जेव्हां ते त्यांसंबंधानें निकाल

सांगत असत, त्यावेळीं त्यांच्या निकालांत हिंदु कायद्यावरील अस्सल ग्रंथांतील तत्त्वांचें स्पष्टीकरण व विवरण, त्याचप्रमाणें त्यांचा साधकबाधक विचार भरपूर व बिनचूक येत असे. हीं तत्त्वें काय आहेत तें ते आधीं पूर्णपणें स्वतः समजून घेत असत आणि खटला चालू असतांना दोन्ही पक्षांच्या अगर एका पक्षाच्या वकिलाचें अस्सल संस्कृत मूळ ग्रंथांतील तत्त्वांविषयीं अज्ञान दिसून आलें तर ते त्यावेळीं खटला तहकूब ठेवीत व वकिलास मूळ ग्रंथांचें अध्ययन करावयास पूर्ण संधि देत असत. ह्याचा परिणाम जो होणें इष्ट होता तोच झाला. स्वतः न्यायाधिशाचें मूळ पुरातन ग्रंथांतील आधारांकडे पूर्ण लक्ष आहे व त्यांचा विचार केल्यावांचून ते आपला निकाल देत नाहींत असा अनुभव येतांच जे वकील पूर्वी मूळ ग्रंथांकडे ढुंकून पाहात नसत, ते आतां त्या ग्रंथांचें आस्थापूर्वक अध्ययन करूं लागले! त्यांनीं आपल्या अनेक निकालांत हिंदु लॉमधील पुष्कळ भानगडीचे प्रश्न सर्व प्रकारच्या मूळ आधारांचा सूक्ष्म विचार करून निकालांत आणिले. त्यांच्या निकालांवर प्रिव्ही कौन्सिलमध्यें अपिलें होऊनही त्यांचेच निकाल कायम झाल्यामुळें त्यांस साहजिकपणें योग्य तें महत्त्व प्राप्त झालें असून, तसेच प्रश्न पुढें आले असतांना इतर न्यायाधिशांस ते मार्गदर्शक होत असतात व सर्वांस त्या निकालांचा फार आदरपूर्वक विचार करावा लागतो. सारांश, नारायणराव अपिलेट बाजूचे न्यायाधीश असतांना हिंदु धर्मशास्त्राच्या अध्ययनास उत्तेजन मिळालें व त्याविषयाच्या संशोधनास प्रारंभ होऊन त्यांतही चांगलीच गति झाली. ज्या वकिलांना संस्कृत येत नव्हतें अगर येत असून आतां त्याचा विसर पडल्यासारखें झालें, होतें त्यांनीं हुषार शास्त्र्यांच्या साहाय्यानें आपलें ज्ञान वाढविलें.

हिंदु धर्मशास्त्रास अनुसरून हायकोर्टानें जे निकाल दिले आहेत ते विचारांत घेतांना सर मायकेल वेस्ट्राप व सर रेमंड वेस्ट ह्यांनीं केलेली कामगिरी ध्यानांत आल्यावांचून राहात नाहीं. ह्या दोन्ही न्यायमूर्तींच्या ठिकाणीं हिंदु धर्मशास्त्रासंबंधानें अलोट प्रेम होतें व त्यांनींच आपल्या अनेक निकालांत मूळ तत्त्वांचा केवळ शब्दार्थच लक्षांत न घेतां त्यांचा उदार अर्थ लावण्याचा प्रघात पाडला. त्या काळीं प्रिव्ही कौन्सिलचा कल बंगाल्यांतील कायद्याप्रमाणें निकाल देण्याकडे होता. असें असूनही ह्या दोघां न्यायमूर्तींनीं वर म्हटल्याप्रमाणें हिंदु धर्मशास्त्रांत उदार तत्त्वें आणिलीं व शास्त्रांतील वचनांचा उदार धोरणास अनुसरून अर्थ करावयाचा प्रघात पाडला. त्याच्यानंतर न्या. मू. तेलंग आले. ते तर स्वतःच संस्कृतभाषापारंगत असल्यामुळें त्यांनीं बदललेली परिस्थिति लक्षांत घेऊन तेंच उदार धोरण कायम ठेविलें. पुढें सर लारेन्स जेंकिन्स चीफ जस्टिस झाले. त्यांनीं हिंदु धर्मशास्त्राचा अभ्यास करण्यासाठीं धर्मशास्त्रपारंगत

अशा विद्वान शास्त्र्यांचें साहाय्य घेतलें व त्यायोगें वकिलांचें तिकडे लक्ष लागूं लागणार तोंच नारायणरावांनीं हा प्रश्न हातीं घेतला, त्याचा परिणाम काय झाला त्याचा उल्लेख वर करण्यांत आला आहेच.

नारायणरावांनीं हिंदु लॉसंबंधानें, किंवा हिंदु धर्मशास्त्राच्या बाबतींत अनेक महत्त्वाचे निकाल दिले असें वर म्हटलें आहे. त्यांतील कांहीं निकालांचा येथें उल्लेख केल्यास कायद्याची माहिती नसणारांस त्याचा उपयोग होईल असें वाटून महत्त्वाच्या कांहीं निकालांतील तत्त्वांची रूपरेषा पुढें दिली आहे:—

(१) रामकृष्ण वि. शामराव–इंडियन ला रिपोर्ट २६, मुंबई, पृ. ५२६. ह्या खटल्यांत फुल–बेंचच्या वतीनें नारायणरावांनीं निकाल देतांना पुढील तत्त्व प्रतिपादिलें: ज्यावेळीं एखादी आजी आपल्या अविवाहित नातवाची वारस होते, त्यावेळीं दत्तक घेण्याचा तिचा एरव्हींचा हक्क राहात नाहीं. हा निकाल मदन मोहन वि. पुरुषोत्तम ४५ इंडिअन अपील्स, १५६, पृष्ठ १६१, ह्या अपिलामध्यें प्रिव्हीकौन्सिलनें मान्य केला. (२) निंगरड्डी वि. लक्ष्मण इं. लॉ रि. २६, मुंबई, पृष्ठ १६३, ह्या खटल्यांत नारायणरावांनीं असा निकाल दिला होता कीं, एखाद्या मनुष्याच्या रखेलीनें पोटगीचा दावा दिला असतांना ती त्याची केवळ रखेली होती असें सिद्ध करून भागत नाहीं. मरेपर्यंत ती त्याची रखेली होती व अशाप्रकारें तो संबंध कायम स्वरूपाचा होता असेंही सिद्ध झालें पाहिजे. परंतु बाई नागूबाई वि. बाई मंगळीबाई इं. लॉ रि. ४७, मुं. पृ. ४०१, ह्या खटल्यांत न्या. मू. शाहा व क्रम्प ह्यांनीं असा निकाल दिला होता कीं, अशा वेळीं रखेली आपल्या कुटुंबांतीलच एक माणूस आहे असेंही सिद्ध झालें पाहिजे. ह्या निकाला-वर प्रिव्ही कौन्सिलमध्यें अपील (५३ इं. अॅ. १५३, पृ. १६२) झालें त्यावेळीं नारायणरावांचा वरील निकाल प्रि. कौ. नें कायम केला. (३) गोविंद वि. सखा-राम, इं. लॉ रि. २८; मुं. ३८३–ह्या मुकदम्यांत नारायणरावांनीं असा निकाल दिला कीं, बाप जीवंत असो अगर मृत असो, त्याचें कर्ज त्याच्या मुलानें देणें हें त्याचें धार्मिक कर्तव्य आहे. ह्याच निकालास अनुसरून प्रिव्ही कौ. नें ब्रिजलाल वि. मंगळप्रसाद ५१ इं. अ. १२७, ह्या मुकदम्यांत निकाल देतांना म्हटलें आहे कीं ह्या सारख्या प्रश्नाचा विचार करितांना साहुरामच्या मुकदम्यांत (४४ इं. अ. १२६) प्रदर्शित केलेले विचार रद्द समजावे, कारण ते खटल्याच्या निकालास आवश्यक नव्हते. (४) सौदानप्पा वि. शिवबसप्पा इं. लॉ रि. ३१. मुं. ३५४–नारायणरावांनीं असें तत्त्व प्रतिपादिलें कीं, हिंदुधर्मशास्त्रांतील मिताक्षरांत असा नियम आहे कीं धनकोनें कर्ज देतांना आपल्या करारनाम्यांत जरी व्याजाचा उल्लेख केलेला नसला, तरी धनकोनें आपल्या पैशाची मागणी केली असतांना ऋणकोनें पैसे

परत दिले नाहींत, तर पुढें हिशेब करितांना त्यांत मागणीच्या तारखेपासून व्याजाचाही समावेश करावा. ( ५ ) तारा वि. कृष्णा इं. लॉ रि. ३१; मुं. ४९५–ह्या मुकदम्यांत नारायणरावांनीं असा निकाल दिला कीं, जेव्हां एखाद्या माणसाची मुरळी बनलेली मुलगी आपल्या बापाच्या सर्व जिनगीची मी एकटी वारस आहें असें म्हणते, त्यावेळीं ज्याअर्थी अविवाहित असतांनाच ती मुरळी झाली व फिर्यादीच्या वेळीं ती कन्याही नव्हती व कुलस्त्रीही नव्हती ( म्हणजे विवाहित नव्हती ) त्याअर्थी विवाहित अगर अविवाहित दुसऱ्या मुली नसल्या तरच ती आपल्या बापाच्या मिळकतीची वारस समजली जाईल. ( ६ ) हिंदुधर्मशास्त्रांत कांहीं कारणांमुळें हिंदु मनुष्य कोणाचाही वारस होण्यास नालायक होतो. म्हणून गंगू वि. चंद्रभागाबाई, इं. लॉ रि. ३२, मुं. २७५; ह्या खटल्यामध्यें नारायणरावांनीं असा निकाल दिला कीं, नवरा वारस होण्यास नालायक ठरलेला असला, तरी ती केवळ त्याची बायको आहे म्हणून ती वारस होण्यास नालायक ठरत नाहीं, मग ती आपल्या नवऱ्याची बायको म्हणून वारसहक्क किंवा दुसऱ्या कोणाचीही वारस म्हणून आपला हक्क पुढें मांडो, मात्र हिंदुधर्मशास्त्रानुसारें ती स्वतः वारस होण्यास पूर्वीच नालायक ठरलेली नसावी. ( ७ ) सुंदराबाई वि. शिवनारायण; इं. लॉ रि. ३२, मुं. ८१; ह्या मुकदम्यांत नारायणरावांनीं असें प्रतिपादिलें आहे कीं, साधारणपणें संस्कार ह्या शब्दांत विवाहसंस्काराचा समावेश होतो आणि कोणत्याही अविभक्त कुटुंबांतील हिस्सेदाराच्या ( कोपार्सनरच्या ) विवाहासाठीं जर कर्ज काढलेलें असलें तर तें मिताक्षरा व मयूख ह्या दोन्ही कायद्यांच्या आधारें कौटुंबिक कार्यासाठीं काढलेलें कर्ज असें मानिलें जातें. ( ८ ) कलगौडा वि. सोमाप्पा, इं. लॉ रि. ३३, मुं. ६६९; ह्या मुकदम्यांत दत्तकासंबंधानें महत्त्वाचा निकाल देण्यांत आला तो असा कीं, ज्याला स्वतःचा मुलगा आहे अशा मनुष्याचें जर दत्तविधान झालेलें असलें, तर त्याचा दत्तविधानाच्या अगोदर जन्मलेला मुलगा पूर्वीच्या कुटुंबांतील आपला वारस हक्क किंवा आपलें गोत्र गमावून बसत नाहीं, किंवा बापाच्या दत्तविधानामुळें बापाचें दत्तविधानानंतरचें गोत्र किंवा त्या कुटुंबाचा वारस हक्क त्याला प्राप्त होत नाहीं. ( ९ ) चुनिलाल वि. सुजाराम, इं. लॉ रि. ३३, मुं. ४३३; ह्यांत मुलीच्या लग्नाच्या वेळीं तिच्या आईकडल्या अगर बापाच्या बाजूच्या एखाद्या आप्तास पैसे दिले तर त्याचा काय परिणाम होतो ह्याचा नारायणरावांनीं खुलासा केला आहे. ( १० ) भीमाचार्य वि. रामाचार्य, इं. लॉ रि. ३३; मुं. ४५२; ह्या मुकदम्यांत नारायणरावांनीं असा निकाल दिला कीं मिताक्षरानुसारें जेव्हां एखादी विवाहित पण मूल नसलेली बाई मरण पावते त्यावेळीं दुसऱ्या बायकोपासून तिच्या नव-

त्याला जरी एखादा मुलगा असला तरी तिच्या स्त्रीधनाचा वारसा त्या मुलाकडे न जातां त्या स्त्रीधनाचा वारस तिचा नवरा होतो. ( ११ ) दयाळदास वि. सावित्रीबाई, इं. लॉ रि. ३४, मुं. ३८५; ह्यांत असा निकाल सांगण्यांत आला कीं, मयूख कायद्यानुसारें अन्वाधेय ( लग्नानंतर नवरा किंवा आईबाप ह्यांनीं दिलेलें ) स्त्रीधनाची मुलगा व मुली ह्यांच्यामध्यें सारख्या प्रमाणांत वांटणी झाली पाहिजे. ( १२ ) बाई परसन वि. बाई सोमली, ३६, मुं. ४२५; ह्या मुकदम्याच्या निकालांत अप्रतिबंध वारसा व सप्रतिबंध वारसा ह्याचें विवरण केलें असून त्यांत असें सांगितलें आहे कीं व्यवहार मयूख व मिताक्षरा, ह्या दोन्ही शास्त्रांनुसारें जेव्हां मुलांकडे आईचे वारस ह्या नात्यानें मिळकत जाते, त्यावेळीं ती त्यांची संयुक्त प्राप्ति होत नाहीं, तर ती समाईक ( टेनन्सी इन कॉमन ) प्राप्ति होते. ( १३ ) नथूभाई वि. हंसागौरी, इं. लॉ रि. ३६, मुं. ३७९; ह्या मुकदम्यांत नारायणरावांनीं असा निकाल दिला कीं, मिताक्षरा व मयूख शास्त्रांनुसारें संयुक्त कुटुंबांतील विहीर व रस्ता ह्यांची वांटणी करतां येत नाहीं. ( १४ ) तुकाराम वि. नारायण, इं. लॉ रि. ३६, मुं. ३३९; ह्या मुकदम्यांत फुल बेंचाच्या वतीनें नारायणरावांनीं असा निकाल दिला कीं, ज्यावेळीं एखाद्या अविवाहित हिंदू स्त्रीच्या मागें बापाची बहीण व तिच्या बापाचे पांच किंवा सहा पिढ्या दूरचे सपिंड गोत्रज ह्यांच्यामध्यें तिचें स्त्रीधन कोणी घ्यावयाचें हा प्रश्न उपस्थित होतो, त्यावेळीं तें स्त्रीधन वरील सपिंडगोत्रजास न मिळतां बाईच्या बापाच्या बहिणीस मिळालें पाहिजे. ( १५ ) तुकाराम वि. नाथा इं. लॉ रि. ३६, मुंबई १२०; ह्या खटल्यांत नारायणरावांनीं असें ठरविलें कीं, व्यवहारमयूखानुसार जेव्हां एकेबाजूस मयताची सावत्र बहीण व विरुद्ध पक्षाकडे चुलता ह्यांत वारसहक्काविषयीं प्रश्न उपस्थित होतो, त्यावेळीं सावत्र बहिणीकडे वारस हक्क येतो.

अशाप्रकारें हिंदु लॉ संबंधानें ज्यांस कायमचें महत्त्व प्राप्त झालें आहे असे त्यांचे आणखी कितीतरी निकाल दाखवितां येतील. त्याचप्रमाणें कायद्याच्या निरनिराळ्या शाखांसंबंधानें नाना प्रकारचे व गुंतागुंतीचे खटले त्यांच्यापुढें आले असतांना त्यांनीं त्यांसंबंधानें काळजीपूर्वक लिहिलेले पुष्कळ निकाल दाखवितां येतील. परंतु त्या सर्वांचें वर्णन करून विस्तार करण्याची आवश्यकता नाहीं.

सर लॉरेन्स जेंकिन्स मुंबईच्या हायकोर्टाचे चीफ जस्टीस असतांना त्यांनीं स्वतः हिंदु कायद्याचा फार आस्थापूर्वक अभ्यास केला होता ह्याचा उल्लेख वर आलाच आहे. जे कोणी त्यांचे हिंदु लॉ संबंधाचे निकाल वाचतील त्यांना

त्यांच्या वाचनाची व मूळ कायद्याच्या त्यांच्या माहितीची कल्पना झाल्याशिवाय राहाणार नाहीं. अशी स्वतः त्यांची स्थिति असल्यामुळें नारायणरावांकडे त्यांचें लक्ष वेधलें जाणें हें अगदीं साहजिक होतें. नारायणरावांची हुषारी, त्यांचें कायद्याचें परिपक्व ज्ञान, त्यांत नित्य भर घालण्यासंबंधानें त्यांची उत्सुकता, त्यांचें पवित्र शील, त्यांचें एकंदर वाचन व त्यांनीं दिलेले निकाल ह्यांमुळें सर लॉरेन्स जेन्किन्स ह्यांच्या ठिकाणीं नारायणरावांसंबंधानें फार आदर व प्रेम वसत असे. वकील न्यायाधिशापुढें त्यावेळपर्यंत हायकोर्टांतील सेशन्सचे खटले चालत नसत. तसे खटले त्यांच्यापुढें चालूं नयेत असा नियम नव्हता; पण तशी वहिवाट होती. सर लॉरेन्स ह्यांनीं ही जुनी वहिवाट मोडून सर नारायण ह्यांच्यापुढें सेशन्सचे खटले चालावेत अशी व्यवस्था केली. सर लॉरेन्स एवढेंच करून थांबले नाहींत. मुंबई हायकोर्टांत अपिलेट साइड व ओरिजनल साइड असे दोन विभाग आहेत हें सर्वश्रुत आहे. वकील न्यायाधिशाच्या जागीं असणाऱ्याची नेमणूक फक्त अपिलेट कोर्टांतच होत असे. नारायणरावही प्रथम अपिलेट कोर्टांतच न्यायदानाचें काम करीत असत. परंतु सर लॉरेन्स ह्यांनीं हीही वहिवाट मोडून नारायणरावांची ओरिजनल साइडकडे प्रथम नेमणूक केली. त्यांना नारायणरावांची त्या बाजूकडे नेमणूक करावयाची होती म्हणून त्यांनीं ही फार दिवसांची वहिवाट मोडली असेंही म्हणतां येईल. ह्यावरून नारायणरावांसंबंधानें सर लॉरेन्स ह्यांच्या ठिकाणीं किती उच्च भावना होती त्याची आपल्याला आज कल्पना करितां येते. नारायणरावांनीं ओरिजनल साइडचे जज्ज असतांना जे निकाल दिले त्यांतील बहुतेक अपिलांत व प्रिव्ही कौन्सिलमध्यें कायम झाले आहेत एवढें सांगितलें म्हणजे त्या निकालांचें महत्त्व वाचकांच्या ध्यानांत येईल.

## कायद्याचा अभ्यास करणारे विद्यार्थि व सर नारायण

मुंबईच्या सरकारी लॉ कॉलेजचे अधिकारी दर वर्षीं कोणातरी नामांकित कायदेपंडितास बोलावून त्याच्या व्याख्यानाचा योग वर्षांतून एकदां जुळवून आणीत असत. नारायणरावांनीं १९०७ व १९०९ अशा दोन सालीं लॉ कॉलेजच्या विद्यार्थ्यांस उद्देशून जीं व्याख्यानें दिलीं तीं चिरस्मरणीय अशींच झालीं आहेत. कायद्याचा अभ्यास करणारांनीं, त्याचप्रमाणें वकिली करणारांनीं व न्यायदानाचें महत्त्वाचें काम करीत असणारांनीं तीं व्याख्यानें मननपूर्वक वाचण्यासारखीं आहेत. नारायणरावांचें हिंदुधर्मशास्त्राच्या अध्ययनाकडे विशेष लक्ष होतें हें आपण जाणत आहोंच. त्यांचें जितकें लक्ष होतें तितकेंच इतरांचें म्हणजे वकिलांचेंही दुर्लक्ष होतें व ह्या विषयाची हेळसांड होत होती हा त्यांचा नित्याचा अनुभव असल्यामुळें, पहिल्या व्याख्यानाच्या

वेळीं त्या मुद्याचें विवेचन करितांना ते म्हणाले, ' ज्यांनीं हिंदुधर्मशास्त्राचें परम आस्थेनें अध्ययन केलें आहे, व एखादा बिकट प्रश्न पुढें आला असतांना ज्यांच्या सल्ल्याचा फार उपयोग होत असे असे जुन्या काळचे शास्त्री लोक उत्तेजनाच्या अभावीं आतां बहुतेक आढळत नाहींतसे झाले आहेत. खरें पहातां आमच्यासारख्या लोकांना आधुनिक पद्धतीनें शिक्षण मिळून वर न्यायशास्त्राचें आम्हांला ज्ञान झालेलें, म्हणून त्यांचें कार्य आतां ह्या आधुनिक ज्ञानमंडित लोकांनीं करावयाचें, पण आम्ही हिंदुधर्मशास्त्राच्या तशा प्रकारच्या अध्ययनाकडे लक्षच पुरवीत नाहीं. त्या विषयाचें सांगोपांग अध्ययन करावयास फारशीं सुशिक्षित माणसें पुढें येतच नाहींत. '

महाराष्ट्रांत साधारणपणें जें हिंदुधर्मशास्त्र प्रचलित आहे, त्यांत विज्ञानेश्वर व व्यवहारमयूखकर्ता नीलकंठ ह्यांनीं प्रतिपादलेलीं धर्मशास्त्रतत्त्वें जिमूतवाहनापेक्षां अधिक उदार व व्यवस्थित आहेत हें सर्व कायदेपंडितांस मान्य आहे. म्हणून मिताक्षरा व मयूख ह्यांच्यांत प्रतिपादिलेल्या तत्त्वांचें आस्थापूर्वक अध्ययन करून त्यांचा प्रसार करणें व त्यांच्या धोरणानें कायद्याचे निकाल लागण्याच्या कामीं सहाय्य करणें हें अशा लोकांचें कर्तव्य आहे. जे कोणी नुकतेच वकिलीचा धंदा करूं लागले आहेत व जे लवकरच तो धंदा करावयास लागतील अशांस त्यांनीं ह्याच व्याख्यानांत फार उपयुक्त सूचना केल्या आहेत. वकिली करूं लागण्यापूर्वी अगर न्यायदानाचें काम शिरावर घेण्यापूर्वी प्रत्येकास जी तयारी करणें जरूर आहे तींत आपलें मन संस्कृत करणें ही एक आहे. केवळ कायद्याच्या परीक्षा पास झाल्यानें हें होतें असें नाहीं. पुढें डिस्ट्रिक्ट जज्जाच्या हुद्यापर्यंत चढलेले श्री. जनार्दन दामोदर दीक्षित हे प्रथम ठाणें येथें वकीली करीत असत. त्यांच्यावरील अब्रूनुकसानीच्या खटल्यांत नारायणरावांचा व त्यांचा कसा संबंध आला त्याचा पूर्वी उल्लेख झाला आहेच. ह्या गृहस्थांस प्रथम कऱ्हाड येथें मुन्सफीच्या जागेवर जेव्हां नेमिलें, त्यावेळीं ते नारायणरावांच्या भेटीस गेले होते. त्यावेळीं त्यांना नारायणरावांनीं असाच उपदेश केला: " तुम्ही आतां न्यायदानाचें कार्य करूं लागणार आहां. अशा वेळीं आपल्या स्वतःच्या मनाच्या शिक्षणाची हेळसांड करूं नका. जगांत काय चाललें आहे तें वर्तमानपत्रें तुम्हांला सांगतील. पण त्यायोगें तुमचें शिक्षण पूर्ण होणार नाहीं. तुम्ही उत्तमोत्तम ग्रंथांचें वाचन सतत चालू ठेवा. कितीही काम असलें तरी आपल्या वाचनासाठीं वेळांत वेळ काढा. त्याचप्रमाणें आपलें वाचन एकपक्षीय ठेवूं नका. पाश्चात्यांचे ग्रंथ वाचतांना आर्य संस्कृतिविषयक ग्रंथांकडेही दृष्टी असूं द्या. सारांश, तुमची बुद्धि विकसित व्हावी, मन प्रगल्भ व्हावें व त्याची प्रतिभा तुम्हीं लिहिलेल्या निका-

लांत दिसावी व ह्या सर्वांस पोषक असें तुमचें वर्तन असावें एवढेंच मला तुम्हांला सांगावेंसें वाटतें.” त्याचप्रमाणें वकीलीचा धंदा करणारांनीं तर्कशास्त्राचें चांगलें अध्ययन केलें पाहिजे, असें त्यांना वाटत असे. मग त्यांनीं तर्कशास्त्रावरील मोठ-मोठे ग्रंथ जरी आत्मसात केले नाहींत तरी मिलचें लॉजिक तरी अवश्य वाचावें असें ते म्हणत असत. अशा प्रकारें कायद्याच्या प्रदेशांत पदार्पण करणारांनीं ( 1 ) Jevin's Principles of Science, ( 2 ) Smith's Leading Cases, व ( 3 ) Brooms Legal Maxims and Common Law हीं पुस्तकें अवश्य वाचावीं असा त्यांचा आग्रह असे. थोडक्यांत विषय आटोक्यांत यावा, किंवा परीक्षेपुरतें ज्ञान प्राप्त व्हावें इतकीच विद्यार्थ्यांची दृष्टी असते, म्हणून अनेक विषयांवरील लहानलहान पुस्तकें वाचून ते परीक्षकांची समजूत करण्याचा प्रयत्न करीत असतात. हीं लहानलहान पुस्तकें अवश्य टाळा, असा त्यांनीं कायद्याचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांस उपदेश केला आहे. त्या त्या विषयावरील जे सर्व-मान्य ग्रंथ त्यांचेंच अध्ययन करणें श्रेयस्कर होय. हिंदु कायद्याचें ज्ञान होतांहोईल तों मेन व घोष ह्यांचे ग्रंथ वाचून प्राप्त करून घ्यावें. त्याचप्रमाणें विज्ञानेश्वराचा मिताक्षरा व नीलकंठाचा व्यवहारमयूख व पराशरस्मृतीवरील मध्वाचार्यांची टीका हे ग्रंथ मुळांतूनच वाचणें अगत्याचें आहे. दोन वर्षांनीं त्यांनीं लॉ कालेजच्या वार्षिक समारंभाच्यावेळीं जें भाषण केलें त्यावेळीं मनाची कायद्यानुसारें विचार करण्याची संवय Legal habit of mind ह्या विषयाचें त्यांनीं सविस्तर विवेचन केलें. कायद्याच्या क्षेत्रांत वावरणाऱ्या सर्व लोकांनीं हें व्याख्यान मननपूर्वक अध्ययन करण्यासारखें आहे. ह्या व्याख्यानांत विद्यार्थ्यांस उद्देशून ते म्हणाले, “आमच्या सर्व विद्यार्थ्यांना एक वाईट खोड जडली आहे. ते बहुतेक सगळें वर्ष टंगळमंगळ करण्यांत घालवितात आणि परीक्षा जवळ आली म्हणजे झपाट्यानें अभ्यासाला लागतात. अशाच वेळीं घोकंपट्टीला सुरवात होते. परीक्षांमुळें घोकंपट्टीचा आश्रय करावा लागतो असें कित्येकांचें म्हणणें आहे, तें सर्वांशीं मला मान्य नाहीं. कांहीं घोकंपट्टी अवश्य आहे. मात्र विषय न समजतां केलेली घोकंपट्टी लाभदायक नसते व कोणाही परीक्षकाला प्रश्न विचारतेवेळीं अशा घोकंपट्टीस उत्तेजन देणें आवडत नाहीं. आतां कायद्याचा अभ्यास करावयाचा म्हणजे कायद्याच्या निरनिराळ्या शाखांचें ज्ञान मिळवावयाचें एवढेंच केवळ नसून, धंद्यांत पडतांना मनाला कायद्यासंबंधानें वळण व कायदेशीर वाटणारें वळण ह्यांतील भेद ध्यानांत घेऊन मनाला खरें वळण लावणें ह्याचाही कायद्याच्या अभ्यासांत अंतर्भाव होतो असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं.

आतां एकाद्या वकिलानें किंवा न्यायाधिशानें कायद्याच्या गुंतागुंतीच्या प्रश्नांचा

मोठ्या हुषारीनें विचार करणें व तसा विचार करितांना Legal habit of mind दाखविणें ह्यांत भेद आहे हें प्रथम ध्यानांत ठेविलें पाहिजे. प्रथमतः कोठलाही खटला पुढें आला असतांना वकिलानें अगर न्यायाधिशानें त्या खटल्याच्या खऱ्याखऱ्या हकीकतीचा योग्य छडा लावला पाहिजे. खटल्यांतील खरा प्रकार व त्यांतील वादग्रस्त मुद्दे त्यानें आपल्या दृष्टीपुढें ठेविले पाहिजेत. इतकें झाल्यावर मग त्यानें पुराव्याचा विचार करावयाचा. ह्यासाठीं त्यानें शास्त्रज्ञ व वाङ्मयसेवक ह्या दोघांच्या पद्धतीचा अंगिकार केला पाहिजे. आणि ह्यालाच मनाला कायदेशीर वळण लावणें असें मी समजतों. म्हणजे असें : एखादा भौतिक शास्त्रज्ञ आपल्या विषयाच्या मागें लागला म्हणजे लहान लहान दिसणाऱ्या सर्व गोष्टी एकत्र करून व त्यांचा पाठ-पुरावा घेऊन ज्याप्रमाणें आपला सिद्धान्त ठरविण्याचा प्रयत्न करितो, तसें कायद्याचा अभ्यास करणारानें करून वाङ्मयविशारदाची विहगदृष्टीही स्वीकारली पाहिजे. कायदे पंडितानें कोणत्याही प्रकारचा पुरावा नसतांना झालेले ग्रह बाजूस ठेविले पाहिजेत. म्हणजे प्रथम एखादी गोष्ट गृहीत धरिली तरी तिच्या विरुद्ध सर्व पुराव्याचा कसो-शीनें विचार करून ती असत्य आहे अशा दृष्टीनें सर्व काम करावें आणि अशा प्रकारें सर्व बाजूनीं हल्ला करूनच तिचा खरेपणा अगर खोटेपणा ध्यानांत येण्याचा संभव असतो. ह्या पद्धतीला शास्त्रज्ञाची कार्य करण्याची पद्धत असें म्हणतां येतें. आतां केवळ इतकेंच करून कायद्याच्या जगांत चालावयाचें नाहीं. तीव्र सत्यप्रीति ही तर हवीच, पण त्याबरोबर सारासारविचार व लोकव्यवहारांतील अनुभव ह्यांचाही आश्रय केला पाहिजे. ज्याच्याविषयीं अन्याय होत असेल त्यास न्याय देणें, दुर्बलास साहाय्य करणें हें कायद्याचें ध्येय आहे हें विसरतां कामा नये. शास्त्रज्ञ जें कांहीं शोधांतीं त्याला सांपडेल तें जगापुढें मांडतो, व आपली सत्यप्रीति जगाच्या अनु-भवास आणून देतो. कायदेपंडिताला सत्यप्रीति हवीच आहे. पण त्याला सत्याचें प्रदर्शन करावयाचें नसतें. सारासार विचार करून कोणत्या गोष्टी पुढें आणावयाच्या व कोणत्या मागें ठेवावयाच्या हें त्यानें ठरवावयाचें असतें. आणि तेंही योग्य शब्दांत, योग्य भाषेंत, तर्काच्या पायावर त्याला करावयाचें असतें. शास्त्रज्ञ म्हणणार कीं मला आजूबाजूस पहावयाची कांहीं आवश्यकता नाहीं. मी सत्य पहाणार, सत्य शोधणार व सत्य सांगणार. पण जगाचा अनुभव घेतलेला माणूस म्हणणार सर्व कांहीं सत्य बेलाशक आत्मसात् कर, पण आपल्या कार्याला अवश्य तेवढेंच जगापुढें ठेव. ( Know all that you can know, but say only what is strictly to the purpose. )

दुसरी एक गोष्ट आपण सर्वांनीं ध्यानांत ठेविली पाहिजे. तुम्ही वकील ह्या नात्यानें एखादा खटला चालवीत असा, किंवा न्यायाधीश ह्या नात्यानें एखाद्या

खटल्याचा विचार करीत असा, पुराव्याच्या कायद्यानें तुम्ही बांधलेले आहां व त्या कायद्यानें जीं बंधनें विचारपूर्वक व दीर्घ अनुभवाच्या जोरावर घालून दिलीं आहेत, त्यांच्या पलीकडे तुम्हांला जातां येत नाहीं. म्हणून तुम्ही पुराव्याच्या कायद्याचें फार आस्थेनें अध्यायन करा व हें लक्षांत ठेवा कीं, आपल्या एकंदर व्यवहारांत तर्काचा कसा उपयोग करावा हें पुराव्याचा कायदा शिकवितो व त्याचीं तत्त्वें अनुभवाच्या पायांवर स्थापिलेलीं आहेत. म्हणून हिंदी पुराव्याच्या कायद्याचें फार आस्थापूर्वक अध्ययन करण्याची मी तुम्हांला फार आग्रहाची शिफारस करितों. ह्या कायद्याच्या अभ्यासाच्यायोगें खटले चालविण्याच्या शास्त्रशुद्ध पद्धतीचें ज्याप्रमाणें ज्ञान होतें, त्याचप्रमाणें आपल्या कायदेशीर वर्तुळांत राहून काम कसें चालवावें हेंही त्याला त्यायोगें कळतें. ज्यानें पुराव्याच्या कायद्याचा कसून अभ्यास केलेला नाहीं त्याला Legal habit of mind प्राप्त व्हावयाची नाहीं. वीस वर्षांपूर्वी, म्हणजे सुमारें सन १८८९ सालीं, सर रेमंड वेस्ट ह्यांच्या अध्यक्षतेखालीं डॉ. भांडारकरांचें एक विद्वत्ताप्रचुर व्याख्यान झाल्याचें मला स्मरतें. त्यांत त्यांनीं कित्येक संशोधक आजूबाजूच्या पुराव्याचा विचार न करितां आपले सिद्धांत ठरवितात व आपल्या पूर्वग्रहास बळी पडून आपलें संशोधन कार्य चालवितात असें सांगितलें. संशोधनाच्या क्षेत्रांत वावरणारे विद्वान जर सत्यास अशा रीतीनें बाजूस सारतात, तर व्यवहारामध्यें असा प्रकार नित्य होतो ह्यांत आश्चर्य मानण्यासारखें कांहीं नाहीं. व्यवहारांतही आपल्याला सत्य काय व असत्य काय ह्याचा नित्य विचार करावयाचा असतो. कधींकधीं अज्ञानामुळें, कधीं अभिमानामुळें, कधीं पूर्वग्रहाच्या जोरावर आपण असत्यास सत्य व सत्यास असत्य करून टाकतों. म्हणून मी तर म्हणतों कीं, सर्व सुशिक्षितांनीं पुराव्याच्या कायद्याचा अवश्य अभ्यास करावा व कायद्याच्या क्षेत्रांत ज्यांना वावरावयाचें आहे त्यांनीं तर कायद्याची ही शाखा आत्मसात् केलीच पाहिजे. परंतु मोठ्या खेदाची गोष्ट ही आहे कीं कायद्याच्या ह्या शाखेइतकें दुसऱ्या कोठल्याही शाखेकडे आज सर्वत्र दुर्लक्ष होत नसावें; आम्ही परीक्षांपुरतें त्या विषयाचें अध्ययन करितों, आणि परीक्षेचें काम संपलें कीं पुराव्याच्या कायद्याकडे आमचें दुर्लक्ष होऊं लागतें. पुष्कळ वेळां असें होतें कीं एका पक्षाच्या वकिलानें एकादा प्रश्न विचारला म्हणजे त्यास हरकत घेण्यासाठीं विरुद्ध पक्षाचा वकील मोठ्या उत्सुकतेनें उठतो व हरकत घेऊं लागतो. पण पुराव्याच्या कायद्याच्या कोणत्या कलमाखालीं तूं ही हरकत घेत आहेस असें त्याला विचारलें कीं तो गोंधळून जातो व मग पुराव्याचा कायदा चाळूं लागतो! बाहेरगांवच्या पुष्कळ खटल्यांमध्यें हरकत घेण्यासारखा पुरावा खटल्यांत दाखल करण्यांत येतो. म्हणूनच परीक्षा घेतांना साक्षीदाराची साक्ष, उलट साक्ष, फेरतपासणी ह्यांसंबंधीं प्रश्न विचारले जावेत

अशी सूचना युनिव्हर्सिटीला करण्याची आवश्यकता हायकोर्टाला वाटली. अशा प्रकारें ह्या शाखेची हेळसांड होण्याचें एक मुख्य कारण असें आहे कीं, पुराव्याचा कायदा हा केवळ सारासार विचारावर उभारलेला आहे, मग आपण सारासार विचार कायम ठेविला म्हणजे झालें, असें पुष्कळांना वाटतें ! पण असें म्हणतांना जें आपण विसरतों तें हें कीं, पुराव्याचा कायदा म्हणजे एका व्यक्तीचा सारासार विचार नव्हे. तर आजपर्यंतच्या अनुभवाच्या व शहाणपणाच्या जोरावर ह्या कायद्याची उभारणी झालेली आहे. आपले साधुसंत, धर्मशिक्षक, वाडवडील, नेते ह्या सर्वांची आपल्याला अशी शिकवण आहे कीं, स्पष्ट पुराव्याच्या अभावीं कोणाविषयींही भलताच ग्रह करून घेऊं नये. हीच शिकवण पुराव्याच्या कायद्याची आहे. आरोपी जें सांगत आहे तें खरेंच आहे असें धरून चालावयाचें, तो प्रामाणिकच आहे असें प्रथम मानावयाचें, व पुरावा विरुद्ध आला व तो शाबीत झाला तरच त्याच्या खरेपणावरील आपला विश्वास अस्थानीं होता असें ठरवावयाचें, असें जें पुराव्याच्या कायद्याचें तत्त्व आहे तें ह्याच तत्त्वानुसारें होय. ही गोष्ट वकिलांनीं अवश्य लक्षांत ठेविली पाहिजे. कारण, साधारणतः वकील म्हटला म्हणजे अनुदार वृत्तीचा, कठीण हृदयाचा, आपल्या सारख्या माणसांमध्यें तंटेबखेडे उत्पन्न करून, त्यांस भांडावयास लावून त्यावर आपल्या पोटाची खळगी भरीत भरीत गब्बर होणारा व जें वाईट आहे, निंद्य आहे, तें चांगलें आहे, सत्य आहे असें दाखविण्याचा प्रयत्न करणारा विचित्र प्राणी आहे असा समज सर्वत्र आढळतो ! परंतु व्यवहारांत आजची स्थिति अशी आहे कीं, वकिलांवांचून कांहीं चालत नाहीं व त्याच्या संबंधानें जी विश्वासाची भावना असावयास पाहिजे ती कांहीं दिसून येत नाहीं. मनांतून लोक वकिलाला भितात आणि त्याचा तिरस्कारही करितात ! उत्तम वकील म्हटला म्हणजे तो युक्तिबाज, ह्या बोटावरील थुंकी त्या बोटावर सहज करणारा, अनेक प्रकारची उपाययोजना करून विरुद्ध पक्षावर मात करणारा असा साधारण समज आहे. त्याचप्रमाणें वकील म्हटला म्हणजे त्याचें सर्व लक्ष आपल्या फीकडे, त्याला आपल्या कुळाच्या गरीबीकडे पहाण्याचें सुचत नाहीं असाही साधारण समज आहे. हे जे वकिलासंबंधानें लोकांचे ग्रह झाले आहेत ते केवळ दुराग्रह नाहींत, किंवा दुसऱ्या कोणा धंदेवाल्यांमध्यें हे किंवा अशा प्रकारचे दोष दाखवितां येणार नाहींत असें कांहीं म्हणतां येणार नाहीं. परंतु हे दोष घर करून रहावयास आमच्या धंद्यांत पुष्कळ जागा आहे हें कांहीं खोटें [१] नाहीं. नेहमीं कज्जेकफावतींत पडण्याचा, दोघांच्या भांडणांत कोठली तरी

१. But there can be no doubt that the temptations to hard heartedness, want of charity, over technicality, over subtelty are greater i nour profession than in any other. —*The Legal Habit of Mind*

एक बाजू घेण्याचा, आपला धंदा आहे. त्यामुळें अंतःकरण निष्ठुर होत जाण्याचा, किंवा प्रेमाचा झरा शुष्क होत जाण्याचा संभव आहे ह्यांत कांहीं संशय नाहीं. वकिलाचा धंदाच मुळीं असा आहे कीं, तो करीत असतांना त्यांत वाद-विवाद हा नेहमीं करावा लागतोच. त्यामुळें लहानसहान आधार सांपडला तरी त्याचा कीस काढून आपली बाजू सबळ करण्याकडे साहजिक प्रवृत्ति होते. वरील प्रकारची प्रवृत्ति व्हावयास आणखी एक गोष्ट कारण होत असते. बहुतेक सर्व खटल्यांत वकिलांना सत्य-असत्याच्या मिश्रणाशीं झगडावें लागतें. प्रत्येक साक्षी-दार शपथपूर्वक, अगदीं परमेश्वरास स्मरून मी म्हणतों तेंच खरें असें सांगतो व दुसऱ्या साक्षीदाराच्या विरुद्ध धडधडीत खोटें विधान करीत असतो. अशा प्रकारें एका शपथेविरुद्ध दुसरी शपथ, एकाच्या प्रतिज्ञेविरुद्ध दुसऱ्याची प्रतिज्ञा आणि परस्पर विरुद्ध जबान्या पाहून, ऐकून, अनुभवून मन निढावलें, त्यांतील कोमल भावना नष्ट झाली, प्रेमाचा ओलावा सुकून गेला, प्रत्येकाविषयीं मनांत साशंक वृत्ति बाणूं लागली, सहानुभूति नष्ट झाली, तर त्यांत आश्चर्याचें असें काय आहे ? ज्याच्या मनाची अशी स्थिति होते त्यास शांति व स्वास्थ्य कोठून प्राप्त होणार ?

ही संकटपरंपरा, ही धोक्याची अवस्था जर टाळावयाची असेल तर त्याला एकच उपाय आहे. आपण स्वतः मनुष्याच्या नैसर्गिक चांगुलपणावरील विश्वास दृढ केला पाहिजे. साक्षीदार खोट्या जबान्या देतात, पण कित्येक प्रसंगीं त्यांचे वकीलच त्यांना तशी शिकवणूक देतात. न्यायाधीश स्वतः सदाचरणी, पापभीरू, धर्मशील असला, वकीलही प्रामाणिक, प्रेमळ व सहानुभूतिपूर्वक काम करणारा असला, तर साक्षीदार सहसा जाणूनबुजून खोटी साक्ष द्यावयास धजत नाहीं, हें मी स्वानुभवानें सांगूं शकतों. ही अतिशयोक्ति आहे असें आपण समजूं नये. कित्येक वर्षांपूर्वी रत्नागिरी येथें मि. इन्नन नांवाचे एक जज्ज होते. हे गृहस्थ अगदीं सौम्य वृत्तीचे, प्रेमळ अंतःकरणाचे, दीनांचे संरक्षक व पापभीरू होते. त्यांचेवर लोकांची अकृत्रिम भक्ति जडली होती. त्यांच्या शीलाचा व त्यांच्या तेजाचा असा परिणाम होत असे कीं, साक्षीदार त्यांच्यापुढें आले कीं, त्यांस जें कांहीं खरें असेल तेंच सांगावयाची बुद्धि होत असे. त्याप्रमाणें एका मुन्सफांचीही कीर्ति होती. सारांश, Legal habit of mind म्हणजे कायद्याच्या शब्दांचा व वाक्यांचा कीस काढणें नव्हे, किंवा प्रतिपक्षास, अगर न्यायाधिशांस बुचकळ्यांत किंवा गोंधळांत पाडण्याचें सामर्थ्य अंगीं आणणें नव्हे; किंवा, जात, धर्म, रंग ह्यांविषयीं पूर्वग्रहानें दूषित होऊन हुशारीनें कार्य करणें नव्हे. अशा रीतीनें वागणारा वकील मोठा हुषार असेल, पण एकंदरींत तो खालच्याच दर्जाचा वकील असें समजावयास कांहीं हरकत नाहीं. तो दोन पैसे मिळवील, पण तो आपल्या

धंद्यास भूषण मात्र नव्हे एवढें खरें. वकील हा समाजाच्या रास्त हक्कांचा पुरस्कार करणारा, अन्याय दूर करण्याच्या कामीं सर्व प्रकारें सहाय्य करणारा असला पाहिजे. वकिलाचा धंदा हा फार थोर आहे. न्यायाच्या कामीं मदत करणें हें त्याचें ब्रीद असावें. त्याच्या कर्तव्याचें स्वरूप अत्यंत पवित्र आहे. आतां तुम्ही कायद्याचा अभ्यास करीत आहांत, त्यावेळीं शास्त्रज्ञाची कठोर दृष्टि व वाङ्मयसेवकाची विहग-दृष्टि दोन्ही आपल्याशा करून साधुसंतांनीं जें मनाचें औदार्य दाखविलें तेंहि नित्य दृष्टीपुढें ठेवा. अशा दृष्टीनें तुम्ही अध्ययन चालू ठेवाल तर मिळविलेलें ज्ञान सामर्थ्यदायी होईल व तें नीरस वाटणार नाहीं. हें ध्येय फार उच्च आहे असें तुम्ही म्हणाल. होय, तें तसें आहे ह्यांत कांहीं संशय नाहीं. ध्येय हें नेहमीं उच्चच असावें लागतें. हें उच्च ध्येय टाकून तुम्ही कमी प्रतीचें ध्येय स्वीकारिलें, तर वकील हा अन्याय दूर करणारा, जनतेच्या हक्कांचें संरक्षण करणारा न होतां समाजाला कीड लावणारा, समाजाचा नाश करणारा व समाजाचा हितशत्रु होतो."

## कांहीं गुणदोष

नारायणराव मोठे धर्मनिष्ठ गृहस्थ होते हें सर्वांस विदित आहे. उच्च धर्मनिष्ठा व देवावरील दृढ विश्वास ह्यांच्या योगें त्यांच्या अखिल जीवनास मनोरम सौंदर्य प्राप्त झालें होतें. त्यांचे धर्मविषयक विचार, त्यांचे धर्मविषयक लेख, त्यांच्या धर्मविषयक आकांक्षा, त्यांचें ध्येय, त्यांचें आत्मपरीक्षण, त्यांचा नित्य क्रम ह्यांविषयीं अन्यत्र विवेचन झालेंच आहे. तथापि सर्व शुभ कार्यांत परमेश्वराचें सहाय्य मागावें, आपल्या मनाची आर्ति देवाला सांगावी असा त्यांचा विश्वास असे व त्याप्रमाणें ते स्वतः वागत. मन गोंधळलें, दोन्ही पक्षांकडील विचार ऐकून तें द्विधा झालें व पुढें काय करावें ह्याविषयीं स्पष्ट कल्पना होत नाहीं असें झालें कीं ते देवास शरण जात.[१] न्यायासनीं

१. I realised today the value of Prayer and silent communion with God. Yesterday there was a motion before me in the Court for the appointment of a receiver. The question raised was such that after I had heard arguments I could not make up my mind, felt rather perplexed as to what I should do. So I reserved judgment. At night I tried to think and make up my mind but I could not see my way clear. I gave up thinking over the point and before going to bed prayed and in the prayer sought God's help towards the decision. I slept very well. Got up in the morning—prayed again. And when after my bath I sat with the papers to think and decide, the way I should decide seemed to stand before me as if it had come of itself—without any effort of mine. I wrote it out and delivered my judgment. 23-1-1906

अधिष्ठित असतांना एकदां एका खटल्यांतील दोन्ही पक्षांच्या वकिलांचीं भाषणें ऐकून त्यांचें स्वतःचें मन निश्चित होईना. घरीं आल्यावर त्यांनीं पुष्कळ विचार केला, पण मनाचें समाधान होईना. अखेरीस नेहमींचीं कार्यें करून ते निद्रावश झाले. पहाटेस त्यांनीं देवाची प्रार्थना केली व नंतर त्या खटल्याचा निकाल लिहावयास बसले. त्या वेळीं त्यांस कांहींही अडचण भासली नाहीं, सर्व शंका विलयास गेल्या व नेहमीं-प्रमाणें त्यांनीं आपला निकाल लिहिला. त्यावेळेच्या सहज स्फूर्तीच्या भरांत त्यांना स्वतःला कोणत्याही प्रकारचा प्रयास न पडतां, अगर कालच्या अडचणी मनांत न येतां त्यांनीं तो निकाल लिहिला. हा एकाच वेळचा अनुभव असें मात्र नव्हे. ज्या ज्या वेळीं त्यांस निकालासंबंधानें कांहीं शंका उपस्थित होई, त्या त्या वेळीं त्याच दिवशीं निकाल न लिहितां ते निकाल देण्याचें काम पुढल्या दिवसावर टाकीत आणि घरीं आल्यावर योग्य वेळीं ते देवाची मनःपूर्वक प्रार्थना करीत व नंतर पूर्वीं ज्या गोष्टींविषयीं त्यांस कोडें पडलेलें असे त्याचा त्यांस सहज उलगडा होत असे. अशास एका प्रसंगास उद्देशून त्यांनीं म्हटलें आहे:—

Always pray, especially in doubt and difficulty, and God will help you, provided the prayer is earnest and mind pure.

त्यांचा असा दृढ विश्वास होता कीं केवळ सत्कार्यरति पुरेशी नाहीं. जें जें कांहीं आपण करीत आहों तें देवाचें कार्य आहे अशा विश्वासानें करावें असें त्यांचें मत होतें. म्हणून कोणीही सत्कार्यरति कायम ठेवण्याचा प्रयत्न केला म्हणजे झालें असें म्हटलें कीं त्यांस तें पटत नसे व ते ताबडतोब सांगत कीं,

Work alone without the consciousness and the inspiration that it is God's, narrows us; it is apt to degenerate into mere routine; and difficulties, disappointments, temptations, mar it. But pray to God and accustom yourself to the idea that you are doing God's work and the prayerful habit becomes an inspiration, making even drudgery divine.

अर्ल बर्कनहेड ह्यांनीं Fourteen English Judges ह्या नांवाचा एक चरित्रात्मक व चर्चात्मक ग्रंथ लिहिला आहे. त्यांत सर एडवर्ड कोक ह्यांचेविषयीं लिहितांना त्यांनीं पुढील आशयाचे उद्गार काढले आहेत :—

"न्यायाधीश ह्या दृष्टीनें त्यांच्या कारकीर्दीकडे पहातां कायद्याच्या तत्त्वांनुसारें वागण्याची त्यांची सिद्धता असे. परंतु त्यांच्याप्रमाणेंच नामांकित, विद्वान व नांवा-रूपास आलेल्या दुसऱ्या कित्येक न्यायाधिशांप्रमाणें आपल्या कोर्टांत चाललेलीं दोन्ही पक्षांचीं भाषणें संथपणें ऐकून घेण्याची व कायद्याच्या मुद्द्यांसंबंधानें आपल्या अध्यक्षत्वाखालीं वादविवाद चालू ठेवण्याची त्यांची सिद्धता नसे."

दुसऱ्या कित्येक नामांकित न्यायमूर्तीप्रमाणें नारायणरावांसही लांबलांब भाषणें, व त्याच त्याच मुद्द्यांचें चर्वितचर्वण चाललेलें ऐकावयाचा कंटाळा असे व अशा वेळीं ते आपली अधीरता आपल्या आचरणानें व्यक्तही करीत असत. मुंबईच्या हाय कोर्टाचे एक माजी सर न्यायाधीश सर नॉरमन म्याकलाउड हे आपल्या विद्वत्ते-बद्दल प्रसिद्ध नसत. परंतु त्यांचा काम करण्याचा वेग इतका होता कीं, त्यांनीं हाय-कोर्टातील शिल्लक राहिलेलें काम अल्पावधींत खलास करून टाकलें! ते स्वतः खटल्याचे सर्व कागदपत्रें घरून फार काळजीपूर्वक वाचून येत. नंतर कोर्टांत ज्या मुद्यांवर दोन्ही पक्षांच्या वकिलांचें म्हणणें ऐकून घ्यावें असें त्यांना वाटे तेवढ्याच मुद्यांवर वकिलांना ते बोलावयास सांगत व कधींकधीं तर वकिलास भाषण करावयाची आवश्यकताच नाहीं असें सांगून आपला निकाल देऊन टाकीत! नारायणरावांप्रमाणें त्यांनीं कायद्याचीं तत्त्वें आत्मसात् केलेलीं नव्हतीं, त्यांचे निकाल विद्वत्तापूर्ण नसत व त्यांत चिरकाल महत्त्वाचा भागही कमीच असे. त्यामुळें त्यांचे पुष्कळसे निकाल पुढें टिकाव धरीत नसत हा भाग स्वतंत्र आहे. पण त्यांनीं पुष्कळसें कुचंबून पडलेलें काम धडाडीनें निकालांत आणिलें ह्याविषयीं दुमत नाहीं. इतर हुशार कायदेनिष्णात न्यायमूर्तीप्रमाणेंच कांहींसें नारायणरावांचें होत असे. सर मॅकलाउड वकिलांना बोलण्यास पुष्कळ वेळां अवसर देत नसत व कित्येक वेळां आपण काढलेल्या मुद्यांवरच वकिलांना बोलण्यास सांगत असत. परंतु नारायण-रावांनीं सतत पुष्कळ वर्षे वकिली केलेली असल्यामुळें वकिलांच्या गुणांचें, त्याच-प्रमाणें त्यांच्या दोषांचें त्यांचें ज्ञान भरपूर होतें. इकडे वकील आपल्या कांहीं मुद्यांवरील भाषण घोळूनघोळून चालवीत असतो आणि जज्ज ते सर्व मुद्दे ध्यानांत घेऊन पुढील मुद्द्यांचा विचारही मनांत करूं लागतो, तरी वकीलसाहेबांचें जुन्याच मुद्द्यांवरील रेंगाळणें व तेच ते मुद्दे पुढें आणून कंटाळवाणें भाषण पुढें चालविणें हा प्रकार पाहून न्यायाधिशाची शांति ढळते. आपले मुद्दे पूर्णपणें जज्जाच्या ध्यानांत यावे म्हणून वकील आपलें कौशल्य लढवीत असतो, पण जज्जसाहेबांची मजल फार पुढें गेलेली असल्यामुळें त्यांना हा सर्व प्रकार फार कंटाळवाणा वाटत असतो. असला प्रकार नारायणरावांस सहन होत नसे व ते वकिलांचीं लांबलचक आणि चर्वितचर्वण करणारीं भाषणें त्यांस आटोक्यांत आणावयास लावीत. त्यामुळें कधीं कधीं वकि-लांचा निरुत्साहही होत असावा. परंतु त्यांच्यासंबंधानें विशेष गोष्ट अशी असे कीं, काम झटपट करण्याच्या हेतूनें, खटला पूर्ण समजून घेतल्यावांचून घाईघाईनें ते आपले निकाल जागच्या जागीं सांगत नसत. त्यांनीं दिलेल्या निकालांसंबंधानें सामान्यतः असें म्हणतां येतें कीं, त्यांच्या पुष्कळ निकालांस अधिकाराचें व काय-मचें स्वरूप प्राप्त झालें असून, त्यांस विरोध असा क्वचितच दिसून येतो. त्यांचे

निकाल वाचीत असतांना हिंदु कायद्याची अगर दुसऱ्या एखाद्या कायद्याची वाढ कशी झाली व ती होत असतांना कोणकोणतीं तत्त्वें अमलांत येत गेलीं ह्या विष-यींचें त्यांचें विवरण मुद्देसूद व बिनचूक असें आढळतें. पुष्कळशी गुंतागुंतीची माहिती पुढें आलेली असली तरी तींतून महत्त्वाचे तेवढे मुद्दे ते चटकन् काढून घेत व त्यांची चर्चा करीत. ह्या त्यांच्या गुणासंबंधानें विचार करीत असतांना न्यायमूर्ति ह्या नात्यानें लॉर्ड रसेल ह्यांच्या कारकीर्दीचा ऊहापोह करतेवेळीं मि. जेल्प ह्यांनीं काढलेल्या उद्गारांची आठवण होते. कारण, नारायणरावांसंबंधानें तसेंच म्हणतां येण्यासारखें आहे. "सर्व बाबतींतील त्यांचा वक्तशीरपणा हा त्यांचा गुण लक्षांत ठेवण्यासारखा आहे. त्याचप्रमाणें आपल्यापुढें होणाऱ्या भाषणांकडे त्यांचें केव्हांही दुर्लक्ष होत नसे. दुसरी गोष्ट, सर्वांशीं त्यांचें वर्तन समानभावाचें असे. म्हणजे एखादा तरुण बॅरिस्टर केस चालवीत असला व त्याच्या भाषणांत व केस चालविण्याच्या पद्धतींत मननीय मुद्दे व मुद्देसूदपणा असला व त्यानें आपला खटला प्रथम चांगल्या रीतीनें समजून घेतला आहे असें दिसलें कीं, ज्याप्रमाणें एखाद्या वृद्धाचार्य बॅरिस्टराचें म्हणणें ते लक्षपूर्वक ऐकत, त्याचप्रमाणें ह्या तरुणाकडे त्यांचें लक्ष असे. तरुण, वयोवृद्ध, लहान व मोठा हा भेद ते मानीत नसत. त्यांचा दीर्घोद्योग अत्यंत आश्चर्यजनक होता. त्यांच्या निका-लांत त्यांच्या भाषाप्रभुत्वाची साक्ष जागोजाग पटे. निकाल तोंडीं सांगत असतांना ग्राम्य म्हणी, अस्पष्ट उद्गार, अर्धवट वाक्यें कधींही आढळत नसत आणि त्यांतील तर्कशुद्ध विचारसरणी, भाषेचा सरळपणा, विचारांचा वहाता ओघ, त्यांची कळकळ ह्यांचा निकाल ऐकत असतांना मनावर परिणाम झाल्यावांचून राहात नसे. परंतु त्यांचा मुख्य दोष असा होता कीं, एखादा खटला चालवितांना जर वकिलाचा बावळटपणा, अगर मूर्खपणा दिसून आला, किंवा कोणीं विनाकारण वाचाळता चालविली, किंवा खटल्यासंबंधानें निराधार व चुकीचीं विधानें जाणूनबुजून होत आहेत असें त्यांच्या अनुभवास आलें, तर मात्र त्यांची शांति ढळत असे व मग तसा हेतु नसतांही बॅरिस्टर व साक्षीदार ह्यांच्यासंबंधानें त्यांच्या हातून अन्यायाचें वर्तन होत असे. ह्याचें मुख्य कारण असें असे कीं, त्यांच्याशीं ज्यांचा संबंध येत असे त्यांचा निर्बुद्धपणा अगर बावळटपणा त्यांस सहन होत नसे. आपल्या हातून अन्याय होऊं नये अशी त्यांची फार इच्छा असे. म्हणून त्यांचें उच्च ध्येय, त्यांचा अधिकार, त्यांचें इच्छास्वातंत्र्य ह्यांमुळें आपली इच्छा इतरांवर लादण्याचा प्रयत्न होत आहे असें वाटत असे." हे लॉर्ड रसेलसंबंधानें मि. जेल्प ह्यांनीं काढलेले उद्गार कमीअधिक प्रमाणांत नारायणरावांसही लागू पडण्यासारखे आहेत. कधींकधीं त्यांच्या तोंडून अनुदारता

दर्शविणारे उद्गार वकील अगर बॅरिस्टरसंबंधानें निघून जात. परंतु थोड्या विचारांतीं आपल्या हातून अन्याय घडला असें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस येतांच ते ताबडतोब त्या वकिलास अगर बॅरिस्टरास आपल्या खोलींत बोलावून दिलगिरी प्रदर्शित करीत. ते स्वतः अगदीं प्रामाणिक, सरळ वृत्तीचे असून कुढ्या दिलाचे नसल्यामुळें त्यांच्या अंतःकरणावर जो तात्कालिक परिणाम होत असे त्यास अनुसरून ते बोलून जात. पण त्यांच्या मनांत द्वेषबुद्धि, किंवा मत्सरभाव नसल्यामुळें, त्याचप्रमाणें आपल्या हातून कोणासंबंधानेंही अन्याय होऊं नये ही भावना नेहमीं जागृत असल्यामुळें त्यांच्या ध्यानांत आपली चूक ताबडतोब येत असे व एकदां ती लक्षांत आल्यावर तिची दुरुस्ती केल्यावांचून त्यांस मुळींच चैन पडत नसे.

## ओरिजिनल साईडचे जज्ज

सर नारायण ह्यांची चीफ जस्टिसच्या जागीं एकदां १९०९ सालीं व १९११ अशी दोनदां नेमणूक झाली होती. त्यांच्यासारख्या अगर सर लल्लूभाई शहासारख्या नामांकित वकिलांची चीफ जस्टिसच्या जागीं कायमची नेमणूक होणें कायद्याच्या दृष्टीनें शक्य नसावें ही अत्यंत आश्चर्याची व खेदाची गोष्ट आहे. चीफ जस्टिसच्या जागीं कोणाला नेमतां येईल ह्यासंबंधाचा जो नियम आहे त्याचा अर्थ त्या जागेवर बॅरिस्टर जज्जाची नेमणूक व्हावी असा केला गेलेला आहे. परंतु वकील जज्जांची ह्या जागेवर वारंवार नेमणूक करतां यावी, वकील जज्जाला महिनेच्या महिने त्या जागीं नेमलें जावें आणि कायमची नेमणूक व्हावयाच्या वेळीं मात्र दुसऱ्याच जज्जाची नेमणूक व्हावी हा कायद्याचा जुलूमच म्हणावयाचा! अखेरीस ह्या मल्लिनाथीसंबंधानें बरीच चर्चा होऊन असेंब्लीपर्यंत हें प्रकरण जाऊन असें आश्वासन मिळालें कीं, लवकरच ही अडचण दूर करण्यांत येईल व त्याप्रमाणें एक बिलही तयार करण्यांत आलें. परंतु तें बिल पास झालें तर आय. सी. एस. जज्जलाही चीफ जस्टिसच्या जागीं कायमचें नेमतां आलें असतें असें पाहून सर्व हिंदुस्थानांत त्याच्याविरुद्ध बरीच चर्चा झाली व अखेरीस तें बिल मागें घेण्यांत आलें. ज्याप्रमाणें वकील जज्जाची हायकोर्टाच्या मुख्य जज्जाच्या जागीं नेमणूक करितां येत नव्हती त्याचप्रमाणें आय. सी. एस. जज्जाचीही तशी नेमणूक करितां येत नव्हती. त्याचीं कारणें अशीं आहेत कीं, आय. सी. एस. जज्जाला सरकारच्या कार्यकारी कौन्सिलचे सभासद होतां येतें; एवढेंच केवळ नव्हे, तर त्याला विशेष प्रसंगीं इलाख्याचा गव्हर्नरही होतां येतें, म्हणून त्याची सर न्यायाधिशाच्या जागीं नेमणूक करितां येत नव्हती. त्यास

वर जावयाचा एक तरी मार्ग मोकळा असतो. त्याच्या कायमच्या नेमणुकीला दुसरा एक असा अडथळा समजण्यांत येत असे कीं, आय. सी. एस. जज्ज हा बहुत-करून खालून वर आलेला अधिकारी असतो. खालीं त्यानें Executive officer म्हणून अधिकार गाजविलेला असतो. त्यामुळें त्याची दृष्टी तशीच झालेली असते. चीफ जस्टिसच्या जागेस पूर्वग्रहांनीं ज्याची दृष्टि दूषित झाली आहे असा मनुष्य नको असतो. सारांश, वकील जज्जाला फायदा मिळावा म्हणून योजिलेली सुधारणा, आय. सी. एस. ना लाभदायक होते असें पाहून व आय. सी. एस्. जज्जांची संख्या अधिक असते असें जाणून, रद्द करणें भाग पडलें. परंतु आतां १९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्ट, कलम २२० पोट कलम ३ च्या प्रोव्हाइजो ( Proviso ) प्रमाणें वकील जज्जास चीफ जस्टीस नेमण्यास कायद्याची हरकत दूर झाली आहे.[१]

नारायणरावांस चरित्र-ग्रंथ वाचण्याची फार आवड असे. त्यांतूनही आत्मचरित्र-पर ग्रंथांस ते फार महत्त्व देत असत. कारण आत्मचरित्रांत सर्व विवेचन साधार असतें, सर्व महत्त्वाच्या प्रसंगांचें स्वतःच्या अनुभवाच्या जोरावर त्यांत वर्णन आलेलें असतें. निरनिराळ्या विषयांवरील चरित्रनायकाचे विचार त्यांत वाचावयास मिळतात. ह्या दृष्टीनें पहातां स्वतः नारायणरावांनीं जर आत्मचरित्रपर ग्रंथ लिहिला असता, तर त्याचें मोलही करितां आलें नसतें. त्यांनीं स्वतःस उद्देशून जागोजाग जें लिहून ठेविलें आहे त्याचा आम्हीं निरनिराळ्या ठिकाणीं उपयोग केला आहे. तथापि न्यायमूर्ति असतांना कोर्टांत आलेल्या अनुभवांसंबंधानें, किंवा तेथील कामाच्या अनुभवांसंबंधानें त्यांनीं फारसें लिहून ठेविलेलें नाहीं. कायद्याचे बिकट प्रश्न सोडवितांना त्यांना प्रार्थनेचें जें साहाय्य होत असे त्याचा उल्लेख दुसरीकडे केलाच आहे. नाहीं म्हणावयास नारायणरावांनीं आपले मित्र वासुदेवराव भांडारकर ह्यांस लिहिलेल्या कांहीं पत्रांत ह्या अनुभवांसंबंधानें कोठेंकोठें उल्लेख आढळतो. ह्यांपैकीं कांहीं पत्रें मृत्युपूर्वी वासुदेवराव भांडारकरांनीं आमच्या स्वाधीन केलीं व त्यांचा योग्य तो उपयोग करावा, अशी त्यांनीं आम्हांस सूचना

१. Government of India Act, 1935—25 & 26 George V, ch. 42, ( Sec. 220, Sub-section ( 3 ) is as follows :—

" Provided that a person shall not unless he is or when first appointed to judicial office was, a barrister, a member of the Faculty of advocates, or a pleader be qualified for appointment as a Chief Justice of any High Court competent by Letters Patent until he has served for not less than three years as a Judge of the High Court.

केली होती. ह्या पत्रांतील माहितीच्या आधारें पुढील भाग लिहिला आहे:—

वकील न्यायाधिशानें हायकोर्टांत अपील—कोर्टांत नेहमीं काम करावें अशी मुंबई हायकोर्टाची वहिवाट असे. त्यामुळें माधवराव रानड्यांसारख्या न्यायमूर्तींस ओरिजिनल साइडचें दर्शन झालें नाहीं. नानाभाई हरिदास ह्या वकील न्यायाधिशाच्या जागीं काशिनाथपंत तेलंगांची नेमणूक झाली होती. आणि ते जरी ॲडव्होकेट होते तरी त्यांना बहुतेक सर्व काळ अपिलेट कोर्टांतच काम करावें लागलें. हायकोर्टांतही रूढीचें इतकें माहात्म्य होतें व आजही तें आहेच. पण सर लॉरेन्स जेन्किन्स सर न्यायाधीश असतांना ह्या बाबतींत तरी हें रूढीचें भूत त्यांनीं मोठा हिय्या करून गाडून टाकलें! पहिलीं जवळ जवळ तीन वर्षें नारायणरावांनीं न्यायाधीश ह्या नात्यानें अपिलेट बाजूलाच काम केलें; परंतु १९०३ सालीं सर लॉरेन्स ह्यांनीं वकील जज्जानें अपिलेट बाजूलाच बसावयाचें ही रूढी मोडण्याचा निश्चय करून त्यांनीं १९०३ च्या आगस्टमध्यें नारायणरावांची ओरिजनल बाजूकडे नेमणूक केली. त्यावेळीं ती व्यवस्था आक्टोबरपर्यंतच चालावयाची असें ठरलें होतें.[1] तरी पण ता. २ जान्युआरी रोजीं वासुदेवरावांना लिहिलेल्या पत्रांत नारायणराव म्हणतात, "आक्टोबरच्या रजेनंतर कोर्टाच्या कामास सुरुवात झाल्यावर चीफ जस्टिस साहेबांनीं मला सांगितलें कीं बॅरिस्टर लोकांना तुमचें काम फार पसंत पडल्यामुळें तुम्हांला त्याच कोर्टांत आणखी कांहीं काळ काम करावें लागेल." त्याप्रमाणें जान्युआरीपर्यंत त्यांनीं तेथें काम तर केलेंच. पण जान्युआरीच्या (१९०४) पहिल्याच तारखेस नारायणरावांची व सर लॉरेन्स जेन्किन्स ह्यांची मुलाखत झाली त्यावेळीं सर लॉरेन्स म्हणाले, "ओरिजनल साइडला तुमचें

---

१. "Next Monday the Court reopens and I am to be on the Original side. When I was sent over there last August, the Chief Justice said it would be for a few months—till X'mas at the most; but on reopening of Court after October vacation he told me as the Bar "was greatly satisfied" with me he intended to continue me there some time longer. I met the Chief Justice yesterday and again he said "You will be gratified to hear that there is a great satisfaction with your work on the Original side. They are very highly impressed with it and Scott tells me that you have been reminding him by your work of Farran. I am sorry to part with you from the Appellate side but I am afraid they all want you on the Original side and I must continue you there."

जें काम चाललें आहे तें पाहून सर्व बॅरिस्टर्सनीं अत्यंत समाधान व्यक्त केलें आहे, त्यांना तुमचें काम अगदीं पसंत आहे. आणि मि. स्काट ( हे त्यावेळीं ॲडव्होकेट जनरल होते व नंतर सर लॉरेन्सच्या जागीं चीफ जस्टिस झाले. ) तर म्हणत होते कीं, तुमची एकंदर काम करण्याची पद्धत पाहून आपल्याला मि. फॅरन ह्यांची आठवण होते. त्या बाजूच्या ( ओरिजनल साइड ) सर्व लोकांना तुमचें काम इतकें आवडल्यामुळें मला तुम्हांला तिकडेच ठेवणें अगत्याचें आहे, पण तुमच्या ह्या बदलीमुळें आमच्या अपिलेट बाजूचें नुकसान होत आहे ह्याबद्दल मला वाईट वाटतें" आणि वास्तविक पहातां स्वतः नारायणरावांस अपिलेट साइडपेक्षां ओरिजनल साइडचेंच काम अधिक आवडूं लागलें होतें व तसें त्यांनीं सर लॉरेन्स ह्यांस सांगितलेंही. ओरिजनल साइडला अथपासून इतिपर्यंत मोठमोठ्या केसिस जज्जापुढें चालतात व सर्व पुरावा व साक्षी न्यायाधिशापुढें येतात. मात्र नारायणरावांच्या वेळीं जज्जाला लिहून घेण्याचें काम बरेंच असे, आतां त्यांना लघुलिपि लेखकाचें सहाय्य मिळतें. दुसरें असें कीं, आपली हुषारी, कायद्यांतील पारंगतता, कायद्यांतील गुंतागुंतीचे प्रश्न सोडविण्याचें कौशल्य, ओरिजनल साइडलाच काम करीत असतांना दाखविण्याच्या अधिक संधी येतात, असें त्यांस वाटत असे.[१] ओरिजनल साइडला जज्जाचें काम करीत असतांना ज्याप्रमाणें विशेष महत्त्वाचे मुद्दे नसलेले खटले त्यांच्यापुढें येत, त्याचप्रमाणें गुंतागुंतीचे मुद्दे असलेल्या केसिसही त्यांच्यापुढें येत. गुंतागुंतीच्या खटल्यांतील निकाल मागाहून सांगण्याचें त्यांनीं ठरविलें म्हणजे मग नारायणरावांचें विचाराचें चक्र सुरू व्हावें. फिरावयास गेले तरी ते मुद्दे त्यांच्या डोक्यांत घोळावेत व त्यांच्यावरच त्यांचा सारखा विचार चालावा. फारच महत्त्वाचीं व त्रासदायक प्रकरणें असलीं म्हणजे मग रात्रीं बिछान्यावर पडल्यावरही त्यांचे विचार चालत व त्यामुळें त्यांची झोंपमोडही होत असे.[२]

## एक अनुभव

नारायणराव वकील असतांना एकदा खटला हातीं घेतल्यानंतर त्यासंबंधानें

---

१. I like the Original side myself better, except that the manual labour of the work is greater than on the appellate side. I don't mind it. I rather like it—the work is so stimulating for one thing and for another gives one a chance of proving what there is in him, if there is anything in him.

२. The ideas in connection with the points raised come and trouble at night and sometimes sleeplessness is the result. It is a most difficult thing to be able to drive out all thoughts and go to bed.

त्यांचे हातून कधींही कोणत्याही प्रकारचा निष्काळजीपणा होत नसे हें मागें आलेंच आहे. इतर सर्व वकिलांनीं आपल्याप्रमाणेंच काम करावें असें त्यांस वाटत असे व त्यांची तशीच अपेक्षा असे. आपल्या अशीलाचें हित साधणें व त्यासाठीं सर्व योग्य उपाय अमलांत आणणें हें त्यांचें ध्येय असे. तेंच ध्येय सर्व वकिलांचें असावें असें त्यांस वाटत असे. १९०४ सालीं ओरिजनल साइडच्या कोर्टांत जाण्यापूर्वी ते अपिलेट साइडकडेच होते व त्यांच्या जोडीला मि. रसेल ह्यांची योजना झालेली होती. त्यावेळीं त्यांच्यापुढें एक अपील आलें. सर नारायण ह्यांनीं ह्या वेळीं आपले मित्र वासुदेवराव भांडारकर ह्यांना लिहिलेल्या एका पत्रांत असें म्हटलें आहे कीं, 'अपिलेट साइडकडे काम करितांना जज्जाला हात जोडून बसावयाचें असतें. वकील त्याच त्याच मुद्यांचें सारखें चर्वितचर्वण करीत असतात आणि "All sorts of facts" कोर्टापुढें ठेवीत असतात, मग त्यांचा खटल्याशीं संबंध असो अगर नसो. ह्या अपिलांत खालच्या कोर्टानें म्हटलें होतें कीं ही सर्व मिळकत मूळ **अ** ची होती. तो अमुक सालीं वारला. परंतु त्याला मुलगा (Issue) नसल्यामुळें **ब** चा ह्या मिळकतीवर हक्क पोंचतो असा मी निकाल देतों. त्या निकालावर हें अपील होतें. आमच्यापुढें असा मुद्दा मांडण्यांत आला कीं, **ब** हा कांहीं **अ** चा वारस ठरत नाहीं. तो कसा वारस ठरत नाहीं तें आम्हांस सांगा, असें कोर्टानें विचारतांच हे वकीलसाहेब अगदीं गंभीरपणें सांगूं लागले कीं 'हा प्रश्न ह्या कोर्टांत काढतांच येत नाहीं ! कारण हा मुद्दा ( Issue ) खालच्या कोर्टानें निकालासाठीं मुळीं काढलाच नव्हता !' 'अहो वकीलसाहेब ! ही माहिती तुम्हीं आणिलीत तरी कोठून' असें त्यांस विचारतां खालच्या कोर्टाच्या जज्जाचें "As there was no issue, I must find that the plaintiff is entitled to the property." हें वाक्य त्यांनीं आपल्या मुद्याच्या पुष्टीकरणार्थ मोठ्या गंभीरपणें वाचून दाखविलें ! 'अहो ! ( Issue ) ह्या शब्दाचा अर्थ येथें "मुलगा" असा आहे कीं, "मुद्दा" असा आहे ह्याचा तुम्हीं विचार केला आहे काय' असा कोर्टाकडून प्रश्न विचारला जातांच वकीलसाहेब गडबडले, कोर्टांतले सगळे लोक हंसले व मग जागे होऊन वकीलसाहेब म्हणाले, ही चूक झाली खरी ! पण कोर्टाचा गैरसमज करून देण्याचा माझा उद्देश नव्हता असें सांगून व कोर्टाची क्षमा मागून स्वारी आपल्या जागेवर बसली ! आणि हे गृहस्थ आपल्याकडे आलेल्या खटल्याचे कागद वाचून कोर्टांत येणाऱ्या वकिलांपैकीं एक होते !'

## सर नारायण ह्यांचा स्वाभिमान

नारायणरावांचा एक विशेष गुण असा होता कीं, ज्या स्थितींत आपण असूं त्या

स्थितीस अनुरूप कर्तव्यें करण्यांत ते कोणत्याही प्रकारें कसूर करीत नसत. त्याच-प्रमाणें आपल्या वाजवी हक्कांसंबंधानें त्यांच्यांत तीव्र जाणीव असे, व त्या हक्कांचें संरक्षण करण्यासाठीं ते मनःपूर्वक झटत. १९१० सालीं नोव्हेंबर ता. २१ रोजीं गव्हर्नरसाहेबांची लेव्ही झाली, त्यावेळीं चीफ जस्टिस व इतर न्यायाधीश लेव्हीला गेले होते. लेव्ही ज्यावेळीं भरते त्यावेळीं सरकारी मोठ्या अधिकाऱ्यांच्या जागा ठरलेल्या असतात, व त्याच ठिकाणीं त्यात्या अधिकाऱ्यांनीं बसावयाचें असतें. तेथें गेल्यावर नारायणराव व इतर जज्ज ठरलेल्या जाग्यावर म्हणजे गव्हर्नरसाहेबांच्या उजव्या बाजूला बसले. पण वरील दिवशीं तेथून त्यांस उठावयास लावून दुसऱ्याच ठिकाणीं त्यांची बसावयाची व्यवस्था केली. अशा प्रकारें उचलबांगडी करणें हा आपला अपमान होय व ह्यावेळीं आपण आपला तिरस्कार व्यक्त करणें अगत्याचें आहे, असें नारायणरावांनीं सर्व न्यायाधिशांस बजाविलें. मागें सर जेम्स फर्ग्युसन ह्यांच्या कारकीर्दींत असाच प्रकार झाला होता. त्यावेळच्या चीफ जस्टिससाहेबांनीं नव्या व्यवस्थेनें हायकोर्ट जज्जांचा अपमान झाल्याचें गव्हर्नर साहेबांस कळविलें व जोंपर्यंत पूर्वीची व्यवस्था अमलांत येणार नाहीं, तोंपर्यंत लेव्हीला अगर गव्हर्मेंट हाऊसमधील कोणत्याही कार्याला हायकोर्टाचा जज्ज हजर राहाणार नाहीं असा खलीता गव्हर्नरसाहेबांकडे पाठविण्यांत आला होता. सर नारायण ह्यांच्या तोंडून ही जुनी हकीकत ऐकतांच चीफ जस्टिस, व इतर सर्व न्यायाधीश एकदम तेथून बाहेर पडले व दुसऱ्याच दिवशीं रायल एशियाटिक सोसायटीच्या लायब्ररींत जाऊन नारायणरावांनीं टाइम्स ऑफ इंडियाचा ता. २० नोव्हेंबर १८८३ चा अंक शोधून काढला. त्यांत चीफ जस्टिस व गव्हर्नर ह्यांच्यांतील पत्रव्यवहार प्रसिद्ध झाला होता. ता. २२ नोव्हेंबर १९१० रोजीं सर्व जज्जांची सभा भरून सरकारला जज्जांचा कसा अपमान झाला हें कळवावें[१] असें ठरलें. नारायणरावांच्या जागरूकतेचा हा परिणाम होता.

## हायकोर्टाचा सुवर्णमहोत्सव व सर नारायणराव

सन १८६२ सालीं मुंबईच्या हायकोर्टाची स्थापना झाली आणि नारायणराव न्यायाधीश असतांना, म्हणजे १९१२ सालीं सर बेसिल स्कॉट, हायकोर्टाचे त्यावेळचे सर न्यायाधीश ह्यांनीं हायकोर्टाचा सुवर्ण महोत्सव ता. १४ आगस्ट १९१२ रोजीं साजरा केला. ह्यावेळीं सर नारायण ह्यांस बहुत-

१. The Chief Justice and the judges met ( 22 Nov. 1910 ) to consider the treatment of the judges at yesterday's meeting and sent a protest to the Governor.

करून असें वाटलें असावें कीं, हा सुवर्णमहोत्सवाचा दिवस केवळ इतर न्यायमूर्ती व बॅरिस्टर्स ह्यांच्या बरोबर बसून भोजन झोडण्यांत, अगर वकील सॉलिसिटर्स ह्यांच्यासमवेत चहा पिण्यांत घालविल्यानें हायकोर्टाचा सुवर्णमहोत्सव आपण योग्यप्रकारें साजरा केला असें व्हावयाचें नाहीं. म्हणून हायकोर्टानें गेल्या पन्नास वर्षांत कोणकोणती विशेष कामगिरी केली, प्रारंभीं मुख्य न्यायाधीश कोण होते, तीनच न्यायाधिशांसह कामास कशी सुरुवात झाली, हिंदुधर्मशास्त्राची प्रथम काय अवस्था होती, त्यास व्यवस्थित स्वरूप कसें येऊं लागलें, प्रजेच्या हक्कांचें संरक्षण करण्याचा पायंडा हायकोर्टानें कसा घातला, महाराजा लायबल केससारख्या खट-ल्यानें एकंदर हिंदु समाजांत कशी खळबळ उडाली, शेअर बाजारांतील सट्टेबाजी-मुळें पुष्कळांचीं दिवाळीं निघालीं असतां व्यापारांतील नेकीच्या संरक्षणार्थ हायकोर्ट कसें झटलें वगैरे मुद्दे ज्यांत आहेत असा एक ऐतिहासिक दृष्टीनें फार महत्वाचा लेख पुष्कळ प्रयास करून नारायणरावांनीं लिहिला व तो सुवर्णमहोत्सवाच्या दिवशीं, म्हणजे ता. १४ ऑगस्ट १९१२ रोजीं टाइम्समध्यें प्रसिद्ध करविला. हा लेख ज्यांनीं ज्यांनीं त्या वेळीं वाचला त्यांना सर नारायण यांची समयसूचकता पाहून त्यांच्या विषयीं त्यांच्या ठिकाणीं असलेल्या आदरभावांत भर पडली व कित्येकांनीं त्या जुन्या माहितीनें भरलेल्या त्यांच्या लेखाबद्दल त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन केलें. ह्या लेखां-तील कांहीं भाग सारांशरूपानें येथें दिला आहे.

हायकोर्टाचे पहिले सर न्यायाधीश सर म्याथ्यू सास हे एक मासलेवाईक न्यायाधीश होते. ह्यांना लोक 'सास धी सायलंट' असें म्हणत असत! हे दिसावयास मोठे रागीट, घुमे, व दुर्मुखलेले असे दिसत. ह्यांचे निकाल म्हणजे कायदेशीर लांबीचे, जरूरीच्या गोष्टींचें स्पष्टीकरण करणारे असत. हे गृहस्थ कधीं लोकांत मिसळत नसत, कोणाशीं बोलत नसत. कोणाशीं कांहीं व्यवहार करीत नसत. रोज सकाळीं घोड्यावर बसूनफेर फटका करावा, दर रविवारीं सकाळीं गिरगांवांतल्या पोर्च्युगीज चर्चमध्यें उपासनेस जावें, व रोज अगदीं वेळेवर कोर्टात हजर रहावें एवढें त्यांना माहित होतें. माससाहेब कधीं गव्हर्नमेंट हाऊसमध्यें गेले नाहींत, कीं कधीं त्यांनीं वर्तमानपत्राला स्पर्श केला नाहीं! न्यायाधिशानें इकडे तिकडे पहावयाचें नाहीं, समोर जे कागद येतील तेवढेच पहावयाचे, व योग्यवेळीं निकाल द्यावयाचा ही जी न्यायाधिशासंबंधाची अपेक्षा, त्याप्रमाणें ते तंतोतंत वागतात असें लोक म्हणत.

हिंदुधर्मशास्त्राच्या सुधारणेचा व त्याला व्यवस्थित स्वरूप देण्याचा प्रश्न हाय-कोर्टानें अजमासें १८७७ सालीं, म्हणजे स्थापनेनंतर १५ वर्षांनीं, हातीं घेतला. १८७० पासून १८८२ पर्यंत सर मायकेल वेस्ट्राप हे हायकोर्टाचे सर न्यायाधीश होते व रेमंड वेस्ट हे १८७१ पासून १८८७ पर्यंत हायकोर्टाचे जज्ज होते. ह्या

दोन्ही न्यायमूर्तींचे हिंदुधर्मशास्त्रावरील निकाल पाहिले तर हिंदुस्थानांतील सर्व हायकोर्टांच्या निकालांवर त्यांची सरशी असल्याचा अनुभव आल्यावांचून रहाणार नाहीं. हायकोर्टाची स्थापना होण्याच्यापूर्वी हिंदुधर्मशास्त्राविषयींच्या निकालाच्या बाबतींत बराच गोंधळ माजून राहिलेला होता. न्यायाधिशांना शास्त्री सांगतील त्याचप्रमाणें निकाल द्यावे लागत. त्यांना हिंदु कायद्याच्या ग्रंथांत काय सांगितलें आहे तें संस्कृत येत नसल्यामुळें कळत नसे, आणि शास्त्र्यांना इंग्रजी येत नसल्यामुळें साहेबांच्या भाषेंत त्यांना समजावून देतां येत नसे! शास्त्री लोकांना धर्मशास्त्राचें ज्ञान चांगलें असे व त्या दृष्टीनें त्यांचा उपयोग होत असे. परंतु कायदा व आचार (Ritual) ह्यांतील भेद त्यांस कायद्याचें आधुनिक पद्धतीचें शिक्षण मिळालेलें नसल्यामुळें कळत नसे. सांगितलेलें काम ते चांगल्या रीतीनें बजावीत, पण सर्वस्वीं त्याच्यावर अवलंबून राहाणें धोक्याचें असे. आणि कांहीं वर्षे शास्त्री लोक सांगतील तो कायदा असा प्रकार होत होता. म्हणजे एका आंधळ्यानें दुसऱ्या आंधळ्याला वाट दाखवावी ह्यासारखा कांहींसा हा प्रकार होत होता. न्यायाधिशांना सर्वस्वी आपल्या शास्त्र्यांवर अवलंबून रहावें लागे, आणि जेथें स्त्रियांच्या वारसाहक्काचा प्रश्न येई तेथें शास्त्र्यांची अनुदार-वृत्ति हटकून अनुभवास येत असे! दुसरें असें कीं, सगळ्या हिंदुस्थानावर प्रिव्ही कौन्सिलच्या निकालांचा ताबा असे व तो आजही आहे. पण त्यावेळीं प्रिव्ही कौन्सिल बंगालच्या आहारीं गेलेलें होतें आणि बंगाल स्त्रियांच्या वारसाच्या विरुद्ध होता व आचारधर्माकडे त्याचा विशेष कल होता. हा असा गोंधळ माजल्यामुळें मिताक्षरा व मयूख ह्या दोहोंमध्यें ज्यांस आधार सांपडावयाचा नाहीं असा तृतीय पंथ स्त्रियांच्या वारसाहक्काच्या बाबतींत जज्जांनीं बनविलेल्या कायद्यामुळें अस्तित्वांत आला! नवऱ्याच्या मागें त्याच्या विधवेला, किंवा मुलाच्या मागें त्याच्या आईला जो वारसाहक्क प्राप्त होतो तो फक्त तिच्यापुरताच आणि तो तिच्या मागें तिच्या वारसाकडे न जातां तिच्या मृत नवऱ्याच्या किंवा मुलाच्या वारसाकडे जातो असे जे निकाल हायकोर्टाच्या जज्जांनीं दिले आहेत त्यांना मिताक्षरा व मयूख ह्यांत आधार नाहींत. पण तसा कायदा होऊन गेला आहे एवढें मात्र खरें. ही अत्यंत असमाधानकारक स्थिति मि. रेमंड वेस्ट हे हायकोर्टाचे रजिस्ट्रार असतांना त्यांच्या ध्यानांत आली. मूळ ग्रंथांतील वचनांच्या अज्ञानाचा हा परिणाम असें जाणून संस्कृतचे अध्यापक डॉ. बुल्हर ह्यांच्या साह्यानें हिंदुशास्त्राचा सारांशरूप ग्रंथ (Digest) प्रसिद्ध करण्यांत आला. त्यामुळें मुंबई इलाख्याला लागू असणाऱ्या धर्मशास्त्राविषयीं स्पष्ट कल्पना होण्यास एक उत्तम साधन उपलब्ध झालें. पुढें कसाकसा फेर होत

गेला हें दाखविण्याचें हें स्थळ नव्हे, परंतु सर मायकेल वेस्ट्राप हे सर न्यायाधीश झाल्यापासून ह्या कार्यास स्पष्टपणें प्रारंभ झाला असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. जज्ज होण्यापूर्वी बॅरिस्टर ह्या नात्यानें त्यांनीं पुष्कळ वर्षें कोर्टांत काम केलें होतें. त्यामुळें लोकांच्या रीतीभातीसंबंधानें त्यांना जातीनें चांगली माहिती झालेली होती. शिवाय डॉ. भाऊ दाजीसारख्या नामांकित संस्कृतज्ञाची व त्यांची चांगली मैत्री होती. आणि हिंदुधर्मशास्त्रापैकीं कांहीं बिकट प्रश्न उद्भवला कीं, अत्यंत परिश्रम करून, त्या प्रश्नाचा योग्य निकाल लावल्या-वांचून ते स्वस्थ बसत नसत. त्यांना जरी संस्कृत येत नव्हतें, तरी पुढें अस-लेल्या प्रश्नास लागू पडणारे मूळ आधार शोधून काढून ते समजावून घेतल्यावांचून ते स्वथ बसत नसत. ह्याचा परिणाम असा झाला कीं, पुरुषाप्रमाणेंच बायकाही संपूर्णपणें वारस होण्यास पात्र आहेत ही गोष्ट मूळ आधारांच्या जोरावर त्यांनीं स्थापित केली. आजच्या काळीं सर मायकेल वेस्ट्राप ह्यांनीं जो हा नियम स्थापिला त्यांत नवीन असें कांहीं वाटणार नाहीं. कारण, तो आतां आमच्या अंगवळणीं पडून गेला आहे. परंतु सर्व हिंदुस्थानावर सत्ता असलेल्या प्रिव्ही कौन्सिलचा बंगालविषयीं असलेला पक्षपात व बंगालच्या जिमूतवाहन व रघुनंदन ह्यांच्या पलीकडे आधार न शोधण्याकडील त्यांचा कल व मुंबईच्या त्या वेळपर्यंतच्या जज्जांचा दुबळेपणा ध्यानांत घेतां सर मायकेल वेस्ट्राप ह्यांनीं स्त्रियांच्या वारसाच्या बाबतींत जें महत्कार्य केलें त्याचें महत्त्व सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

स्त्रियांच्या वारसाहक्काच्या आड त्यावेळपर्यंत न्यायाधिशांचे परस्पर विरुद्ध निकालच केवळ येत असत असें नव्हे. विशेषतः एक वाक्य त्यांच्या वारसाहक्कास फारच मारक होत असे. तें वाक्य "Women are devoid of organs of sense and therefore not entitled to share." अशा अर्थाचें आहे! कांहींनीं ह्याचा अर्थ असा केला होता कीं, पुरुषांना जसें शरीर व आत्मा आहे तसा स्त्रियांस नाहीं[१]! अर्थात् पुरुषांप्रमाणें त्या नसल्यामुळें त्या वारस होऊं शकत नाहींत! कांहींचें म्हणणें असें कीं स्त्रिया प्रकृतीनें जात्याच नाजूक असल्यामुळें घरें-दारें व इतर मिळकतीचा उपभोग घेण्याची पात्रताच मुळीं त्यांच्यांत नाहीं![२] ही भानगड लक्षांत घेऊन सर मायकेल ह्यांनीं एका निबंधवजा निकालांत ह्या प्रश्नाचा मोठ्या धैर्यानें खल केला. धैर्यवान्, निश्चयी व आत्मसामर्थ्याविषयीं जागृत अस-

१. Women had neither body nor soul as men had.

२. Women were more delicate in body than men, and that therefore they were not entitled to participate in the enjoyment of property.

णारा न्यायाधीश न्याय देतांना कायद्याला आपल्या इच्छेनुसार कसा वांकावयास लावतो तें त्या निकालावरून स्पष्ट होतें.[१] सर मायकेल ह्यांनीं आपल्या निकालांत वैदिक वचनांचा अगदींच निराळा अर्थ केला. हें वचन स्त्रियांच्या वारसा-हक्काच्या विवेचनालाच मुळीं लागू नाहीं असें त्यांनीं सांगून टाकलें ! स्त्रिया ह्या बोलून चालून नाजूक प्रकृतीच्या असल्यामुळें सोमरसाचें पान करण्यास त्या योग्य नाहींत, म्हणून सोमरसपानांत त्या भागीदार व्हावयास लायक नाहींत, वारसाहक्कास लायक नाहींत असें मात्र मुळींच नाहीं ! आणि ज्यावेळीं त्यांना प्रिव्ही कौन्सिलला आपल्याकडे वळवावयाचें असेल त्यावेळीं ते असें ठांसून लिहीत कीं, बंगालचा किंवा मद्रासचा कायदा काय असेल तो असो, आमच्या इकडे ही अशी पूर्वापार पद्धत आहे व त्याप्रमाणेंच आमचा कायदाही आहे. ज्या निकालांत वरील सोमरसाचा शोध लावला होता व मुंबईचा कायदा अमुक आहे असें ठांसून सांगण्यांत आलें होतें तो खटला अपिलांत प्रिव्ही कौन्सिलकडे गेला. त्यावेळीं इकडे साधारण समज असा होता कीं, ज्या अर्थी प्रिव्ही कौन्सिलचा कल बंगालकडे आहे, त्याअर्थी मुंबईचा हा विपरीत निकाल फिरविला जाईल. पण तसें कांहीं झालें नाहीं आणि तें कायम करतांना जीं कारणें दिलीं होतीं त्यांची गोळा बेरीज साधारणतः अशी होती; सर मायकेल हे मुंबईचे, त्यांना आपल्या इलाख्याची सर्व माहिती चांगलीच आहे, आणि न्यायमूर्ति वेस्ट ह्यांनीं तर हिंदु लॉचा डायजेस्टच प्रसिद्ध केला आहे. तेव्हां त्यांचेंच म्हणणें बरोबर असलें पाहिजे म्हणून त्यांच्या वाटेला न जाणें हा उत्तम मार्ग ![२] हिंदु लॉ संबंधाच्या निकालांचें धोरण ह्या निकालापासून उदार झालें आणि ह्या उदार धोरणाचा परिणाम कमी अधिक प्रमाणावर दुसऱ्या हायकोर्टांवर होऊन त्यांच्या धोरणांतही उदार भाव येत गेला असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं.

ह्याच लेखांत ' **करसनदास केस** ' ह्या सदराखालीं महाराजा लायबल केस म्हणून जो खटला प्रसिद्ध आहे त्याच्या संबंधानें नारायणरावांनीं जे विचार प्रसिद्ध केले आहेत त्यांत पुढील आशयाचा मजकूर आहे.

न्यायाचीं कोर्टें हीं लोकांना सद्गुणी करण्यासाठीं स्थापन झालेलीं नाहींत. कर्तव्य करण्यास जे चुकत असतात त्यांस ताळ्यावर आणण्यासाठीं कोर्टांची स्थापना झालेली

---

१. It is a striking example of the daring of a judge who knows how to make the law bend to the cause of justice.

२. Sir Michael Westropp knows all about his presidency : his colleague Mr. Justice West is author of a Digest on Hindu law. They must be right. Let us leave them alone.

असते.[1] आणि कर्तव्याचा प्रश्न पुढें आला कीं, आपल्या हक्कांचाही विचार सुचतो आणि ब्रिटिश इंडियांतील कोर्टांनीं कायदेशीर हक्कांची कल्पना केवळ दृढ केली एवढेंच नव्हे, तर कोर्टांनीं लोकांना अधिक हक्क दिले आहेत. प्रत्येक व्यक्तीला आपण कोणी तरी आहोंत, आपल्या विचारांना, नैतिक भावनांना किंमत आहे असें वाटूं लागणें ही गोष्ट हायकोर्टानें प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणें जनतेस शिकविली आहे. ह्याचें एक उदाहरण जर पहावयाचें तर फार लांब जावयास नको. हायकोर्टाची स्थापना होण्यापूर्वी सुप्रीम कोर्टापुढें महाराजा लायबल केस चालू होती. तीच हायकोर्टापुढें नंतर गेली. करसनदास मूळजी ह्यांनीं वैष्णव महाराजांच्या विरुद्ध कांहीं लेख लिहिले. ते आपल्या अब्रूस धक्का पोहोंचविणारे आहेत असें महाराजांना वाटलें. आपल्या पुष्कळ अनुयायांच्या दृष्टीनें आपल्याला कमीपणा आणणारे हे लेख आहेत असें त्यांना वाटलें व ही फिर्याद झाल्याबरोबर त्यांच्या अनुयायांमध्यें बरीच खळबळ उडाली. जुन्या वळणांतल्या लोकांच्या व महाराजांच्या भक्तांच्या दृष्टीनें आपल्या गुरुजींना न्याय मिळण्यासाठीं कोर्टांत जाण्याचा प्रसंग यावा हें अनुचित होतें. दुसरें असें कीं, ज्यांना आपण प्रत्यक्ष देवाचा अवतार समजतों व त्या भावनेनें त्यांची पूजा करितों, त्यांची आपल्याप्रमाणेंच पूजा करणें हें कर्तव्य असतांना, तें न करतां त्यांच्या आचरणावर उघडपणें टीका करण्यास उद्युक्त व्हावें हें विलक्षण धाष्ट्र्याचें कृत्य वाटलें. हा खटला चीफ जस्टिस सास व जज्ज आरनाल्ड ह्यांच्यापुढें चालू झाला. त्यावेळीं निकालासंबंधानें लोकांत निरनिराळे तर्क सुरू झाले. कोणी म्हणावयास लागले कीं, चीफ जस्टिस साहेब स्वतः अगदीं जुन्या विचारांचे आहेत, तेव्हां ते महाराजांच्या वतीनेंच निकाल देणार. कोणाला वाटलें न्यायमूर्ति आरनाल्ड हे उदार विचारांचे असल्यामुळें व सुधारणाविषयक चळवळींची त्यांस आवश्यकता वाटत असल्यामुळें करसनदासच्या बाजूचा निकाल होणार ! अखेरीस बावीस दिवस खटला चालून सास साहेबांनीं मुख्य मुद्यांचा निकाल मि. करसनदास ह्यांच्या बाजूनें दिला. कमी महत्त्वाच्या मुद्यांचा निकाल त्यांच्या विरुद्ध केला; पण आरनाल्ड साहेबांनीं सर्व मुद्यांचा निकाल मि. करसनदास ह्यांच्या वतीनें दिला व शेवटीं अशा आशयाचे उद्गार काढले : कित्येकांना ह्या खटल्यानें विचार करावयास लावलें आहे; पुष्कळांना हा खटला कशासाठीं झाला त्याबद्दल चौकशी करावयास लावलें असावें. खरें पहातां आमच्या पुढें असलेल्या प्रश्नाचा व अध्यात्मवादाचा कांहीं संबंध

---

१. Courts of Justice do not exist to make virtuous men; that is not their *direct* aim or avowed function, theirs is to redress and punish violations of duty.

नव्हता, त्यांत नीतीचा प्रश्न होता.[१]

## ताई महाराज खटला

वकील व न्यायमूर्ति ह्या प्रकरणांत प्रसिद्ध ताई महाराज खटल्यासंबंधानें कांहींही लिहावें असा आमचा विचार नव्हता. कारण, बारा वर्षांच्या कारकीर्दीत नारायणरावांपुढें पुष्कळ खटले आले; नाशीकच्या कटाचा खटलाही त्यांच्यापुढेंच निघाला होता. परंतु महत्त्वाच्या खटल्यांचाच चरित्रांत उल्लेख करावयाचा म्हटलें, तरी त्यायोगें पुष्कळच ग्रंथविस्तार झाला असता. म्हणून ज्या खटल्यांमध्यें हिंदु-धर्मशास्त्र अगर कायदा ह्यासंबंधानें कांहीं विशेष तत्त्व प्रतिपादिलें आहे असें तज्ज्ञांनीं आम्हांस कृपा करून सांगितलें, त्यांपैकीं कांहीं खटल्यांचा आम्हीं वर उल्लेख केला आहे. परंतु नारायणरावांनीं लिहिलेली १९१६ सालची रोजनिशी पहात असतां चीफ जस्टिस सर बेसिल स्काट व नारायणराव ह्यांच्यांतील पुढील संवाद आमच्या वाचण्यांत आला. सर बेसिल चंदावरकरांस म्हणाले :—

" You will be interested to learn that I had it from Lowndes that the Privy Council Judgement upsetting your decision and Heaton's in the Tai Maharaj Case and exonerating Tilak came as a shock both on Lowndes and Sir Robert Finlay. I asked Lowndes whether he was prepared for that Judgement. He said both he and Finlay were confident of success and felt sure that your decision would be confirmed, but within an hour after the hearing began they were surprised to find Lord Shaw against them. Lowndes told me that when the judgement of the Privy Council came out, Sir Robert Finlay who rarely expressed any opinion on judgements delivered by any tribunal, remarked, that the Privy Council had delivered a shocking judgement. "

N. G. C.—" I had it from Pherozeshah Mehta that Tilak had made his speech affirming his loyalty under an arrangement made through Daji Abaji Khare with Mehta and communicated to Government. Mehta told me that he had no idea at the time that he became a party to the arrangement, that the real object of Tilak and Khare was to create a prejudice in

---

१. It has probably taught some to think; it must have led many to inquire. It is not a question of Theology that is before us. It is a question of morality.

Tilak's favour in view of the hearing of the Tai Maharaj appeal before the Privy Council."

हा मजकूर वाचल्यानंतर ताई महाराज खटल्यांत नारायणरावांनीं व हीटन साहेबांनीं लिहिलेले निकाल व त्याचप्रमाणें प्रिव्ही कौन्सिलचा निकाल वाचणें अगत्याचें वाटलें. हे तिन्ही निकाल वाचल्यानंतर ताई महाराज खटल्याच्या बाबतींत ज्या कित्येक विशेष गोष्टी आमच्या दृष्टोत्पत्तीस आल्या त्या चरित्रांत नमूद करण्याचा विचार करीत असतां, श्री. नरसिंह चिंतामण केळकर ह्यांनीं टिळकचरित्रांत ह्या खटल्याच्या बाबतींत जें कांहीं लिहिलें आहे तें वाचावें असें मनांत आलें व तें वाचल्यानंतर केवळ कर्तव्य ह्या दृष्टीनें आम्हांस आढळलेल्या गोष्टी चरित्रांत नमूद झाल्याच पाहिजेत असें वाटूं लागलें.

जगन्नाथ महाराज पंडित ह्यांना ताई महाराजांनीं औरंगाबाद येथें मांडीवर घेतलें किंवा नाहीं,हा भांडणाचा मुख्य विषय होता.ह्या बाबतींत पुण्याच्या मुन्सफांनीं औरंगाबाद येथें दत्तविधान पूर्ण झालें असें ठरविलें. अपिलांत हा खटला चंदावरकर व हीटन ह्यांच्यापुढें निघाला व ता. २३ सप्टेंबर १९१० रोजीं दोघां न्यायमूर्तींनीं स्वतंत्र न्यायपत्रकें देऊन खटला निकालांत आणला. चंदावरकरांनीं आपल्या निकालपत्रांत असें म्हटलें आहे कीं, जगन्नाथ महाराज ह्यांचें दत्तविधान औरंगाबाद येथें झालें असें मानिलें, तरीसुद्धां टिळक व खापर्डे ह्यांनीं आपलें ताईमहाराजांवरील जें वजन त्याचा दुरुपयोग करून हें दत्तविधान घडवून आणिल्यामुळें तें कायदेशीर ठरत नाहीं.[१] हीटन साहेबांनीं दत्तविधान झालेंच नाहीं, असें म्हटलें असून टिळक व खापर्डे ह्यांनीं आपल्या वर्चस्वाचा दुरुपयोग केला, असा निकाल दिला आहे. ह्या निकालावर प्रिव्ही कौन्सिलमध्यें अपील झालें. लॉर्ड शॉ, सर जॉर्ज फारवेल, सर जॉन एज व मि. अमीर अली ह्यांच्यापुढें प्रिव्ही कौन्सिलचें अपील निघालें, त्यावेळीं लॉर्ड शॉ हे कोर्टाचे पुढारी होते व त्यांनींच कोर्टाचा निकाल दिला. प्रिव्ही कौन्सिलनें हायकोर्टाच्या विरुद्ध निकाल दिला व पुण्याच्या मुन्सफांचा निकाल कायम केला.

आतां चंदावरकर व हीटन ह्यांचे निकाल प्रिव्ही कौन्सिलनें फिरविले ह्याबद्दल आम्हांला वाद घालावयाचा नाहीं. त्याचप्रमाणें प्रिव्ही कौन्सिलनें दिलेला निकाल हा अखेरचा होय, हें तत्त्व आम्हांस मान्य आहे. परंतु न्यायाधीश झाले तरी तीं

१....Assuming that the fourth plaintiff was adopted at Aurangabad, the adoption is not valid because it was brought about by means of undue influence exercised over Tai Maharaj by both Tilak and Khaparde.

माणसेंच होत. आणि माणसांच्या हातून चूक केव्हांही होणें शक्य आहे. मग असा न्यायाधीश पुण्याचा मुन्सफ असो, हायकोर्टाचा जज्ज असो, अगर प्रिव्ही कौन्सिलचा न्यायाधीश असो. आणि ह्याचा पुरावा ज्या निकालानें हायकोर्टाचा निकाल फिरला, त्यांतच आपल्याला पहावयास सांपडतो! चंदावरकर व हीटन ह्यांनीं निरनिराळीं निकालपत्रें दिलीं असून त्यांत त्यांनीं आपापलीं कारणेंही दिलीं आहेत. उदाहरणार्थ, हीटनसाहेबांनीं म्हटलें आहे कीं, ह्या खटल्यांत मध्यवर्ती अशीं तीन माणसें आहेत. जगाचा अनुभव नसलेली, वीस वर्षांच्या आंतील वयाची विधवा व वयस्क, सुशिक्षित, गुणवान्, जगाचा अनुभव असलेले वकील, कीर्तिवान् लोकांमध्यें मानमान्यता पावलेले व अधिकार गाजविणाऱ्या व्यक्ति ( of dominating personality) टिळक व खापर्डे. ही दोन पक्षांची तुलना एक पक्ष किती दुबळा व दुसरा किती बलवान् होता, व त्यामुळें ह्या दोघांपुढें त्या विधवाबाईचें कांहींही चालणें कसें अशक्य होतें हें दाखविण्यासाठीं **हीटन**साहेबांनीं केली आहे. पण प्रिव्ही कौन्सिलनें ही तुलना **चंदावरकरांच्या** माथीं मारली आहे! आणि तेंच खरें धरून नरसोपंत केळकर चालले आहेत! त्याचप्रमाणें "पुष्कळ प्रसंगांसंबंधानें साक्षीदारांनीं सांगितलेल्या हकीकती निःसंशय खऱ्या आहेत, तसेंच निदान एका, व तीही सर्वांत अधिक महत्त्वाच्या, प्रसंगाची हकीकत खोटी आहे" म्हणून "आम्हांला असें म्हणणें भाग पडतें कीं, सुस्थितींत असलेल्या पुष्कळ लोकांनीं कट करून खोट्या साक्षी दिल्या आहेत" (Unquestionably to my mind the account given by the witnesses appears to be a true account of many a series of events and a false account of at least one event and that the most important."..." We are driven to believe that a considerable number of men of good position have conspired together to give false evidence." ) ह्या संबंधानें प्रिव्ही कौन्सिलचे जज्ज म्हणतात The conclusion thus made is of the most serious character amounting to plain judical finding of conspiracy and of perjury. साक्षीदारांनीं कट करून खोट्या साक्षी दिल्या हा भयंकर स्वरूपाचा आरोप न्यायमूर्तीनें केला आहे, ही गोष्ट खोटी नाहीं. ज्यांनीं आरोप केला त्यांनीं आपल्या समजुतीप्रमाणें कारणेंही दिलीं आहेत. तीं प्रिव्ही कौन्सिलला पटलीं नाहींत हा भाग स्वतंत्र आहे. परंतु वरील सर्व वाक्यें **हीटन** साहेबांच्या निकालपत्रांत असून, प्रिव्ही कौन्सिलनें तीं पुनः **चंदावरकरांच्या** निकालांत कल्पून त्यावर टीका केली आहे! आणि टिळकांच्या चरित्रकारांनीं खऱ्याखोट्याचा पुरावा न पहातां **चंदावरकरांनींच** असें म्हटलें आहे असें गृहीत धरून आपल्या टीकेचा इमला

उभारला आहे! बरें, स्वतः प्रिव्ही कौन्सिलनेंही ताई महाराज एक तरुण विधवा असून, सहज कोणत्याहि पक्षाकडे वळणारी व ट्रस्टीचें तिच्यावर मोठें वजन होतें ह्या गोष्टी मान्य केल्या आहेत! मग अशा स्थितींत तिला तिच्या इच्छेविरुद्ध औरंगाबादला नेणें, अपरात्रीपर्यंत दत्तविधानांतील गोष्टींचा खल करणें, व अखेरीस दुसऱ्या दिवशीं सकाळीं सह्या घेणें, दत्तक जर घेतला तर त्यावेळीं कोणास न बोलावणें, वाजंत्रीं न आणणें, पानसुपारी न करणें, प्रसाद न वांटणें, हारतुरे न वांटणें, दत्तक घेतलेल्या मुलाचें रूढीस अनुसरून नांव जें बदलावयाचें तें न बदलणें, होम न करणें व अखेरीस पुण्यास परत आल्यावर सरदारांच्या एजंटांना आम्ही मुलाची 'निवड करून आलों' असें लिहिणें (Mr. Tilak wrote a letter to the Agent for Sardars, merely stating that a boy had been selected) ह्या सर्व गोष्टी ट्रस्टींनीं आपल्या वजनाचा दुरुपयोग केला असें सुचविणाऱ्या आहेत असें हीटन साहेबांस वाटलें तर त्याबद्दल त्यांना दोषी कसें ठरवितां येतें? त्याचप्रमाणें सर्व विधि पुण्यास व्हावयाचे, होम झाल्यावांचून दत्तविधान पूर्ण होत नाहीं, म्हणून बाकीच्या गोष्टी होऊं दिल्या, पण अखेरची म्हणजे मुलाला मांडीवर घेण्याच्या गोष्टीला ताई महाराजांनीं अखेरीस धैर्यानें संमति दिली नाहीं, असें हीटनसाहेबांनीं जर सुचविलें व त्यास आधार दिले, तर तें त्यांचें म्हणणें आधारावांचून होतें असें कसें म्हणतां येतें? ह्या सर्व गोष्टी **हीटन**साहेबांच्या निकालपत्रांत आहेत. आणि त्या **चंदावरकरांच्या** निकालांत आहेत असें कल्पून चरित्रकारांनीं चंदावरकरांवर खुशाल लेखणी चालविली आहे!

प्रिव्ही कौन्सिलनें आणखी एका बाबतींत चंदावरकरांसंबंधानें गैरसमज करण्याचें साधन त्यांच्या टीकाकारांच्या हातीं दिलें आहे. चंदावरकरांनीं आपल्या निकालांत म्हटलें आहे कीं, "ताई महाराजांना मुलगा दत्तक घेण्यास त्यांच्या यजमानानें सांगितलें होतें आणि त्याच्या मृत्यूनंतर दत्तक घेण्याची तिची तयारी होती. ह्या दोन गोष्टींचा मुन्सफाच्या मनावर परिणाम झालेला दिसत आहे. पण येथें प्रश्न **निराळाच** आहे." (But the question here is **different.**) प्रिव्ही कौन्सिलनें different शब्दाऐवजीं **difficult** असा शब्द घालून हें व त्याच्यापुढील वाक्य थोडा फेरफार करून (Relations towards her च्या ऐवजीं Relations between them असें करून) हीं वाक्यें चंदावरकरांच्या "टिपणा" मधून घेतल्याचें म्हटलें आहे! (The citation just made is from the notes of Chandavarkar J.) चंदावरकरांनीं कांहीं टिपणें केलीं असलीं, तरी तीं प्रिव्ही कौन्सिलला कोठून मिळालीं? जरी मिळालीं असलीं तरी त्यांतून प्रिव्ही

कौन्सिलला उतारा घेण्याचा अधिकार कसा पोंचतो ? पण खरा प्रकार असा आहे कीं, तीं वाक्यें चंदावरकरांच्या **निकालांतच** आहेत, मात्र प्रिव्ही कौन्सिलनें different च्या ऐवजीं difficult घातलें असून Relations towards her च्या ऐवजीं Relations between them असा फेरफार करून त्यांच्या टिपणांतून हा उतारा घेतला आहे असें खुशाल विधान केलें आहे ! आतां, केवळ ह्या दत्तक प्रकरणाचा विचार करितांना ताई महाराजांची कोल्हापुरास लग्नासाठीं जाण्याची उत्कटेच्छा, दोघां ट्रस्टींनीं त्यांना कांहींतरी सबबी सांगून जाऊं न देणें, ताई महाराजांचा कोल्हापूर येथील आप्तांकडील ओढा, त्याचप्रमाणें औरंगाबादेहून परत आल्यानंतर ट्रस्टींनीं जें कांहीं केलें आहे तें मला कबूल नाहीं अशी ताई महाराजांनीं केलेली तक्रार, तसेंच वाड्यांत असतांना बाहेर ठेवलेला पहारा व व ट्रस्टींच्या परवानगीवांचून कोणासही आंत जाऊं न देणें इत्यादि गोष्टींचा विचार करितां ताई महाराजांचें स्वातंत्र्य अत्यंत मर्यादित होतें असें कोणासही पटण्यासारखें आहे. परंतु प्रिव्ही कौन्सिलनें ट्रस्टींना असें वागून स्वतःचा कांहीं लाभ करून घ्यावयाचा नव्हता हीच गोष्ट मुळीं आपल्या दृष्टीपुढें ठेविली होती व पुराव्यांत सिद्ध झालेल्या किंवा कबूल केलेल्या सर्व गोष्टींचा उल्लेखही केलेला नाहीं. दत्तविधानाची चळवळ झाली त्यावेळीं ताई महाराज आपल्या नवऱ्याच्या वारस म्हणून दत्तविधानास कायद्याच्या दृष्टीनें अधिकारसंपन्न नव्हत्या, परंतु आपल्या मृत पुत्राची आई ह्या नात्यानें त्याची वारस म्हणून मिळकत आल्यानंतर तिला दत्तक घेण्यास अधिकार होता व त्यावेळेस मृत्युपत्राचा अमल नाहींसा झालेला होता. ह्या मुद्याचा विचार प्रिव्ही कौन्सिलनें केलेला दिसत नाहीं. ताई महाराजांना सर्व मिळकत आपल्या मृत मुलाची वारस ह्या नात्यानें मिळाली होती व आपल्या उपजीविकेसाठीं ट्रस्टींच्या तोंडाकडे पहाण्याची त्यांना कांहीं जरूर नव्हती. व असाच विचार केला तर सर्व मिळकतीच्या ताईमहाराज मालक असल्यामुळें कोल्हापुरास जाण्याच्या बाबतींत त्यांस प्रतिबंध करणें ही गोष्ट ट्रस्टींच्या अधिकारांतील नव्हती. तसेंच ताई महाराज मुलाच्या मृत्यूनंतर इस्टेटीच्या स्वतः मालक झाल्यामुळें आपली मालकी घालवून, दत्तक घेतल्यावर, फक्त पोटगी घेण्याचा अधिकार राहातो, ही गोष्ट तिच्या लक्षांत आणून देण्याची कांहीं आवश्यकता नव्हती असेंही म्हणतां येत नाहीं. परंतु ही गोष्ट ट्रस्टींनीं ताई महाराजांच्या ध्यानांत आणून दिली नाहीं. कारण, आपल्या मुलाची वारस म्हणून सर्व मालमत्तेची व्यवस्था पहाण्याचा अधिकार ताई महाराजांकडे आल्यामुळें ट्रस्टींची सत्ता संपुष्टांत येते म्हणून ही गोष्ट त्यांनीं ताई महाराजांस कळविली नाहीं एवढेंच केवळ नव्हे, तर सरकारी दप्तरांत ताई महाराज त्यांच्या **नवऱ्याच्या** वारस व

आम्ही ट्रस्टी त्यांचे वहिवाटदार असें त्यांनीं बेधडक लिहून दिलें होतें! असा सर्व खरा प्रकार असतांना व कायद्यानें ताई महाराजांच्या एकंदर स्थितींत फरक झालेला असतांना, ही गोष्ट ताईमहाराजांच्या ध्यानांत आणून देणें हें ट्रस्टींचें कर्तव्य नव्हतें असें प्रिव्ही कौन्सिल म्हणतें! सत्तेपुढें शहाणपण नाहीं! आणखी एका गोष्टीचा येथें उल्लेख करणें अगत्याचें आहे. प्रिव्ही कौन्सिलचें असें म्हणणें पडलें कीं, ट्रस्टींचा स्वतःचा ह्या प्रकरणांत कांहीं फायदा व्हावयाचा नसल्यामुळें त्यांना आपल्या वजनाचा दुरुपयोग करण्याची कांहीं आवश्यकता नव्हती. मग हीच गोष्ट स्वतः टिळकांवर ह्याच प्रकरणांत जो फौजदारी खटला झाला होता त्याच्या संबंधानें म्हणतां येईल! ज्यांनीं खटला भरला त्यांचा स्वतःचा कांहीं फायदा नव्हता, ट्रस्टची व्यवस्था नीट लागावी हाच मूळ हेतु होता. मग टिळक निर्दोषी म्हणून सुटल्यानंतर केसरीनें एवढी टीका करण्याची कांहीं आवश्यकता नव्हती! सारांश, प्रिव्ही कौन्सिलनें चंदावरकर–हीटन ह्यांचीं निकालपत्रें फिरवितांना जी काळजी घ्यावयास पाहिजे होती ती घेतलेली नाहीं. आणि अशी काळजी घेण्याची विशेष आवश्यकता होती. कारण, चंदावरकरांनीं औरंगाबाद येथें मांडीवर घेण्याचा विधि झाला असला तरी तो कसा बेकायदेशीर आहे हें दाखविलें आहे व हीटन साहेबांनीं औरंगाबाद येथें दत्तविधान झालेंच नाहीं असें म्हटलें आहे!

दत्तविधानांतील होमाविषयीं एक गोष्ट येथें नमूद केली पाहिजे. दादासाहेब खापर्डे ह्यांच्यासारख्या वाकबगार वकिलाला एकाच गोत्रांतील मुलगा दत्तक घेतला, तर अशा दत्तविधानांत होम करण्याची आवश्यकता नाहीं, असा निकाल असल्याचें माहीत असलेंच पाहिजे. मग अशी माहिती असूनही पुण्यास परत गेल्यावर होम वगैरे विधि करण्यांत येतील असें प्रथम आश्वासन देण्याची काय आवश्यकता होती? असें आश्वासन दिलें असलें पाहिजे, ही गोष्ट प्रिव्ही कौन्सिलनेंही मान्य केली आहे! प्रिव्ही कौन्सिलचे न्यायमूर्ति म्हणतात :—

"It is admitted in this case that the ceremony (homam) was not performed, and it seems to be fairly clear that it was one of those things which it was intended afterwards to carry out at Poona as part of the general ceremonial and festivities which were to be carried through there." म्हणजे ह्यावरून इतक्या गोष्टी बाहेरच्या मनुष्याच्या दृष्टोत्पत्तीस येतात : (१) होम वगैरे विधि पुण्यास करूं असें ताई महाराजांस सांगितलें असावें; (२) होम करण्याची आवश्यकता नाहीं हें माहीत असून मुलगा मांडीवर घेण्याची क्रिया उरकून घेण्यास ताई महाराजांची

परवानगी मिळाली म्हणून होम वगैरे विधि पुण्यास केले जातील असें सांगितलें असावें; (३) इकडे ताई महाराजांनीं सर्व विधि व होम केल्यावांचून ज्याअर्थीं दत्तविधान पूर्ण होत नाहीं, त्याअर्थीं आपल्या मागचा त्रास चुकविण्यासाठीं मुलाला मांडीवर उचलून घेणें एवढी गोष्ट चंदावरकर म्हणतात त्याप्रमणें ताई महाराजांनीं केली असेलही; (४) मुलाची निवड करून आलों, असें डेक्कन सरदारांच्या एजंटाना जें पत्र लिहिलें गेलें त्यावरून कोणताही शास्त्रोक्त विधि औरंगाबाद येथें झाला नव्हता हें उघड आहे. मोठ्या सरदार घराण्यांतील दत्तविधान कांहींही समारंभा-वांचून होणें शक्य नाहीं.

आतां श्री. नरसोपंत केळकर ह्यांनीं टिळकचरित्रांत चंदावरकरांसंबंधानें जो गैरसमज करण्याचा प्रयत्न केला आहे त्याविषयीं येथें दोन शब्द लिहितों. चंदावर-करांनीं ता. २३ सप्टेंबर १९१० रोजीं ताईमहाराज खटल्याचा निकाल सांगितला. १९१५ सालीं प्रिव्ही कौन्सिलचा निकाल बाहेर आला. १९२० सालीं लोकमान्य टिळकांची इहलोकींची यात्रा संपली. १९२३ सालीं चंदावरकरांस परलोकवास प्राप्त झाला. आणि टिळकचरित्राचा दुसरा खंड १९२८ सालीं प्रसिद्ध झाला. पुढील मजकूर वाचतांना ह्या सनांचा संबंध येणार आहे, म्हणून ते येथें मुद्दाम दिले आहेत.

टिळकचरित्रामध्यें जी अत्यंत अनुदार व अनुचित टीका झाली आहे तिचा विचार करण्यापूर्वी एक फार महत्त्वाची गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. हायकोर्टाच्या न्यायाधिशास आपल्या जागेचा चार्ज घेण्यापूर्वी, आपल्या खासगी माहितीचा न्याय-दानाच्या कार्यी उपयोग केला जाणार नाहीं व आपल्यापुढें जो पुरावा असेल तेव-ढाच विचारांत घेऊन न्यायदानाचें कार्य करीत राहीन अशी प्रतिज्ञा घ्यावी लागते. म्हणजे व्यक्ति अगर प्रसंग ह्यांविषयीं कितीही खासगी माहिती असली, तरी तिचा उपयोग न्यायाधिशांस करितां येत नाहीं. असें असतां टिळकचरित्रकार म्हणतात कीं "मन प्रतिकूल असलें म्हणजे सर्वच गोष्टी प्रतिकूल दिसूं लागतात, त्यांतलाच हा प्रकार होय. टिळक व चंदावरकर ह्यांचें पूर्वी केव्हांही बनलें नाहीं. उभयतांच्या मनांत **एकमेकांविषयीं अत्यंत अनादर.** आपल्या वर्तमानपत्रांतून टिळकांनीं त्यांच्यावर सडकून टीका केलेली. तेव्हां सर चंदावरकरांनीं देखील कलुषित दृष्टीनेंच या अपिलांत टिळकांकडे व त्यांच्या कृत्यांकडे पाहिलें असल्यास नवल काय ?" आतां टिळकांचें व चंदावरकरांचें अनेक गोष्टींत बनलें नाहीं, व त्यांचे विचार जमत नसत हें खरें आहे; पण तेवढ्यावरून त्याचा सूड चंदावरकरांनीं घेतला असें दाखविण्यास त्यांच्या वर्तनांत कांहींतरी दाखवितां येईल काय ? लोकमान्य मुंबई शहरीं सरदारगृहांत अत्यवस्थ स्थितींत असतांना चंदावरकर

त्यांचें दर्शन घेण्यासाठीं, किंवा त्यांच्या समाचारासाठीं जे आपण होऊन गेले, ते काय टिळकांच्याविषयीं त्यांच्या ठिकाणीं अनादराची भावना होती म्हणून? त्याचप्रमाणें मृत्यूनंतर एका आठवड्याच्या आंत टिळकांसंबंधानें लेख लिहून जो त्यांनीं टाइम्स-मध्यें प्रसिद्ध करविला तो काय टिळकांविषयीं त्यांच्या ठिकाणीं "अत्यंत अनादर" होता म्हणून? त्या लेखांत नारायणराव काय म्हणत आहेत तें पाहिलें म्हणजे टिळकांविषयीं त्यांचें मत काय होतें त्याची कल्पना होईल. त्यांचेच शब्द पहा:—

The idea of opposing the Government, of creating in the people a spirit of strength, amounting to revolt against it possessed him completely and in that he never wavered. He pursued it as his one ruling passion of life and ideal...He was a politician and a politician of an age which forced Indians to be destructive critics rather than constructive statesmen...Now that he is gone, our personal and political hostilities such as they were of this mortal life, are laid to rest. Whatever our differences and personal conflicts and vilifications, the man's fearlessness, doggedness, love of his country, his desire to arm it with self-respect and the singleness of purpose with which he pursued his aims in his own way without abating his ardour a bit to the last of his life and the courage of doggedness with which carried on his campaign against death and disease in his last hours just as he had carried on his political campaign, throughout his life, all these will be remembered for ever. He has made his mark in history, and as one who differed from him seriously and held some of his methods to be detrimental to the abiding interests of the future of the country, I join in the deepest mourning over his death and in mourning and paying my respectful memory to him—all the more respectful because I have all along been opposed to him in politics and social reform. Let me add that his purity of private character and his genius of scholarship have given him that strong hold on the admiration and the adoration of the people which he has attained and which he would not have perhaps attained but for them. (*Times of India, 6th August 1920*)

नारायणरावांचें टिळकांच्या आजारांत मुद्दाम त्यांच्या भेटीस जाणें, मृत्यूनंतर आपला आदर व्यक्त करणारा लेख त्यांनीं लिहिणें, त्यांत टिळकांच्या अनेक गुणांची मुक्त कंठानें स्तुती करणें, त्यांचे व आपले कोणत्या बाबतींत मतभेद

होत असत हें सांगणें, त्यांचें शील व त्यांचें धीरोदात्त वर्तन, त्यांची निर्भय-वृत्ति व त्यांचें संशोधनप्रेम ह्यांसंबंधानें मनःपूर्वक प्रशंसा करणें ह्या गोष्टी चंदावरकरांच्या मनांत टिळकांविषयीं "अत्यंत अनादर" असल्याचें दाखवितात काय ? उलट पक्षीं चरित्रकार केळकर प्रिव्ही कौन्सिलनें चंदावरकरांचें न्यायपत्रक फिरविलें एवढ्या गोष्टीचा फायदा होऊन त्यांच्यासंबंधानें द्वेषाची भावना उत्पन्न करण्याचा कसून प्रयत्न करितात ! आणि हें पवित्र कार्य करीत असतां प्रिव्ही कौन्सिलनें चंदावरकरांच्या तोंडांत हीटन साहेबांचे शब्द कोंबून चंदावरकरांसंबंधानें मोठा अन्याय कसा केला आहे तें त्यांस दिसलें नाहीं म्हणून म्हणा, किंवा दिसूनही परस्पर कार्य होत आहे असें पाहून, गैरसमज अधिक पसरविण्याचें कार्य परस्पर होऊं देणें बरें असें त्यांस वाटलें म्हणून म्हणा, वस्तुस्थिति त्यांनीं लोकांपुढें आणली नाहीं एवढें खरें. इतकेंच नव्हे, तर चंदावरकरांविषयीं जनतेचें मन कलुषित करण्याचा मात्र त्यांनीं चांगलाच प्रयत्न केला आहे. प्रिव्ही कौन्सिलनें चंदावरकरांच्या निकालपत्रांतील वाक्यें घेऊन त्यांतील कारणें व विचार खोडून टाकण्याचा प्रयत्न केलेला नाहीं. हीटन साहेब व चंदावरकर ह्यांनीं एकच विचारांची दिशा अंगिकारिली नसतांही हीटन साहेबांचे विचार चंदावरकरांवर लादले आणि इकडे टिळक चरित्रकारांनीं प्रिव्ही कौन्सिलनें चंदावरकरांसंबंधानें जे उद्गार काढले नाहींत, ते प्रिव्ही कौन्सिलच्या न्यायपत्रकांत घालून चंदावरकरांवर सूड उगवून घेतला आहे ! टिळक चरित्रकार स्वतः एल्‌. एल्‌. बी. आहेत. मराठा पत्राचे संपादक म्हणून साताऱ्याहून टिळकांनीं त्यांना जेव्हां पुण्यास आणिलें त्यापूर्वी ते साताऱ्यास कोर्टांत खेपा घालीत होते व मुंबई हायकोर्टांत जेव्हां टिळकांचे खटले चालत तेव्हां वकील बॅरिस्टर विरुद्ध-पक्षाच्या वकीलबॅरिस्टरास उद्देशून बोलतांना, अगर कोर्टही त्यांचेविषयीं बोलतांना कोणती शब्दयोजना करितात ह्याची त्यांस कल्पना असलीच पाहिजे. असें असून त्यांनीं कांहीं शब्दांचें भलतेंच भाषांतर करून चंदावरकरांसंबंधाच्या गैरसमजामध्यें भर घालण्याचें महत्कार्य केलें आहे ! चरित्रकारांनीं अवतरण-चिन्हांत "न्या. चंदावरकर विद्वान असतील पण त्यांनीं ट्रस्टींवर जो आरोप केला आहे तो सर्वस्वी अयोग्य आहे" हें वाक्य दिलें आहे. पण हें वाक्य प्रिव्ही कौन्सिलच्या न्यायपत्रकांत **कोठेंही आढळत नाहीं !** "With much respect to the learned judge" असें तेथें आहे, पण विरोध दर्शवितांना वापरण्याची कोर्टाची ही भाषा आहे, प्रिव्ही कौन्सिलच्या न्यायाधीशाच्या डोळ्यांत चंदावरकरांची विद्वत्ता सलत होती असें त्यावरून होत नाहीं !

आणखी एका गोष्टीचा येथें उल्लेख करणें अगत्याचें आहे. चंदावरकरांनीं ताई-

महाराज खटल्यांत आपल्या विरुद्ध निकाल दिला, म्हणून टिळकांस त्यांचेविषयीं अनादर वाटत असेलही. पण, चंदावरकरांनीं आपल्या वर्तनानें व लेखानें टिळकांविषयीं आपलें मत काय होतें तें दाखविलेंच आहे. त्यावरून चंदावरकरांच्या मनांत टिळकांविषयीं "अत्यंत अनादर" होता ही केळकरी कल्पित कथा आहे असें दिसून येईल. तसेंच टिळकचरित्रकार म्हणतात "आपल्या वर्तमानपत्रांतून टिळकांनीं त्यांच्यावर (चंदावरकरांवर) सडकून टीका केलेली." केव्हां टीका केलेली ? चंदावरकर न्यायमूर्ति झाल्यापासून राजकारणांत भाग घेत नसत. त्यापूर्वींही दहा वर्षें राष्ट्रीय सभेस हजर न राहिल्याचें त्यांनीं स्वतःच सांगितलें आहे. न्यायमूर्ति होण्यापूर्वीं त्यांच्या हातीं स्वतःचें असें वर्तमानपत्र नव्हतें. अशा स्थितींत राजकीय बाबतींत सडकून टीका करावयास टिळकांना संधि तरी केव्हां मिळाली ? चंदावरकरांचीं सामाजिक ध्येयें निराळीं, टिळकांचीं निराळीं; टिळकांचे राजकीय चळवळीचे मार्ग चंदावरकरांना मान्य नव्हते; एवढेंच नव्हे तर ते देशाच्या हितास हानिकारक आहेत असें चंदावरकरांनीं दाखवून दिलें आहे. म्हणून आम्हांला तर असें वाटतें कीं, चंदावरकरांवर टिळकांनीं "सडकून" टीका केली ही देखील "अत्यंत अनादरा"च्या भावनेप्रमाणेंच चरित्रकारांच्या सुपीक मेंदूतून निघालेली कल्पना आहे ! सुडाची कल्पना सजविण्यासाठीं ही अनादराच्या भावनेची व सडकून टीकेची पार्श्वभूमी श्री. नरसोपंत केळकरांनीं तयार केली आहे.

टिळक चरित्राच्या दुसऱ्या खंडांत ( भाग. ३, पृ. ३० ) श्री. केळकर म्हणतात "आणि एखाद्यानें जर असें म्हटलें असतें कीं अधिकारलोभानें जसें टिळकांनीं हें दत्तविधानाचें खोटें काम ( चंदावरकरांच्या मतानुसार ले० ) केलें त्याचप्रमाणें मुख्य न्यायाधिशाची जागा मिळविण्याच्या अधिकारलोभानें सरकारचे वैरी जे टिळक त्यांच्याविरुद्ध चंदावरकरांनीं हा खोटा निकाल दिला, तर तें म्हणणाऱ्याला कोर्टाची बेअदबी केल्याबद्दल शिक्षा झाली असती." दुसरें कोणी म्हटलें असतें तर, असें म्हणून ह्या ठिकाणीं केळकर हे आपल्या मनांतील विष ओकलेच आहेत ! पण येथेंही बापड्यांची पुरीपुरी दिशाभूल झाली आहे ! हायकोर्टाच्या मुख्य न्यायाधीशाची जागा कोणाही वकील अगर आय्. सी. एस्. न्यायाधीशाला कायमची मिळणें १९१० सालीं शक्य नव्हतें हें केळकरांच्या लक्षांत नसावें. आतां कदाचित् ते म्हणतील कीं कायम नाहीं तर नाहीं, ॲक्टिंग जागेसाठीं त्यांची ही कारवाई असावी ! पण येथेंही फजितीचेंच ताट त्यांच्यापुढें वाढून ठेवलेलें आहे. चंदावरकर व हीटन ह्यांनीं आपापलीं स्वतंत्र न्यायपत्रकें ता. **२३ सप्टेंबर १९१०** रोजीं दिलीं. पण ह्यापूर्वी एक वर्ष आधींच चंदावरकर ॲक्टिंग चीफ जस्टिसचें काम करून बसले होते त्याची वाट काय ? बरें, ह्या मानासाठीं तरी ते धडपडत

होते काय ? मुळींच नाहीं ! आणि हें केवळ अनुमानाच्या जोरावर आम्ही म्हणत नाहीं. १९०९ सालीं पुढें ॲक्टिंग हायकोर्ट जज्ज झालेले मि. नाईट हे डिस्ट्रिक्ट जज्ज होते. त्यांच्या पुढील एका खटल्यांत हिंदु लॉसंबंधानें कांहीं भानगडीचा प्रश्न होता. त्याविषयीं मित्रत्त्वाच्या नात्यानें त्यांनीं चंदावरकरांचें मत विचारिलें होतें. व त्याच पत्राच्या शेवटीं चीफ जस्टिस झाल्याबद्दल चंदावरकरांचें अभिनंदन केलें होतें. त्यास उत्तर देतांना चंदावरकर आपल्या ता. १७ जुलै १९०९ च्या पत्रांत म्हणतात :—

" I do not know that I enjoyed being C. J. I did not feel the joy of it. I have arrived at a stage of life when the honours have ceased to gratify me. To take things as they come and work is all I care for. "

दुसरी गोष्ट अशी कीं, टिळक स्वतःला ब्रिटिश सरकाराचे दुष्मन म्हणवीत नसत. ते ब्रिटिश सरकारचे वैरी आहेत असें चंदावरकर व हीटन ह्यांनीं म्हटलेलें नाहीं. डॉ. भांडारकरांजवळ " ब्रिटिश सरकारचीं बिंगें बाहेर काढणें हाच आपला प्रधान हेतु आहे, " असें टिळक म्हणाले होते* व " ब्रिटिश सरकारचा मी तिर-

---

* १९१६ सालीं डॉ. भांडारकर व नारायणराव ह्यांच्यांतील एक संभाषण नमूद केलेलें आहे. त्यांत पुढील भाग आहे :—" आतां जहालांनीं राष्ट्रीय सभेवर छापा घातला व ती आपली ताब्यांत घेतली म्हणजे तिची धडगत नाहीं. कारण टिळकांच्या पक्षांत कांहीं विध्वंसक माणसें आहेत. तीं राष्ट्रीय सभेची वाट लावल्या-वांचून स्वस्थ बसणार नाहींत. स्वतः टिळकांचें तसें नाहीं. त्यांची परी निरा-ळीच आहे. ते संभावीत आहेत व त्यांच्या ठिकाणीं दयेची भावना आहे. एकदां त्यांनीं मला संभाषणांत असें स्पष्ट सांगितलें कीं, ह्या ब्रिटिश सरकारचीं सर्व बिंगें बाहेर काढणें, हाच आपला प्रधान हेतु आहे. ( My one great aim of life is to expose the British Government. )

नारायणराव—काय टिळकांनीं असें म्हटलें ? आणि तें केव्हां बरें असावें ?

भांडारकर—१९०८ सालीं त्यांना शिक्षा होण्यापूर्वी ते मजकडे वारंवार येत असत, त्यावेळीं हे असे उद्गार त्यांनीं अनेक प्रसंगीं काढले आहेत. मी ब्रिटिश सरकारचा तिरस्कार करीत आहें असें त्यांनीं केव्हांच म्हटलें नाहीं. त्यांच्या मार्गांत अडचणी उत्पन्न करावयाच्या, विघ्नें आणावयाचीं, व त्यांच्या मनाप्रमाणें कारभार करणें त्यांना अशक्य करावयाचें हा आपला हेतु आहे, असें ते म्हणत एवढेंच त्यांच्याविरुद्ध बोलतां येईल. पण ते गृहस्थ आहेत, संभावीत आहेत व अगदीं निर्व्यसनी आहेत ह्यांत कांहीं संशय नाहीं. " हें संभाषण प्रिव्ही कौन्सिलचा निकाल झाल्यानंतरचें आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

स्कार करीत आहें " असें देखील म्हणावयास जे टिळक तयार नव्हते, त्यांना स्वतःच त्यांच्या शिष्यवरानें **सरकारचे वैरी** बनवावें हा अजब योग नव्हे काय ? त्याचप्रमाणें तुरुंगांतून सुटल्यानंतर ज्या टिळकांनीं स्वतः आपल्या **राजनिष्ठेची घोषणा** केली, व ज्यांनीं गोपाळराव गोखले ह्यांच्या मृत्यूनंतर गोखल्यांचें अनुकरण करा, असा जाहीर उपदेश, गोखल्यांशीं जिवंतपणीं मनसोक्त विरोध करूनही केला, ते लोकमान्य टिळक ब्रिटिश सरकारचे दुष्मन होते असें विधान त्यांच्या शिष्योत्तमांनीं स्वलिखित टिळकचरित्रांत करावें ह्यापेक्षां आणखी तिरस्करणीय गोष्ट कोणती असूं शकेल ?

नारायणरावांनीं बारा वर्षें हायकोर्ट जज्जाचें काम पूर्ण यशस्वी रीतीनें केलें. तें करीत असतांना लोकहितकारक चळवळींत त्यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला. स्टूडंट्स् ब्रदरहूडसारख्या संस्थेंत नियमानें कित्येक वर्षें त्यांनीं व्याख्यानें दिलीं, स्टूडंट्स् लिटररी अँड सायन्टिफिक सोसायटीच्या शाळेंत दर शनिवारीं कित्येक वर्षें त्यांनीं इंग्रजी शिकविलें व त्यांत त्यांना कोणत्याही प्रकारें कमीपणा वाटला नाहीं. ते फार आनंदानें तें कार्य करीत असत. आठवडाभर हायकोर्टाच्या न्यायाधिशाचें काम करून एक दिवस मोठ्या उल्हासानें इंग्रजी शिकविण्यासाठीं दर आठवड्यास मुलींच्या शाळेंत नियमानें जाणारे व आपुलकीच्या भावनेनें तें कार्य करणारे एकटे सर नारायणच होत असें म्हटलें तर त्यांत मुळींच अतिशयोक्ति होत नाहीं. शाळेंत जाणाऱ्या तरुण मुलींचा घोळका पाहिला म्हणजे त्यांना कितीतरी आनंद होत असे. न्यायमूर्ति असतांनाच सोशल सर्व्हिस लीग स्थापन करून त्यांनीं ती नांवारूपास आणिली. श्री. वि. रा. शिंदे ह्यांनीं स्थापन केलेल्या अस्पृश्यतानिवारक चळवळींत पुढाकार घेऊन तो विषय सर्वतोमुखीं करून लोकांमध्यें अस्पृश्यतानिवारणासंबंधानें सक्रिय सहानुभूति उत्पन्न करावयास त्यांचे श्रम बऱ्याच अंशानें कारण झाले. अस्पृश्यांची उन्नति साधल्यानें आम्ही आपली स्वतःची उन्नति साधीत असतों–By elevating the Depressed Classes we elevate ourselves हें महावाक्य नारायणरावांनींच उच्चारिलें. भाजेकर वकिलांस हाताशीं धरून प्रेसिडेन्सी सोशल रिफार्म असोशिएशनच्या द्वारें पंडित विद्यासागर ह्यांच्या पुण्यतिथीचें निमित्त करून विधवाविवाहाच्या चळवळीस त्यांनींच पुन्हां एकदां चालना दिली. युनिव्हर्सिटि परीक्षा पास होणाऱ्या विद्यार्थिनींचें जाहीर अभिनंदन करण्याचा उपक्रम त्यांनींच सुरू केला. प्रार्थनासमाजाचे सभासद, उपदेशक व अध्यक्ष ह्या नात्यांनीं त्यांनीं नाना प्रकारचीं कार्यें केलीं. ह्याच अवधींत अनेक संस्थांशीं संबंध ठेवून त्यांस आपल्या विचारांचा व अनुभवाचा लाभ दिला. युनिव्हर्सिटीमध्यें प्रथम फेलो, नंतर सिंडिक व त्यानंतर व्हाइस चान्सलर व पुन्हा

सिंडिक ह्या नात्यानें त्यांनीं बहुमोल कार्य केलें. एकेका महत्वाच्या विषयावर त्यांनीं सिंडिक व व्हाइस चान्सलर ह्या नात्यानें जे विचार प्रदर्शित केले ते उच्च शिक्षणांतर्गत अनेक विषयांवर त्यांनीं किती खोल विचार केला होता त्याची प्रत्यक्ष साक्ष पटविणारे आहेत. इतकीं सर्व कार्यें करीत असूनही हायकोर्टाच्या कामांत त्यांच्याकडून केव्हांही कसूर झालेली नाहीं. त्यांचें कर्तृत्वसामर्थ्य किती दांडगें होतें, त्यांची काम करण्याची पद्धत किती शिस्तवार होती, त्यांची आकलन शक्ति किती उच्च प्रकारची होती, ह्याची साक्ष ह्या सर्व कार्यांचा विचार मनांत आला कीं पटल्यावांचून राहात नाहीं. लोकांना पुष्कळ वेळां आश्चर्य वाटत असे कीं, इतकीं सर्व कार्यें वेळच्यावेळीं करावयास नारायणरावांस अवसर सांपडतो तरी कसा ? हीं सर्व कार्यें हातून होत असतांना कांहीं वर्तमानपत्रांसाठीं व मासिकांसाठीं विशेष लेख लिहिण्यास व नाना प्रकारच्या विषयांवर व्याख्यानें द्यावयास त्यांना वेळ सांपडत असे ! त्यांना ह्या सार्वजनिक कार्यांचा कंटाळा आला नाहीं. परंतु बारा वर्षांनंतर कर्तव्य करण्याचें नवें क्षेत्र देवानें आपल्यापुढें ठेविलें आहे असें वाटलें म्हणून त्यांनीं संस्थानची नोकरी इंदूरच्या महाराजांच्या अत्याग्रहास बळी पडून पत्करली. तेथें ते फार दिवस कां राहिले नाहींत ह्याचा विचार अन्यत्र केलेला आढळेल.

प्रकरण पांचवें

# सामाजिक सुधारणा

नारायणराव आपल्या देशाच्या सर्वांगीण उन्नतीसाठीं झटणारे होते. सर्व बाजूंनीं आपली उन्नति जर व्हावयाची आहे, तर त्यासाठीं सर्व बाजूंनीं प्रयत्न झाले पाहिजेत हें निर्विवाद आहे. म्हणूनच आधीं राजकीय कीं प्रथम सामाजिक ह्या प्रश्नाचा काथ्याकूट न करितां, दोन्ही बाजूंनीं प्रयत्नांस लागणें इष्ट आहे, असें त्यांनीं त्या वादाच्यावेळीं प्रतिपादिलें होतें. तथापि नारायणरावांचें लक्ष सामाजिक व धर्मविषयक बाबींकडे विशेष होतें हें कांहीं खोटें नाहीं.[1] त्यांच्या एकंदर पूर्वतयारीचा जर आपण क्षणभर विचार केला, तर त्यांनीं आपल्या पुढील आयुष्यामध्यें सामाजिक व धर्मविषयक बाबींस अधिक महत्त्व दिलें ह्याबद्दल आपल्याला आश्चर्य वाटावयाचें नाहीं. कारण, त्यांनीं लोकस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण केलें होतें. मुंबई शहरीं एकदां पैशाचा धूर पसरला होता. त्यामुळें पुष्कळांची दृष्टी दूषित झाली होती. योग्य अयोग्य, खरें खोटें, नीति अनीति ह्यांतील भेदाकडे दृष्टि न जातां, स्वैर आचारविचारांकडे कल विशेष होता. ज्याचेजवळ धन विपुल त्यानें चैन व ऐषआराम ह्यांत त्याचा व्यय करणें ह्यांत बहुजनांना कांहींही गैर वाटत नसे. ज्याच्याजवळ पैसा आहे, त्यानें जर उघडपणें बाहेरख्यालीपणा केला, तर लोकांमध्यें तें त्याच्या वैभवाचें, अगर मोठेपणाचें लक्षण मानलें जात असे, त्यांत कोणाला कांहीं गैर वाटत नसे, एवढेंच केवळ नव्हे, तर त्याच्या कुटुंबांतल्या स्त्रियांना व प्रत्यक्ष त्याच्या पत्नीलाही त्यांत कमीपणाचें

---

१. १८८६ सालीं कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेंत भाषण करतांना नारायणरावांनीं स्पष्टपणें सांगितलें कीं, सामाजिक व धर्मविषयक सुधारणेनंतर राजकीय सुधारणेला मी प्रथम स्थान देतों.

अगर कांहीं विशेष वाटत नसे![1] ह्याच काळाचें वर्णन करितांना सभोंवतालची त्यावेळची स्थिति स्वतः पाहून गोविंद नारायण माडगांवकरांनीं म्हटलें आहे;. " वेश्यांचे नाच हें तर भरतखंडास एक ग्रहणच लागलें आहे. ह्यापासून प्रत्येक शहरांत किती नासाडी होते याचें अनुमान करवत नाहीं. दुराचरणी स्त्रिया सर्व मुंबईभर पसरल्या आहेत. त्यांची संख्या दिवसेंदिवस वाढत आहे. आनंदाच्या दिवशीं श्रीमंत गृहस्थांस आगतस्वागताविषयीं सन्मान देणें असल्यास ह्या प्रकारच्या एकदोन स्त्रिया सभेंत उभ्या केल्यानें ते संतुष्ट होतात. " विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, त्यावेळीं जुन्या आचारविचारांस नित्य बिलगून बसणाऱ्या पारशी[2] लोकांसही शुभ प्रसंगीं वेश्यांचे नाच करण्याची आवश्यकता वाटत असे व त्यांच्या येथेंही नाचरंग होत असत. त्याचप्रमाणें वरच्या वर्गांत तसेंच वाणी-भाटे वगैरे लोकांतही गांजा, अफीण, चंडोल, चरस ह्यांचें व्यसन भलत्याच थरास गेलें होतें.[3] एकीकडे शिक्षणाचा होत असलेला प्रसार, दुसरीकडे एरव्हीं कर्मठपणा दाखविणारांतही हा दुराचरणाचा किळसवाणा प्रकार, अर्ध्या हळकुंडानें पिंवळीं झालेलीं माणसें इतस्ततः वागावयास लागलेलीं, कांहीं उघडपणें अगर प्रच्छन्नपणें स्वतःच्या आचरणाच्याद्वारें नास्तिक मताचा प्रसार करण्यांत गुंतलेलीं, अशा वेळीं एकाएकीं मिळालेली संपत्ति नष्ट होऊन पुष्कळांच्या तारवटलेल्या डोळ्यांना अंजन मिळाल्याचें नारायणरावांनीं ऐकिलें होतें. परमहंस मंडळीचा बोजवारा कां उडाला त्याचेविषयीं नारायणरावांनीं योग्य निदान केलेलें, सामाजिक उच्च ध्येय असलें तरी जोंपर्यंत त्या उच्च ध्येयांचा प्रवेश आपापल्या कुटुंबांत होत नाहीं, तोंपर्यंत गुप्तपणें जातिभेद नष्ट करण्याचे प्रयत्न व्यर्थ होत. स्त्रियांना ज्ञानाचा लाभ दिल्यावांचून पुरुषास कोणतेंही सामाजिक सुधारणेचें उच्च ध्येय गांठतां यावयाचें नाहीं, अशी ज्यांची खात्री झालेली, त्या नारा-

---

१. कांहीं जातींत आजही हा प्रकार चालू आहे. आज मोठे देशभक्त व राष्ट्राचे पुढारी म्हणून मिरविणारे एक गृहस्थ तरुणपणीं रोज घरीं मध्यरात्र उलटल्यावर येत; तेव्हां एका बाईनें कुतूहलपूर्वक कुटुंबांतील वृद्ध स्त्रीपाशीं आपले चिरंजीव इतके उशीरां रोज घरीं कां येतात अशी चौकशी करितां "पुरुषाच्या चरित्राविषयीं आपण खोलांत जाऊं नये" असें उत्तर मिळालें!

२. मात्र पारशी लोकांनींच आपल्या ज्ञातींत वेश्यांचे नाच व कलावंतिणींचें गाणें ह्यावर प्रथम बहिष्कार घातला असें सर दिनशा वाच्छा ह्यांनीं आपल्या आठवणींत म्हटलें आहे.

३. मुंबईच्या ह्या पूर्वस्थितीचें विस्तृत विवेचन " प्रार्थनासमाजाचा इतिहास " ह्या ग्रंथांत सविस्तर सांपडेल.

यणरावांनीं आपल्या सबंध आयुष्यांत सामाजिक सुधारणेचा पुरस्कार केला, तर तें सर्व त्यांच्या पूर्वतयारीस अनुरूपच झालें असें म्हणावयास हरकत नाहीं. शिवाय, "नारायणरावांचे तारुण्यांतील आदर्श" किंवा "मोठेपणींचे मार्गदर्शक" कोण होते तें जर आपण पाहिलें, तर नारायणरावांच्या एकंदर आयुष्यास जें वळण लागलें त्यापेक्षां निराळें वळण लागणें शक्यच नव्हतें, असें दिसून येईल. त्याचप्रमाणें ज्या परमहंस सभेवर नारायणरावांनीं कडक टीका[1] केली, त्या परमहंस सभेच्या "कोणी कोणाचा द्वेष करूं नये, **ब्राम्हणांनीं महारास तुच्छ मानूं नये,** महारांनीं ब्राम्हणांशीं वैर करूं नये, शूद्रांनीं ब्राम्हणास हात दाखवीन असें म्हणूं नये, हिंदूंनीं पृथ्वींतील सर्व देशांत व्यापारास जावें, तेथील लोकांशीं सख्यत्व करावें, त्यांचीं विद्या-कसबें शिकावीं, अडाणी समजुती सोडाव्या, स्वदेशांत परदेशांतील यंत्रें व हरएक हुन्नर आणावे, काशीपासून लंकेपर्यंत सर्वांच्या मनांत वर्तमानपत्रद्वारें एक सूत्र खेळत असावें, एकाचें दुःख तें सर्वांचें दुःख, व एकाचें सुख तें सर्वांचें सुख असें सर्वांनीं मानीत जावें." ह्या ध्येयामध्यें[2] सर्व सामाजिक सुधारणा येते, हेंही त्यांनीं ध्यानांत ठेविलें होतें.

आतां ह्या ठिकाणीं नारायणरावांचे "तारुण्यांतील आदर्श" व "मोठेपणींचे मार्गदर्शक" जे कोणी झाले त्यांच्याविषयीं नारायणरावांनीं निरनिराळ्या वेळीं नमूद केलेल्या विचारांची कल्पना करून दिली म्हणजे त्यांच्या विचारांस लागलेली दिशा लावावयास हे त्यांचे आदर्श व मार्गदर्शक कसे कारणीभूत झाले असावे याची अटकळ करतां येईल. नारायणरावांचा ज्यांच्याशीं विशेष परिचय झाला, ज्यांच्या विचारांचा, लेखांचा, संभाषणांचा व चरित्रांचा त्यांचेवर परिणाम झाला, त्यांत मुख्य नारायण महादेव ऊर्फ **मामा परमानंद** होत. भांडारकर, रानडे, तेलंग, माडगांवकरबंधु, नूलकर, जव्हेरिलाल याज्ञिक हे सर्व मामांचे समकालीन. परंतु सर्वांचा मामांविषयीं अत्यंत आदर असे. त्यांच्या विचारांस सर्वच महत्त्व देत. हें स्वतः अनुभवून नारायणराव मामांच्या गुणांशीं समरस होण्याचा प्रयत्न करूं लागले. त्यांनीं मामांच्या लेखांचें चांगलें अध्ययन केलें, रोज त्यांच्या सहवासाचा लाभ घेणें हें आपलें कर्तव्य मानून त्यांच्या चरणांपाशीं बसून नारायणरावांनीं त्यांचे विचार आत्मसात् करण्याचा प्रयत्न केला. आपल्या लेखांत, व्याख्यानांत व उपदेशांतही नारायणराव वारंवार मामांची आठवण करून देत. आपल्या एका लेखांत ते म्हणतात, "आमच्या पुढाऱ्यांत मामा परमानंद हेच खरेखुरे ऋषि होते असें

---

१. हा भाग प्रार्थनासमाजांत दाखल होण्यापूर्वी ह्या प्रकरणांत आला आहे.

२. रे. बाबा पदमनजी ह्यांचें 'अरुणोदय' हें पुस्तक पहावें.

म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. मामा फार गोड व उदार स्वभावाचे गृहस्थ होते, आणि शांतपणें, विशेष गाजावाजा न करितां, ईश्वरावर सर्व भार टाकून, ते आपल्या देशाच्या उद्धारासाठीं देवाचें कार्य सतत करीत होते. आपले भांडारकर, रानडे, तेलंग हे सर्व त्यांस मार्गदर्शक समजून त्यांच्या सल्ल्यानें, त्यांच्या विचारानें वागत व त्यांच्या उपदेशास योग्य महत्त्व देत. ते एक आदर्शवत् गृहस्थ होते. त्यांची एकदां ओळख झाली कीं, त्यांच्याविषयीं मनांत प्रेम व आदर हीं उदित व्हाव-याचींच व त्यांचा व आपला परिचय झाला म्हणून आपणांस धन्यता वाटावी इतक्या थोर योग्यतेचे गृहस्थ मामा परमानंद होते. त्यांची वृत्ति नेहमीं शांत व सौम्य असून उपकारांची फेड अपकारांनीं झाली तरी ते अपकार नेहमीं विस-रून जात व अपकार करणारांना क्षमा करीत. "एल्फिन्स्टन कॉलेजचे सप्तर्षि[1]" ह्या आपल्या व्याख्यानांत मामासंबंधानें बोलतांना ते म्हणाले, "एल्फिन्स्टन कॉलेजांतील थोर पुरुषांची यादी आपल्यापुढें ठेविली आहे तींत जर आणखी एका नांवाचा मीं समावेश केला नाहीं तर ही यादी अपुरी होईल. हें नांव आपण जरी ऐकिलें नसलें तरी आज त्यांच्या नांवाचा आदरपूर्वक उल्लेख करणें अग-त्याचें आहे. नारायण महादेव परमानंद ह्यांचें नांव आपल्याला ऐकूनही माहीत नसावें. तेही एल्फिन्स्टोनिअनच होते. कोणत्याही प्रकारें गाजावाजा न करितां शांतपणें कार्य करणारे ते गृहस्थ होते. माझा व त्यांचा पंधरा वर्षांचा दीर्घ परिचय होता.[2] ह्या दीर्घ काळांत ते मला गुरुस्थानीं होते. म्हणून मी स्वानुभवावरून सांगूं शकतों कीं, त्यांची साधुवृत्ति, त्यांची उदार सहानुभूति, बिकट परिस्थितींत योग्य सल्ला देण्याची त्यांची असमान्य हातोटी, त्यांची विद्वत्ता, त्यांचा साधेपणा, निगर्वी वृत्ति ह्यांच्यामुळें ज्यांचा ज्यांचा त्यांच्याशीं संबंध येई त्यांजवर त्यांचें वजन पडे. ते एका साप्ताहिकाच्या ( नेटिव्ह ओपिनिअन ) इंग्रजी भागाचे संपा-दक होते. त्यांतील भारदस्त लेख, पोक्त विचार, स्पष्टोक्ति, उदार धोरण, सुंदर भाषा ह्यांच्यायोगें थोड्याच दिवसांत तें पत्र सर्वांच्या आदरास पात्र झालें. त्या वेळचे गव्हर्नर सर बार्टल फ्रीअर ह्यांच्या कानीं त्या पत्राची कीर्ति जातांच ते स्वतः त्याचे वर्गणीदार झाले होते."

---

१. हे सप्तर्षि म्हणजे ( १ ) बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर, ( २ ) दादाभाई नवरोजी, ( ३ ) रामकृष्ण गोपाळ भांडारकर, ( ४ ) महादेव गोविंद रानडे, ( ५ ) फेरोजशहा मेथा, ( ६ ) काशिनाथ त्रिंबक तेलंग, ( ७ ) नारायण महादेव परमानंद.

२. मामा परमानंद १८९३ सालीं परलोकवासी झाले.

नारायणरावांचे 'तारुण्यांतील आदर्श' व 'मोठेपणींचे मार्गदर्शक' असे जे दुसरे गृहस्थ होते त्यांत डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर हे प्रमुख होते. सामाजिक सुधारणेसंबंधानें बोलण्याचे प्रसंग आले असतां, ज्या ज्या वेळीं कर्ते सुधारक व मार्गदर्शक ह्यांविषयीं बोलण्याचे प्रसंग येत, त्या त्या वेळीं डॉ. भांडारकरांचा मोठ्या आदरानें ते उल्लेख करीत व त्यांचें उदाहरण जनतेपुढें ठेवीत. त्यांच्याशीं नाना विषयांवर त्यांचें संभाषण होत असे. त्यांची सत्यप्रीति, धर्मनिष्ठा, करारी बाणा, धर्मसुधारणेची कळकळ, प्रागतिक विचार, विचारांनुसार आचरण, अध्ययनशीलता, संशोधनकार्यांतील तत्त्वनिष्ठा, त्यांचीं धर्मपर व्याख्यानें,[1] ह्यांचा त्यांच्या मनावर इतका परिणाम झाला होता कीं, सामाजिक व धर्मसुधारणेच्या बाबतींत कोणाशीं-ही संभाषण करतांना तो व्यक्त केल्यावांचून त्यांस बरें वाटत नसे.

शाळेंत ( एल्फिन्स्टन हायस्कूल ) शिकत असतांनाच नारायणरावांच्या विचारांस वळण लावण्याचें काम एका वर्तमानपत्रानें देखील केलें आहे त्याचा येथें उल्लेख करणें अगत्याचें आहे. नारायणराव एल्फिन्स्टन हायस्कूलमध्यें दाखल झाल्यावर सुट्टीच्या वेळांत त्यावेळीं काळकादेवीच्या रस्त्यावर प्रार्थनासमाजाचे एक संस्थापक प. वा. वासुदेव बाबाजी नवरंगे ह्यांचें जें स्टेशनरी वगैरे मालाचें दुकान होतें तेथें वर्तमानपत्रें वाचण्यासाठीं[2] जात असत. त्यावेळीं त्यांच्या विचारांस उत्तम दिशा लावावयास ज्या अनेक गोष्टी कारण झाल्या त्यांपैकीं **इंडिअन मिरर व संडे मिरर** ह्या पत्रांचें नियमित वाचन हें एक होतें. ह्याचें स्मरण आपल्या लेखांत नारायणरावांनीं कृतज्ञबुद्धीनें केलें आहे. नारायणराव म्हणतात, "**इंडिअन मिरर** हें पत्र त्यावेळीं ब्राह्मसमाजाच्या मालकीचें होतें व केशवचंद्र सेन ह्यांच्या शिकवणीस अनुसरून हें पत्र चालत होतें. मिररचें संपादकत्व बाबू प्रतापचंद्र मुझुमदार ह्यांजकडे होतें. अशा परिस्थितींत हें पत्र प्रसिद्ध

---

१. डॉ. मार्टिनो ह्यांच्या Hours of Thought व Endeavours after the Christian Life ह्या ग्रंथांच्या तोडीचा 'धर्मपर लेख व व्याख्यानें' हा ग्रंथ आहे असें नारायणरावांस वाटत असे.

२. वर्तमानपत्रें वाचावयास एकटे नारायणरावच वासुदेवरावांच्या दुकानांत जात असत असें नव्हे. प. वा. रा. ब. काशीनाथपंत मराठे पेन्शन घेतल्यानंतर एकदां वासुदेवरावांस भेटावयास गेले होते, तेव्हां जुनी ओळख त्यांनीं पुढील वाक्य उच्चारून पटवून दिली : "अहो, तुमचें दुकान काळकादेवीवर असतांना एक गोरा गोमटा चित्पावनाचा मुलगा जो तुमच्याकडे येणारीं वर्तमानपत्रें वाचावयास येत असे तोच मी काशीनाथ मराठे!"

होत असल्यामुळें त्याचें एकंदर धोरण उच्च, उदार, प्रागतिक असे व नीति व धर्म ह्यांविषयीं विशेष कटाक्ष ठेवून पत्र चालविलें जात असे. त्यामुळें त्याचें वाचन विशेषतः तरुणांस लाभदायक व उद्बोधक होत असे. त्यावेळीं सामाजिक व धर्मविषयक बाबतींत पुढाकार घेणारे वासुदेव बाबाजी नवरंगे ह्यांनीं हें पत्र माझ्यासारख्या विद्यार्थ्यांनीं अवश्य वाचावें असें सुचविलें व त्यांच्या सूचनेस अनुसरून मीं त्या पत्राचें वाचन नियमानें सुट्टींत करूं लागलों. ह्यांतील मुख्य व स्फुट लेख धर्माचा उच्च आदर्श पुढें ठेवून लिहिले जात. लोकपुढारी व त्यांचीं कार्यें ह्यांवर निर्भीड टीका होत असे, पण, त्यांत खाजगी द्वेष, अनुदारपणा, लांगूलचालन, असले प्रकार मुळींच दिसत नसत. त्यामुळें अशा सर्व लेखांच्या वाचनाच्या द्वारें मला फार लाभ होई. आपल्यावरील जबाबदारीचा विसर पडून लिहिलेले लेख मिररमध्यें मला आढळून आले नाहींत. माझ्या विचारांस अनेक बाजूंनीं वळण मिळत होतेंच. पण मिरर मधील लेखांचा माझ्या मनावर झालेल्या अत्यंत इष्ट परिणामाचा मला केव्हांही विसर पडावयाचा नाहीं. परमेश्वरावरील माझा विश्वास दृढ करण्यास मिररमधील लेख पुष्कळ अंशानें कारण झाले ह्यांत कांहीं संशय नाहीं. त्यावेळीं इंडिअन मिरर हें पत्र रोज निघत असे व दर रविवारीं संडे मिरर निघत असे. ह्यांत विशेषतः धर्म व नीतिपर लेख येत व ते मला फार आवडत असत. कारण, त्यांत तरुणांच्या ध्येयांची योग्य मीमांसा असे. पुढें मिरर पत्राची मालकी ब्राह्मसमाजानें सोडली व ती माझे मित्र राय-बहादुर नरेंद्रनाथ सेन ह्यांच्याकडे आली. ह्या पत्रानें आजपर्यंत (१९१०) पूर्वींचेंच धोरण कायम ठेविलें आहे. स्वतंत्र वृत्ति, धर्मनिष्ठा, सामाजिक व धर्म-सुधारणेसाठीं मनापासून झटणें, हाच त्याचा क्रम आजही आहे. सत्य, दया व प्रगति ह्यांस हें पत्र वाहिलेलें आहे. आणि केशवचंद्र सेन, प्रतापचंद्र मुझुमदार ह्यांचे त्यावेळचे लेख ह्यांचा माझ्यावर लहानपणीं जो अत्यंत इष्ट परिणाम झाला त्याचें कृतज्ञतापूर्वक स्मरण करून इंडिअन मिरर पत्राच्या सुवर्ण महोत्सवाबद्दल मी ह्या पत्राचें मनःपूर्वक अभिनंदन करितों."[१]

नारायणरावांनीं सामाजिक सुधारणेचीं जीं तत्त्वें प्रतिपादिलीं तीं त्यांच्या अनेक व्याख्यानांत, लेखांत व मित्रांस लिहिलेल्या पत्रांत पसरलेलीं आहेत. तीं शोधून एकत्रित केलीं म्हणजे नारायणराव कोणतें धोरण दृष्टीपुढें ठेवून सामाजिक

---

१. इंडिअन मिरर पत्राचा सुवर्णमहोत्सव ता. १४ ऑगस्ट १९१० रोजीं रायबहादूर नरेंद्रनाथ सेन ह्यांनीं त्या पत्राचा विशेष अंक काढून साजरा केला. त्या अंकासाठीं नारायणरावांनीं एक लेख लिहिला होता. त्यांत वरील मजकूर आहे.

सुधारणेच्या कार्यास लागले व कोणत्या तत्त्वांनुरोधें सुधारणेसंबंधाचीं कार्यें व्हावींत अशी त्यांची इच्छा होती त्याची आपल्याला कल्पना होईल. नारायणराव ज्यावेळीं सुधारणेच्या आखाड्यांत उतरले, त्यावेळीं सुधारकांच्या विरुद्ध साधारणतः असा आक्षेप घेण्यांत येत असे कीं, सुधारक आपल्याला स्वयंभू म्हणवितात. पूर्वजांचा अनुभव, पुरातन इतिहास, पुरातन रूढी ह्यांचा कांहींही ते विचार करीत नाहींत. परंतु रानडे, भांडारकर व आपले नारायणराव ह्यांच्या विचारांचा विचार केला तर हा आरोप किती वृथा आहे त्याची सहज कल्पना होते. भांडारकरांच्या शत्रूंनाही त्यांच्या ठिकाणीं जुन्या संस्कृतीविषयीं अभिमान नव्हता असें म्हणतां यावयाचें नाहीं. न्या. मू. रानडे ह्यांनीं राजा राममोहन राय वरील आपल्या व्याख्यानांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, ब्राम्हसमाजाची स्थापना राममोहन ह्यानें केली अशी भाषा वापरणें हेंच एकार्थीं चुकीचें आहे. आम्ही पुरातन ऋषींचे अनुयायी आहोंत व त्यांचीच परंपरा आम्ही चालवीत आहोंत. आणि नारायणरावांनीं सोलापूर येथें भरलेल्या प्रांतिक परिषदेंत भाषण करितांना स्पष्ट सांगितलें कीं, "प्रत्येक देशानें आपली उन्नति करून घेतेवेळीं आपली पूर्वपीठिका, आपली परिस्थिति, आपला आजपर्यंतचा अनुभव, आपलें आजपर्यंतचें धोरण, आपलें कर्तृत्व ह्यांचा विचार केला पाहिजे. इतर देशांचीं उदाहरणेंही आपल्या दृष्टीपुढें अवश्य असलीं पाहिजेत. सुधारणेचीं, उन्नतीचीं मूलतत्त्वें सर्वत्र सारखींच असावयाचीं. तथापि सुधारणारूपी इमारत उभी करतांना आपला पाया पूर्वींचाच व अनुभवानें जो चांगला मजबूत ठरला आहे तो ठेवून, आपण उपाययोजना केली पाहिजे." [१]

---

१. दुसऱ्या एका व्याख्यानांत ते म्हणतात:

I am one of those who cling to the belief that all reform, to be productive of good and lasting, must begin by taking into account the past history of the people for whom it is meant and it ought to regulate itself on lives which do not conflict with their highest and noblest ideals. There is no difficulty in accepting this as the starting point of all reform movements which aim at success.

आणखीही ते म्हणतात:—

We do not wish to make light of the past, nor do we desire to touch the ancient in either a spirit of irreverence or thoughtlessness.

दुसऱ्या वेळीं ते म्हणाले:—I too venerate the past. I am proud of our ancestors; but are our ancestors, watching us from above, proud of us? Let us think of that a little.

ह्यावरून नारायणरावांच्या ठिकाणीं आपल्या पूर्वसंस्कृतीसंबंधानें कसा अभिमान होता तो व्यक्त होतो. मात्र कोणतीही गोष्ट केवळ पुरातन आहे, म्हणून ती शिरसा-वंद्य मानावयास ते तयार नसत. पुढें पाऊल टाकावयाचें तर पूर्वी आपण होतों कोठें हें पाहिलें पाहिजे. त्याचप्रमाणें त्यांचा असा विश्वास होता कीं, कोण-ताही समाज शीलावस्थेंत केव्हांही नसतो. समाज अगर समाजसंघ जागच्याजागीं स्थिर आहे अशी कल्पना करून घेणें हें अगदीं चूक आहे. समाज एक तर पुढें, अगर मागें जात असतो. त्याची प्रगति होत नसली, तर निःसंशय तो मागें जात असतो. म्हणून व्यक्तीनें सामाजिक प्रगतीच्या कार्यांत भाग घेतला पाहिजे, एवढेंच नव्हे, तर तसें करणें हें त्याचें कर्तव्यच आहे, आणि त्याच्यावरच जनतेचें, समाजाचें कल्याण अवलंबून आहे असें त्यांचें मत असे.[1] मात्र, त्यांना स्वतःला थोर सामा-जिक सुधारकाच्या[2] कोटींत कोणी नेऊन बसविलें तर ते स्पष्ट सांगत कीं तो अधिकार माझा नाहीं. तो मान राजा राममोहन, केशवचंद्र, ईश्वरचंद्र विद्यासागर, विष्णुशास्त्री पंडित व डॉ. भांडारकर ह्यांचा आहे. त्यांनीं दाखविलेल्या मार्गाचें अनुसरण करणें, त्यांच्या पावलावर पाऊल टाकणें हें आपलें कर्तव्य आहे. त्यांची शिकवण व त्यांच्या शिकवणीपेक्षांही त्यांचीं चरित्रें आपल्याला असें निक्षून सांगत आहेत कीं, आपल्या स्त्रियांना उदार शिक्षण देणें, त्यांच्या एकंदर स्थितींत सुधा-रणा घडवून आणणें, जे जुने आचार विचार प्रगतीच्या मार्गांत येत असतील ते बदलणें हें आपलें कर्तव्य आहे.

नारायणरावांच्या वेळीं सामाजिक सुधारणेचें स्वरूप अगदीं निराळें होतें. ज्या गोष्टी त्यावेळीं समाजांत रूढ नव्हत्या, व ज्या रूढ होणें समाजाच्या हिताच्या दृष्टीनें अवश्य होतें त्या प्रचारांत आणण्यासाठीं प्रयत्न करणें हें सामाजिक सुधारणेंत त्यावेळीं मोडत असे. पण नारायणरावांची दृष्टी थोडी निराळी असे. त्यांचें असें म्हणणें असे कीं,

---

१. Life is a mission and a duty and even the humblest man, whatever his capacities, is called on to do what little he can to promote the cause of social progress for it is on that progress that much of our social well-being depends.

२. I cannot indeed claim the honour of a social reformer, for it is a name, deserved by but a few among us. Rammohan Roy, Keshab Chunder Sen, Vidyasager, Vishnu Shastri Pandit, and Dr. Bhandarkar are the names that have merited that title, and ours—yours and mine—is the privilege, if we will, to follow in their footsteps.

सर्व सामाजिक सुधारणेचा पाया कौटुंबिक सुधारणा[1] हा आहे. आणि इतरांच्या दुःखाविषयीं कळवळा बाळगणें व त्याप्रमाणें वर्तन करणें ह्याचेंच नांव सामाजिक सुधारणा. म्हणून ते विचारतात, "आपण आपल्या बहुजन समाजामध्यें काय पहातों ? एक तर मुलींना अज्ञानाच्या स्थितींत ठेवावयाचें, अज्ञानाच्या अवस्थेंतच कोणाशींतरी त्यांचीं लग्नें लावून द्यावयाचीं, व आपलें जबाबदारीचें ओझें हलकें झालें असें मानावयाचें. गतभर्तृकांना पुनर्विवाहाची मोकळीक ठेवावयाची नाहीं, पुरुषांनीं मात्र एकीमागून दुसरी अशा वाटेल तितक्या स्त्रियांशीं लग्नें लावावयाचीं, एवढेंच नव्हे, तर एक पत्नी जीवंत असतांही एखादें कारण कल्पून अगर कारण नसतांही दुसरा विवाह करावयाचा, स्त्रियांना कमी लेखावयाचें, शूद्र जे आहेत त्यांना नीच समजावयाचें, कांहीं माणसांना अतिशूद्र मानून त्यांना अस्पृश्य मानावयाचें, ते रस्ता चालल्यानें रस्ताही बाटतो असें समजावयाचें, ते वाट चालत असतांना त्यांसच आरोळी मारावयास लावावयाचें, ही काय भूतदया ? ह्याला काय जगाच्या दुःखाचा कळवळा म्हणावयाचें ? आतां ह्यापुढें हा असला कृत्रिम भेदभाव चालावयाचा नाहीं. तो आपल्या देशाच्या कल्याणास सर्वपरि घातक आहे." स्वतः नारायणरावांची सामाजिक सुधारणेची जरी ही अशी दृष्टी होती तरी सुधारणेस जे अनुकूल होते ते ह्या दृष्टीनें सामाजिक सुधारणेच्या प्रश्नाकडे पहात नसत. ते म्हणत कीं, तुम्हांला आपल्या पूर्व संस्कृतीसंबंधानें केवळ अभिमान असून उपयोगाचें नाहीं. तर तुम्ही जें कांहीं करणार तें शास्त्रसंमत तर असलेंच पाहिजे, पण तें सर्व धर्मगुरूंच्या अनुमतीनेंही झालें पाहिजे. ज्यावेळीं हे प्रश्न समाजापुढें होते त्यावेळीं लोकांच्या विचारांची जी स्थिति होती ती लक्षांत घेऊन नारायणरावांनीं ह्या दोन्ही प्रश्नांची वाट कशी लावली त्याची माहिती मोठी बोधपर आहे. आमच्या मनावर धर्माचा दृढ परिणाम झालेला आहे व आमच्या सर्व व्यवहाराची रचना धर्मशास्त्रावर आधारलेली आहे. म्हणून नवीन विचार अगर आचार जर प्रचारांत आणावयाचे तर त्यांना शास्त्राधार असावा असें जर त्यावेळच्या लोकांना वाटलें तर त्यावेळच्या विचाराच्या दृष्टीनें त्यांत फारसें कांहीं वावगें नव्हतें. सुधारणा हवी, पण ती धर्मशास्त्रास विहित असावी. म्हणून अशा लोकांच्या समाधानार्थ नारायणरावांनीं असें सांगितलें कीं, शास्त्रांची सर्व बाबतींत एकवाक्यता नाहीं व शास्त्रांनींच वाट दाखवून दिली आहे कीं, रूढी शास्त्रांना मागें टाकूं शकते.[2] हिंदुसमाजाचा इतिहास हें कंठरवानें सांगत

१. ह्याच दृष्टीनें त्यांनीं परमहंस मंडळीवर टीका केली आहे.

२. (a) But Shastras themselves are not agreed on many points.

आहे कीं, शास्त्राच्या आज्ञा मागें सारून नवीन रूढी प्रचारांत येऊं शकतात म्हणजे प्रत्येक नव्या रूढीनें अशा रीतीनें शास्त्राला मागें सारिलें. खरें पाहिलें असतांना शास्त्रांनीं आम्हांला पुष्कळ स्वातंत्र्य दिलें आहे. आणि हीच गोष्ट आपण लोकांना पटवून दिली पाहिजे. शास्त्रांचा इतिहास म्हणजे आपल्या एकंदर समाजामध्यें नित्य फेरफार कसे होत गेले त्यांचा इतिहास होय.[१] म्हणून त्यांनीं एकदां विचारिलें, कोणतीही रूढी पूर्वी योग्य ठरली, लोकांस ती त्यावेळीं पटली, म्हणून ती आतांच्या लोकांनाही योग्य वाटलीच पाहिजे काय ? वीस वर्षांपूर्वी केलेला अंगरखा तीस वर्षांचें वय असतांना आजही तो बरोबर झाला पाहिजे असें म्हणण्यासारखें हें आहे. पूर्ण विचार केल्यावांचून कोणतीही जुनी रूढी अगर शास्त्र आम्हांस झुगारून द्यावयाचें नाहीं. पण केवळ रूढी अमुक आहे, किंवा शास्त्रांत अमुक वचन आहे, म्हणून थबकून बसावयाचें, म्हणजे प्रगतीचा मार्ग बंद करण्यासारखें आहे.

आतां धर्मगुरूस मान्य होणाऱ्या सुधारणा अंमलांत आणाव्या असें म्हटलें तरी प्रगतीचा मार्ग खुंटण्यास मदत केल्यासारखेंच होणार आहे. ह्याच्या स्पष्टीकरणार्थ नारायणरावांच्याच चरित्रांतील प्रसंग घेणें बरें. नारायणराव १८८५ सालीं विलायतेस गेले व त्याच वर्षाच्या अखेरीस ते परत आले हें आपल्याला माहीत आहे. त्यांच्या ज्ञातींतील परदेशगमन करणारे तेच पहिले गृहस्थ होत. ते गेले त्यावेळीं थोडी कुजबूज झाली, एवढेंच. पण परत आल्यानंतर त्यांच्या ज्ञातीच्या लोकांनीं कांहींही गिल्ला[२] केला नाहीं. ज्ञातीच्या लोकांनीं कांहीं चळवळ केली नाहीं, सभा भरून ते जातिबहिष्कृत समजावे असे ठराव झाले नाहींत. ते आपल्या कुटुंबांत येऊन मिसळले व ते विलायतेस गेले व परत आले हें जणूं काय आपल्याला माहीतच नाहीं असें स्वामींनीं दाखविलें. खरें पहातां त्यावेळीं

---

(b) Custom or usage can supersede the injunctions of the Shastras.

१. Every custom makes the begining of such departure ; if the Shastras themselves say we can make new customs, I do not see why the social reformer should restrict himself to the Shastras alone.

२. When I visited England sixteen years ago (1885), of course there was an agitation about my doing so. But nothing was done and I was received by my caste and in my family I was treated as if I had never violated any of the rules of the caste ! for ten years nothing was done.

प्रायश्चित्ताचा प्रश्नच पुढें आला नाहीं व चांगलीं दहा वर्षें जातींतील कुटुंबांशीं सर्व व्यवहार झाल्यानंतर दुसरे दोन तरुण ज्यावेळीं विलायतेस गेले, त्यावेळीं विलायतेस जाण्याचा वणवा आतां पेटणार असें पाहून सभा झाल्या, निरनिराळे विचार सभेपुढें आले व नारायणरावांस बहिष्कृत केलें गेलें आणि दहा वर्षांत त्यांच्याशीं ज्यांचा संबंध आला त्यांना अल्प प्रायश्चित्त देऊन त्यांच्यावर निर्दोषी-पणाचा छाप मारला गेला! धर्मगुरू ही पुरातन संस्थाच नष्ट व्हावी असें कांहीं नारायणरावांना वाटत नव्हतें. पूर्वकालीं धर्मगुरूंनीं पुष्कळ उपयुक्त कार्य केलें आहे असेंच त्यांचें मत होतें,[१] पण, पूर्वी स्वामी आपल्या स्वतःच्या इच्छेनुसार आज्ञा सोडीत, पण आतां ते आपल्या कांहीं अनुयायांच्या विचारानें वागूं लागले आहेत. ह्याचा अर्थ इतकाच कीं, धर्मगुरू ही संस्था आतां पूर्वीप्रमाणें सर्व-सत्ताधारी राहिलेली नाहीं. केवळ परदेशगमनाचा विचार केला तरी धर्मगुरू व त्यांचे अनुयायी म्हणविणारे जे कोणी असतील त्यांनीं असा विचार केला पाहिजे कीं, इंग्लंड व हिंदुस्थान यांचे संबंध आतां इतके निकट झाले आहेत कीं, लोकांची, जातींची, स्वामींची इच्छा असो अगर नसो, तरुण पिढींतले लोक परदेशगमन करणार. जाती, रूढी, धर्मगुरू यांनीं एक होऊन कितीही दंगल माजविली तरी परदेशगमनास कोणासही आळा घालतां येणार नाहीं. हें जाणून धर्मगुरूंनीं आतां काळवेळ पाहून वागलें पाहिजे.[२] आज कित्येक जातींत परदेशगमनाच्या बाबतींत कांहीं गडबड होत नाहीं व परत आल्यावर पूर्ववत् सर्व व्यवहार सुरू होतात. पण, कांहीं लोकांना असें वाटतें कीं, प्रायश्चित्तावांचून कोणालाही जातींत घेऊं नये व कोणी तर इतके मागें आहेत कीं, परदेशगमन हें सर्वथैव निषिद्ध, तें करणारा पतित, त्यास प्रायश्चित्त देऊनही तो शुद्ध होत नाहीं! आतां परदेशगमन केल्यानें आपण पापकृत्य केलें असें ज्यांस प्रामाणिकपणें वाटत असतें व प्रायश्चित्त घेत-ल्यानें त्या पापाचें क्षालन होईल, असेंही ज्यांस मनःपूर्वक वाटतें त्यांनीं खुशाल प्रायश्चित्त घेऊन पावन व्हावें! परंतु ज्याला परदेशगमन हें पाप आहे असें वाटत नाहीं, प्रायश्चित्तावर ज्याचा विश्वास नाहीं, एवढेंच नव्हे, तर संधि आली तर पुन्हांही परदेशगमनास जो सिद्ध होईल, त्याला तूं प्रायश्चित्त घे असा आग्रह करणें

---

१. The institution of gurus is a holy and venerable institution which I have no doubt has done much good in the past.

२. The only condition of their survival and continuance is adapting themselves to new wants. This institution of gurus can only survive subject to that condition.

म्हणजे तूं ढोंगी हो असें सांगणें नव्हे काय ?[१]

ज्यावेळीं नारायणरावांच्या जातींत त्यांना प्रायश्चित्त देण्याची चळवळ १८९५ सालीं चालली होती, त्यावेळीं नारायणरावांस त्यांचे कांहीं हितचिंतक मित्र प्रायश्चित्त घेऊन मोकळें होण्याचा आग्रह करीत होते! त्यावेळीं "मला जें योग्य वाटलें तें मीं केलें, माझ्या हातून कोणतीही गैर गोष्ट झाली असें मला वाटत नाहीं तर मी प्रायश्चित्त काय म्हणून घ्यावयाचें ?" असा जबाब नारायणराव ह्या आपल्या मित्रांस देत असत. त्यावर ह्या मित्रांचें असें म्हणणें पडे कीं, "तुम्हीच एवढें हट्टास कां पेटावें ? रानडे, तेलंग हे तुमच्यापेक्षां थोर होत हें तुम्हांला मान्य आहेच, तुम्ही त्यांचे अनुयायी, मग त्यांच्याप्रमाणेंच वागावयास तुम्हांला काय हरकत असावी ?" रानड्यांनीं प्रायश्चित्त घेतलें व तेलंगांनीं आपल्या इच्छेविरुद्ध मुलीचें लग्न लहान वयांत केलें. ह्यावर नारायणरावांनीं स्पष्ट उत्तर दिलें कीं, ह्याचा अर्थ असा कीं, थोरांचें जें चुकीचें वर्तन असेल, अगर त्यांचा जो दुबळेपणा असेल, त्याचेंही आपण अनुकरण करावें, असें तुमचें म्हणणें. तुमच्या तत्त्वाचा जर स्वीकार केला, तर ह्या सुधारणा केव्हांच व्हावयास नको![२] अशावेळीं आपण आपला विवेक, आपल्या मनाची सांगी, बाजूला ठेवून, लोकांना जें प्रिय तें करावें असाही जेव्हां त्यांना उपदेश झाला, तेव्हां त्यांनीं त्यावेळीं नुक्तेंच घडलेलें एक उदाहरण आपल्या एक मित्राच्या पत्राच्या उत्तरांत नमूद केलें. ते म्हणतात, "लॉर्ड ह्यारिस ह्यांचे चहाते व मित्र ह्यांची जी सभा झाली तींत त्या लोकांचे विचार व हेतु मान्य नसूनही, व त्यांची स्मारकाची चळवळ पसंत नसतांना न्या. मू. रानडे हजर राहिले. मला सभेचा हेतु मान्य नव्हता म्हणून मी ह्या चळवळींत सामील झालों नाहीं व सभेला हजरही राहिलों नाहीं. पण तुमच्या विचाराप्रमाणें माझें हें वर्तन गैर झालें! आपल्या सदसद्विवेकबुद्धीला जें योग्य वाटतें त्याप्रमाणें आपण आचरण करावयाचें नसतें तर

---

१. Of what use is a *prayaschitta,* if instead of leading to sincere penitence and preventing the commission, it only becomes a promoter and abetter of sin?...Prayaschitta has already become a license, so to say, for many a sin and many a flagrant departure from the path of virtue.

२. You cite the example of Justice Ranade and Justice Telang. Well, if your argument is sound, it follows we are to imitate even the weaknesses and lapses of great men! —*From a letter to Mr. Raghavendra Rao* (1895)

लोकांना काय आवडेल तें आपल्या विवेकाची सांगी गुंडाळून ठेवून आचरावयाचें असें तुमचें म्हणणें ! [१] ”

तेलंगांच्या संबंधानें नारायणरावांस फार आदर असे. त्यांच्या मृत्यूनंतर नारायणरावांनीं लिहिलेल्या तेलंगांच्या आठवणी, किंवा Telang as a student हा त्यांचा लेख वाचणारांस हें सहज कळून येण्यासारखें आहे. आपल्या विचारांप्रमाणें वागण्याचें धैर्य त्यांच्यांत नव्हतें, हें जरी खरें असलें, तरी तें त्यांचें वर्तन अनुकरणीय ठरत नाहीं; कारण, स्वतः तेलंगांमध्यें आपल्या दुबळेपणाची जागृति होती व एकदां ह्याच विषयावरील संभाषणांत त्यांना आपल्या कमकुवतपणाची आठवण होऊन त्यांनीं अश्रूही ढाळले ! एवढेंच नव्हे तर ह्या बाबतींत आपलें कोणी अनुकरण करूं नये असेंच त्यांना वाटे व जे कोणी आपल्या विचारांस सामाजिक सुधारणेच्या बाबतींत कृतीचें स्वरूप देतात त्यांच्याविषयीं त्यांच्या ठिकाणीं उत्कट आदर असे, हें मुलीच्या पुनर्विवाहानंतर शेणव्यांच्या ठाकुरद्वारीं डॉ. भांडारकरांवर बहिष्कार घालण्यासाठीं भरलेल्या सभेंत नारायणरावांशीं वाटाघाट करून त्यांनीं पुढाकार घेतला ह्यावरून सिद्ध होतें. [२]

खरें पाहतां “आज जी प्रायश्चित्ताची रिकामी उठाठेव चालू आहे तिजकडे मी पूर्ण दुर्लक्ष केलें पाहिजे.” कारण, “मी दहा वर्षांपूर्वी धर्मबाह्य वर्तन केलें म्हणून ही चळवळ झालेली नसून, कांहीं मंडळींनीं आपल्या स्वार्थासाठीं दहा वर्षांनंतर ती सुरू केली आहे म्हणून तिजकडे मी पूर्ण दुर्लक्ष [३] करावें असें डॉ. भांडारकरांचें म्हणणें

---

१. We are not, according to your reasoning, to do what our conscience tells is good but what people tell us to do, even if we in our heart of hearts dislike it. —*From a letter to a friend.*

२. As to Mr. Justice Telang it is wronging his memory to say that his example in the matter of his want of moral courage should be imitated, for he himself had to confess his weakness and praise those who showed moral courage. He even wept for his weakness. It was he, who, in consultation with me, arranged to blow up by exposure the men who worked to excommunicate Dr. Bhandarkar and yet we are to follow his example which he himself disliked ! I am afraid human progress and improvement would suffer if your principles were accepted.

—*From a letter to Mr. Raghavendra Rao.*

३. The very fact that the question of excommunication has been raised years after the event shows that orthodox scru-

आहे तेंच योग्य आहे" असें त्यांनीं आपल्या धाकट्या मामांस जरी कळविलें होतें, तरी प्रायश्चित्तवाल्यांच्या गोटांत असलेले, पण नारायणरावांविषयीं खरा आदर असलेले कांहीं मित्र त्यांना त्यांची चूक दाखविण्याचा प्रयत्न करीत होतेच ! त्यांनीं आतां आणखी निराळ्या रीतीनें नारायणरावांवर आपली छाप बसविण्याचा प्रयत्न केला. आपल्या मतांनुसार वर्तणें हेंच माझें कर्तव्य आहे, असा नारायण-रावांच्या एका पत्राचा रोंख पाहून, "ह्या नीतिधैर्याच्या वगैरे सर्व गप्पा आहेत, आणि जे लोक बोलल्याप्रमाणें आपण आचरण करीत आहों असें दाखवीत असतात, तो त्यांचा सर्व अभिमानाचा, अहंतेचा बडेजाव असतो ! लोक सुधार-कांना जिकडे तिकडे नांवें ठेवीत आहेत. सुधारक म्हणजे केवळ बोलघेवडे, त्यांच्या हातून कृति होण्याच्या नांवानें पूज्य, म्हणून आपण कांहींतरी करून दाख-वावयाचें व आपण त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ आहोंत असा दिमाख दाखवावयाचा ही एक महत्त्वाकांक्षा" असें लिहून अप्रत्यक्षपणें नारायणराव वरील वर्गांत मोडतात असें ह्या मित्रांनीं सुचविलें ! आपल्या मित्रांचे विचार आतां वरील दिशेनें सुरू झाले हें पाहून नारायणरावांस सखेद आश्चर्य वाटलें,[१] पण त्यांनीं वरील विचार शांतपणें खोडून काढले. त्यांनीं म्हटलें कीं "समजा, जे सुधारक आपल्या विचाराप्रमाणें आचरण करितात, त्यांच्या आचरणाच्या मुळाशीं अहंता असली, तर त्यांत काय बिघडलें? त्यायोगें ते दुष्ट लोक आहेत व त्यांचें वर्तन गैर आहे असें ठरतें काय? चांगलें कार्य करीत असतांना अहंतेची भावना असली, तरी कार्याच्या सातत्यामुळें ती अहंता मागें पडते व कार्याचें महत्त्वच अधिक पुढें येतें.[२] लोक दोन्ही

---

ples are not at the bottom of the movement. Earnest orthodox scruples deserve respect, though one who has no such scruples ought not to yield to them against his conscience ; but in the present case, however, there can be no such scruples and consequently the agitation must be treated with contempt. —*Quoted by Narayanrao in his letter to his uncle at Karwar, 1-7-1895.*

१. The argument you have urged in your last letter is surprising to me so far that I did not expect or even dream that you would have allowed your cultured intelligence to be swayed by it. —*March 7th 1895.*

२. "Vanity may be the motive, but it is not a corrupt motive. Rather it ceases even to be a weakness if it impels a man to follow a righteous course to lead the van of reform."

बाजूंनीं बोलावयास तयार असतात. बोलल्याप्रमाणें कृति केली नाहीं तर सुधारकांवर नेहमींच भेकडपणाचा आरोप येतो, आणि बोलाप्रमाणें कृति केली, तर ह्याला लोकांची पर्वा नाहीं, ह्याला आपण मोठे कर्ते सुधारक असें म्हणवून घेण्याची महत्त्वाकांक्षा आहे, बाकीच्या लोकांना मागें ठेवून आपण पुढें जाणारा, असा अभिमान ह्याला झाला आहे, अशीही टीका आहेच! ग्लॅडस्टन, कॉब्डन, राममोहन, केशवचंद्र सेन ह्यांच्यासारख्यांवर वरच्यासारखी टीका झाली आहे, आणि लोकांनीं त्यांना मोठे महत्त्वाकांक्षी म्हणून त्यांचें महत्त्व कमी करण्याचा जेथें प्रयत्न झाला आहे, तेथें माझ्यासारख्यांचें उदाहरण काय जमेंत धरावयाचें? परंतु घटकाभर माझ्या आचरणाच्या मुळाशीं अहंतेची भावना आहे असें मान्य केलें, तरी त्याच्यायोगें माझ्या वर्तनाची योग्यता कशी कमी होते?[१] दुसरी गोष्ट अशी कीं, आपल्या सभोंवारचे लोक आपणास प्रतिकूल आहेत असें पाहूनही, व त्यांच्या विचारांप्रमाणें न चालल्यानें नानाप्रकारचे लोकच्छल उघडपणें व प्रच्छन्न रीतीनें आपणास सहन करावे लागतील ह्याची जाणीव असतांना, पूर्ण विचारानंतर ठरलेल्या मतांनुसार वागणारा इसम बढाईखोर कसा? त्याला जो फायदा होणार असेल त्यामानानें त्याचा त्याग अधिक तीव्र असतो.[२] तो बिकट परिस्थितीला तोंड द्यावयास सिद्ध होतो.

खरें पहातां लोकछंदानुवर्ती झाल्यास अशा लोकांकडे लोकनेतृत्व सहज येणें शक्य असतें; सवंग लोकप्रीतीचें वाण सहज त्यांच्या पदरांत पडणें सुलभ असतें, त्या सर्वांचा बोलण्याप्रमाणें कृती करणारे त्याग करतात, आणि खरा प्रकार असा असून ते म्हणे महत्त्वाकांक्षी आणि अहंपिशाच्चानें घेरलेले! वास्तविकपणें, जे लोक आपल्याला लोकांनीं चांगलें म्हणावें, धर्मनिष्ठांमध्यें व कर्मठांमध्यें आपली गणना व्हावी म्हणून आपले स्वतःचे विचार, आपलें ज्ञान, आपलीं मतें एके बाजूस गुंडाळून ठेवून, बहुजन समाजाला जें प्रिय तें आपल्याला प्रिय असें लटकेंच दाखवितात, व लोकांकडून धन्यवाद प्राप्त करून घेतात, ते मोठे महत्त्वाकांक्षी असतात, त्यांना लोकपुढारी म्हणवून घेण्याची हांव असते, म्हणून ते आपलीं खरीं मतें बाजूस ठेवून, बहुजनाला जें हवें आहे तें करावयास तयार होतात व सत्य असत्य, धर्म अधर्म ह्यांचा कांहीं विचार करीत नाहींत. असल्या

---

१. " The fact that I am led by vanity in acting up to my professed principles, supposing it to be a fact, cannot detract from the value of my conduct. "

२. The sacrifice is greater than the advantage from the purely worldly point of view.

ढोंगीपणापेक्षां बोलल्याप्रमाणें कृति करणारे व त्यांची अहंता हजारपटीनें बरी ![1]"

नारायणरावांच्या परदेशगमनामुळें उत्पन्न झालेलें प्रायश्चित्त-प्रकरण येथेंच थांबल्यासारखें झालें. स्वतः नारायणरावांनीं प्रायश्चित्ताचा विचार आपल्याला शिवूं दिला नाहीं. परंतु कांहीं लोकांनीं स्वामींच्या व आप्तांच्या समजुतींसाठीं प्रायश्चित्त घेतलें असें म्हणतात. ज्यांनीं प्रायश्चित्त घेतलें व ज्यांनीं घेतलें नाहीं त्यांचे परस्परांतील व्यवहार बंद झाले नाहींत, हें माहीत असूनही १८९९ सालीं नारायणरावांची कन्या सुंदराबाई ह्यांचा श्री. दत्तात्रय नारायण सिरूर ह्यांच्याशीं जो विवाह झाला, त्यांत ज्यांनीं भाग घेतला त्या सर्वांना बहिष्कृत करण्याचा प्रसंग ज्ञातीच्या स्वामींवर पुन्हा एकदां आला! ह्या नंतर जातींतील कांहीं पुढारी एकत्र जमून त्यांनीं ठराव करून स्वामींना विनविलें कीं, त्यांनीं मागें विलायतेहून जाऊन आलेल्या लोकांसंबंधानें जो ठराव केला आहे त्याचा पुन्हा विचार करावा. असा ठराव त्यांच्याकडे जातांच, स्वामी एकदम रागावले व ह्या सभेंत हजर असणारांचीं नांवें कळवावीं असा हुकूम सुटला! तीं नांवें कळविण्याची तसदी कोणी घेतली नाहीं. म्हणून स्वामींनीं वरील विवाहांत भाग घेणारांशीं इतर कोणीही संबंध ठेवूं नये असें फर्मान काढलें! तेंही फर्मान दप्तरीं राहिल्यासारखें झालें! कारण, नारायणरावांच्या हयातींत व नंतर त्यांच्या कुटुंबांत जीं कार्यें झालीं त्यावेळीं जातींतील कुटुंबांनीं त्यांच्याशीं व्यवहार मुद्दाम ठेविला नाहीं असा अनुभव आला नाहीं. ज्ञातींतील उपाध्यायांची त्यांना जरूर भासली नाहीं; कारण सर्व कार्यें प्रार्थनासमाजास मान्य असलेल्या तत्त्वांनुसार झालीं. अशाप्रकारें त्यांच्या ज्ञातींत स्वामींचीं फर्मानें लोकांनीं निर्जीव करून टाकलीं. ह्यासंबंधानें त्यावेळीं इंडिअन सोशल रिफार्मर पत्रानें लिहिलेल्या लेखांत पुढील मजकूर आहेः—

Inspite of the fulmination of this great Shankaracharya, inter-dining between the sinners and the saved goes on, we understand to an extent which causes very little inconvenience to the former, especially in the larger towns.

## लोकसंग्रह, शास्त्राधार व शास्त्रीपंडित

आतां शास्त्रीपंडित अशा लोकांचें सहाय्य घेऊन, शास्त्राधाराच्या जोरावर लोकमत सामाजिक सुधारणेस अनुकूल करून घ्यावें असें म्हणणारा जो एक पक्ष महाराष्ट्रांत होता त्याची वाट काय लागली तें नारायणरावांनीं दाखवून दिलें आहे. सुधारणा घडवून आणण्याचे जे अनेक मार्ग पूर्वीच्या काळीं सुचविले जात त्यांत

१. Vanity is preferable thousand times to hypocrisy.

शास्त्रांच्या आधारें सुधारणा घडवून आणणें हा एक मार्ग होता. अर्थात् शास्त्रांचा विचार करतां अमुक सुधारणा इष्ट आहे असें प्रत्यक्ष शास्त्रीमंडळ अगर ज्यांच्याविषयीं आदर आहे असे शास्त्री प्रतिपादूं लागले, तर त्याचा जनतेवर इष्ट परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं, असें पूर्वी वाटत असे व ह्याच हेतूनें न्या. मू. रानडे ह्यांनीं विधवाविवाहाच्या प्रश्नास शास्त्राधार आहेत हें दाखवून विधवाविवाहास अनुकूल मत करण्याचा प्रयत्न केलेला पुष्कळांस माहित असेलच. असो; रावसाहेब मंडलीक हे त्यांच्या काळीं जुन्या लोकांचे पुढारी म्हणून समजले जात. परंतु खरें पहातां ते जुन्या आचारविचारांचे अंध भक्त नव्हते. धर्मनिष्ठ, सत्यनिष्ठ व करारी बाण्याच्या ह्या थोर गृहस्थांसंबंधानें नारायणरावांच्या ठिकाणीं अत्यंत आदर असे. लेंच्यापेंच्या अनेक सुधारकांपेक्षां रावसाहेबांसारखा एक विरोधक पुरवला असें ते म्हणत. कारण, रावसाहेबांस जें असत्य, अन्याय्य व अधर्म्य वाटलें, त्याचा त्यांनीं कसून विरोध केला. मग त्यामुळें जुन्या विचारांच्या लोकांचीं मनें दुखवतील हा विचार त्यांस त्यावेळीं शिवला नाहीं. करसनदास मुळजी ह्यांनीं जेव्हां वैष्णव महाराजांचीं कृष्णकृत्यें चवाठ्यावर आणिलीं व त्यामुळें त्यांच्यावर महाराजांनीं खटले भरले, त्यावेळीं रावसाहेब मंडलिकांनीं शेट करसनदास ह्यांना मनःपूर्वक सहाय्य केलें व जुन्या विचारांच्या लोकांचीं मनें दुखविलीं. तसेंच मुंबईंत मुलींच्या शिक्षणासाठीं शाळा स्थापण्याच्या कामीं मंडलिकांनीं पुढाकार घेतला होता. तथापि शास्त्रीपंडितांच्या सहाय्यानें सुधारणा प्रचारांत आणावी असें त्यांचें मत होतें. त्यामुळेंच १८८६ सालीं ज्यावेळीं "बालविवाह" व "असंमत वैधव्य" ह्या विषयासंबंधानें प्रसिद्ध शेट मलबारी ह्यांनीं अनेक लेख लिहून व व्याख्यानें देऊन मोठी चळवळ केली, सगळा हिंदुस्थान हालवून सोडला, पुष्कळांचीं मतें मिळवून त्यांचा प्रसार केला, व अखेरीस Infant Marriage व Enforced widowhood हीं कायद्यांनीं बंद व्हावींत असें व्हाइसरायसाहेबांस सुचविलें; त्यावेळीं ह्या चळवळीविरुद्ध प्रचंड विरोधक चळवळ झाली व रावसाहेब मंडलिकांनीं विरोधक चळवळीचा पुढाकार आपल्याकडे घेतला. येथील माधवबागेंत सामाजिक सुधारणेच्या बाबतींत सरकारचें सहाय्य घ्यावें किंवा घेऊं नये याचा विचार करण्यासाठीं त्यावेळपर्यंत झाली नव्हती इतकी मोठी सभा झाली, तींत निरनिराळ्या जातींचे हजारों लोक हजर होते. ही सार्वजनिक सभा असल्यामुळें ना. काशिनाथपंत तेलंग, गोकुळदास कहानदास पारख, वामन आबाजी मोडक, नारायणराव चंदावरकर ह्यांच्यासारखे सुधारक व कांहीं सुधारणा कायद्याच्या सहाय्यानें होणें अगत्याचें आहे असें म्हणणारे लोकही सभेस त्यावेळीं आपला पक्ष लोकांपुढें मांडण्यासाठीं हजर होते. ह्या सभेला नारायणरावांनीं

"The noisy farce at Madhav Bag असें म्हटलें आहे. ह्याचें कारण असें होतें कीं, अध्यक्षांस सभेचें नियंत्रण करतां आलें नाहीं. अनुकूल अगर प्रतिकूल ठरावावर मतें घेणें किंवा मोजणें अशक्य असूनही अध्यक्षांनीं बेलाशक उपसूचना नापास व सरकारनें सामाजिक बाबतींत ढवळाढवळ करूं नये ही सूचना पास झाली असा निकाल देऊन टाकला! ह्या सभेशीं वस्तुतः आपल्याला कांहीं करावयाचें नाहीं, परंतु लोकांना बरोबर घेऊन, अगर समाजानें आपली सुधारणा आपणच करावी, Reform from within, असें रावसाहेब मंडलिकांचा पक्ष म्हणत असे; म्हणून सभेच्या दिवशीं तेलंगांनीं आपली उपसूचना पुढें आणण्यापूर्वी असें म्हटलें कीं, सरकारनें आमच्या सामाजिक बाबतींत ढवळाढवळ करूं नये किंवा कायदा करूं नये, असें सरकारला जर सांगावयाचें तर प्रथम आमच्या सामाजिक व्यवस्थेंत कांहीं व्यंगें आहेत हें खुल्या दिलानें मान्य करून तीं व्यंगें दूर करण्याची जबाबदारी आमची आहे हें आम्ही जाणत आहों असें ह्या सभेनें सरकारला सांगितलें पाहिजे.[1] म्हणून त्यांनीं तशा अर्थाची उपसूचना केली, तीस अनुमोदन देण्यासाठीं गोकुळदास पारख उठले, पण त्यांस बोलूं न देतां तेलंगांविरुद्ध भाषण करण्यासाठीं डॉ. कीर्तिकरांना स्वतः अध्यक्षांनीं बोलाविलें! सारांश, सरकारनें सामाजिक बाबतींत हात घालूं नये ही मूळ सूचना कांहींतरी उपाययोजना करून पास झाली असें जाहीर करावयाचें होतें, म्हणून सभेचा फार्स करण्यांत आला एवढेंच. ह्यावेळीं रावसाहेब मंडलिकांना लोकांना बरोबर घेऊन सुधारणा घडवून आणण्याची आशा व्यर्थ आहे हें ज्याप्रमाणें कळून आलें त्याचप्रमाणें शास्त्री व पंडित ह्यांच्यामागें लागून अनिष्ट रूढी नष्ट करण्याची आशा करणें व्यर्थ आहे हेंही त्यांस स्वानुभवानें कळून आलें. माधवबागेच्या सभेंत तेलंगांची अगदीं सरळ उपसूचना पटली नाहीं. आमच्या सामाजिक व्यवस्थेंत व्यंगें आहेत, तीं आमचीं आम्ही दूर करण्याचा प्रयत्न करूं असें आश्वासन द्यावयास जे तयार नाहींत ते लोक Reform from within कसली घडवून आणणार? पण, त्यावेळीं मंडलिकांनीं जाहीर रीतीनें हें तत्त्व जरी मान्य केलें नाहीं तरी पुढें आम्ही स्वामी आणि गुरु, शास्त्री व पंडित ह्यांच्या सहाय्यानें सुधारणा घडवून आणूं असें मंडलिक पक्ष म्हणूं लागला; पण असें म्हणणें म्हणजे सुधारणेची आवश्यकता

---

१. Mr. Telang pointed out the necessity of acknowledging that there were some evils arising from our marriage customs and of recognising the responsibility of the community of curing them.

कबूल करणें होय, असें नारायणरावांनीं दाखविलें आहे.[1] इतकें झाल्यानंतर वरील मंत्र लागू करून एक सुधारणा घडवून आणण्याचा योग लवकरच आला! एक सुशिक्षित ब्राम्हण गृहस्थ आपलें शिक्षण संपवून परत स्वदेशीं आले.[2] शास्त्रीपंडितांच्या सहाय्यानें ह्या तरुणास लहानसें प्रायश्चित्त देऊन पावन करून जातींत घ्यावयाच्या चळवळीचा पुढाकार मंडलिकांनीं घेतला. परदेशगमन हें पाप जर नव्हे, व परदेशगमन केल्यानें पाप होत नाहीं, असें जर आपल्याला वाटतें, तर जें पाप नाहीं तें केल्याबद्दल प्रायश्चित घेणें हा अविचार होय असें नारायणरावांचें स्वतःचें मत असल्यामुळें त्यांनीं स्वतः प्रायश्चित्त घेतलें नाहीं हें आपण जाणत आहों.[3] पण, जुन्या विचारांच्या रावसाहेबांनीं शास्त्रीपंडितांच्या सहाय्यानें प्रायश्चित्त[4] देऊन परदेशगमन करून परत आलेल्या ब्राम्हण युवकास पावन करून घेण्याच्या चळवळीचा पुढाकार घेतला हें पाहून सुधारकांस आनंद झाला.[5] मंडलिकांनीं कित्येक शास्त्र्यांना आपल्या येथें बोलाविलें व त्यांना आपला विचार कळविला. त्यांपैकीं कित्येकांना धर्मावर हें मोठेंच संकट आलें आहे असें वाटलें व त्यांनीं मंडलिकांच्या विचारा-प्रमाणें वागण्याचें साफ नाकारलें! ह्या शास्त्रीमंडळींत भीमाचार्य झळकीकर हे होते. त्यावेळीं शास्त्रीबुवा एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें शास्त्री होते व त्यांना रावसाहेब

---

१. It ( Mandlik and his party) had admitted that reform was necessary and it had proclaimed that the only way of promoting the cause was to move on by winning Gurus and Shastris over to its side.

२. हे गृहस्थ म्हणजे श्री. रावजी भवानराव पावगी असावेत.

३. My objection to प्रायश्चित्त in the case of England-returned men is that I do not consider a trip .to England is sinful....

४. परदेशगमनास प्रायश्चित्त शास्त्रांत सांपडणें शक्य नाहीं. कारण आमच्या शास्त्रांना इंग्लंडची कांहीं कल्पना नव्हती. समुद्र ओलांडणें हें पाप आहे व त्यास प्रायश्चित्त नाहीं असें शास्त्रांत म्हटलें आहे असें १८९६ सालीं नारायणरावांनीं म्हटलें आहे.

५. The socalled reformers welcomed the prospect of a staunch upholder of orthodoxy who till then had been known to treat all notion of reform with contempt, taking the work of reform in his hands and showing them how to do it.

मंडलिकांसारखे कर्मनिष्ठ गृहस्थ आचारधर्मावर तुळशीपत्र ठेवावयास तयार झाले हें पाहून अत्यंत खेद झाला; कारण, रावसाहेबांनीं जो उपाय सुचविला त्यास कोठेंही शास्त्राधार नाहीं असें त्यांचें स्पष्ट मत होतें. झळकीकरांनीं स्वतः नारायणरावांना सांगितलें, "तुम्हां सुधारकांना विरोध करण्यांत अर्थ नाहीं आणि काळ आमच्या उलट आहे हें आम्ही जाणत आहों. वास्तविक पहातां, तुम्हीं आम्हांला विचारण्याच्या फंदांत पडूं नये व आपल्याला जें योग्य वाटतें तें खुशाल आचरणांत आणावें ! आम्ही कांहीं तुम्हांला आडवे येणार नाहीं. पण, तुम्ही आमच्याकडे आलांत व तुम्हांला इष्ट वाटतो तसा शास्त्रार्थ आम्हीं करावा असें सुचवूं लागलांत, तर मात्र जें सत्य आहे तें निवेदन करणें व तुम्हांला विरोध करणें हेंच आमचें कर्तव्य होईल हें तुम्ही ध्यानांत ठेवा."[१] ठरलेल्या दिवशीं शास्त्री मंडळींनीं यावें व विलायतेहून आलेल्या तरुणास प्रायश्चित्त देऊन पावन करून घ्यावें व नंतर सर्व मंडळीचें ब्रह्मवृंदासह भोजन व्हावें असें ठरलें होतें. त्याप्रमाणें सर्व तयारी झाली, पण प्रायश्चित्त देण्याच्या वेळीं कोणी शास्त्री हजरच राहिले नाहींत ! रावसाहेब आले, त्यांनीं पानसुपारी घेतली, जे भटजी अनुकूल होते त्यांनीं प्रायश्चित्त दिलें, पण रावसाहेब भोजनासाठीं थांबले नाहींत, त्यांना आपला बेत फसला हें कळून चुकलें व त्यानंतर समाजाला बरोबर घेऊन शास्त्री व पंडित मंडळीच्या सहाय्यानें सामाजिक सुधारणा घडवून आणण्याचा प्रश्न रावसाहेबांनीं पुन्हां पुढें आणिला नाहीं ! खरें पहातां ह्यावेळीं हें सिद्ध झालें कीं, शास्त्री व पंडित आणि एकंदर जनता एकदम सुधारणेस अनुकूल होण्याची आशा व्यर्थ आहे. कोणीतरी जबाबदार पुढाऱ्यांनीं, ज्यांना सुधारणेचीं तत्त्वें पटलीं आहेत, विचारानुसार आचार झाला पाहिजे हें ज्यांना पटलें आहे, त्यांनीं पुढें होऊन आपल्या स्वतःच्या विचारांप्रमाणें आचरण करून दाखविलें पाहिजे. लोक ताबडतोब अशा आचरणाचें अनुकरण करणार नाहींत; परंतु अशीं उदाहरणें घडत गेलीं कीं त्यांचा जनतेवर इष्ट परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं. स्वामी, शास्त्री, पंडित ह्यांना पुरातन ध्येयानुसारच वागलें पाहिजे. लोकच त्यांच्या ध्येयांना पुसेनातसे झाले म्हणजे मग ते लोकांबरोबर येण्याचा प्रयत्न करण्यास सिद्ध

---

१. "We Shastris know the time is against us and it is no use opposing. You people should not consult us, but go your own way and do the thing you think right; we shall not come in your way. But if you ask us and want us to twist the *Shastras* to your purpose and go with you, we must speak truth plainly and we must oppose."

होतील.[१] म्हणून नारायणरावांनीं असें स्पष्ट सांगून ठेविलें आहे कीं, समाजांत[२] राहून सुधारणा घडवून आणावयाची (Reform from within) जर आहे, तर सर्वांनीं हात जोडून बसल्यानें ती व्हावयाची नाहीं. ज्यांना तत्त्वें पटलीं आहेत, त्यांनींच तीं आचरणांत आणून दाखविलीं पाहिजेत. यक्षिणीची कांडी फिरेल, कांहीं तरी चमत्कार होऊन लोकांचीं मनें पालटतील व मग आम्ही लोकोद्धार करावयास सिद्ध होऊं असें म्हणून सुधारणा व्हावयाची नाहीं. आधीं माणसें, व्यक्ति, मग एकंदर जनता (Not masses, but men first). म्हणून जर कोणी असें म्हणूं लागला कीं, थांबा, घाई करूं नका, सगळा समाज सिद्ध झाला म्हणजे मग सुधारणेचें पाहूं, तर अशानें जगाच्या अंतापर्यंत सुधारणेसाठीं कुचंबावें लागेल ![३] आणि खरोखरच जर असा कोणाचा विश्वास असला, तर तो आपली फसगत करून घेत आहे असें खुशाल समजावें, असें नारायणरावांनीं निक्षून सांगितलें आहे.

कांहीं मंडळींचें असें म्हणणें असतें कीं, सामाजिक सुधारणेसाठीं कोणी कांहींही विशेष प्रयत्न करावयाची आवश्यकता नाहीं. काळ सुधारणा घडवून आणील. हें तत्त्व नारायणरावांस मुळींच मान्य नव्हतें.[४] त्याचा खुलासा १९०० सालीं मंगलूर येथें दिलेल्या व्याख्यानांत त्यांनीं केला आहे. त्याच सुमारास मद्रासकडील कोणा प्रोफेसरानें प्रगति व्हावी पण ती कोणत्याही प्रकारचा त्रास अगर अडचण झाल्यावांचून व्हावी (Painless progress) असें सुचविलें होतें. नारायणरावांस हा विचार हास्यास्पद वाटला. Painless progress पेक्षां कांहींही श्रम न करितां परीक्षा पास होण्याचें पेटंट प्रोफेसर महाशयांनीं शोधून काढलें असतें तर विद्यार्थ्यांवर त्यांचे फार उपकार झाले असते असें त्यांनीं म्हटलें ! कारण त्यांच्या-मतें प्रोफेसर महाशयांनीं सुचविलेलें तत्त्वच मुळीं चुकीचें आहे. कांहीं खटपट,

---

१. Swamis and Shastris are wedded to old and worn out ideals...They will follow the new reform when they find that they must, or else there is no chance for them.

२. "Reform from within" is impossible so long as enlightened and educated individuals will sit still in the hope that something may turn up and that they will then help in the regeneration of their kind.

३. When men tell you to wait till the whole of Society moves, you may wait till doomsday.

४. Time is no agent; it is men and not time that are the moving springs of Society.

प्रयत्न केल्यावांचून, धैर्य दाखविल्यावांचून, कोणाचीं मनें दुखविल्यावांचून, त्याग केल्यावांचून, त्रास सहन केल्यावांचून म्हणे सुधारणा करा ! हें कधीं झालें आहे? मोठमोठीं कार्यें सहज होत नसतात. त्यांत धोका असतो, श्रम असतात, लोकनिंदेचें भय असतें, त्याग असतो, लोकच्छल असतो, तेव्हां अशीं कार्यें होतात. म्हणून त्यांनीं सांगितलें कीं, विरोधाच्या पोटीं प्रगति असते. ( All progress is through conflict. ) अडचणी येतात म्हणून तो मार्गच सोडावयाचा हा पळपुट्यांचा मार्ग त्यांना पसंत नव्हता. अडचणींना पाठ[1] द्यावयाची, त्यांच्याशीं झगडावयाचें, मार्ग शोधावयाचे, व कार्य करून दाखवावयाचें हा मार्ग त्यांना पसंत होता. कारण, सामाजिक सुधारणेचा प्रश्न विचारांत घ्यावयाचा म्हटलें कीं, जुने अहितकर आचार–विचार, ढोंगी वर्तन, दुराग्रह ह्यांचे जे पर्वत उभे आहेत ते जमीनदोस्त करावयाचे, आणि हें महत्कार्य श्रम, मेहनत, त्याग ह्यांवांचून कसें होणार ?[2]

सामाजिक सुधारणेच्या बाबतींत पुढाकार घेणारांवर असा आरोप नारायणरावांच्या काळीं घेतला जात असे कीं, ह्यांच्या ह्या सुधारणा राष्ट्रीय धोरणास ( National lines ) अनुसरून होत नाहींत, म्हणून त्या लोकांस पटत नाहींत. ह्या हरकती, न करत्याचा वार शनिवार, ह्या सदरांत येणाऱ्या असतात हें नारायणराव जाणून होते. म्हणून ते एकदां म्हणाले कीं, ह्या लोकांचें म्हणणें काय आहे, हेंच कळणें कठीण असतें. कारण, ह्या लोकांना साहेबी पोषाख केला तर तो चालतो, विलायती खाणेंपिणें चोरून केलें तर तें चालतें, अनेक विलायती आचारविचार उचलले तर ते चालतात, राष्ट्रीय सभा जी खरोखर पाश्चात्यांचेंच अनुकरण आहे ती चालते. एवढेंच नव्हे, तर त्याच धर्तीवर निरनिराळे जातीचे लोक सभा भरवूं लागले आहेत. हें जर सर्व चालतें व ह्याच्या योगें कोठें राष्ट्रीयत्वास बाध येत नाहीं, तर मग सामाजिक सुधारणेच्या बाबतींतच तेवढें कोठें बिघडतें ? आणि दुसरें असें कीं, जर एखादें ध्येय आपल्याला इष्ट व हितकर

---

१. Let us remember that difficulties have to be faced in some shape or another if we want progress and reform. And the saviours of Society are those who instead of fencing with social problems, or taking shelter in plausible phrases nerve themselves to action and set an example of doing deeds.

२. When you think of Social reform you have to face a Himalaya of superstition, corruption and bigotry, the removal of which can only be by labour which cannot be painless.

वाटत आहे, तर तें केवळ पाश्चात्य आहे, म्हणून आपण थबकावें काय म्हणून ?[१] खरें पहातां पाश्चात्य तत्त्वें व विचार ह्यांचा सर्व लोकांच्या आचारविचारांवर इतका परिणाम होत आला आहे कीं, कधीं कधीं पाश्चात्यांचीं तत्त्वें, विचार व सुधारणा ह्यांपासून दूर रहा असें सुचविणारेच पाश्चात्यांच्या तत्त्वानुसारें आपला उपदेश करीत असतात ! एका ब्राम्हण[२] गृहस्थांनीं **ब्राम्हणधर्माचें** रक्षण करा असा मोठ्या कळकळीचा उपदेश एका लहानशा पुस्तकांत केला आहे. आणि शेवटीं "सर्व जगावर जय मिळविला पण आत्मा गमावून बसलां, तर त्याचा काय उपयोग ?" ह्या बायबलांतील वाक्याच्याद्वारें त्यानें ब्राम्हणांस जागृत करण्याचा प्रयत्न केला ! ह्यावरूनही अगदीं जुन्या वळणाच्या विचारांच्या लोकांवर पाश्चात्य ध्येयें व विचार ह्यांचा नकळत कसा परिणाम होतो तें स्पष्ट दिसत आहे, मग सुधारकांनीं जाणूनबुजून कांहीं पाश्चात्य सामाजिक ध्येयें उचललीं तर त्यानें काय बिघडतें ?

नारायणराव इंदुप्रकाशपत्राचे संपादक असतांना पुण्यांतल्या हुजूरपागेंतलें मुलींचें हायस्कूल स्थापन झालें त्यावेळीं त्यांनीं स्त्रीशिक्षणावर प्रदर्शित केलेले विचार ह्यापूर्वीं येऊन गेलेच आहेत. त्यानंतर १८९६ सालीं मद्रास येथील हिंदु सोशल रिफार्म ॲसोसिएशनच्या विद्यमानें त्यांचें भाषण झालें, त्यांत त्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं, सामाजिक सुधारणेच्या यादींत स्त्रीशिक्षण ही पहिली बाब आहे. कारण, आमच्या मुली व कुटुंबांतील स्त्रिया ह्यांस शिक्षण देणें हें आम्ही आमचें पहिलें कर्तव्य समजतों.[३] स्त्रीशिक्षणास ते इतकें महत्त्व देत असत कीं, स्त्रीशिक्षणाचें कार्य आपल्या हातूनही व्हावें असें त्यांस वाटे व म्हणूनच सोसायटीच्या शाळेंत दर शनिवारीं ते मुलींना इंग्रजी शिकवीत व त्यायोगें त्यांस फार आनंद व समाधान प्राप्त होत असे. मुलींना अगर स्त्रियांना होतां होईल तों मातृभाषेंतूनच शिक्षण द्यावें व इंग्रजी दुसऱ्या भाषेप्रमाणें शिकवावें, पण तें अवश्य शिकवावें असें

---

१. And why should you be afraid of any ideal if it is good and suited to our needs merely because it appears Western ?

२. A Brahman wrote a pamphlet the other day calling upon his castemen to uphold Brahmanism, and how does he uphold it ? By a quotation from the Bible ! He wound up his appeal by telling his people " What shall a man gain if he gains the whole world but lose his soul ?" (1900.)

३. We say that it is our first duty to educate our daughters or other female wards.

ते म्हणत. शक्य असेल तेथें, व इच्छा असेल तर मुलींना पुरुषांच्या बरोबरीनें व त्यांना जें शिक्षण मिळतें तें स्त्रियांना द्यावयास हरकत नाहीं असें त्यांनीं पूर्वीच म्हटलें आहे. परंतु उच्च शिक्षण सर्वांस शक्य नसतें. म्हणून त्यांनीं असें निक्षून सांगितलें आहे कीं, आपल्या कुटुंबांतील सर्व व्यवस्था उत्तम रीतीनें ठेवण्याची पात्रता त्यांच्यांत आणणारें, त्यांस उत्तम गृहिणी करणारेंच शिक्षण तें असावें असें नव्हे, तर पुरुषांच्या सहकारी, मित्र होण्याची पात्रता आणणारें शिक्षण तें असावें.[१] पुष्कळसें शिक्षण मिळाल्यानें आमच्या स्त्रिया गृहकृत्यांत कुचकामी ठरतील असें नारायणरावांस वाटत नसे. त्या उत्तम गृहिणी आजही आहेतच, पण शिक्षणाच्या-द्वारें वाढती जबाबदारी ओळखण्याची पात्रता त्यांच्यांत आणावयाची आवश्यकता आहे असें ते प्रतिपादीत.

## विधवाविवाह

विधवाविवाहाच्या बाबतींत नारायणरावांनीं नेहेमीं पुढाकार घेतला. मुंबईस प्रेसिडेन्सी सोशल रिफार्म ॲसोशिएशन नामक जी संस्था आहे तिचे ते अखेर-पर्यंत अध्यक्ष होते. त्यांच्याच प्रोत्साहनानें भाजेकर वकिलांनीं 'वुइडो मॅरेज डे' पाळण्याची प्रथा पाडली व आज हिंदुस्थानांत पुष्कळ मोठमोठ्या शहरीं हा दिवस कमीअधिक उत्साहानें पाळला जात आहे. नारायणरावांनीं विधवाविवाह समा-जास मान्य व्हावा ह्या हेतूनें अनेक प्रकारें सहाय्य केलें आहे. शेट माधवदास रघुनाथदास ह्यांचा विवाह प्रेमकुवरबाईशीं झाल्यानंतर मुंबईच्या कपोल वाणी जातींत फारच खळबळ उडाली होती. त्यावेळीं नारायणरावांनीं त्या विवा-हाची साद्यंत हकीकत लिहून काढली व विधवाविवाहासंबंधानें लोकांचे गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न केला. इंदुप्रकाशाचे संपादक असतांना ह्या विषयासंबंधानें वारंवार लेख लिहून ते लोकांमध्यें जागृति उत्पन्न करीत असत. त्याचप्रमाणें व्याख्यानांच्या व संभाषणांच्या द्वारें पुनर्विवाहासंबंधानें अनुकूल मत करण्याचे त्यांचे प्रयत्न सतत चालू असत. माधवदासांनीं आपल्या घराच्या दिवाणखान्याला Widow Marriage Hall असें नांव दिलें होतें व मुंबईत होणारे सर्व पुन-र्विवाह ह्या हॉलमध्यें पूर्वी होत असत. अशा प्रत्येक प्रसंगीं नारायणराव हजर

---

१. I do not care whether you educate your women in the vernaculars or in English, provided the education they are given is one, which fits them to be the guardian angels of their homes, provided we enable them not only to be good house wives but also good companions of life.

असत व कोणतीही अडचण वगैरे आली तर सहाय्य करावयास ते नेहमीं सिद्ध असत. तथापि विधवा विवाहास शास्त्राधार आहे म्हणून तो प्रचारांत यावयास हरकत असूं नये अशी नारायणरावांची दृष्टि नव्हती. शास्त्राधार नसते तरी त्यांनीं विधवाविवाहाचा पुरस्कार केला असता. कारण, सत्य, न्याय, दया व पावित्र्य हा सर्व सामाजिक सुधारणेचा पाया आहे असें त्यांस वाटे. बालविधवांसंबंधानें मोठा अन्याय होत आहे, त्यांना हजारों कुटुंबांमध्यें आज अत्यंत क्रूरतेनें वाग-विलें जात आहे, त्यांचे हाल होत आहेत, म्हणून त्यांच्यावर होणारा अन्याय दूर करण्याच्या हेतूनें, त्यांची इच्छा असल्यास त्यांस विवाहाची परवानगी असावी असें त्यांचें म्हणणें असे. असें असल्यामुळें जेव्हां सुशिक्षित म्हणविणारे लोक अशा विवाहास विरोध करावयास प्रवृत्त होत तेव्हां त्यांचा क्रोध उचंबळून येत असे[1]! आणि १९०१ सालीं हा असा अनुभव ज्या ठिकाणीं पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांनीं विधवा विवाहाची चळवळ आपल्या पूज्य मातुःश्रीच्या आज्ञेनुसार पूर्ण विचार करून सुरू केली, जेथें पहिला विधवाविवाह त्यांनीं घडवून आणिला, ज्या शहरीं त्यांनीं पुष्कळ जागृति उत्पन्न करून लोकांमध्यें खळबळ उडवून दिली त्या कलकत्ता शहरीं सामाजिक परिषदेच्या बैठकींत त्यांना आला! न्या. मू. रानडे ह्यांच्या मृत्यूनंतर सामाजिक परिषदेची धुरा नारायणरावांनीं उचलली, आणि १९०१ सालीं राजा विनयकृष्ण ह्या एका मोठ्या जमिनदारांस परिषदेचें अध्यक्ष-पद देण्यांत आलें! हे गृहस्थ अगदीं जुन्या वळणांतले आहेत ह्याची नारायण-रावांस आगाऊच माहिती मिळाली होती. तथापि परदेशगमन करून आलेल्या लोकांस जातींत परत घ्यावें ह्या हेतूनें केलेल्या चळवळींत यांनीं पुढाकार घेत-ल्याचें नारायणरावांस अवगत होतें. त्यांचा कल उदार विचारांकडे होत आहे असें पाहून नारायणरावांनीं त्यांना अध्यक्ष होण्याची विनंति केली व ती त्यांनीं मान्यही केली! परंतु बालविधवांच्या विवाहास विरोध नसावा, अशा अर्थाचा ठराव पुढें येणार असें कळतांच बरीच खळबळ उडाली! अगदीं कर्ती माणसें नारायणरावांस सांगूं लागलीं कीं, हा ठराव येथें मान्य व्हावयाचा नाहीं, विधवा-विवाहास येथें पुष्कळ विरोध आहे, तर हा ठराव तुम्ही गाळाच! गेल्या वर्षी

१. Am I to be told when society sacrifices child widows, while permitting old men to marry, when caste tyrannises and breeds jealousies, when society conspires to make slaves of its mem bers in the name of religion and custom that I am to sit silent or say soft-things, lest by protesting against the evils I displease and give pain?

पंजाबांत ह्या ठरावाला विरोध झाला नाहीं, इतर ठिकाणीं विरोध होत नाहीं, मग ज्या ठिकाणीं पंडित ईश्वरचंद्र ह्यांनीं ही चळवळ सुरू केली, त्या बंगाल्यांत विरोधाच्या भीतीनें मी हा ठराव मागें घेणार नाहीं, असा स्पष्ट जबाब नारायणरावांनीं दिला. परंतु ठराव परिषदेपुढें आला तेव्हां प्रथम अध्यक्षांनीं आपलें अंग काढून घेतलें! "मी ह्या ठरावास अनुकूल नाहीं, व प्रतिकूलही नाहीं, मला तटस्थ राहूं द्या" असें त्यांनीं सुचविलें व ठरावास अनुकूल भाषणें होत असतां "ह्या ठरावास पुष्कळांचा विरोध आहे, विधवांनीं विवाह करावा असें आम्हांस वाटत नाहीं" असा ओरडा कित्येकांनीं केला! १८९६ सालीं ज्यावेळीं कलकत्त्यास परिषद भरली होती त्यावेळीं न्या. मू. रानडे ह्यांस ह्या बंगाली लोकांनीं असाच त्रास दिला होता व ह्यावेळीं अध्यक्षच जुन्या वळणांतले असल्यामुळें ह्या मंडळीला जोर येणार याची जाणीव नारायणरावांस होती. त्यांनीं ठराव तर पास करून घेतला; पण ज्या ठिकाणीं विधवाविवाहाच्या चळवळीस प्रारंभ झाला, ज्या कार्यासाठीं ईश्वरचंद्र विद्यासागर ह्या थोर पुरुषांनीं अनेक प्रकारचा छळ सोसला, त्या कार्याची त्यांच्या जन्मस्थानींच अशी अवहेलना व्हावी हा प्रकार नारायणरावांस लांछनास्पद वाटला, म्हणून त्या वर्षी समारोपादाखल भाषण त्यांनीं त्याच विषयावर केलें. त्यावेळेचा नारायणरावांचा आवेश, गतभर्तृकांच्या कल्याणाविषयींची त्यांनीं व्यक्त केलेली कळकळ, त्यांच्यावर होत असलेल्या जुलमाबद्दल त्यांची चीड, दयाळु म्हणविणाऱ्या हिंदु समाजाच्या दुष्टपणाची त्यांनीं केलेली फोड व प्रत्येक शब्दाच्याद्वारें व्यक्त होणारी त्यांची तळमळ ह्या सर्वांचा विरोधकांच्याही मनावर इतका परिणाम झाला कीं, त्यांचा विरोध मावळला, नारायणरावांच्या पावित्र्याचा व तेजाचा अत्यंत इष्ट परिणाम झाला, व ज्या ठिकाणीं पूर्वी पुष्कळ लोक विरुद्ध आहेत असा ओरडा झाला, तेथें तितक्याच आवेशानें आतां कोणाचा विरोध नाहीं असा ध्वनी जिकडून तिकडून आला! अखेरच्या भाषणांत त्यांनीं लोकांना स्पष्टपणें विचारिलें :–

I ask if there is one amongst you who will now tell me that there are many still against the resolution which created some sensation a little while ago ? ( Several voices, No, None ! )

ज्या गतभर्तृकांचा विचार आपलें आयुष्य कांहींतरी उपयुक्त कार्य करून घालविण्याचा असतो, किंवा इतरांच्या दुःखाशीं समविभागी होऊन परोपकाराचीं कार्यें ज्या पतिस्मरणार्थ करीत राहतात व आपलें आयुष्य सत्कारणीं लावतात त्यांच्याविषयीं नारायणरावांस साहजिकच अत्यंत आदर असे. पण, अल्प वयांतच ज्यांच्यावर वैधव्याची कुऱ्हाड पडली, ज्यांस वैवाहिक जीवनाची कांहीं कल्पनाही नाहीं, त्यांस

त्यांची इच्छा असली तर पुनर्विवाहाची मोकळीक असावी, अशा आशयाच्या ठरावा-सही विरोध होणें ही क्रूरपणाची परमावधि होय असें त्यांना वाटे. अशा बाल-विधवांना जन्मभर वैधव्यांत डांबून ठेवणें, ज्यांच्या ठिकाणीं दयेची, अनुकंपेची भावना आहे, ज्यांचीं अंतःकरणें प्रेमळ आहेत, असें म्हणतात त्यांस शोभतें काय? आणि हींच माणसें स्मशानांत ज्यांचीं लांकडें गेलीं आहेत अशा थेरड्यांना बिनबोभाट अनेक लग्नांची परवानगी देतात असे उद्गार काढून बंगाली लोकांची त्यांनीं उघडउघड निर्भर्त्सना केली![1]

## जातिभेद

परमेश्वराचें पितृत्व व मनुष्यमात्राचें भ्रातृत्व हीं ब्राह्मधर्मांचीं तत्त्वें नारायणरावांनीं मान्य केलेलीं असल्यामुळें जातिभेद त्यांस मुळींच मान्य नव्हता हें निराळें सांगण्याची कांहीं आवश्यकताच रहात नाहीं. परंतु जे कोणी सामाजिक सुधारक ह्या नात्यानें त्यांच्या चरित्रकालाकडे पाहतील त्यांस एकंदर सुशिक्षित हिंदु समाजामध्यें विचारांत कशी क्रांति होत गेली तें दिसून येतें. १८९६ सालीं नारायणरावांनीं मद्रासच्या हिंदु सोशल रिफार्म ॲसोशिएशनच्या वार्षिक उत्सवाचें व्याख्यान दिलें. त्याच ठिकाणीं १८९५ सालीं डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर ह्यांनीं सामाजिक सुधारणेवर व्याख्यान देतांना असें बजाविलें होतें कीं, 'जातिभेद हा एक फारच मोठा राक्षस आहे, व त्यास आपणांस नष्ट करावयाचें आहे. तथापि जात ही इतकी दृढमूल होऊन बसली आहे कीं, जाति-भेद नाहींसा करावयास जातां एक नवीनच जात उत्पन्न होऊं पहाते.' हें ध्यानांत ठेवून वरील व्याख्यानांत नारायणरावांनीं सांगितलें कीं, ही अडचण विचारांत घेऊन बहुजन समाजास आम्ही असें सुचवीत आहों कीं प्रत्येक जातीनें प्रथम आपल्यांतील पोटभेद नाहींसे करण्याचा प्रयत्न करावा. पण जातिभेद हा आमच्या, सर्व प्रकारच्या उन्नतीच्या आड येत आहे, असें त्यांचें स्वतःचें मत असल्यामुळें ते स्वतः जातिभेद मानीत नसत, इतरांचीं मतेंही आपल्या सारखींच व्हावीं असें त्यांस वाटत असे. १८९५ सालीं आपल्या एका मित्राला लिहिलेल्या पत्रांत ते म्हणतातः—

It is a bad day for the country when seeing what we see, we are not able to convince ourselves that caste has proved the curse of the country. It is not the only curse I grant but as long as it lasts, we are doomed.

---

१. Do you think it speaks well of the loving capacity, the humane heart, of a people who doom this innocent girl to life-long widowhood while they allow an old man with one foot in the grave to marry as often as he likes?

तथापि नारायणरावांस असें वाटत असे कीं, प्रामाणिकपणें जातिभेदावर ज्यांचा पूर्ण विश्वास असेल त्यांच्याशीं आपलें भांडण नसावें. अशा थोड्या व्यक्तींत त्यांच्या दृष्टीनें रा. सा. मंडलीक मोडत व त्यांच्याबद्दल त्यांच्या ठिकाणीं अत्यंत आदर असे. परंतु चोरून जात न मानणें व वरून अगदीं जुन्या मतांचा अभिमान दाखविणें ह्या गोष्टीची त्यांस मनस्वी चीड येत असे, व अशा ढोंगी वृत्तीबद्दल ते आपला तीव्र तिरस्कार दाखवीत असत.[१] जातिभेदामुळें एकंदर हिंदु जनतेची अत्यंत हानि होत आहे व आज आमच्यामध्यें जे भेद, जे पक्ष, जो द्वेष, निरनिराळ्या पक्षांतील तीव्र मतभेद दिसत आहे ह्या सर्वांस जातिभेद कारण आहे, कोणत्याना कोणत्या रीतीनें जातिभेद ह्या सर्व अनर्थास कारण होत आहे असा त्यांचा अनुभव होता. मात्र केवळ जातिभेदामुळें हा सर्व अनर्थ होत आहे असें ते म्हणत नसत. मुख्यत्वेंकरून प्रचलित जातिभेदामुळें आमची उन्नति होत नाहीं ह्याबद्दल त्यांची खात्री होती.[२]

येथें जातिबंधनें शिथिल व्हावीं एतदर्थ जे निरनिराळ्या रीतींनीं गेल्या शंभर वर्षांत प्रयत्न झाले आहेत व ज्यांची हकीकत नारायणरावांच्या लेखांत निरनिराळ्या ठिकाणीं सांपडते ती एकत्र करून देणें सयुक्तिक होईल असें वाटतें. म्हणून साररूपानें ती पुढें दिली आहे :—

पेशवाई पडल्यानंतर केवळ तीन वर्षांनीं, म्हणजे १८२१ सालीं, गंगाधर दीक्षित फडके नामक एक पुण्याचे ब्राह्मण गृहस्थ ६ वर्षें मुंबईत राहून १८२७ सालीं पुण्यास परत गेल्यानंतर त्यांस जातींत परत घेण्यासंबंधानें कसा त्रास झाला ह्याचें वर्णन पूर्वीं झालेंच आहे. दीक्षितांची चळवळ जातिभेदाविरुद्ध नव्हती.

---

१ एका मित्राला लिहिलेल्या पत्रांत ते म्हणतात :—What is it that actuates those who wish to aggrandise the caste system, who suffer men to be what they like in secret and wink at sins and vices, and preach the gospel of saying one thing and doing another : who will break the rules on the sly and yet studiously keep up appearances to please the caste !...

I cannot even now understand how a man can break the rules of caste in secret and have the face to go and pose as a faithful follower of it. No community can live longer or last long on shams.

२. Everyday shows that it ( caste ) is the parent of cliques, factions and jealousies which have disunited the Hindus and have made slaves of them. It is not the only cause but it is one of the principal causes.

समुद्र ओलांडणें हें निषिद्ध मानूं नये एवढ्यापुरती ती होती. परंतु आर्येन ब्रदर-हूडची माहिती देतांना Crusade against Caste ह्या लेखाखालीं नारायणरावांनीं ती मुद्दाम दिली आहे. जातिभेदाचीं बंधनें शिथिल करण्याच्या पहिल्या निश्चित प्रयत्नास १८४० च्या सुमारास परमहंस सभेनें प्रारंभ केला हें जितकें खरें आहे तितकेंच नारायणरावांनीं हेंही दाखवून दिलें आहे कीं, ज्या प्रकारें ह्या कार्यास प्रारंभ करावयास पाहिजे होता त्या प्रकारें तो न केल्यामुळें परमहंस सभेस अपयश आलें. कोणत्याही सामाजिक सुधारणेचीं बीजें कुटुंबांत रुजल्यावांचून सुधारणेस यश येण्याची आशा करणें व्यर्थ आहे. हा प्रयत्न फसला, पण त्यानंतर जातीच्या लोकांस न कळत पालनजी काकाच्या हॉटेलांत चोरून खाण्यापिण्याचा प्रकार सुरू झाला व हा वाममार्ग डॉ. विल्सनसारख्या ख्रिस्ती मिशनरींनींच फक्त हिंदु पुरुषांनाच आपल्या येथें भोजनास बोलावून दाखविला असा आरोप काशिनाथपंत तेलंगांनीं नंतर केला! लोक चोरून हॉटेलांत जातात हें वाईट आहे, अशा अर्थाचें डॉ. विल्सन ह्यांनीं लिहिलेलें पत्र जेव्हां त्यांच्या चरित्रांत प्रसिद्ध झालेलें तेलंगांनीं पाहिलें, तेव्हां त्यांनीं हा टोमणा मारला होता![1] हें तेलंगांचें मत नारायणरावांस मान्य नव्हतें हें येथें नमूद करणें अगत्याचें आहे. ह्या नंतर १८६९ सालीं जातिभेद मोडण्याचा अगर जातिभेदाचीं बंधनें शिथिल करण्याचा प्रयत्न झाला. त्या सालीं मुंबई शहरांत ब्राम्हण ज्ञातींतील पहिला विधवाविवाह झाला. त्यानंतर भोजन झालें. त्यास अवघे सात पुरुष हजर होते व कांहींनीं आपलीं तोंडें दिसूं नयेत म्हणून तोंडावरून बुरखे घेतले होते, एवढेंच केवळ नव्हे तर पोलिस कमिशनर सावटर ह्यांनीं त्यांच्या रक्षणार्थ पोलिसचे शिपाई दिले होते! एवढ्या कडेकोट बंदोबस्ताखालीं जरी हा लहानसा भोजनसमारंभ झाला, तरी हजर असणारांचीं नांवें बाहेर फुटलींच! ह्या सर्वांना जातिबहिष्कृत करण्यांत आलें व कांहींनीं प्रायश्चित्तेंही घेतलीं असें नारायणरावांनीं नमूद केलें आहे. ह्याच सुमारास डॉ. भाऊ दाजी ह्यांच्यासंबंधानें घडलेलें एक उदाहरण नमूद केलें आहे. तें १८७० सालांतील आहे. एका गृहस्थांनीं आपल्या कांहीं ज्ञातिबांधवांना आपल्या येथें भोजनास बोलाविलें. त्यांतच विलायतेहून बॅरिस्टर व ख्रिस्ती होऊन आलेले गोविंदराव करकरे होते. सर्व जण एकाच खोलींत बसले, पण गोविंदराव ख्रिस्ती म्हणून त्यांना निराळें बसविलें. दुसऱ्या दिवशीं ही बातमी सर्वत्र पसरली. जातींत बरीच खळबळ उडाली, वर्तमानपत्रांत कांहीं पत्रें प्रसिद्ध झालीं व अखेरीस ज्या **खोलींत** मंडळी जेवली तेथें एक ख्रिस्ती गृहस्थ जेवला म्हणून बिचाऱ्या डॉ.

---

१. But who has taught us Hindus to break caste on the sly? Dr. Wilson and the Christian missionaries!

भाऊ दाजींना प्रायश्चित्त घ्यावें लागलें! १९१५ सालीं नारायणरावांनीं म्हटलें आहे कीं आतां तो काळ बदलला आहे! पण ही बदललेली परिस्थिति यावयास जीं अनेक कारणें झालेलीं आहेत त्यांत गव्हर्न्मेंट हाऊसमधील भोजनसमारंभही कांहीं अंशानें कारण झाले आहेत ह्याची आठवण नारायणरावांनीं करून दिली आहे! ते म्हणतात कीं, साधारणतः १८८० पर्यंत हिंदु पद्धतीनें रहाणाऱ्या लोकांना गव्हर्न्मेंट हाऊसमधील खान्याला बोलावीतच नसत! रानडे तेलंगांसारख्यांना शेवटीं येण्याचें आमंत्रण देत असत! परंतु लॉर्ड रे साहेबांच्या वेळेपासून मनू पालटूं लागला. विलायतेहून परत आलेल्या एका तरुण गृहस्थांस जेवणाचें आमंत्रण आलें व त्यांनीं तें बेधडक स्वीकारलेंही! आमंत्रण स्वीकारल्याचें कळतांच दोन उदारधी व विद्वान् युरोपिअन गृहस्थ ह्या गृहस्थांस "तुम्हीं आमंत्रण स्वीकारिलेंत त्याला कांहीं हरकत नाहीं, पण तुम्ही भोजनास येऊं नका; आम्ही तुमच्या वतीनें लॉर्ड व लेडी रे ह्यांजपाशीं बतावणी करूं व तुमच्या एकंदर स्थितीचें वर्णन करूं. त्याची तुम्हीं काळजी करूं नका!" असें आश्वासन देऊं लागले! पण त्या गृहस्थांनीं असें सांगितलें कीं, भोजनास जाण्याचा आपला निश्चय कायम आहे; लोकांनीं चोरून केलें असतां जें चालतें, व ज्याच्या विरुद्ध जातीकडून कांहीं गिल्ला होत नाहीं, तें मी प्रसिद्धपणें करणार आहें. ह्यावर ते युरोपिअन गृहस्थ म्हणाले, "तें सर्व खरें, पण तुम्ही आपल्यावर विनाकारण संकट ओढवून कां घेतां? कांहीं वर्षें थांबा, मग जसा काळ बदलत जाईल, त्याप्रमाणें तुम्हीहि आपल्या आचरणांत बदल करीत चला.[१] "पण, महाराज, मी प्रयत्न केल्यावांचून काळ कसा बदलणार?" शेवटीं ह्या गृहस्थांचा दृढ निश्चय पाहून ह्या उदार गृहस्थांनीं अशी एक तोड सुचविली कीं, तुम्हांला तुमच्या जातीकडून कांहीं त्रास झालाच, तर तुम्हीं असें सांगा कीं, "गव्हर्नर साहेबांचें आमंत्रण हें राजाच्या आज्ञेप्रमाणेंच आहे व राजाची आज्ञा कोणास अवमानितां येत नाहीं म्हणून आपण भोजनास गेलों!" ह्या गृहस्थांस असल्या लंगड्या सवलतीची कांहीं जरूर नव्हतीच. ते उघडपणें भोजनास गेले व जातीनें अगर इतर कोणीही त्यांस जाब विचारला नाहीं, अगर त्यावेळीं त्यांच्या कोणी वाटेस गेलें नाहीं.[२]

---

१. "Wait for some years and when the times move, you move too."

"But time won't move unless I move."

२. नारायणरावांनीं ही हकीकत जरी तृतीयपुरुषीं दिली आहे, तरी उघडपणें गव्हर्न्मेंट हाऊसमधील भोजनाचें आमंत्रण स्वीकारणारे व निश्चयानें भोजनास

[ हल्लीं गव्हर्न्मेंट हाऊसमध्यें जाऊन जेवणारांचे तीन वर्ग आहेत. (१) जें कांहीं केलें असेल त्याचा स्वीकार करणारे; ( २ ) शाकाहारी; ( ३ ) नुसते येऊन बसणारे व गप्पा मारणारे. सर्वांचीं नांवें वर्तमानपत्रांत प्रसिद्ध होतात, पण कोणाच्याही जातीकडून कोणासही आज कांहींही त्रास होत नाहीं. ही १९१५ तली गोष्ट. आणि फक्त तीस वर्षांपूर्वी परजातीचा अगर परधर्मांचा मनुष्य जवळ बसलेला आम्हांस खपत नसे ! बंगालवर नबाबांची सत्ता असतांना टागोर कुटुंबाला अशाच क्षुद्र कारणासाठीं बहिष्कृत करण्यांत आलें होतें. असो. लॉर्ड रे नंतर लॉर्ड हॅरीसची कारकीर्द सुरू झाली. आणि त्यांच्या अमदानींत क्रिकेटचे सामने चालू असतां हिंदु–मुसलमान, स्पृश्य–अस्पृश्य एकाच ठिकाणीं बसून मधल्या विश्रांतीच्या वेळीं उपाहार करूं लागले ! मद्रास येथें जातिबंधनें शिथिल करण्याचें कार्य आपल्या गोपाळराव गोखल्यांमुळें झालें हें ऐकून पुष्कळांस नवल वाटेल. १९१५ च्या कांहीं वर्षांपूर्वी गोपाळराव मद्रास येथें गेले असतां, सोडावॉटरच्या बाटलीलाही स्पर्श न करणाऱ्यांपैकीं कांहीं सुशिक्षितांनीं गोपाळरावांस भोजनास बोलाविलें, व अनेक जातींचे लोक त्यांच्या पंक्तीला बसून जेवले व असे अनेक समारंभ त्यावेळीं झाले व अशा प्रकारच्या सहभोजनासंबंधाच्या सुशिक्षितांच्या हरकती विरघळून गेल्या ! १९०५ च्या सुमारास त्यावेळच्या मद्रासच्या गव्हर्नरसाहेबांनीं नारायणरावांस सांगितलें होतें कीं, इकडले लोक इतके पुरातनमतवादी आहेत कीं एखाद्या ब्राम्हण गृहस्थाला मला चहाचें आमंत्रणही देतां येत नाहीं ! आणि त्यानंतर दहाच वर्षांनीं लॉर्ड पेंटलंड ह्यांच्या कारकीर्दींत ब्राम्हणब्राम्हणेतर गव्हर्नरसाहेबांच्या पार्टींत मिसळून चहा व बिस्किटें ह्यांचा फन्ना उडवितांना पाहून नारायणरावांस आश्चर्य वाटलें ! एवढेंच केवळ नाहीं तर सर शंकरन् नायर ह्यांच्या येथें एक मुसलमान जज्ज जेवावयास असतांना त्यांच्याबरोबर ब्राम्हणब्राम्हणेतर समभावानें जेवत असलेले पाहून नारायणरावांस मोठें कौतुक व आश्चर्य वाटलें व जो मद्रास प्रांत त्यावेळपर्यंत अगदीं मागसलेला समजला जात असे त्याचे जातिभेदाविरुद्ध निर्धाराचे प्रयत्न चालले आहेत असें त्यांना दिसून आलें.[१] "तुम्ही कितीही शिक्षण दिलें तरी हिंदूंच्या भोळसर समजुती व कर्मठपणा जाणार नाहीं हें होरेस विल्सन ह्यानें केलेलें भविष्य मद्राससारख्या प्रांतांतही कसें अगदींच खोटें पडलें आहे" तें ह्यावेळीं नारायणरावांच्या ध्यानांत आलें. ]

---

जाणारे पहिले हिंदु गृहस्थ दुसरे कोणी नसून स्वतः नारायणरावच होते हें येथें स्पष्टपणें नमूद करावयाची आवश्यकताच नाहीं !

१. Madras till but some time ago, regarded as the hot-bed of bigoted orthodoxy, is now fairly on the war-path against caste.

येथपर्यंत मुंबईस मजल आल्यानंतर १८९२ सालीं पुण्यास पांच हौद मिशन-मध्यें चहा घेतल्यानंतर जें वावटळ उठलें त्यांत टिळक व रानडे हे सांपडले होते. रानडे हे प्रार्थनासमाजाचे व सामाजिक चळवळीचे पुढारी आणि त्यांनीं ख्रिस्त्यांच्या हातचा चहा प्याल्याबद्दल प्रायश्चित्त घेणें ह्याबद्दल त्यावेळीं त्यांच्याविरुद्ध फार प्रखर टीका झाली. प्रार्थनासमाजाची बाजू घेऊन सदाशिव पांडुरंग केळकर ह्यांनीं प्रार्थना-समाजाचें मुखपत्र जें सुबोधपत्रिका त्यांत रा. ब. रानडे व रा. ब. चिंतामणराव भट ह्यांजवर कडक टीका केली. परंतु रा. ब. रानडे ह्यांची ह्या बाबतींत दृष्टि निराळीच होती. प्रार्थनासमाजाच्या दृष्टीनें त्यांनीं प्रायश्चित्त घेणें हें गैर होतें ह्यांत कांहीं संशय नाहीं; पण एकंदर हिंदु जनतेमध्यें उदार विचार कसे पसरतील, जातिभेदविषयक बंधनें कशीं शिथिल होतील व उच्चनीच भाव कसा नष्ट होईल इकडे रानड्यांची दृष्टि होती. म्हणून ज्यावेळीं सुधारकही त्यांच्यावर टीका करूं लागले कीं त्यांनीं प्रायश्चित्त घेतल्यानें सुधारणेची पिछेहाट केली, त्यावेळीं त्यांनीं प्रतिपादिलें कीं, जर एखादें क्षुद्र प्रायश्चित्त घेतल्यानें जुन्या लोकांचें समाधान होत आहे, तर त्यांच्याच साधनानें आपल्या कार्यास वाट मोकळी करून देणें हेंच योग्य होय![1] म्हणजे याचा अर्थ असा कीं, आपल्याला जें योग्य वाटतें तें बेलाशक करावें, जातीनें हरकत घेतलीच तर प्रायश्चित्त घेऊन मोकळें व्हावें, पण पुन्हां क्रम चालू ठेवावा! नारायणरावांस हा क्रम मान्य नव्हता. जें आपल्याला योग्य व न्याय्य वाटतें तें केल्याबद्दल प्रायश्चित्त घेण्याची मुळींच आवश्यकता नाहीं, तसेंच जें योग्य वाटतें तें करण्यास काळ अनुकूळ केव्हां होईल याची वाट पहात बसण्याचीही गरज नाहीं, असें नारायणरावांस वाटत होतें व त्याप्रमाणें त्यांचें आचरण होतें. रानडे व चंदावरकर ह्यांच्या धोरणांतील हा फरक सामाजिक सुधा-रणेच्या इतिहासाच्या दृष्टीनें लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

ह्यानंतर मुंबईत कॉस्मॉपॉलिटन क्लब ह्या नांवांची एक संस्था स्थापन झाली होती. ही संस्था कांहींशी बिनबुडाचीच होती. म्हणजे निरनिराळ्या धर्मांचे व जातींचे लोक ह्या संस्थेचे सभासद होते, व संस्थेच्या जागेंत त्यांचे नेहमींच खाने होत असत. एकदां १८९५ च्या सुमारास असा खाना झाल्यानंतर हजर असणारांपैकीं एकानें "पकीं एक" अशी सही करून वर्तमानपत्रांत सर्व भोजन-बंधूंचीं नांवें प्रसिद्ध केलीं! त्यामुळें बराच गोंधळ उडाला. पुन्हां एकदां प्रायश्चि-त्ताची वावटळ उठली व मागें ज्याप्रमाणें परमहंस सभा बंद पडली, त्याप्रमाणें

१. "If orthodoxy was willing to let people off each time a caste rule was broken on condition of penance, it was best to beat caste with its own weapons."

कॉस्मॉपॉलिटन क्लबही कांहीं काळानें बंद पडला! नारायणरावांचा कॉस्मॉपॉलिटन क्लबशीं कांहीं संबंध केव्हांच नव्हता. परंतु पुढल्या प्रयत्नांचा मधला दुवा म्हणून ती हकीकत वर दिली आहे. अलीकडल्या काळांतील जातिभेदाची तीव्रता कमी करण्यासाठीं मोठ्या प्रमाणावरील झालेला प्रयत्न म्हणजे १९१२ झालीं आर्यन ब्रदरहूड संस्थेच्या विद्यमानें झालेलें सहभोजन होय.

ह्या सहभोजनांत सर्व जातींच्या लोकांनीं भाग घेतला होता; प्रार्थनासमाजाचे सभासद डॉ. श्री. सोळंकी, व प्रसिद्ध क्रिकेटपटू श्री. बाळू हे भोजनप्रसंगीं पंगतींत असलेले पाहून कोणीही धर्म बुडण्याच्या भीतीनें पानांवर बसल्यानंतर उठून गेले नाहींत. परंतु एक मोठे नामांकित गृहस्थ डॉ. सोळंकी व मि. बाळू आपल्या पंक्तीचा लाभ देणार आहेत अशी कुणकुण कळतांच परत गेले! पुढें कांहीं वर्षांनीं ह्या गृहस्थांचें हें सोवळें सुटलें! भोजनोत्तर कांहीं दिवसांनीं थोडी खळबळ उडाली; कांहीं गुजराती बंधूंना भोजनांत भाग घेतल्याबद्दल जातीच्या जुलमामुळें पश्चात्ताप झाला व प्रायश्चित्त घेतल्यानंतर त्यांचे आत्मे शांत झाले हा भाग वेगळा. परंतु भोजनांत भाग घेतल्याबद्दल ज्ञातिमंडळाकडून जाब विचारला असतां, लीलाधर संपत ह्यांनीं जो जबाब दिला त्यावरून जातिभेदाचीं बंधनें चांगलींच शिथिल झाल्याचें दिसून आलें. ज्ञातीला पाठविलेल्या आपल्या उत्तरांत ते म्हणतात :—

"भाटिया ज्ञातीच्या इतर मंडळीप्रमाणें गेलीं चार वर्षें आर्यबंधुमंडळाचा मी सभासद असून सभासद ह्या नात्यानेंच मी सहभोजनप्रसंगीं हजर होतों ही गोष्ट सर्वांस महशूर आहे. असें असतां नोटीस काढून मला व माझ्यासारख्या इतरांना असा प्रश्न कां विचारण्यांत यावा हेंच मला मुळीं कळत नाहीं. इतर ज्ञातींच्या मंडळीबरोबर सहभोजन करणें हा माझा आज बरेच दिवसांचा प्रघात आहे. त्याचप्रमाणें माझे इतर ज्ञातिबांधवही असेंच करीत असल्याचें मला माहित आहे. सोशल रिफॉर्म ॲसोशिएशनच्या वतीनें होणाऱ्या भोजनप्रसंगींही मी हजर राहात असें, इतकेंच नव्हे तर इतर क्लबांच्या भोजनप्रसंगीं मी हजर राहिलों आहें व ह्या भोजनप्रसंगीं भाटिया ज्ञातीच्या इतर लोकांना इतर ज्ञातींबरोबर भोजन करतांना मीं पाहिलें आहे. प्रवासाच्या प्रसंगीं आणि सुरत व बनारस येथील राष्ट्रीय सभांच्या वेळीं इतर ज्ञातींबरोबर भाटिये मंडळींनीं भोजन केल्याचें मला माहीत आहे. एकच अन्न सर्व ज्ञातीच्या मंडळींनीं एकत्र एका पंक्तीस बसून खाण्यास कांहीं हरकत नाहीं असा माझा बरेच दिवसांपासूनचा विश्वास आहे. इतर ज्ञातींबरोबर सहभोजन करणें ही भाटिया ज्ञातींत एक पद्धत होऊन बसली आहे. असें असतां त्यांना ज्ञातिबहिष्कृत केल्याचें मला माहीत नाहीं. अशा स्थितींत

आर्यबंधुमंडळाच्या सहभोजनप्रसंगीं मी हजर राहिल्यानें ज्ञातीचा कांहीं रिवाज मीं तोडला असें मला वाटत नाहीं, अथवा मी तोडीत आहें, अशीही माझी समजूत होत नाहीं." आतां अशा प्रकारचें जाहीर उत्तर देण्याचें सामर्थ्य भाटिया ज्ञातींतील एका व्यक्तींत येणें हें नारायणरावांसारख्यांनीं ज्ञातिबंधनें शिथिल करण्याचें जें प्रत्यक्ष उदाहरण घालून दिलें त्याचें मूर्त फळ नव्हे असें कोण म्हणेल ? त्याचप्रमाणें ज्या सामाजिक परिषदेचे नारायणराव जनरल सेक्रेटरी होते व जी संस्था पोटभेद मोडण्यापलीकडे गेली नव्हती तिच्या पुष्कळ पुढें आर्यन ब्रदरहुड ही संस्था गेली होती. ह्या संस्थेचे दफ्तरी सॉलिसिटर हे प्राणरूप होते व सर नारायणराव आधारस्तंभ म्हणजे अध्यक्ष होते. ह्या संस्थेच्या विद्यमानें १९१२ सालीं झालेल्या परिषदेंत जें प्रास्ताविक भाषण केलें त्यांत त्यांनीं प्रथम देवाची प्रार्थना[1] केली. त्या भाषणांत आर्यन ब्रदरहुड ह्या संस्थेची व संस्थेनें केलेलें कार्य ह्यांची माहिती दिल्यावर जातींची अनिष्टता व अनवश्यकता, जातींनीं

---

१. ह्या प्रार्थनेंत आर्यांच्या भक्तीचा इतिहास आहे, म्हणून ती पुढें दिली आहे :—

He Who in the beginning of the Aryan Society taught our foremost ancestors, the Rishis, to see and realise in this land, a world of beauty, wonder and admiration pulsating with the life and spirit of Brahma in the face of external Nature; Who in the second stage of our Aryan growth in ancient times taught the same Rishis to speak His views, and find the inner world of wonder, of beauty, and of admiration in the inner consciousness and heart of man, able to assert man's personality in the strength of God, and manifest itself in using nature for the higher ends of humanity; Who in the third stage of our Aryan growth taught the same Rishis, our ancestors, to realise that life dominates the world external in man and Who taught them to chant the song divine and immortal which we cherish and worship as our most precious heritage of Aryan life, the Bhagavad Geeta; Who gave us such divine personalities as Rama and Sita, ideals of Hindu manhood and Hindu womanhood; Who inspite of our dissensions and differences has enabled the Hindu community to stand shock of all ages and endeavour to assert itself in the world of cosmic growth; Whom we worship as Brahma and Parameshwar, may He bless us in the sacred work for which we are all met here today, may He give us life and strength for the message and work we have met to confer and to do.

पूर्वकालीं केलेलें हित, पण कालावधीनें त्याच जातिभेदानें हिंदुसमाजाची उडविलेली दुर्दशा, सांप्रत जातिभेदानें हिंदुसमाजाचीं केलेलीं शकलें, उत्पन्न झालेलीं वैमनस्यें व दुरीभाव, इ० गोष्टींचें समर्पक विवेचन केलें व जातिभेद-निर्मूलनाविषयीं चाललेल्या प्रयत्नांवर जुन्या व नव्या मंडळीकडून करण्यांत येणाऱ्या आरोपांचें त्यांनीं खंडन केलें. प्राचीनकाळची समाजव्यवस्था, जाति व रूढी, पूर्वींच्या जाति व हाच क्रम पुढें चालल्यास उत्पन्न होणाऱ्या जाति व आतांच्या जाति ह्यांचें यथार्थ चित्र नारायणरावांनीं रेखाटलें व अत्यंत करुणास्पद व दीन स्थितीस पोंचलेल्या हिंदुसमाजाचा अस्थिपंजर सर्वांपुढें उभा केला. शेवटीं ते म्हणाले "सांप्रत आपण स्वातंत्र्याच्या काळांत राहात आहोंत; आपण एक-मेकांत मिसळत आहोंत व आपलें एकमेकांशीं संघटण होत आहे. आपण एकत्र झालों, तर आपला विजय होईल. विभक्त झालों तर आपली अधोगति व नाश ठरलेला आहे. बुद्ध, नानक व बसव ह्यांनीं जातिभेदाचें बंड मोडण्यासाठीं प्रयत्न केले, पण त्यांना यश आलें नाहीं. तरीसुद्धां आपण निराश न होतां चिकाटीनें प्रयत्न केले पाहिजेत. ब्राम्हसमाज, आर्यसमाज, प्रार्थनासमाज आणि थिऑसफी इ० संस्था निरनिराळ्या दिशांनीं, पण एकाच ध्येयाकडे चालल्या आहेत. हें काम बिकट आहे. पण चाललेले प्रयत्न स्तुत्य व आशाजनक आहेत. मी सर्वांकरितां आहें, हें लक्षांत ठेवून व सर्वात्मक प्रीतीचें ध्येय ध्यानांत आणून आपण प्रयत्न

---

१. ह्या परिषदेची हकीकत वाचून मुंबई इलाख्यांत नोकरी केलेले पहिले हिंदी आय. सी. एस., महर्षि देवेंद्रनाथ यांचे चिरंजीव व रवींद्रांचे ज्येष्ठ बंधू सत्येंद्रनाथ टागोर हे सर नारायण ह्यांस लिहिलेल्या पत्रांत म्हणतातः—

Allow me to congratulate you on the anti-cast-movement started by the Aryan Brotherhood. It is indeed a bold step to take but the times are propitious and under proper guidance the movement is bound to succeed. We in Bengal have broken through the caste rules as regards interdining but as regards intercaste marriages, it is there that the shoe pinches. Except in the case of Sadharan Brahma Samajists such marriages cannot be thought of. So practically caste reigns supreme in Bengal. It is a wise policy to give shastric basis to the movement but with us the voice of *shastras* has ceased and indeed the *shastras* may be made to speak anything you choose, for anything you may do in support of your position. And an orthodox pandit will cite the same texts against it.

करूं या, म्हणजे परमेश्वर आपणांस यश देईलच." आर्यन[१०] ब्रदरहुड परिषदेनें जातिभेदाच्या बाबतींत स्पष्ट आघाडी कशी मारली हें जातिभेदासंबंधानें कायम झालेला ठराव व परिषदेनंतरचें जाहीर सहभोजन ह्यांवरून स्पष्ट होत आहे. ठराव असा होता:—

"हिंदुसमाजांतील अनेक जातींनीं आपापल्या उन्नतीसाठीं व अभ्युदयासाठीं जी इच्छा प्रदर्शित केली आहे ती पाहून ह्या परिषदेस यद्यपि समाधान वाटतें, तथापि आकुंचित मार्गानें व आपल्या जातीपुरती दृष्टि ठेवून प्रयत्न करण्याचें वळण त्यांनीं आपल्याला लावून देण्याचें जें आरंभिलें आहे, तें पाहून परिषदेस खेद वाटतो."

जातिभेदाविरुद्ध पूर्वीपासून जुन्या सुधारकांनीं, नारायणरावांनीं व इतरांनीं जे प्रहार केले त्याचे इष्ट परिणाम झाले ह्यांत कांहीं संशय नाहीं. पांच हौद मिशन-मध्यें जाऊन चहा घेतल्यामुळें, अगर न घेऊनही उठलेलें वादळ, नंतर ह्या मुंबई शहरांत कॉस्मॉपॉलिटन क्लब नांवाची संस्था स्थापन होणें व क्लबच्या आवारांत कोणत्याही प्रकारचा भेदभाव न पाळला जाणें, पण एकदां एका सहभोजनाच्या-वेळीं हजर असलेल्यांचीं नांवें प्रसिद्ध होतांच सर्वांची तारांबळ उडणें, आणि पुष्कळ वर्षांनीं आर्यन ब्रदरहुडसारख्या संस्थेच्या विद्यमानें झालेल्या सहभोज-नांत फक्त कांहीं गुजराथी सभासदांस जातींकडून तंबी मिळणें व त्यानंतर भोजनाच्या बाबतींत जातींच्या पुढाऱ्यांनीं पूर्ण दुर्लक्ष करणें ह्या पायऱ्या पाहिल्या म्हणजे नारायणरावांच्या हयातींत जातिबंधनें पुष्कळ प्रमाणांत शिथिल झाल्याचा अनुभव त्यांस आला होता ह्यांत कांहींही संशय नाहीं. असा जरी त्यांना अनुभव आला होता तरी कोणत्याही बाबतींत आंत एक व बाहेर निराळें तें त्यांस मुळींच पसंत नसे. आपल्या जातीसाठीं, लोकसंग्रहासाठीं, आपले स्वतःचे विचार बाजूस ठेवून, लोकांपुढें मान लवविली पाहिजे असला उपदेश त्यांस क्षणमात्र रुचत नसे. असल्या लोकांस ते नेहमीं सांगत कीं, इतिहासाची शिकवण पहा. अखेरीस जसा काळ येईल त्याप्रमाणें सत्यासत्याचा विचार न करितां वागणाऱ्या लोकांविषयीं लोकांत खरा आदर उत्पन्न होतो, कीं सत्य व न्याय ह्याप्रमाणें वागणारे, आंत जें तेंच बाहेर दाखविणारे, सर्व व्यवहारांत प्रामाणिकपणा ठेवून आपलें आचरण ठेवणारे असे जे कोणी त्यांचेविषयीं जनतेस आदर असतो, हें लक्षपूर्वक पहा, म्हणजे लोकच्छंदानुवर्ती, तत्त्वनिष्ठा न दाखविणाऱ्या, वेळ येईल त्याप्रमाणें वागणाऱ्या लोकांविषयीं विचारी लोकांत अनादराचीच भावना असल्याचा अनुभव येईल. जेथें सत्यनिष्ठा नाहीं, जेथें आचारशुद्धि नाहीं, तेथें वरवरचे पुष्कळ प्रकार घडले, जातीच्या पावित्र्यरक्षणाचे कितीही प्रयत्न झाले, तरी अशा जातींची धडगत

नाहीं. अशा जाती दिवसेंदिवस अवनत होत असल्याचा अनुभव आल्यावांचून राहणार नाहीं.[१]

## पावित्र्य हा पाया.

वर एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, सामाजिक सुधारणेसंबंधानें नारायणरावांचे विचार थोडे निराळे होते. सार्वजनिक कार्यांमध्यें कमीअधिक प्रमाणानें भाग घेऊं लागल्यापासून शेवटच्या घडीपर्यंत नारायणरावांची सामाजिक प्रगतीसंबंधाची आस्था लवमात्र ओसरली नाहीं. ह्याचें मुख्य कारण असें होतें कीं, सामाजिक सुधारणेची चळवळ ही केवळ मुलींना शिक्षण देणें, त्यांच्या उच्च शिक्षणास प्रतिबंध नसणें, त्यांच्या विवाहाची वयोमर्यादा वाढविणें, गतभर्तृकांस विवाहाचा मार्ग मोकळा असणें, अस्पृश्यांचा उद्धार करणें,[२] जातिभेद नाहींसे करणें अशा प्रकारच्या गोष्टींपुरतीच आहे अशी त्यांची कल्पना नव्हती. सत्य, न्याय पावित्र्य ह्यांच्या पायावर ही चळवळ त्यांस उभारावयास व टिकून रहावयास हवी होती.

अपेयपान करणारे, अनीतीचें वर्तन ठेवणारे, पण मुलींचे विवाह प्रौढवयीं घडवून आणणारे, जातिभेद न मानणारे, पुनर्विवाहास प्रोत्साहन देणारे जे कोणी असतील त्यांस खरे सुधारक म्हणावयास नारायणराव केव्हांही तयार नसत. एवढेंच नव्हे, तर सुधारणेच्या यादींत मोडणाऱ्या सर्व गोष्टी मान्य असून ज्यांना नायकिणींचें नाचगाणें करविणें व तेथें हजर राहाणें असल्या गोष्टी गैर वाटत नाहींत त्यांसही नारायणरावांनीं सुधारक म्हटलें नसतें. कारण, सामाजिक सुधारणेच्या चळवळीची सर्व भिस्त पावित्र्यावर असली पाहिजे असा त्यांचा आग्रह

---

१. When I found years ago caste a mere mockery, a huge, hypocrisy, men professing to be what in reality they were not drinking forbidden liquor and eating forbidden things on the sly and outwardly worshipping caste I thought to myself that no community can live long or last long on shams. (March 1895) हें झालें त्यांचें १८९५ तील मत. पण १९२३ सालीं प्रो. बक ह्यांच्या व्याख्यानानंतर नारायणरावांनीं स्पष्ट सांगितलें कीं Caste is our curse, the mill stone round our necks which so long as it exists will prove our stumbling block in India. ह्यावरून जातिभेदासंबंधाची त्यांची दृष्टि प्रथमपासून अखेरपर्यंत सारखी होती हें दिसून येतें.

२. अस्पृश्योद्धाराच्या चळवळींत नारायणरावांचें स्थान पुढें स्वतंत्र भागांत दाखविलें आहे.

असे.[१] प्रत्येक सुधारणाप्रिय मनुष्यानें ही गोष्ट लक्षांत ठेवून व स्वतः तसें आचरण ठेवून सामाजिक सुधारणेचा पुरस्कार करावयास पुढें आलें पाहिजे असें त्यांस वाटत असे. म्हणून मद्रासच्या सोशल रिफॉर्म ॲसोसिएशननें आपल्या कार्यक्रमांत नायकिणींचें गाणें व नाच ह्यांस प्रतिबंध[२] व हजर न राहाणें हें कलम घातलेलें पाहून त्यांना फार समाधान वाटलें, व त्यांनीं १८९६ सालीं मद्रासकर बंधूंना सांगितलें कीं, तुम्हीं जो कार्यक्रम हातीं घेतला आहे तोच योग्य आहे. त्याबद्दल आज तुमची अवहेलना होईल. पावित्र्याचे मोठे पुरस्कर्ते म्हणून तुमची टवाळकी होईल. परंतु पावित्र्यास महत्त्व देणारी तुमची चळवळच योग्य आहे. ही चळवळ अशीच उत्साहानें चालविली असतां तिचा इष्ट परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं.[३] नारायणराव ज्यावेळीं सामाजिक सुधारणेच्या आखाड्यांत उतरले त्यावेळीं जनसमूहाची सुधारणेच्या चळवळीस अनुकूलता नाहीं, याचा त्यांना रात्रंदिवस अनुभव येत असे. जनसमूहाचो गोष्ट बाजूला ठेविली, तरी सुशिक्षित लोक सामाजिक सुधारणेस अनुकूल नाहींत हेंही ते पहात होते. लोकगंगेच्या ओघांत सहज वाहून जाणारे, ऐनवेळीं मुळींसुद्धां हातपाय न हालविणारे, विवेकास बाजूस सारून, लोकांस रुचेल तें बोलणारे, आपल्या विवेकाच्या सांगीविरुद्ध आचरण करणारे, एवढेंच केवळ नव्हे, तर सुधारणेच्या मार्गांत मुद्दाम अडचणी आणणारे, सुधारकांस जनसमूहाच्या दृष्टीनें निंद्य ठरविणारे, त्यांच्या विरुद्ध जाणूनबुजून खोट्या नाट्या गोष्टी उठवून त्यांच्या कार्याची बदनामी करणारे लोकांस त्यांनीं ओळखून ठेविलें होतें. परंतु ते डगमगले नाहींत. तत्त्वांच्या बाबतींत सोयीसाठीं अल्पस्वल्प ढिलेपणा आला तरी हरकत नाहीं असा विचार त्यांस केव्हांही सुचला नाहीं व पवित्र विचार, पवित्र आचार, पवित्र आकांक्षा ह्या

---

१. Life of purity ought to be the key-note of Social Reform Movement.

२. १८६५ सालीं मद्रास येथें वेदसमाज स्थापन झाला. ह्याच समाजाचें रूपांतर ब्राह्मसमाजांत झालें. ह्या वेदसमाजाचा सभासद होतांना प्रत्येकास पुढील नियम मान्य असावा लागे. "मी नाच करविणार नाहीं, नाच होत असेल तेथें हजर राहणार नाहीं, अगर कोणत्याही रीतीनें नाच ह्या संस्थेस उत्तेजन देणारें आचरण ठेवणार नाहीं."

३. They may laugh at you and take you for visionaries; but be sure enthusiasm in the cause of morality has unrivalled charm and power which does not fail sooner or later to assert itself.

संबंधींच्या आपल्या धोरणांत त्यांनीं तिळमात्र फरक केला नाहीं. एवढेंच केवळ नाहीं, तर आपल्याप्रमाणेंच तुम्ही करा, म्हणजे अंतीं खऱ्या सुधारणेचा जय झाल्यावांचून रहाणार नाहीं असा त्यांनीं सर्वांस उपदेश केला.[१]

## कौटुंबिक जीवन व त्याचें पावित्र्य

त्याचप्रमाणें कौटुंबिक जीवन व त्याचें पावित्र्य ह्याकडे नारायणरावांचें विशेष लक्ष[२] व असे ही बाब सामाजिक सुधारणेच्या बाबीमध्येंच आणिली पाहिजे असा त्यांचा आग्रह असे. त्यांच्या ठिकाणीं अखिल स्त्रीजातीविषयीं आदरबुद्धि होती व ती त्यांच्या चरित्राचें विशिष्टत्व स्थापन करीत असे. 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः' ह्या वचनाची आठवण सर्वांस असते व महाराष्ट्रांतील एका प्रसिद्ध मासिकाच्या शिरोभागीं हें वचन नित्य झळकत असे त्यामुळें तें वचन सर्व महाराष्ट्रीयांच्या चांगलें परिचयाचें झालें आहे. त्याचप्रमाणें आज पर्यंत ज्यांनीं ज्यांनीं सामाजिक सुधारणेच्या कार्यीं पुढाकार घेतला त्या सर्वांच्या ठिकाणीं स्त्रियांविषयीं साधारणतः आदरबुद्धि वसत होती व वसत आहे, हें स्थूल मानानें खरें आहे. नारायणरावांच्या लेखांचें वाचन व मनन करणारांच्या ध्यानांत स्त्रिया विषयींची त्यांची विशेष आदरबुद्धि, येईलच[३], पण त्याहीपेक्षां त्यांचीं व्याख्यानें ज्यांनीं प्रत्यक्ष ऐकिलीं आहेत, त्यांच्याशीं संभाषणाचा ज्यांना योग आलेला आहे त्यांच्या ही गोष्ट तात्काल लक्षांत येत असे. स्त्रियांसंबंधानें अनेक बाबतींत होत असलेल्या अन्यायां-

---

१. We complain that Hindu Society has a deep-seated prejudice against social reform; but once convince it that you are men of moral excellence, that you lead and insist upon others leading lives of rectitude, and that all your plans and proposals of reform centre round that as the cardinal principle of faith, you cannot fail to attract its attention, engage its sympathies and at last secure its support.

२. The life of the householder, the life of home is the best, the most ideal, favoured of man and God.

३. "Ideals of Womanhood" ह्या व्याख्यानांत नारायणराव म्हणतात :—
Woman is the genius presiding not only over the domesticities but also the humanities of life. To her is given the faculty to do the good and see the better and to achieve it ; to achieve it by worship—The worship consisting in constant action, and the action consisting in ceaseless aspiration.

संबंधानें बोलत असतांना क्रोधानें लाल झालेली ती मूर्ति, त्यांच्या गुणांचें वर्णन करीत असतांना त्या गुणांतच मुरलेली ती सौम्य वृत्ति, तोंडावरील ती प्रसन्नता व तें सौम्य हास्य, तो उल्हास, आपल्या विचारांस योग्य स्फुटता मिळावी म्हणून होणारी ती यथार्थ शब्दयोजना, व बिनचूक विचारसरणी ह्यांच्याद्वारें त्यांची आदरबुद्धि सूचित होत असे. त्यांना असें वाटे कीं, व्यक्तिमात्राच्या खऱ्या सुखाचा पाया कौटुंबिक जीवन झाला पाहिजे. आणि त्यांचा स्वतःचा अनुभव तसाच होता. कौटुंबिक जीवनाचें पावित्र्य, कौटुंबिक जीवनांतील स्वास्थ्य व शांति, आणि कौटुंबिक जीवनांतील धर्मशीलता ह्यांवर देशाचा उद्धार अवलंबून आहे असा त्यांचा अनुभव होता आणि हें सर्व स्त्रियांच्याच द्वारें साध्य होणें शक्य आहे असा त्यांचा दृढ विश्वास होता. म्हणून आपल्या एका व्याख्यानांत त्यांनीं असें सांगितलें कीं, समाज व सरकार ह्यांस एकजीव करण्याचें मुख्य साधन कौटुंबिक जीवन होय! कौटुंबिक जीवनाची छाप आमच्या सामाजिक, औद्योगिक व राजकीय जीवनावर पडते. ज्या मानानें कौटुंबिक जीवन पवित्र व चांगलें असेल, त्या मानानें समाज पवित्र व चांगला होईल. ज्याप्रमाणानें कौटुंबिक जीवन अनुकरणीय, महनीय असेल त्याप्रमाणानें सर्व समाज होईल. आणि आपण हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, स्त्री ही कुटुंबांतील अधिष्ठात्री देवता आहे.[१]

१८८१ सालीं नारायणरावांस जो एक अनुभव आला त्याचा त्यांस पुढील सबंध आयुष्यांत विसर पडला नाहीं. Heart of Hinduism वरील एका लेखांत तो अनुभव त्यांनीं निवेदिला आहे. तो येथें दिला असतां अधिक परिणामकारक होईल असें जाणून तो येथें दिला आहे. नारायणराव लिहितात :—

" स्त्री, मग ती आई असो, पत्नी असो, बहीण असो, अगर मैत्रीण असो, ती मार्ग चुकलेल्या पुरुषाला मार्गावर आणणारी, त्याचा पशुभाव नष्ट करणारी, व त्याला योग्य वेळीं खरा मार्ग दाखविणारी देवता आहे. परंतु पुष्कळ वेळां कौटुंबिक जीवनामध्यें स्त्रीसंबंधानें असा अनुभव आला नाहीं तर तो दोष कोणाचा असतो? आम्हीं आमच्या स्त्रियांना निर्दयतेनें वागविलें आहे. तिचा दर्जा कमी करून टाकला आहे. तरीसुद्धां किती तरी स्त्रिया आपल्या दुराचरणी पतीसाठीं

१. The cementing bond of society and state is the home. What the home-life of the people is, that will be its social, industrial and political life. The pure home, a good home, a great home means a pure society, a great society, a pure state and a great state. And the presiding genius of the home is the woman.

—*Woman Soul*

स्वार्थत्याग करितात! नाना उपायांची योजना करून त्यांना सुधारण्याचा, सन्मार्गावर आणण्याचा प्रयत्न, नाना प्रकारचा छळ व मारहाण सहन करून करितात! आणि किती तरी पुरुषांना सर्व प्रकारें दुराचरण केल्यानंतर ज्या पत्नीला आपण क्रूरपणें वागविलें, जिचा अनादर केला, जिला छळलें, तीच अखेरीस आपलें विसाव्याचें स्थान होय असा अनुभव आला आहे! माझ्या अनुभवांतील एकच गोष्ट येथें दिल्यानें माझा मुद्दा वाचकांच्या सहज लक्षांत येण्यासारखा आहे.

१८८१ सालांतील ती गोष्ट. मी वकिलीला नुक्ताच प्रारंभ केला होता. एकदां एक वृद्ध गृहस्थ मला भेटावयास आले. त्यावेळीं डोळ्यांत टिपें आणून त्यांनीं मला आपली जी हकीकत सांगितली व जो उपदेश केला त्याचा मला केव्हांही विसर पडणार नाहीं. ते म्हणाले, "मुला, मी एक म्हातारा आहें, केव्हां मला येथून जावें लागेल याचा नियम नाहीं. परीक्षेमधलें तुझें सुयश पाहून मला फार आनंद वाटला व तुझें अभिनंदन करण्यासाठीं मी आलों आहें, पण अभिनंदनापेक्षां तुझ्या हिताचे दोन शब्द सांगण्यासाठीं मी आलों आहें हेंच खरें. पहा, व्यसनी, चैनी जीवनापासून दूर रहा. कौटुंबिक जीवनास प्राधान्य देऊन नेहमीं आपल्या मुलांमाणसांत, आपल्या कुटुंबांत रहा. माझ्याकडे पहा. माझे डोळे बहुतेक गेले आहेत, शरीर दुबळें झालें आहे व नेहमीं कांहींनाकांहीं दुखणें असतेंच! हा सगळा कशाचा परिणाम आहे असें तुला वाटतें? माझ्या तरुणपणीं मी चैनींत आयुष्य घालविलें. रात्रभर भटकावें, चैन करावी, व घरीं पहाटे तीन किंवा चार वाजतां परतावें. पण घरीं आल्यावर मला काय आढळून येत असे? एक लहानसा दिवा मिणमिण जळतो आहे आणि माझी बायको त्याच्याजवळ बसून डोळ्यांतून टिपें गाळीत आहे! कित्येक महिने तिनें मला माझ्या हिताचा उपदेश करून पाहिला, पण त्याचा मोबदला मारहाणीच्या रूपानें जेव्हां मी तिला देऊं लागलों व जेव्हां तिच्या हें ध्यानांत येऊन चुकलें कीं, तिनें माझ्या हिताच्या दोन गोष्टी सांगितल्यानंतर मी अधिक व्यसनी होऊं लागलों, तेव्हां ती मला बोलेनाशी झाली! रोज मी परत आलों कीं तिनें कांहीं-तरी शहाणपणाचा उपदेश करावा व मीं तिला चोपावें अशी माझी मोठी इच्छा असे; पण ती पुढें एक शब्द तोंडावाटे काढीनाशी झाली! माझ्या पावलांची चाहूल ऐकिली कीं तिनें उठावें व निमूटपणें दरवाजा उघडावा! रात्रभर डोळ्यांतून अश्रुधारा वहात आहेत अशा स्थितींत ती ह्या चांडाळाची तिष्ठत वाट पहात बसावयाची. तिला शांत पाहून मीही शांत राहात असें. क्षणभर मला माझ्या आचरणाबद्दल पश्चात्तापही होई. पण तो तेवढ्या वेळेपुरताच! चैन करण्याचें

मला पुरेंच वेड लागलें होतें, त्यांत कांहींही कमी न करितां, शरीराच्या दृष्टीनें चैन करणें अशक्य होईपर्यंत मी अनाचार केला व आज माझी ही अशी स्थिति झाली आहे. आणि त्या उदार, सहनशील, सद्‌गुणी शांत वृत्तीच्या माझ्या बायकोनें सर्व छळ, यातना शांतपणें सहन केल्या. तिचा नवरा म्हणवून घेण्यासही मी अपात्र आहें. तिच्या ह्या स्वार्थत्यागानें मला बहुमोल धडा शिकविला आहे. पण, आतां काय त्याचें ? तरीपण मी असें कां म्हणावें ? अशा बायकोच्या सहवासांत असणें म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वराच्या सहवासांत असण्यासारखें आहे. आणि आज जरी मी अशा दुबळ्या स्थितींत आहें, व आयुष्याचा सर्वपरी दुरुपयोग केल्यानें ही कुडी सोडून जाणें हें बरें असें जरी कधीं काळीं वाटतें, तरी तिच्या संबंधानें माझ्या हातून झालेलीं पातकें धुऊन काढण्यासाठीं व तिला सुख देण्यासाठींच आणखी जगावें असें मला वाटतें. बाबा, माझ्या ह्या चरित्रापासून धडा घे व ह्य संसार सुखानें कर."

आधींच नारायणराव उच्च विचार व आचार ह्यांच्या वातावरणांत वावरत होते, आपलीं उच्च ध्येयें त्यांनीं ठरविलीं होतीं, त्यांनुसार आचरणास त्यांनीं प्रारंभ केला होता, अशा वेळीं वृद्धाचा ह्य उपदेश आपल्या पुढील कार्यांची रूपरेषा दृष्टीपुढें आणण्यास कारण झाला असावा. ह्या उदाहरणाचा त्यांस केव्हांही विसर पडला नाहीं, एवढेंच नव्हे, तर कुटुंबाचें पावित्र्य व स्त्री ही कुटुंबाची देवता हें ध्येय जेव्हां जेव्हां संधी येई तेव्हां तेव्हां लोकांपुढें ठेवण्यास ते विसरत नसत.

अशाप्रकारें स्त्रीजातीसंबंधाचा आदर व कौटुंबिक जीवनाचें पावित्र्य स्पष्ट रीतीनें लोकांपुढें ठेवणारे व ह्या बाबतींत आपला स्वतःचा अनुभव विविधप्रकारें निवेदणारे एकटे नारायणरावच होते असें म्हटलें असतां अतिशयोक्ति व्हावयाची नाहीं. मागील टीपांत उद्धृत केलेले विचार प्रदर्शित करावयास त्यांच्या दृष्टिक्षेपांत आलेली अनेक कुटुंबांची केविलवाणी स्थिति कारण झाली असावी. कारण, बाहेर न्यायाच्या गोष्टी सांगून स्वतःच्या कुटुंबांत पदोपदीं अन्यायाचा बाजार घालणारे, स्वतः दयेचीं कामें बाहेर करून दुष्टपणाचा अनुभव कुटुंबांत आणून देणारे, स्त्रियांस सन्मानानें वागविण्याविषयीं लोकांस उपदेश करून स्वतःच्या कुटुंबांत पदोपदीं त्यांचा अपमान करणारे, पावित्र्याच्या गप्पा मारून स्वतः अपावित्र्यामध्यें नांदणारे, लोकांच्या स्त्रिया, लोकांचीं मुलें, लोकांचीं कुटुंबें ह्यांच्याविषयीं आस्था दाखवून स्वतःच्या कुटुंबांतील स्त्रियांची, स्वतःच्या कुटुंबाची व मुलांबाळांची आबाळ करणारे, लोकसेवक, लोकहितकारी म्हणून मिरविणारे पुढारी यांच्या दृष्टीपुढें असून त्यांच्या चरित्रांकडे पाहून हे व असे उद्गार त्यांनीं काढिले

असावेत असें मानावयास पुष्कळ जागा आहे. परोपदेशे पांडित्यम् न लढवितां कुडींत प्राण असे तोंवर The presiding genius of the home is the woman ह्या तत्त्वानुसार नारायणराव वागले, असें त्यांच्या कौटुंबिक जीवनाकडे पहातां आपल्याला सहज म्हणतां येतें. आपणां आर्य लोकांमध्यें पतिपत्नीचा संबंध मोठ्या प्रेमाचा व निष्ठेचा असतो. आमच्या स्त्रियांमध्यें आढळणाऱ्या पतिनिष्ठे-सारखी पतिनिष्ठा कोठल्याही देशांत पहावयास सांपडावयाची नाहीं. सामाजिक सुधारणांतर्गत व आपल्या मनाला न पटणाऱ्या कित्येक गोष्टी आपल्या पतीची इभ्रत राखण्यासाठीं करावयास आमच्या स्त्रिया तयार होतात. नारायणरावांना आपली पत्नी सौ. लक्ष्मीबाई ह्यांच्यासंबंधानें जो अनुभव आला तोच विशेषतः वरील उद्गार काढावयास कारण झाला असावा. लक्ष्मीबाईंची समयसूचकता, त्यांची निष्ठा, त्यांची दूरवर दृष्टी, त्यांचा साधेपणा, त्यांचें प्रसंगावधान, व आपपरभाव विसरून प्रेम करण्याची त्यांची वृत्ति पाहूनच नारायणरावांच्या ठिकाणीं आपल्या पत्नीसंबं-धानें विशेष आदराची व अभिमानाची भावना जागृत झाली होती. खरें पाहिलें तर ज्ञान व विद्वत्ता ह्यांचा विचार करितां बिचाऱ्या लक्ष्मीबाईंना नारायणरावांची बरोबरी करितां येणें शक्य नव्हतें. परंतु त्यांना असा अनुभव येत गेला कीं, पतीच्या वाढत्या दर्जाबरोबर आपली जबाबदारीही वाढत आहे ह्याची जागृति लक्ष्मीबाईंच्या ठिकाणीं उत्पन्न झाली. नारायणरावांना स्वतःच्या मातेच्या जीवनाचा आलेला अनु-भव, पत्नीच्या सौजन्याचा, सुविचाराचा, कल्पकतेचा, परोपकाररततेचा व प्रेमळ अंतःकरणाचा आलेला अनुभव, स्त्रीजातीविषयींचा त्यांचा आदर दृढ करीत होता. सारांश, त्यांचें स्वतःचें कौटुंबिक जीवन इतकें महनीय होतें, त्यांचें कुटुंब (Home) त्यांस इतकें निवाऱ्याचें स्थान वाटत असे, तेथील वातावरण त्यांस इतकें उल्हास-जनक वाटत असे कीं, बाहेरचीं कार्यें करावयास जो उत्साह प्राप्त होत असे, त्याचें उगमस्थान त्यांचें कौटुंबिक जीवन होतें, ह्याविषयीं कांहीं संशय नाहीं. त्यांच्या सामर्थ्याचा जीवंत झरा त्यांच्या कौटुंबिक जीवनांत होता. घरांत स्वास्थ्य नाहीं, समाधान नाहीं, शांति नाहीं, सुख नाहीं, समरस होणारीं माणसें नाहींत, म्हणून बाहेरच्या कार्याशीं एकजीव होणाऱ्यांपैकीं ते नव्हते. आपल्याला आपल्या कौटुं-बिक जीवनांत जो सर्व सुखाचा जीवंत झरा सांपडला आहे तसा इतरांसही लाभावा एतदर्थ त्यांचे सर्व प्रयत्न असत. त्यांनीं स्वतःच्या कष्टानें मिळविलेली लक्ष्मी त्यांच्यापाशीं त्यांच्या हयातींत व मागेंही राहिली. परंतु त्यांची देवदत्त लक्ष्मी जेव्हां दृष्टिआड झाली,[1] तेव्हां त्यांचें जीवन ओसाड मैदानाप्रमाणें ओस झालें. पण

१. श्रीमती सौ. लेडी लक्ष्मीबाई चंदावरकर ह्यांना ता. २६ ज्यानुआरी १९२० रोजीं देवाज्ञा झाली.

त्यांच्या कुटुंबाची अधिष्ठात्री देवता जरी त्यांच्या दृष्टिआड झाली तरी ती त्यांच्या अंतःचक्षूच्या आड झाली नाहीं. १९२१ सालीं प्रार्थनासमाजाच्या उत्सवांत मुख्य दिवशीं भाषण करीत असतांना मुखावाटे डॉ. भांडारकरांसंबंधानें[1] उद्गार निघत असतांना त्यांचा कंठ दाटून आला, त्यांच्या नेत्रांवाटे सारख्या अश्रुधारा वाहूं लागल्या, ह्याचें कारण त्यांस त्यांच्या प्रियपत्नीची त्या वेळीं आठवण झाली. त्याचप्रमाणें एकदां तर नारायणराव गाढ झोपेंत असतांना त्यांना आपल्या प्रिय पत्नीचें दर्शन[2] झालें. त्यासंबंधानें त्यांनीं स्वतः लिहून ठेविलें आहे.

१. डॉ. भांडारकरांसंबंधानें उद्गार काढीत असतांना लक्ष्मीबाईची आठवण होणें ह्याचा संबंध काय असें सकृद्दर्शनीं कोणासही वाटण्याचा संभव आहे. त्याचें स्पष्टीकरण असें आहे. एके वर्षी उन्हाळ्यांत नारायणरावांचीं व डॉ. भांडारकरांचीं निरनिराळ्या विषयावर संभाषणें होत. एमिअल ह्या ग्रंथकाराविषयीं बोलणें निघालें त्यावेळीं डॉ. भांडारकर म्हणाले, "एमिअल म्हणतो कीं, सुखासाठीं मनुष्यास कांहीं तरी एक स्वतः ठरविलेलें साध्य, किंवा मध्यबिंदु असावा लागतो. पत्नीवरील प्रेम हा तो मध्यबिंदु किंवा हें तें साध्य. माझें तें साध्य गेलें आणि नारायणराव तुमचें तें आहे. देवानें त्याचा तुम्हांला पुष्कळ पुष्कळ वर्षे लाभ द्यावा अशी माझी प्रार्थना आहे." दुसऱ्या एका प्रसंगीं डॉ. भांडारकर व नारायणराव ह्यांचें कौटुंबिक जीवनासंबंधानें भाषण चालू असतां डॉ. भांडारकरांनीं पुढील आशयाचे उद्गार काढले होते: "आतां ( १९१६ ) माझ्या ह्या वयांत सुद्धां मला घरांतली सर्व व्यवस्था पहावी लागते. मला अगदीं बारीकसारीक व्यवहार पहावा लागतो. तुम्ही ह्या बाबतींत अगदीं सुखी आहां. लक्ष्मीबाई घरांतल्या कामाचा तुमच्यावर मुळींच बोजा पडूं देत नाहींत. कुटुंब असलं म्हणजे हा मोठा फायदा असतो. दुसरें, आपलें आपल्या कुटुंबावर जें शुद्ध व सात्त्विक प्रेम असतें व तिचेंही आपल्यावर जें प्रेम व आपल्याविषयीं तिची जी भक्ती असते त्याच्यायोगें आपल्याला देवाच्या प्रेमाची ओळख पटते." डॉ. भांडारकरांविषयीं बोलतांना नारायणरावांना ह्या उद्गारांची आठवण झाली असावी. त्याचप्रमाणें "ह्याच माझ्या घरांत कांहीं वर्षांपूर्वी मी, माझें कुटुंब, माझे मुलगे मुलगी, त्यांचीं मुलेंबाळें अशीं रहात होतीं, पण आतां पहा, माझें कुटुंब गेलें, माझी ज्येष्ठ कन्या निवर्तली, माझा ज्येष्ठ पुत्रही माझ्या समोर गेला आणि मी ह्या मुलांमाणसांनीं एकदां भरलेल्या घरांत एकटा येऊन राहिलों आहे. हे विचार मनांत आले म्हणजे तें दुःखानें व्याप्त होतें; पण देवाचा विचार मनांत आला, त्याला शरण गेलों, त्याची प्रार्थना केली म्हणजे मनाला शांति प्राप्त होते" ह्या डॉ. भांडारकरांचा अनुभव त्यांच्या दृष्टीपुढें असावा.

२. Vision of my beloved wife at night in sleep. It was glorious vision, it braced me when I awoke and I felt so fresh.

त्यावेळीं त्यांना इतका उल्हास वाटला कीं, पहाटेस ४ वाजतां ते उठले व प्रथम देवाची प्रार्थना करून त्यांनीं देवाचे आभार मानिले.[1] ह्या चवर्षी डिसेंबर महिन्यांत त्यांस ६५ वें वर्ष लागलें. यावेळीं आपल्या मागील आयुष्याची सोबतीण, आपल्या कुटुंबांतील अधिष्ठात्री देवता जी आपली पत्नी तिची त्यांस आठवण झाली. तेव्हां ते लिहितात :—

Alas ! the dearest companion no longer here to cheer ! God's will ! He knows what is best. ह्यावरून नारायणरावांच्या सर्व सुखाचा पाया, सर्व सुखाचें बीज, सर्व सुखाचें साधन, त्यांचें कौटुंबिक जीवन कसें होतें ह्याची आपल्याला कल्पना होते. अशा प्रकारचें कौटुंबिक जीवनसौख्य पुष्कळांच्या वांट्यास येतें, नाहीं असें नाहीं. पण त्यांना त्यांत विशेष कांहीं वाटत नाहीं. अशा सुखाचीं धनी जीं इतर माणसें त्यांना ह्या कौटुंबिक सुखाचा व देशाच्या उन्नतीचा कसा निकट संबंध आहे त्याची जाणीव नसते. परंतु नारायणरावांनीं हें दाखवून दिलें कीं, पवित्र, सुखी, चांगलें व थोर कुटुंब म्हणजेच (अशीं सर्व कुटुंबें झालीं म्हणजे) पवित्र, सुखी, चांगला व थोर योग्यतेचा समाज होणें शक्य असतें आणि कुटुंबास अशा प्रकारचें वळण लावून हें सामर्थ्य त्यांत आणण्याची पात्रता फक्त स्त्रींत आहे, म्हणून ती कुटुंबाची अधिष्ठात्री देवता होय.

स्त्रियांसंबंधानें नानाप्रकारचीं वर्णनें आपल्या जुन्या ग्रंथांतून आढळतात व आधुनिक काळीं आधुनिक पद्धतीनें केलेलीं त्यांचीं वर्णनें कमी नाहींत. परंतु कौटुंबिक जीवनाचें महत्व प्रस्थापित करून, स्त्रिया कुटुंबांच्या अधिष्ठात्री देवता आहेत हें दाखवून, देशाच्या त्या उद्धारक आहेत अशाविषयीं जागृति उत्पन्न करण्याचा प्रयत्न एकट्या नारायणरावांनींच केला आहे. त्यांना असें वाटत असे कीं, ज्या देवतेमुळें आपल्याला पावित्र्याचा, प्रेमाचा, शांतीचा, आनंदाचा व एकंदर कौटुंबिक सौख्याचा व स्वास्थ्याचा लाभ होत आहे तसा इतरांस व्हावा, अशा कुटुंबांची संख्या वाढावी, पावित्र्याचें, प्रेमाचें, देवाच्या सहवासप्रियतेचें वर्तुळ वाढावें, म्हणून पुढें ज्या निरनिराळ्या कुटुंबांच्या अधिष्ठात्र्या देवता होणार त्यांच्या शिक्षणाविषयीं त्यांनीं आस्था दाखविली व त्यांच्यापुढें हे विचार ठेविले. स्त्रियांच्या अनेक सभांत हे विचार त्यांनीं प्रदर्शित केले, स्त्रियांचा गौरव नारायणरावांनीं आपल्या लेखांत व भाषणांत जितका केला आहे तितका दुसऱ्या कोणत्या पुढाऱ्यानें केलेला नाहीं.

---

१. Opened my heart in thankfulness to God for the vision I had at night of my beloved—her company still vouchsafed to me in spirit.

नारायणरावांच्या ठिकाणीं आपल्या पत्नीवर असाधारण प्रेम होतें. लक्ष्मीबाई आधुनिक दृष्टीनें सुशिक्षित नव्हत्या. परंतु त्यांनीं आपण आपल्या पतिराजांस कोणत्याही प्रकारें कमीपणा येऊं नये अशी आपली तयारी केली. पूर्वी त्यांना मोठ्या सभेंत जाणें पसंत नसे, त्यांस गुदमरल्यासारखें व्हावें. पुढें त्या मोठमोठ्या सभा स्वतः चालवूं लागल्या. नारायणरावांनीं त्यांची प्रगति दाखविणाऱ्या किती तरी गोष्टी नमूद करून ठेविल्या आहेत. एकदां एका मुलींच्या शाळेचा बक्षिस समारंभ होता. नारायणराव अध्यक्षस्थान स्वीकारणार होते, भाषण ते करणार होते, व बक्षिसें लक्ष्मीबाई वांटणार होत्या. त्या दिवशीं सेशन्समध्यें नाशिक कटाचा खटला चालू असल्यामुळें नारायणरावांस समारंभास हजरही राहातां आलें नाहीं. डॉ. मॅकीकन ह्यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारिलें, पण लक्ष्मीबाईंनीं पंधरा मिनिटें भाषण करून सर्वांस थक्क करून टाकलें! हें ऐकून नारायणरावांस किती समाधान वाटलें![1]

१९१० सालापर्यंत लक्ष्मीबाई गव्हर्न्मेंट हाउसमध्यें भोजनसमारंभास कधीं हजर राहिल्या नव्हत्या. त्या सालीं त्या नारायणरावांबरोबर गेल्या व एके बाजूला स्वतः गव्हर्नरसाहेब, दुसऱ्या बाजूला आलेले पाहुणे राइट ऑनरेबल सर वुइल्यम मॅथर व मध्यें लक्ष्मीबाई अशी तेथें व्यवस्था आढळली! पण, लक्ष्मीबाई मुळींच घाबरल्या नाहींत व गव्हर्नरसाहेब व सर वुइल्यम ह्यांच्याशीं धीटपणें त्या बोलत होत्या व शेवटीं सर वुइल्यम ह्यांनीं त्यांस सांगितलें कीं, आपल्याशीं संभाषण करीत असतां मला फार महत्त्वाची माहिती मिळाली! ह्यावरून लहान मोठ्या, कुठल्याही मिश्र समाजांत जाऊन आपल्या पदवीप्रमाणें वागावयास त्या कशा सिद्ध झाल्या होत्या व त्यामुळें नारायणरावांस सर्व कार्यें कशीं सुरळीत पार पाडतां येत होतीं याची कल्पना होईल. पुष्कळ वेळां असा अनुभव येतो कीं, अधिकार व संपत्ति ह्यांचा लाभ झाला, म्हणजे त्याच्याबरोबर मोठेपणाच्या खोट्या कल्पनाही येतात व परोपकार, अंगमेहनत करून इतरांच्या उपयोगी पडणें वगैरे गोष्टींचा विसर पडतो व फार तर उंटावरून शेळ्या हांकल्या जातात. नारायणरावांस रात्रंदिवस असा अनुभव येत होता कीं, वाढत्या मोठेपणाबरोबर लक्ष्मीबाईंची परोपकारवृत्ति वाढत होती. घरांतलें कोणतेंही काम करणें त्यांना कमीपणाचें वाटत नसे व जातीनें त्या कामास लागत. पुण्याच्या समाजाचा १९११ सालांतील उत्सव

---

१. My wife addressed the girls in a speech of about fifteen minutes which I have heard from several present was well delivered and brought her encomiums of all present. Dr. Mackichan in his speech complimented her on her powers of oratory.

आटपल्यानंतर सर्व मंडळी धर्मसाधनासाठीं लोणावळ्यास गेली व त्यांनीं सर नारायण ह्यांच्या येथेंच तळ दिला! डॉ. भांडारकर वगैरे सर्व मंडळी होती. लक्ष्मीबाईंनीं जातीनें सर्व मेहनत करून परगांवीं असूनही अल्पावधींत भोजनाची उत्तम व्यवस्था केली व सर्व बेत इतका ठाकठीक ठेवला कीं, सर्वांस फार आश्चर्य वाटलें! डॉ. भांडारकरांनीं तर आधुनिक काळांतल्या तुम्ही द्रौपदीच आहां असें त्यांस म्हटलें![1]

लक्ष्मीबाईंची परहिताची कळकळ सक्रिय होती. आपल्या हातून होईल तितकें इतरांचें कल्याण करण्यासाठीं त्या जातीनें झटत. इतरांचें दुःख हलकें करण्यासाठीं त्या स्वतः झटत. त्यांच्या मदतीची कोणी अपेक्षा केली अगर न केली, तरी त्या इतरांच्या सहाय्यासाठीं स्वतःच्या प्रकृतीकडे न पहातां धांवून जात. ह्या बाबतींत स्वतः नारायणरावांनीं १९१६ सालीं लिहून ठेवलेली व लोणावळें येथें घडलेली हकीकत पुढें देतों, म्हणजे नारायणरावांच्या संसारसुखाविषयीं सर्वांस सहज कल्पना होईल :—

"आपण देवाचें कार्य करीत आहों ह्याची मुळींच जाणीव नसून तशा कार्यांत रत असलेली पत्नी असणें हें किती भाग्याचें! आज सकाळीं (१२–५–१९१६) मी आपल्या खोलींत लिहीत बसलों असतां एक तरुण मजकडे आला व मला सांगूं लागला कीं, मला श्री. राजू बाबाजी ह्यांनीं असा निरोप कळवावयास सांगितलें आहे कीं, नर्स मिळाली! नर्स? नर्स कशाला? आणि तिच्यासंबंधाचा निरोप राजू बाबाजींकडून काय म्हणून? त्यांना बिचाऱ्यांना कां त्रास! मला वाटलें माझी पुतणी इंदू हिला ताप येत होता म्हणून तिच्यासाठीं नर्स हवी असेल! चौकशीकरतां कळलें कीं, शेट राजू बाबाजी आपल्या नातीला घेऊन मुंबईस जाण्याच्या तयारींत असतां तिच्या पोटांत दुखूं लागलें! त्यांना वाटत

---

१. त्यावेळीं विलायतेंत असलेल्या आपल्या चिरंजीवाला लिहिलेल्या पत्रांत सर नारायण ह्यांनीं ह्या प्रसंगाचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे:—

We had a nice company here last Sunday—about forty members, ladies and gentlemen of the Prarthana Samaj of Poona, headed by Dr. Bhandarkar. They came from that place to spend here the concluding day of the 40th anniversary celebration of the Samaj. They were all our guests. Your mother acted the hostess splendidly. Dr. Bhandarkar complimented her as a modern Draupadi of the Mahabharata because within a few hours she had the breakfast ready and all the wants of the guests were attended to with quiet strength and becoming courtesy.

होतें कीं, पुरे दिवस भरावयास अद्याप अवकाश आहे, पण सकाळींच पोटांत दुखूं लागतांच त्यांची तारांबळ उडाली, ते वृद्ध गृहस्थ घाबरून गेले व घरांत दुसरें कोणी नसल्यामुळें त्यांनीं बाईंना ( लक्ष्मीबाईंना ) बोलाविलें. आज दोन वर्षें बाईंचा पाय दुखत आहे व त्यामुळें घरांत त्या मोठ्या प्रयासानें चालतात. पण वरील निरोप येतांच त्या राजू बाबाजींकडे चालत गेल्या! आपला दुखरा पाय घेऊन त्या ताबडतोब चालत गेलेल्या पाहून ते वृद्ध गृहस्थ गहिंवरले व त्यांच्या डोळ्यांत पाणी आलें! "बाईसाहेब! आपल्याला फार त्रास झाला. नातीला घेऊन मुंबईस जावयास निघलों तों तिच्या पोटांत दुखूं लागलें! मी असा म्हातारा, काय करावें तें सुचेना म्हणून आपल्याला तसदी दिली! आतां माझ्या जिवांत जीव आला आहे!" बाई मुलीजवळ बसल्या, तिची त्यांनीं समजूत घातली. घाबरण्याचें कांहीं कारण नाहीं, मुलगी संध्याकाळच्या सुमारास बाळंत होईल असें सांगितलें. मात्र गांवठी सुइणीवर अवलंबून राहूं नका, पास झालेली सुईण आणा, असें सांगून व दोघांनाही धीर देऊन त्या परतल्या. "अहो, पण हा दुखरा पाय घेऊन तेथपर्यंत चालत गेलांत तरी कशा" असें विचारतां त्या म्हणाल्या "गेलें तशीच चालत, झालें. त्यांनीं मुद्दाम निरोप पाठविला, आणि ते अगदीं काळजींत आहेत असें कळल्यावर मला स्वस्थ बसवेल तरी कसें? मी तेथें गेलें, ह्याबद्दल मला किती तरी बरें वाटत आहे. नाहींतर त्या गांवठी सुइणीनें कांहीं तरी गोंधळ घातला असता आणि त्या पोरीच्या जिवाला अपायही होण्याची भीति होती. संध्याकाळीं पुन्हा बाई गेल्या, व ती मुलगी सुखरूपपणें बाळंतही झाली." ही हकीकत देऊन नारायणराव म्हणतात:—

This little act of duty on the part of my wife is one of numerous others of the kind. What a blessing she is!

लक्ष्मीबाईंची दृष्टी सर्वत्र असावयाची. नोकरमाणसांच्या येथें कांहीं घरगुती अडचण उपस्थित झाली कीं त्याची काळजी बाईंना! माळ्याच्या मुलांना लोणा-वळ्यासारख्या ठिकाणीं फार थंडी वाजत असेल म्हणून बाईंनीं कापड खरेदी करावें, त्यांनीं कपडे बेतावे व ते स्वतः शिवून मुलांना द्यावे! त्याशिवाय त्यांना समाधान वाटत नसे. ह्या अशा अनेक गोष्टी त्या सहज करीत व आपण कांहीं विशेष करीत आहों हा विचार त्यांना केव्हांही शिवत नसे. आपल्या स्वतःच्या अडचणींस न जुमानतां, त्यांनीं परांसाठीं खपावें. हें सर्व कोणत्याहीप्रकारें गाजावाजा न करितां त्या करीत असत. त्या स्वभावानें अत्यंत प्रेमळ व मनानें उदार होत्या. त्यांच्या प्रेमाची व विचारांची वाढ सारखी होत होती. लक्ष्मीबाईंच्या प्रकृतीस आराम नव्हता म्हणून सर नारायण त्यांस घेऊन कालिकत येथें जाऊन राहिले

होते. तेथें नारायणराव ब्राम्हसमाजाचें कार्य करीत असतां सर्वत्र साहजिक ओळखी झाल्या. कालिकत येथें एक चिरस्मरणीय गोष्ट घडली. कालिकतहून कांहीं अंतरावर एक कसरत करणारा मनुष्य रहात असे. त्याच्या कसरतींत एक अस्पृश्य मुलगा होता. हा मनुष्य लहान लहान मुलांकडून आश्चर्यचकित होण्यासारखे कसरतीचे प्रयोग करून दाखवीत असे. सर नारायण ह्यांच्या सन्मानार्थ केलेल्या सार्वजनिक प्रयोगाच्यावेळीं लक्ष्मीबाई प्रकृति तितकी ठीक नसल्यामुळें जाऊं शकल्या नाहींत, म्हणून त्या मनुष्यानें एक प्रयोग त्यांच्या राहत्या बंगल्यांत मुद्दाम करून दाखविला. त्यावेळीं एका लहान पण अस्पृश्य मुलानें सर्वांस थक्क करून टाकणारे अनेक प्रयोग केलेले पाहून लक्ष्मीबाईंना फार आनंद झाला. त्यांचें कोंवळें मन सद्गदित झालें. हें मूल अस्पृश्य आहे, ह्या प्रांतामध्यें सोंवळयाचें बंड फार आहे, हा विचार पळमात्रही मनांत न आणितां बाईंनीं प्रेमानें त्या मुलास आपल्याकडे घेतलें, त्याला कुरवाळिलें व त्याच्याशीं दोन प्रेमाचे शब्द त्या बोलल्या. त्या मुलानें केलेले आश्चर्यकारक प्रयोग पाहून लोक जितके थक्क झाले होते त्यापेक्षां लक्ष्मी-बाईंचें हें धैर्य व हा प्रेमळपणा पाहून त्यावेळीं लोकांस आश्चर्य वाटलें व बाई-विषयीं त्यांच्याठिकाणीं आदरभाव जागृत झाला. एकनाथ महाराजांनीं "अंत्यज तोक[1] कडे" घेतल्यासारखाच हा प्रकार झाला म्हणावयाचा. बाईंनीं एकदां कोणा-सही आपलें म्हटलें व त्यास आश्रय दिला म्हणजे मग त्याच्यावर सारखा प्रेमाचा वर्षाव व्हावा. मोठ्या कुटुंबांमध्यें कांहींशीं आश्रित भावानें राहणारीं व घरांतील मुलें ह्यांच्यामध्यें आपपरभाव दाखविण्याची पद्धत असते. पण बाईंच्या येथें हा भाव मुळींच नसे. कित्येक वर्षें त्यांच्या येथें अशा प्रकारें रहाणाऱ्यांनीं १९२० सालीं म्हटलें होतें "तीं त्या प्रेमळ माउलीच्या सहवासामध्यें गेलेलीं वर्षें मी कधीं तरी विसरेन काय? अंत समीप आला तेव्हां त्यांनीं घरांतील सर्व लहानमोठ्यांना आपल्याजवळ बोलाविलें व प्रत्येकास कांहीं बोधाचा शब्द सांगितला. पण मी अभागी, तो अलभ्य लाभ (मी येथें नसल्यामुळें) मला झाला नाहीं. त्यांनीं मला इतकें प्रेमानें वागविलें कीं, त्यांचीं प्रत्यक्ष मुलें व मजमध्यें त्यांनीं यत्किंचित तरी भेदभाव राखल्याचें मला स्मरत नाहीं. मला मी माझ्या आईपासून दूर आहें असें वाटत नसे. प्रेमभावा-मुळें मला माझ्या आईची आठवण व्हावी असें त्यांनीं कांहीं होऊं दिलें नाहीं. त्यामुळें सुट्टीच्या दिवसांतही त्यांच्यापासून दूर व्हावें असें मला वाटत नसे." दुसरें असें कीं त्या सहज रीतीनें उपकार करीत, व त्यांची फेड व्हावी अशी त्यांची केव्हांही अपेक्षा नसे. उपकारांचें स्मरण नसल्यासारखी जरी कोणाची वागणूक असली तरी तिकडे त्यांनीं पूर्ण दुर्लक्ष करावें. सारांश, संकटाच्या वेळीं

१. तोक = मूल.

मदत करावयास, वियोगाच्या वेळीं धीर द्यावयास, आजाराच्या वेळीं आपल्या प्रेमाचा आधार देऊन वृत्ति उल्हसित करावयास त्या सिद्ध असत. अशावेळीं स्वतःच्या प्रकृतीचें अस्वास्थ्य, आपल्या अडचणी ह्यांचा विचारही मनांत न आणितां इतरांच्या सहाय्यासाठीं, दोन प्रेमाचे शब्द बोलून इतरांचा दुःखभार हलका करण्यासाठीं त्या कशा धांव घेत तें मीं स्वतः अनुभविलें आहे. बाईंची सर्व कार्यांतील दक्षता विशेष होती. त्यांची बुद्धि तीक्ष्ण व परिस्थितीविषयींचें त्यांचें अनुमान बिनचूक असे. संसारांतील त्यांची दक्षता, इतरांच्या सुखाविषयींची त्यांची दक्षता, स्वतःच्या कर्तव्यासंबंधाची त्यांची जाज्वल्य जागृति ह्या त्यांच्या असामान्य गुणांमुळें त्यांनीं कितीतरी लोकांना सुखी केल्याचें आम्हांस माहीत आहे. किती मुलींना योग्य वर पाहून देऊन त्यांनीं सुखी केलें आहे. संकटाच्या वेळीं योग्य सल्ला देऊन कितीतरी कुटुंबांचें स्वास्थ्य त्यांनीं राखिलें आहे, धीर देऊन कितीतरी व्यक्तींना त्यांनीं कर्तव्याचे मार्ग दाखविले आहेत. आपण स्वतः आनंदी राहून कितीतरी कुटुंबांना त्यांनीं आनंदी केलें आहे. त्यांच्याशीं संभाषणाचा योग आला म्हणजे त्यांची तीक्ष्ण बुद्धि, निश्चयी वृत्ति, प्रबळ इच्छाशक्ति, अनेक प्रचलित विषयांवरील त्यांचें बिनचूक ज्ञान, सामाजिक बाबतींतील त्यांचे उदार विचार, त्यांची सत्यनिष्ठा व त्यांचा करारी स्वभाव ह्याची जाणीव होत असे.

नारायणरावांना बाहेर कितीही महत्वाचीं कामें असलीं तरी तीं पार पाडून घरीं येऊन आपल्या माणसांच्या सहवासांत राहण्याची ओढ फार लागे. मुलांमध्यें मिसळावें, त्यांच्याशीं थट्टा विनोद करावा, त्यांच्या अभ्यासाविषयीं विचारपूस करावी व आपल्या कुटुंबाशीं नाना विषयांवर भाषण करावें हा त्यांचा क्रम नित्य असे. कौटुंबिक स्वास्थ्य व सुख हा आपल्या सुखाचा पाया आहे असें त्यांचें मत होतें. तें राखण्याचा त्यांचा प्रयत्न असे. त्यांचें कौटुंबिक जीवन आदर्शवत् होतें व आपलें मुलांबाळांनीं व आप्तांनीं भरलेलें घर हें त्यांचें निवाऱ्याचें स्थान होतें.

## सामाजिक परिषद

नारायणरावांनीं इंदुप्रकाश पत्राचीं सूत्रें हातीं घेतल्यापासून अखेरपर्यंत सामाजिक सुधारणेसंबंधानें ज्या चळवळी झाल्या त्यांत पुढाकार घेतला. संमतिवयाचें बिल, विधवाविवाहाच्या कार्याचा प्रसार, बसू बिल, समाज–सेवा–संघ, ( Social Service League ), वगैरे सर्व सामाजिक चळवळींत त्यांचा पुढाकार होता. १९०० सालच्या राष्ट्रीय सभेचें अध्यक्षस्थान त्यांनीं मंडित केलें होतें. राष्ट्रीय सभेबरोबरच सामाजिक परिषदेचें अधिवेशन पूर्वी भरत असे. ह्याचवेळीं न्या. मू. माधवराव रानडे ह्यांची प्रकृति अत्यवस्थ झाली व डॉक्टरांनीं लाहोरास न जाण्याचा त्यांस सल्ला दिला. कित्येक दिवस रोज रात्रीं १०॥ वाजतां त्यांच्या

हृदयांत कळ उठे व कांहीं वेळ त्यांस ह्यापेक्षां मरण बरें असें वाटत असे. सामाजिक परिषदेच्या बैठकीच्या सुमारास त्यांस जरी थोडा आराम वाटत होता व त्यांचे नित्याचे व्यवसाय जरी चालू होते तरी त्यांनीं प्रवास करणें इष्ट नव्हतें, म्हणून डॉक्टरांनीं लाहोरास त्यांस जाऊं दिलें नाहीं. त्यावेळीं माधवरावांस अत्यंत खेद झाला व त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा सुरू झाल्या ! ज्याप्रमाणें राजकीय विषयांचा खल करण्यासाठीं राष्ट्रीय सभा आहे, त्याचप्रमाणें सामाजिक विषयांचा खल करण्यासाठीं प्रातिनिधिक स्वरूपाची संस्था असावी हा मुख्य हेतु दृष्टीपुढें ठेवून माधवरावांच्या परिश्रमानें सामाजिक परिषद स्थापन झाली होती. देशाच्या निरनिराळ्या भागांत सामाजिक सुधारणेच्या एखाद्या अंगास प्राधान्य देऊन कार्य करणारीं माणसें माधवरावांस आढळत. ह्या सर्व माणसांच्या कामाची सर्वांस माहिती होणें व अशा सर्व कर्त्या माणसांनीं वर्षांतून एकदां तरी एकत्र होऊन आपपल्या प्रांतांतील कार्यासंबंधानें व अडचणींविषयीं सर्वांस कल्पना करून देण्याच्या हेतूनें अशा सर्व व्यक्तींस एकत्र आणण्याचें ठिकाण—सामाजिक परिषद—माधवरावांनीं निर्माण केलें.[1] आणखीही त्यांचा दुसरा हेतु होता. राष्ट्रीयसभेचें जनकत्व मि. ए. ओ. ह्यूम ह्यांच्याकडे जात असतें, तें रास्तच आहे. पण प्रथमपासून माधवरावांच्या सल्ल्यावांचून ह्यूम साहेबांचें पान हाललें नाहीं हें कांहीं खोटें नव्हे. जोंपर्यंत सरकारी नोकरांनीं राष्ट्रीय सभेस हजर राहण्याप्रेसंबंधानें प्रतिबंधनपर हुकूम नव्हता तोंपर्यंत माधवराव राष्ट्रीय सभेच्या बैठकींत प्रेक्षक ह्या नात्यानें जातीनें हजर असत. आणि एकदां तर त्यांनीं पटकन उठून भाषण केल्याची आठवण त्यांच्या चरित्रांत नमूद आहे. पुढें ते जरी हजर रहात नस्त, तरी त्यांचा सल्ला प्रत्येक महत्वाच्या कार्यांत घेतला जात असे, ह्यांत कांहीं शंका नाहीं. ह्यासाठीं ज्या ठिकाणीं राष्ट्रीय सभेचें अधिवेशन असेल त्याठिकाणीं आपणांस जावयास मिळावें म्हणून माधवरावांनीं सामाजिक परिषदेचें खूळ सुरू केलेलें आहे असें त्यांचे टीकाकार म्हणत ! राजकीय सुधारणा व सामाजिक सुधारणा ह्या चळवळी एकाच वेळीं झाल्या पाहिजेत असें त्यांचें स्पष्ट मत होतें, म्हणून त्यांनीं सामाजिक परिषदेची स्थापना केली, हेंच खरें व जोंपर्यंत सामर्थ्य होतें तोंपर्यंत

---

१. Differences of subjects, differences of castes, differences of provinces and districts, differences of languages separated the workers from one another.

There was no touch, no sympathy, not even the knowledge of the fact that they were fellow-workers among the early reformers.

ते परिषदेच्या[१] उन्नतीसाठीं जातीनें खपले. पुढच्या बैठकीचें काम माधवराव सबंध वर्षभर करीत, त्या प्रीत्यर्थ पाण्यासारखा पैसा खर्च करीत; हिंदुस्थानांतील कोनाकोपऱ्यांतील हितचिंतकांशीं पत्र व्यवहार करीत. अशाप्रकारें ज्या परिषदेचें त्यांनीं संगोपन केलें त्या परिषदेस हजर राहतां येत नाहीं हें पाहून त्यांस किती दुःख झालें असेल याची कल्पनाच करणें बरें. अशा स्थितींत त्यांनीं नारायणरावांस बोलावून त्यांना लाहोर येथें परिषदेचें सर्व काम पहाण्यास सांगितलें व सामाजिक परिषद् ही आपली अत्यंत प्रिय कन्या नारायणरावांच्या पदरांत घातली! त्यावर्षीं माधवरावांचें वसिष्ठ व विश्वामित्र हें व्याख्यान प्रो. गोखले ह्यांनीं वाचून दाखविलें. परत आल्यावर सर्व परिषदेची हकीकत नारायणरावांनीं जेव्हां माधवरावांस सांगितली व परिषद पूर्णपणें यशस्वी झाली हें त्यांच्या ध्यानांत आलें तेव्हां त्यांस फार समाधान वाटलें[२] व आपण सर्व प्रकारें लायक व्यक्तीच्या हवालीं सामाजिक परिषदेचीं सूत्रें करीत आहों, असें त्यांस त्यावेळीं वाटलें असावें.[३] १९०१ सालीं १६ जान्युआरी रोजीं रावसाहेब रानडे एकाएकीं परलोकवासी झाले व सामाजिक परिषदेसंबंधाची सर्व कामाची जबाबदारी नारायणरावांनीं आपल्याकडे घेतली, व गोपाळराव देवधरांची सेक्रेटरीच्या जागीं नेमणूक होई-पर्यंत त्यांनीं रानड्यांचें काम मनःपूर्वक केलें.

---

१. राष्ट्रीय सभेची मुंबईतली पहिली बैठक आटपल्यानंतर नामदार तेलंगांनीं टाइम्समध्यें पत्र लिहून असें जाहीर केलें कीं, राजकीय विषयांची चर्चा संपल्या-नंतर राष्ट्रीय सभेच्या बैठकींतच सामाजिक विषयांची चर्चा वेळ असला तर व्हावी अशी मूळ योजना होती. परंतु वेळेच्या अभावीं तसें झालें नाहीं; तथापि पुष्कळ मंडळी हजर असतांना दि. ब. रघुनाथराव व रा. ब. रानडे ह्यांचीं सामाजिक विषयांवर व्याख्यानें झालीं. (राष्ट्रीय सभेचा पहिला रिपोर्ट—पा. ८३—८४.)

२. The last letter he wrote to me was touching and all too generous acknowledgement of the little that I was glad to do at his bidding in connection with its proceedings at Lahore.

३. The last letter I had from him shortly before his death touchingly suggested that I should take active interest in the conferences.

प्रकरण सहावें

# प्रार्थनासमाजांत दाखल होण्यापूर्वी

१९११ सालीं सर नारायण चंदावरकर ह्यांच्या लेखांचा व व्याख्यानांचा संग्रह केलेला जो ग्रंथ **मनोरंजक ग्रंथ प्रसारक मंडळीनें** प्रसिद्ध केला त्यास श्री. के. नटराजन ह्यांनीं प्रस्तावना लिहिली आहे. त्यांत त्यांनीं एके ठिकाणीं असे उद्गार काढले आहेत कीं, "जरी सर्व प्रकारच्या सुधारणा ( देशोन्नतीस ) सहाय्यकारक आहेत, तरी स्वतः सर नारायण यांचा कल राजकारणापेक्षां सामाजिक किंवा धर्मविषयक चळवळींकडेच विशेष आहे."[१] दुसऱ्या एके ठिकाणीं त्याच प्रस्तावनेंत ते म्हणतात, "सर नारायण ह्यांस धर्म म्हणजे कांहीं ठराविक विधि पाळणें असें वाटत नाहीं. धर्म हें जीवन आहे, किंवा धर्माचा मनुष्याच्या जीवनाशीं अत्यंत निकट संबंध आहे असें त्यांचें म्हणणें आहे." ह्यानंतर जवळ जवळ बारा वर्षें सर नारायण ह्यांच्या सहवासाचा, कर्तृत्वाचा, विचारांचा व लेखांचा लाभ सर्वांना झाला. ह्याच एका तपाच्या काळांत त्यांच्या चरित्रांत आणखी विशेष महत्त्वाच्या घडामोडी झाल्या. ह्याच काळांत दीर्घ काळ परिचित झालेली मुंबापुरी त्यांची इंदूर येथील प्रधान दिवाणांच्या जागीं नेमणूक झाल्यामुळें अल्प काळपर्यंत त्यांस मुकली. संसारांतील संग्रामाच्या वेळीं त्यांस निवाऱ्याचीं दोन स्थानें होतीं, एक त्यांची गृहलक्ष्मी व दुसरें स्थान म्हणजे त्यांचा देव. ह्या निवाऱ्याचा एका स्थानाचा–गृहलक्ष्मीचा वियोग त्यांस ह्याच काळांत झाला. ह्याच काळांत नव्या कौन्सिलच्या मार्गदर्शकत्वाचा मान त्यांस मिळाला. सर नारायण ह्यांनीं कौन्सिलच्या अध्यक्षाच्या कार्याच्या पद्धतीचा जो पायंडा घातला त्यास अनुसरूनच आतांपर्यंत कार्य चाललें आहे. ह्याच काळांत त्यांचा विविध विषयांवरील लेखनव्यवसाय अधिक प्रमाणांत चालू होता; ह्याच काळांत हायस्कूलमध्यें

---

१. ह्याच ग्रंथावर अभिप्राय देतांना टाइम्सनेंही म्हटलें आहे :—

The cause which has been closest to his heart all through life is social and religious reform.

अभ्यास करणाऱ्या मुलांच्या नीतिशिक्षणासाठीं Light for life हें मद्रासच्या मॅकमिलन कंपनीसाठीं लिहिलेलें पुस्तक प्रसिद्ध झालें. ह्याच काळांत प्रचलित राजकारणावरील त्यांचे पुष्कळ लेख प्रसिद्ध झाले. परंतु हा अलीकडचा काळ घेतला काय, किंवा १८७५ पासून १९१३ पर्यंतचा ३७–३८ वर्षांचा काळ घेतला काय, त्यांच्या सर्व आयुष्यांत धर्म–जीवंत जागृत धर्म–केंद्रस्थानीं होता असें दिसून येईल. नारायणराव नाना विषयांवर लेख लिहीत, व्याख्यानें देत, परंतु कोणत्याही विषयाचें कोणत्याही प्रकारें त्यांनीं विवेचन केलें, तरी देव व धर्म ह्यांविषयीं विचार प्रत्यक्ष नाहीं तर अप्रत्यक्षपणें आल्यावांचून रहात नसे. ते राजकीय विषयावर व्याख्यान द्यावयास लागले तरी त्यांची धर्मनिष्ठा कोणत्याना कोणत्या रीतीनें व्यक्त झाल्यावांचून रहात नसे. त्यांच्या सर्व सामर्थ्याचें रहस्य देवावरील त्यांच्या दृढ विश्वासांत होतें, असें त्यांच्या एकंदर चरित्राकडे पाहिलें असतां म्हणतां येतें. त्यांनीं आपलें अखिल जीवन परमेश्वराच्या हवालीं केलें. ज्या ज्या वेळीं अडचणीचे, मनुष्याची मति सर्व प्रकारें गुंग करून टाकणाऱ्या परिस्थितींतून मार्ग काढण्याचे प्रसंग त्यांचेवर आले, त्या त्या वेळीं "**हात धरोनियां दावीं मज वाट । पुढें कोण नीट तेचि देवा**" अशा आशयाची त्यांनीं देवाची प्रार्थना केली व त्यांना "**जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती। चालविसी हातीं धरोनिया**" असा अनुभव आला. ही चरित्रलेखकाची, किंवा त्यांच्याविषयीं मनांत आदर बाळगणारांची केवळ कल्पना नव्हे. मृत्युपूर्वी पावशतक आधीं त्यांनीं असे उद्गार काढले आहेत कीं, "मी परमेश्वरावर पूर्ण विश्वास ठेवून आहें व त्यानें माझा अगर माझ्या माणसांचा केव्हांही त्याग केला नाहीं."[१] नारायणरावांचें हें लहानसें वाक्य जेव्हां माझ्या वाचण्यांत आलें, त्यावेळीं त्यांच्या एकंदर चारित्र्याची, एकंदर कर्तृत्वाची, तेजस्वी शीलाची किल्लीच मला सांपडली असें वाटलें.

ही आपली परमेश्वरावरील निष्ठा ते आपल्या लेखांत किंवा धर्मपर व्याख्यानांतच व्यक्त करीत असत असें मात्र नव्हे. ज्या ज्या वेळीं प्रसंग येईल त्या त्या वेळीं निरनिराळ्या रीतीनें ते ती जाहीर करीत असत. १८९७ सालीं नारायणराव युनिव्हर्सिटीतर्फे मुंबई कायदेकौन्सिलांत निवडून येण्याच्या खटपटींत होते. त्यावेळीं वकील ह्या नात्यानें त्यांचें काम फार वाढलें होतें. त्यांत कौन्सिलच्या कामाची भर पडली तर एकंदर कामाचा बोजा फार वाढेल, असें एका पत्रांत कारवार येथील त्यांच्या धाकट्या मामानें सुचविलें होतें. त्यास उत्तर देतांना नारायणराव ह्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे कीं, माझी निवडणूक झाली तर माझ्या कामाचा बोजा वाढेल हें खरें,

१. "I have trusted in God and He has never forsaken me or mine."

परंतु एकदां कोणतेंहि काम अंगावर घेतलें म्हणजे तें कर्तव्य ह्या दृष्टीनें झालेंच पाहिजे. देवावर माझा पूर्ण विश्वास आहे, त्यानेंच आजपर्यंत मला सामर्थ्य दिलें आहे व त्यानेंच मला नेहमीं सरळ मार्गांत ठेवलें आहे, असा माझा विश्वास आहे व माझा अनुभवही तसाच आहे.[१]

तुकारामासारख्या एखाद्या साधु पुरुषानें नानाप्रकारचे छळ व बिकट प्रसंग ह्यांचा अनुभव घेऊनही 'तुका म्हणे तूं गा कृपावंत भारी । ऐसें मज हरि कळों आलें' असें म्हणणें आणि आधुनिक काळीं 'मी देवावर भरिभार ठेवून राहिलों आणि देवानें माझा केव्हांही त्याग केला नाहीं' असें म्हणणें ह्यांत वस्तुतः कांहीं फरक नाहीं. तुकारामाचा भगवंतावरील दृढ विश्वास ज्याप्रमाणें पहिली उक्ति दर्शविते, त्याचप्रमाणें दुसरी उक्ति परमेश्वरावरील नारायणरावांच्या जीवंत जागृत विश्वासाची साक्ष पटविते. आणि हेंच नारायणरावांच्या सर्व सामर्थ्याचें, सर्व कर्तृत्वाचें, त्यांच्या असाधारण उद्योगरतीचें, त्यांच्या सहनशीलतेचें व त्यांच्या उल्हासी वृत्तीचें रहस्य होतें. जी धर्मनिष्ठा पुढें उत्कट स्वरूपांत व्यक्त झाली, अगर जी पुढें विकसित होत गेली तिचा पाया नारायणराव लहानपणीं आपल्या आजोळीं[२] असतांना घातला गेला होता हें विसरून चालावयाचें नाहीं. नदीचें मूळ प्रथम लहान असतें, पुढें त्याचा प्रचंड विस्तार होतो त्याप्रमाणें नारायणरावांचें झालें असें आज बिनदिक्कत म्हणतां येतें. आपल्या आजोबांवरील कन्याविरहाची हकीकत नारायणरावांनीं स्वतः दिलेली आपण वाचली आहे.[३] पुढें पुष्कळ वर्षांनीं नारायणराव न्यायमूर्ति झाल्यानंतर त्यांच्यावरही कन्याविरहाचा प्रसंग ओढवला. त्यावेळीं अशाच वियोगाच्या वेळीं आपल्या आजोबांनीं दाखविलेल्या धैर्याची नारायणरावांस आठवण झाली असावी. नारायणरावांच्या त्यावेळच्या वर्तनासंबंधानें सुबोधपत्रिकेंत पुढीलप्रमाणें उल्लेख आला होता. त्यांच्या आजोबांवरील प्रसंगाची त्यावेळीं लेखकास कांहींही माहिती नव्हती :—

"त्यांची ती गोजिरवाणी कनिष्ठ कन्या परलोकवासी झाली त्यावेळची नारायणरावांची शांत व समाहित वृत्ति पाहून आमच्यासारखीं माणसें अगदीं बुचकळ्यांतच पडलीं! जमलेली सर्व मंडळी अगदीं चित्रासारखी स्वस्थ बसली होती. नारायणरावांचें दुःख हलकें करावें म्हणून कोणी कांहीं विषय काढण्याचा विचार करीत होते, इतर मंडळी शांतपणें बसून आपली सहानुभूति व्यक्त करीत होती. अशा

---

१. पृ. १५१ मधील टीप पहा.

२. बालपण व शिक्षण पृ. १९–२२ पहा.

३. पृ. २१ पहा.

त्यावेळीं स्वत: नारायणराव दु:खानें वेडावलेले, विरहानें पोळलेले, आपलें बालक काळानें हिरावून नेलें म्हणून देवावर रागावलेले दिसले काय ? नाहीं ! उलट जमलेल्या मित्रमंडळींत बसून शांतपणें ते मृत्यूची मीमांसा करीत होते व अनेक कवि व तत्त्ववेत्ते ह्यांचे मृत्यूसंबंधाचे विचार ते इतरांस कळवीत होते. मरण पावलेलें बालक घरांत डोळ्यांसमोर असतांनाही त्यांची ही असामान्य स्थिर वृत्ति अनुभवून नारायणरावांच्या आध्यात्मिक सामर्थ्याची चांगलीच कल्पना झाली. ”

अशा प्रकारें ज्या आध्यात्मिकतेचा पाया बाळपणींच घातला गेला तिचा मुंबईस आल्यावर विकास कसा झाला; त्या विकासास अनुकूल परिस्थिति कशी प्राप्त होत गेली, व त्या परिस्थितीचा फायदा घेऊन त्यांनीं सर्व स्थितीचें निरीक्षण कसें केलें हें ह्या व पुढील प्रकरणांतील विवेचनावरून आढळून येईल.

पुढील शिक्षणासाठीं नारायणरावांस त्यांच्या मामांनीं मुंबईस आणिलें व तेव्हांपासून त्यांच्या सर्वांगीण विकासास प्रारंभ झाला. ते जर मुंबईस आलेच नसते तर काय झालें असतें हा विचार मनांत आला कीं मन क्षणमात्र गोंधळून जातें. कारण त्यांनीं आपल्या सर्व आयुष्यांत जें एकंदर महनीय कार्य केलें, त्यांची आध्यात्मिकता, त्यांचे लेख, त्यांचीं प्रवचनें, त्यांचें चारित्र्य, ह्यांचा जो आपणांस लाभ झाला, त्यांच्या कौटुंबिक जीवनाचें पावित्र्य आपल्या ध्यानांत आलें तें सर्व ते मुंबईत आले म्हणून ! पहिली गोष्ट अशी कीं, होनावर, कारवार व मुंबई येथें निरनिराळ्या वेळीं, निरनिराळ्या परिस्थितींत त्यांना जे अनुभव आले त्यांचा त्यांना पुढें विसर पडला नाहीं. सेंट मेरीमधील शिस्त, शिक्षकांचें निर्मळ आचरण व मुलांशीं प्रेमाचें व सरळ वर्तन, तसेंच त्यांची शिकविण्याची हौस ह्या सर्वांचा त्यांना विसर पडला नाहीं. शाळेंतील शिक्षकांचें वर्तन व पुढें कॉलेजांतील नामांकित अध्यापकांचा व मुलांचा येणारा निकट संबंध ध्यानांत ठेवून शिक्षकांच्या हातीं मुलांचें शील बनविणें किती तरी आहे याची त्यांनीं खूणगांठ बांधिली. पुढें योग्यवेळीं स्टूडंट्स ब्रदरहूड ह्या संस्थेच्या विद्यमानें त्यांनीं शीलसंवर्धनास अत्यंत सहाय्यभूत होणारीं व्याख्यानें दिलीं. इंग्रजी शाळेंतील शिक्षकांचे सर्व नियमबद्ध व्यवसाय, उद्यमशीलता, नेहेमीं वाचनांत गढून गेलेलें असणें, फुरसदीच्या वेळीं धर्मग्रंथांचें मनन ह्याचा बालवयांत झालेला परिणाम पुढें प्रौढपणींही ताजा होता. मुलें शिक्षणासाठीं विलायतेस गेलीं म्हणजे अशा गोष्टींकडे त्यांचें पुष्कळ वेळां दुर्लक्ष होतें असें त्यांनीं ऐकिलें होतें. हें लक्षांत ठेवून शिक्षणासाठीं विलायतेस गेलेल्या चिरंजीवास लिहिलेल्या एका पत्रांत ते म्हणतात :—

“सर्व कार्यांत वक्तशीरपणा, योग्यवेळीं योग्य प्रकारचें जेवणखाण, मनाला निरुद्योगी न ठेवणें, योग्य प्रमाणांत व्यायाम करणें, ह्या गोष्टी ध्यानांत ठेवून सर्व

गोष्टी वेळच्यावेळीं करण्याची संवय लावून घेतली पाहिजे." ह्यावरून आपला स्वतःचा विद्यार्थिदशेंतील अनुभव ध्यानांत ठेवून ते कसे वागत त्याची आपल्याला कल्पना होते.

नारायणरावांस त्यांचे मामा शामराव विठ्ठल ह्यांच्या सहवासामुळेंही फार लाभ झाला. ते पदवीधर नव्हते, तरी विद्वान् होते, चौकस होते, व त्यांचें अध्ययन दांडगें होतें. त्यांनीं आपल्या भाच्याला निरनिराळ्या संस्था दाखविल्या, त्यांची माहिती सांगितली, पण आपलीं मतें त्यांच्यावर लादलीं नाहींत. प्रार्थनासमाजाशीं त्यांचा परिचय मामांनीं करून दिला, व पुढें पुढाऱ्यांशीं नारायणरावांचा परिचयही झाला. परंतु ह्या समाजांत केवळ हीं मोठीं, विद्वान्, चारित्र्यवान् माणसें आहेत, म्हणून नारायणराव प्रार्थनासमाजांत[1] दाखल झाले नाहींत. त्यांनीं स्वतः समाजाच्या स्थापनेची माहिती मिळविली. समाजाची स्थापना होण्यापूर्वी परमहंस नामक जी संस्था अस्तित्वांत होती व जी १८६० च्या सुमारास बंद पडली तिची स्थापना, कार्य करण्याची पद्धत ह्यांविषयीं त्यांनीं माहिती गोळा केली. त्या संस्थेचें चुकलें असावें कोठें याचा त्यांनीं निश्चय ठरविला व नंतर ते प्रार्थनासमाजाचे १८८१ सालीं सभासद झाले. परमहंस सभेसंबंधानें प्रार्थनासमाजाच्या अनेक सभासदांनीं काढलेले उद्गार मीं ऐकिले आहेत. समाजाच्या स्थापनेपासून इहलोकींची यात्रा संपेपर्यंत प्रार्थनासमाजाचे अध्यक्ष असलेले डॉ. आत्माराम पांडुरंग ह्यांच्याशीं परमहंस सभेच्या धोरणासंबंधानें माझें भाषणही[2] झालेलें आहे. तथापि परमहंस सभेसंबंधानें जितकी सडेतोड, साधकबाधक कारणांचा विचार करून नारायणरावांनीं टीका केली आहे, तशी टीका प्रार्थनासमाजाच्या कोणत्याही सभासदानें केलेली माझ्या अवलोकनांत नाहीं. इंदुप्रकाश पत्रासाठीं एक टोपण नांव घेऊन १८८६ सालीं नारायणरावांनीं एक फार

---

१. एल्फिन्स्टन हायस्कूलमध्यें अभ्यास करीत असतांनाच त्यांचें ब्राह्मसमाजाकडे लक्ष वेधूं लागलें होतें. ते म्हणतात :—The *Indian Mirror* was one of the journals which influenced me in forming my opinions on religious and social reform when I was at school and college...I was first introduced to a percusal and its clos, who was then a pioneer of religious and social reform in Bombay—I refer to the late Mr. Wasudeo Babaji Navrange.

—*Indian Mirror Golden Jubilee Issue, 1910.*

२. ह्यांतील कांहीं भाग डॉ. आत्माराम पांडुरंग ह्यांच्या त्रोटक चरित्रांतून घेतला आहे.

महत्त्वाची लेखमाला लिहिली. ह्या मालेंतील एका लेखांत परमहंस सभेच्या कामगिरीवर व सभेच्या धोरणावर जी टीका आली आहे तिचेवरून प्रार्थना-समाजानें स्वीकारलेलें धोरण त्यांना पसंत पडलें म्हणून ते समाजांत दाखल झाले असें म्हणतां येतें. परमहंस सभेंत डॉ. आत्माराम पांडुरंग, डॉ. भांडारकर वगैरे मंडळी होती. त्या सभेचें धोरण चुकलें असें त्यांस वाटलें व माधवराव रानडे ह्यांनीं इंदुप्रकाशाचे संपादक ह्या नात्यानें 'धर्माचें महत्त्व' अशा अर्थाच्या सुंदर लेखांत "मनुष्यास दुसऱ्या सर्व गोष्टी मुबलक असल्या तरी त्यास नैसर्गिक रीत्याच धर्माची तहान कशी लागते, धर्माच्या आधारावांचून त्यास समाधान कसें प्राप्त होत नाहीं, अंतीं मनुष्याच्या व्यग्र चित्ताला धर्मच कसा शांति देऊं शकतो, ज्यावेळीं संचित ऐश्वर्याचा, आप्तस्वकीयांचा, मित्रबांधवांचा कांहींही उपयोग होत नाहीं, त्यावेळीं धर्मच कसा हात देतो, मनामध्यें नानाप्रकारचे विचार तरंग उत्पन्न झाले असतां, मन चिंतेनें व्यग्र होतें तेव्हां, अगर पापपुण्याचे विचार मनांत येतात त्यावेळीं, धर्मच व्यथित मनाचें कसें समधान करूं शकतो, निरनिराळ्या परस्परविरोधी विचारांचा सुळसुळाट झाला, अज्ञेयवाद, नास्तिकवाद, वस्तुवाद वगैरे नव्यानव्या विषयांनीं देव धर्म, पापपुण्य, ,एतद्विषयक विचारांस दाबून टाकण्याचा कडेलोट प्रयत्न केला, तरी अंतीं धर्माची आवश्यकता मनुष्याला भासतेच व धर्माचा आश्रय केल्यावांचून शांति प्राप्त होत नाहीं" हा विचार पुढें आणावयास प्रारंभ केला. नंतर १८६७ सालीं प्रार्थनासमाजाची स्थापना झाली. ह्या स्थापनेसंबंधानें डॉ. भांडारकरांनीं काढलेले उद्गार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. "पुढें परमहंस सभेच्या कांहीं सभासदांस असें वाटूं लागलें कीं, सामाजिक सुधारणा ही जर चिरस्थायी व एकंदर समाजाच्या कल्याणास पोषक व्हावयास हवी तर तिचा पाया धार्मिक सुधारणा हा झाला पाहिजे. म्हणून त्यांनीं कलकत्त्याच्या ब्राम्हसमाजाच्या नमुन्यावर येथें प्रार्थनासमाजाची स्थापना केली. ( They organised the Theistic Body of the Prarthana Samaj on the model of the Brahma Samaj of Calcutta ). ईश्वराचें पितृत्व व मनुष्याचें भ्रातृत्व हीं दोन मुख्य तत्त्वें ह्या संस्थेचीं आहेत. जातिभेद नाहींसा करणें हें तत्त्व ह्यांत अंतर्गत असूनही त्यांत आणखी एक असा भाव आहे कीं, उच्चनीच भाव मनांत आणावयाचाच नाहीं. सर्व एका परमेश्वराचीं लेंकरें, सर्वांचा अधिकार समान, इतकी मजल मारावयास इतर संस्था तयार नसतात." ही सर्व हकीकत येथें देण्याचें कारण इतकेंच कीं, खरें पहातां परमहंस सभेच्या धोरणावर ही प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष टीका आहे. तथापि नारायणरावांनीं परमहंस सभेचा जसा समाचार घेतला तसा प्रार्थनासमाजाच्या दुसऱ्या कोणाही सभासदानें घेतला नाहीं,

असें वर म्हटलेंच आहे. परमहंस सभेचें चुकलें कोठें हें ध्यानांत ठेवून त्यांनीं पुढें ४० वर्षे समाजकार्य केलें. त्यांनीं आपल्या लेखांत परमहंस सभेच्या स्थापनेचा इतिहास, सभेचें कार्य व सभासद इ० विषयींही माहिती दिली आहे. ती येथें न देतां सभा मोडण्यास झालेल्या कारणांची मीमांसा करितांना त्यांनीं केलेल्या टीकेचें स्वरूप येथें दाखवितों.

"ह्या सभेच्या दर आठवड्याच्या सभेंत सामाजिक विषयांवर थोडा वादविवाद व नवीन सभासदांस दीक्षा देणें ह्यापेक्षां विशेष कांहीं होत नसे. परंतु दरसाल एक मोठें सहभोजन होत असे. ह्या सहभोजनास सर्व शाखांचे सभासद येत असत. त्यावेळीं कोणत्याही प्रकारें जातिभेद पाळण्यांत येत नसे. आलेली सर्व मंडळी मोठ्या आनंदानें, सर्वांशीं मिळून मिसळून वागत असत. त्यावेळीं भलत्या सलत्या विषयावर गप्पासप्पा होत नसत. त्याचप्रमाणें जेवणाचा प्रकार अगदीं साधा असे. त्यांत अभक्ष्य व अपेय अशा सर्व वस्तूंवर पूर्ण बहिष्कार असे. (And at the dinner spirituous drinks of every sort, and heterodox food of every kind used to be rigorously excluded) ज्यांना ह्या सभेविषयीं कांहीं खरी माहिती नव्हती, किंवा ज्यांनीं भलत्या सलत्या कंड्या ऐकल्या होत्या व ज्यांना त्या खऱ्या वाटत होत्या, त्यांना परमहंस सभा म्हणजे हव्या त्या निषिद्ध मानलेल्या पदार्थांवर चोरून ताव मारण्याचें किंवा अपेयपान करण्याचें गुप्त ठिकाण असाच समज होऊन बसला होता. आणि सर्व प्रकार गुप्तपणें करणें किंवा रोटीपाव मुद्दाम खाणें, भिस्त्याच्या हातचें पाणी पिणें हे जे आवश्यक प्रकार तिकडे होत असत त्यांमुळें वरील सारखे समज त्यावेळीं रूढ होते व ते आजही नाहींत असें नाहीं. जातिभेदावर आपला विश्वास नाहीं असें दाखविण्यासाठीं वरील प्रकार होत असत. ह्या संस्थेचे जे पुढारी म्हणून गृहस्थ होते ते सर्व सदाचारसंपन्न व देशहितेच्छु गृहस्थ होते. त्यांचा हेतु इतकाच होता कीं, जातिभेद अमान्य असणारीं माणसें प्रथम एकत्र करावयाचीं व अशा लोकांची संख्या मोठी झाली व संस्थेस सान्य असणाऱ्या विचारांस समाजांत मान्यता मिळत आहे असें आढळून आलें कीं, मग संस्थेचा हेतु जाहीर करावयाचा व सर्व व्यवहारही जाहीररीतीनें करावयाचे. पण असें करण्याची वेळच आली नाहीं! हिंदुसमाजांतील पुराणप्रियतेवर गुप्तरीतीनें घाव घालून ती घालविण्याचा प्रयत्न करणें ही सहजसाध्य गोष्ट नव्हती. संस्थेचें ध्येय उच्च होतें, सदाचरणी माणसांकडे संस्थेचें धुरीणत्व होतें, त्यांच्याठिकाणीं संस्थेविषयीं जागृत कळकळ होती हें सर्व खरें. तथापि एक लहानशी गोष्ट संस्था नामशेष व्हावयास पुरेशी[१] झाली! कोणी

---

१. And yet an apparently trifle incident sufficed to bring it down and effect its ruin completely and without any difficulty.

एक मनुष्य संस्थेचें सर्व दप्तर लांबवितो का, आणि सर्व नांवें व आजपर्यंतचे सर्व गुप्त व्यवहार चवाठ्यावर येतील ह्या भीतीनें संस्थेच्या अस्तित्वावरच गदा येते काय! जोंपर्यंत सर्व व्यवहार गुप्तपणें चालत होते व लोकांत सभेच्या कार्याविषयीं चर्चा होत नव्हती तोंपर्यंत सर्व कांहीं ठीक होतें. पण नुसतें दप्तर हरवलें असें कळतांच कित्येकांच्या छातींत धडकी भरली, आपापल्या जातींकडून होणाऱ्या छळांचीं भेसूर चित्रें त्यांच्या पुढें उभीं राहिलीं व त्यांनीं मागें पळ काढला, संस्था व तिचीं ध्येयें ह्यांस ते विसरले; ज्यांची अशी गाळण उडाली नव्हती व ध्येयनिष्ठा ज्यांच्यांत अधिक होती ते आपले सहकारी आपल्याला सोडून गेले असें पाहून निराश व हताश झाले व त्यांनींही संस्थेसंबंधानें सर्व आशा सोडून दिली![1] आणि हें असें झालें ह्याच्याबद्दल फारसें आश्चर्य वाटावयास नको. शेंकडों व हजारों वर्षें चालत आलेले आचार, ज्यांच्याविषयीं अंधश्रद्धा उत्पन्न झाल्यामुळें ज्यांस धर्माचारांचें स्वरूप प्राप्त झालें होतें असे आचार गुप्तपणें उपाययोजना करून घालविण्याचा प्रयत्न करणें हा केवळ वेडेपणा होय. जातिभेदामुळें सर्वत्र पांगलेल्या लोकांना एकत्र करावयाचें व त्यांच्यांत एकराष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न करावयाची तर त्या कार्यीं गुप्त उपायांची योजना हें अगदीं चुकीचें व आत्मघातकी तत्त्व होय. कारण,

---

१. नारायणरावांनीं हा लेख १८८६ सालीं लिहिला. त्याचा शोध चरित्रलेखकास १९२९ सालीं लागला. तथापि वरील लेख प्रसिद्ध झाल्यानंतर बारा वर्षांनीं जेव्हां परमहंस सभेचे सभासद व प्रार्थनासमाजाचे अध्यक्ष डॉ. आत्माराम पांडुरंग परलोकवासी झाले त्यावेळीं त्यांच्याविषयींच्या चरित्रात्मक लेखांत पुढील उल्लेख आढळतो:—

"पूर्वीपासूनच स्वतंत्र रीतीनें, उघडपणें, लोकांस अरुचिकर अशा विषयांचा ऊहापोह करण्याची वहिवाट ह्या लोकांनीं पाडली असती व विचारास योग्य वाटणारें आचरण गुप्त मंडळीच्या खोलींत मात्र व्हावयाचें ह्या प्रकारास जर त्यांनीं टाळा दिला असता, तर पुढें परमहंस सभेंतील सभासदांच्या नांवांचें दफ्तर लांबविल्याबरोबर सर्व सभासदांची जी तारांबळ उडाली ती उडाली नसती व नंतर एकेश्वरी मतें मान्य असूनही त्या मतांप्रमाणें वर्तणाऱ्यांतून निघून जाण्याचा प्रसंग कांहीं लोकांवर आला नसता."

वरील उद्गार ऐकून डॉ. आत्माराम पांडुरंग ह्यांनीं पुढील उत्तर दिलें:—

"होय, तुम्ही म्हणतां तें एकार्थी खरें आहे. त्याच वेळीं ह्या गुप्त मंडळीच्या किंवा परमहंस पंथाच्या भानगडींत न पडतां उघडपणें आम्ही आचारास जर सुरवात केली असती तर बरें झालें असतें खरें."

ज्या लोकांची सहानुभूति मिळवून व ज्यांच्या विचारांचें परिवर्तन घडवून काम करावयाचें, त्यांच्यामध्येंच अशा गुप्तपणामुळें संस्थेविषयीं शंका उत्पन्न होते व हेतूंचा विपर्यास व्हावयास जागा मिळते. दुसरी गोष्ट अशी कीं, अशा गुप्तपणामुळें सभासदांत एक प्रकारचा भित्रेपणा येतो. आपल्या विचारांबद्दलचा त्यांचा अभिमान नष्ट होतो व त्यांचें नैतिकदृष्ट्या अधःपतन होतें. अशा प्रकारें बाहेरच्या लोकांच्या दृष्टीनें व आंतील सभासदांच्या दृष्टीनें हें धोरण चुकीचें ठरतें. परमहंस सभेचा पायाच मुळीं अशा प्रकारें चुकीच्या तत्त्वांवर उभारला गेला. चुकीच्या तत्त्वावर कामास सुरवात केल्यामुळें नंतर मार्गांत नवीन नवीन अडचणी उपस्थित होत गेल्या. संस्था उच्च हेतु मनांत योजून स्थापण्यांत आली, लोकहिताचें कंकण हातीं बांधून संस्था निघाली हें सर्व खरें, पण हें लोकहितसाधन Telescopic Philanthrophy सारखें होतें; म्हणजे टेलिस्कोप मधून ज्याप्रमाणें दूरचा पदार्थ दिसतो, पण जवळचा पदार्थ दिसत नाहीं, त्याप्रमाणें ह्या परोपकारी लोकांस सगळ्या जनतेंतील जातिभेद दिसला व त्याच्या दूरीकरणार्थ त्यांनीं प्रयत्न सुरू केले, पण आपल्या पायाखालीं काय जळत आहे तें त्यांनीं पाहिलें नाहीं! परमहंस सभेला सगळ्या जनतेच्या सुधारणेचा प्रश्न दिसला, पण हिंदु व्यक्तींची व हिंदु कुटुंबांची सुधारणा ह्यांकडे सभेचें लक्ष गेलें नाहीं. ही अंधारांत एकदम उडी घेणें झालें, आपलें अवसान लक्षांत न आणतां उडी घेणें, अगर मागें पुढें न पहातां उडी घालणें, अथवा आपल्या सामर्थ्याचें मापन न करितां घाला घालणें, म्हणजे अपयशाला आमंत्रणच करणें होय. परमहंस सभेच्या सभासदांचे विचार व सर्वसाधारण जनतेचे विचार ह्यांच्यांत फार मोठें अंतर असतांना अखिल जनता सहजासहजीं आपल्या विचारांची होईल अशी अपेक्षा करावयास काय आधार होता? ह्याला खरा व एकच उपाय असा होता कीं, ज्या सुधारणा समाजांत घडून याव्या असें वाटत होतें त्या सुधारणा व्यक्तिमात्रानें आपापल्या कुटुंबांतून करावयास प्रारंभ करणें अगत्याचें होतें. तसें कांहीं न झाल्यामुळें केवळ नांवांची यादी व हकीकतीचीं पुस्तकें गहाळ होतांच सर्वांची वाताहत झाली! जर एखाद्या सामाजिक व्यंगाविरुद्ध चळवळ करावयाची आहे, तर प्रथम लोकमत जागृत करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. असें न केलें, कांहीं आडदांडपणा केला, तर लोक दुराग्रही बनतात, व सुधारणेविषयीं प्रयत्न करणारांत मात्र गैरसमज उत्पन्न होतो. परमहंस सभेचें असेंच झालें. कित्येक लोकांना जात धर्मापेक्षांही अधिक प्रिय वाटते. तुमचा देवावर विश्वास नसला तरी हरकत नाहीं, तुम्ही आपल्याला नास्तिक म्हणवून घेतलें तरी हरकत नाहीं, किंवा तुमचा ख्रिस्ती धर्मावर किंवा इस्लामवर विश्वास आहे असें तुम्हीं म्हटलें तरी कांहीं हरकत नाहीं,

परंतु तुम्हीं जातीला अमान्य असें आचरण केलें, परजातीच्या माणसाच्या हातचें अन्न सेवन केलें, ख्रिस्ती किंवा मुसलमानाच्या हातून पाणी प्यालांत, तर तुम्ही कितीही भाविक भक्त असलांत, तरी त्याचा कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं. तुमचें पतन झालें, तुमचें आचरण धर्मबाह्य झालें, म्हणून सर्वांनीं तुमचा त्याग केला पाहिजे, तुम्हाला जातींत परत घेणें शक्य नाहीं, अशी त्यावेळीं लोकांच्या विचारांची स्थिति होती. ह्याचें उत्तम उदाहरण त्यावेळीं सिडने स्मिथ ह्यांनीं दिलें होतें. बनारस येथें मणिकर्णिका वगैरे घाट पहाण्यासाठीं कांहीं युरोपिअन लोक होडींतून गेले असतांना त्यांना एक मनुष्य वहात जातांना दिसला. त्याला थोडी धुगधुगी आहे असें आढळतांच त्यांनीं मोठ्या कनवाळूपणानें आपली होडी त्याच्याजवळ नेली व त्याच्या तोंडांत जवळचें लव्हेंडर ओततांच तो मनुष्य सावध झाला! मग त्यांनीं त्याला आपल्या होडींत घेतलें व त्याच्या घरीं त्याला पोंचविण्याची व्यवस्था केली. पण त्याला घरीं कोणी घेईना! त्याचे आप्त स्वकीय त्याला जवळ करीनात! तो मग पोलिसकडे गेला व त्यांना सांगूं लागला कीं, "त्या दुष्ट साहेब लोकांनीं मला वांचविलें, मी मरत होतों, तें मला त्यांनीं मरूंही दिलें नाहीं, व आतां मला कोणीही जवळ करीत नाहीं! हें ऐकून पोलिसांनीं त्या ब्राम्हणाला साहेबाकडे नेलें व त्यानें ह्या ब्राम्हणास प्राणदान देण्याचें जें पाप केलें होतें त्याबद्दल पुढें सतत तीन वर्षें त्याचा योगक्षेम चालविला! प्रत्येक वेळीं तो ब्राम्हण साहेबाकडे येई त्यावेळीं साहेबाला शेलक्या शिव्या हासडून परत जात असे! हें उदाहरण त्यावेळच्या लोकस्थितीचें निदर्शक म्हणून येथें दिलें आहे. लव्हेंडर वॉटर संबंधाचा दुराग्रह जरी आज गेला असला तरी जातिसंबंधाच्या समजुती त्यावेळीं तशाच होत्या. पुरातनाभिमानी लोकांना जात हेंच सर्वस्व होतें व आतांही (१८८६) तसेंच आहे. असें असतां गुप्तपणें जेवणें झोडून व गुप्तपणें सर्व व्यवहार करून जातीचें वर्चस्व कमी कसें व्हावें? त्याला उपाय म्हणजे लोकांना खऱ्या धर्माची ओळख करून देणें, स्त्रियांना शिक्षण देऊन त्यांचीं मनें उदार मतांस अनुकूल करणें, निरनिराळ्या सुधारणांचा प्रथम आपापल्या कुटुंबांत प्रवेश करविणें हें होतें, तें न केल्यामुळें परमहंस सभेचा पूर्ण पराजय झाला. वर म्हटल्याप्रमाणें आपल्या कार्यास प्रारंभ न केल्यामुळें सुधारणेला जनतेकडून विरोध करून घेण्याचें श्रेय मात्र परमहंस सभेनें आपल्याकडे घेतलें.[१] योग्य मार्गाचें अवलंबन केलें असतें तर सुधारणा लोकांत अधिक

१. I call this failure signal for various reasons. Had the Paramhansa Sabha begun as they ought to have begun, Hindu Society at this day would have made more progress than it is

प्रिय झाली असती. परंतु त्यावेळीं जें अशक्य होतें त्यालाच हात घातल्यामुळें तें साधलें तर नाहींच, पण पदरांत थोर निराशा मात्र पडली, आणि सभेच्या निरनिराळ्या वृत्तींच्या सभासदांवर निरनिराळे परिणाम झाले. त्यांच्यापैकीं कांहीं उत्साही सभासद नास्तिक बनले, कांहीं अगदीं जुन्यांत शिरले, कांहींनीं ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला, व फारच थोड्या लोकांनीं आपलें चुकलें होतें कोठें ह्या विचारास प्रारंभ केला व निरनिराळ्या मार्गांचें अवलंबन करून आपला हेतु पूर्ण करण्याच्या मार्गास ते लागले. परमहंस सभेचा लोकांना विसर पडला, मात्र त्या संस्थेनें सुरू केलेले प्रकार, न कळतां, स्मारकरूपानें मागें राहिले! वर्ज्य वस्तूंचें चोरून मारून सेवन करणें व अज्ञानी व दुराग्रही लोकांच्या दृष्टीनें मौजमजा, अभक्ष्य भक्ष्य व अपेय पान हीच सुधारणा असल्या गोष्टी मात्र मागें राहिल्या! ह्यामुळें ह्या परमहंस सभेनें सुधारणेचें कार्य अधिक बिकट मात्र करून ठेवलें! जातिभेद नष्ट करण्यासाठीं चोरट्या उपायांचें अवलंबन केल्यामुळें जुन्या समजुतींच्या लोकांचा दुराग्रह फार वाढला आहे, आणि नवशिक्षित लोकांचें सर्व लक्ष राजकीय सुधारणेकडे विशेष असल्यामुळें सामाजिक व धर्मविषयक सुधारणेकडे त्यांचें पूर्ण दुर्लक्ष होत असून त्याविषयीं त्यांच्यांत बेपर्वाई आली आहे. त्याचप्रमाणें चोरून मारून आपण जिभेचे लाड पुरविले व तें नंतर जातीच्या लोकांना कळलें तरी ते कांहीं करीत नाहींत, जात त्यामुळें रुष्ट होत नाहीं हें पाहून कांहीं लोक त्या मार्गाचें अवलंबन करून अज्ञेयवाद किंवा नास्तिकवाद यांचा पसारा घालीत आहेत. अशाप्रकारें एकंदर हिंदु समाजांत हल्लीं (१८८६) गोंधळ माजून राहिला आहे.

आतां येथें असा प्रश्न उद्भवण्याचा संभव आहे कीं, परमहंस सभेसंबंधानें नारायणरावांनीं केलेलें एवढें विवरण येथें देण्याचें कारण काय? त्याचें सरळ उत्तर असें आहे कीं, नारायणराव भावनेला बळी पडून प्रार्थनासमाजांत दाखल झाले नाहींत. शाळेंत शिकत असतांना जरी प्रार्थनासमाजाच्या कित्येक पुढाऱ्यांविषयीं त्यांना माहिती मिळाली होती तरी १८८१ पर्यंत ते समाजाचे सभासद झाले नाहींत. मध्यंतरींच्या काळांत त्यांनीं प्रार्थनासमाजाच्या पूर्वपीठिकेची माहिती मिळविली; परमहंस सभेचें चुकलें कोठें त्याचा विचार केला, आणि ज्या संस्थेविषयीं त्यांचें प्रतिकूल मत झालें होतें, त्या संस्थेंतूनच[१] प्रार्थना-

---

able to show and the cause of reform would not have been hindered.

१. A good many, a large majority of those ( members of the Paramhansa Sabha ) who had looked forward to the time

समाजसंस्था निघाली असतांही ते प्रार्थनासमाजांत आले. असा खरा प्रकार असल्यामुळें परमहंस सभेच्या कार्याची त्यांनीं कोणत्याप्रकारें चिकित्सा केली हें येथें नमूद केल्यानें त्यांच्या भावी धोरणावरही प्रकाश पडणार असल्यामुळें तो भाग वर दिला आहे. ज्यावेळीं ते समाजाचे सभासद झाले, त्यावेळीं आपल्या देशांत निरनिराळ्या प्रकारच्या चळवळी चालू होत्या. परंतु धर्माला–उदार धर्माला, प्राधान्य देऊन सर्व कार्यें करावयाचीं हें ध्येय एकट्या प्रार्थनासमाजाचींच माणसें जनतेपुढें मांडीत होतीं हें त्यांनीं लक्षांत घेतलें असावें. कारण, त्यांची स्वतःची अशी समजूत होती कीं, " धर्मास प्राधान्य देऊन सर्व चळवळी झाल्या पाहिजेत. तरच त्या चळवळी परिणामकारक होतील. ह्यासाठीं उदार धर्मास प्राधान्य देणाऱ्या संस्थेंत, म्हणजे प्रार्थनासमाजांत, ते दाखल झाले, एवढेंच नव्हे तर धर्मास प्राधान्य देऊन, ते धर्मबुद्धीनें सर्व प्रकारच्या चळवळींत पडले. त्यांनीं धर्माची जी व्याख्या केली होती ती पाहिली म्हणजे अखिल जीवनास धर्माचा आधार असल्यावांचून तें संपूर्णपणें यशस्वी होत नाहीं, असें त्यांना कां वाटत होतें त्याची कल्पना होते. "ज्याच्यायोगें आपण जबाबदार प्राणी आहोंत अशी साक्ष पटते, ( म्हणजे आपण कांहींही केलें तरी आपल्याला कोणी विचारता पुसता नाहीं असें वाटत नाहीं ) ज्याचें वजन आपलें वर्तन व एकंदर शील ह्यांवर पडतें, ज्याच्यायोगें आपण सत्यनिष्ठ व सर्ववेळीं प्रामाणिक होतों, ज्याच्यायोगें आपणास आयुष्यांत गांभीर्याची आवश्यकता पटते, ज्याचें वर्चस्व सर्व आयुष्यांत आढळून आलें पाहिजे व अमुक एका कार्यांत त्याचें महत्त्व, दुसऱ्या कार्यांत त्याचें महत्त्व नाहीं असें वाटत नाहीं " तोच खरा धर्म. आणखी एके ठिकाणीं त्यांनीं म्हटलें आहे कीं "ज्याचा आपल्या नित्याच्या जीवनाशीं निकट संबंध येतो, आपल्या आचरणाचें

---

when they would be able to put caste out of the country, demolish it, and raise India in the scale of nations, gave up thinking of caste and reform ! A few enlightened and elevated with ideals of the right kind, felt that the way to reform the country was not by merely denouncing caste and that it was not by getting indignant at priests that one could reform the country. A new life meant a new spirit, a new spirit meant a new acting upto the ideals which holy men have handed down to us by their lives and by their works, and that the only way to regenerate the country was to regenerate its heart, to purify it by means of God, humanity and religion. —*Darkness or Dawn.*

अत्युच[1] ध्येय जो आपल्यापुढें ठेवितो, केवळ उच्च ध्येयें पुढें ठेवून स्वस्थ न राहतां तीं ध्येयें अंशमात्रेंकरून आचरणांत आणावयास लावितो, आपले विचार, आपले आचार, व आपल्या आकांक्षा ह्यांवर ज्याचा परिणाम होतो व जो व्यक्तीच्या, समाजाच्या, देशाच्या, राष्ट्राच्या जीवनाचा मुख्याधार बनतो तोच खरा धर्म." हें ध्येय प्रार्थनासमाजांत दाखल झाल्यानें आपणास साधतां येईल असें त्यांस वाटलें, म्हणून ते प्रार्थनासमाजांत दाखल झाले.

---

१. ब्रह्मानंद केशवचंद्र सेन हे प्रथम १८६४ सालीं मुंबईस येऊन गेले. त्यावेळीं मुंबईंत सोन्याचा धूर निघत होता व त्यामुळें त्यांच्या व्याख्यानाकडे कोणाचें लक्ष गेलें नाहीं. दुसऱ्या खेपेस ते १८६८ सालीं मुंबईस येऊन गेले. एका व्याख्यानाच्या वेळीं डॉ. भाऊ दाजी अध्यक्ष होते. केशवचंद्रांच्या व्याख्यानाचा लोकांच्या मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम झाला, परंतु अध्यक्षांनीं असें सांगितलें कीं, सुधारणेच्या बाबतींत मी फार विचार केला आहे. माझें मत असें आहे कीं, आपण फार सावधगिरीनें व धोरणानें वागलें पाहिजे! मूळ व्याख्यानामुळें उत्पन्न झालेला उत्साह ह्या उद्गारांमुळें कोठल्याकोठें विरून गेला. डॉ. भाऊ दाजी ह्यांच्या उपदेशांतर्गत धोरणासंबंधानें नारायणराव म्हणतात "मागें व सध्यांही सावधगिरी व धोरण ह्यांविषयीं पुष्कळ बोलणें झालें आहे. आतां त्याचा आम्हांला वीट आला आहे. ज्यांनीं ह्या शब्दांवर भिस्त ठेवून त्याप्रमाणें वागण्याचा प्रयत्न केला त्यांनीं ह्या शब्दांचा दुरुपयोग करून सुधारणेविषयीं नाउमेद उत्पन्न केली आहे. आम्हांला सावधगिरी व धोरण ह्यांचा बागुलबोवा नको आहे. अंतःकरणाची कळकळ, आस्था, उत्साह व ध्येयनिष्ठा हवी आहे."

प्रकरण सातवें

## प्रार्थनासमाज व शिकवण

नारायणरावांनीं प्रार्थनासमाजांत दाखल होण्यापूर्वी कोणत्या प्रकारची तयारी केली होती, संस्थेच्या मूळपीठिकेची माहिती मिळवून आपल्या विचारांस निश्चित स्थिति आणण्याचा कसा प्रयत्न केला हें आपण पाहिलें आहे. अशी सर्व तयारी झाल्यानंतर सन १८८१ सालीं, वयाचीं २५ वर्षे पूर्ण झाल्यानंतर, गुरुवर्य रामकृष्ण गोपाळ भांडारकर[१] ह्यांच्या समक्ष त्यांनीं प्रार्थनासमाजाचीं पुढील तत्त्वें मान्य केलीं:—

१ परमेश्वरानें हें सर्व जग उत्पन्न केलें; तोच एक खरा देव, त्याशिवाय दुसरा देव नाहीं. तो नित्य, ज्ञानस्वरूप, अनंत, कल्याणनिधान, आनंदमय, निरवयव, निराकार, एकच, अद्वितीय, सर्वांचा नियंता, सर्वव्यापी, सर्वज्ञ, सर्वशक्ति, कृपानिधि, परमपवित्र, पतितपावन असा आहे.

२ केवळ त्याच्याच उपासनेच्या योगें येथें व परलोकीं शुभ प्राप्त होतें.

३ त्याच्यावर प्रीति, पूज्यबुद्धि व अनन्यभाव हीं ठेवून त्याप्रमाणें त्याचें मनानें भजनपूजन करणें व त्यास प्रिय अशीं कृत्यें करणें हीच त्याची खरी उपासना होय.

४ मूर्ति व इतर जड पदार्थ यांची पूजा किंवा प्रार्थना करणें हा ईश्वरोपासनेचा खरा प्रकार नव्हे.

५ परमेश्वर सावयवरूपानें अवतार घेत नाहीं व कोणताही एक ग्रंथ साक्षात् ईश्वरप्रणीत किंवा सर्वांशीं प्रमाण नाहीं.

---

१. सर नारायण ह्यांच्या सन्मानार्थ इंदुरास जाण्यापूर्वी जो समारंभ झाला होता त्यांत डॉ. भांडारकरांनीं पुढील उद्गार काढले होते :

" The education which Sir Narayan had received at College made him feel the presence of God everywhere and it was that feeling that made him join the Prarthana Samaj."

६ सर्व मनुष्यें एका परमेश्वराचीं लेंकरें आहेत, म्हणून भेद न राखितां परस्परांशीं बंधुभावानें वागावें, हें ईश्वरास प्रिय आहे, आणि हें मनुष्याचें कर्तव्य आहे.

प्रार्थनासमाजाचा सभासद होतांना केवळ वरील तत्त्वांस मान्यता दर्शवून भागत नाहीं. प्रत्येक सभासदास प्रतिज्ञा करावी लागत असे; नारायणरावांनीं पुढीलप्रमाणें प्रतिज्ञा केली :—

"धर्माच्या ह्या मूलतत्त्वांवर माझी पूर्ण श्रद्धा आहे, आणि त्यांस अनुसरून आचरण करणें हें माझें कर्तव्य आहे असें मी समजतों, अशी परमेश्वरास स्मरून मी प्रतिज्ञा[1] करितों."

प्रार्थनासमाजाची ज्यावेळीं १८६७ सालीं स्थापना झाली, त्यावेळीं सभासद होणाऱ्या प्रत्येक व्यक्तीस अशी प्रतिज्ञा करावी लागे कीं, "मी प्रत्यहीं परमेश्वराचें चिंतन करीत जाईन. सत्कर्में आचरावयास व असत्कर्मांपासून दूर रहावयास मी यत्न करीन. स्वभावदोषानें कांहीं वाईट कर्म मजपासून घडल्यास त्याविषयीं पश्चाताप व्हावा एतदर्थ परमेश्वरापाशीं प्रार्थना करीन. हे परमेश्वर! ह्या प्रतिज्ञा पाळण्याचें सामर्थ्य मला दे." स्थापनेच्या वेळच्या तत्त्वांमध्यें "मूर्तिपूजा हा असन्मार्ग असून देवास अपमानकारक आणि मनुष्यास नीचत्वास आणणारा व दुराचरणाप्रत नेणारा आहे" असें होतें. त्याऐवजीं १८७३ सालीं "प्रतिमा व इतर सृष्ट पदार्थ ह्यांची पूजाअर्चा किंवा आराधना करणें हा ईश्वरोपासनेचा खरा प्रकार नव्हे," असें तत्त्व जेव्हां स्थापित झालें, त्यावेळीं नारायणरावांचें धर्माकडे लक्ष होतेंच व ह्या धर्मसंस्थेच्या तत्त्वांत होत असलेला फरक ते प्रत्यक्ष पहात[2] होते. ही सर्व चळवळ कशी झाली त्याचा व त्याविषयीं झालेल्या चर्चेचा प्रत्यक्ष

१. नारायणरावांच्या कारकीर्दीत ह्या प्रतिज्ञेंत १९२० सालीं फरक झाला. पूर्वीच्या प्रतिज्ञेंतील "समजतों" ह्या शब्दापुढें व "अशी" ह्या शब्दापूर्वी पुढील मजकूर घातला गेला :—

"तसेंच मी एकेश्वरी विधीनुसार सर्व गृह्य व इतर संस्कार करण्यास तयार आहें व त्यावेळीं कोणत्याही प्रकारें प्रतिमापूजन करणार नाहीं."

२. १८७० सालीं केशवचंद्रसेन मुंबईस तिसऱ्यांदा येऊन गेले. त्यावेळच्या बहुतेक व्याख्यानांस मी हजर असें, त्यावेळीं मी तरुण होतों व चौकस होतों. तेव्हां आम्ही शाळेंत किंवा कॉलेजांत होतों. आपल्या देशांतील निरनिराळे धर्म हें एक प्रकारचें गूढ कोडेंच बनून गेलें आहे, ही गोष्ट आम्हांस पटली होती. उत्साहानें काम करणाऱ्या प्रगल्भ विचारांच्या थोर पुरुषांचीं उदाहरणें आमच्यापुढें होतीं.

अंधकार कीं अरुणोदय

अनुभव घेऊन नारायणराव १८८१ सालीं प्रार्थनासमाजाचे सभासद झाले. पुढें दोन वर्षांनीं प्रार्थना समाजाच्या चिटणिसाच्या कामाची जबाबदारी त्यांच्यावर येऊन पडली. त्याच वर्षी प्रार्थनासमाजाच्या पहिल्या सोळा वर्षांची हकीकत नारायणरावांच्या सहीनिशीं प्रसिद्ध झाली आहे. तींत म्हटलें आहे:—

"इंग्रजी विद्येचा पसार झाल्यापासून सुशिक्षित लोकांमध्यें सत्यासत्य, योग्यायोग्य, कर्तव्याकर्तव्य, ह्यांविषयीं विचार करण्याची शक्ति वाढत चालली. लोकरूढीस अनुसरून व धर्माच्या नांवानें ज्या शेंकडों गोष्टी आपण नेहमीं करितों, त्यांत कित्येक अगदीं निरर्थक आहेत, व कित्येक तर हानिकारक आहेत, याकरितां त्यांचा त्याग केला पाहिजे व कित्येक गोष्टींचा प्रचार आपणांत नाहीं पण त्यांची फार आवश्यकता आहे, याकरितां त्या चालू केल्या पाहिजेत असें कित्येक सुशिक्षित लोकांस वाटूं लागलें. कांहीं दिवसांपर्यंत असे नुसते विचार मनांत येतां येतां पुढें त्या विचारांप्रमाणें प्रत्यक्ष आचरण घडलें पाहिजे असें मनांत येऊन जेथें इंग्रजी विद्येचा विशेष फैलाव झालेलीं अशीं ह्या देशांतील मुख्य कलकत्ता, मुंबई व मद्रास हीं शहरें येथेंच वरील उद्देशाच्या सिद्ध्यर्थ प्रथम मंडळ्या स्थापन होऊं लागल्या" आणि ही मूळपीठिका लक्षांत घेऊन नारायणराव कार्यास लागले.

प्रार्थनासमाजांत दाखल होणारी प्रत्येक व्यक्ति साधनार्थी असते, म्हणून ती प्रार्थनासमाजाची सभासद होते. परंतु सभासद झाल्यानंतर त्याची तळमळ कमी न होतां ती खरें पाहतां वाढत जाते. त्याला त्याचें साधन दोन बाजूंनीं साधावयाचें असतें. एक सभासद ह्या नात्यानें स्वतःचें व्यक्तिगत साधन व आपल्या साधनाच्या, आचरणाच्या, ध्येयसाधनाच्याद्वारें समाजाच्या सामुदायिक साधनास हातभार लावणें. नारायणरावांच्या व्यक्तिगत साधनासंबंधानें पुढें स्वतंत्र विवेचन केलें आहे. ह्या ठिकाणीं प्रार्थनासमाजाच्या ध्येयाविषयीं नारायणरावांच्या काय कल्पना होत्या व त्याच्या साधनासंबंधानें त्यांनीं आपल्या व्याख्यानांच्या द्वारें काय काय उपाययोजना सांगितली ह्याचें थोडें विवेचन करण्याचें योजिलें आहे.

नारायणरावांचें स्वतःचें वाचन व अनुभव, त्यांच्या भोवतीं जीं अधिकारी माणसें होतीं त्यांचे उपदेश, लेख व अनुभव, आपल्या सभोवारच्या लोकांसंबंधानें त्यांना नित्य येणारा अनुभव हीं सर्व लक्षांत घेऊन त्यांचें असें निश्चित मत झालें होतें कीं, "धर्माच्या सुधारणेचा प्रश्न हा सर्व प्रकारच्या चळवळींना पायाभूत झाला पाहिजे, आणि लोकांच्या सुधारणेसाठीं त्यांच्या धर्मविषयक समजुतींत सुधारणा करण्याचा प्रयत्न न करितां व धर्मास प्राधान्य न देतां दुसऱ्या मार्गानें प्रयत्न करणें म्हणजे विहिरींतून चाळणीनें पाणी काढण्याच्या उद्योगासारखें निष्फळ होण्यासारखें आहे." आणि म्हणूनच त्यांनीं सभासद झाल्यापासून आयुष्याची मर्यादा संपेतों-

पर्यंत सर्व चळवळीचा पाया धर्मच झाला पाहिजे असें म्हणणाऱ्या प्रार्थनासमाजाची तनमनधनें[1] करून सेवा केली. त्यांची दृढ समजूत होती कीं, " आमच्या सामाजिक प्रगतीला धर्मसुधारणा पायाभूत झाली पाहिजे आणि धर्मसुधारणेचा पाया आमची जी पूर्वपरंपरा व पूर्व संस्कृति तिच्यावरच घातला पाहिजे." परंतु त्यांना असेंही वाटत होतें कीं, "पुरातन काळची कोणतीही राजकीय, सामाजिक, अगर धर्मविषयक संस्था एखाद्या सुधारकाला, अगर सुधारकांना आज जशीच्या तशी उठवितां येईल असें म्हणणें अन्यथा आहे... पूर्वीचे सिद्धान्त व मार्ग जितक्या अंशानें त्यांत सत्यांश आहे तितक्या अंशानें ठीक आहेत. त्या सत्यांशाचा परम आदरानें स्वीकार केला पाहिजे. त्याच प्रमाणें इतर धर्मांतील उत्तमांशाचाही आपण आदरानें अंगीकार केला पाहिजे व आज जी परिस्थिति आहे तीस अनुरूप अशी घडी बसविली पाहिजे व आपल्या आजच्या गरजांचा विचार झाला पाहिजे." ख्रिस्ती धर्मासंबंधानें त्यांची फार आदराची भावना असे. व कित्येक वेळां ते ख्रिस्ती मंदिरांतून उपासनांसही हजर राहात असत. कारण ते म्हणत कीं, "ख्रिस्तानें उपदेशिलेला जो धर्म त्याची ज्याच्या पायावर उभारणी झाली आहे तें प्रेमाचें तत्त्व आपणांस त्या धर्मापासून घेतलें पाहिजे. विश्वबंधुत्वाची कल्पना महाभारत, भगवद्गीता वगैरे आपल्या हिंदु धर्मग्रंथांतही आहे. पण आपल्या जातिभेदादि आनुवंशिक दोषांमुळें प्रेमाची बुद्धि बुद्धामध्यें अगर येशूमध्यें जितकी विकसित झालेली होती तितकी ती आम्हांमध्यें आजही नाहीं; म्हणून प्रेमाचें तत्त्व बौद्धधर्मापासून अगर ख्रिस्तीधर्मापासून आपण घेतलें पाहिजे व हें आपल्यापैकीं प्रत्येकाच्या आयुष्याचें तत्त्व बनून, परोपकार बुद्धि आपण आपल्या सर्व व्यवहारांत व कृत्यांत दाखविली पाहिजे," व हाच मार्ग दाखविण्यासाठीं प्रार्थनासमाजाची स्थापना झाली असें त्यांचें मत ते आपल्या व्याख्यानांतून बोलून दाखवीत. यावर मग लोक असें म्हणूं लागतात कीं, प्रार्थनासमाजास स्वतःचा म्हणून कांहीं धर्म नाहीं, एका धर्मापासून एक तत्त्व, दुसऱ्यापासून दुसरें, म्हणजे ही हजार ठिगळें लावलेली गोधडी म्हणावयाची! अशा आक्षेपकांस त्यांनीं उत्तर दिलें आहे कीं, प्रत्येक धर्मामध्यें मनुष्याच्या प्रगतीस साहाय्यभूत होणारें असें कांहीं तरी असतेंच;

---

१ न्या. मू. रानडे प्रार्थनासमाजाचे अध्यक्ष असतांना प्रत्येक सभासदानें आपल्या प्राप्तीपैकीं शेकडा दोन टक्के दरमहा वर्गणी दाखल समाजास द्यावे असा नियम झाला व त्याप्रमाणें स्वतः रानडे दरमहा ८० रुपये वर्गणीदाखल देऊं लागले. त्यांचाच कित्ता नारायणरावांनीं गिरविला व अखेरपर्यंत त्यांनीं ह्या नियमानुसार प्रार्थनासमाजास बिनतक्रार वर्गणी दिली.

केवळ ख्रिस्ती धर्म, केवळ प्रचलित हिंदु धर्म, किंवा बौद्ध धर्म यांच्या योगेंच नव्हे, तर निरनिराळ्या धर्मांतील उदात्त तत्त्वें एकत्र करून, मानवी अंतःकरणाची आध्यात्मिक तळमळ शांत करणारा धर्म आज हवा आहे. मात्र ब्राह्मधर्म हा सर्वस्वी नवीन धर्म आहे असें मानावयास ते तयार नसत. आपल्या एका व्याख्यानांत त्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं, "ब्राह्मधर्म हा कांहीं नवीन धर्म नाहीं. उपनिषदें व भगवद्गीता ह्यांमध्यें ज्या थोर विभूतींचे विचार ग्रथित केले आहेत, त्या विभूतींच्या अंतःकरणांमध्यें जो भाव होता त्या भावाच्याच भरभक्कम पायावर ब्राह्मधर्माची स्थापना झालेली आहे. मूळचा अति उत्तम व अति उदात्त असा जो हिंदुधर्म त्याचेंच ब्राह्मधर्म हें परिणत स्वरूप होय." "ईश्वरानें आपलें स्वरूप सर्व देशांना सर्व काळीं प्रकट केलें आहे. त्याचे भक्त, विशेष कर्तृत्ववान्, पक्षीं अवतारी पुरुष, साधुसंत ह्यांनीं अखिल मनुष्य जात आपलीशी केली आहे." प्रार्थनासमाजास जय येवो वा न येवो त्यासंबंधानें ते कधींही काळजी करीत नसत; परंतु मनुष्यमनुष्यांतील भेदाभेदाचा ह्या समाजानें निषेध केला आहे, व योग्य मार्गानें जर प्रगति व्हावयास पाहिजे तर ह्याच मार्गाचें अवलंबन केल्यानें ती होणार आहे असें ते म्हणत व ईश्वराचें पितृत्व व मनुष्यमात्राचें भ्रातृत्व हें तत्त्व आचरणांत आणणें हाच तो मार्ग होय, असें ते सांगत असत.

नारायणराव १८८१ सालीं प्रार्थनासमाजाचे सभासद झाले, हें वर आलेंच आहे; परंतु प्रार्थनासमाज केव्हांही लोकप्रिय नव्हता, व आजही नाहीं. लोकप्रिय नसलेल्या संस्थेचा नारायणरावांसारखा धडाडीचा, विद्वान् व होतकरू तरुण गृहस्थ सभासद होत आहे असें पाहून कांहीं हितचिंतकांनीं नारायणरावांस सभासद होण्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला! त्यांनीं नारायणरावांस सांगितलें कीं, "ज्यांनीं हा समाज स्थापन केला, त्यांच्या मृत्यूबरोबर हा समाजही लयास जाणार; डॉ. आत्माराम पांडुरंग, रानडे व मोडक हे ह्या जगांतून नाहींसे[1] झाले कीं, ही संस्था ढासळून पडलीच म्हणून समजा!" पुढें घोर आपत्ति ओढवणार असें सांगणाऱ्या ह्या भविष्यवाद्यांनीं असेंही भाकित केलें कीं, "असा एक काळ लवकरच येईल कीं त्यावेळीं समाजाच्या ट्रस्टींना ही इमारत दुसऱ्या कोणत्या तरी संस्थेच्या ताब्यांत द्यावी कीं कसें याचा विचार करावा लागेल" असा कळकळीचा उपदेश झाला तरी त्याकडे पूर्ण दुर्लक्ष करून नारायणराव समाजांत दाखल झाले

---

१. डॉ. आत्माराम पांडुरंग १८९८, रानडे १९०१, मोडक १८९७ सालीं परलोकवासी झाले; ज्या धर्मपरिषदेंत नारायणरावांनीं हे उद्गार काढले ती परिषद १९०५ सालीं मुंबईंत भरली होती.

एवढेंच नव्हे, तर सभासद ह्या नात्यानें त्यांनीं ४२ वर्षे समाजाची एकनिष्ठेनें सेवा केली. त्यांना हें माहित होतें कीं, १८६७ सालीं ज्या पंधरा सोळा गृहस्थांनीं "ह्या समाजाची स्थापना केली, ते कांहीं मोठे अद्वितीय"[1] पुरुष नव्हते! "ते आपली दुर्बलता पूर्ण जाणून होते. कर्तव्यकर्म करण्याची प्रखर जागृति त्यांच्यांत उत्पन्न झालेली होती, आणि स्वत:वरील जबाबदारी ते पूर्णपणें ओळखून होते." ह्या आद्य सेवकांचा आपल्या पिढीला असा संदेश आहे कीं, "समाजाची सेवा करण्याकरितां तुमच्यामध्यें जो कांहीं सत्त्वगुणाचा अंश असेल तो सर्व खर्च करा" असा त्यांचा दृढ विश्वास होता व ह्या विश्वासानुसार वर्तन करून १९०५ सालीं त्यांनीं जाहीर केलें कीं, "आम्हीं जें कांहीं थोडेंबहुत काम करीत असतों त्याचा आढावा मी नित्य घेत असतों. ह्या समाजाबरोबर अस्तित्वांत आलेल्या बाकीच्या सर्व संस्था लयास गेल्या आहेत. पण आमचा लहानसा, गरीब व लोकनिंदित समाज अद्यापपर्यंत उत्तम प्रकारें टिकून राहिला आहे. मी प्रार्थनासमाजाचा सभासद झालों त्या वेळेपेक्षांही सध्यांच्या काळीं आशाजनक स्थिति आहे. आमच्या अटकळीच्या बाहेर समाजाची प्रगति होत आहे." दुसरें असें कीं, केवळ मोठ्या माणसांच्या योगेंच एखादी संस्था चालते असेंही नारायणरावांस वाटत नसे. आणि ते विशेषत: तरुणांस असें सांगत असत कीं, 'थोर पुरुषांवर अवलंबून राहण्याची संवय तुम्ही आपल्याला लावून घेऊं नका.' स्वत: त्यांच्या ठिकाणीं थोर पुरुषांसंबंधानें अत्यंत आदराची भावना असे. म्हणून त्यांनीं एकदां म्हटलें कीं, तरुणांनीं थोर पुरुषांविषयीं उत्कट आदरभाव ठेवावा हें ठीक आहे. परंतु असे पुरुष आपल्याला रोज मार्गदर्शक असावयास पाहिजेत असा का एकदां समज झाला कीं मग आपण सर्वस्वीं त्यांच्यावर अवलंबून रहावयास शिकतों, आपला आपलेपणा जातो, आपण आपलें सारासार विचार करण्याचें सामर्थ्य गमावून बसतों! कारण आपल्यासाठीं विचार करण्याचें सर्व काम आपला मार्गदर्शक करीत असतो असें आपल्याला वाटतें. त्यांनीं सांगावयाचें व आपण करावयाचें असा प्रकार होऊन आपण आपल्या स्वत:ला सर्वस्वीं परावलंबी, पंगू करून घेतों. खरें पहातां, विश्वाचा व्यापार साध्यासुध्या माणसांच्या द्वारेंच चालत आहे. आपणच अधिकांशानें जगांत वावरत असून आपण सर्वांशीं थोर पुरुषांवर अवलंबून रहावें अशी अनौदार्यसूचक व्यवस्था देवानें मुळीं केलेलीच नाहीं. साध्यासुध्या माणसांच्या द्वारें विश्वाचा सर्व व्यापार

---

१. भांडारकर, रानडे, मोडक हे अनुक्रमें १८६९, १८६८ व १८६९ मध्यें प्रार्थनासमाजाचे सभासद झाले, व प्रार्थनासमाज त्यापूर्वीच म्ह० १८६७ सालीं स्थापन झालेला होता.

चालावयाचा असतो व तो चालत आहेही. ह्यासाठीं जगाची उन्नति होण्यासाठीं ज्या गुणांची आवश्यकता आहे त्या गुणांची प्राप्ति करून त्यांचें सामर्थ्य आपण वाढीस लावूं या."[१] समाजाची उन्नति केवळ थोर पुरुषांवर अवलंबून नसते हें तत्त्व लोकांमध्यें बिंबविण्यासाठीं आपला स्वतःचा थोरपणा विसरून ते कसे प्रयत्न करीत असत याची ह्यावरून चांगली कल्पना होते.

प्रार्थनासमाज ह्या संस्थेसंबंधानें व त्यांतील कांहीं व्यक्तींसंबंधानें त्यांस अत्यंत आदर व अभिमान असे, हें सर्वांस माहीत आहेच. मंदिरांतील उपासना होतां-होईतों चुकवावयाच्या नाहींत असा त्यांचा क्रम[२] असे. आज आपल्याला जी स्थिति प्राप्त झाली आहे, आपल्या ठिकाणीं जी विचारजागृति आहे, धर्म व धर्म-जीवन ह्यांसंबंधानें जी आस्था वाटत आहे ती प्रार्थनासमाज ही संस्था व समाजाचे पुढारी ह्यांच्यामुळें होय असें ते वारंवार सांगत.[३] एवढेंच नव्हे तर प्रार्थनासमा-जाचा सभासद ह्या नात्यानें आपल्या हातून समाजाची ज्या प्रकारची सेवा व्हाव-

---

१. This world can go on by us, by you and me. We are the bulk of the world and God has not been so ungenerous as to leave us entirely at the mercy of the great men. The world has to be carried on by average men...It is we who have to carry on its business. Let us see that we get planted in us those powers by the development of which we can do what lies in our power in order to make the world move onwards and towards the goal which we have all at heart.

२. I have come to regard attendance at service as one of the best preparations for life's duties and works in a spirit of correct manhood in this world of distractions.

३. I do not know how the sight of the Prarthana Samaj strikes other minds but to me it is a sacred symbol of life and eternity. What do I not owe to my Samaj? What it has done for me during twenty-eight years that I have been privileged to be one of its members is far far more than anything by way of humble service I can claim to have done for it. I have with the growth of my manhood come to look upon it as the centre of my best thoughts and affections; and I have learnt to measure all my actions by the standard of its rules and ideals. दुसऱ्या एके वेळीं ते म्हणाले :–I do not know what I would have been if I had not come under the influence of my mother Church.

यास पाहिजे होती तितकी व तशी ती झाली नाहीं असेंही त्यांना कधींकधीं वाटे.[१] परंतु सभासद व अध्यक्ष ह्या नात्यानें त्यांनीं बेचाळीस वर्षें बजाविलेल्या सेवेचा विचार केला म्हणजे त्यांच्या स्थितींतील कोणाही सभासदानें त्यांच्याइतकी सेवा बजाविली नाहीं असें निश्चयात्मक रीतीनें म्हणतां येतें.[२] मंदिरामध्यें उपासना चालविण्याचें काम त्यांनीं सहसा नाकारलें नाहीं; एवढेंच नव्हे, तर अडचणीच्या वेळीं, प्रथम त्यांना विचारलें नाहीं तर तें त्यांना बरें वाटत नसे![३] समाजाचें **सुबोधपत्रिका**नामक जें साप्ताहिक आहे, त्याच्यासाठीं फावल्यावेळीं लेख लिहावयास त्यांची नेहमीं सिद्धता असे. Tuka's Tool असें नांव घेऊन A Wrestling Soul ह्या सदराखालीं त्यांचे लहान लहान लेख येत असत, हें त्यांच्या लेखांच्या संग्रहावरून सर्वांस माहीत झालें आहे; पण त्यापेक्षां पुष्कळ लहानमोठे लेख त्यांनीं लिहून संपादकांस उपकृत केलें आहे. इतकें करूनही आपल्या स्वतःच्या सेवेसंबंधानें त्यांना यत्किंचितही अभिमान नसे.

त्यांचीं धर्मपर व्याख्यानें स्वानुभवाच्या कसास उतरणारीं असत. आपला नित्याचा अनुभव आपल्या प्रवचनांत आणावा, इतरांच्या अनुभवाशीं आपला अनुभव ताडून पहावा, इतरत्र धर्मविचारांच्या होत असलेल्या विकाससंबंधानें आपल्याला प्राप्त झालेली माहिती आपल्या धर्मपर व्याख्यानांत आणावी, एखादा महत्त्वाचा ग्रंथ प्रसिद्ध झाला म्हणजे प्रवचनांत त्याची ओळख करून द्यावी असा त्यांचा क्रम असे. ते स्वतः नियमानें मंदिरांतील उपासनांस हजर रहात. इतरांनींही तसेंच करावें असें त्यांस वाटे.[४] कांहीं सभासद कोणत्याही कारणानें कां होईना,

---

१. In my own heart I feel that I have not done my duty to the Samaj in the way I ought to have and could have done.

२. डॉ. भांडारकर मात्र अपवाद समजावेत.

३. Nothing gives me greater pleasure than to see Mr. Korgamkar in the pulpit, for his very life is a sermon and service; but it is not fair to throw burden twice in a month on him as he is hardworked already. Had I known there was none else to take up the service yesterday, I should have relieved Mr. Korgamkar.

*—From a letter to the Secretary, Prarthana Samaj—1919.*

४. १८८५ सालीं रविवार ता. २७ सप्टेंबर रोजीं ते लंडन येथें पोंचले. लंडनमधील त्यांचा तो पहिलाच दिवस, तरी त्या दिवशीं ते एका मंदिरांत ईश्वरोपासनेस हजर राहिले.

स्वतः उपासना चालविण्याच्या वेळापेक्षां इतरांच्या वेळीं हजर न राहिलेलें त्यांना आवडत नसे. कोणत्याही अधिकाराचा उपासक असला, तरी त्यानें केलेली प्रार्थना अगर उपदेश ह्यांपासून कांहींच लाभ होत नाहीं असें त्यांस कधींही वाटत नसे. त्यांचा अनुभव ह्या उलटच असे.[१] प्रार्थनासमाजासारख्या संस्थेशीं प्रत्येकानें संबद्ध असावें, त्या संस्थेच्या ध्येयाशीं समरस व्हावें व तीं आपल्या आचरणांत आणण्याचा निश्चयपूर्वक प्रयत्न करावा असें त्यांचें म्हणणें असे व त्याप्रमाणें ते स्वतः वागण्याचा प्रयत्न करीत असत. वेळ येईल त्याप्रमाणें वागावयाचें व त्यावेळीं आपल्या ध्येयांचा विचार करावयाचा नाहीं असें त्यांचें कधीं होत नसे. म्हणून त्यांनीं असें स्पष्ट म्हटलें आहे कीं,

Men must have an ideal to live by. And nothing regulates individual life better than a settled consciousness that the individual is attached to a religious body as a member. Such attachment brings with it a sense of responsibility and the individual knows by what measure or rule of conduct he is to be judged in all his relations. Life ceases in such a case to be an aimless affair.

प्रार्थनासमाजाचीं तत्त्वें बुद्धीस मान्य होऊन भागत नाहीं, तीं सर्व सभासदांनीं अनुभवाच्या कसास लावून आत्मसात् केलीं पाहिजेत. प्रतिमापूजनावर विश्वास नसून भागत नाहीं. सर्व विश्वाचा कर्ता, सर्वसमर्थ, करुणामय, प्रेमस्वरूप जो परमेश्वर तो व्यक्तिमात्राच्या विश्वासाचें व विसाव्याचें स्थान झाला पाहिजे. ह्यासाठीं त्यांनीं सांगितलें आहे कीं, 'परमेश्वराचें खात्रीचें वसतिस्थान जर कोठें असेल तर तें मनुष्याचें अंतःकरण[२] होय. १९१६ सालीं दिलेल्या एका उपदेशांत नारायण-रावांनीं सांगितलें कीं, "परमेश्वर आपल्या हृदयांत आहे, तो पवित्र, चित्रूपानें आपल्या हृदयाला प्रकाशित आहे, म्हणून आपण त्याला त्याच्या सत्य स्वरूपामध्यें हृदयांत भजलें पाहिजे." परमेश्वर शाश्वत आहे, तो व्यापक आहे, तो प्रेमरूप आहे, तो पवित्र आहे, तो ज्ञानमय आहे, त्याला हृदयांत भजावें असें ब्राम्ह-समाजाचें व प्रार्थनासमाजाचें म्हणणें आहे; तें नवीन नाहीं. तें उपनिषद्काला-पासून ऋषींनीं व नंतर संतांनीं प्रतिपादिलें आहे. म्हणून मूर्तिपूजा हा परमेश्वरो-

---

१. There is not a single preacher in the pulpit from whose discourse I have not caught some inspiration of hope, some lesson of light which I have not learnt.

२. ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशे तिष्ठति ।

पासनेचा खरा मार्ग नव्हे असें समाजाचें म्हणणें आहे. हृदयांतर्यामीं परमेश्वराला भजावें, नीतीनें चालावें, जगाची प्रगति होईल असें चालावें हा आपला धर्म होय. ज्या ज्या वेळीं आपल्या हातून जें होऊं नये तें घडतें, आपण जें बोलूं नये तें बोलून जातों, त्या त्या वेळीं आमच्या अंतःकरणामध्यें गूढरूपानें असणारा तो लहान, शांत, मंजुळ ध्वनि आमची निर्भर्त्सना करितो, किंवा आम्ही मार्ग चुकलों असें सांगतो. म्हणून त्यांचा असा आग्रह असे कीं, "देव आपला सांगाती आहे याचा अनुभव घ्या, आपल्या सर्व गरजा त्याला निवेदन करा; त्याला शरण जा. आणि मग आपल्याला जो हा संसार पूर्वी दुःखमय वाटत होता, तोच संसार नवीन रूप धारण करितो; दुःखें सुखें होतात, नित्याचीं कर्मे त्रासदायक न होतां आनंददायक होतात. कारण तीं करीत असतां आपण देवाच्या सहवासांत असतों आणि आपलीं सर्व प्रकारचीं ओझीं देखील आपल्याला हलकीं वाटतात. कारण प्रत्यक्ष परमेश्वर परमात्माच तीं सहज सहन करण्याचें सामर्थ्य आपल्याला देत असतो. ज्यांना हें सर्व मान्य आहे, हें सर्व पटतें ते धन्य होत. ज्यांना अशा प्रकारचा अनुभव स्वतः येत असल्यामुळें हें पटत आहे, ते त्याहून अधिक धन्य होत. कारण, देव आपल्या सांगाती आहे, तो आपला मित्र आहे, मार्गदर्शक व आपलें ओझें हलकें करणारा आहे, ही गोष्ट तर्कवितर्कापेक्षां अनुभवानेंच त्वरित पटण्यासारखी आहे." पण, पुष्कळ वेळां संसारांतील अनेक आपत्ति, वियोग, नुकसान ह्यांचा अनुभव येऊं लागला कीं, बुद्धिगर्भ विश्वास कोठल्याकोठें उडून जातो; व "ईश्वर जर आनंदस्वरूप आहे तर मग ह्या संसारांत आम्हांला आनंदाचाच, सुखाचाच व प्रेमाचाच कां लाभ होत नाहीं? आमच्यावर संकटें आलीं असतां प्रेममय देव स्वस्थ कां बसतो? तो आमच्या संकटांचें निवारण कां करीत नाहीं? जेथें आनंद तेथें दुःखही आहेच. मग ईश्वर जर प्रेममय आहे, तर मग सर्वत्र अनुभवास येणारी संकटपरंपरा काय म्हणून?" असले प्रश्न मनुष्य विचारूं लागतो. ह्याला नारायणरावांनीं उत्तर देतांना सांगितलें आहे कीं "आधुनिक तत्त्ववेत्ते, धर्मप्रचारक व विचारी पुरुष ह्या विषयाचा थोड्या निराळ्या दिशेनें विचार करूं लागले आहेत. देव आमच्यावर संकटें पाठवितो व आपण मौज पहात स्वस्थ बसतो ही कल्पना आतां मान्य होण्यासारखी नाहीं. देव आपल्या सांगाती आहे, जेथें जातों तेथें आहे. दुःखाच्या वेळीं आपल्या दुःखाचा तो वांटेकरी होतो; सुखाच्या वेळीं आपल्या सुखांत भर घालून आपलें रक्षण तो करितो. म्हणजे देव आपणाला सोडीत नाहीं, एवढेंच नव्हे, तर तो नित्य आपल्या संगें आहे, हें आपणास कळतें ही जी भावना ती देवाच्या स्वरूपाविषयीं आपल्यास उच्च प्रकारच्या अनुभवाचा लाभ करून देते. प्रथम मनुष्यांना ईश्वर

ह्या कांहीं तरी एक शक्ति आहे, सामर्थ्य आहे, असें वाटे, म्हणजे त्यांच्या मनामध्यें देवाविषयीं भीतीची कल्पना होती. नंतर ईश्वर ज्ञानमय आहे असें त्यांना वाटूं लागलें व त्यावेळीं तो मनुष्याच्या सुखदु:खाविषयीं बेपर्वा आहे असा समज होता. यानंतरची तिसरी स्थिति परमेश्वर प्रेममय किंवा आनंदमय आहे ही. ईश्वर एकदांच विश्वरूपी घड्याळाला किल्ली देऊन आतां शांत व स्वस्थ बसून राहिलेला नाहीं, तर आपल्या सर्व व्यवहारांमध्यें तो आपला वांटेकरी आहे, आपल्या सुखदु:खामध्यें तो समसुखदु:खी आहे, आपण त्याच्यापासून निराळे होत नाहीं, एवढेंच नव्हे, तर तो आपला जीवनाधार आहे, त्या जीवनांतर्गत आपलें जीवन आहे हेंच सत्य आहे, हेंच आतां अनुभवानें कळून येत चाललें आहे."

'परमेश्वर सावयवरूपानें अवतार घेत नाहीं व कोणताही एक ग्रंथ साक्षात् ईश्वरप्रणीत किंवा सर्वांशीं प्रमाण नाहीं' असें प्रार्थनासमाजाचें तत्त्व आहे. ग्रंथप्रामाण्यासंबंधानें आज सर्व विचारी जनांचें मत प्रार्थनासमाजाप्रमाणेंच आहे. परंतु क्वचित् प्रसंगीं निरनिराळ्या धर्मांचे अभिमानी जन आपलाच धर्मग्रंथ खरा असला दुराग्रह चालवितात. ह्यासाठीं नारायणराव केवळ आपल्याच धर्मग्रंथावर विसंबून न राहातां इतर धर्मांच्या ग्रंथांचेंही अध्ययन करा असा मोठ्या आग्रहानें उपदेश करीत असत. १९१२ सालीं बायबल सोसायटीची जेव्हां शताब्दि झाली, त्यावेळीं त्यांनीं त्या शतसांवत्सरिक उत्सवाचें महत्त्व सांगतांना, हिंदुधर्मग्रंथांचें आदरपूर्वक अध्ययन करा असा ख्रिस्ती लोकांस उपदेश केला. व ख्रिस्ती धर्मपुस्तकांचें अध्ययन करा असें आपल्या बांधवांस प्रेमानें सांगितलें. अशाच्या योगें आकुंचित वृत्ति नष्ट होऊन आपल्या स्वत:च्या धर्मपुस्तकांचें खरें महत्त्व ध्यानांत येऊन, क्षणमात्र अंधभक्ति नष्ट झाली, तरी त्यांच्याविषयीं खरा अभिमान व आदर जागृत झाल्यावांचून राहाणार नाहीं असा त्यांचा विश्वास होता. हिंदुधर्मांत भक्ति आहे, परंतु त्या भक्तीमध्यें इतरांस सुख व्हावें म्हणून आपण स्वत: हालअपेष्टा भोगावयास सिद्ध होण्याचें सामर्थ्य नाहीं असा जो ख्रिस्ती लोकांकडून आक्षेप येत असतो त्यास उत्तर देतांना ते एकदां म्हणाले कीं,

I would be wronging Hinduism and losing sight of its evolution if I fail to perceive that what stands for the above idea is equally patent in Hinduism.

संतांचें लिखाण वाचा, त्याचें मनन करा असा ख्रिस्ती लोकांस आग्रह करितांना त्यांनीं काढलेले पुढील उद्गार संतांविषयीं त्यांच्या ठिकाणीं किती उत्कट आदर होता त्याची साक्ष पटवितात:—

If you study the lives and the teachings of the saints of the Bhakti school with close attention, with genuine sympathy, which gives you real insight, you will see how their point of view, the frame of their minds and mould of their lives have been given to them by the ideas in the Upanishds and the Bhagavat Gita...These saints tried to be सम to all beings. This attempt contains within itself the germ of the spirit of love which takes us to God. This idea we see paralleled in the teaching of Christ 'Do unto others as you would be done by.' But the समत्व that these sages sought to attain goes deeper, they try to look upon others just as if they were their, selves

अवतारवाद ज्या अर्थानें इतरांस मान्य आहे त्या अर्थानें प्रार्थनासमाजास मान्य नाहीं, व नारायणरावांसही तो मान्य नव्हता. परंतु पुढील उताऱ्यांत दर्शविलेलें तत्त्व

"But at certain times in national or world history when He sees that evolution has reached a certain point He sends—and it has so frequently occurred that it may be called a law—a new soul into the world charged with power, not with superhuman power, but with human power raised to the utmost point it can reach at that period of human development, a genius, as we call it, is born. A new start is given to the world, an elect soul is sent forth to do a vast work."

त्यांस पूर्णपणें मान्य होतें व "होतां धर्मग्लानि प्रभु तूं संभवसी। साधुहृदीं ज्ञानाची स्फूर्ति तयां देसी" ह्या "प्रार्थना संगीतां"तील[1] वचनावरून वरील उताऱ्यांतील तत्त्व प्रार्थनासमाजासही अमान्य नाहीं असें होतें. परंतु नारायणरावांनीं अवताराची कल्पना निराळ्याच रीतीनें लोकांपुढें मांडण्याचा प्रयत्न केला आहे. व्यक्तिमात्राच्या ठिकाणीं परमेश्वरानें अनेक गुण बीजरूपानें ठेविले आहेत. सत्य, ज्ञान, दया, प्रेम, आनंद हे जे गुण आहेत त्यांच्या वाढीस ह्या संसारामध्यें नित्य अनेक प्रसंग येत असतात. तेव्हां परमेश्वराची अशी इच्छा आहे कीं, हे त्याचे गुण आमच्या संसारामध्यें वाढीस लावावे व त्यांचा विकास करून परमेश्वराच्या राज्याची स्थापना करणारीं त्याच्या हातांतील साधनें आम्ही व्हावें. जितक्या अंशानें त्याच्या गुणांची वाढ आम्ही आमच्या आयुष्यांत करूं व त्यांचा उपयोग इतरांच्या हितासाठीं करूं तितक्याच अंशानें आम्हीच त्याचे अवतार आहोंत हें सिद्ध होत

१. प्रा. सं. पृष्ठ ३८९ आरती ७ वी पहा.

जाईल.[१] परमेश्वर अशा प्रकारें व्यक्तिमात्रानें आपल्याशीं सहकार्य करावें अशीच अपेक्षा करीत असतो. आम्ही आपल्या स्वतःच्या आचरणाच्या द्वारें स्वाराज्याची ( देवाच्या राज्याची ) स्थापना करावी एवढीच त्याची अपेक्षा नसून त्याचा विस्तार करण्याची जबाबदारीही त्यानें व्यक्तिमात्रावर टाकलेली आहे. संसार ही सगळी माया, हा सर्व व्यर्थ पसारा नाहीं; ह्या संसारांत देवानें आत्मोद्धारासाठीं व इतरांच्या उद्धारासाठीं आम्हांला घातलें आहे. येथें केवळ मौज करण्यासाठीं आम्ही आलेलों नाहीं. त्याचे स्वतःचे गुण त्यानें आम्हांमध्यें ठेविले आहेत, त्यांचा विकास स्वतःच्या जीवनामध्यें आम्ही करून त्याच्याद्वारें त्याच्या हेतूची पूर्तता करावयाची आहे. आम्ही आनंदानें व उल्हासानें त्या कार्यास लागून, त्याचे खरेखरे अवतार आपण आहोंत हें त्याच्या धर्माची स्थापना व वाढ करून दाखविण्यास सिद्ध झालें पाहिजे.[२]

अशा प्रकारें आपले लेख व व्याख्यानें ह्यांच्या द्वारें प्रार्थनासमाजाची शिकवण काय आहे ती लोकांपुढें ठेवण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, एवढेंच नाहीं तर ह्या शिकवणीनुसार त्यांनीं आपलें स्वतःचें साधन सतत चालू ठेविलें. त्यांनीं अखेरपर्यंत स्वतःला शिस्तींत ठेवण्याचा प्रयत्न कसा केला, हें पुढें जें विवरण केलें आहे त्याचे वरून वाचकांच्या ध्यानांत येईल. वरील सर्व विवेचनावरून नारायणरावांनीं सामुदायिक साधनास कसा हातभार लावला तें स्पष्ट झालें. आतां त्यांच्या व्यक्तिगत साधनाची वाचकांस कल्पना करून देतों.

---

१. He calls on us to act as free agents entrusted with the duty of carrying out the eternal laws of His kingdom. He calls on us to become *avatars* to incarnate in our lives the principles of Sanatan Dharma-eternal religion…We are asked to become righteous, just, loving and kind. All these commandments are but the directions which we are to follow in our relations with our fellowmen…He has made us *avatars* to raise and uplift other men and in this process of serving others to achieve our elevation.

२. Life is not vanity nor vexation. It is not *illusion* nor *maya*. It is a trust for the due discharge of which we are responsible to Him who blessed us with it. He has not brought us here to get the most of the worldly pleasures but to relinquish them for higher things. He has designed us to be the concrete embodiments of His eternal laws to enact them in our own lives and in the lives of others. Let us respond willingly to the call and fulfil the great hopes which our Heavenly Father has placed in us by proving real *avatars* in establishing *dharma* and helping its advancement.

प्रकरण आठवें

# आध्यात्मिक जीवन

धार्मिकतेसंबंधानें लोकांमध्यें साधारण समजूत अशी आहे कीं, धार्मिक मनुष्य म्हटला म्हणजे संसारासंबंधानें त्याची एक विशिष्ट दृष्टि असावी लागते. संसारांत तर असावयाचें, सभोंवतालच्या इतर माणसांप्रमाणेंच संसार करावयाचा, परंतु संसारासंबंधानें नेहमीं बोलतांना अत्यंत तुच्छ भाव दर्शवावयाचा. संसार ही माया आहे, हा सर्व व्यर्थ पसारा आहे,[१] त्यांतून सुटून जाण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे;[२] ह्या संसारांत राहून आपल्याला कोणत्याही प्रकारें धर्मसाधन करितां येईल ही कल्पना व्यर्थ आहे. आपली स्त्री, आपलीं मुलें, आपले आप्त इ० आपल्या साधनमार्गांतील विघ्नें आहेत, म्हणून ह्यांच्यापासून दूर राहाणें धार्मिक माणसास अत्यंत अगत्याचें आहे, अशी जरी साधारण समजूत आहे व त्या समजुतीचें वारें प्रार्थनासंगीतासारख्या प्रार्थनासमाजाच्या अधिकृत पुस्तकांतील संग्रहाला जरी लागलें आहे, तरी नारायणरावांच्या चरित्राकडे पाहिलें तर त्यांच्या सर्व व्यवहारांत असल्या आध्यात्मिकतेचा प्रवेश झालेला ज्याप्रमाणें आढळावयाचा नाहीं, त्याचप्रमाणें त्यांचे लेख व व्याख्यानें ह्यांत ह्या आध्यात्मिकतेची प्रशंसाही आढळावयाची नाहीं. ब्राम्हधर्म

---

१. आमच्या साधुसंतांच्या विचारांत व शिकवणुकींत संसारासंबंधानें चुकीची शिकवण आढळते ह्याची जागृति त्यांना चांगली होती. म्हणून एकदां त्यांनीं ह्याची आठवण पुढील शब्दांनीं करून दिली होती:— "आमचे साधुसंत जगाला, संसाराला अगदीं कंटाळले होते. त्यांची अशी शिकवण आढळते कीं, हें सर्व व्यर्थ आहे, ही माया आहे, म्हणून संसाराचा त्याग केला पाहिजे. तरच आपली धडगत."

२. प्रार्थनासमाजानें प्रसिद्ध केलेल्या "प्रार्थनासंगीत" ह्या पुस्तकांतही "संसार लोभ सारा । वाउगा हा पसारा । कांहीं न येइ कामा ।" असें एका आरतींत म्हटलें आहे !

असा धरिं छंद । जाई तुटूनिया भवबंध ॥ —प्रा. सं.

सर्व व्यवहार धर्माच्या आश्रयानें व्हावेत असें म्हणतो. आणि त्याबरोबरच आवश्यक व्यवहाराच्या त्यागानेंच धर्मसाधन होणें शक्य आहे अशी त्याची शिकवण नाहीं. " कुटुंब हा समाजाचा पाया आहे, आणि जीवितास उदात्तता प्राप्त करून देणारे नव्हत, तर समुदायास श्रेष्ठत्व प्राप्त करून देण्याच्या कामीं सहाय्यभूत होणारे सद्गुण गृहस्थाश्रमांतील कर्तव्यक्षेत्रांत वावरून संपादितां येतात." " सन्मार्गानें अर्थार्जन करणारा, सम्यक् ज्ञानानें संपन्न, मोक्षाप्रत जातो " असें याज्ञवल्क्य ऋषींनें म्हटलेलें त्यांस ज्ञात होतें. त्याचप्रमाणें विष्णुपुराणांत " गृहस्थाश्रम सर्वांत श्रेष्ठ व उदात्ततम " मानलेला आहे हें ते जाणून होते. ह्यासाठींच त्यांनीं म्हटलें आहे कीं, " गृहामध्येंच प्रेमाचा पहिला धडा आपण शिकतों. प्रेमाचा दीप तेवत नसला, तर जग भयाण, निराशापूर्ण भासेल आणि जीवित दुःखमय केवळ भारभूत असें वाटेल. प्रेमरूपी प्रकाशाचें उगमस्थान म्हणजे गृहच--कुटुंबच--होय. जें जें कांहीं मनुष्याला चांगुलपणा देणारें आहे, जें राष्ट्रीय महत्त्व प्राप्त करून देणारें आहे, म्हणजे आज्ञाधारकता, स्वार्थत्याग, कर्तव्यें निष्ठापूर्वक करण्याची प्रवृत्ति, हे सर्व गुण कुटुंबामध्येंच सांपडतात. समाजाचे घटक ( स्त्रीपुरुष ), राज्यांतले नागरिक, कार्यकर्ती माणसें, साधु, वीर आणि विद्वान् माणसें जन्माला येण्याचें स्थान कुटुंबच होय. सारांश, एखाद्या देशांतल्या बहुतेक कुटुंबांचे विचार, भावना, कृत्यें आणि महत्वाकांक्षा हीं कशा प्रकारचीं आहेत तीं मला सांगा, म्हणजे तो देश कोणत्या दर्जाचा आहे, श्रेष्ठ दर्जाचा आहे कीं कनिष्ठ दर्जाचा आहे हें मी सांगेन. " परमेश्वर प्रेमस्वरूप आहे असें आम्ही म्हणतों, असा सिद्धान्तही ठरवून त्याच्या आधारें सर्व आस्तिक जगामध्यें नानाप्रकारचीं प्रवचनें होत असतात. पण, नारायणरावांनीं असें निक्षून सांगून ठेविलें आहे कीं शुद्ध प्रेमाचे धडे मिळण्याची शाळा जर कोठें असली तर ती आपलें घर, आपलें कुटुंब होय. कुटुंबामध्यें राहून नानाप्रकारचे प्रसंगांतून पार पडत असतांनाच देवाच्या प्रेमाची ओळख होते. कुटुंबांत नानाप्रकारचे प्रसंग देतात, नानाप्रकारच्या माणसांशीं संबंध येतात, नानाप्रकारचीं कर्तव्यें करावीं लागतात, कर्तव्याचे, प्रेमाचे, सहनशक्तीचे, त्यागाचे, आत्मसंयमनाचे धडे कुटुंबांतच मिळतात. हा अनुभव नारायणरावांना आल्यामुळें त्यांनीं म्हटलें आहे कीं "आमचें प्रेम, आमची न्यायबुद्धि, आमची सत्यप्रीति, आमचा स्वार्थत्याग, आमची कार्यप्रवृत्ति, कर्तव्य म्हणजे एक कटकट नव्हे, तर ती एक प्रकारची भक्ति आहे असें मानण्याचा स्वभाव हें सर्व शिकण्याचें स्थान कुटुंबच होय. ह्यामुळेंच समाजचक्राला गति मिळत असते." ह्यावरून एक गोष्ट आपल्या विशेष रीतीनें ध्यानांत येते. प्रेम करण्याच्या शक्तीला प्रथम व्यक्तिमात्राच्या कुटुंबांत वाव मिळावयाचा असतो. जेथें आपल्या स्वतःच्या

कुटुंबांतील माणसांस आपल्या प्रेमळ स्वभावाची ओळख होत नाहीं, तेथें त्यांना त्याचें उग्र स्वरूपच दिसतें; पण प्रेमाचा वर्षाव बाहेरच्या माणसांवर होतो, तेथें कुटुंबांत प्रेमराज्य वसणें शक्य नाहीं. आपल्या स्वतःच्या मुलांच्या शिक्षणाची आबाळ करून इतरांच्या मुलांच्या शिक्षणासाठीं शिक्षणसंस्था चालविणारांचें ज्याप्रमाणें कोठें तरी चुकतें, त्याचप्रमाणें हें आहे. नारायणरावांस तर असें वाटत असे कीं, "कुटुंबप्रीतीपासून स्वदेशप्रीतीस सुरुवात व्हावी" आणि "ईश्वरी संकेतही असाच आहे," असा त्यांचा दृढ भरंवसा असे. आणखीही त्यांनीं सांगून ठेविलें आहे कीं, "स्वदेशप्रीतीसही परिणतावस्था आहे आणि ती अखिल मानवजातीवरील प्रेम ही होय. पण, ह्या ध्येयापासून आम्ही च्युत झालों आहों. आमच्या अंतःकरणांतली प्रेमज्योत विलयाला गेली आहे. प्रेमज्योतीच्या प्रकाशामध्यें उदार मनानें व शुद्ध अंतःकरणानें वावरावयाचें सोडून कूपमंडुकवत् स्वार्थ दृष्टीनें आम्ही आपापल्यापुरतीं लहान लहान जगें निर्माण केलीं व आमच्या अंतःकरणावर तिमिराचें आवरण पाडलें.'' देवाच्या प्रेमाचा आस्वाद प्रथम स्वतःच्या कुटुंबांत घेऊन, आपल्या प्रेमाची ओळख प्रथम कुटुंबांत देऊन, त्या प्रेमवृक्षाचा सारखा विस्तार होत जावा असें ध्येय त्यांनीं आपल्यापुढें ठेविलें. आपल्या स्वतःच्या विकास-साधनाच्या कार्यीं रत असतांना त्यांनीं जी एक गोष्ट आपल्या दृष्टीपुढें ठेविली होती, व जिचा साधारण माणसास नित्य विसर पडतो, ती ही कीं, विचाराप्रमाणें आपला आचार असला पाहिजे.[1] आपल्या विचाराप्रमाणें जें जें कांहीं शुभ व सत्य असेल तें आपण कृतींत आणिलें पाहिजे. आणि ह्यासाठीं व्यक्तिमात्रानें आपल्या शीलावर करडी नजर ठेविली पाहिजे. कारण "आयुष्यांतील प्रत्येक क्षणीं आपण आपलें शील बनवीत असतों." असें जर आहे, तर प्रत्येक क्षणीं आपण जागरूक असलें पाहिजे हें उघड झालें. मग तशी जागरूकता राखण्याचा निश्चयात्मक प्रयत्न आमच्या हातून होत असतो काय? आपण नेहमीं जें ध्यानांत ठेवावयास पाहिजे तें हें कीं "आपण परिस्थितीच्या ओघाबरोबर वाहून जात नाहीं." आपण परिस्थितीच्या ओघाबरोबर जर वहावत गेलों तर आपलें शील बनावयाचें नाहीं, आपल्या स्वत्वाची वाढ व्हावयाची नाहीं व आपलें व्यक्तित्व दिवसेंदिवस नष्ट होत आहे असा कष्टमय अनुभव मात्र आपल्याला येईल.

---

१. आपल्या एका व्याख्यानांत नारायणराव म्हणतात :—

"व्यक्तिमात्राचा श्रेष्ठतम धर्म जो आहे तो हाच कीं, पूर्णपणें विचार करून जें कांहीं आपल्याला योग्य, सत्य, न्याय्य वाटेल तें कर्तव्यबुद्धीनें आचरणांत आणावयाचें, मग त्याच्यायोगें कोण राजी होतो व कोणाची इतराजी होते हा विचारच मनांत आणावयाचा नाहीं."

आतां ह्या विषयाचा विचार करीत असतांना एक गोष्ट आपल्या दृष्टीपुढें राहाते व ती आपल्याला नेहमीं भेडसावीत असते. आमचें जें कांहीं साधन असेल तें आम्हांला संसारांत राहून करावयाचें असतें. संसार ज्या कुटुंबाच्याद्वारें करावयाचा तें कुटुंब अत्यंत उपकारक आहे हें नारायणरावांनीं आपल्याला सांगून ठेविलें आहे. डॉ. भांडारकरांनीं एकदां सांगितलें कीं " प्रपंच म्हणजे ईश्वराची पूजा असें झालें पाहिजे. सत्कार्यें हीं पुष्पें होत तीं वाहून संसार-मंदिरीं देव पूजावा." हें अगदीं योग्य आहे. परंतु सत्कार्य करूं लागलों कीं, त्याचाच अभिमान[1] मनांत उत्पन्न होतो; परोपकार हातून होऊं लागला कीं, इतरां-कडे दृष्टी जाते आणि दुसऱ्याच्या हातून तसें वर्तन होत नाहीं अशी खरीखोटी समजूत करून घेऊन आपण स्वतःच्या बढाईत गर्क होतों, असा पुष्कळांचा अनुभव आहे. आतां ब्राम्ह व प्रार्थनासमाजांत साधारणतः असा समज आहे कीं, प्रत्येक घटक आपल्या आचाराच्याद्वारें कमीअधिक प्रमाणानें प्रचारकार्य करीत असतो. परंतु प्रत्येक सभासदाला साधनसंपत्तीचा संग्रह करावयाचा असतो. ह्या समाजां-मध्यें प्रचारक व सभासद प्रचारक असाही भेद करितां येतो. ह्या दोहोंच्या साधन-साहित्यामध्यें साहजिकपणें फरक आहे. पंडित शिवनाथ शास्त्री ह्यांचेंच आपण उदाहरण घेऊं. पंडित महाशय एक उच्च श्रेणीचे साधक होते, गृहस्थ होते व प्रचारक होते. प्रचारकही व्यवहार करितो व सभासदही व्यवहारांत असतो. तथापि व्यवहार करून प्रचारकास साधनसंपत्तीचा संग्रह करण्यास मिळणारी संधि व सभासदास मिळणारी संधि ह्यांत फरक आहे. प्रचारकाचे व्यवहार व साधकाचे व्यवहार ह्यांत भेद आहे. तरी प्रचारक गृहस्थांच्या परिस्थितीचा विचार करून मार्ग दाखविण्याचा प्रयत्न करितो. संसारांतील प्रचारकाचें जीवन व साधकाचें जीवन ह्यांतील भेद तो जाणत असतो. एवढेंच केवळ नव्हे तर गृहस्थ-गृहस्थाच्या परि-स्थितीमध्यें व एकंदर जीवनामध्यें असलेला भेद तो रात्रंदिवस अनुभवीत असतो. व त्यामुळें साधनसंपत्तीमध्यें सारखेपणा असूं शकत नाहीं. दुसरी एक गोष्ट अशी आहे कीं, दुसऱ्याचें साधन कांहींएक अंतरापर्यंत सर्वांस लाभदायक होणें शक्य आहे. परंतु प्रकृतिभेदामुळें प्रत्येकाचा साधनक्रम स्वतंत्र असण्याचा संभव आहे. ह्या सर्व गोष्टी ध्यानांत घेऊन नारायणरावांनीं आपल्या साधनसंपत्तीचा कसा संग्रह केला व त्यांचा साधनमार्ग कसा उद्बोधक झाला त्याचा आतां आपण विचार करूं.

नारायणरावांच्या ठिकाणीं अध्ययनशीलता अगदीं अखेरपर्यंत होती हें सर्व-श्रुत आहे. पण केवळ अध्ययनानें व्यक्तिमात्राच्या साधनसंपत्तींत भर पडत नाहीं.

---

१. वांटिलें तें धन। केली अहंता जतन ॥

अध्ययनाबरोबर मननशीलता पाहिजे. मनन स्वदोष जागृति करितें. स्वदोष-जागृतीनंतर उपरति होणें शक्य आहे. स्वदोषजागृतीच्या अनुरोधानें शरणागतीची आवश्यकता भासूं लागते व त्यानंतर कर्तव्यरति स्थिरावून, मार्गदर्शक होऊन सामर्थ्यदायी होते. हा सर्व अनुभव व्यक्तिमात्रानें आपापल्या कुटुंबांत घ्यावयाचा असतो. इतरांचें साधन फार तर मार्गदर्शक होऊं शकतें हें वर आलेंच आहे. "नित्य ह्या मनाशीं करितों विचार। तों हें अनावर विषयलोभी" हा तुकोबांच्या अभंगाचा चरण केवळ आपल्या स्वतःला लावून घेऊन तो घोळून घोळून म्हणण्यांत धर्मसाधन नाहीं. आपल्या स्वतःच्या अनुभवाच्या कसाला इतर साधकांचे अनुभव लावून स्वतःच्या प्रयत्नानें मार्ग कंठावयाचा असतो. 'अनुभवें अनुभव अवघा साधियेला। तेणें स्थिरावला मनु ठायीं' असें तुकोबांनीं जें म्हटलें आहे तें ह्याच उद्देशानें. इतरांचे अनुभव कोठपर्यंत उपयोगी पडतात तें ह्यावरून कळतें. मग स्वतः नारायणरावांनीं आपली साधनसंपत्ति कशी जमविली व आपल्या साधनाचा कसा विकास केला याचा आपल्याला माग काढतां येईल काय? हा माग लावण्याचीं जीं साधनें उपलब्ध आहेत तीं प्रथम ध्यानांत घेतलीं पाहिजेत.

नारायणराव मधून मधून रोजनिशी लिहीत असत. आम्हांला त्यांच्या कांहीं रोजनिशा मिळाल्या आहेत. पण एकही रोजनिशी सारखी वर्षभर लिहिलेली नाहीं, म्हणूनच ते मधून मधून रोजनिशी लिहीत असत असें वर म्हटलें आहे. ह्यांत स्वतःचे अनुभव कधीं लिहिलेले आहेत, तर स्वतःस उपदेश, आत्मपरीक्षण व आत्मनिर्भर्त्सनही आहे. ह्याशिवाय एकदोन चोपड्यांतून तुरळक आत्मगत विचार लिहून ठेविले आहेत. त्यांनीं लिहिलेल्या कांहीं पत्रांतही स्वानुभवकथन, अगर मार्गकथन आढळतें. त्याच प्रमाणें त्यांचे धर्मपर लेख व व्याख्यानें ह्यांचें परिशीलन केलें म्हणजे त्यांत त्यांचा स्वतःचा अनुभव पुष्कळ दिसून येतो. पुष्कळ वेळां स्वतःच्या अडचणी, स्वतःचे उन्नतीचे प्रसंग ह्यांच्या आधारेंच ते बोलत आहेत असें वाटतें. नारायणराव निरनिराळ्या व्यक्तींशीं झालेलीं संभाषणें कधीं कधीं स्वतः लिहून ठेवीत असत. त्यावेळीं ते आपले विचारही टिपून ठेवीत. त्याचप्रमाणें सकाळीं उठल्यापासून रात्रीं झोंपीं जाईपर्यंत काय झालें, रजेच्या दिवसांत काय वाचलें, नंतर मनांत कायकाय विचार आले ह्यांचें कधीं कधीं ते काळजीपूर्वक टांचण करीत. ह्या सर्व साधनांच्या आधारें त्यांच्या आध्यात्मिक विकासाची रूपरेषा येथें आंखण्याचें ठरविलें आहे. परंतु ह्या बाबतींतही एका गोष्टीविषयीं विशेष खबरदारी घेतली पाहिजे. साधनमार्गांतील एक सर्वसाधारण अनुभव असा आहे कीं, त्या मार्गांत व्यक्तिमार्गाची जसजशी गति होत जाते, तसतशी त्याच्यामध्यें अधि-

काधिक प्रखरतेनें स्वदोषजागृति होत जाते. इतरांच्या दृष्टीनें सूक्ष्मतम दोष असले, तरी स्वतःमध्यें ते असल्यास त्यांचें महत्त्व त्यास विशेष वाटूं लागतें व त्यांच्या निरसनाविषयीं प्रखर उपायांची तो योजना करूं लागतो. ही चित्ताची ठेवण लक्षांत न आल्यामुळें तुकोबांसारख्या साधुपुरुषाचे आत्मनिर्भर्त्सनपर उद्गार पाहून त्यांचे कांही टीकाकार त्यांची विटंबना करण्यास तयार होतात ! तसेंच, नारायणरावांचें आत्मनिर्भर्त्सन, उपाययोजना, आत्मोपदेश पाहून आपणही आपली वृत्ति तशी न होऊं देण्याची खबरदारी घेतली पाहिजे. ज्याप्रमाणें "मी व माझा पिता एक आहें" असें म्हणणाऱ्या येशूनें अंतीं "देवा, ह्यावेळीं तूं मला कसें सोडलेंस" असे उद्गार काढल्यानें त्याची वास्तविक योग्यता कमी होत नाहीं, त्याचप्रमाणें मी नित्य तळाला जातों व वर येतों, किंवा, नाहीं आराधिलें तुज । भक्ति न कळेचि मज ॥, अगर 'बळें बाह्यात्कारें संपादिलें सोंग । नाहीं झाला त्याग अंतरींचा ॥' किंवा 'नित्य ह्या मनाशीं करितों विचार । तों हें अनावर विषयलोभी ॥' 'अवघ्या पातकांची मी एक राशी' अशा प्रकारचे उद्गार पाहून तुकोबासंबंधानें मनामध्यें हीनभाव येण्याची आवश्यकता नाहीं. ही गोष्ट नारायणरावांच्या साधनक्रमाचा विचार करितांना आपण आपल्या दृष्टीपुढें ठेविली पाहिजे. कारण, कधींकधीं त्यांनीं धन्यतेचे, समाधानाचे, व शांतिसूचक उद्गार काढले आहेत, तर पुष्कळ प्रसंगीं आत्मनिर्भर्त्सनपर, परीक्षणपर, स्वतः-विषयीं अत्यंत क्षुद्रभाव प्रकट करणारे, कधीं निराशेचे, तर कधीं खेदाचे उद्गार त्यांनीं काढले आहेत. तेवढयावरून त्यांच्या आध्यात्मिकतेचा ठाव लागत नाहीं.

आपल्या साधनक्रमामध्यें त्यांनीं पहिली गोष्ट जी केली ती त्यांनीं आपल्याला शिस्त[१] लावून घेतली. रोज पहांटे म्हणजे ४ वाजतां उठावयाचें, प्रातर्विधि आटो-पावयाचा व कांहीं काळ भजन, मनन, प्रार्थना व धर्मग्रंथांचें वाचन ह्यांत घालवा-वयाचा व रात्रौ निजण्यापूर्वी तोच क्रम त्यांचा असे. हा क्रम त्यांनीं अगदीं अखेर-पर्यंत चालविला. जेव्हां जेव्हां त्यांनीं रोजनिशी लिहिली तेव्हां तेव्हां प्रातःकाळीं केलेल्या भजनप्रार्थनेचा अगर वाचलेल्या ग्रंथांचा त्यांनीं उल्लेख केला नाहीं असें सहसा होत नाहीं. कधीं कधीं रजेच्या व इतर दिवसांत कोणकोणते ग्रंथ वाचावयाचे, दोन प्रहरच्या वेळीं काय वाचावयाचें त्याचें ते टांचण करीत असत. रजेच्या दिवसांसाठीं केलेलें एक टांचण येथें देतों :—

"पहांटे ४ वाजतां[२] उठून प्रातर्विधीनंतर ६ वाजेपर्यंत भजन, मनन व प्रार्थना.

---

१. I am grateful to God for the impulse to work methodically and resolve to work rather than weary myself in indolence.

२. लहानपणीं पहाटे उठण्याची संवय त्यांना त्यांच्या आजोबांनीं लाविली ती संवय होनावर अगर कारवार येथेंच ठेवून ते मुंबईस आले नाहींत हें विशेष होय !

( प्रार्थनासंगीतांतील पदें व अभंग ह्यांची त्यांनीं एक मोठी यादी केली होती. तीं पदें व ते अभंग त्यांच्या विशेष म्हणण्यांतील असत. ) पुढें ६ पासून ७-३० पर्यंत ज्ञानेश्वरी, एकनाथ, बायबल, ब्राउनिंग ह्यांचें वाचन. ८ पासून ११-३० पर्यंत लेखनव्यवसाय. १-२ पत्रव्यवहार. २-३ वर्तमानपत्रें व त्यांतील विशेष विचारांचें टांचण; ३-५ लेखनव्यवसाय, ५-७ फिरणें. ७-८ उपनिषदांचें वाचन, मनन व प्रार्थना. ८-१० ग्रंथवाचन."

कोर्टाच्या दिवसांतला कार्यक्रम थोडा निराळा असे. ७-३० पर्यंत वाचन वगैरे झाल्यावर Cases of the Day; Cases for preparation; Cases on the weekly list हें काम उरकल्यानंतर कायद्याचें रिपोर्टवाचन, ग्रंथवाचन वगैरे. कोर्टानंतर संध्याकाळीं मुलांबरोबर वाचन व भाषण भोजनोत्तर पुन्हां वाचन वगैरे. रात्रौ झोंपीं जाण्यापूर्वीं भजन, मनन व प्रार्थना.[1]

अशाप्रकारें त्यांनीं जरी आपल्याला शिस्त लावण्याचा प्रयत्न केला, तरी वारंवार स्वतःसंबंधानें असमाधानाच्या स्थितीचा त्यांस अनुभव येत असे. पुष्कळांस रस्त्यानें चालतांना ते विचारमग्न स्थितींत आढळत. कधींकधीं ह्या विचारमग्न स्थितीचें पर्यवसान औदासिन्यांत होत असे. नारायणराव स्वतः फार हळव्या मनाचे असल्यामुळें कोणी तरी विशेष परिचयाच्या मित्रानें त्यांचें चुकतें कोठें हें त्यांना दाखवून दिलें, अगर आपल्या इतक्या वाचनाचा ते इतरांस लाभ देत नाहींत, अगर समाजाचें जें "सुबोधपत्रिका" नामक पत्र त्यास लेखनसहाय्य देत नाहींत असें म्हटलें ( Mr...sees me and says I am to blame for not utilising my reading in the Subodha Patrika. Ap. 14. 1899) कीं, त्यांच्यावर निराशेचा पगडा बसे. इतकीं साधनें अनुकूल असतांना, इतकी अनुकूल परिस्थिति असतांना, आपण आयुष्याचा सदुपयोग करीत नाहीं, एवढेंच नव्हे, तर तें व्यर्थ घालवीत आहों असें त्यांस कधीं कधीं वाटत असे. परंतु प्रारंभीं प्रारंभीं वारंवार त्यांची वृत्ति अशा प्रकारची होत असे. अशा एका वेळीं ते म्हणतात :—

I can not allow myself to drift in this world in this aimless manner. I have been for sometime suffering from fits of depression and moods of melancholia have so much of late been forcing over me that I am afraid if I do not controll myself and summon courage and manliness to battle with these moods I shall

---

१. हा त्यांचा क्रम माहित नसल्यामुळें लोकांचा पूर्वी असा समज असे कीं त्यांचें वाचन एकदेशीय आहे. १८९९ सालीं एकदां भाजेकर वकिलांनीं आपले धर्मग्रंथ वाचण्याचा त्यांना उपदेश केला !

be making a wreck of my life. The feeling has been perpetually worrying me that I am good for nothing in this world—that there is nothing that can please me in it and all I can do is to endure life and be dragged on by it instead of leading it with and for some noble and useful purpose. ( 16-6-95. )

ही अशी भयंकर निराशेची स्थिति पुढील काळांत केव्हांही त्यांस प्राप्त होत नसे. आणि तारखेवरून पहातां ह्यानंतर आणखी दोन वर्षांच्या आंतच त्यांनीं परमेश्वरावरील दृढनिष्ठा, तो आपला मार्गदर्शक असल्याची ग्वाही व तो आपल्या कुटुंबांतील सर्व माणसांचा रक्षक असल्याचा अनुभव निवेदिला आहे ( पृ. १५१ पहा. ) आतां वर वर्णिलेली भयंकर निराशेची स्थिति व तुकोबांचे आत्मनिर्भर्त्सनपर अभंग ह्यांत साहश्य दिसून येतें व त्यावरून इतकेंच सिद्ध होतें कीं, साधनमार्गामध्यें जे अंतःकरणपूर्वक मार्ग क्रमीत असतात त्यांस तळाला जाण्याचे व वर येण्याचे प्रकार यांचा वारंवार अनुभव येत असतो. अशा प्रकारची स्थिति प्राप्त झाली म्हणजे नारायणराव साधारणपणें दोन उपायांची योजना करीत असत. वासुदेवराव भांडारकर जेव्हां मुंबईंत असत तेव्हां कोणताही विशेष विचार मनांत आला, एखादा ग्रंथ वाचीत असतां त्यांत कांहीं सुंदर भाग आढळला कीं आपला विचार किंवा तो भाग काकांच्या पुढें ( वा. गो. भां. ) ठेवण्याचा त्यांचा प्रघात असे मग त्यावर चर्चा चाले. ही चर्चा हायकोर्टांत वकिलांच्या खोलींत, परस्परांच्या घरीं किंवा फिरत असतांना रस्त्यांतही चाले. त्याप्रमाणें एकदां वरच्या प्रकारची वृत्ति असतांना वासुदेवरावांशीं संभाषण झालें. त्यासंबंधानें लिहितांना त्यांनीं म्हटलें आहे कीं, "माझा नित्याचा हा असा अनुभव आहे कीं, एकट्या वासुदेवरावांनाच माझ्या मनाची स्थिति चांगल्या रीतीनें कळते. त्यांना माझे विचार, विकार व वृत्ति ह्यांविषयीं सहानुभूति आहे. त्यांनीं अशा प्रकारची निराशेची वृत्ति निश्चयानें सोडून देण्याचा मला उपदेश केला व मलाही आपण असें गलित न होतां विवेकाचा आश्रय करणें हेंच योग्य असें वाटूं लागलें आहे." ह्या अशा स्थितींतही ते परमेश्वराच्या चरणांचा आश्रय करून त्याची मनःपूर्वक प्रार्थना करीत असत. परंतु वासुदेवराव पुढें बडोद्यास गेल्यावर परमेश्वर परमात्मा हाच एक त्यांचें विसाव्याचें ठिकाण झालें. मनाच्या त्रस्त स्थितींत असतांना देवाच्या चरणांचा आश्रय घ्यावयाचा, आपल्या मनाची स्थिति त्याला निवेदन करावयाची, आपली आर्ति त्याला सांगावयाची, आपला अनुभव त्याला सांगावयाचा व त्याच्याच स्फूर्तीनें स्वतःला उपदेश करावयाचा असा त्यांचा क्रम असे! अशाच एका वेळीं त्यांनीं आपल्या स्वतःला बजावलें कीं, "आपलें आयुष्य म्हणजे स्वतःला शिस्त लावून घेण्याचें स्थान होय. ही अशी शिस्त आपल्याला जर लावून घ्यावयाची, तर आपण

सामर्थ्यवान् असलें पाहिजे व आपल्याला कांहीं तरी कार्य करून दाखवावयाचें आहे असा आत्मविश्वास असला, तरच हें सामर्थ्य प्राप्त होणार आहे." लागलीच देवाचें स्मरण करून ते म्हणतात "पण, देवा, हें सामर्थ्य मला तुजवांचून दुसऱ्या कोठून प्राप्त होणार ?" (म्हणून आपल्या आत्म्यास उद्देशून ते म्हणतात) "तूं ह्या मातींतला किडा नाहींस. तुजमध्यें दैवी अंश आहे त्याला बिलग, त्याचा प्रकाश जसा आंत तसा बाहेर पडेल असें कर. सर्व शुभकार्यांच्या स्फूर्ति तुला तिकडून मिळूं देत. ह्या जीवितरूपी गिरीचें टोंक धुक्यानें व्याप्त असलें, तरी तेथें चढून जा, व देवाची प्रार्थना कर, कीं देवा, आयुष्यांतलीं कर्तव्यें एकाद्या मर्दाप्रमाणें करण्याचें सामर्थ्य मला दे."[१]

निराशेची लाट आली, मन उदास झालें, सभोंवार अनाचार, दुराचार अधिक प्रमाणांत आढळला, कांहीं व्यक्तींविषयीं असलेला आदर अनाठायीं होता असें आढळून आलें, म्हणजे वरीलप्रमाणें उपाययोजना होणें हें ठीक आहे. पण, नेहमींची व्यवस्था काय ? आपल्या एकंदर वर्तनास शिस्त लावणें अगत्याचें असतें व त्याप्रमाणें नारायणरावांनीं आपल्या आचरणास शिस्त कशी लावली होती त्याचा उल्लेख वर आला आहेच. वकील, न्यायाधीश, प्रधान, मंत्री, कौन्सिलचे अध्यक्ष ह्या सर्व स्थितींत असतांना स्वतःच्या साधनास ते केव्हांही विसरले नाहींत. कितीही महत्त्वाचें काम असलें, तरी रोजचा आंखलेला साधनक्रम संपविल्यावांचून ते त्या कामास हात लावीत नसत. ठराविक पद्धतीचें साधन नीरस होण्याचा संभव असतो. मग ज्याप्रमाणें संध्येचे शब्द तोंडावाटे उच्चारावयाचे त्याप्रमाणें प्रार्थना अगर भजन ह्यांचेंही होण्याचा संभव असतो. म्हणून नारायणरावांचें साधन अगदीं रोजरोज नवें असे. म्हणजे त्यांनीं स्वतःच्या साधनास सहाय्यभूत अशीं पदें व अभंग ह्यांची निवड केली होती व त्यांतील कांहीं ते रोज आवडीनें म्हणत व त्यावर त्यांचें मनन रोज तासतास चाले, असें त्यांच्या रोजनिशींतील उल्लेखांवरून म्हणतां येतें. अभंगाचा एखादा चरण घ्यावयाचा, अगर उपनिषद्, गीता, ज्ञानेश्वरी, दासबोध,

---

१. Life is discipline and to go through it well, we must be strong. The strength must come from faith in our mission, where can that strength come but from Thee Oh Lord ! Believe, my Soul, Thou art not of the earth, but that there is the Divine in Thee ; cling to it, make it inwards and outwards : make that your inspiration and aspire with its help. The mountain tops of life may be misty. But stand there, climb there and pray, "God Almighty ! help me to go through life with manliness."

बायबलांतील एखादें वाक्य कधीं कधीं आपल्या ग्रंथांतील शिकवण व बायबल, ब्राउनिंग ह्यांची शिकवण ह्यांवर त्यांचें मनन चाले. ह्यांची ते तुलना करीत. १९२१ सालीं आपल्या रोजनिशींत मननानंतरची लहानशी प्रार्थना त्यांनीं लिहून ठेविली आहे. तींत ते म्हणतात :—

Teach me to live in contemplation of Thee and guide me to serve *all*, in particular the poor and the helpless and the afflicted not for gain or honour but for Thy sake and to do Thy will.

पुष्कळ वेळां Browning चें एखादें काव्य घेऊन त्यावर त्यांचें मनन चाले. तुकारामाच्या अभंगांवर त्यांची भक्ति पुष्कळ असे हें सर्वश्रुत आहे. एकदां प्रिन्सिपॉल फ्रेझर ह्यांनीं त्यांस आपल्या आवडीचे अभंग कळविण्याची विनंति केली होती. त्यावेळीं त्यांनीं ४० अभंगांची[1] निवड केली व त्यांत पहिला अभंग जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती हा होता.

---

१. नारायणरावांनीं निवडलेल्या ४० अभंगांचे प्रथम चरण असे आहेत :—

( १ ) जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती; ( २ )आतां माझ्या भावा, अंतराय नको देवा; ( ३ ) हा तो नव्हे कांहीं निराशेचा ठाव; ( ४ ) धाई अंतरीच्या सुखें; ( ५ ) प्रथम भाव शुद्ध कर; ( ६ ) हित व्हावें तरी दंभ दूरी ठेवा; ( ७ ) जाणोनि नेणतें करीं माझें मन; ( ८ ) मन वाचातीत तुझें हें स्वरूप; ( ९ ) नको सांडूं अन्न नको सेवूं वन; ( १० ) आतां तरी पुढें हाचि उपदेश; ( ११ ) निर्वैर व्हावें सर्व भूतांसवें; ( १२ ) चित्त शुद्ध तरी शत्रू मित्र होती; ( १३ ) क्षमा शस्त्र जया नराचिया हातीं; ( १४ ) मान अपमान गोवें; ( १५ ) नरस्तुति आणि कथेचा विकरा; ( १६ ) ऐसें भाग्य कई लाहाता होईन; ( १७ ) काय जाणें मी पामर; ( १८ ) अद्वैतीं तों माझें नाहीं समाधान; ( १९ ) न कळे महिमा वेद मौनावले; ( २० ) काय किती करूं लोकदंभ मान; ( २१ ) माझे मज कळों येती अवगुण; ( २२ ) ज्ञानियांचे घरीं चोजविता देव; ( २३ ) बोलासारखी करणी; ( २४ ) वाचेच्या चापल्यें बहु झालों कुशळ; ( २५ ) काय माझें नेती वाईट म्हणोन; ( २६ ) करूनि चिंतन, उच्चारीन नाम; ( २७ ) लौकिकापुरती नव्हे माझी सेवा; ( २८ ) जैसें तैसें राहे देवाचें हें देणें; ( २९ ) प्रेम जडो पदीं पतितपावना; ( ३० ) ठेवा जाणीव गुंडोन; ( ३१ ) काय तो विचार असो भेदाभेद; ( ३२ ) निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म; ( ३३ ) धन्य तोचि प्राणी क्षमा ज्यांचे अंगीं; ( ३४ ) जो भक्तांचा विसावा उभा पाचारितो धांवा; ( ३५ ) कासयास दूर जावें निजहृदयीं शोधावें; ( ३६ ) आपुलें स्वहित करावें पैं आधीं; ( ३७ ) सुखी संसारीं असावें; ( ३८ )

१. मानसन्मानासंबंधानें १८९७ सालीं त्यांची अशी भावना होती :—

I have made it the principle of my life to seek no honours or positions of trust and responsibility, but take them as they come, if I feel and my friends say that I am qualified for them. वर नारायणरावांनीं आपल्याला शिस्त लावून घेतली होती असें म्हटलें आहे. तथापि कधींकधीं केलेले निश्चय समाधानकारक रीतीनें पार पडत नसत, किंवा त्यांना स्वतःलाच ते तसे पार पडले आहेत असें वाटत नसे; म्हणून स्वतःच्या निश्चयांसंबंधानें त्यांनीं स्वतःच्या जागृतीसाठींच स्पष्टपणें लिहिलें कीं, एवढे हे सर्व निश्चय मीं केले होते खरे परंतु whether they have been kept up and adhered to or not is another question. त्यांतले किती पाळले गेले हा एक निराळाच प्रश्न आहे. ज्याप्रमाणें साधुवर्य तुकोबांनीं "जातों तळा येतों मागुतला वरी" असे उद्गार काढून आपल्या साधनाची कल्पना करून दिली आहे, त्याचप्रमाणें नारायणरावांचे स्वतःसंबंधानें सतत प्रयत्न चालू असत. स्वतःच्या दोषांवर त्यांची करडी नजर असे. ते भलतेंच कांहीं तरी बोलले, अगर कोणी भलतेंच कांहीं तरी केलें कीं ते तेवढ्या वेळेपुरते क्रोधवश होत असत, परंतु ताबडतोब "क्रोधयुक्त अंतःकरण। तेणें नासे स्वधर्माचरण" ह्या उक्तीची आठवण करून घेऊन गेलेला तोल सांवरीत. एकदां नारायणराव सकाळच्या वेळीं मनन करीत बसले होते. मनन संपल्यावर त्यावेळीं मनांत आलेले विचार त्यांनीं टिपून ठेविले. त्यांचा सारांश असा आहे:—

"ज्यावेळीं दुसऱ्याचे दोष मला दिसून येतात त्यावेळीं मी स्वतः क्रोधवश न होतां त्याला दोषांपासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. पण, काय करावें! कोणीही खरोखर कांहीं गैरगोष्ट केली, अगर चूक केली असें माझ्या मनानें घेतलें कीं ताबडतोब मी स्वतःस विसरतों व क्रोधवश होतों! माझ्या स्वतःच्या हातून सुद्धां चुका होतातच याचा मला अशा वेळीं विसर पडतो. मी जर स्वतः दोषरहित नाहीं व हें मी स्वतः जाणून आहें, तर मग इतरांचे दोष पाहून मी एवढें कां खवळून जावें? म्हणून मी पुन्हा एकदां निश्चय करतों कीं, इतरांशीं सौम्यपणें वागावयाचें. कोणास कांहीं उपदेश करावयाचा असला, तर तोही लीनतेनें करावयाचा; कोणाचाही तिरस्कार न करितां त्यांस हिताच्या गोष्टी सांगावयाच्या व त्याच्या दोषांबद्दल प्रेमानें, सौम्यपणें त्याची कानउघाडणी करावयाची. प्रेमानें इतरांस जिंकण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. अशा रीतीनें जीवित कंठणें हेंच माझें

---

पतितपावना; (३९) दुर्बुद्धि ते मना कदा नुपजो नारायणा; (४०) कांहीं चुकलें वांकलें.

कर्तव्य होय व परमेश्वरासही हाच मार्ग संमत आहे." ह्यावेळीं त्यांच्या मनांत जी जागृति झाली होती तिच्यायोगें त्यांना आपल्या स्वतःच्या दोषांची स्पष्ट कल्पना झाल्यामुळें त्यांनीं असेंही म्हटलें :—

" To win man by the winsome beauty of truth is necessary for *me whose great short-coming is want of gentleness.*" नारायणरावांच्या साधनांतील विशेष हा असे कीं, त्या त्या वेळचे भाव ते पडदा न ठेवतां स्पष्टपणें लिहून ठेवीत. 'माझे तों स्वभाव मज अनावर' असा त्यांस ज्या ज्या वेळीं अनुभव येत असे त्या त्या वेळीं ते "तुजही देतां भार कांहीं नव्हे" अशा अर्थाचे उद्गार काढून परमेश्वरास अनन्यभावें शरण जात व अशाच प्रसंगीं ते अशी खूणगांठ बांधून ठेवीत :—

" To have a sweet temper we must have faith in Divine Providence. That alone lifts us above anxiety and care, that alone plants our feet on a rock and brings content, satisfaction, peace into the soul. "

साधनक्रमामध्यें असणारांची पुष्कळ वेळां अशी प्रवृत्ति होते कीं, मागचा काळ आध्यात्मिक दृष्ट्या उच्च प्रकारचा होता, व आज आपण त्या स्थितींत नाहीं असें वाटतें. "मागें जैसा होता माझे अंगीं भाव। तैसा एक ठाव नाहीं आतां" असे उद्गार तुकोबांनीं काढले खरे, पण ते त्यांची जागृति अधिक तीक्ष्ण झाल्याचे, किंवा त्यांची आध्यात्मिकता श्रेष्ठतर स्थितीप्रत गेल्याचें सुचवीत होते. परंतु गत-कालांतील आध्यात्मिक गुणांची आठवण करून आज जर नैराश्याच्या गर्तेंत पडावयाचें असेल तर तें अत्यंत घातक होय. सर नारायण ह्यांचे आत्मपरीक्षणपर उद्गारांमध्यें गतकाळच्या स्वतःच्या आध्यात्मिक वैभवासंबंधानें चर्चा आढळून येत नाहीं. आजचे दोष कसून पहावयाचे व आजच्या कर्तव्याविषयीं विंचना कराव-याची, हा त्यांचा क्रम असे. म्हणूनच एकदां त्यांनीं स्वतःला उपदेश केला कीं "बाबारे! मागच्या काळासंबंधानें खेद करीत बसूं नकोस, किंवा भविष्यकाळा-विषयीं भलभलत्या आशा बाळगूं नकोस. आजच्या घडीचा विचार कर; आतांचीं ह्या घडीचीं कर्तव्यें कर. घाबरूं नकोस. देवावर विश्वास ठेव, देवाची प्रार्थना कर व आपल्या कर्तव्यांत मग्न रहा. विरोध झाला असतां गळून जाऊं नकोस. ज्या प्रमाणें पर्वत स्थिर दिसतो, तसा तूं शांतपणें निश्चयात्मक रीतीनें स्थिर रहा. कारण, देव तुला वर्तवीत आहे, देवाच्या हातचें तूं साधन आहेस, देव तुझा उपयोग करून घेत आहे असाच तुझा विश्वास आहे हें विसरूं नकोस. तूं जीं कार्यें करीत आहेस त्यांत तूं इतका समरस होऊन जा कीं तुझें व्यक्तित्व त्या

कार्यांत राहूं दे."[१]

व्यक्तिमात्राच्या आध्यात्मिक विकासाच्या आड अनेक गोष्टी येत असतात. लौकिक दृष्टया जीं पापें समजलीं जातात त्यांपासून दूर राहिल्यानें व्यक्तीचा आध्यात्मिक विकास ( Spiritual Developmeut ) होतो असें नाहीं, ही गोष्ट नारायणरावांस मान्य होती. आध्यात्मिक विकास हा केवळ अमुक अमुक गोष्टी न केल्यानें होणारा नाहीं. कांहीं गोष्टींपासून दूर रहातांना कांहीं विशेष गोष्टी करावयाच्या असतात. उदाहरणार्थ–परनिंदा किंवा परदोषाविष्करण घ्या. ह्याकडे मनुष्याची साहजिक प्रवृत्ति असते. आणि विशेषतः सार्वजनिक चळवळींत मनुष्य पडूं लागला कीं, त्यास नाना प्रकारचीं, नाना वृत्तीचीं, नाना दर्जाचीं, नाना हेतु मनांत योजून आलेलीं माणसें भेटतात व नानाप्रकारच्या, परस्पर विरोधी आचरणांचे नमुने आढळतात. अशा वेळीं परदोषांचें आविष्करण करून अप्रत्यक्षपणें स्वतःचा थोरपणा लोकनिदर्शनास आणण्याचा मोह सहज होतो. हें जाणून नारायणरावांनीं स्वतःला चिमटा घेऊन ठेवला आहे.

" निंदा असे ज्याचे चित्तीं । त्यासी सर्वथा नाहीं गती ॥ इतरांचे दोष हुडकून काढण्यासारखी सोपी दुसरी गोष्ट नाहीं ! त्याला कांहीं बुद्धि, स्वार्थत्याग, विवेक, शील ह्यांची जरूर लागत नाहीं. लोकांविषयीं कुरकूर करीत बसावयाचें झालें ! पण अशा माणसाचें केव्हांही कल्याण होणें शक्य नसतें."[२] मग त्यांनीं आपल्या साधनक्रमांत कोणतें धोरण स्वीकारिलें होतें ? एक तर आपल्या शत्रूवरही प्रेम करा हा आदर्श त्यांनीं आपल्यापुढें ठेविला, आणि ह्या आदर्शाप्रमाणें कसें वागावयाचें तें त्यांनीं आपल्या मनाला शिकविलें. तें असें:—

प्रथमतः दुसऱ्याच्या विरुद्ध जी द्वेषासारखी भावना असेल तिच्याविषयीं सरळ बुद्धीनें आपल्या मनाशीं विचार करावा व ती भावना खरोखर किती तिरस्करणीय

---

१. Donot brood over your past or dream over your future. Live in this hour. Answer its calls. Fear not. Go on with your work, trusting in God, praying, never fainting, but courageously standing up, when opposed, as silent and resistless as a mountain bed-rocked in the faith that God is using you. Let your person disappear behind your work."

२. Nothing is easier than fault-finding. No talent, no self-denial, no brains, no character are required to set up ( in ) the grumbling business. The fault-finding man is without salvation.

आहे तें पहावें. ( Face squarely all your nourished spite against any one and see how contemptible it is) इतकें करून पुरें होत नाहीं. म्हणून त्यांनीं स्वतःला असें वळण लाविलें कीं, जी व्यक्ति आपल्याला आवडत नाहीं तिच्याच विषयीं प्रार्थना करावी. ती अशी असावी कीं प्रार्थनेच्या क्षणीं त्या व्यक्तीला मदत करण्याचा प्रसंग आला तर ती करण्यास आपण सिद्ध होऊं; तथापि एवढें एखाद्यावेळीं केल्यानेंही भागत नाहीं. म्हणून नेहमीं उपयोगी पडावी अशी शिकवण त्यांनीं स्वतःपुढें ठेविली:

Cultivate humility. Be indifferent to, and court not, lean not upon, praise or blame. Be not elated when praised or depressed when maligned or blamed. When slighted or abused, endure quietly.

नारायणरावांच्या एकंदर वर्तनाशीं ही शिकवण ताडून पहाण्याचा प्रयत्न करणारांस ही सर्व शिकवण ते आपल्या स्वतःच्या आचरणांत आणण्यासाठीं मनापासून झटत होते असें दिसून आल्यावांचून राहणार नाहीं. त्यांच्यासंबंधानें नानाप्रकारचे गैरसमज झाले. नानाप्रकारें त्यांच्यावर भलतीच टीका झाली; त्यांनीं ज्या गोष्टी केल्या नव्हत्या त्या त्यांना चिकटविण्यांत आल्या; ज्या अनेक गोष्टी न्यायासनावर असतांना त्यांनीं तत्त्वनिष्ठापूर्वक केल्या त्यांचें श्रेय दुसऱ्यांस मिळालें, तरी अशा वेळीं कोणत्याही प्रकारें तक्रार वगैरे न करितां, अगर आपली बाजू पुढें मांडण्याच्या भानगडींत न पडतां, अशा सर्व वेळीं आपल्या अंतःकरणांत उदित होणाऱ्या मंजुळ ध्वनीच्या अनुरोधानें ते वागले. असे सर्व प्रसंग जणूं काय ध्यानांत आणूनच स्वतःलाच त्यांनीं उपदेश केला कीं,

Be loyal to the inner voice; keep faith with yourself and maintain self-respect in the face of ridicule and embarrassing circumstances. Under opposition, ridicule, rebukes and injuries, learn to be silent. By silence you gain self-control and the force of character; you are able to conceal defect and gain power—quiet firmness gets greater ascendancy and control.

अशा ह्या तत्त्वानुसार सतत वर्तन ठेवण्याचा प्रयत्न करूनही आपलें एकंदर वर्तन सर्व वेळीं अगदीं जसें असावयास पाहिजे तसें आहे असें त्यांस कधीं वाटत असे काय ? तसें त्यांस वाटत नसे आणि हीच त्यांच्या आध्यात्मिकतेची उत्तम साक्ष होय. कोणा साधकाला ज्या क्षणीं आतां आपण दोषविहीन आहों असें वाटूं लागतें त्याच क्षणीं, पूर्वी तो उन्नतीच्या शिखरास पोंचलेला असला तरी, तो अहंतेच्या गर्तेमध्यें पडतो. पण ही खऱ्या भक्ताची स्थिति नव्हे. नारायणरावांची ही स्थिति केव्हांही नव्हती.

सद्भक्त नेहमीं उन्नतिपथीं लागलेला असतो. भक्ताला परमेश्वराशीं समरस होण्याचा अधिकार प्राप्त झालेला असल्यामुळें नेहमीं पुढेंपुढें जाण्याचा प्रयत्न करणें हेंच त्याचें उन्नतिसाधन. ह्यासाठीं भक्ताला नेहमीं जागृत रहावें लागतें. नाना प्रकारच्या संधि येतात, त्यांच्याद्वारें, शब्दांच्या, कृतींच्या, योजनेच्या, वृत्तीच्या, आनंदाच्या, प्रेमाच्या, सेवेच्या द्वारें त्याला उन्नति साधण्याचे प्रसंग येतात त्या सर्वांकडे लक्ष ठेवून भक्ताला वागावयाचें असतें. नारायणरावांचा प्रयत्न ह्याच दिशेनें असे. त्यांची मननशीलता त्यांस आत्मपरीक्षणास प्रवृत्त करी व आत्मपरीक्षणामुळें ते नेहमीं जागरूक असत, असें त्यांच्या खाजगी लिखाणावरून सुस्पष्ट होत आहे. त्यांच्या आत्मपरीक्षणाचा येथें एक नमुना देतों:—

" आज सकाळीं उठलों आणि पहिला विचार मनांत आला तो असा कीं, शुभकार्यांमध्यें मग्न रहावयाचें व आपण स्वतः प्रथम निर्दोष रहावयाचें. ह्या अशा निर्धारापेक्षां व्यक्तिमात्रास आणखी उच्चतर ध्येय तें काय असणार?[1]

No aspiration can be nobler, no wish higher and holier than "to be good." And how can I be good unless I know what goodness is? It is godliness—God is Good—how silently, steadily He works, how kind and loving. Bring to your work the spirit of love, deal generously, charitably with your fellows. Be pure in thought and deed and let not the day pass without doing some act of kindness to some suffering soul. And whatever you do, do it in a spirit of humblemindedness. Be not conceited—remember you have faults. You are weak.

इतकेंच करून ते थांबले नाहींत. त्यांनीं लागलीच परमेश्वराची अत्यंत नम्रभावें प्रार्थना केली कीं, "परमेश्वरा, सर्व प्रकारें शुभ, पवित्र आचरण ठेवण्यास, व शुभ कार्यें करण्यास तूंच मला शिकीव. मी माझ्या स्वतःच्या लायकीचा, योग्यतेचा, किंवा सामर्थ्याचा विचार करीत बसलों तर माझ्यासारखा दुसरा कोणी दरिद्री नाहीं व तुझ्या प्रेमास मी सर्वस्वी अपात्र आहें असेंच समजलें पाहिजे. छे, छे, देवा, माझी अशी योग्यता कांहींच नाहीं हें मला शिकीव. तूंच शुभ बुद्धि प्रेरणारा व तूंच शुभ कार्यें करवून घेणारा, तूं माझ्या हातून जीं शुभ कार्यें घडविशील त्यांवरून माझी योग्यता ठरणार. पण, देवा, हीं कार्यें माझ्या हातून नम्रतेनें होतील असें कर." अशाप्रकारें नित्य ते आपल्याला शिस्तीमध्यें ठेवण्यास झटत असत. शिस्तीनें वागावयाचें म्हणजे आपल्या ठिकाणीं तसें सामर्थ्य पाहिजे आणि हें सामर्थ्य पर-

---

१. नारायणरावांचे इंग्रजी शब्दच अधिक परिणामकारक वाटल्यामुळें ते जसेच्या तसेच वर दिले आहेत.

मेश्वराकडूनच प्राप्त होणें[1] शक्य आहे, असा त्यांचा विश्वास होता व त्यास अनुसरून ते वागत असत.

वरील विवेचनावरून नारायणराव सतत आत्मपरीक्षणाच्या द्वारें स्वतःला जागृत ठेवण्याचा, स्वतःच्या दोषांचें शोधन करून, नम्र वृत्तीनें प्रार्थना करून, त्यांचें निरसन करण्याचा प्रयत्न करीत असत हें वाचकांच्या लक्षांत आलेंच आहे.[2]

---

१. Life is discipline and to go through it we must be strong. The strength must come from faith...whence can that strength come but from Thee, Oh Lord !

२. १९१३ सालीं शेट दामोदर सावळाराम यंदे ह्यांनीं नारायणरावांच्या कांहीं नीति व धर्मपर व्याख्यानांचें मराठी रूपांतरात्मक पुस्तक प्रसिद्ध केलें. ह्या पुस्तकाला जें चरित्र जोडलें आहे त्यांत म्हटलें आहे :—

" त्यांच्या ठिकाणीं स्वदोषजागृति अत्यंत प्रखर स्वरूपानें वसत आहे. आत्मपरीक्षण करा, आत्मपरीक्षण करा, असला उपदेश करून ते स्वस्थ बसणारांपैकीं नाहींत. त्यांचें आत्मपरीक्षण नित्य चालू असतें. फिरावयास जातात तेव्हां एखाद्या नुकत्याच वाचलेल्या ग्रंथावर ते मनन करीत असतात आणि इतर शांत वेळीं व स्थळीं त्यांचें स्वतःविषयींचें परीक्षण नित्य चालू असतें. तें इतकें प्रखर असतें कीं, आपल्या हातून कांहीं आगळिक झाली, असा त्यांचा समज झाला, कोणास लागण्यासारखें आपण कांहीं बोललों असें त्यांच्या लक्षांत आलें कीं, सर्व गैरसमज दूर करून घेतल्यावांचून ते स्वस्थ बसत नाहींत. आपली चूक झाली असल्यास ते ती कबूल करावयास एका पायावर तयार असतात." हें चरित्र वाचून नारायणरावांनीं लेखकास जें पत्र लिहिलें होतें त्यांत पुढील वाक्य आहे :—

One thing you have hit with literal truth and that is that I examine myself daily before my God and repent.

सर नारायण ह्यांच्या मृत्यूनंतर येथील टाऊनहालमध्यें जी एक जाहीरसभा दुःखप्रदर्शनासाठीं भरली होती तींत भाषण करतांना सर नारायण ह्यांचे मित्र मि. नटराजन ह्यांनींही त्यांच्या आत्मपरीक्षणपर वृत्तीविषयीं जे उद्गार काढले ते येथें नमूद करणें अगत्याचें आहे:—

Sir Narayan's work in the field of social and national reform is known to all, but what is not so well known is his constant striving in the direction of personal reform...The great thing that impressed any one who came in close contact with Sir Narayan was his constant endeavour to overcome his own

सर नारायण ह्यांच्या आत्मपरीक्षणासंबंधानें एक विशेष गोष्ट येथें लक्षांत ठेवण्यासारखी आहे. आत्मपरीक्षणाच्या द्वारें स्वदोषजागृति उत्पन्न होते, ही स्वानुभवाची गोष्ट आहे. आत्मपरीक्षणावांचून स्वदोषजागृति नाहीं हें जरी खरें आहे, तरी केवळ जागृति झाली म्हणजे स्वदोषनिरसन होत नाहीं. स्वदोषांसंबंधानें अनुताप झाला पाहिजे व त्या अनुतप्त स्थितींत असतांना दोषनिवृत्ति संबंधानें पुन्हा वारंवार स्वतःची कसून परीक्षा व्यक्तीनें केली पाहिजे. आणि हें सर्व नारायणराव करीत होते. ते आत्मपरीक्षण करीत हें त्यांनीं स्वतःच आपल्याला सांगितलें आहे; परंतु हें आत्मपरीक्षणही मामुली होऊन त्यास जडता येण्याचा संभव असतो. मनुष्यस्वभाव साधारणतः असा आहे कीं, जो तो आपले स्वतःचे दोष झांकण्याचाच प्रयत्न करीत असतो व त्याच वेळीं इतरांचे दोषांचा कसून शोध करीत असतो ! सर नारायण ह्यांचा क्रम अगदींच निराळा असे. ते इतरांच्या दोषांचा राईचा डोंगर करण्याच्या भानगडींत पडत नसत. (1) Have I been industrious? (2) Have I been true, just and prudent? (3) How have I employed my time? (4) How far have I succeeded in my resolution to practise virtue of patience? (5) What good have I done असे प्रश्न स्वतःला विचारून ते देवास शरण जात, व आपले गुप्त असलेले दोषही आपल्याला कळावे व ते नाहींसे करण्यास तूं मला शिकीव अशी त्यांची प्रार्थना असे.

---

little human shortcomings ( ह्या भागांत ह्याचीं उदाहरणें त्यांचे स्वतःचे उद्गार देऊन वाचकांस सादर केलींच आहेत. )...He was said to have been a severe Judge; but he was habitually more severe to himself than he ever was to the worst criminal that came before him. Of him it may truly be said that he constantly held

> A silent court of Justice with himself,
> Himself the Judge and Jury and himself
> The prisoner at the bar.

Above all, he was a man of faith. He lived by faith, acting the faith he lived by without fear...When it was a question between doing the right thing, as it appeared to him, and incurring unpopularity, he unhesitatingly chose to do the right ...We...do well to do honour to the memory of a man who, in his life, did so much in so many directions to ameliorate the conditions of life for the depressed and oppressed and to mould our public life on high principles.

येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून नारायणराव आत्मपरीक्षणास किती महत्त्व देत असत व ते आत्मपरीक्षणाच्या द्वारें स्वतःस जागृत ठेवण्याचा प्रयत्न कसा करीत असत तें आपण पाहिलें आहे. "स्वदोषजागृतीच्या अनुरोधानें शरणागतीची आवश्यकता भासूं लागते" हें तत्त्व त्यांस पटल्यामुळें आत्मपरीक्षण व स्वदोष-जागृति एवढ्यावरच त्यांचें साधन थांबत नसे. नारायणरावांचा प्रार्थनेवर[1] विशेष दृढ विश्वास होता. प्रार्थना हेंच मनुष्याच्या ठिकाणीं नम्रपणा उत्पन्न करणारें, परमेश्वराच्या सहवासांत व्यक्तीला ठेवणारें, परमेश्वराच्या सहवासाचें महत्त्व पटविणारें अत्युत्तम साधन आहे असें त्यांस वाटत असे. किंबहुना प्रार्थनेवांचून व्यक्तीचें साधन केव्हांही पूर्ण होणें शक्य नाहीं असा त्यांचा अनुभव होता. ज्यावेळीं आपल्याला कांहीं मार्ग सुचत नसेल किंवा किंकर्तव्यमूढ अशी स्थिति झाली असेल त्यावेळीं अवश्य प्रार्थना करावी, असें त्यांचें मत होतें व त्याप्रमाणें ते स्वतः वागत असत, हें वकील व न्यायमूर्ति ह्या भागांत त्यांनीं जें स्वानुभव कथन केलें आहे त्यावरून आपण जाणलेंच आहे. आणि त्यामुळेंच Always pray especially in doubt and difficulty and God will help you ह्या त्यांच्या वाक्याचें महत्व अत्यंत आहे हें येथें निराळें सांगावयास नको. ह्यावरून आपण अडीअडचणीच्या वेळीं प्रार्थना करावी, म्हणजे सर्व कांहीं प्राप्त होईल असा त्यांच्या म्हणण्याचा आशय होता असें कोणी समजण्याची आवश्यकता नाहीं. कारण वर अवतरलेलें वाक्य पूर्ण करितेवेळीं Provided the prayer is earnest and the mind pure ही सूचना देऊन प्रार्थनेच्या पूर्वीच्या तयारीची त्यांनीं कल्पना करून दिली आहे.

---

१. "Constant and steady prayer and meditation practised daily train us to retire into our own inner selves, seek the company of conscience, which is God's voice and strengthen our will. Our will which alone has the power to carry out what our conscience orders, must go constantly to it, commune with it, and receive its orders, understand them before it can execute them, like the minister of a king who must be in regular attendance upon the king to receive his orders before executing them."

*Light for Life*—Part I

Prayer brings us relief and strength and I long to hear from prayerful friends, for I do believe in the efficacy of prayer and am sure prayers *are* answered where they proceed from a sincerely penitent heart and ask for spiritual strength.

—*From a letter to an American friend* ( *1916* ).

१९१५ सालीं डिसेंबर महिन्यांत १९१६ सालासाठीं आम्हांला आपला संदेश विदित करा अशी विनंति Y. M. C. A. ह्या संस्थेच्या मुंबईच्या शाखेनें सर नारायण ह्यांस केली होती. ह्या ख्रिस्ती संस्थेनें ख्रिस्ती नसणाऱ्या व्यक्तीला वर्षाचा संदेश द्यावयास सांगणें ही गोष्ट संस्थेच्या चालकांच्या ठिकाणीं सर नारायण ह्यांच्यासंबंधानें किती आदर वसत होता त्याची साक्ष देत आहे. त्यावेळीं त्यांनीं जो संदेश दिला त्याचें पहिलेंच वाक्य असें आहे :—

Pray and be pure—that is the eternal message, the song of life. प्रार्थनेच्या योगें आपल्या बुद्धीला चालना मिळते, आपल्या विचारांना उत्तम दिशा लागते व आपलें मन स्वच्छ होऊं लागतें. ह्या आपल्या संदेशांत ते म्हणतातः—

The burden ( of life ) will become a blessing, if we all, young and old, hearken unto the inner voice and follow the example of prophets and saints, who by prayer became pure and learning to love God and man in silent communion, became the founders of Society and leaders of men. Prayer takes us to the centre of our eddying lives and brings peace and the peace of God breeds love, the law of life and love leads to purity. Purity is cleanliness of body, mind and heart. It is disinterestedness in the discharge of duty. And duty carries where the habit of prayer abides. Prayer is the cure of all cares.

अशाप्रकारें ज्यांनीं आपल्या आध्यात्मिक जीवनाच्या वाढीसाठीं सर्व स्थितींत असतांना निश्चयपूर्वक प्रयत्न केले व आपल्या अंतःकरणास पवित्र राखण्यासाठीं जे झटले, ज्यांनीं आपलें सर्व जीवन प्रार्थनामय करण्याचा प्रयत्न केला, त्यांस कोणी जर असें म्हटलें कीं, 'प्रार्थनेवर आपला विश्वास नाहीं, अशा स्थितींत सत्कार्यरति कायम ठेवण्याचा प्रयत्न केला, तर तेवढ्यानें भागणार नाहीं काय,' तर त्यास ते उत्तर देत कीं, नाहीं, तेवढ्यानें भागत नाहीं. आपण जीं कार्यें करीत आहों तीं देवाचीं आहेत, देवच तीं करण्याची स्फूर्ति व सामर्थ्य देत आहे अशा भावनेनें सत्कार्यास प्रवृत्त न झाल्यानें कर्त्याच्या ठिकाणीं अनुदारपणा येतो, अहंता त्याला जडते व तें एक नेहमींचें काम अशीही भावना होते, व अडचणी आल्या, निराशा झाली, मोहाचे प्रसंग आले कीं अशा व्यक्ति पुष्कळ वेळां गलितधैर्य होतात. म्हणून आपण देवाचें कार्य करीत आहों, देवच आपल्याला कार्यास लावीत आहे, तोच सर्व सामर्थ्य देत आहे, अशा विश्वासानें कार्यास लागून परमेश्वरास शरण जा, प्रत्येक बिकट प्रसंगीं त्यास आपलें हृद्गत निवेदन करा कीं तुमच्यामध्यें अवश्य असा लीनपणा उत्पन्न होईल, कार्य करण्यास परमेश्वरच स्फूर्ति

देत आहे असा अनुभव येऊं लागेल, व आपण आपलीं कार्यें करीत असतांनाच हीं देवाचीं कार्यें आहेत असा प्रत्यक्ष अनुभव येत जाईल असें ते सांगत.

आतांपर्यंतच्या विवेचनावरून सर नारायण ह्यांनीं अखेरपर्यंत आपलें व्यक्तिगत साधन कसें सतत चालू ठेविलें होतें त्याची कल्पना होईल. अशा श्रेष्ठ दर्जाच्या साधकाचा प्रार्थनासमाजाशीं सभासद ह्या नात्यानें ४२ वर्षें संबंध होता. ह्या दीर्घ काळांत त्यांनीं जी धर्मसेवा केली, जे उपदेश केले, जीं व्याख्यानें दिलीं, व सर्व धर्मकार्यांमध्यें त्यांनीं जी तळमळ दाखविली त्याविषयीं अस्पष्ट कल्पना मागील प्रकरणांत करून दिलीच आहे. आतां आपल्या स्वतःच्या साधनाच्या व ध्येय-साधनाच्याद्वारें त्यांनीं सामुदायिक साधनास कसें साह्य केलें त्याचा थोडा विचार करूं.

कोणीही मनुष्य जेव्हां प्रार्थनासमाजासारख्या संस्थेचा सभासद होतो तेव्हां आपल्या आचरणाच्याद्वारें संस्थेचा उद्देश पार पाडण्याची जबाबदारी त्याचेवर साहजिकच येते. ज्यावेळीं प्रार्थनासमाजाची स्थापना झाली, त्यावेळीं 'प्रतिमापूजन हा असन्मार्ग' आहे असें प्रार्थनासमाजाचें मत होतें. कांहीं वर्षांनीं मतांची उजळणी झाली त्यावेळीं 'प्रतिमापूजन हा ईश्वरोपासनेचा खरा[1] प्रकार नव्हे' असें मत समाजानें स्वीकारिलें व नारायणराव ही मतांची उजळणी झाल्यानंतर समाजांत दाखल झाले. पूर्वी "संसारांतील सर्व धर्मसंबंधीं कृत्यें ह्या मतास (प्रतिमापूजन असन्मार्ग आहे ह्या) अनुसरून व्हावीं," असा समाजाचा उद्देश जाहीर करण्यांत आला होता. तत्त्वांची उजळणी झाल्यानंतर, म्हणजे प्रतिमापूजन हा ईश्वरोपासनेचा खरा प्रकार नव्हे, असें जाहीर झाल्यानंतर, (सहा तत्त्वांतर्गत) "ह्या धर्मांची प्रवृत्ति होऊन प्रपंचांतील सर्व कृत्यें त्यांस अनुसरून घडावीं" हा समाजाचा उद्देश जाहीर झाला. दोन्ही मतें व दोन्ही उद्देश पाहिले, तर संसारांतील सर्व प्रसंगीं समाजाच्या तत्त्वांस अनुसरून वागण्याची जबाबदारी सभासद होतांना प्रत्येक इसम आपल्यावर घेतो हें उघड आहे. असें असून पुष्कळ वर्षें ह्या संबंधानें सभा-सदांमध्यें जितकी प्रखर जागृति असावयास पाहिजे होती तितकी नव्हती, ही

---

१. ह्यासंबंधानें डॉ. रामकृष्णपंत भांडारकर ह्यांनीं पुढीलप्रमाणें स्पष्टीकरण केलें आहे :—

"प्रतिमापूजन हें पाप आहे, असें नाहीं. तो ईश्वरोपासनेचा खरा मार्ग नव्हे. त्याचें अवलंबन लौकिकासाठीं करणें हा प्रकार अत्यंत लघुता आणणारा आहे, पाप आहे असें मला वाटत नाहीं. मात्र मूर्तिपूजेवर श्रद्धा नसून श्रद्धा आहे असें भासविलें तर तें पाप होईल."

गोष्ट सत्य आहे.[१] ह्यासंबंधानें स्वतः नारायणरावांचे उद्गार अगदीं स्पष्ट आहेत. ते म्हणतात : "आमच्यापुढें जें ध्येय आहे, जीं तत्त्वें आहेत, त्यांस अनुसरून असें आमचें आचरण नसतें, ही अत्यंत लाजिरवाणी गोष्ट आहे, हेंही मी कबूल करितों. आमचें जें उच्चतम ध्येय त्यास न शोभण्यासारखें आमचें आचरण असतें." तथापि तत्त्वानुसार वर्तन ठेवण्याची जागृति नारायणरावांच्याच काळांत झाली असून त्यांचें स्वतःचें आचरण त्यास कमीअधिक प्रमाणांत कारण झालें आहे ह्यांत कांहीं संशय नाहीं. आज कोणासही सभासद होतांना प्रतिमापूजन ज्यांत आहे असे विधि करणार नाहीं अशी जी प्रतिज्ञा करावी लागते ती १९२० सालीं समाजानें मान्य केली आहे. तथापि समाजास मान्य अशा तत्त्वांनुसार आपल्या कुटुंबांतील सर्व विधि नारायणरावांच्या हातून प्रथमपासून होत आले आहेत असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. त्यांनीं आपल्या दोन्ही चिरंजिवांचे विवाह समाजपद्धतीनेंच घडवून आणिले व त्यांच्याच उदाहरणाचा आदर्श पुढें ठेवून त्यांचे जामात प. वा. श्री. दत्तात्रय नारायण सिरूर हे चालले व त्यांचे चिरंजीव श्री. विठ्ठलराव हे आज चालत आहेत. स्वतः नारायणरावांनीं आपल्या एका मित्रास १८९५ सालीं लिहून कळविलें होतें कीं, 'निरनिराळ्या विचारांच्या मित्रांशीं वादविवाद करून, पूर्ण विचारांतीं मीं माझीं मतें निश्चित केलीं आहेत, व त्यांवर माझी पूर्ण श्रद्धा आहे. माझी परमेश्वरापाशीं अशी प्रार्थना आहे कीं, ह्या तत्त्वांनुसार नेहमीं माझें आचरण व्हावें; मग हीं तत्त्वें आचरणांत आणण्याच्या कामीं मला मरण आलें तरी हरकत नाहीं.'[२] ह्यावरून त्यांच्या धैर्याची कोणासही कल्पना होण्यासारखी आहे. प्रार्थनासमाज ही संस्था प्रथमपासून जुन्या समाजाशीं फटकून वागलेली नाहीं. सभासदांना समाजाचे सभासद झाल्यामुळें आपापल्या जातींना मुकावें लागलें नाहीं. त्यामुळें अनुष्ठानाच्या बाबतींत सभासदांमध्यें दुबळेपणा आला होता तो घालवावयास कांहीं काळ लागणें अपरिहार्य होतें. विवाहाच्या वेळीं कोणत्याही रीतीनें प्रतिमापूजन करावयाचें नाहीं असें म्हणणारी पिढी १९२०

---

१. ह्या विषयाचा विस्तृत ऊहापोह 'प्रार्थनासमाजाचा इतिहास' ह्या ग्रंथांत केला आहे. जिज्ञासूंनीं त्या ग्रंथांतील 'धर्मानुष्ठान व ध्येयपालन, (पृ. २२५–२४३) हें प्रकरण वाचावें.

२. I have never wavered, but honestly formed my principles after careful discussion with friends of all shades of opinions. I have pinned my faith to the creed I maintain and may God enable me to be faithful to it and if need be, to die for it.

—*From a letter to Mr. Raghavendra Rao, 1895.*

सालचा ठराव होण्यापूर्वींच तयार झाली, आणि त्याचें श्रेय सर नारायण ह्यांच्या शिकवणीस कमीअधिक अंशानें दिलें पाहिजे. ते थोर होते, मोठे अधिकारी होते व प्रार्थनासमाजाचे अध्यक्ष होते; परंतु सर्व सभासदांमध्यें मिसळणें, त्यांच्या अडचणीच्या व दुःखाच्या वेळीं त्यांच्याशीं समरस होणें, सहानुभूतिपूर्वक त्यांची विचारपूस करणें ह्या त्यांच्या वर्तनाचा ध्येयसाधनाच्या कार्यी सर्वांवर अत्यंत इष्ट असा परिणाम होत असे. जगाच्या दृष्टीनें क्षुद्र व्यक्तीपासून बोध घ्यावयाची त्यांची तयारी[1] पाहून त्यांच्याविषयीं आदरभाव जागृत होई. त्यांचें रोजचें व्यक्तिगत साधन, त्यांच्या प्रार्थना व उपदेश, त्यांची समाजकार्याविषयींची आस्था व त्यांची सरळवृत्ति सर्व साधकांस सहाय्यभूत होत असे.

---

१. Greatness of Small Men हें त्यांचें व्याख्यान पहा.

प्रकरण नववें

# नारायणराव व तरुणपिढी

Let us learn first of all to lead good and pure lives; lives that make no distinction between seeming and being, but inspire us to virtue, charity, faith and love and lead us on ever to build our own well-being on our own moral strength and on the well-being of those about us.

आपल्या देशांत आज जी अस्वस्थता माजली आहे, कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं, अशी जी स्थिति आज झाली आहे, पुढारी कोण व अनुयायी कोण ह्याचें कधींकधीं जें कोडें पडतें, पुढारी म्हणून ज्यांना समजण्यांत येत आहे, त्यांच्याही विचारांत जी स्थिरता दिसत नाहीं, गाजलेले पुढारी सोयीप्रमाणें बिनदिक्कत पगड्या फिरवितात, विचारांची चंचलता जी दिसून येत आहे, ह्या शांतताप्रिय शहरांत शेंकडों लोकांचे बळी देऊनही विकत घेतलेली शांति किती वेळ टिकेल याची शाश्वती सांगतां येत नाहीं, अशा वेळीं नारायण-रावांची आठवण झाल्यावांचून राहात नाहीं. आज ते ह्या लोकीं असते, तर दंगे झालेच नसते, किंवा त्यांच्या मध्यस्थीनें ते एकदम थांबले असते, असें म्हणणें हें जरी धाडसाचें होईल, तरी एवढें मात्र खरें कीं, ते स्वस्थ बसले नसते, व सलोखा उत्पन्न होण्यासाठीं त्यांनीं श्रमपूर्वक प्रयत्न केले असते. मागें रेल्वेकामगारांचा ज्यावेळीं मोठा संप झाला त्यावेळीं त्यांनीं मध्यस्थी करून संप मिटविला हें प्रसिद्ध आहे. संपाच्या वेळीं संपाचीं कारणें व एकंदर परिस्थिति ह्यांचा ते विचार करीत. जे तरुण संपवाल्यांचे पुढारी म्हणून समजले जात. त्यांच्या परिस्थितीचा, त्यांच्या मनोरचनेचा, त्यांच्या आकांक्षांचा, ध्येयांचा विचार करून नंतर त्यांस आपल्या अनुभवाचा ते फायदा देत असत. प्रथम केवळ संपांच्या वेळींच त्यांचें असें धोरण असे, असें नाहीं. ज्या ज्या चळवळींत तरुण आहेत, व अनिष्ट परिणामांमुळें त्यांच्या सहाय्याची अपेक्षा केली जात असे, त्यांचें त्या त्या चळवळीसंबंधानें हेंच धोरण असे. कारण, तरुणांच्या संबंधानें नारायणरावांच्या

ठिकाणीं विशेष प्रेम असे. "तरुणांनीं पुढें यावें, त्यांनीं देशोद्धाराचीं कामें अंगावर घ्यावीं, तरुणांनीं शीलवान होऊन आपल्या शीलाचा, उद्योगप्रीतीचा, आपल्या कर्तव्यनिष्ठेचा छाप बहुजनसमाजावर मारावा, तरुणांनीं आपली सत्यनिष्ठा सर्व व्यवहारांत व्यक्त करून दाखवावी, त्यांनीं स्वार्थ साधावा, पण तो साधतांनासुद्धां आपली सत्यनिष्ठा डळमळूं देऊं नये, तरुणांनीं एकदां मार्ग सत्य आहे अशी पूर्ण विचार करून खात्री पटल्यावर धडाडीनें पुढें येऊन कृति करावी असें त्यांना वाटे." परंतु आपल्या सभोंवतालची ओघवाह्यता पाहून त्यांना मनस्वी खेद होत असे. ओघाबरोबर वाहून जाणें हें दुबळेपणाचें लक्षण होय. केवळ पुरातन काळापासून चालत आलेल्या समजुतींस धक्का बसेल म्हणून आपण सत्याचा अपलाप करावयाचा हा विचार त्यांना केव्हांच शिवला नाहीं. ह्यासाठीं तरुणांस त्यांनीं एकदां सांगून टाकलें कीं, "लोक काय म्हणतात ह्याला भलतेंच महत्त्व देणें हा अविचार आहे. व्यक्तिमात्राचा श्रेष्ठतम धर्म हा आहे कीं, पूर्णपणें विचार करून जें आपल्याला योग्य, सत्य व न्याय्य वाटेल तें कर्तव्यबुद्धीनें आचारांत आणावयाचें, मग त्याच्यायोगें कोण राजी होतो, अगर कोणाची इतराजी होते हा विचारच मनांत आणावयाचा नाहीं, यालाच म्हणतात नीतिधैर्य." असा ज्यांनीं तरुणांस इषारा दिला, त्यांच्यांत व त्यांच्या वेळच्या, अगर त्यांच्या पूर्वींच्या पुढाऱ्यांत फरक काय व नारायणरावांनीं तरुणासाठीं केलें तरी काय आणि तरुणपिढीपुढें त्यांनीं कोणतीं ध्येयें ठेविलीं याचा अल्पसा विचार येथें करावयाचा आहे.

सर्व पुढाऱ्यांचें लक्ष कमीअधिक प्रमाणानें तरुणांकडे असतेंच; पण तें बव्हंशीं औपचारिक असतें. आजचीं तरुण माणसें हीं पुढलीं कर्तीं माणसें होत, किंवा आजच्या तरुणांतूनच देशाचे हितकर्ते किंवा पुढारी निघावयाचे, म्हणून तरुणांस गोंजारणें निराळें व त्यांच्याशीं समरस होऊन, त्यांचे विचार, त्यांच्या आकांक्षा, त्यांचीं ध्येयें, त्यांचे मार्ग व त्यांचें शील ह्या सर्वांस योग्य वळण लावण्यासाठीं मनःपूर्वक झटणें निराळें. एखाद्या मोठ्या चळवळीच्या प्रसंगीं शहरांतले व बाहेरचे तरुण जमवून त्यांस चेतविणें, त्यांच्याकरवीं विरुद्ध पक्षाची विटंबना करविणें निराळें, व तरुणांच्या अडचणी, तरुणांच्या मनाची स्थिति, त्यांच्या आकांक्षा ह्यांचा पूर्ण विचार करून त्यांना देशाचे सर्वपरी लायक घटक करण्यासाठीं प्रयत्न करणें निराळें. पहिला प्रकार वेळोवेळीं घडलेला आजपर्यंत दिसलाच आहे. वृद्ध नाहीं, तरुण नाहीं, स्वार्थत्यागी देशोद्धाराचीं कार्यें करणारा नाहीं, पुरुष नाहीं, स्त्री नाहीं, आपल्या विचारांस प्रतिकूल विचार लोकांपुढें ठेवणारांची विटंबना करण्याचे धडे मिळाले म्हणून पुढाऱ्यांच्या हातूनही तरुणपिढींतलीं कित्येक माणसें निसटल्याचा अनुभव आजपर्यंत आलेला आहे. अशा प्रकारचें शिक्षण तरुणांस

मिळाल्यानंतर गुरूची विद्या गुरूस फळण्याचा प्रकारही होतो! एका पुढाऱ्यावर सडलेलीं अंडीं फेंकलीं गेलीं व विरुद्धपक्षाकडून त्याची सुटका झाली! नारायणरावांनीं वर म्हटलेल्या दुसऱ्या प्रकारचीं कार्यें करण्यांत आपला बहुत काळ दवडिला त्यांच्यासंबंधानें कोणी कोणी अनुदारतादर्शक असेही उद्गार काढले कीं, राजकीय बाबतींत उघडपणें पुढाकार घ्यावयास मिळत नाहीं, म्हणून नारायणरावांनीं विद्यार्थ्यांस हाताशीं धरिलें! नावडतीचें मीठही अळणी असतें असें जें म्हणतात, त्याप्रमाणें हा प्रकार आहे, ह्यांत कांहीं संशय नाहीं. कारण, स्टूडंटस ब्रदरहूड ह्या संस्थेची स्थापनाही ज्या वेळीं झालेली नव्हती, ह्या संस्थेचे जनकही ज्यावेळीं विद्यार्थिदशेंत होते, त्याच्या पूर्वींपासून नारायणरावांनीं तरुणांच्यापुढें उत्तमोत्तम ध्येयें ठेवण्यास प्रारंभ केला होता.[1] त्यांनीं असें करावयास कां प्रारंभ केला ह्याचा क्षणमात्र विचार केला तर नारायणरावांच्या कामगिरीची आपल्याला अल्प तरी कल्पना होण्यासारखी आहे. डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर ह्यांनीं आपल्या कुटुंबांत रोजची कौटुंबिक प्रार्थना सुरू करावयास बंधु वासुदेवाचा स्पेन्सरकडील विशेष कल कारण झाला, हें ज्याप्रमाणें खरें आहे, त्याचप्रमाणें बहुतकाळापासून नारायणरावांचें तरुण पिढीकडे लक्ष लागावयास कारणेंही झालेलीं होतीं. त्यांना स्वतःला लहानपणींच त्यांच्या मामांनीं प्रार्थनासमाज, त्याचीं तत्त्वें, ध्येयें यांची माहिती करून दिली होती. ज्या पुरुषांची त्यांनीं माहिती सांगितली त्यांचा प्रत्यक्ष परिचय व्हावा अशी जिज्ञासा उत्पन्न झाली होती. त्याची माहिती पूर्वीं येऊन गेली आहे. पुढें मामा मागें पडले व भाचे नारायणराव प्रार्थनासमाजांत १८८१ सालीं दाखल झाले. त्यापूर्वींपासून तरुणांच्या ठिकाणीं होत असलेली चलबिचल त्यांच्या लक्षांत आली होती. चांगल्या नांवाजलेल्या अध्यापकांच्या देखरेखीखालीं मुलांचें शिक्षण होत होतें. सर्व कॉलेजांतील आजकालच्या अध्यापकांपेक्षां त्यावेळचे अध्यापक उच्च दर्जाचे होते; परंतु विद्यार्थ्यांच्या भोंवतालीं असलेलें वातावरण आध्यात्मिकतेची वाढ होण्यास पोषक नव्हतें. धर्माची ओळख घरीं होण्याचीं साधनें कमी होत होतीं. बाहेरचें वातावरण धर्मभावनेस प्रतिकूल होतें. कॉलेजांत, वादविवादाच्या सभांत, मित्रमित्रांच्या संभाषणांत, सामाजिक संमेलनाच्या वेळीं, अध्यापकांच्या विचारांत अश्रद्धा, संशय, अज्ञेयवाद व कधीं कधीं

---

१. नारायणरावांनीं विल्सन कॉलेजच्या लिटररी सोसाइटीच्या विद्यमानें १८८६ सालीं मि. वेलिंकर विल्सन कॉलेजचे विद्यार्थि असतांना Our students and their responsibilities अशा विषयावर व्याख्यान दिलें. मि. वेलिंकर १८८८ सालीं बी. ए., १८९० सालीं एम्. ए. व १८९३ सालीं एलएल. बी. झाले.

नास्तिकवादही ह्यांचा सुकाळ असे. घरीं दुर्लक्ष, बाहेर विरोध, वाचनांत येणारे ग्रंथ साशंक वृत्तीस पोषक अशी स्थिति पाहून तरुण पिढीच्या कल्याणाची तळमळ नारायणरावांच्या ठिकाणीं उदित झाली. अशा प्रकारची तरुणांची स्थिति एकट्या नारायणरावांच्याच तेवढी लक्षांत आली असें म्हणणें योग्य होणार नाहीं; पण, एवढें मात्र खरें कीं, दुसरीं माणसें परिस्थिति ध्यानांत घेऊनही स्वस्थ बसलीं असावींत, आपापसांत हळहळलीं असावींत, पण एकटे नारायणराव स्वस्थ न बसतां उद्योगास लागले. आपल्याला योग्य वाटतात तीं सर्व बाबतींतील ध्येयें तरुणांपुढें ठेवावयाचीं व त्यांच्या विचारांस योग्य वळण लावण्याचा प्रयत्न करावयाचा असें त्यांनीं ठरविलें. त्यांच्या भाषणांत व लेखांत वारंवार तरुण पिढीला उद्देशून जे उद्गार आढळतात, त्याचप्रमाणें केवळ तरुणांसाठीं त्यांनीं जीं अनेक व्याख्यानें दिलीं किंवा अनेक लेख लिहिले ते ह्याच कारणासाठीं. त्यांचीं व्याख्यानें व लेख जे कोणी लक्षपूर्वक वाचतील त्यांस धार्मिक, सामाजिक, नीतिविषयक, शिक्षणसंबंधीं व राजकीय बाबतींतही त्यांनीं तरुणांपुढें स्पष्ट ध्येयें ठेविलीं आहेत असें दिसून येईल. हीं ध्येयें काय होतीं तें पहाण्याचा अल्प प्रयत्न करूं या.

नवशिक्षितांसंबंधानें आपला नित्याचा असा अनुभव आहे कीं, त्यांच्यांत पुरातन संस्कृति, जुने ग्रंथ, जुनी शिकवण इ० संबंधानें प्रथम अश्रद्धा उत्पन्न होते. त्यांस कांहीं अंशीं शिक्षणाचा एकांगीपणा हें कारण असूं शकेल. म्हणजे जुन्या अस्सल वळणांतलीं माणसें घेतलीं म्हणजे त्यांचा दहींदुधाचा सागर अशा गोष्टींवरही विश्वास असावयाचा व नव्या संस्कृतींत मुरलेल्या माणसांमध्यें साधारणतः पुरातन संस्कृतीविषयीं अज्ञान व अनादर असल्यामुळें नव्या पिढींत अंधश्रद्धा येण्याच्या ऐवजीं ती अश्रद्ध बनली आणि जे जे म्हणून सुधारक गणले गेले त्यांच्यावर सरसकट हा छाप बसूं लागला! डॉ. भांडारकर सुधारक व रँगलर परांजपेही सुधारक, किंवा डॉ. भांडारकर सुधारक व गोपाळराव देशमुखही सुधारकच पण ह्यांच्यांत पुष्कळ भेद आहे. ज्यावेळीं गोपाळराव देशमुखांनीं पुराणें हीं शिमगा आहेत, असें जाहीर रीतीनें प्रतिपादिलें, त्यावेळीं आर्य संस्कृतींतील जो सत्यांश त्याचा पक्ष, किंवा पुराणांचा पक्ष, एखाद्या शास्त्रीबोवांनीं घेतला काय? नाहीं. तर प्रार्थनासमाजाचे पुढारी जे डॉ. भांडारकर त्यांनीं पुराणांचा पक्ष घेतला व सांगितलें कीं, "आम्हीं वेदांपासून तों पुराणांपर्यंत सर्व ग्रंथांमध्यें सत्य जें आहे, तें **वडिलोपार्जित** जिनगीप्रमाणें मानून, त्याजविषयीं अभिमान बाळगून त्याचें मोठ्या प्रयत्नानें रक्षण करूं; आणि आपल्या ग्रंथांमध्यें विशेषेंकरून उपनिषद्, भगवद्गीता, आणि भारतामधील दुसरीं कांहीं प्रकरणें, कांहीं कांहीं पुराणें, व तुकारामबावासारख्या साधूंचे प्राकृत ग्रंथ त्यांजमध्यें....धर्मसंबंधीं

व नीतिसंबंधीं असे प्रौढ विचार आहेत कीं, ह्यासंबंधानें अन्यदेशीय धर्मग्रंथांशीं त्यांची तुलना केली असतां हे मागें पडणार नाहींत; इतकेंच नाहीं, तर पुष्कळ अंशीं ह्यांचें वर्चस्व स्पष्ट दिसून येईल. परंतु सोनें आणि माती ह्यांची मिसळ झाली आहे. कोणताही ग्रंथ सर्वांशीं प्रमाण, त्यांत जें आहे तें सर्व खरें, असें आमच्या मतास पटत नाहीं म्हणून त्यांत असत्याचा जो अंश आहे तो असत्यच आम्ही म्हणूं, भलताच दुराग्रह धरून वाईट तें वाईट नव्हे, बरेंच आहे, असें कदापि म्हणणार नाहीं."

अशी ही पूर्वपीठिका असल्यामुळें तेंच वळण नारायणरावांनीं गिरविलें तर त्यांत आश्चर्याचें कांहीं नाहीं. नारायणरावांच्या ठिकाणीं आपल्या आर्य संस्कृतीसंबंधानें व आपल्या पुरातन ग्रंथांसंबंधानें अत्यंत अभिमान होता. उपनिषदें, गीता, ज्ञानेश्वरी, तुकारामाचे अभंग, रामदासांचा दासबोध इ० ग्रंथ त्यांच्या नित्य पठणांत असत. परंतु तरुणांपुढें ह्या ग्रंथांसंबंधानें काय किंवा एकदम जुन्या वळणासंबंधानें काय अंधश्रद्धा बळावेल असे उद्गार त्यांनीं कधीं चुकूनही काढले नाहींत. त्यांची दृष्टी अशी असे कीं, कोणतीही सुधारणा निर्दोष असावी, व टिकाऊ व्हावी अशी जर इच्छा असली, तर ज्या समाजांत ती घडवून आणावयाची त्या समाजाचा पूर्वेतिहास आपण अवश्य ध्यानांत घेतला पाहिजे. शिवाय सुधारणा त्या समाजांतील उच्च ध्येयास प्रतिकूल नसावी. म्हणजे जेथें अवश्य आहे, इष्ट आहे व शक्य आहे, तेथें पूर्व संस्कृति, पूर्व ग्रंथ, जुने विचार ह्याविषयीं संपूर्ण आदर दाखवून वागावें असाच त्यांचा बाणा असे.

आपलें जीवन ही माया आहे, हा सर्व व्यर्थ पसारा आहे, ही समजूत सोडली पाहिजे असें त्यांनीं प्रथम सांगितलें आहे.[१] सर्व प्रसंगीं, सर्व प्रकारच्या परिस्थितींत, चरित्राचें पावित्र्य हें लहानथोरांचें ध्येय असावें असा त्यांचा कटाक्ष असे.[२] आणि हें ध्येय पाळीत असतांना भूतकाळ व आजचा अनुभव लक्षांत घेऊन भविष्यकाळीं थोर स्थिति प्राप्त करून देण्याची तयारी पाहिजे. त्यांनीं मुद्दामच अशी इशारत देऊन ठेविली आहे कीं, रूढी ह्या नेहमीं बदलत असतात व कालमानाप्रमाणें त्या बदलल्याच पाहिजेत. म्हणून कालमानास अनुसरून योग्य रूढी पाडणें हें त्या त्या वेळच्या पुढाऱ्यांचें कर्तव्य आहे. पूर्व ऋषींनीं शास्त्रापेक्षां रूढीचें महत्त्व अधिक सांगितलें आहे तें ह्याचसाठीं. शास्त्रांत बदल करितां येत नाहीं, रूढींत करितां

---

१. They must first get rid of the notion that life was an illusion. (1889)

२. Let us learn *first* of all to lead good and pure lives.

येतो व तो करावा असा शास्त्राचा आधार आहे.[1] ही गोष्ट लक्षांत ठेविली नाहीं तर फार अनर्थ होतो. असत्यांतून काढून आम्हांला सत्याप्रत ने, किंवा अंधकारांतून काढून आम्हांस प्रकाशांत आण[2] अशी प्रार्थना करणाऱ्या ऋषींचे वंशज आज अंधकारांत चांचपडत आहेत, एवढेंच नव्हे, तर आपल्या वर्तनानें असेंच सिद्ध करून देत आहेत कीं, अंधकारांत चांचपडत राहाणें हाच आमचा हक्क आहे! म्हणून त्यांनीं तरुणांच्या मनावर असें ठसविण्याचा प्रयत्न केला कीं, काळाच्या ओघाबरोबर वाहून जाऊं नका. काळाचा ओघ प्रचंड आहे, त्याच्या विरुद्ध जाण्याचें सामर्थ्य आपल्यामध्यें नाहीं, ही वेडेपणाची समजूत असून आपला दुबळेपणा झांकण्याचा प्रयत्न होय. नारायणरावांनीं तरुणांस वारंवार असें बजाविलें आहे कीं स्वतः काळ कोणतीही सुधारणा घडवून आणीत नाहीं. माणसें सर्व कांहीं करूं शकतात. रूढी, जुन्या समजुती, देवभोळेपणा ह्यांचें दडपण समाजावर सर्वत्र असतें. परंतु ज्यांना सुशिक्षणाचा लाभ झाला आहे असेच लोक वाहात्या ओघास प्रतिबंध करूं शकतात. त्यांनीं समाजाच्यापुढें जाऊन मार्गदर्शक झालें पाहिजे.[3]

अशाप्रकारें जुन्यानव्यासंबंधानें कोणती दृष्टि असावी हें दाखवून दिल्यानंतर नारायणरावांनीं तरुणांचें एका महत्त्वाच्या मुद्याकडे लक्ष वेधलें आहे. 'सामाजिक' सुधारणा हें मोठें गोंडस नांव आहे. ह्या सुधारणेसंबंधानें बोलतांना एकंदर जनतेच्या उन्नतीसंबंधानें चर्चा करण्याची पुष्कळांना संवय असते. नारायणरावांनीं कौटुंबिक सुधारणेच्या अभावीं सामाजिक सुधारणा शक्य नाहीं,[4] असें दाखवून दिलें. परंतु सगळ्या समाजाला वेसण घालण्याचा प्रयत्न करून आपण स्वतः मात्र अलिप्त राहणारे अवलिया प्राणी त्यांनीं पाहिले, तेव्हां त्यांनीं तरुणांस इषारा दिला कीं, व्यक्तिगत सुधारणा हा खरें पहातां सामाजिक सुधारणेचा पाया झाला पाहिजे. हें ध्येय पुढें ठेवून कार्य केलें तरच अखिल समाज आपल्याबरोबर येईल. कारण

---

१. Our very *shastras* have given us a free hand in changing with the time by agreeing upon one point more than upon anything else, that is by pronouncing without any hesitation that custom or usage can supersede the injunctions of the shastras.

२. असतो मा सद्गमय; तमसो मां ज्योतिर्गमय.

३. It is only those who are educated that can give society the propelling force. To move with it is to move in old ways; it is only by moving ahead of it and showing it the way onwards that you can get it to move on.

४. सामाजिक सुधारणा हें प्रकरण पहा.

सत्याचा केवळ उपदेश करून भागत नाहीं. सत्य हें व्यक्तिमात्रानें आपल्या आचरणांत आणावयाचें असतें. सामाजिक सुधारणा सत्याच्या, न्यायाच्या पायावर उभारावयाची असते, म्हणजे ज्या सत्याचा इतरांस उपदेश करावयाचा तें प्रत्येकानें स्वतःच्या आचरणांत जेव्हां संधि येईल तेव्हां आणिलें पाहिजे. असें होऊं लागलें म्हणजे जनता अशा सुधारकांच्या पक्षास येऊन मिळाल्याशिवाय रहाणार नाहीं, हें त्यांनीं तरुणांस सांगितलें.[१]

नारायणरावांनीं जीं अनेक व्याख्यानें सामाजिक व नैतिक विषयांवर दिलीं आहेत तीं बहुतेक तरुणांस उद्देशून आहेत. तशीं तीं नसत तेव्हां तरुणांस उद्देशून त्यांत कांहीं विशेष भाग आणल्यावांचून ते राहात नसत. इतके ते तरुणांच्या आकांक्षांशीं समरस झाले होते. १८८६ सालीं त्यांनीं "आमचे विद्यार्थी व त्यांची जबाबदारी" ह्या विषयावर विल्सन कॉलेजच्या लिटररी सोसायटीच्या विद्यमानें भाषण केलें. विद्यार्थ्यांस उद्देशून केलेलें त्यांचें हें पहिलेंच स्वतंत्र भाषण होय.[२] त्या व्याख्यानांत नारायणरावांनीं विशेषतः तीन गुणांवर भिस्त ठेविली आहे. (१) कर्तव्यासंबंधानें जागृति व प्रखर कर्तव्यनिष्ठा, (२) नीतिधैर्य—जें पुढील आयुष्यांत वेळोवेळीं दाखविण्याचे प्रसंग येतात, व (३) आत्मविश्वास. ह्यावेळीं आपल्या तरुण मित्रांस उद्देशून बोलतांना आजचे जे तरुण ते उद्याचे पुढारी, असले मिळमिळीत उद्गार काढून त्यांची तृप्ति झाली नाहीं. तुम्ही आपल्या देशाच्या भवितव्याचे धनी आहांत (Masters of my country's future) असें त्यांनीं तरुणांस बजाविलें. त्याचप्रमाणें लोकांवर अशी छाप बसवा, तशी छाप बसवा असला उंटावरून शेळ्या हांकण्याचा प्रकार त्यांनीं केला नाहीं. "तुमचें आपल्या देशावर जर प्रेम असेल, आणि तें आहे ह्याविषयीं मला बिलकूल शंका नाहीं, तुम्हांला आपल्या देशाच्या कल्याणाची जर कळकळ वाटत असेल, आणि ती वाटत आहे, ह्याविषयींही मला शंका नाहीं, तर प्रथमतः तुम्ही आपली स्वतःची बौद्धिक व नैतिक उन्नति साधा कीं जेणेंकरून आपल्या देशाचा उद्धार करण्याची पात्रता तुमच्यांत येईल." आमच्या तरुणांचें राजकीय चळवळीकडे प्रथम लक्ष जातें. ज्यावेळीं

---

१. Social reform needs individual reform; if we work inspired by that ideal, enlivened by that holy trust in our individual selves, we may be sure to find society coming to our side, which is the side of Truth and Progress.

२. यंग थीईस्टस् यूनिअन नामक संस्थेनें १९३० सालीं हें व्याख्यान स्वतंत्रपणें छापून प्रसिद्ध केलें आहे.

वरील व्याख्यान झालें त्यावेळीं राष्ट्रीय सभेची नुक्तीच स्थापना झाली होती, सर्वत्र राष्ट्रीय सभा व राजकीय चळवळ ह्यांविषयीं चर्चा सुरू होती. मागच्या वर्षी नारायणराव विलायतेंत जाऊन तेथें हिंदुस्थानविषयक चळवळ यशस्वी रीतीनें पार पडून आले होते व तो विषयही सर्वतोमुखीं होताच. तिकडील प्रसिद्ध मुत्सद्यांचीं नांवें हिंदुस्थानापुढें होतीं. अशा त्यावेळीं आपल्या तरुणांची कोण-त्याही प्रकारें दिशाभूल होऊं नये म्हणून पूर्वतयारीवर नारायणरावांनीं जोर दिला आहे. योग्यवेळीं तरुणांनीं राजकारणांत बेलाशक पडावें असेंच त्यांचें मत होतें म्हणून त्यांनीं कळकळीनें तरुणांस सांगितलें :—

" Try to be men before you aspire, as you ought to aspire, to be *statesmen*. Form a lofty ideal of your duty and learn to go through life as men born to carry out that ideal with moral courage on the one hand and self-reliance on the other. "

अशाप्रकारें तरुणांस केवळ जबाबदारीसंबंधानें उपदेश करून त्यांचें समाधान झालें नाहीं, ही नारायणरावांच्या चरित्रांतील एक विशेष गोष्ट आहे. तरुणांनीं विद्या मिळ-विली, ज्ञान प्राप्त करून घेतलें, बौद्धिक उन्नति झाली एवढ्यानें भागलें असें त्यांनीं समजतां नये; ज्यांस ज्ञान प्राप्त झालें, ज्यांच्या बुद्धीचा विकास झाला, व ज्यांच्यामध्यें ज्ञान व बुद्धिविकास ह्यांमुळें इतर जनांपेक्षां श्रेष्ठपणा आला, त्यांच्यांत व साधारण जनसमुहांत निकट भाव उत्पन्न झाला पाहिजे. ज्ञानी जनांनीं आपला थोर अधि-कार लक्षांत ठेवून आपले विचार बहुजनसमजांत पसरतील असे प्रयत्न केले पाहिजेत. आपल्या पुरातन संस्कृतीचें हेंच मोठें वैगुण्य अनुभवानें खरें ठरलें. त्याकाळीं बौद्धिक उन्नतीची, अगर सात्विक विचारांची कांहीं कमतरता नव्हती. परंतु विचारी माणसें व तत्त्वज्ञ हे इतक्या उंच भराऱ्या मारण्यांत गर्क होऊन गेले कीं, त्यांना इतरेजनांची आठवण नाहींशी झाली किंवा त्यांच्याकडे ते क्षुद्र दृष्टीनें पाहूं लागले.[१] ह्याचा परिणाम असा झाला कीं, बुद्धिमान् व ज्ञानी लोक इतरां-पासून म्हणजे व्यापारी, धंदेवाईक इ० लोक ह्यांच्यापासून वेगळे झाले, ह्या दोन वर्गांमध्यें प्रेम, सलोखा, मैत्री ह्यांचा अभाव दिसून येऊं लागला. ह्याचा साहजिक असा परिणाम झाला कीं हे विचारवान् व बुद्धिवान् लोक केवळ कल्पनेच्या वाता-

---

१. In ancient India there was no lack of intellectual growth and philosophical thought, but our philosophers and thinkers soared so high in the regions of speculation that they forgot the world, detached themselves from it, professed contempt for it and dwelt in the region of theory.

वरणांत तरंगूं लागले व त्यांना जगाच्या व्यवहाराचा अनुभव नसल्यामुळें ते व्यवहारशून्य बनले व इकडे व्यापार उदीम करणारे जे लोक होते त्यांच्यांत विचार-जागृति नसल्यामुळें दिवसेंदिवस त्यांची अवनति होत गेली.[१] म्हणून त्यांनीं तरुणांस बजाविलें कीं विचार व व्यवहार एकत्र असले पाहिजेत. ह्यांची फारकत झाली तर अंतीं ती घातक झाल्यावांचून राहात नाहीं.[२]

प्रत्येक सुशिक्षित तरुणापुढें बौद्धिक, नैतिक, आध्यात्मिक व धंद्यासंबंधानें निश्चित ध्येयें असलीं पाहिजेत. हीं ध्येयें प्रत्येकानें आपल्या मगदुराप्रमाणें आचरणांत आणण्याचा कसून प्रयत्न केला पाहिजे. अशा प्रकारें आपल्या व्यक्तिगत ध्येयांची जे हेळसांड करणार नाहींत त्यांसच सार्वजनिक हिताच्या झगड्यांत पडण्याचा अधिकार येतो. म्हणजे स्वतःच्या मुलांबाळांच्या शिक्षणाची पूर्ण हेळसांड करून लोकांसाठीं शिक्षणावर व्याख्यानें द्यावयास जाणें त्यांना पसंत नव्हतें. आपण स्वतः कर्जबाजारी राहून, इतरांस मितव्ययावर व्याख्यानें देणें, स्वतःच्या कुटुंबांत अव्यवस्थितपणाचें साम्राज्य चालू ठेवून, लोकांस व्यवस्थित कौटुंबिक जीवनावर धडे देणें त्यांना पसंत नव्हतें.

---

१. स्वतः नारायणरावांची कर्तव्यनिष्ठा किती प्रखर होती ह्याची जाणीव सर्वांस आहे. आपलें कोर्टाचें काम वेळेवर करून बाहेरचा मोठा व्याप संभाळणें त्यांना साधतें कसें, ह्याचा पुष्कळांस अचंबा वाटत असे. पण ह्याचें उत्तर १८८९ सालींच तरुणांस उद्देशून भाषण करितांना त्यांनीं देऊन टाकलें आहे. त्यांनीं सांगितलें कीं, आपण जो धंदा पत्करला असेल तो एकनिष्ठेनें केला पाहिजे; मग ती कचेरींतील नोकरी असो, अगर वकिलीसारखा धंदा असो. परंतु एवढ्यावरून ती नोकरी अगर तो धंदा करणें एवढेंच आपलें ध्येय, व त्याच्या पलीकडे कांहींच साध्य नाहीं असें मात्र नव्हे. एकदां आपली सर्व बुद्धि, वेळ, कल्पकता, हुषारी त्याच कामीं खर्च करण्याचें वळण लागलें कीं, मनुष्य गंजूं लागतो, त्याची दृष्टि आकुंचित होते व त्याची गति खुंटते. म्हणून आपल्यावर धंद्याचें वर्चस्व होऊं न देतां, आपला ताबा त्याचेवर राहिला पाहिजे. ज्या व्यक्तीला ज्ञानाचा लाभ झालेला आहे, त्यानें आपल्या ज्ञानामध्यें भर घालीत राहिलें पाहिजे व त्या ज्ञानाचा इतरांस लाभ दिला पाहिजे. वेळ मिळत नाहीं ही कुरकुर व्यर्थ आहे. वेळ मिळत नाहीं, ही तक्रार खरी नसून, वेळ फुकट पुष्कळ जातो अशी वस्तुस्थिति आहे. ( It was not want of time but waste of time that led men to grumble. )

२. The men of business fell down and sank deeper and deeper into ignorance, because thought was not on their side.

नारायणरावांच्या वेळीं—म्हणजे ते कॉलेजांत शिकत असतांना व नंतर—मिलच्या मतांचा तरुणांच्या मनावर विशेष परिणाम झाला होता हें त्यांनीं अनुभविलें होतें. त्याच वेळीं वर्डस्वर्थसारखे अध्यापक येऊन त्यांनीं जेव्हां प्रथम मिलच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला व त्याच्या चिंधड्या उडविल्या तेव्हां तरुणांच्या विचारांस स्थिरता आली हें आपण मागें पाहिलें आहे. परंतु नास्तिकवाद ज्याला म्हणतात तो जरी विशेष प्रमाणांत अस्तित्वांत नसला, तरी अज्ञेयवाद अजिबात केव्हांच नष्ट झालेला नाहीं हें नारायणरावांस माहीत होतें. ज्यांनीं खरोखर अज्ञेयवादावरील ग्रंथ मननपूर्वक वाचिले आहेत त्यांचें म्हणणें इतकेंच असतें कीं, ह्या विश्वाच्या मुळाशीं एक शक्ति आहे हें निःसंशय, पण आम्हांला तिचें पूर्ण ज्ञान नाहीं; ती शक्ति काय आहे हें आम्हांस कळत नाहीं.[१] ही अज्ञेयवादाची त्यावेळची स्थिति त्यांनीं तरुणांपुढें ठेविली व तींतून त्यांना बाहेर काढण्याचा यशस्वी प्रयत्न केला.[२]

नारायणराव स्वतः मोठे आशावादी होते हें सर्वांस विदित आहे. व्यक्तिगत आध्यात्मिक जीवनाच्या बाबतींत त्यांच्यावर निराशेची छाया कधीं कधीं पडे, पण ती फार वेळ टिकत नसे हें "आध्यात्मिक जीवन" ह्या भागावरून वाचकांच्या लक्षांत येईल. ते स्वतः आशावादी असून तरुणांमध्यें आशा, हुरूप, उत्साह हे प्रेरण्याचा त्यांचा सतत प्रयत्न असे. त्यांनीं असा अनुभव घेतला होता कीं, साधारपणें तरुणांना असें वाटतें कीं, आपण यःकश्चित माणसें, आपल्या हातून कांहीं विशेष कार्य होणें नाहीं, म्हणून आपण कसल्याच भानगडींत न पडणें बरें ! कारण, कार्यें करून दाखविणारीं माणसें निराळींच असतात व त्यांची धमकही स्पष्ट दिसून येते. पण हें तत्त्व चुकीचें आहे हें नारायणरावांनीं नानाप्रसंगीं नानातऱ्हांनीं तरुणांच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न केला. आध्यात्मिक बाबतींत कार्य करणारांनीं असला रडवा सूर काढूं नये म्हणून त्यांनीं Greatness of Small Men असें जें एक धर्मपर व्याख्यान दिलें त्याचा उल्लेख दुसरीकडे केलेला आहे.[३]

---

१. Atheism was now a dead force if it had ever been a force at all. Agnosticism had taken its place and the feature of this agnosticism was that it admitted that the world was guided by some power of which all that Agnostics could say was that they could know nothing about it.

२. स्टूडंट्स् ब्रदरहूड व सोशल सर्व्हिस लीग ह्या दोन संस्थांच्या द्वारें.

३. Each individual was a force, whether for good or evil, however poor or humble he might be.

परंतु सर्व तरुणांस उद्देशून त्यांनीं असें शिकविलें आहे कीं, प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणीं एक प्रकारचें सामर्थ्य नांदत असतें. त्या सामर्थ्याचा उपयोग बऱ्याकडे अगर वाइटाकडे होणें शक्य आहे. प्रत्येक व्यक्तीच्या विचारांचा व आचारांचा, हेतूंचा, आकांक्षांचा, सहवासाचाही सभोंवतालच्या लोकांवर इष्ट अगर अनिष्ट परिणाम होतच असतो. मात्र व्यक्तिमात्राचे प्रयत्न हा परिणाम इष्ट व्हावा असे असले पाहिजेत, म्हणून प्रत्येक तरुणानें आपल्यापुढें उच्च ध्येयेंच ठेविलीं पाहिजेत व तीं आपल्या आटोक्यांत आणण्याचा सतत प्रयत्न करीत राहिलें पाहिजे. जितकें ध्येय उच्च तितकी प्रयत्नाची शिकस्त झाली पाहिजे. ध्येयसाधनाच्या बाबतींत नेहमींचा अनुभव असा आहे कीं, जसजसे आपण आपल्या ध्येयाच्या सन्निध जातों, म्हणजे ध्येय साधण्यासाठीं जसजसे आपले मनःपूर्वक प्रयत्न होत असतात, तसतसें आपलें ध्येय आपल्यापासून दूर जात असतें, म्हणजे ध्येय साध्य होत नाहीं असें नव्हे, तर आपलें ध्येय उच्चतर होत जातें.[१]

अशा प्रकारें नारायणराव तरुणांस मार्ग दाखवीत असतांना जी नवीन पिढी त्यांच्या दृष्टीपुढें असे त्यांचे गुणदोषही त्यांच्या लक्षांत येत व योग्य वेळीं त्यांचा ते उल्लेख करीत. प्रथम येथें दोषांविषयींच थोडा विचार करूं.

कांहीं बाबतींत तरुण पिढीचें पाऊल पुढें होतें याची जाणीव नारायणरावांच्या ठिकाणीं होती. आत्मविश्वास असावा, तरुणांत तो असणें चांगलेंच, परंतु एक तर जितक्या प्रमाणानें तरुणांनीं कार्यें करून दाखविण्यास पुढें आलें पाहिजे तितक्या प्रमाणानें ते येत नाहींत, आणि जे येतात त्यांच्यांतील कित्येकांत वृद्धांविषयीं अनादर व स्वतःविषयीं मात्र भलतीच अहंता त्यांस दिसून आली. सर्व कांहीं आपल्यालाच कळतें, इतरांस कांहींच कळत नाहीं, असली वृत्ति एकदां तरुणांत शिरली म्हणजे मग त्यांच्या सुधारणेस अवकाशच रहात नाहीं.[२] तरुणांतील स्वतंत्रवृत्ति त्यांस आवडे, ते अशा तरुणांचें मोठ्या प्रेमानें अभिनंदन करीत, आपल्या विचारांच्या उलट त्यांनीं दिशा पत्करिली तरी त्याचें त्यांना कांहीं वाटत

---

१. They must start in life with determination to idealise the real and realise the ideal. They must have before them high ideals, the higher, the better.

२. अशाच प्रकारच्या तरुणास उद्देशून एका पत्रांत ते लिहितात :—

He has the making in him of a useful man, but it won't do for him to think that he knows everything, that he is wise and others senior to him in age and experience do not know.

नसे. कारण, अनुभवानें ते शहाणे होतील असें त्यांना वाटे.[१] त्यांचें लक्ष प्रथम त्यांच्या गुणांकडे जात असे. असले तरुण नेहेमीं दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिणारांपेक्षां पुष्कळ पटीनें बरे, असें ते म्हणत. परंतु तरुणांनीं स्वतःच्या खऱ्या खोट्या थोरपणांत रंगून जाऊं नये असें त्यांस वाटे. दुसरी बाजू ऐकण्याविषयीं त्यांनीं नेहेमीं तत्पर असावें, असें त्यांचें म्हणणें असे.[२] त्यांच्यांत आदराची भावना अधिक असली पाहिजे, असें ते प्रतिपादीत. तसेंच कर्तृत्ववान् तरुण अल्प निराशा, अगर उत्तेजनाचा अभाव किंवा अशीच कांहीं प्रतिकूल परिस्थिति दिसली कीं गलितधैर्य होतात. असला कमकुवतपणा तरुणांत येणें हें बरें नव्हे, असें त्यांचें मत असल्यामुळें, त्यांस धैर्य देऊन ते त्यांस कार्यप्रवण करण्याचा प्रयत्न करीत. एकदां एका संस्थेशीं संलग्न असलेला तरुण गलितउत्साह झाला, व त्यानें नारायणरावांपाशीं आपलें रडगाणें गाइलें. कर्तव्यदक्ष तरुणांनीं ज्याप्रमाणें फलाशा न धरितां कर्तव्य करावें, त्याचप्रमाणें, स्वकर्तव्यदक्ष असतांही इतर तसे नाहींत असा भाव नसावा अशी त्यांची दृष्टी असे; म्हणून इतर माणसें कर्तव्यक्षेत्र सोडून परगांवीं गेलीं, अगर कोणी कार्यें करीत नाहींत अशी रड गाणारास त्यांनीं उपदेश केला कीं,

You should never allow yourself to be troubled by the thought that your superiors are leaving you to carry on the work alone. God is with you and you have all the points of superiority which those who have left you may well envy. We are all brothers and equal in points of God's work and all it requires is *faith* and *love*. And these you have and hence the institution is bound to go forward.

अशा उपदेशाच्या योगें निरुत्साहाच्या जागीं उत्साह, निराशेच्या जागीं आशा व कर्तव्यविन्मुखतेच्या जागीं कर्तव्यनिष्ठा दिसूं लागे.

तेलंगांच्या मृत्यूनंतर नारायणरावांनीं तेलंगांच्या कांहीं आठवणी टाइम्समध्यें प्रसिद्ध केल्या होत्या.[३] विद्यार्थ्यांशीं नारायणरावांचा जसजसा अधिकाधिक परिचय होऊं लागला तसतसें त्यांचें अडतें कोठें तें त्यांच्या अधिक स्पष्टपणें ध्यानांत

---

१. I like a young man who is not a slave, who exercises even though a little foolishly his own judgment.

२. I like a young man who is independent at the same time modest in this sense that he is prepared to hear the other side of the question and does not talk with contempt of the elders, although they may be in the wrong.

३. १८९३

येऊं लागलें. आमचे विद्यार्थि स्वतः फारसे स्वयंस्फूर्तीनें वाचीत नाहींत, वाचलें तर ज्या प्रकारच्या ग्रंथांचें वाचन असावयास पाहिजे त्या ग्रंथांविषयीं आवड त्यांच्यांत उत्पन्न होत नाहीं, तसेंच त्यांच्या वाचनांत पद्धत नसते. त्यांना मनाची एकाग्रता साधत नाहीं. हे अवलोकनानें दिसून आलेले तरुणांतील दोष ध्यानांत घेऊन Telang as a student हें व्याख्यान त्यांनीं दिलें.[1] ह्यांत विद्यार्थि ह्या नात्यानें त्यांनीं रंगविलेलें तेलंगांचें शब्दचित्र जसें असावयास पाहिजे तसें आहेच, पण तेलंगांच्या गुणांकडे, अगर ज्ञानलालसेकडे तरुणांचें लक्ष वेधतांना ते गुण त्यांच्यांत नाहींत व ते यावेत अशी त्यांची प्रबल इच्छा होती असा विचार मनांत आल्यावांचून राहात नाहीं. म्हणून तेलंगांच्या ज्ञानजिज्ञासेचें वर्णन करून ते थांबले नाहींत. एकंदरींत तरुणांच्या आयुष्याचें ध्येय काय असावें याचा त्यांनीं त्याच वेळीं विचार केला. त्यांनीं असें पाहिलें होतें कीं, कॉलेज सुटल्यानंतर जर वाचनाची आवड राहिली तर ती एकांगी होते. म्हणजे संस्कृत वाङ्मयाची गोडी लागली तर मग तिकडेच वाहून जावयाचें; त्या भाषेविषयीं व वाङ्मयाविषयीं इतका अभिमान कीं त्या अभिमानाच्या भरांत दृष्टि मंदावून दुसऱ्या भाषांतील व देशांतील वाङ्मयाकडे पहावयाचेंही नाहीं. असला दुरभिमान व एकांगी वृत्ति पाहूनच तेलंगांचें उदाहरण नारायणरावांनीं तरुणांपुढें ठेविलें. तेलंग हे उत्तम संस्कृतज्ञ[2] होते हें सर्वांस माहीत आहे. त्यांनीं मॅक्समूलरच्या Sacred Books of the East ह्या मालेसाठीं गीतेचें केलेलें भाषांतर प्रसिद्धच असून, अगदीं तरुणपणीं गीतेचेंच पद्यरूपानें केलेलें भाषांतर सर्वांस माहीत आहे. ह्या ग्रंथाचा उपोद्घात आजही सर्वांस मननीय आहे. अनेक ग्रंथ व टीकापर लेख लिहूनही कोणीही एकांगी व्हावें असें तेलंगांस वाटत नसे व पाश्चात्य देशीं जें वाङ्मय व जो विचार जनतेपुढें मांडला जात आहे त्याचेंही आपल्या वाङ्मयाबरोबर अध्ययन व्हावें असें तेलंगांचें स्पष्ट मत होतें. तेलगांसंबंधानें दुसरी गोष्ट नारायणरावांनीं तरुणांपुढें ठेविली ती अशी कीं, तेलंग एवढे सर्वमान्य विद्वान् पण ते अखेरपर्यंत विद्यार्थि Student होते, एवढेंच नव्हे तर त्यांच्या संबंधानें असें म्हणतां येतें कीं He died learning. ( शेवटपर्यंत ज्ञान प्राप्त करीत करीत ते गेले. ) हें मुद्दाम तरुणांस सांगण्याचें कारण काय ? अलीकडले तरुण कॉलेजांत शिकत असतांनाही

१. १९००

२. No man loved Sanskrit Literature more deeply than he ( Telang ), but he felt that the Oriental mind required to be liberalised and corrected by the literature and vigorous thought of the West.

पद्धतशीर अध्ययन करीत नाहींत, परिक्षेचे दिवस जवळ आले म्हणजे मग फार तर रात्रीचा दिवस करून अगर अभ्यसनीय पुस्तकांवरील लहान लहान पुस्तकें अभ्यासून कशा तरी परीक्षा पास व्हावयाच्या, हाच प्रकार पुष्कळांच्या बाबतींत आढळून येतो. असा वास्तविक प्रकार असल्यामुळें कॉलेज सुटल्यावर मग पहावयासच नको! नारायणराव म्हणतात, कॉलेज सुटल्यावर नुसता चालढकल-पणा चाललेला असतो. वाचलेंच तर कांहीं तरी वाचावयाचें, कांहीं तरी करा-वयाचें! कांहींही पद्धतशीर होत नाहीं. वास्तविक पहातां कॉलेज सुटल्यावर उत्तम ग्रंथांचें पद्धतशीर वाचन एक ध्येय पुढें ठेवून झालें पाहिजे, म्हणजे अशा वाचनाचा आचरणावर परिणाम होऊन नेहमीं हातून उत्तम कार्यें करण्यास प्रोत्साहन मिळतें.[१] सुशिक्षित तरुणांनीं पुढें यावें व सार्वजनिक व लोकहिताचीं कार्ये करण्यास सिद्ध व्हावें, असें त्यांस वाटत असे; परंतु अशीं माणसें पुष्कळ वेळां एककल्ली व दुराग्रही बन-तात; व त्यांना आपल्या स्वतःच्या ज्ञानाचा व कर्तृत्वाचा मिथ्या गर्व होतो. म्हणून नारायणरावांनीं तरुणांस सांगितलें कीं, असला आडदांडपणा उपयोगाचा नाहीं. तेलंगांप्रमाणें आपण मन उदार ठेवून साधकबाधक गोष्टींचा विचार करा-वयास शिकलें पाहिजे.[२] एककल्लीपणा व दुराग्रह ह्यांचा अंतर्भाव कधीं कधीं स्वाभिमान, स्वदेशाभिमान ह्यांत होतो. व अशा व्यक्तींना मोठे विचारवान् म्हणून लोक समजतात; परंतु खरें पहातां हा मनाचा एक प्रकारचा दुबळेपणाच असून नैतिक दृष्टया ही आत्मघाताची पूर्वतयारीच होय. तेलंगांनीं ज्या मार्गाचा अवलंब केला त्याचा परिणाम असा झाला कीं, सत्यापासून च्युत न होतां, सारासार विचार व समतोलपणा राखून गंभीरपणें सर्व कार्यें करण्यास ते प्रवृत्त झाले व स्वतःच्या ठिकाणीं स्वदोष-जागृति नेहमीं असल्यामुळें अहंता, आत्मश्लाघा, इतरांविषयीं क्षुद्रबुद्धि हे दोष त्यांच्यांत शिरले नाहींत. म्हणूनच मोठ्या कळकळीनें नारायण-रावांनीं तरुणांस असें सांगितलें कीं :—

---

१. When we leave College, commences a career of *drift*—not of *drill*—whether in thought or in action. We read aimlessly, work, if we work at all, unsystematically. What is wanted is a systematic course of reading—and reading of the best kind, calculated to excite the highest thought and influence the noblest action.

२. By independence I mean disciplined liberty, and it is the young man who whilst holding fast by his convictions is tolerant of the opinions of others whom I consider truly independent.

To be thoughtful, to be fair, to be reverential and above all to be pure—this must be the aim of life.

सारांश असा कीं, राष्ट्रहिताचीं सर्व प्रकारचीं कार्यें करण्यास तरुणांनीं पुढें यावें असें त्यांस फार वाटे, परंतु त्यांनीं वर म्हटल्याप्रमाणें पूर्वतयारी करून पुढें यावें. केवळ चळवळ करण्यासाठीं पुढें येणें हा विचार तरुणांच्या कल्याणाच्या दृष्टीनेंच नारायणरावांस त्याज्य वाटत असे. कोणताही विषय हातीं घेतला तरी त्याचें सांगोपांग अध्ययन व्हावें, अनेक ग्रंथांचें वाचन व्हावें, विरुद्ध पक्षाचा विचार शांतपणें पुढें ठेवून त्याचें मनन व्हावें, अशी त्यांची शिकवण असे व स्वतः नारायणराव असेंच वर्तन ठेवीत. म्हणून त्यांना नेहमीं असें वाटे कीं, सार्वजनिक कार्यें करण्यासाठीं थोडींच माणसें पुढें झालीं, थोडींच माणसें कार्यवाहक झालीं तरी चिंता नाहीं; पण जीं पुढें येतील त्या सर्वांनीं अंतर्बाह्य शुद्धि, निरपेक्षबुद्धीनें वर म्हटल्याप्रमाणें काम करण्याची इच्छा व विनीतभावें सर्व कार्यें करण्याची सिद्धता दाखवावी. हे सर्व विचार मनांत असतांना एकदां नारायणराव म्हणाले,

Give me half a dozen men of sterling virtue, of a sensitive conscience and of courageous convictious and I can tell you the fortunes of the community amidst which they live. ह्यावरून तरुणांवर त्यांची किती भिस्त होती त्याची कल्पना होते.

नारायणरावांचा असा दृढ विश्वास होता कीं, एकंदर परिस्थितीचा विचार करतां त्यांच्या वेळची तरुण पिढी जुन्या पिढीच्या मानानें पुष्कळ वरच्या दर्जाची आहे ! तरुणांना घरीं व शाळा, कॉलेजें ह्यांतून कोणत्याही प्रकारचें धर्मशिक्षण मिळत नाहीं हें त्यांना कळून चुकलें होतें. जुन्या आचारविचारांवरील विश्वास उडाला, व त्यांच्याऐवजीं नवीन धर्मविचारांशीं ओळख नाहीं हें ते प्रत्यहीं पहात होते. पूर्वींचीं भौतिक शास्त्रें धर्मास विरोध करीत होतीं; पण भौतिक शास्त्रें धर्मास आतां पूरक होत आहेत.[१] विधिकलाप यांवरील तरुणांचा विश्वास उडाला आहे हेंही खोटें नाहीं. तरीसुद्धां नारायणरावांचें असें म्हणणें होतें कीं, त्यांच्या वेळची तरुण पिढी ही पूर्वपिढींपेक्षां श्रेष्ठ आहे ह्यांत कांहीं संशय नाहीं. त्यांनीं असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, जुन्या पिढीची व्यसनासक्ति नव्या पिढींत नाहीं. जुन्या पिढीला लांचलुचपतीसंबंधानें कांहीं क्षिति नसे. तरुण पिढींत ह्या बाबतींत पुष्कळ सुधारणा झाली आहे. जुन्या लोकांचा धर्म म्हणजे क्रियाकर्में सांग करणें अगर करविणें. त्याचा त्यांच्या नित्याच्या आचरणाशीं कांहीं संबंध नसे. बाहेरख्यालीपणा, असत्याचरण,

---

१. Science has now advanced so far as to be the handmaid of religion.

लांचलुचपत घेणें, व्यापारांत लबाडी करणें, ह्याचा व धर्माचा कांहीं संबंध नाहीं, असें त्यांचें वर्तन असे. धर्माचारांच्या वेळीं हे बाह्य आचार यथासांग करावयाचे, सढळ हातांनीं दानधर्म करावयाचा, व व्यवहार करितांना वर म्हटल्याप्रमाणें वागावयाचें, ह्यांत कांहीं असंबद्ध आहे असें त्यांस वाटत नसे. ह्या दृष्टीनें आपल्या एकंदर आचरणाकडे ते पहात नसत. पण आजच्या पिढीचें तसें नाहीं. आजची पिढी जुन्या पिढीच्या दृष्टीनें धर्मनिष्ठ नसली, तरी वरील बाबतींत आजच्या तरुणांत सुधारणा आहे ह्यांत कांहीं संशय नाहीं. सत्यनिष्ठा, प्रामाणिकपणा इ० बाबतींत आजचे तरुण पुढें गेले आहेत.[१] आत्मज्ञान,[२] आत्मसंयमन व आत्मश्रद्धा हे गुण आजच्या तरुणांतही यावयास हवे आहेत. पण ही त्यांच्यांत जी उणीव आहे तिचें कारण पूर्वीच्या पिढींत ती अधिक होती. त्या पिढींतील लोकांना ह्या गुणांची कांहीं कल्पनाच नव्हती.[३]

नारायणरावांस समकालीन असे सर्व पुढारी घेतले, किंवा त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या पुढाऱ्यांच्या चरित्रांकडे दृष्टी वळविली, किंवा विद्यमान पुढाऱ्यांचा चरित्रक्रम जरी पाहिला, तरी नारायणरावांप्रमाणें इतर कोणीही तरुणांच्या कल्याणासंबंधानें निरनिराळ्या दिशांनीं इतका विचार केलेला आपल्याला आढळावयाचा नाहीं. तरुण पिढीचें ( पुरुष व स्त्रिया ) आपल्या हातून होईल तितकें कल्याण कसें करितां येईल याची त्यांस रात्रंदिवस तळमळ लागून राहिली होती. ह्यासाठीं ते कोठेंही गेले, तरी त्यांचें प्रथम लक्ष तरुण, त्यांच्या चळवळी, त्यांच्यांतील कर्ती अगर होतकरू माणसें ह्यांच्याकडे जात असे. प्रौढ व वृद्ध माणसांचे दोष कांहींही असले, तरी त्यांची पुनरावृत्ति तरुणांत न होतां, त्यांच्या गुणांचा परिपोष व्हावा व त्यांनीं आपल्या ठिकाणीं गुणांचा अधिकाअधिक संचय करावा व ते गुण स्वतःच्या व इतरांच्या कल्याणाच्या कार्यी लावावे अशी त्यांची इच्छा होती. ह्या इच्छेस अनुसरून ते स्वतः वागले व त्यांनीं तरुण पिढीस आपल्या सामर्थ्यानुसार सत्य मार्ग

---

१. We know now how to look upon corruption, bribery and upon every other vice from the point of view of practical morality.

२. Self-knowledge self-control self-confidence are wanting because, they were wanting even more so in the last generation...Every young man was ashamed to be called a liar. But that was not the case with men of the past generation...Call a young man of our days a liar, he is sure to resent it as the worst insult that could be offered to him.

दाखविला. त्यांनीं असें पाहिलें कीं, मुंबईमध्यें ज्या अनेक संस्था आहेत त्यांत Students' Brotherhood,[1] ही संस्था विद्यार्थ्यांच्या कल्याणाच्या दृष्टीनें हल्लीं जशी असावयास पाहिजे तशी आहे. Masters of my country's future असें ज्यांना त्यांनीं म्हटलें आहे त्या तरुणांना एकत्र करावयाचें, जात, धर्म ह्यांचा

---

१ स्टूडंट्स ब्रदरहूड ही संस्था प्रो. नारायण गुणाजी वेलिंकर ह्यांनीं स्थापन केली हें सर्वश्रुत आहे. १८८६ सालीं नारायणरावांनीं विल्सन कॉलेजच्या विद्यमानें विद्यार्थ्यांची जबाबदारी अशा विषयावर व्याख्यान दिलें हें आतां वाचकांस विदित झालेंच आहे. त्यावेळीं नारायणरावांनीं जे विचार व जीं ध्येयें तरुणांपुढें ठेविलीं त्यांचा ज्या विद्यार्थ्यांवर अत्यंत इष्ट असा परिणाम झाला त्यांत नारायणराव वेलिंकर होते. ह्या व्याख्यानामुळें व कॉलेजांत अभ्यास चालू असतांना विद्यार्थ्यांसंबंधानें त्यांना जो अनुभव आला होता व विद्यार्थ्यांच्या निरनिराळ्या प्रवृत्ती पाहून त्यांच्या गुणदोषांसंबंधानें त्यांच्यामध्यें जी जागृति झाली होती तिच्यामुळें विद्यार्थ्यांसाठीं आपण कांहींतरी केलें पाहिजे अशी तळमळ वेलिंकरांस लागून राहिली व १८८९ सालीं कॉलेजांतील व शाळांतील मुलांच्या नीतिशिक्षणासाठीं त्यांनीं प्रथम एक लहानसा वर्ग काढला. ह्यांत दाखल होणाऱ्या विद्यार्थ्यांना चतुर्विध ( चार ) प्रतिज्ञा घ्याव्या लागत. ( १ ) मी नेहमीं सत्य भाषण करीन ( २ ) शिव्यागाळी करणार नाहीं व तोंडावाटे अमंगल शब्द काढणार नाहीं ( ३ ) ह्या वर्गाविषयीं माझ्या बरोबरीच्या विद्यार्थ्यांस माहिती देईन ( ४ ) ह्या वर्गासाठीं मी थोडासा स्वार्थत्याग नित्य करीन. हा वर्ग विद्यार्थ्यांत पुष्कळ लोकप्रिय झाला, त्याची वाढ झाली व मग कांहीं वर्षांनीं त्यास Students' Brotherhood असें नांव देण्यांत येऊन त्याचे उद्देश व कार्यक्षेत्र हीं विस्तृत करण्यांत आलीं तीं येणेंप्रमाणें ( १ ) अभ्यासाच्या सवयींस उत्तेजन देणें ( २ ) बंधुत्वाचें ध्येय पुढें ठेवून वागणें ( ३ ) आदर्शवत् जीवन हेंच ध्येय गांठणें व ( ४ ) समाजसेवा हें ध्येय साधण्याचें प्रमुख साधन होय असें मानून वागणें. संस्थेची वाढ होऊं लागतांच प्रार्थनासमाजाच्या मंदिरांत ब्रदरहूडच्या व्याख्यानांचा कार्यक्रम होऊं लागला. प्रथम नारायणराव चंदावरकर ब्रदरहूडचे फक्त अध्यक्षच होते. परंतु विद्यार्थ्यांस ज्ञानामृत पाजण्यासाठीं ते आपण होऊन पुढें आले व सतत १० वर्षें त्यांनीं विद्यार्थ्यांस आपल्या ज्ञानाचा, अनुभवाचा व आध्यात्मिकतेचा लाभ दिला. ब्रदरहूड ह्या संस्थेस त्यांच्या ह्या दहावर्षात्मक कार्यामुळें किती लाभ झाला, त्याचें योग्य वर्णन नारायणरावांस १९१३ सालीं दिलेल्या व पुढें उद्धृत केलेल्या मानपत्रांत आलेंच आहे.

विचार न करितां सर्व जातींच्या व सर्व धर्मांच्या तरुण स्त्रीपुरुषांस एकत्र आणावयाचें व व्याख्यानें, कित्येक ग्रंथांचें अध्ययन, सामाजिक संमेलनें, संभाषणें, वादविवाद ह्यांच्याद्वारें त्यांच्या ज्ञानांत भर घालावयाची, त्यांच्यापुढें उच्च ध्येयें ठेवून त्यांच्या साधनाची पूर्वतयारी करावयाची, सर्वांमध्यें बंधुभावाची वाढ करावयाची, उच्चनीच भाव सर्व व्यवहार करीत असतां ठेवावयाचा नाहीं अशा प्रकारचे ह्या संस्थेचे हेतु पाहून ही संस्था आपलें कार्य करण्यास योग्य आहे असें वाटून ब्रदरहूडचे केवळ अध्यक्ष न राहातां त्याचे एक अध्यापक ते झाले. ही गोष्टही अखिल हिंदुस्थानांत असाधारण होती हें विसरतां नये. हायकोर्टाच्या न्यायाधिशानें तरुणांस उद्देशून एखादें व्याख्यान देणें, अगर एखाद्या संस्थेचें अध्यक्षस्थान स्वीकारून त्या संस्थेस मान्यता मिळवून देणें हें निराळें व नारायणरावांप्रमाणें ब्रदरहूड ह्या संस्थेशीं अनेक वर्षे संबद्ध होऊन राहणें व दर आठवड्यास नियमानें व्याख्यानें देऊन तरुणांच्या ज्ञानांत भर घालणें हें निराळें. खरें पहातां १८८६ सालापासून नारायणराव तरुणांच्या कल्याणासाठीं झटूं लागले. त्या सालीं व १८८९ मध्यें त्यांनीं विल्सन कॉलेजच्या लिटररी सोसायटीच्या विद्यमानें व्याख्यानें दिलीं. नारायणराव ब्रदरहूडच्या सीनिअर विद्यार्थ्यांना १९०९–१९१२ हीं तीन वर्षे कवि Wordsworth चें Prelude हें काव्य समजावून सांगत होते. हीं त्यांचीं व्याख्यानें होत असतां विद्यार्थ्यांस फार लाभदायक झालीं. व नंतर तीं साररूपानें प्रसिद्ध केल्यावरही पुष्कळ तरुणांनीं वाचलीं व आपल्याला वर्डस्वर्थच्या काव्याचें रहस्य समजण्यास ह्या व्याख्यानांचा अतिशय उपयोग झाला असें कांहींनीं नारायणरावांस कळविलेंही. एक दोन पत्रांचाच येथें उल्लेख करितों. अकोला येथें श्री. एन्. के. फडके नांवाचे एक गृहस्थ वकील आहेत. १९१४ सालीं हे गृहस्थ राधाबाई सगूणच्या दुकानांत कांहीं पुस्तकें पहात असतां त्यांस वर्डस्वर्थवरील नारायणरावांचीं व्याख्यानें ज्यांत एकत्र केलीं आहेत तें पुस्तक आढळलें, तें त्यांनीं विकत घेतलें, आस्थेनें वाचलें, व्याख्यानांच्या साहाय्यानें Prelude पुन्हा वाचलें व त्यांस फार लाभ झाला. नारायणरावांस स्वतः भेटून त्यांचे आभार मानण्याचा विचार त्यांनीं दोन वर्षे केला, पण तो अमलांत आला नाहीं, म्हणून शेवटीं नारायणरावांस १९१६ सालीं पत्र लिहिलें ! ह्या पत्रांत श्री. फडके म्हणतात :—

My impressions about you are fast changing. From *dislike* I have begun to like you, admire you and revere you. My life's joy your pamphlet has awakened in the deepest manner and I am so thankful to you that I have been thinking these two

years of writing to you. Now I make bold and express my cordial gratitude for opening to me a temple of blessings unknown in life before.

हें पत्र आल्यानंतर नारायणरावांनीं श्री. फडके ह्यांचे मनःपूर्वक आभार मानले व उत्तम काव्यवाचन हें ज्याप्रमाणें शक्तिवर्धक औषध असतें त्याप्रमाणें जीवनास उत्साह प्राप्त करून देणारें कसें आहे तें सांगितलें. परंतु केवळ इंग्रजी काव्य वाचल्यानें अशीं आस्थेवाईक माणसें एकांगी होण्याचा संभव आहे असें वाटल्यामुळें नारायणराव श्री. फडके ह्यांना लिहिलेल्या पत्रांत म्हणतात : "If with Wordsworth and Browning, you combined ज्ञानेश्वरी and एकनाथी भागवत you read all you want to turn life from a burden into a blessing." ह्यावरून नारायणराव तरुणांना इंग्रजी काव्याची गोडी लावतांना आपल्या पुरातन ग्रंथांची त्यांनीं हेळसांड करूं नये ह्याविषयीं किती खबरदारी घेत असत याची कल्पना होईल. वर्डस्वर्थवरील व्याख्यानांचा कित्येक तरुणांवर कसा विलक्षण परिणाम झाला याची साक्ष देणारें आणखी एक उदाहरण येथें देण्यासारखें आहे. फ्रामरोज जे. मिथालजी ह्या नांवाचा एक पारशी विद्यार्थि वर्डस्वर्थवरील व्याख्यानें ऐकावयास १९०९–१९१२ हीं तीन वर्षें येत असे. हीं व्याख्यानें ऐकून सृष्टिसौंदर्य, सृष्टीचें वैभव ह्याविषयींची त्याची आवड इतकी दृढावली कीं, त्यानें शेतकी कॉलेजांत आपलें नांव दाखल केलें व १९१६ मध्यें तो शेतकीचा पदवीधर झाला ! हें वृत्त त्या तरुणानें स्वतः पत्र लिहून जेव्हां नारायणरावांस कळविलें, तेव्हां त्यांना साहजिकच फार समाधान वाटलें. मि. मिथालजी ह्यांना लिहिलेल्या पत्रांत नारायणराव लिहितात :—

I am so glad to know for the first time that it was my exposition of Wordsworth's Prelude from 1909—1912...which strengthened your love of natural scenery and nature and induced you to join the Agricultural College and qualify yourself for what you rightly call " one of the noblest professions". I am gratified to have this token of my study of the Prelude with the members of your time of the Brotherhood...I congratulate myself on the fact I did not expose the Prelude in vain and there has been at least one who found the exposition helpful in forming his aim and ideal of life. "

अशाप्रकारें सतत दहा वर्षें त्यांनीं ब्रदरहूडमध्यें जें अध्यापनाचें कार्य केलें त्याच्यायोगें त्यांच्या व्याख्यानांचा लाभ घेणारांचा बहुत फायदा झाला. त्यांनीं Tennyson चें In Memorium हें काव्यहि फार सहृदयतेनें तरुणांस शिकविलें.

रवींद्रनाथ टागोर ह्यांच्या काव्याचें रहस्यहि त्यांनीं विद्यार्थ्यांस विशद करून सांगितलें. हा त्यांचा क्रम सुरू असतांनाच इंदूरच्या महाराजांचें त्यांस आमंत्रण आलें व नारायणरावांनीं तेथील मुख्य दिवाणाची जागा पत्करिली. त्यावेळीं जाण्यापूर्वी Brotherhood ह्या संस्थेनें त्यांचा बहुमान केला.[1] त्यांस ता. २९ मार्च १९१३ रोजीं ब्रदरहूडतर्फे एक मुद्दाम तयार केलेला आल्बम आदरपूर्वक अर्पण केला. ह्यांत सी. एम्. करसेटजी, एन्. जी. वेलिनकर, पी. ए. वाडिया, मिरझा ए. ए. खान, बी. एन्. मोतीवाला, बी. एस्. तखंड, एस्. आर्. मुल्ला, एम्. विश्वेश्वरराव, के. जे. दुबाष, डी. जी. दळवी, एच्. जे. भाभा, भगवानदास माधवदास, जी. अँडरसन, आर. स्कॉट, जे. जे. विमादलाल इ० थोर विद्वान व सन्मान्य गृहस्थांच्या सह्या आहेत. नारायणरावांनीं जें अध्यापनाचें कार्य केलें त्याचें महत्त्व ह्या लोकांस किती वाटत होतें त्याची अल्प कल्पना येण्यासाठीं ह्या मानपत्रांतील कांहीं भाग पुढें दिला आहे:—

We the members of the Students' Brotherhood, Bombay, crave permission to express our mingled feelings of sorrow and pleasure on the eve of your departure from Bombay, sentiments of sorrow because we shall be deprived of the company of one whose presence was an ever living source of inspiration and happiness, but at the same time sentiments of pleasure at the fact that you are leaving Bombay for occupying a position which will offer you opportunities of usefulness and a service in a new sphere of work. You associated yourself with the Brotherhood when its work was in its beginning and you gave it an impetus and a new life which have enabled it to extend its influence and the scope of its usefulness. As a scholor and above all as a lover of English poetical literature you have endeavoured successfully to inspire in us a genuine love of culture and particularly a taste for poetry.

In your own private life, you have manifested the spirit of brotherhood in a way more effective than preaching could have done. Further, as a scholar and as a true hearted Social Reformer, interested by genuine sympathy in the lives and desti-

---

१. सर नारायण ह्यांस १९१० सालीं सर ही पदवी प्राप्त झाली. त्यावेळीं ब्रदरहूडनें त्यांचा सन्मान केला होता. त्याची त्रोटक हकीकत 'चरित्र संगति' ह्या प्रकरणांत पहावयास सांपडेल.

nies of the future citizens of this city and this country, you have presented to us a living example of the ideals that should guide a Brotherhood of Students. We take this opportunity therefore to convey to you our sense of appreciation and admiration for the valuable work that you have done for our institution and we pray that in the new sphere of work to which you have been now called you may have still wider opportunities of rendering those valuable services to your countrymen in India which you have so ungrudgingly and spontaneously rendered for a long time.

## सोशल सर्व्हिस लीग

मुंबई शहरांत सोशल सर्व्हिस लीग नांवाची संस्था असून ह्या संस्थेनें आपला रौप्यज्युबिली महोत्सव गेल्या वर्षी मोठ्या उत्साहानें साजरा केला व ह्या प्रसंगा-निमित्त पंचवीस वर्षांतील कार्याची माहिती देणारा रिपोर्ट प्रसिद्ध करून लीगनें बजाविलेल्या कामाची माहिती सर्वांस करून दिली. परंतु पंचवीस वर्षांपूर्वी मुंबई शहरांत शिमग्याच्या सणाच्या वेळीं सर्वत्र होणाऱ्या बीभत्स प्रकारांस आळा घालण्यासाठीं मुंबई होलिका कमिटी व प्रेसिडेन्सी सोशल रिफार्म ॲसोशिएशनचे कांहीं सभासद ह्यांची एक सभा १९११ सालीं भरली व ह्या सभेनें होलिका सम्मेलन कमिटी नेमिली. ह्या कमिटीचे हेतु शिमग्याच्या दिवसांत होणाऱ्या बीभत्स प्रकारांविरुद्ध लोकमत तयार करणें, ह्या दिवसांत जे अत्यंत ओंगळ प्रकार होतात त्यांस आळा घालणें, जे बीभत्स प्रकार चालू असतात त्यांकडे लोकांचें लक्ष जाऊं नये म्हणून करमणुकीचे चांगले प्रकार, खेळ वगैरे सुरू करणें वगैरे होते. कमिटीनें मोठ्या उत्साहानें कामास सुरुवात केली. ३५० स्वयंसेवकांनीं रात्रंदिवस शहरांतील सर्व भागांत खपून बीभत्स व ओंगळ प्रकारांच्या विरुद्ध लोकमत तयार केलें व १६ मार्च १९११ रोजीं सर नारायण ह्यांच्या अध्यक्षतेखालीं सर कावसजी जहांगीर हॉलमध्यें एक मोठी जाहीर सभा भरली. ह्या सम्मेलनाच्या कामांत गोपाळ-राव देवधरांनीं पुढाकार घेतला होता. त्यावेळच्या लोकांच्या विचारांच्या स्थितीची कल्पना केवळ त्या सभेसाठीं बडोद्याहून मुद्दाम आलेल्या काशीबाई हेरलेकर ह्यांच्या भाषणावरून फार चांगल्या रीतीनें होते. त्यावेळीं त्या म्हणाल्या होत्या, " होळीच्या दिवसांत कुलीन स्त्रियांना रस्त्यांतून जाणें फार धोक्याचें होतें आणि बीभत्स व घाणेरड्या अशा अपशब्दांच्या लाखोल्या लहानथोरांच्या, पोरां-बाळांच्या, वडील माणसांच्या, किंबहुना सर्वांच्या कानांवर येऊन आदळतात

ही फार लाजिरवाणी गोष्ट आहे. विसाव्या शतकांत आपण निव्वळ रूढी म्हणून अनिष्ट चाली पाळाव्यात आणि मनुष्यत्वाला पूर्णपणें विसरून जावें यापेक्षां अधिक लांछन तें कोणतें? एके काळीं आम्हां स्त्रियांची अशी स्थिति होती कीं, वाईट इच्छेनें त्यांच्याकडे कोणीहि पाहण्यासहि धजत नसत. अद्यापही ही स्थिति तशी नाहींशी झालेली नाहीं. परंतु होळीच्या दिवसांत आयाबहिणींची व इतर स्त्रियांची वाईट शब्दांनीं वाटेल तशी संभावना करण्याची जणूं काय सनदच मिळाली आहे असें वर्तन अशिक्षित वर्गाकडून घडत असतें. बायका घरांत बसून राहिल्या तरी ते अपशब्द त्यांच्या कानांवर येऊन आदळतात!" नारायणरावांनीं अध्यक्ष ह्या नात्यानें ह्या वेळीं फार परिणामकारक भाषण केलें. त्या वेळीं त्यांनीं असें दाखवून दिलें कीं शुद्धाचरणाचा प्रश्न नैतिक, मानसिक, किंबहुना सर्व प्रकारच्या सुधारणांच्या मुळाशीं आहे; इतकेंच नव्हे तर तो राष्ट्रीय वैभवाचा पाया आहे. परमात्मा परमेश्वर ह्याचें रूप ओळखून त्याशीं आपल्या स्वरूपाचें तादात्म्य करण्याचा जें राष्ट्र प्रयत्न करीत नाहीं, तें राष्ट्र आपल्या हातानेंच स्वतःस मारक होत असतें. ज्या ह्या दिवसांत आपण पशुवृत्ति स्वीकारून मनुष्यत्वाला पूर्णपणें फांटा देतों, तो होळीचा सण अशा नाशाचा द्योतक आहे आणि त्यांतील अमंगळ व अभद्र प्रकारांना मूठमाती देण्याची व त्यांच्या ठिकाणीं बोधपर, उदात्त व निर्दोष करमणुकीच्या साधनांची स्थापना करण्याची अत्यंत आवश्यकता आहे....शुद्ध विचार, शुद्ध वाणी व शुद्धाचरण हीं आपल्या जीवनांतून तिळमात्र ढळणार नाहींत असा आपण निश्चय केला पाहिजे. शुद्धाचरणानें राष्ट्रें उदय पावतात व त्याच्या अभावीं तीं अधोगतीस पोंचतात, हा अभेद्य सिद्धांत्त आहे. म्हणून देवाचें सत्य, ऋषिमुनींचें सत्य, आपले पूज्य ग्रंथ ह्यांतील सत्य ह्यांचा प्रचार करण्यासाठीं जगामध्यें जा. शुद्धाचरण हें प्रत्येक गोष्टीचें मूळ, मध्य व शेवट आहे, हें विसरूं नका. सदाचार व सद्गुण ह्यांच्याच योगानें देशाला वैभव प्राप्त होत असतें. अनेक स्थित्यंतरांतून पार पडलेल्या आमच्या राष्ट्रांत अजूनही तेज झळकत आहे व तें आमच्या आयाबहिणी, बायकामुली ह्यांच्या द्वारें प्रकाशित होत आहे. आमचा उद्धार आमच्या स्त्रियांच्याच द्वारें होणार आहे आणि असें असतां अशा ह्या आमच्या अत्यंत सुशील, नम्र भगिनींची ह्या होळीच्या दिवसांत विटंबना करणें आमच्या लोकांना शोभतें काय? नारायणरावांचें अत्यंत कळकळीचें व हृदयस्पर्शी भाषण ऐकून त्यावेळीं अत्यंत इष्ट असा परिणाम झाला. गोपाळराव देवधरांच्या नेतृत्वाखालीं अनेक तरुणांनीं जें उत्साहानें कार्य केलें त्या तरुणांच्या उत्साहाला व कर्तृत्वाला वर्षभर दाबून ठेवून वर्षांतून एकदां आणि एकाच प्रकारचें कार्य करण्यासाठीं

कामास लावण्यापेक्षां ह्या तरुणांचा उत्साह सर्व वेळीं सामाजिक पावित्र्याचा प्रसार करण्याच्या कार्यी लावणें अधिक श्रेयस्कर होय असा विचार स्टूडंट्स ब्रदरहूडचे एक कार्यकर्ते सभासद श्री. बी. एन्. मोतीवाला ह्यांच्या मनांत आला. त्यांनीं तो बंडोपंत भाजेकरांपुढें ठेविला व ता. १९ मार्च रोजीं सकाळीं ब्रदरहूडमध्यें हा विचार सर नारायण ह्यांच्यापुढें ठेवतांच त्यांना अत्यंत आनंद झाला व त्याच दिवशीं संध्याकाळीं पांचहजार लोक ज्या सभेंत जमले होते त्या सभेंत सोशल सर्व्हिस लीग ह्या संस्थेची कल्पना सर नारायण ह्यांनीं लोकांपुढें मांडिली व त्याच दिवशीं लीगची स्थापना झाली. नारायणराव ह्या लीगचे प्रथमपासून अध्यक्ष होते. लीगचे हेतू पुढीलप्रमाणें ठरलेले आहेत.

(१) सामाजिक अनेक बाबींसंबंधानें साधार माहिती मिळवून त्यांचें अध्ययन करणें: निरनिराळ्या सामाजिक प्रश्नांवर वादविवाद व चर्चा करून समाज-सेवेच्या दृष्टीनें लोकांमध्यें जागृति उत्पन्न करणें.

(२) जनतेची शारीरिक, नैतिक, मानसिक व आर्थिक स्थिति सुधारण्याच्या दृष्टीनें पुढीलप्रमाणें योजना करणें.

(क) गरीब जनतेची एकंदर स्थिति सुधारण्याच्या हेतूनें त्यांना कामें वगैरे मिळवून देणें व ह्या दृष्टीनें अनेक दिशांनीं प्रयत्न करणें.

(ख) रात्रीच्या व दिवसाच्या शाळा काढून त्यांना सज्ञान करणें; त्याचप्रमाणें जे लोक उद्योगधंद्यावर जात असतील त्यांच्यासाठीं वाङ्मय, उद्योगधंदे ह्यांविषयीं शिक्षण मिळावें म्हणून व्याख्यानें देणें, मॅजिक लॅन्टर्नच्याद्वारें माहिती देऊन यांच्या ज्ञानांत भर घालणें, वाचनालयें व ग्रंथालयें स्थापणें.

(ग) त्यांच्या औषधोपचाराची व्यवस्था करणें.

(घ) त्या लोकांमध्यें को-ऑपरेटिव्ह क्रेडिट सोसायटी, को-ऑपरेटिव्ह स्टोअर्स, को-ऑपरेटिव्ह हाउसिंग इन्शुअरन्स वगैरे कामें सुरू करून सहकारितेची सर्व चळवळ सुरू करणें.

(ङ) त्यांच्यासाठीं क्लब, जिमखाने, मैदानें व आठवड्याच्या अखेरच्या लहान लहान सफरी सुरू करणें.

(च) घरींदारीं बाहेर सर्वत्र स्वच्छता ठेवण्यास उत्तेजन देणें.

(छ) मद्यपान, जुगार, वेश्यागमन व इतर व्यसनांपासून लोकांस परावृत्त करण्याचे प्रयत्न करणें.

(ज) कैदेंतून सुटलेले व इतर दुष्कृत्यप्रवण लोकांस शिक्षण देणें व त्यांना सदाचारसंपन्न करण्याचे प्रयत्न करणें.

( ज्ञ ) दारिद्य्र व संकटें ह्यांपासून लोकांची मुक्तता.

( ३ ) समाजसेवकाच्या शिक्षणाची व्यवस्था करणें.

( ४ ) समाजसेवा व दानधर्म संघटित रीतीनें करण्यास मदत करणें.

लीगच्या कामाचा पुढाकार हिंदसेवक नारायणराव जोशी ह्यांनीं घेतला. मि. मोतीवाला ह्यांचा उल्हास, नारायणराव जोशी ह्यांची कल्पकता व नारायणराव चंदावरकर ह्यांचें मार्गदर्शकत्व असा त्रिवेणीसंगम झाल्यामुळें लीगच्या कामाचा पसारा फार वाढला. सर रतन टाटा, सर डोराबजी टाटा, सर विठ्ठलदास ठाकरसी, एन्. एम्. वाडिया चॅरिटीज, कित्येक गिरण्यांचे मालक व चालक ह्यांच्याकडून पैसे मिळवून स्त्रीपुरुषांच्या उन्नतीसाठीं अनेक महत्त्वाचीं कार्यें सुरू झालीं. रात्रंदिवस खपणारीं माणसें पुढें आलीं व त्यांनीं उपयुक्त कार्यांचे डोंगर उभे केले व ह्या सर्व कार्यांचे कर्णधार सर नारायण चंदावरकर होते. त्यांचा उल्हास सर्वांस उत्साह उत्पन्न करीत असे. त्यांची कर्तव्यनिष्ठा इतरांस कार्यप्रवण करीत असे. ता. १४ मे १९२३ रोजीं त्यांचा अंत झाल्यानंतर सोशल सर्व्हिस लीगच्या व्यवस्थापक मंडळानें पुढील ठराव पास केला :—

"That this meeting of the Managing Committee of the Social Service League places on record its deep sense of sorrow at the death of Sir Narayan Ganesh Chandavarker, the President of the League since its inception, and offers its sincere and deep condolence to the members of his family in their great bereavement and places on record its deep appreciation of the great and valuable services rendered by him to the cause of social service in general and of the League in particular."

प्रकरण दहावें

# पित्याचीं पुत्रास पत्रें

नारायणरावांनीं आपले ज्येष्ठ चिरंजीव श्री. विठ्ठलराव ह्यांस मुंबई विद्यापीठाची बी. ए. ची परीक्षा होण्यापूर्वी म्हणजे १९०८ सालीं पुढील अभ्यासासाठीं विलायतेस पाठविलें. त्यांनीं तेथें प्रथम आय्. सी. एस्. परीक्षेचा अभ्यास करावा अशी त्यांची व स्वत: विठ्ठलरावांची इच्छा होती. अर्थात् वयाची इयत्ता आड येणार नाहीं अशा बेतानें त्यांस पाठविणें अगत्याचें असल्यामुळें येथें बी. ए. न होतां विठ्ठलराव विलायतेस गेले. नारायणरावांस एकंदर चार अपत्यें, दोन मुली व दोन मुलगे. शेवटचें अपत्य—कन्या—८ वर्षांची असतांनाच १९०८ सालीं निवर्तली. कन्या श्री. सुंदराबाई शिरूर ह्यांनीं आपल्या पित्याच्या हयातींत अनेक सामाजिक कार्यें, आपल्या पित्याच्या पावलावर पाऊल टाकून, करण्यास प्रारंभ केला; एवढेंच नव्हे तर अनेक प्रकारें त्यांनीं लोकसेवा बजाविली. कनिष्ठ चिरंजीव श्री. प्रभाकरपंत बी. ए., एल्एल्. बी असून हल्लीं कस्टम्समध्यें असिस्टंट कलेक्टरच्या हुद्यावर आहेत. विठ्ठलराव आपल्या वडिलांप्रमाणेंच हसून खेळून, घरांत लहान मोठ्यांत मिसळून, थट्टामस्करी करून वागणारे, तर प्रभाकरपंत विशेष न बोलणारे, शांतपणें परिस्थिति पहाणारे, मंडळींत विशेष न मिसळणारे असे आहेत.[1] विलायतेंत असतांना नारायणराव चिरंजीवास जीं पत्रें लिहीत त्यांत परदेशीं असतांना प्रथम आपल्या प्रकृतीची काळजी कां व कशी घ्यावी, तेथील लोकांशीं कसें वागावें, कोणास टाळावें, अभ्यासासंबंधानें कशी दक्षता बाळगावी, मैत्री कोणाशीं करावी, वगैरे अनेक विषय ते आणीत. त्यांचीं सर्व पत्रें अगर सर्व पत्रांचा सारांशही ह्या चरित्रांत प्रसिद्ध करणें शक्य नाहीं. म्हणून निरनिराळ्या विषयांवरील त्यांचे अनेक पत्रांत आलेले विचार एकत्र आणून ते येथें देण्याचें ठरविलें आहे. ह्यावरून नारायणराव चिरंजिवाचें विलाय-

---

१. Prabhakar is a silent mouse and does not fill the house with glee and high spirits as you used to do, so we all miss you.

तेंत शिक्षण चालू असतां येथें कोणकोणत्या विषयाचा विचार करीत असत व मुलाच्या एकंदर शिक्षणासंबंधानें त्यांस किती आस्था होती त्याची वाचकांस सहज कल्पना होईल.

नारायणरावांनीं अनुभविलें होतें कीं, मुलें एकदां परदेशीं गेलीं, म्हणजे प्रकृती-विषयीं कसें व किती जपलें पाहिजे ह्याचें त्यांस भान रहात नाहीं. त्यांच्या हातून होऊं नयेत त्या गोष्टी होऊन जातात, व मग पश्चात्ताप झाला, तरी प्रकृति मूळ पदावर आणणें दुरापास्त होऊन जातें. म्हणून नारायणरावांनीं आपल्या चिरंजिवास बजाविलें कीं, हिंदुस्थानांतून अभ्यासासाठीं इंग्लंडला जाणारांनीं तेथील थंडी-संबंधानें विशेष काळजी घेतली पाहिजे. तिकडली सर्दी फार घातक असते. प्रथम आपल्याला कांहीं वाटत नाहीं, पण हीच सर्दी पुढें घातास कारण होते.[१] तिकडे केव्हां सर्दी होईल याचा नियम नसतो, म्हणून गरम कपड्यांच्या बाबतींत निष्काळजी असूं नये. भरपूर गरम कपडे असूं द्यावेत. तसेंच जें पचन होणार नाहीं अशी शंका येईल तें खाण्याच्या भरीस पडूं नये. जेवणां-तील पदार्थांसंबंधानें दक्षता बाळगणें जरूर आहे. त्याचप्रमाणें सर्व खाण्याच्या बाबतींतही निमयन अवश्य असावें. प्रकृतीच्या स्वास्थ्यासाठीं व्यायाम अवश्य केला पाहिजे. पण कधींकधीं व्यायामाचें वेड लागलें म्हणजे तरुणांचीं मनें व्यायामा-कडेच झुकतात; तर तसें करूं नये. चांगला व्यायाम घ्यावा, पण त्यांतही प्रमाणा-बाहेर जाऊं नये.

## अभ्यास

अभ्यासाच्या बाबतींत हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, त्यांतही पद्धत असली पाहिजे. लहर येईल तेव्हां वाचावयाचें, वेळच्यावेळीं अभ्यास करावयाचा नाहीं, टंगळमंगळ करावयाची हें उपयोगाचें नाहीं. सारखी मेहनत केल्यावांचून कांहींही प्राप्त होत नाहीं, हा सर्वसाधारण नियम अभ्यासाच्या बाबतींतही लागू पडतो. हें झालें पद्धतशीर अभ्यासासंबंधानें. पुष्कळ मुलांना असें वाटतें कीं, आपण चांगले हुषार आहों, स्वदेशीं विशेष अभ्यास न करितां जर आपल्याला परीक्षां-मध्यें सुयश मिळत होतें, तर तें परदेशीं कां मिळूं नये ? पण हें उपयोगाचें नाहीं. अभ्यासांत विशेष मन घालून तो नियमानें करण्याची हीच वेळ आहे. अभ्यास कसून करावा, पण प्रकृति बिघडवून तो करूं नये.[२] अभ्यासांत शिस्त अवश्य

---

१. Beware of colds which in England are treacherous.

२. Hard work is necessary but it should not be at the sacrifice of health.

पाहिजे. शिस्त नाहीं आणि वाईट संवयी ह्यांमुळें जन्माचा नाश करून घेतलेलीं विलायतेहून परत आलेलीं मुलें पुष्कळ मला माहित आहेत.[१]

[२]कामा बंधू आपला वेळ मुळींच फुकट जाऊं देत नसत. परीक्षेमध्यें यश येईपर्यंत त्यांनीं करमणुकीसाठीं वेळ घालविला नाहीं! तसेंच सर्वांनीं करावें असें माझें म्हणणें नाहीं. परंतु विशेष लक्ष लावून मेहनत केल्यावांचून परीक्षेंत यश येत नाहीं हें मात्र विसरून वागूं नये. त्याचप्रमाणें विशेष अभ्यास केल्यानंतर करमणुकीमध्यें थोडा वेळ घालवूं नये असें मी म्हणत नाहीं. कामा बदर्स करमणुकीकडे पूर्ण दुर्लक्ष करीत होते, त्याप्रमाणें करणें इष्ट नसलें तरी मनाला येईल तेव्हां किंवा सवडीनुसार अभ्यास करणें हें उपयोगाचें नाहीं. कदाचित् माझ्या पुढल्या सूचना शाळेंतल्या मुलांस योग्य आहेत असें कोणास वाटण्याचा संभव आहे. तथापि ह्या सर्वसाधारण सूचना अंतीं लाभदायक वाटल्यावांचून रहाणार नाहींत. एखादा ग्रंथ वाचावयास घेतला म्हणजे प्रथम त्यांतील एकंदर विचारांची साधारण कल्पना येण्यासाठीं व त्याचा विशेष काय आहे तो कळण्यासाठीं ग्रंथ एकवार अथपासून इतिपर्यंत वाचावा. दुसऱ्या खेपेस तो काळजीपूर्वक वाचावा. शब्दांच्या अर्थाकडे विशेष लक्ष द्यावें. मरे सारखा चांगला कोश जवळ ठेवावा व केव्हांही अर्थाविषयीं संशय आला, किंवा अर्थ ध्यानांत आला नाहीं तर कोश चाळावा व आपली खात्री करून घ्यावी. ग्रंथकर्त्याचें हृद्गत समजण्यासाठीं तो तिसऱ्यांदा वाचावा व मग त्या सर्व ग्रंथाचा अगर त्यांतील महत्त्वाच्या भागांचा सारांश आपल्या स्वतःच्या शब्दांत लिहून ठेवावा.

आपल्या देशांतल्या पुष्कळ हुषार पण गरीब मुलांना पुढील अभ्यास करण्याच्या संधि साधनांची अनुकूलता नसल्यामुळें मिळत नाहीं. हें ध्यानांत घेऊन सुस्थितींतल्या मुलांनीं त्यांच्या व आपल्या स्थितींतला फरक दृष्टीपुढें ठेवून आपली जबाबदारी व कर्तव्य ह्यांसंबंधानें जागरूक असलें पाहिजे. त्यांचे पालक त्यांस सर्व साधनांची अनुकूलता करून देतात. परमेश्वराच्या कृपेनें त्यांच्या मार्गांतील सर्व अडचणी दूर झालेल्या असतात. ही साधनांची अनुकूलता व विपुलता लक्षांत घेऊन आपण कांहीं तरी विशेष करून दाखवूं असा निर्धार असला पाहिजे.

---

१. I have known several of our youth returned from England who have been failures because of want of method and intolerant habits.

२. कामा बंधू हे जुळे भाऊ होते. ते दोघेही सारखा पोषाख करीत. त्यामुळें बाहेरच्यांस कोठला कोण हें ओळखतां येत नसे! अभ्यासही ते एकत्र करीत. नेहमीं दोघे मिळून बाहेर पडत. ते दोघेही एकाच वर्षी आय. सी. एस. झाले होते.

आपण प्राप्त संधि व साधनें ह्यांचा सदुपयोग केला व दैवावर हवाला दिला नाहीं म्हणजे झालें. दुसरी एक गोष्ट अशी कीं, आय. सी. एस. सारख्या परीक्षेंत पास होण्याची पात्रता आहे किंवा कसें हा विचार केव्हांही मनांत आणूं नये. त्याचप्रमाणें यशापयशाचा विचार मनांत आणून स्वतःस निरुत्साह करूं नये. यश, अपयश, आशा, निराशा ह्यांचा विचार मनांत न आणतां धैर्यानें, नेटानें, उल्हासानें अभ्यासास लागावें, म्हणजे अंतीं यश हें ठेवलेलेंच. अशा रीतीनें आपल्याकडून आपण जेव्हां प्रयत्नांची शिकस्त करीत असतों, तेव्हां परमेश्वरच आपल्याला सर्व सामर्थ्य देत आहे असा अनुभव आल्यावांचून रहात नाहीं. जे विषय आपल्या आवडीचे आहेत त्यांचें मन लावून अध्ययन करणें ह्यांत विशेष कांहीं नाहीं. तें चांगलें तर खरेंच, तथापि जे विषय आपल्या आवडीचे नाहींत, परंतु ज्यांचें अध्ययन करणें अवश्य आहे, ते आत्मसात् करणें, त्यांत पारंगतता मिळविणें हें विशेष आहे. आय. सी. एस. च्या परीक्षेंतील सर्व विषय आवडीचे नसतात. म्हणून जे आपल्या आवडीचे विषय नाहींत त्यांच्याकडे विशेष लक्ष देणें अगत्याचें आहे. आपल्या आयुष्यामध्यें सर्वच कांहीं आपल्या मनासारखें होत नसतें, किंवा जें आपल्याला आवडतें त्याचीच निवड करावयाची असेंच कांहीं नेहमीं नसतें, तर ज्याची आपल्याला निवड करणें भाग पडतें, त्याच्याशीं मिळतें घेणें आपल्याला भाग पडतें. तसेंच अभ्यासाचें आहे. मात्र जो विषय आपल्या आवडीचा असतो त्यांत विशेष पारंगतता मिळविण्याचा प्रयत्न व्हावा.[१] प्रसिद्ध प्रो. जेम्स ह्यांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहेः—

" Prepare yourself in the subject so well, that it shall be always on the lip : then in the class room trust your spontaneity, fling away all future care. "

म्हणून माझेंही असेंच म्हणणें आहे कीं,

Yes, fling away all care; be bold since you are determined to do your best. Be resolute, courageous, self-confident, patient and calm.

अभ्यासासंबंधानें लिहितांना एक सूचना करावीशी वाटते. आय्. सी. एस्. परिक्षेसाठीं आज जो अभ्यास चालू आहे त्यासंबंधानें मी वेळोवेळीं लिहीत आलों आहें. आपण आपलेकडून शिकस्त करावी, आणि हताश होऊं नये. आय्. सी. एस्. होणें हेंच

---

१. In life we have not to choose so much as to reconcile ourselves to what we are forced to choose...Master some one subject for which you have love.

कांहीं ध्येयसर्वस्व नाहीं. जर असें वाटूं लागलें कीं हा अभ्यास आपल्याला झेपणार नाहीं, व खासगी व इतर शिक्षकांसही तसेंच वाटलें, तर त्या परीक्षेचा नाद बेलाशक सोडून द्यावा! मग आपल्या आवडीचा विषय घेऊन त्यांत उत्तम पदवी मिळविण्यासाठीं त्याच दिशेनें सर्व प्रयत्न चालवावे. गणित व शास्त्र ह्या विषयांत पारंगतता मिळवावी. तीक्ष्ण बुद्धि, विषयाची आवड, उच्च दर्जाची ग्राहक शक्ति, उद्यमशीलता, व जीवनाचें पावित्र्य इतकीं साधनें असतांना निराशेचा विचारही मनांत येतां नये. इतकें सांगूनही ज्याच्यायोगें अभ्यासाचीच मुळीं शिसारी येईल असा बेदम अभ्यास केव्हांही करूं नये, हें सांगितलेंच पाहिजे. असल्या वर्तनाचा प्रकृतीवर अनिष्ट परिणाम झाल्यावांचून रहात नाहीं. एवढ्या दूर देशीं राहून अति अभ्यास करून आपणच आपली प्रकृति ढांसळवून घेणें हा अविचार होय. म्हणून माझें पित्याचें हेंच सांगणें आहे कीं, एकाग्रचित्तें पद्धतशीर रीतीनें अभ्यास करावा. चित्त एकाग्र न करितां केलेला अभ्यास व्यर्थ होय. चित्त एकाग्र करतां येणें ही मोठी देणगी आहे. हिच्या जोरावरच ग्लॅडस्टनसारख्याला एवढें थोर पद प्राप्त करून घेतां आलें. अभ्यासाच्या वेळीं दुसरेंच कांहीं काम काढूं नये. एकदां ती संवय लागली कीं मग घात झालाच म्हणून समजावें. वर्तमानपत्रें वाचूं नयेत असें नाहीं. जगांत काय चाललें आहे तें कळण्यासाठीं तीं दृष्टीखालून अवश्य घालवींत. परंतु ऐन तारुण्यांत पुष्कळशीं वर्तमानपत्रें वाचण्यानें तरुणांची रुची बिघडते; अभ्यासावरील लक्ष उडतें व चालू घडामोडींमध्येंच मन गुरफटून जातें, तें सर्वस्वी अनिष्ट आहे. ग्लॅडस्टनसाहेबांनीं एकदां आपल्या चिरंजिवाला लिहिलेल्या पत्रांत म्हटलें आहे:

To read much of such matter (Daily Newspapers) in early youth clogs the palate; it is like eating a quantity of marmalade before dinner.

## लोकांशीं कसें वागावें?

[ आमच्या इकडल्या रीतीभाती व इंग्लंडांतील रीतीभाती ह्यांत अनेक बाबतींत पुष्कळ फरक आहे. तिकडल्या रीतीभाती व रिवाज माहित नसल्यामुळें तेथें गेलेल्या तरुणांचा बराच घोटाळा उडतो व हेतु नसतांही त्यांच्या हातून जें होऊं नये तें होऊन जातें; म्हणून ह्या बाबतींत नारायणरावांनीं आपल्या चिरंजीवास वेळोवेळीं अनेक सूचना केल्या आहेत. त्यांचें साधारण स्वरूप पुढीलप्रमाणें होतें. ]

सर्वांशीं वागतांना नम्रता धारण करावी व अति परिचय किंवा विशेष सलगी अवश्य टाळावी. तेथल्या लोकांचे गुण उचलण्याचा प्रयत्न करावा. तेथें (Gentle-

man) म्हटला म्हणजे तो कांहीं विशेष गुणांनीं युक्त असा समजला जातो. उत्तम रीतीभाती, नम्रपणा, शांतवृत्ति, मनमिळाऊपणा हे ते गुण होत. तेथें रहाणें, तेथील नानाप्रकारच्या लोकांच्या संगतीचा लाभ होणें, हेंच एक शिक्षण आहे. ह्यासाठीं तेथें असतांना अशा प्रकारचें शिक्षण मिळविण्याच्या संधि व्यर्थ घालवूं नयेत. म्हणून इंग्रज विद्यार्थ्यांचा परिचय अधिक करावा, पण केव्हांही त्यांना असें वाटूं देऊं नये कीं आपल्या स्वतःच्या संगतीचा त्यांस सहज लाभ होणें शक्य आहे. त्यांच्या चांगल्या रीती अवश्य उचलाव्या, त्यांच्याशीं आपण आपलें वजन राहील अशा रीतीनें वागावें. तसेंच त्यांच्या संगतीची आपल्याला अतिशय तहान लागलेली आहे असेंही दाखवूं नये. आमची इकडे अशी खातरी आहे कीं, तुझी नेहमींची सभ्य वृत्ति, मूळचाच विनय, व नम्रता ह्या गुणांमुळें तूं जिकडे जाशील तिकडे सर्वांना प्रिय झाल्यावांचून राहणार नाहींस. केव्हांही तेथें मोठमोठ्यानें बोलून गोंगाट करूं नये. नम्रपणाच धारण करावा. इतरांच्या संगतींत असतांना प्रथम स्वतः विशेष न बोलतां, इतर काय बोलतात, कसें बोलतात तें ऐकण्याचें काम करावें व त्यापासून पुष्कळ शिकावें. आपण कोणी तरी मोठे आहोंत, अगर थोरामोठ्याचे कुटुंबांतील आहोंत म्हणून श्रेष्ठ आहोंत असली भावना क्षणमात्र ठेवूं नये. आपल्या मित्रांची व परिचितांची योग्य निवड आधीं करावी आणि ती केल्यावर त्यांच्याशीं मोकळेपणानें वागावें; त्याचप्रमाणें आपल्या संगतीची त्यांच्या ठिकाणीं आवड आहे किंवा नाहीं तें पाहून, जीं माणसें आपल्या कसास उतरलीं असतील त्यांच्याशीं मोकळेपणानें वागावें. परंतु केव्हांही अद्वातद्वा व बेजबाबदार भाषण करूं नये. तसेंच इतरांच्या संबंधाच्या बाजारगप्पा, कोणाचीं व्यंगें, चरित्रांतील दोषार्ह प्रसंग ह्यासंबंधानें चाललेल्या अघळपघळ गप्पा, थापा, कोट्या ऐकूंही नयेत. तें जालिम विष आहे असें मानून टाळावें. त्यांयोगें आपलें मन दूषित होतें, त्यांचा आपल्या मनावर अत्यंत अनिष्ट असा परिणाम होतो.[१]

## इंग्लिश समाज व शहरें

ज्या शहरांत थोर थोर माणसें नांदलीं आहेत, जेथें मोठमोठ्या संशोधकांनीं अनेक शोध लाविले आहेत, जेथें मनास उत्साह देणारे प्रसंग घडून आले आहेत, अनेक स्थळें पाहून चिरस्मरणीय प्रसंगांची जेथें आठवण होते अशा शहरांत

१. Avoid gossip and scandal, never listen to them; they are poisons of life and eat into the very vitals of our lives if we allow ourselves to be influenced by them.

राहण्याची व तेथें राहून अभ्यास करण्याची संधि मिळणें हें सुदैवच होय. केंब्रिज शहर हें अशांपैकींच असून अभ्यासासाठीं येथें राहण्याची संधि तुला प्राप्त झाली आहे. ज्यांची कीर्ति अजरामर झाली आहे, इतिहास, काव्य, वाङ्मय, भौतिक शास्त्रें ह्यांत ज्यांचें नांव अजरामर झालें आहे, असे सर ऐझाक न्यूटन, कवि मिल्टन इ. अनेक थोर पुरुषांचें शिक्षण केंब्रिज येथेंच झालें आहे. तुझ्यासारख्या तरुणानें ह्या शहराच्या स्फूर्तिकारक स्मृती नित्य आपल्या दृष्टीपुढें ठेवून त्यांच्यापासून स्वतः जागृति प्राप्त करून घेतली पाहिजे. दुसरी गोष्ट अशी कीं, ज्या इंग्रज लोकांमध्यें तूं रहात आहेस त्यांच्यापासून आपणाला पुष्कळ गोष्टी शिकावयाच्या आहेत हें नित्य ध्यानांत ठेव. वरवर जें कांहीं दिसतें तोच गाभा, किंवा इंग्लिश समाजाचें सत्य स्वरूप असें समजूं नकोस. लोकांच्या घरीं, कुटुं-बांत आणि विशेषतः मध्यम स्थितींतील ( Middle classes ) कुटुंबांत इंग्लिश समाजाची उज्ज्वल बाजू पहावयास सांपडते. अशा कुटुंबांमध्यें आपण गेलों म्हणजे तेथें किती व्यवस्था दिसते, त्यांच्या वर्तनांत किती विनय, साधेपणा, सहजपणा व सत्यप्रीति असते, हें अनुभवानेंच कळतें. आपण जर स्वतः चांगल्या रीतीनें वागलों तर इंग्लिश स्त्रिया व पुरुष दयाळू, व एकंदरींत चांगले आहेत असें आढळून येतें. आपण त्यांच्याशीं स्वाभिमान राखून, सभ्यपणें वागलों, योग्य तितकीच शालीनता व नम्रता राखून खुल्या दिलानें त्यांच्याशीं बोलूंचालूं लागलों म्हणजे तेही आपल्याशीं योग्यप्रकारें वागूं लागतात. आपलें बसणें-उठणें, बोलणें-चालणें, व्यवहार वगैरे सर्व जसे असावयास पाहिजेत तसे असले म्हणजे त्यांच्या खऱ्या कौटुंबिक जीवनाची आपल्याला ओळख पटते. माझी अशी मोठी इच्छा आहे कीं, इंग्रज लोकांचें एकंदर जीवन, विचार व आचार ह्यांतील जो चांगला भाग आहे, तो तूं मनःपूर्वक पहावास आणि ज्यांच्या सहवासांत राहिल्यानें त्यांच्यांतील उत्तमांश तुझ्या ध्यानांत येईल अशा स्त्रीपुरुषांचा अधिक सहवास तुला घडावा.

## शिक्षण व राजकारण.

अभ्यास चालू असतांना राजकारणाचा विद्यार्थ्यांना वासही लागूं नये अशा मताचे नारायणराव नव्हते. जगांत काय चाललें आहे हें प्रौढ विद्यार्थ्यांस कळणें अवश्य आहे व त्यासाठीं त्यांनीं एखादें वर्तमानपत्र अवश्य वाचावें, असें त्यांनीं म्हटलें आहे हें आपण वर पाहिलें आहे. परंतु एखादें वर्तमानपत्र वाचणें निराळें, अनेक वर्तमानपत्रांत डोकें खुपसून बसणें निराळें व कोणत्या तरी एका पक्षाचीं मतें तींच आपलीं मतें असें ठासून प्रतिपादूं लागणें व अशा तरुणांच्या संस्थांमध्यें सामील

होणें निराळें. विठ्ठलराव विलायतेंत असतांना तेथें 'इंडियन मजलिस' असें बाहेरून दिसावयास सामाजिक नांव घेतलेली एक तरुणांची संस्था होती. ह्या संस्थेचे विठ्ठलराव सभासद झाले होते. परंतु कांहीं सभासदांच्या उच्छृंखळ वृत्तीची व राजकारणांत कांहीं सभासदांची चाललेली लुडबूड नारायणरावांस विठ्ठलरावांकडून कळली. त्यावेळीं हे तरुण राजकारणांत जर भाग घेऊं लागले असले, तर अशा संस्थेचें सभासद न राहणें बरें असें नारायणरावांनीं सुचविलें. "तूं राजकारणापासून आज पूर्णपणें अलिप्त रहावेंस अशी माझी इच्छा आहे. कारण, तुझे विचार परिपक्व झाले म्हणजे मग राजकारणांत भाग घ्यावयास पुढें पुष्कळ अवसर सांपडणार आहे."[१] दुसऱ्या एका पत्रांत त्यांनीं लिहिलें "इंग्लंडांत अभ्यासासाठीं जाऊन जे विद्यार्थी राजकारणांत पुढाकार घेऊं लागले आहेत, त्यांनीं भरविलेल्या सभांना तूं जात नाहींस हेंच ठीक होय. असल्या सभांना हजर राहून कोणाचाही कांहीं फायदा होत नाहीं हें तुझें म्हणणें खरें आहे. कांहीं तरी भकून व बेजबाबदार विधानें करून ही मंडळी देशाचें अत्यंत नुकसान करीत आहेत ह्यांत कांहीं संशय नाहीं. एका माणसानें तरुणांचीं मनें बिथरविलीं, आणि स्वतःच्या भाषणांबद्दल येणाऱ्या संकटांचा वास लागतांच ह्या इसमानें अज्ञातवास पत्करला आहे. आतां तरी ह्या माणसाच्या भेकड वृत्तीची साक्ष तरुणांस पटो म्हणजे झालें." माझें असें निश्चित मत झालें आहे कीं, एकदां आपण जगाच्या व्यवहारांत पडलों म्हणजे मग तिकडल्या किंवा इकडल्या कोठल्याही राजकारणांत भाग घ्यावयास कांहीं हरकत नाहीं.[२] आज एकाग्र चित्तानें अभ्यास करण्याची ही वेळ आहे. ह्यावेळीं कडक भाषणांतील भावनोद्दीपक विचारप्रवाहांत वाहून जाऊं नकोस. जोंपर्यंत तूं विद्यार्थिदशेंत आहेस तोंपर्यंत आस्थापूर्वक विचार करण्याचें व बोलतांना अगर लिहितांना जें कांहीं सांगावयाचें तें स्पष्टपणें पण सत्यास धरून, त्याचप्रमाणें विचारपूर्वक सांगण्याचें आपल्याला वळण लाविलें पाहिजे. आज तूं विद्यार्थि आहेस म्हणून आजच्या स्थितींत राजकारणाच्या बाबतींत बोलण्यापेक्षां ऐकणें हेंच तुझें कर्तव्य आहे.[३] कांहीं विद्यार्थ्यांनीं निर्लज्जपणाचें वर्तन केलेलें आपल्याला माहीत

---

१. There will be time enough for you to interest yourself in Politics when your judgment is matured.

२. Politics are for people when they come into the world of practical life.

३. So long as you are a student, your duty is to train yourself to think carefully, and express yourself, whether in speech or writing, truthfully, clearly and in sober manner. You must be more of a listener than a talker in politics so long as you are a student.

नाहीं काय ? मग तें लक्षांत घेऊन हिंदी विद्यार्थ्यांसंबंधानें कांहीं इंग्लिश लोकांचे जर विपरीत ग्रह झाले तर त्याबद्दल आपल्याला त्यांना दोष देतां येईल काय ? त्या विद्यार्थ्यांप्रमाणें कोणत्याही प्रकारचा अविचार न करितां, इतर विद्यार्थ्यांनीं आपलें सदाचरण, आपलीं उच्च ध्येयें व तीं आचरणांत आणण्याचे प्रयत्न, आपला नम्रपणा व एकंदरींत आपलें विचारपूर्वक वर्तन ह्यांच्याद्वारें ते ग्रह घालविण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. सर फेरोजशहा मेथा सांगत होते कीं, विलायतेंत पुष्कळ विद्यार्थ्यांचें वर्तन जसें असावयास पाहिजे तसें असत नाहीं. ह्यावरून विद्यार्थी तेथें किती बेजबाबदारपणें वागत असले पाहिजेत ह्याची कल्पना होते.

एकदां राणीच्या जाहिरनाम्यांतील वचनें पाळलीं गेलीं नाहींत त्यामुळें असंतोषास कारण मिळालें आहे, असा पक्ष विठ्ठलरावांच्या पत्रांत होता.[१] त्यास उत्तर देतांना नारायणरावांनीं कळविलें कीं, " त्या जाहिरनाम्यांतील वचनें सर्व पाळलीं गेलीं नाहींत हें खरें आहे. परंतु त्यांतील वचनांची पूर्तता हळूहळू होत आहे. लॉर्ड मेयोनीं स्थानिक स्वराज्याचा (Municipal Government) पाया घातला. लॉर्ड रिपन ह्यांनीं त्याला दृश्य स्वरूप दिलें व लॉर्ड लॅन्सडाऊन ह्यांनीं त्याचा आणखी पुरस्कार केला. आणि आतां ( १९०९ ) आपल्याला नव्या सुधारणांचा लाभ झालेला आहे. एकंदरींत पाहिलें तर सर्वत्र हळूहळू प्रगति होत आहे असाच अनुभव येईल. ब्रिटिश सत्तेचा पाया विवेक व शिस्त हा आहे. ती सत्ता लहरी व दुष्ट नाहीं; आणि ह्या सत्तेंतील हीच मोठी धन्यतेची गोष्ट आहे." ( पुढें कांहीं महिन्यांनीं नाशिकचे कलेक्टर जॅक्सन साहेबांचा नाटकगृहांत खून झाला, त्याविषयीं लिहितांना नारायणराव म्हणतात " नाशिकचे कलेक्टर मि. जॅक्सन ह्यांचा एका तरुणानें खून केला हें वर्तमान ऐकून सर्वांना मोठा धक्का बसल्यासारखें झालें आहे. सर्व देश ह्या दुष्ट कृत्यामुळें शोकसागरांत बुडाला आहे. सिव्हिल सर्व्हिसपैकीं अतिशय दयाळू, प्रजेवर प्रेम करणारे, लोकांच्या कल्याणासाठीं रात्रंदिवस झटणारे व

---

१. As to the allegation that the pledges of the Proclamation remain unfulfilled my answer is:—

That is true but there has been a gradual advance towards their fulfilment. Lord Mayo was the father of Municipal Government ; Lord Ripon gave it a push. Lord Lansdowne advanced it further and now we have the reforms. After all is said there is growth and advance, steady and sure under British rule. It is a rule, on the whole of conscience and constitution, not of whim and caprice. That is its highest interest.

लोकांमध्येंच राहून समाधान व आनंद मानणारे ते गृहस्थ होते. शिवाय ते एक मोठे नामांकित विद्वान् गृहस्थ होते व संस्कृत व इतर प्राच्य भाषांचा त्यांचा अभ्यास दांडगा होता. आणि अशा उदार व चांगल्या इसमास आपला इलाखा मुकला आहे. हे क्रांतिकारक ( Anarchists ) खुनी लोक देशाचा नाश करीत आहेत. सरकारनें तीव्र उपाय योजून त्यांचीं पाळें मुळें खणून काढल्यावांचून, त्याचप्रमाणें गुप्त संस्थांचा अति कडक उपाय योजून शोध लावल्यावांचून लोकांस निर्धास्त वाटणार नाहीं.[१]

## स्वतंत्र वाचन

मुलें पुढील अभ्यासासाठीं विलायतेस गेलीं, आणि तीं अभ्यासू असलीं म्हणजे आपल्या अभ्यासाच्या पुस्तकांचें लक्षपूर्वक वाचन ठेवतातच. त्याचप्रमाणें वर्तमान-पत्रें व मासिकें ह्यांचेंही त्यांचें वाचन चालू असतेंच. तें योग्य प्रमाणांत चालू ठेवावें असेंच नारायणरावांचें मत होतें हें आपण जाणतच आहों. त्याचप्रमाणें मनोरंजनासाठीं मधून मधून नाटकें पहाणें हें देखील अवश्य आहे, असेंच त्यांस वाटत असे.[२] मात्र चांगलें व वाईट ह्यांतून विचारपूर्वक निवड करावी, परंतु हें सर्व करीत असतां व्यसनी लोकांच्या संगतीपासून अलिप्त असावें असा त्यांचा आग्रह असे; त्यांच्यापासून चार पावलें दूर असावें व विडी व दारू ह्यांस केव्हांही स्पर्श करूं नये,[३] असें त्यांनीं विठ्ठलरावांस सांगितलें होतें. विलायतेस गेलेलीं मुलें इतकें सर्व जरी करीत असलीं, तरी तेवढ्यानें भागत नाहीं असें नारायण-रावांस वाटत असे. मुलांनीं केवळ अभ्यासांतले किडे बनूं नये, त्यांनीं आपल्या

---

१. These anarchists are ruining the country and unless Government pursue a sterner policy of repression and hunt down mercilessly all secret societies and conspiracies there can be no safety for the people.

२. Neither your mother, nor I, object to time spent by you occasionally in witnessing a dramatic performance. Recreation and amusement of that kind are sometimes necessary to relieve the mind. Only you should discriminate between a good play and a bad one.

३. I have warned you and. I warn you once more against drink and smoking. Don't contract those evil habits,... keep a way from smoking, drinking and the like.

विठ्ठलरावांस आजही कोणतेंही व्यसन नाहीं.

मनाची उन्नति करणारें, सृष्टिसौंदर्याची आवड उत्पन्न करणारें, आयुष्यांतील निरनिराळ्या प्रसंगीं सहाय्यभूत होणारें वाङ्मय अवश्य वाचावें असें त्यांस वाटे व आपल्या चिरंजिवास त्यांनीं तसा उपदेश जो अनेक वेळां केला आहे, त्याची कल्पना पुढील अवतरणांवरून होईल.

"कधीं कधीं आपलें मन उदास होतें, अभ्यासाकडे लक्ष लागत नाहीं, उदास विचारांचा मनावर पगडा बसतो, व कोठलेंही काम हातीं घेण्यास मन तयार होत नाहीं; मित्रमंडळींत जाऊन वेळ घालवावा असेंहि वाटत नाहीं, अशा वेळीं कवितेचें चांगलें पुस्तक घेऊन तें वाचावयास लागावें आणि वर्डस्वर्थच्या काव्यांत अशा वेळीं आपलें मन शांत करण्याचें सामर्थ्य आहे असा माझा स्वतःचा अनुभव आहे. आणि तूंही त्याच दिशेनें प्रयत्न कर. वर्डस्वर्थ हाच तुझा आवडता कवि झाला तर फारच बरें. एकलकोंडेपणानें आलेलें औदासिन्य घालविण्याचें सामर्थ्य वर्डस्वर्थमध्यें आहे.[१]"

नेहमीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, स्वतंत्र वाचनाच्या बाबतींत, पुष्कळसे बाहेरचे ग्रंथ अगदीं वेळांत वेळ काढून वाचल्यानें आपल्या ज्ञानांत भर पडते ही समजूत अगदीं चुकीची आहे. विचारशक्तीची वाढ होणें अगत्याचें असतें. एक ना धड आणि भाराभर चिंध्यांनीं हें होत नाहीं. म्हणून थोड्या व सर्वमान्य ग्रंथांची निवड करावी, आणि त्यांच्यावर प्रभुत्व मिळविण्याचा प्रयत्न करावा. रस्किन, मिल्टन, शेक्स्पिअर, वर्डस्वर्थ, टेनिसन, बर्क व बायबल हे ग्रंथ नेहमीं जवळ टेबलावर ठेवावे व आळीपाळीनें ते सावकाश वाचावे. कांहीं तरी वाचावयाचें म्हणून हे ग्रंथ वाचावयाचे असें नव्हे. म्हणून जें कांहीं वाचलें असेल त्यासंबंधानें शांतपणें विचार करावा. एक ओळ वाचली, तिच्याविषयीं मनांत विचार केला व तिच्यांतील तत्त्व आत्मसात् केलें तर तें परिणामाच्या दृष्टीनें शंभर ओळी वाचण्यापेक्षां अधिक आहे हें विसरू नये.[२] आतां तुझ्याकडून असें उत्तर येण्याचा संभव आहे कीं, येथें नेहमींचा अभ्यासच मुळीं इतका असतो कीं, बाहेरच्या स्वतंत्र वाचनास मुळीं वेळच मिळणें शक्य नसतें. विद्यार्थ्यांच्या ह्या अडचणींत कांहीं तथ्य नाहीं असें म्हणण्याचा भाग नाहीं. पण मला सांगावयाचें आहे तें इतकेंच कीं, निश्चय केला तर मीं सांगितलेल्या ग्रंथकारांशीं परिचय करून घेण्यास दर-

---

१. I wish you would make Wordsworth's poetry your favourite, because Wordsworth is a good tonic for depression that comes of loanliness.

२. They teach us how to speak, how to think and above all how to behave and act. And that is real education.

रोज पंधरा मिनिटें वेळांत वेळ काढून खर्च करणें अशक्य नाहीं.[1] प्रथम रस्किन, बर्क व शेक्स्पिअर एवढेच हवे तर घ्यावे. रस्किनच्या ग्रंथांतील कांहीं भाग पंधरा मिनिटेंच वाचावा. काळजीपूर्वक व विचार करून कांहीं ओळी जरी वाचल्या तरी त्याचा आश्चर्यकारक परिणाम आढळून येतो. अशा प्रकारें ह्या मोठमोठ्या ग्रंथकारांच्या निकट सहवासांत राहण्याची संवय लावून घेतल्यानें कसें बोलावें, कसा विचार करावा व कसें वागावें ह्याविषयीं शिक्षण सहजासहजीं आपल्याला मिळतें आणि खरें शिक्षण तें हेंच.

## धर्म

धर्मासंबंधानें नारायणरावांची आस्था कोणत्या प्रकारची असे त्याची साक्ष त्यांचें चरित्र सर्वत्र देत आहे. आपल्या आयुष्यांत त्यांनीं धर्मास कोणतें स्थान दिलें होतें व जीं तत्त्वें त्यांस मान्य होतीं तीं स्वतःच्या आचरणांत आणण्याचा त्यांचा प्रयत्न सतत कसा चालू होता हें आपण पाहिलें आहे. आपलें अखिल जीवनक्षेत्र हें धर्मक्षेत्र आहे अशा भावनेनें त्यांचे सर्व व्यवहार होत होते. अशा पित्याचा पुत्र विलायतेंत अभ्यासासाठीं गेल्यानंतर त्याच्या आध्यात्मिक जीवनासंबंधानें ते कांहीं लिहिणार नाहींत हें शक्य नव्हतें; म्हणून ह्याविषयीं त्यांनीं आपल्या चिरंजिवास कोणत्या प्रकारें बोध केला तें आतां पाहूं या.

ख्रिस्त व त्याची शिकवण ह्यांविषयीं माझी अत्यंत आदराची भावना आहे हें तुला माहीत आहे. मी ख्रिस्ताचा एक भक्तच आहें. मी ख्रिस्ती प्रार्थनामंदिरांत उपासनेसही कधींकधीं जातों. ख्रिस्ती प्रार्थनामंदिरांतील ईश्वरोपासना म्हणून बिचकण्याचें कांहीं कारण नाहीं. तुझ्या कॉलेजास लागून उपासना मंदिर आहे. तेथील उपासना टाळण्याचा प्रयत्न करूं नकोस एवढेंच नव्हे, तर तेथें नियमानें हजर रहा, म्हणजे त्या उपासनांपासून पुष्कळ शिकण्यासारखें असतें हें तुला कळून येईल. परमेश्वर सर्व धर्मसंस्थांच्याद्वारे आपला संदेश कळवीत असतो, मात्र हा संदेश प्रेम, सत्य व विश्वास ह्यांसंबंधानें असला पाहिजे. आतां एकच गोष्ट पहा. आज मी आपला परमपूज्य संत तुकाराम ह्याचे कांहीं उद्गार व सेंट जॉन ह्याचे विचार ह्यांतील साम्य पहात होतों. म्हणजे जे कांहीं विचार तुकारामाचे म्हणून आपणास प्रिय आहेत तसेच विचार सेंट जॉनमध्यें आढळतात. ह्यावरून वर जें मीं म्हटलें आहे तें किती खरें आहे तें अनुभवास येतें.

---

१. One line read, studied and mentally digested is worth more than one hundred read without thought and care.

रोज नियमानें प्रार्थना करण्याची संवय लावणें अत्यंत अगत्याचें आहे. प्रार्थना केव्हांही टाळूं नये. त्याचप्रमाणें कोठल्यातरी उपासनामंदिरांत उपासनेस जाण्याचा नियम ठेवावा. सकाळीं व संध्याकाळींही प्रार्थना करण्याची संवय अवश्य लाव. बाकीच्या रोजच्या कर्तव्याचा विसर पडला तर तें एखादवेळ चालेल, पण सर्व कांहीं ठीक असतां देवाची प्रार्थना करण्यासच विसरणें हें मला तरी कसेंसेंच वाटतें. ज्याप्रमाणें रोज प्रार्थना करणें अगत्याचें आहे, त्याचप्रमाणें रोज कांहींतरी धर्मग्रंथांतून थोडेंसें वाचणें हेंही अगत्याचें आहे. त्याच्यायोगानें मन स्थिर होतें व त्यानंतर प्रार्थना करणें सुलभ जातें. ह्यासाठीं माझें तुला हें वारंवार सुचविणें आहे कीं, रविवारची कोठल्या तरी उपासनामंदिरांतील उपासना व सकाळ संध्याकाळची प्रार्थना केव्हांही टाळूं नकोस; हें तुझें सर्वांत पहिलें कर्तव्य आहे असें समजून चाल. अशाप्रकारचा उपदेश केला म्हणजे अलीकडलीं मुलें म्हणतात आम्हांला प्रार्थना करण्याची संवय नाहीं. पण संवय केल्यावांचून होत नसते, तसेंच प्रार्थनेपासून फायदे काय होतात तेंही प्रार्थना करूं लागल्यावांचून कळणें शक्य नाहीं. प्रार्थना मनापासून करा आणि मग तिची गोडी लागते किंवा नाहीं, तें पहा.

आपले दोष काय आहेत त्याची आपल्या स्वतःला कल्पना होणें हें आपल्या स्वतःच्या उन्नतीच्या दृष्टीनें फार लाभदायक असतें. परंतु दोषजागृतीचा परिणाम औदासिन्यांत होतां नये. दोषजागृतीनंतर दोष घालविण्याच्या प्रयत्नास लागलें पाहिजे. हें सामर्थ्य प्रार्थनेच्याद्वारें प्राप्त होतें. एकान्तानें कधींकधीं आपला फायदा होतो. आपण स्वतःविषयीं विचार करूं लागलों म्हणजे दोषजागृति होते व दोषजागृति झाली म्हणजे देवाचा विचार मनांत येतो. एकान्त देवाच्या सन्निध आपल्याला नेतो. म्हणून एकान्तांत असतांना नेहमीं देवाची प्रार्थना करावी. अशाच वेळीं आपल्या मातापितरांची व त्यांच्या प्रेमाची आठवण करावी. त्यांच्या निरपेक्ष प्रेमाच्या द्वारें देवाच्या प्रेमाची ओळख होत असते.

हिंदुस्थानांत ज्यांचें शिक्षण बरेंच झालें आहे असे तरुण पुढील शिक्षणासाठीं विलायतेस गेले म्हणजे तिकडल्या हवेचा व प्रकाशाच्या अभावाचा त्यांच्या मनावर परिणाम होतो व औदासिन्याची त्यांच्यावर छाप पडते हें खरें आहे. परंतु तरुणांनीं ह्या गोष्टीकडे दुर्लक्ष करून तिकडलें सृष्टिसौंदर्य, रात्रीच्या वेळीं दिसणारे अनंत तारे व तारका, ह्यांकडे लक्ष देऊन आपलें औदासिन्य घालविण्याचा प्रयत्न करावा. आनंदाच्या वेळीं त्या आनंदाच्याद्वारें ज्याप्रमाणें आनंदस्वरूप परमेश्वराचें दर्शन होतें, त्याचप्रमाणें आपल्या औदासिन्याच्या व संकटाच्या वेळीं त्या प्रेमस्वरूप परमेश्वराचें दर्शन होणें शक्य असतें. म्हणूनच प्रार्थनेची संवय लावून घेतली पाहिजे.

## पत्रांतील उपदेश.

नारायणरावांनीं आपल्या चिरंजिवास लिहिलेल्या विलायतच्या पत्रांत उपदेशाचा भाग असे व हा असा उपदेशाचा भाग कदाचित् आपल्या मुलाला आवडावयाचा नाहीं, किंवा त्याच्या मनांत त्यासंबंधानें कांहीं विकल्प येण्याचा संभव आहे असा विचार मनांत येऊन ते म्हणतात:—

मला कधीं कधीं असें वाटतें कीं, मी माझ्या पत्रांमध्यें अमुक करावें, तमुक करूं नये, अभ्यासांत शिस्त असावी, संगति चांगल्यांची असावी, रोज प्रार्थना करावी, उपासनामंदिरांतील उपासना टाळूं नये व अभ्यासापलीकडे बाहेरचें वाचन असावें वगैरे जो उपदेश असतो ह्याचा अर्थ हे दोष तुझ्यामध्यें आहेत अशी कल्पना करून मी हें सर्व लिहीत असतों, अगर तुझ्या एकंदर कार्यक्रमासंबंधानें आम्ही इकडे शंकित असतों असा होण्याचा संभव आहे. छे, असें मुळींच नाहीं. तुझे विचार निश्चित आहेत, तुझें शील शुद्ध, तुझ्या रीतीभाती उत्तम असून तूं तेथें आपल्याला प्राप्त होणाऱ्या सुसंधींचा सदुपयोग करीत आहेस हें तुझ्या स्वतःच्या, इतरांच्या पत्रांवरून व प्रत्यक्ष भेटीवरून आम्हांस कळत आहे. एकदां गोपाळराव[1] गोखले मला म्हणाले कीं, तुझी बुद्धि, योग्य वर्तन, व सारासार विचार ह्यांचा आपल्या मनावर चांगला परिणाम झाला होता. त्याचप्रमाणें डॉ. राव[2] म्हणत होते कीं, तुझें एकंदर वर्तन अगदीं एकाद्या सत्पुरुषासारखें असतें. उगीच चकाट्या पिटीत बसणें तुला आवडत नाहीं. एवढेंच नव्हे, तुझीं सर्व कामें वेळच्यावेळीं होत असतात व तुझें एकंदर वर्तन पद्धतशीर असतें. हें सर्व ऐकून आम्हांला किती आनंद होत आहे याची तूं कल्पनाच केली पाहिजेस. तथापि तुला अनुभव कमी आहे; पुष्कळ मुलांनीं तेथें राहून आपलें अकल्याण करून कसें घेतलें आहे त्याविषयीं मागें मीं लिहिलेंच आहे. म्हणून त्या त्या वेळीं मनांत जे विचार येतात त्यांचें टांचण मी पत्रांत करीत असतों.

आपण जें कांहीं करावयाचें योजिलें आहे तें मनापासून करणें, त्यासाठीं बहुत श्रम करावे लागले तरी त्यांची क्षिति न बाळगणें, शांतपणें, संथपणें, प्रतिकूल परिस्थितीशीं झगडत झगडत काम करणें, व तेंही प्रसन्नचित्तें करणें ह्यावर यशाची गुरुकिल्ली अवलंबून आहे. पहा, आतां तूं भौतिक शास्त्र ह्या विषयाचें अध्ययन

---

१. He was much impressed with your intelligence, good sense and propriety of behaviour.

२. He (Dr. Row) says you are almost saintly in your life and ways; you have fine manners and you do not care for light, frivolous talk.

करणार आहेस. आणि हा विषय तुला नवीनच आहे. जर त्यांत तुझें मन रिझलें तर ठीकच, नाहींतरी तूं त्या विषयावर प्रभुत्व मिळविण्यासाठीं झटलें पाहिजे. जो विषय आवडतो त्याचें अध्ययन कोणीही करील. त्यांत विशेष कांहीं नाहीं. परंतु न आवडणाऱ्या विषयांत प्राविण्य मिळविणें ह्यांत विशेष आहे. धैर्य खचूं देऊं नये. आत्मसामर्थ्यावर विश्वास ठेवून कार्यप्रवृत्त व्हावें. म्हणजे यशाचा मार्ग मोकळा होतो.

एखाद्या विषयावर निबंध लिहावयाचा असला, तर त्यासंबंधाची आपल्याला जी सर्वसाधारण माहिती असेल तिच्यावर विसंबून एकदम लेखनास प्रवृत्त होऊं नये. विषयासंबंधानें अगदीं कांटेतोल माहिती मिळवावी. माहिती अशी असावी कीं जिच्या खरेपणाविषयीं शंकाच उत्पन्न होऊं नये. अशा बाबतींत केवळ अनुमानावर अवलंबून राहूं नये. सर्व विधानें साधार असावीं आणि जें कांहीं लिहावयाचें तें साध्या भाषेंत असावें. विचारसरणी सरळ सुटसुटीत असावी, उगाच पुष्कळ लिहूं नये. आपले विचार स्पष्टपणें नमूद करावेत, पण आधारावांचून विधान करूं नये.

अनाठायीं खर्च करूं नये, व तो तूं करीत नाहींस हें मला माहीत आहे. जो खर्च करावयाचा तो ज्याप्रमाणें पद्धतशीर करावा, त्याचप्रमाणें तो पद्धतशीरपणें लिहून ठेवण्याची संवय लावावी. दुर्दैवाची गोष्ट ही आहे कीं, माझ्या लहानपणीं मी स्वतःचे हिशेब ठेवण्याची संवय आपल्याला लावून घेतली नाहीं, त्याबद्दल मला आतां वाईट वाटतें. कारण, त्यामुळें विचारपूर्वक खर्च करण्याच्या बाबतींत मजमध्यें हलगर्जीपणा झाला आहे.[१] म्हणून आतांपासूनच योग्यप्रकारें काटकसर कशी करावयाची हें तूं शिकलें पाहिजेस. खर्च करावा, पण योग्य कार्य व काळ पाहून शहाणपणानें करावा, व केव्हांही उधळपट्टी करूं नये. आपल्या गरजा काय आहेत त्या पहाव्या, व त्याप्रमाणें योग्य काटकसरीचा विचार मनांत वागवून विचारपूर्वक खर्च करावा. बडेजावीचा विचार मनांत आणूं नये. परंतु पैसा फाजील खर्च करावयाचा नाहीं म्हणून तो कंजुषाप्रमाणें खर्च करावयाचा, स्वतः अडचणी सहन करून पैसा सांचवावयाचा, असला विचार केव्हांही मनांत आणूं नये.

---

१. Unfortunately for me I never learnt it when I was young and I have always regretted it, because it has made me careless about the wise spending of money.

प्रकरण अकरावें

# अस्पृश्यतानिवारण

अलीकडे हरिजन उद्धारासंबंधानें जी चळवळ चाललेली ऐकूं येते, वर्तमानपत्रांमध्यें ह्या चळवळीसंबंधानें जी माहिती प्रसिद्ध होत असते, तिच्यावरून पुष्कळांचा असा समज होतो कीं, अस्पृश्योद्धाराची चळवळ ही अगदीं अलीकडची असून गांधीजींनीं ह्या चळवळीस प्रारंभ केला आहे. हा समज होण्यास एक सबळ कारण झालें आहे. आजकाल ह्या चळवळीचे सूत्रधार व इतर पुढारी मागें ह्या बाबतींत ज्यांनीं विशेष कार्य केलें, ज्यांनीं अस्पृश्योद्धाराची चळवळ सर्व हिंदुस्थानभर गाजविली त्यांच्या नांवांचा अगर कार्यांचा चुकूनहि उल्लेख करीत नाहींत! दोन वर्षांपूर्वी पन्नास संस्थांच्या विद्यमानें अस्पृश्योद्धाराची चळवळ संघटित रीतीनें चालू करणारे श्री. विठ्ठल रामजी शिंदे ह्यांस मानपत्र अर्पण करण्याचा समारंभ श्री. गांधीजी ह्यांच्या अध्यक्षत्वाखालीं व्हावयाचा असें ठरलें होतें. त्यावेळीं अस्पृश्योद्धाराच्या चळवळीचा व श्री. शिंदे ह्यांचा मूळ संबंध लोकांस कळेल अशी अपेक्षा होती. परंतु दुर्दैव पुढें आलें व गांधींजींची इच्छा असूनही त्यांस सभेस हजर राहातां आलें नाहीं व जमलेला प्रचंड जनसमूह दोन तास ताटकळत बसला! असो. खरा प्रकार असा आहे कीं, अस्पृश्यांसंबंधानें पहिली चळवळ ज्याप्रमाणें गांधीजींनीं सुरू केली नाहीं, त्याचप्रमाणें ती नारायणराव चंदावरकर अगर विठ्ठलराव शिंदे ह्यांनीं प्रथम सुरू केली नाहीं. मागला इतिहास, मागला अनुभव विचारांत न घेतां खऱ्या सुधारकाच्या हातून महत्त्वाचें कार्य होणें नाहीं.[१] त्यानें मागील अनुभवाचा फायदा घेऊन आपल्या पुढील कार्याची रूपरेषा आंखिली पाहिजे. ह्या दृष्टीनें पहातां खुद्द मुंबई शहरांत सन १८५५ सालीं एक मंडळी स्थापून तिच्या विद्यमानें कांहीं शाळा अस्पृश्य जातींच्या मुलांसाठीं स्थापिल्या गेल्या होत्या; पण त्यावेळीं काळ अनुकूल नसल्यामुळें व

---

१. No social reformer can be worth his work who ignores the past.

चिकाटी धरून काम न झाल्यामुळें त्या शाळा बंद पडल्या.[1] परंतु ह्याच वेळीं जें मुंबईस झालें नाहीं तें पुण्यासारख्या ठिकाणीं शक्य झालें हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. १८४८ सालीं जोतिबा फुले ह्यांनीं पुण्यास मुलींची पहिली शाळा स्थापिली व १८५२ सालीं महारमांगांच्या मुलांसाठीं पहिली शाळा सुरू केली आणि ह्यासाठीं ह्याच सालीं एक मोठी जाहीर सभा भरवून सरकारतर्फे जोतिबांस दोनशें रुपये किंमतीची शाल बक्षीस देण्यांत आली. जोतिबांनीं तीन चार शाळा चालविल्या. एवढेंच नव्हे, तर १८५५–५६ च्या सुमारास महारमांगांच्या मुलांच्या शाळेसाठीं इमारत बांधण्यासाठीं सरकारनें एक जमिनीचा तुकडा व दक्षिणा फंडांतून ५०० रुपये देण्याचें वचन दिलें. आम्हांला असें कळतें कीं १९१४ सालीं भारतीय निराश्रित सहाय्यकारी मंडळीनें ९९ वर्षांच्या करारानें पुणें शहर म्युनिसिपालटीकडून जी सात एकरची जागा घेतली आहे ती त्यावेळीं सरकारनें देऊं केलेल्या जागेपैकींच होय.

खुद्द मुंबई शहराचा विचार केला तर वरील शाळा बंद झाल्यानंतर पुढें १८७० पर्यंत कांहीं विशेष प्रयत्न झाल्याचें दिसून येत नाहीं. त्या सालीं ब्रम्हानंद केशवचंद्र सेन विलायतेहून परत आले व त्यांनीं धोबीतळ्यावरील फ्रामजी कावसजी इन्स्टिट्यूटमध्यें जें व्याख्यान दिलें त्यांत त्यांनीं खालच्या जातींच्या उन्नतीसाठीं मुंबईच्या प्रार्थनासमाजानें कांहीं कार्य करावें अशी सूचना केली. ह्या सूचनेस अनुसरून प्रार्थनासमाजाच्या मंडळींनीं रात्रींच्या कांहीं शाळा स्थापिल्या व त्यांपैकीं दोन शाळा फक्त अस्पृश्य मानलेल्या जातींसाठीं होत्या. १८९१ सालीं प्रार्थनासमाजाचे एक सभासद व पुढें जे समाजाचे उपाध्यक्ष होते, त्या शेट दामोदरदास सुखडवाला ह्या उदार गृहस्थांनीं भायखळा येथें स्वतःच्या खर्चानें अस्पृश्यांसाठीं शाळा चालविण्यास मदत केली. ह्या बाबतींत १९१० सालीं सर नारायण ह्यांनीं असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, आज ज्या चळवळीसंबंधानें बराच बोलबाला होत आहे. त्या चळवळीस अशाप्रकारें प्रार्थना समाजानें येथें सुरुवात केली,[2] असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. परंतु सर नारायण ह्यांनीं असेंही म्हटलें आहे कीं, अस्पृश्योद्धाराच्या एकंदर चळवळीचा त्यावेळपर्यंतचा इतिहास अवलोकन केला व आज अस्पृश्यांच्या उद्धारार्थ चालू असलेलें कार्य ध्यानांत घेतलें तर बरेंचसें श्रेय ख्रिस्ती

---

१. १९१० सालीं The Depressed Classes ह्या विषयावर दिलेलें व्याख्यान पहा.

२. The Prarthana Samaj may justly claim to have initiated the movement of which we hear so much nowadays in connection with the depressed classes.

मिशनरी, ब्राह्मसमाज, कर्नल अल्कॉट व इतर थिऑसफिस्ट, स्वामी दयानंद व आर्यसमाज ह्यांकडे जातें ह्यांत कांहीं संशय नाहीं.[१]

सर नारायण ह्यांनीं १९१० सालीं दिलेल्या व्याख्यानांत जरी वरील माहिती आली आहे, तरी त्यापूर्वी ४ वर्षे आधीं **भारतीय निराश्रित सहाय्यकारी मंडळीची** (Depressed Classes Mission Society of India) स्थापना ता. १८ आक्टोबर १९०६ रोजीं दिवाळींतल्या प्रतिपदेच्या शुभ दिवशीं न्या. मू. चंदावरकर ह्यांच्या हस्तें झाली होती ही गोष्ट येथें नमूद करणें अवश्य आहे. ह्यावरून श्री. विठ्ठलराव शिंदे ह्यांच्या मनांत आलें व मंडळीची स्थापना झाली असें मात्र समजण्याचें कारण नाहीं. श्री. शिंदे हे विलायतेहून परत आल्यानंतर ते मुंबई प्रार्थनासमाजाचे प्रचारक झाले हें सर्वांस विदित आहे. विलायतेंत असतांना तेथील खालच्या वर्गांचें व त्यांच्या उद्धारासाठीं होत असलेल्या प्रयत्नांचें त्यांनीं सूक्ष्म निरीक्षण केलें होतें, व हिंदुस्थानांत परत आल्यानंतर आपल्या येथील अत्यंज लोकांची आज स्थिति काय आहे, त्यांच्या उन्नतीसाठीं कोठेंकोठें काय प्रयत्न होत आहेत, व त्यांच्यासाठीं कोणत्या दिशेनें प्रयत्न करतां येण्यासारखे आहेत हें पहाण्यासाठीं श्री. शिंदे ह्यांनीं १९०३ ते १९०५ ह्या तीन वर्षांत सर्व हिंदुस्थानभर सफरी केल्या व त्यांच्या ह्या सफरींचा १९०५ सालच्या सामाजिक परिषदेंतील आपल्या प्राथमिक व्याख्यानांत नारायणरावांनीं उल्लेख[२] केला. त्यावेळीं प्रांतोप्रांतींच्या अस्पृश्य, गुन्हेगार, जंगली जातींची स्थिति श्री. शिंदे ह्यांनीं स्वतः पाहिली व प्रार्थनासमाजाचे अध्यक्ष सर नारायण ह्यांनीं त्यांस ह्या बाबतींत प्रोत्साहन दिलें. कारण, त्यांचें स्वतःचें असें मत होतें कीं, विधवा व मागसलेल्या जाती ह्यांच्या हितासाठीं आम्ही जे उद्योग करूं त्यावर आम्ही हिंदुलोक प्रागतिकांचे पुढारी होण्यास लायक आहों कीं नाहीं, हें अवलंबून आहे. ह्या सफरी केल्यानंतर मिळालेली व संशोधनाच्याद्वारें प्राप्त झालेली माहिती श्री. शिंदे ह्यांनीं एकत्रित केली व ती लोकांपुढें मांडून त्यांनीं अस्पृश्यांसंबंधानें आजपर्यंत झालेल्या

---

१. The country owes a debt of gratitude to Christian Missionaries, to the Brahma Samaj, to Col. Olcott and the Theosophical Society, to Swami Dayanand Saraswati and the Arya Samaj for what is being done to elevate the depressed classes.

२. My friend Mr. Shinde, Missionary of the Prarthana Samaj of Bombay, has been making a tour in the country to find out what is being done for the elevation of those whom we treat as the outcastes of the society.

व त्यावेळीं होत असलेल्या भयंकर अन्यायासंबंधानें अनेक लेख लिहून व पत्रकें काढून हिंदुस्थानभर जागृति केली. त्यापूर्वी लोकांना हिंदुस्थानांत ज्यांना उच्चवर्णीय लोक मोठ्या दिमाखानें अंत्यज म्हणतात त्यांची साधारण संख्या तरी किती आहे ह्याची कल्पनाच नव्हती. श्री. शिंदे ह्यांनीं सर्व प्रांतांच्या १९०१ सालच्या खानेसुमारीचे आंकड्यावरून असें सिद्ध करून दाखविलें कीं एकूण हिंदूंची संख्या जी १९,२७,१९,७३८ आहे, तींत ५,३२,३६,६३२ अंत्यज समाविष्ट आहेत ! हे सर्व लोक बहिष्कृत आहेत, व त्यांचा छळ मनुस्मृतीच्या पूर्वकाळापासून होत असून खुद्द मनुस्मृतीमध्यें त्यांच्यावरील बहिष्काराचें स्वरूप पुढीलप्रमाणें वर्णिलें आहे :—

**चांडालश्वपचानां तु बहिर्ग्रामात्प्रतिश्रयः ।**
**अपपात्राश्च कर्तव्या धनमेषां श्वगर्दभम् ॥**
**वासांसि मृतचैलानि भिन्नभांडेषु भोजनम् ।**
**कार्ष्णायसमलंकारः परिव्रज्या च नित्यशः ॥**
**न तैः समयमन्विच्छेत्पुरुषो धर्ममाचरन् ।**
**व्यवहारो मिथस्तेषां विवाहः सदृशैः सह ॥**
**अन्नमेषां पराधीनं देयं स्याद्भिन्नभाजने ।**
**रात्रौ न विचरेयुस्ते ग्रामेषु नगरेषु च ॥**
**दिवा चरेयुः कार्यार्थं चिन्हिता राजशासनैः ।**
**अबांधवं शवं चैव निर्हरेयुरिति स्थितिः ॥**
**वध्यांश्च हन्युः सततं यथाशास्त्रं नृपाज्ञया ।**
**वध्यवासांसि गृह्णीयुः शय्याश्चाभरणानि च ॥**

अर्थ—चांडाल, श्वपच इ० जातींनीं गांवाबाहेर रहावें; ह्यांच्याजवळ भांडीं नसावीं; कोंबडीं व गाढव हेंच ह्यांचें धन; प्रेतावरचे कपडे हींच ह्यांचीं वस्त्रें; ह्यांनीं फुटक्या मडक्यांत खावें, काळ्या लोखंडाचे अलंकार ल्यावे, नित्य भटकत असावें. इतरांनीं ह्यांच्याशीं कसलाही व्यवहार करूं नये; त्यांना पाहूंही नये; ह्यांना अन्न द्यावयाचें असल्यास नोकराकडून खापरांतून देववावें; शहरांत किंवा खेड्यांत ह्यांनीं रात्रीं राहूं नये. दिवसा कामासाठींच कांहीं चिन्ह धारण करून यावें. तें काम म्हणजे बिनवारशी प्रेत नेणें, देहान्त शिक्षा झालेल्याचा राजाज्ञेनें वध करणें व त्यांचे कपडे दागिने वगैरे घेणें हीं होत.

सर्व हिंदुस्थानभर जागृति करण्याचें काम करीत असतां, ह्या बाबतींत "अस्पृश्य लोकांना वर आणण्याकरितां एतद्देशीय लोकांनीं आपले पौरस्त्य आचार, रीतिरिवाज आणि परंपरा ह्यांना धरून एक कायमचें मिशनच स्थापलें

पाहिजे व तें सध्यांच्या स्थितींत **प्रार्थनासमाजा**शिवाय दुसऱ्याकडून होणें विशेष संभवनीय नाहीं " असा विचार श्री. शिंदे ह्यांनीं समाजाच्या मंडळीपुढें ठेवला. परंतु योजना कितीही उत्तम असली, कार्य करण्यास माणसें तयार असलीं तरी उत्तम कामें द्रव्याच्या अभावीं होणें दुर्घट होतें. त्याप्रमाणें श्री. विठ्ठलराव दात्याची वाट पहात बसले असतां दिवाळींतील पाडव्याच्या दोनच दिवस आधीं प्रार्थनासमाजाचे उपाध्यक्ष श्री. दामोदरदास गोवर्धनदास ह्यांनीं मंडळीची स्थापना होऊन कामास सुरुवात व्हावी ह्या हेतूनें एक हजार रुपयांची देणगी दिली व कार्तिक शुद्ध प्रतिपदेच्या शुभ दिवशीं सकाळीं—ता. १८ ऑक्टोबर १९०६ रोजीं एलफिन्स्टन् रोड स्टेशनलगतच्या मुरारजी वालजीच्या बंगल्यांत मंडळीची पहिली शाळा उघडण्यांत आली. त्यावेळीं मंडळीचे अध्यक्ष न्या. मू. नारायणराव चंदावरकर ह्यांनीं जमलेल्या मुलांना स्वतः धडा घालून दिला ! प्रारंभापासून ह्या बाबतींत नारायणरावांची अशी भावना होती कीं, खरें पहातां अस्पृश्य मानलेल्या बंधूंच्या उन्नतीचें कार्य हें आत्मोन्नतीचें कार्य आहे.[१] त्यांच्यावर आम्ही कांहींतरी उपकार करीत आहों अशी भावना असूं नये असें सर नारायण म्हणत. कारण त्यांना असें वाटत असे कीं, जोंपर्यंत आमच्यामध्यें अस्पृश्य असा एक स्वतंत्र वर्ग आहे, तोंपर्यंत आम्ही स्वतः आपल्याला अस्पृश्य करून घेत आहों. तसेंच जो कोणी इतरांस तुच्छ लेखून त्यांस दूर ठेवण्याचा प्रयत्न करतो तो स्वतःच तुच्छ मानला जाण्याचा अधिक संभव असतो असें त्यांस वाटत असे.[२] स्वतः नारायणरावांचें लक्ष ह्या विषयाकडे १८९४ सालापासून होतें. त्यावर्षीं त्यांनीं भागवत धर्माचें अर्वाचीन स्वरूप अशा विषयावर दिलेल्या व्याख्यानांत अस्पृश्य जातींसंबंधाची आपली कळकळ व्यक्त केली होती. नारायणरावांचा असा दृढ विश्वास होता कीं आजपर्यंत धर्मग्रंथांनीं व धर्मप्रणेत्यांनीं ह्या अंत्यज मानिलेल्या लोकांना जरी दूर ठेविलें, तरी संतांनीं त्यांना भक्तिमार्ग मोकळा करून दिला व त्यांनींच उच्चनीच भाव काढून टाकला. त्यामुळें अगदीं नीच मानिलेल्या जातींतही सगळ्या हिंदुस्थानांत संत निर्माण झाले व ते सर्वांस आदरणीय झाले. संतांचे हे उपकार एका कीर्तनांत एका अस्पृश्य संतानें पुढीलप्रमाणें स्मरल्याचें नारायण-

---

१. By elevating the Depressed Classes we elevate ourselves.

२. So long as we have the untouchables among us we shall bring to ourselves the contamination of untouchables. He who tries to lower and degrade others and treat them as casteaways ends in the long run by lowering and degrading himself.

रावांनीं लिहून ठेविलें आहे :—" अहो, संतहो, आपण आमच्यावर फार उपकार केले आहेत. ज्यावेळीं वेदांनीं आम्हांला टाकिलें, ब्राह्मणांनीं झिडकारिलें, व लोकांनीं आमच्यावर बहिष्कार घातला, त्यावेळीं आम्ही जे अगदीं नीच, सर्वांस तिरस्करणीय वाटणारे महार त्यांस आपण जवळ केलें. आपण आम्हांला आमच्या उद्धाराचा मार्ग दाखविला व आमच्या ठिकाणीं आशा उत्पन्न केली. " इतकें झालें तरी अस्पृश्यांचा अस्पृश्यपणा गेला नाहीं. आणि सर नारायण ह्यांचा तर असा दृढ विश्वास होता कीं, जोंपर्यंत खालच्या लोकांचा आम्ही तिरस्कार करीत आहों, तोंपर्यंत वरच्या वर्गांची उन्नति व्हावयाची नाहीं. त्याचप्रमाणें, आतां काळ बदलला आहे. सर्वत्र रूढीचीं बंधनें शिथिल होत आहेत, काल्पनिक भेदभाव नष्ट होत आहेत, अशा वेळीं ज्यांना आम्ही अस्पृश्य मानीत आहों ते आतां फार दिवस अस्पृश्य राहणें इष्ट नाहीं व शक्य नाहीं. हें कार्य त्वरित करावयाचें म्हणजे त्यांना शिक्षण द्यावयाचें, कोणत्याही प्रकारचा भेदभाव न राखतां त्यांना वर आणावयाचें, त्यांच्यांत मोकळेपणानें मिसळावयाचें, व त्यांच्यावर आपण मोठे उपकार करीत आहोंत ह्या भावनेनें न वागतां त्यांच्या उन्नतीसाठीं कर्तव्यबुद्धीनें झटावयाचें हें त्यांचें धोरण होतें व ह्यास अनुसरूनच भारतीय निराश्रित सहाय्यकारी मंडळीची स्थापना नारायणरावांच्या अध्यक्षतेखालीं झाली. त्यावेळीं त्यांनीं जें संस्मरणीय भाषण केलें त्यांतील पुढील वाक्यें नारायणरावांच्या उच्च ध्येयाची स्पष्ट कल्पना करून देणारीं आहेत. ते म्हणाले :—

" ह्या नीच मानिलेल्या लोकांना वर आणण्याचा प्रयत्न केल्यानें आम्ही स्वतः-लाच वर आणणार आहों. हें पवित्र कार्य करीत असतां ह्या लोकांचा आम्ही उद्धार करणार हा घमेंडीचा विचार आमच्या अंतःकरणांत न शिरो आणि आम्हां सर्वांना ह्या घोर अन्यायामुळें जी अधोगति प्राप्त झाली आहे ती टळून सर्वांचा सारखाच उद्धार होणार आहे, असा साधा आणि सात्विक भाव आम्हांमध्यें निरंतर जागृत राहो, " ह्या भावाला अनुसरून मंडळीनें आपलीं कार्यें करण्याचा प्रयत्न केला. मंडळी ज्यावेळीं स्थापन झाली त्यावेळीं स्थापनेचा हेतु पुढीलप्रमाणें ठरला :—

" हिंदुस्थानांतील महार, मांग, पारिया वगैरे (विशेषेंकरून पश्चिम हिंदुस्थानांतील) निकृष्ट वर्गांना व इतर अशाच रीतीनें निराश्रित झालेल्या लोकांना (१) शिक्षण, (२) कामधंदा, (३) ममतेची आणि समतेची वागणूक, (४) धर्म, नीति, आरोग्य आणि नागरिकता इत्यादि विषयक उदार तत्त्वांचा उपदेश व अशा इतर साधनांच्या द्वारें आत्मोन्नति करण्याचे कामीं सहाय्य करणें. " मंडळीनें हा

१. There can be no reform or hope for the higher so long as the so-called lower castes are despised.

आपला हेतु दृष्टीपुढें ठेवून आपल्या कार्यास प्रारंभ केला व जसजसें मनुष्यबळ मिळूं लागलें तसतसा कामाचा पसाराही वाढूं लागला. १९०७ पासून १९१२ अखेरच्या राष्ट्रीय सभा सुरत, मद्रास, कलकत्ता, लाहोर, बांकीपूर आणि कराची येथें ज्यावेळीं झाल्या, त्यावेळीं लोकमत जागृत करण्याकरितां स्वतंत्र परिषदा भरविल्या. १९१२ सालीं ऑक्टोबर महिन्यांत डॉ. रामकृष्णपंत भांडारकर ह्यांच्या अध्यक्षतेखालीं तीन दिवस मोठी परिषद भरविली. अशा प्रकारें सर नारायण चंदावरकर ह्यांच्या सल्ल्यानें मंडळीचें काम चाललें होतें.

मंडळीच्या कामाचा विस्तार जो झाला त्यांत मुंबईस सुरू केलेल्या वसतिगृहाचा उल्लेख करणें अवश्य आहे. केवळ शाळा स्थापिल्यानें, अगर दवाखाने चालविल्यानें, किंवा मधूनमधून व्याख्यानांची झोड उडविल्यानें अस्पृश्यता जावयाची नाहीं, याची जागृति मंडळीच्या ठिकाणीं पूर्वीपासून होती. स्वार्थत्यागी व दयाळू वृत्तीच्या स्त्रीपुरुषांनीं अस्पृश्य लोकांच्या वसतींत राहून त्यांच्या घरीं जाऊन, त्यांना आपल्या घरीं बोलावून त्यांच्यामध्यें मंडळीसंबंधानें आपलेपणा जागृत केला पाहिजे, असें कर्त्या माणसांना वाटत होतें. १९०७ सालींच एका उदार गृहस्थांनीं दरमहा १०० रुपयांची देणगी देण्याचें कबूल केलें व त्याच्या जोरावर प्रथम निराश्रित सेवासदन चालविण्यांत आलें. कांहीं विद्यार्थी येथें राहून शाळेंतील व एक मुलगा कॉलेजांतील अभ्यास करूं लागले. १९०८ सालीं श्री. वा. स. सोहोनी हे मिशनला येऊन मिळाले. ह्यापूर्वी मि. सय्यद हे मिशनचे एक प्रचारक झालेच होते. सर नारायण ह्यांनीं प्रारंभींच कार्यासंबंधानें जें ध्येय पुढें ठेविलें होतें, त्याप्रमाणें काम चालू आहे किंवा नाहीं ह्याकडे नारायणरावांचें पूर्ण लक्ष असे. ध्येयविस्मृति झाली कीं कामांत बिघाड व्हावयास वेळ लागावयाचा नाहीं असें ते म्हणत. आणि म्हणून कार्यकर्ती माणसें ध्येयाविषयीं जागृत आहेत असा जरी त्यांचा अनुभव होता तरी ते जागें करण्याचें काम करीतच.[1] वास्तविक पहातां त्यांनीं स्वतः मिशनच्या व्याप्तीचा कार्यक्रम केव्हांही आंखला नाहीं. तें

---

१. १९११ सालीं एका सार्वजनिक सभेंत सर नारायण ह्यांनीं लोकांना स्पष्टपणें बजाविलें होतें कीं, जोंपर्यंत खालच्या वर्गांचा तिरस्कार होत आहे तोंपर्यंत वरच्या वर्गांची उन्नति होण्याची आशा करणें व्यर्थ आहे. ज्यांचा आम्ही तिरस्कार करतों व ज्यांस आम्ही अस्पृश्य लेखतों तेच खरे पहातां फार महत्वाचे लोक आहेत. म्हणून ह्या लोकांच्या उद्धारासाठीं सुरू झालेली चळवळ योग्य रीतीनें चालविली, लोकांनीं सहानुभूतिपूर्वक तिकडे लक्ष दिलें व सर्व कारभार धीरानें चालविला तर खालच्या व वरच्या सर्व लोकांची उन्नति होणार आहे.

सर्व काम त्यांनीं श्री. विठ्ठलराव शिंदे ह्यांचेवर सोंपविलें होतें. आणि त्यांनीं जी जी योजना कमिटीपुढें आणिली तिचा पूर्ण विचार करून तिला पाठिंबा देण्यास त्यांनीं केव्हांही कमी केलें नाहीं. त्यांचा इतकाच कटाक्ष असे कीं, सर्व कामें व्यवस्थित रीतीनें व पूर्ण पद्धतशीरपणें झालीं पाहिजेत. आणि अशा पद्धतीनें काम होत आहे असें त्यांनीं पाहिलें म्हणजे त्यांस फार समाधान वाटे. आपल्या मंडळीचें काम हें सामाजिक आहे, त्याचा व राजकीय चळवळीचा संबंध येऊं नये, किंवा ह्या चळवळीला राजकीय स्वरूप येऊं नये असा सर नारायण ह्यांचा कटाक्ष होता. पुढें अस्पृश्यतेच्या प्रश्नाला राजकीय स्वरूप आल्यानंतर एकंदर चळवळीचें स्वरूप कसें बदलून गेलें आहे तें सर्वांस माहीत आहेच. तथापि जोंपर्यंत ह्या चळवळीचे सर नारायण पुढारी होते, तोंपर्यंत अस्पृश्यांचा मिशनवर पूर्ण विश्वास होता. सर नारायण स्वतः अस्पृश्य मंडळींना प्रेमानें जवळ करीत. सर्व अस्पृश्यांना त्यांच्या घरीं मुक्तद्वार होतें. नारायणराव स्पृश्य व अस्पृश्य हा भेद कसा करीत नसत व ज्या अस्पृश्यांच्या ठिकाणीं आपण अस्पृश्य आहों अशी जाणीव असे त्यांच्याशीं ते कोणत्याप्रकारें वागत असत ह्याची साक्ष सर नारायण ह्यांच्या मृत्यूनंतर श्री. वाघमारे ह्यांनीं केलेल्या भाषणांत **चरित्रसंगति** ह्या प्रकरणाच्या अखेरीस दिलेल्या हकीकतींत सांपडेल. सर नारायण ह्यांनीं निराश्रित सहायकारी मंडळीला स्वतः द्रव्यद्वारें मदत केलीच, पण त्यांचें शील, त्यांचा अनुभव, त्यांचें वजन व त्यांचा पुढाकार ह्यामुळें मिशनची पुष्कळ भरभराट झाली ह्यांत कांहीं संशय नाहीं. नारायणराव नवीन ठिकाणीं गेले कीं, प्रथम तेथील लोकांची ओळख करून घेऊन तेथील धर्मविषयक सामाजिक व शिक्षणविषयक स्थितीसंबंधानें चौकशी करीत. ते १९१५ सालीं सौ. लेडी लक्ष्मीबाई ह्यांच्या प्रकृतीसाठीं मलबारांत गेले होते. त्यावेळीं त्यांनीं कालिकत येथें बरेंच धर्मकार्य केलें व मलबारांतील अस्पृश्यतेसंबंधानें लेख लिहून त्यांत आपले अनुभव सांगितले.

कालिकत येथें सर नारायण ह्यांनीं सर्व मलबारांतील अस्पृश्यांची स्थिति पाहून एक व्याख्यान दिलें व मुंबईत आल्यावर टाइम्स पत्रासाठीं दोन लेख लिहिले. अस्पृश्यांनीं ठराविक रस्त्यांवरून चालावयाचें नाहीं, व इतर रस्त्यांवरून चालतांना आपल्या जातीचा पुकारा करीत चालावयाचें हा प्रकार मलबारवांचून इतर कोणत्याही प्रांतांत नाहीं. मलबारांत जातीजातींतील सूक्ष्म भेदाचें अवडंबर फार असून कडक नियम पाळण्यांत येतात हें पाहून स्वामी विवेकानंदांनीं मलबार हें वेड्यांचें इस्पितळ आहे असें म्हटलें होतें! एका मिशनरीनें मलबारांत सर्व कांहीं चांगलें आहे, पण मनुष्यें मात्र अत्यंत दुष्ट आहेत असें वर्णिलें आहे. सर नारायण ह्यांनीं कांहीं अस्पृश्य लोकांस भीक मागण्यासही परवानगी नाहीं, प्रामाणिपणें काम करण्यासही

मुभा नाहीं, ह्याविरुद्ध कडक टीका करून, त्यांना उद्योग करण्याची तरी परवानगी द्या अशी करुणा भाकिली. विवेकानंदासंबंधानें I have considerable respect for Swami Vivekanand but I cannot sympathise with his superlatives, असें त्यांनीं स्पष्ट म्हटलें असतांना कांहीं लोकांनीं विवेकानंदांचे उद्गार त्यांच्या माथीं मारून त्यांच्यावर टीका केली! मलबारांत नायदी म्हणून अस्पृश्यांतील नीचतम जात आहे. त्यांच्याशीं सर नारायण ह्यांनीं संभाषण केलें. त्यांच्या बोलण्यांत 'वैराग्या'सारखे पुष्कळ शब्द आलेले पाहून नारायणरावांस फार आश्चर्य वाटलें. नीचांतला नीच, अक्षरशत्रू, चांभारापासूनही शंभर यार्ड दूर रहाणें हा ज्याचा अधिकार, आपली अस्पृश्यता पुकारीत भीतभीत जो गांवांत येतो, त्याच्या तोंडीं इतके संस्कृत शब्द, त्यांचीं नांवें उच्चवर्णीयांसारखीं हें कसें, याचें सर नारायण ह्यांस आश्चर्य वाटलें. चौकशीअंतीं त्यांस असें कळून आलें कीं नायदी लोकांचें मूळ नंबुद्री ब्राम्हणापर्यंत पोंचतें! कांहीं नंबुद्री ब्राम्हण कुटुंबांच्या हातून कांहीं प्रमाद घडले म्हणून त्यांस बहिष्कृत करण्यांत आलें. त्यांचें पतन होत होत त्यांस आजच्या नायदी जातीची स्थिति प्राप्त झाली! नारायणरावांनीं मलबारांतला केलेला प्रवास अस्पृश्योद्धाराच्या बाबतींत बराच जागृतीस कारण झाला.

आपण आंखलेल्या ध्येयानुसार काम कसें चाललें आहे हें स्वतः जातीनें पहाणें हें नारायणरावांस फार आवडे. पूर्वयोजनेनुसार कार्यस्थळीं गेल्यानें हा हेतु पूर्ण होत नाहीं हें ते जाणून होते. श्री. सोहोनी आपल्या सर्व कुटुंबासह परळ येथें जाऊन राहिले. अस्पृश्य मुलांच्या वसतिगृहाचें सर्व काम ते व त्यांची पत्नी पहात असत हा त्यांच्या कौतुकाचा विषय होऊन राहिला होता. १९१४ सालीं नोव्हेंबर महिन्यांत त्यांनीं मिशनला अचानक भेट दिली. त्यावेळीं श्री. सोहोनी आपलीं स्वतःचीं मुलें व वसतिगृहांतील मुलें ह्यांसह केळींना पाण्याच्या अळया करीत होते. चिखलानें भरलेल्या हातांनींच श्री. सोहोनी त्यांना नमस्कार करीत सामोरे गेले! हें दृश्य पाहून त्यांना फार आनंद वाटला व अशाच रीतीनें अस्पृश्यांमध्यें मिळून मिसळून काम केल्यानेंच खरें कार्य होईल असे त्यांनीं उद्गार काढले. आणखी एकदां नारायणराव असेच मिशनमध्यें गेले, त्यावेळीं श्री. सोहोनी आपल्या पत्नीसमवेत मुलांच्या जेवणाची व्यवस्था पहात होते. मिसेस सोहोनी अशा प्रकारें अंतर्व्यवस्थेंत पुढाकार घेत आहेत असें पाहून ते फार प्रसन्न झाले. त्यावेळीं नव्या कौन्सिलांमध्यें अस्पृश्यांतील एक पुढारी नेमावयाचा होता व एक अगर अनेक नांवें सुचविण्याचें काम नारायणरावांवर गव्हर्नरसाहेबांनीं सोंपविलें होतें. सोहोनींनीं अनेक नांवें सुचविलीं त्यांत मिशनमध्यें शिकून अस्पृश्यांच्या हितवर्धनासाठीं वर्तमानपत्र चालविणाऱ्या एका तरुणाचें (श्री. घोलप) ह्यांचें नांव होतें. त्यांचीच शिफारस करण्याचें

त्यांनीं ठरविलें. कारण, ते म्हणाले, श्री. घोलप ह्यांच्या हातांत वर्तमानपत्र ही एक अजब सामर्थ्याची चीज आहे. तिचा त्यांना अस्पृश्यांच्या हितासाठीं भरपूर उपयोग करितां येईल. कौन्सिलांत श्री. घोलप हेच अस्पृश्यांचे पहिले प्रतिनिधी म्हणून नेमले गेले होते.

श्री. सोहोनी परळ येथें वसतिगृहाच्या व्यवस्थेचें जें काम करीत असत त्यांत त्यांस सर्व बाबतींत त्यांच्या पत्नीचें किती सहाय्य असे, याची कल्पना नारायणरावांस जेव्हां झाली, तेव्हां त्यांस फार आनंद झाला. सौ. प्रभावती बाई मुलांच्या आजारांत आपल्या स्वतःच्या मुलांप्रमाणें बोर्डिंगांतील मुलांची व्यवस्था ठेवीत. पुष्कळ मुलें एकाच वेळीं आजारी झालीं म्हणजे तहानभूक बाजूस सारून पतिपत्नी हें देवाचें कार्य करीत असत. ह्या सर्व कार्याचा आजच्या काळांत केव्हांही उल्लेख करण्याची बुद्धि ह्या कामाची पूर्ण माहिती असणारांसही होत नाहीं ही एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

अशा प्रकारें कार्य चालत असतांनाच सर नारायण ह्यांना डिप्रेस्ड क्लासिस मिशनशीं असलेला आपला संबंध सोडणें भाग झालें. सर्व कार्यें व्यवस्थितपणें व व्यवस्थापक मंडळीच्या सल्ल्यानें व्हावींत असें त्यांचें धोरण असे. ह्या धोरणास अनुसरून कार्य होत नाहीं असें त्यांस वाटूं लागलें, म्हणून त्यांनीं संस्थेशीं असलेला संबंध सोडला व त्याबरोबरच संस्थेला उतरती कळा लागली व आज ज्यांनीं मूळ कार्यास प्रारंभ केला ते व त्यांची संस्था मागें पडली असून ह्या कार्याचें स्वरूपही अगदींच बदललें आहे व तें बदललेलें स्वरूप राजकीय आहे ह्यांत कांहीं संशय नाहीं.

प्रकरण बारावें

# इंदूरचे मुख्य प्रधान

सर नारायण ह्यांनीं इंदूर संस्थानची नोकरी पत्करली त्यावेळीं पुष्कळांस फार आश्चर्य वाटलें. कारण, १९१३ सालीं हायकोर्टांतून त्यांस सेवानिवृत्त होण्याची आवश्यकता नव्हती. तेथें त्यांस आणखी तीन वर्षें राहातां आलें असतें. दुसरी गोष्ट अशी होती कीं, एवढें वय स्वतंत्र वातावरणांत गेल्यानंतर संस्थानी वातावरण नारायणरावांसारख्या गृहस्थांस कितपत मानवेल याची कांहीं मित्रांस शंका वाटत होती. अशा स्थितींत १९१३ सालीं त्यांनीं इंदूरच्या चीफ मिनिस्टरची–प्रधान मंत्र्याची–जागा कां पत्करली याचा प्रथम खुलासा करणें इष्ट आहे.

१९१२ सालीं सर नारायण ह्यांनीं उन्हाळ्याच्या रजेला जोडून हक्काची रजा घेतली होती व ते लोणावळें येथें विश्रांति घेत होते. त्यावेळीं एके दिवशीं इंदूरच्या स्टेट कौन्सिलचे एक सभासद रा. ब. मुळे ह्यांची सर नारायण ह्यांस आपल्या भेटीस येण्याची इच्छा आहे अशी तार आली. रा. ब. मुळे व नारायणराव एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें एकाच वेळीं होते तेव्हां त्यांची जुनी ओळख होती. तथापि इतकीं वर्षें कांहीं संबंध नसतांना, एकदम तार कां यावी ह्याचा त्यांस खुलासा होईना. नंतर दोनतीन दिवसांनीं मुळेसाहेब भेटीस आले. त्यावेळीं आपल्या भेटीचा उद्देश त्यांनीं असा कळविला कीं, होळकर सरकारच्या मनांत हल्लींचे दिवाण नानकचंद साहेब ह्यांस दूर करून त्यांच्या जागीं आपली नेमणूक करावी असें फार आहे. आपल्यासंबंधानें त्यांना फार आदर आहे व समाजसुधारक ह्या नात्यानें आपण केलेल्या सेवेकडे त्यांचें नेहमीं लक्ष असतें. हें ऐकून अनेक कारणांमुळें संस्थानची नोकरी पत्करणें शक्य नाहीं असें सर नारायण ह्यांनीं त्याच वेळीं रा. ब. मुळे ह्यांना स्पष्ट सांगितलें. तरीसुद्धां सर नारायण ह्यांजपाशीं त्यांनीं जवळजवळ दोन तास ह्या विषयाचा खल चालविला होता! शेवटीं सर नारायण ह्यांनीं रा. ब. मुळे ह्यांस असें निक्षून सांगितलें कीं, पेन्शनला पात्र होईतों मला ह्या प्रश्नाचा विचारही करितां येत नाहीं. येत्या सप्टेंबरमध्यें मी

पेन्शनला पात्र होईन. "हरकत नाहीं, महाराज तोंपर्यंत सहज थांबतील!" "तें खरें! तरीसुद्धां एखाद्या संस्थानांत जेथें नेहमीं पक्ष उपपक्ष, कट व भानगडी असतात, तेथली एखादी नोकरी पत्करावयास मी तयार होईन असें कांहीं मला वाटत नाहीं."[१] रा. ब. मुळे व सर नारायण ह्यांचें असें बोलणें झाल्यावर ते गेले. नंतर १९१३ सालीं ज्यान्युआरी महिन्यांत महूचे मुन्सफ श्री. क्षीरसागर ह्यांनीं इंदूरच्या सदरकोर्टाचे एक न्यायाधीश श्री. कीर्तने ह्यांचें ता. २७ चें एक पत्र सर नारायण ह्यांच्या हवालीं केलें. ह्यांत महाराजसाहेबांची सर नारायण ह्यांनीं आपल्या संस्थानचें दिवाणपद स्वीकारावें अशी इच्छा असल्याचें कळविलें होतें. आपल्या संस्थानांत सामाजिक सुधारणा घडवून आणावयाच्या असल्यामुळें सर नारायण ह्यांस दिवाण करण्यांत ह्या कार्यीं त्यांचें साहाय्य मिळावें हा एक हेतु होता असेंही त्या पत्रांत म्हटलें होतें.[२] व महाराजसाहेबांनीं नुक्तींच राज्यसूत्रें हातीं घेतल्यामुळें सर नारायणरावांसारखाच दिवाण येथें हवा आहे असेंही त्यांत सुचविलें होतें. दुसऱ्याच[३] दिवशीं संस्थानांतल्या वातावरणांत रहाण्याची संवय नसल्यामुळें आपल्याला ह्या जागेचा स्वीकार करितां येत नाहीं असें अगदीं निःसंदिग्धपणें सर नारायण ह्यांनीं श्री. कीर्तने ह्यांस कळविलें, व येथें हें इंदूर प्रकरण संपलें असा त्यांनीं आपला समज करून घेतला. परंतु इंदूर प्रकरण येथें संपावयाचें

---

१. Even then I was not at all sure I would ever make up my mind to serve in a Native State with its life of intrigue.

२. His Highness has great personal regard and respect for you and he himself is a keen enthusiast for social reform. H. H. has full confidence in you and it is after mature reflection that H.H. has desired me to ascertain your wishes in this matter...H. H. has just entered as a ruler full of hope and promise and this is just the time when he should have the assistance and co-operation of a minister of unblemished character and tried integrity and ability and we all feel that he cannot make a happier choice than your goodself.

३. सर नारायण ह्यांनीं ता. २९ ज्यान्युआरी रोजीं श्री. कीर्तने ह्यांना उत्तर लिहिलें त्यांत ते म्हणतात :—

"It is too late for me to begin a new life and career, to which I have not been accustomed, and undertake the arduous duties of the government of a state, with its own problems, which must be new to me.

नव्हतें. ही केवळ त्याची नांदी होती असें पुढें जें घडलें त्यावरून आतां म्हणतां येतें. ह्यानंतर सुमारें १५ दिवसांनीं श्री. कीर्तने व श्री. विश्वनाथराव दळवी ह्यांनीं सर नारायण ह्यांची गांठ घेऊन सांगितलें कीं, इंदूरचे महाराज मुंबईस आले असून दिवाण होण्यासंबंधानें आपल्याला स्वतः विनंति करावी असा त्यांचा हेतु असून त्यांनीं आपणास भेटीस बोलाविलें आहे. त्यावेळीं महाराजसाहेब नेपियन सी रोडवरील गायकवाड सरकारच्या बंगल्यांत उतरले होते. सर नारायण ह्यांनीं होळकर सरकारची भेट घेतली त्यावेळची व नंतरची हकीकत त्यांनीं **स्वतः लिहून ठेविली आहे.** तिच्याच आधारानें पुढील मजकूर लिहिला आहे.

महाराजसाहेबांची गांठ पडतांच सर नारायण ह्यांनीं इंदूरची दिवाणगिरी नाकारली ह्यामुळें आपली मोठी निराशा झाली आहे असें महाराजसाहेब म्हणाले. त्यावर सर नारायण ह्यांनीं पुढील कारणांसाठीं आपण दिवाणाची जागा नाकारल्याचें सांगितलें. ( १ ) संस्थानामध्यें रहाण्याची संवय नसल्यामुळें तेथलें एकंदर जीवन अगदींच नवीन वाटेल. ( २ ) शिवाय राज्यकारभाराचा आपल्याला अनुभव नाहीं ( ३ ) इंदुरास आंतल्या भानगडी ( Intrigues ) पुष्कळ आहेत असें ऐकिवांत आहे आणि इंदूर संस्थानच्या मागच्या इतिहासाकडे पाहिलें तर आपल्यासारख्या व्यक्तीनें आपलें आयुष्य आणि कीर्ति—आणि तेंही ह्या उतार वयांत धोक्यांत घालून संस्थानची नोकरी पत्करावी हें मनास पटत नाहीं.

सर नारायण ह्यांनीं हीं कारणें दिल्यानंतर महाराजसाहेबांनीं सर नारायण ह्यांस असें आश्वासन दिलें कीं, "आपल्याला हवी आहे तशी सर्व व्यवस्था करण्यांत येईल. राज्यकारभारांतील अनुभवासंबंधानें आपल्याला कांहीं काळजी करण्याची आवश्यकता नाहीं. कारण, आम्हांला सर्व व्यवहारांत सरळपणा, पावित्र्य व प्रामाणिकपणा हवा आहे. आणि आपण आमच्या संस्थानांत यावें ह्याविषयीं आम्हांला जें एवढें अगत्य वाटत आहे तें अशासाठीं कीं, आपलें पवित्र शील, सत्याचरण व निर्भीडवृत्ति ह्याबद्दल आपली कीर्ति आहे. आणि संस्थानांतील, भानगडी, गुप्त कट, परस्पर द्वेष, ह्यासंबंधानें म्हणाल तर हे सर्व प्रकार आम्हांला हाणून पाडावयाचे आहेत. आणि ह्यासाठींच आपल्यासारखा जातिभेद न मानणारा, उदार विचारांचा व जातिजातींतील भानगडींत न पडणारा व द्वेषमूलक चळवळींचा तिरस्कार करणारा गृहस्थ दिवाणाच्या जागीं हवा आहे. समाजसुधारक ह्या नात्यानें आपल्याविषयीं आम्हांला फार आदर आहे, आणि आमच्या संस्थानांत समाजसुधारणेसंबंधाच्या पुष्कळशा गोष्टी करावयाच्या आहेत आणि त्यासाठीं आपण आमच्या येथें यावें अशी आमची फार इच्छा आहे. म्हणून आमच्या विनंतीचा आपण पुन्हां एकवार विचार करावा." "मला आपण कांहीं वेळ द्या,

मी आपल्या सूचनेचा पुन्हां विचार करीन " असें सर नारायण ह्यांनीं सांगतांच महाराजसाहेब म्हणाले, " हो हो वेळ अवश्य घ्या व विचार करा; पण अखेरीस आम्हांस अनुकूल असा निकाल द्या म्हणजे झालें ! "[१]

अखेरीस सर नारायण ह्यांनीं महाराजांचा अत्याग्रह, आपल्या संस्थानची सर्वांगीण उन्नति साधण्याची महाराजांची उत्कटेच्छा, व परमेश्वरानेंच सेवेचें नवें क्षेत्र आपल्यापुढें टेविलें आहे अशी मनाची खात्री झाल्यावर कांहीं विशेष अटी घालून महाराजांच्या इच्छेनुसार मुख्य दिवाण ह्या नात्यानें इंदूरची नोकरी पत्करावी असें त्यांस वाटूं लागलें. मात्र विचार करावयास त्यांनीं पंधरा दिवस घेतले व सौ. लेडी चंदावरकर ह्या कारवारहून परत येईपर्यंत त्यांनीं अखेरचा निकाल दिला नाहीं. कारण, पत्नीशीं विचारविनिमय केल्यावांचून कोणतेंही कार्य करावयाचें नाहीं असा त्यांचा बाणा असे.[२] शेवटीं त्यांनीं कांहीं अटींवर इंदूरची नोकरी स्वीकारण्याचें ठरविलें. त्या अटींमध्यें प्रथमतः एक अशी स्पष्ट अट होती कीं, दरबारामध्यें विशेष प्रसंगांसाठीं, ज्यावेळीं नाच होतील त्यावेळीं गैरहजर राहण्याची आपल्याला परवानगी असावी. कारण, तत्त्वतः आपण नाचाच्या विरुद्ध आहों. नाच जेथें आहे तेथें हजर रहावयाचें नाहीं असें आपलें तत्त्व असून नाचाविरुद्ध आपण भाषणें केलीं आहेत व लेख लिहिले आहेत.[३] सर नारायण ह्यांनीं ज्या अटी

---

१. स्वतः महाराजसाहेबांसंबंधानें श्री. कीर्तने ह्यांनीं पहिल्याच पत्रांत अशी ग्वाही दिली होती :—

" From my personal experience, I can assure you that you will find it a pleasure and a labour of love to work with our Maharaja Saheb, in whom, to a sweet and amiable disposition are felicitously combined, a wonderful strong and noble character and a reflective and thoughtful mind more matured than one would expect in a Ruler of his age. You may be sure that you will receive from His Highness the fullest measure of trust and confidence."

२. Before deciding I wanted to speak to my wife, who has been to Karwar. (8-2-13.)

३. I have all along been on principle opposed to *Nautch* parties. I have refused invitations to them and have both publicly and privately condemned them. At Durbars and other functions in Native States, such parties have been customary. If that is the case in Your Highness state, and if Your Highness is of opinion

घातल्या त्या सर्व महाराजांनीं मान्य केल्या. पांच वर्षें नोकरीची मुदत असावी असें नारायणरावांनीं सुचविलें होतें. ह्यावर महाराजांनीं असें कळविलें कीं, इंदूरच्या सरकारी गॅझेटांत नेमणूक पांच वर्षांची आहे असें जाहीर करण्यांत येईल; परंतु परस्परांत खासगी समजूत असावी कीं तीन वर्षें पूर्ण झालीं कीं, पुढें रहावयाचें किंवा नाहीं हें ठरविण्याची सर नारायण ह्यांस किंवा पुढें सर नारायण ह्यांची जरूरी आहे किंवा नाहीं हें ठरविण्याची महाराजसाहेबांस मुभा असावी! ह्याचा अर्थ असा कीं, दाखवावयाचे दांत निराळे व खावयाचे निराळे असा प्रकार असावा. त्यावर सर नारायण ह्यांनीं महाराजसाहेबांस स्पष्ट कळविलें कीं, जें जाहीर रीतीनें प्रसिद्ध झालें आहे त्याच्या विरुद्ध कांहीं तरी खाजगी समजूत असणें हें आपल्याला पसंत नाहीं. बाहेर निराळें व आंत निराळें ही पद्धत माझ्या नित्याच्या आचरणाविरुद्ध आहे.[१] इतक्या स्पष्टपणें सर नारायण ह्यांनीं आपली बाजू पुढें मांडल्यानंतर खासगी आणि जाहीर समजुतीची अट राहाणें शक्य नव्हतें. सर नारायण ह्यांनीं ज्या अटी घातल्या व ज्या महाराजसाहेबांनीं पूर्ण विचार करून कबूल केल्या होत्या, त्यांत एक अट अशी होती कीं, संस्थानच्या प्रत्येक बाबतींत सर नारायण ह्यांचा सल्ला घेतला जावा, आणि आपल्याशीं विचारविनिमय झाल्यावांचून महाराजांनीं कोणताही हुकूम करूं नये. ही अटही महाराजांनीं कबूल केली.[२] अखेरीस संस्थानांतील ही नोकरी पत्करण्यास आपण

---

that a long established usage cannot be abolished all at once I should have the liberty to stay away from such parties.

आपल्या तत्त्वाच्या आड महाराज साहेब येणार नाहींत. असें आश्वासन मिळाल्यानंतर सर नारायण ह्यांनीं ह्या अटीसंबंधानें आग्रह धरिला नाहीं.

१. It is not fair ......that there should be any private understanding inconsistent with and contradicting the published principles. I have conscientious scruples to such private understanding. 23-2-13

२. I made it condition that in every state matter I should be consulted by His Highness beforehand and that no order of his should be made without previous consultation with me. To that also he deliberately agreed. ही अट घातल्याचें जेव्हां चीफ जस्टिस स्कॉट ह्यांना कळलें तेव्हां ते म्हणाले कीं, आपलें सर्व स्वातंत्र्य गमावणारी ही अट महाराज कांहीं मान्य करणार नाहींत व तुम्ही हायकोर्ट सोडून जात नाहीं हें पाहून मला आनंद होत आहे. पण हा त्यांचा आनंद फार वेळ टिकला नाहीं!

कां सिद्ध होत आहों याचा खुलासा स्वतः नारायणरावांनीं श्री. कीर्तने ह्यांस ता. ११ मार्च रोजीं लिहिलेल्या पत्रांत केला आहे तो त्यांच्याच शब्दांत देतों :–

"I have agreed to serve H. H. solely as a call to duty and in response to His Highness's *earnest* wish expressed by him personally to me during our interview and conveyed through you and others that I should take up the office of His Highness's Chief Minister. To maintain the dignity and credit of His Highness, to serve him loyally and regard his interests and the interests of his state, both material and moral, as mine, to seek for no personal benefit but to do my best in my office for the good of His Highness's subjects and the greatness of his government—these are my ideals and my aspirations; and I have faith in God which tells me that if I go straight and live, both privately and officially, a righteous life I shall succeed. My sole ambition is to have it said by one and all in India and England that *His Highness* is a *model ruler*—one who looks *on methodical lines and principles of rectitude for the* welfare of his subjects.

तेथें गेल्यानंतरच्या धोरणासंबंधानेंही त्यांनीं खुलासा केला आहे तो असा कीं सुधारणा पुष्कळ व अनेक बाबतींत करावयाच्या आहेत, पण त्या तडकाफडकी न करितां पूर्ण विचार करून हातीं घेतल्या पाहिजेत. प्रथमतः प्रजेशीं प्रत्यक्ष संबंध आणणें, रोज त्यांच्याशीं तास दोन तास सहवास करून त्यांचें काय म्हणणें आहे, अगर त्यांच्या काय तक्रारी आहेत त्या ऐकून घेणें हें मला केलें पाहिजे. लोकांशीं प्रत्यक्ष संबंध आला म्हणजे, प्रजा व राजा ह्यांचा किती निकट संबंध आहे हें लोकांच्या ध्यानांत येईल. लोकांना अशानें कळून चुकेल कीं, महाराज सरकार स्वतः सर्व व्यवहारांत जातीनें लक्ष घालीत आहेत. प्रथमतः मुख्य दिवाणानें लोकांचीं गाऱ्हाणीं ऐकावीं व नंतर तीं आपल्या कानावर घालावीं अशी महाराज साहेबांची इच्छा आहे व अशा रीतीनें महाराजांचा व प्रजेचा संबंध येत असतो हें प्रजेच्या अनुभवास आणून दिलें पाहिजे.[१]

---

१. My first aim will be to bring His Highness's administration *in touch* with His Highness's people and to make it clear that His Highness takes personal interest in their welfare and expects his chief Minister to hear their grievances and bring them to His Highness's notice.

वरील सर्व हकीकतीवरून असें दिसून येईल कीं, महाराजांचे कित्येक अधिकारी व स्वतः महाराज ह्यांनीं अतिशय आग्रह केला म्हणून इंदूर संस्थानची सुधारणा करण्याच्या हेतूनें सर नारायण ह्यांनीं संस्थानची नोकरी पत्करली. महाराज साहेबांनीं आग्रह केला नसता व सर्व अटी कबूल केल्या नसत्या तर सर नारायण इंदुरास गेले नसते. नेमणुकीस हिंदुस्थान सरकारची मान्यता व सर्व अटींस महाराजांची अनुमति आल्यानंतर सर नारायण ह्यांनीं ता. २ एप्रिल रोजीं मुंबई सोडली व ता. ४ रोजीं ते आपल्या नव्या जागेवर रुजू झाले. त्यावेळीं महाराज साहेबांनीं दरबार भरवून सर्वांस त्यांची ओळख करून दिली, त्यांची योग्यता किती थोर आहे तें सांगितलें व त्यांचा आपल्याला लाभ झाला हें इंदूर संस्थानचें थोर भाग्य होय असें त्यांनीं बोलून दाखविलें.

## इंदूर येथील काम

कोणतेंही काम अंगावर घेण्यापूर्वी पूर्ण विचार करावयाचा व एकदां तें घेतलें म्हणजे मग तें मनापासून करावयाचें, स्वतःच्या सोयी व गैरसोयी ह्यांचा विचार करावयाचा नाहीं, असा नारायणरावांचा बाणा असे व त्यास अनुसरून ते इंदुरास गेल्यावर कामास लागले. संस्थानांतील नोकरी हें अळवावरचें पाणी आहे, याची जागृति त्यांस नेहमीं असे. परंतु जोंपर्यंत प्रामाणिकपणें, कर्तव्यनिष्ठेनें, परमेश्वराचें कार्य म्हणून आपण कार्य करीत आहों, तोंपर्यंत आपणास भिण्याचें कारण नाहीं, ह्या विश्वासानें प्रेरित होऊन ते कार्यप्रवृत्त झाले. प्रथमतः त्यांनीं संस्थानची सर्व माहिती जातीनें करून घेतली. त्यांचें दुसरें एक तत्त्व असें होतें कीं, प्रजेचा व आपला प्रत्यक्ष संबंध आला पाहिजे. लोकस्थिति काय आहे, लोक कसे आहेत, त्यांच्या अडचणी काय आहेत, त्याचें मुख्य दिवाणाला प्रत्यक्ष ज्ञान असलें पाहिजे. त्यालाच जर प्रत्यक्ष ज्ञान नसेल, त्याचा व प्रजेचा प्रत्यक्ष कांहीं संबंध येत नसेल, तर तो महाराजाला काय सांगणार? नारायणरावांस जें कांहीं वाटेल, जो कांहीं अनुभव येईल, स्वतः महाराजांचें कोठें चुकत असलें, तर तें स्पष्टपणें नारायणरावांनीं महाराजांस सांगावें व नारायणरावांच्या धोरणांत जर कांहीं चुकत असलें, तर तें महाराजांनीं नारायणरावांस सांगावें असें धोरण त्यांचें परस्परांसंबंधानें ठरलें होतें. पण, ह्या धोरणानुसार वागण्यास मिळावें म्हणून नारायणरावांनीं प्रथम अनेक बाबतींत बिनचूक माहिती मिळविणें अवश्य होतें. मुंबईहून महाराजसरकारनीं कारभारीसाहेब आणले आहेत, पण गाड्यांतून आणि मोटारीमधून दौडतांनाच त्यांची जी दृष्टिओळख होईल तेवढीच असें जर होऊं लागलें, तर काय कामाचें! म्हणून नारायणरावांनीं रोज सकाळीं शहरांत

फिरावयाचें असा निश्चय केला, आणि हें आपल्या अधिकाराचें प्रदर्शन करण्यासाठीं नव्हतें हें येथें सांगावयास पाहिजे असें नाहीं. प्रजेची व आपली ओळख व्हावी, त्यांचीं कांहीं गाऱ्हाणीं असलीं तर तीं आपल्याला कळावीं, ज्यांचें निवारण ताबडतोब झालें पाहिजे अशा कांहीं अडचणी असल्या तर त्यांचें निराकरण ताबडतोब व्हावें, शहरामध्यें घाणेरडे भाग कोणते आहेत, स्वच्छता किती राखली जात आहे तें जातीनें कळावें म्हणून रोज सकाळीं शहरांतील निरनिराळ्या भागांत जाऊन तेथील स्थिति ते पाहूं लागले व गरीब श्रीमंत अशा सर्व लोकांशीं संभाषणें करून त्यांच्या अडचणींची ते स्वतः कल्पना करून घेऊं लागले.[1] दिवसा जें कांहीं कळविण्यासारखें असेल तें महाराजांस कळविण्याचा त्यांचा क्रम असे. ब्रिटिश अधिकाऱ्यांशीं झालेलीं संभाषणें, आपले विचार, संस्थानासंबंधाचें धोरण सर्व कांहीं ते महाराजांस कळवीत व त्यायोगें काय चाललें आहे त्याची कल्पना महाराजांस होत असे. सर नारायण इंदुरास गेल्यावर चार दिवसांनीं म्हणजे ता. ८ एप्रिल रोजीं महाराजसाहेबांनीं प्रकृतीच्या स्वास्थ्यासाठीं इंदूर सोडलें व ते विलायतेस गेले. विलायतेंत असतांना येथील सर्व हकीकत सर नारायण महाराजसाहेबांस कळवीत असत व महाराजसाहेब तेथून आपले प्रधान मंत्री सर नारायण यांस वारंवार **स्वतः पत्रें लिहीत असत.** ता. १३ जूनला लिहिलेल्या पत्रांत महाराजसाहेब म्हणतात :—

I am glad you find time to go out every morning to look to the health and sanitation of the city and try to hear complaints of the people personally which is very sound and most desirable as personal contact with the people not only helps business but gives an idea of the real state of affairs and what is exacty wanted. It has rightly, I believe, already made you popular among my people and this popularity must result in gaining their confidence and their welfare. Allow me to thank you for this which was so much needed. I am also glad you pay surprise visits to the different departments which must tend to maintain their efficiency.

अशा प्रकारें शहरांत गेल्यावर लोकांच्या अडचणी त्यांस कळल्या म्हणजे त्यांचें

---

१. Every morning for one hour I went round the city, visiting the slums, noticing the sanitary conditions, talking to the people ascertaining their wants and wishes and noting their grievances and visiting schools.

निवारण करण्याचा नारायणराव ताबडतोब प्रयत्न करीत असत. एकदां ते गरीब विणकर लोकांच्या वस्तींत गेले. तेथें आपल्या स्वतःच्या घरांच्या ओट्यावर माग ठेवून विणकर आपलें विणण्याचें काम करीत. सर नारायण यांना असें आढळून आलें कीं, म्युनिसिपालिटीनें विणकरांच्या घरांचे ओटेच रस्त्यांत सामील करून घेतले व त्यांच्या पोटावर पाय आणिले! पुढें सर नारायण ह्यांनीं त्या गरीब विणकरांस जें हवें होतें तें केलें. अशा प्रकारें त्यांच्या चाललेल्या कामाच्या बातम्या स्वतंत्रपणेंही महाराजसाहेबांच्या कानावर जात, व त्यावेळीं एका पत्रांत त्यांनीं लिहिलें कीं, "It is a matter of great pleasure, satisfaction and relief to me to see you so successfully doing your work." व दुसऱ्या एका पत्रांत महाराजसाहेब म्हणतात "I only add one word, and that is that I consider your presence here as God sent and I already see the proof of it."

शिक्षण, शेतकी, आरोग्य वगैरे सर्व खात्यांत नारायणरावांनीं सुचविलेल्या सुधारणांस महाराजांकडून पूर्ण पाठिंबा मिळत गेला व खासगी बाबतींत त्यांच्या धोरणी व विवेकयुक्त वर्तनानें महाराजांचें हित त्यांनीं साधलें. एकदां एका रत्नहाराच्या[1] बाबतींत संस्थानाचें साडेपांच लाखांचें नुकसान होणार होतें व सर नारायण ह्यांच्या खटप-

१. ह्या रत्नहारासंबंधानें खरा प्रकार असा आढळून आला कीं, रत्नहार जरी मौल्यवान होता तरी सर्व व्यवहार संशयास्पद होता. रत्नहाराची किंमत नऊ लाख ठरली होती. पैकीं १॥ लाख व्यापाऱ्याला मिळाले होते. ही किंमत जबर असल्याचें नारायणरावांस दिसून आलें. ३॥ लाख किंमत पटत नसली तर १॥ लाख परत करावे व रत्नहार परत द्यावा असें सुचविण्यांत आलें. शोधाअंतीं नारायणरावांस असें आढळून आलें कीं, व्यापारी व महाराजांचे एक अधिकारी ह्यांचें नातें आहे व ज्याच्या सल्ल्यावर महाराज अवलंबून होते त्याचें व अधिकाऱ्याचें नातें होतें! शिवाय व्यापाऱ्याच्या मुलानें महाराजांस एक छानदार घोडा बक्षीस दिला होता व सर नारायण ह्यांचे कलकत्ता येथील एक मित्र व राजकारणांत प्रमुखत्वानें भाग घेणारे गृहस्थ मध्यस्थ घालून ९ लक्ष रुपये मिळविण्याचा प्रयत्न चालू होता !

सर नारायण यांच्या दक्षतेसंबंधानें आणखी एक उदाहरण येथें देण्यासारखें आहे. त्यांना असें आढळून आलें कीं, संस्थानाचे ७८ लक्ष रुपये बँकेंत अत्यल्प व्याजानें पडून आहेत! सर नारायण ह्यांनीं त्यांपैकीं ६० लक्षांच्या सिक्यूरिटीस घेण्यास महाराजांची संमति मिळविली. याप्रमाणें सर नारायणरावांनीं इंदूर संस्थानचें आर्थिक हित साधलें हें उघड आहे.

टीनें महाराजांस इष्ट अशी व्यवस्था झाली म्हणून दार्जिलिंगहून महाराजांनीं तारेनें कळविलें कीं, It was solely due to your efforts in the interest of the state which I have much appreciated that the state has had success in the necklace affair for which I sincerely thank you.

सहा महिने महाराजसाहेब विलायतेस होते. सर नारायण हे कामावर रुजू झाल्यानंतर चार दिवसांनीं महाराजांनीं इंदूर सोडलें व पुढले सहा महिने संस्थानाचीं सर्व सूत्रें नारायणराव हालवीत होते. ह्या सहा महिन्यांतल्या त्यांच्या कारभाराचें साधारण स्वरूप असें होतें :

(१) जातीनें जेव्हां ते माहिती मिळवूं लागले तेव्हां त्यांच्या हें लक्षांत येऊन चुकलें कीं, निरनिराळ्या कचेऱ्यांत शिस्तीचा पूर्ण अभाव आहे. एकंदर काम चालढकल करून होत असे. अधिकारी वेळेवर येत नसत. नारायणरावांनीं सर्व बेशिस्त मोडली. शिस्त लावून दिली. सर्वांनीं वेळेवर कचेरींत आलेंच पाहिजे असा दंडक घालून दिला.

(२) सर नारायण रोज सकाळीं शहरांत फिरून घाणेरड्या वस्तींतील घरें पहात, अस्वच्छता कोठें आहे तें ध्यानांत घेत, लोकांशीं भाषण करून त्यांच्या अडचणी तक्रारी ह्यासंबंधानें विचारपूस करीत व त्या टिपून घेऊन चौकशी करीत. सकाळीं शाळांसही ते भेट देत.

(३) लोकांचे जे अर्ज येत असत त्यांचा विचार करण्यासाठीं रोज एक तास स्वतंत्र ठेविला होता.

(४) सर्व कचेऱ्यांत शिफारसी व हम करे सो कायदा ह्यांचें बंड आढळून आलें होतें. सरक्युलरें वगैरे काढून हे प्रकार बंद केले.

(५) व्यापाराच्या दृष्टीनें इंदूरचें महत्त्व कमी नव्हतें. व्यापार व उद्योगधंद्यांची वाढ होणें शक्य होतें. परंतु व्यापारीवर्गाकडे अधिकाऱ्यांचें लक्ष नव्हतें. एवढेंच नव्हे तर अधिकाऱ्यांची त्यांच्याकडे पहाण्याची दृष्टि तिरस्काराची असे व स्वतः व्यापाऱ्यांमध्यें ही जाणीव उत्पन्न झाली होती असें नारायणरावांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. म्हणून नारायणरावांनीं प्रथम त्यांच्या ओळखी करून घेतल्या, त्यांच्याशीं निकट संबंध ठेविला, वारंवार त्यांना बोलावून, लहानलहान सभा भरवून, त्यांच्या अडचणी काय आहेत, त्यांचे विचार काय आहेत त्याची माहिती मिळविली. सारांश, सर्व लोकांची, कचेऱ्यांची, सर्व खात्यांची, प्रत्यक्ष माहिती मिळवून त्यांनीं सुयंत्रितपणें सर्व कारभार महाराजांच्या गैरहजेरींत चालविला. विलायतेंत असतांनाच हें महाराजांस आढळून आलें व परत आल्यावर त्यांनीं तसें बोलूनही दाखविलें.

## महाराजांचें प्रत्यागमन.

महाराजसाहेब संस्थानामध्यें येण्यापूर्वी विलायतेहून परत आल्यावर दोन दिवस मुंबईस राहिले व नंतर ते ता. २० आक्टोबर १९१३ रोजीं इंदुरास परत गेले. त्यावेळीं संस्थानच्या सर्व प्रजाजनांस आपले महाराज सुखरूप परत आले म्हणून अत्यानंद झाला व महाराजांचें सर्वांनीं मोठ्या उत्साहानें स्वागत केलें. त्यावेळचा लोकांचा उत्साह इतका अपूर्व होता कीं, खुद्द महाराजसाहेबांनाही अशा प्रकारें आपलें उत्साहपूर्ण स्वागत आजपर्यंत झालें नव्हतें असें वाटलें व तसें त्यांनीं बोलूनही दाखविलें. शहरांतून जातांना त्यांनीं सर नारायण ह्यांस आपल्याजवळ बसविलें व लोकांचा दांडगा उत्साह, आनंद व समाधान पाहून म्हटलें कीं, तुम्ही राज्यकारभार यशस्वी रीतीनें चालविला ह्याचें हें दर्शक आहे. ह्यावरून लोक किती संतुष्ट स्थितींत आहेत तेंही दिसून येतें.[१] अशाप्रकारें महाराजसाहेब येतांक्षणींच मुख्य दिवाणसाहेबांच्या कार्याची प्रशंसा एकच वेळ झाली असें नव्हे. नारायणरावांच्या सर्व कार्यांतील दक्षतेचा व कारभाराचा महाराजसाहेबांच्या मनावर इतका अनुकूल परिणाम झाला होता कीं, ज्या ज्या वेळीं संधी येई त्या त्या वेळीं ते त्यांजपाशीं व इतरांशीं बोलत व माझा तुमच्यावर सर्व विश्वास आहे, व तुम्ही सर्व कांहीं संस्थानच्या हितासाठींच करतां व कराल अशी माझी खात्री आहे असें ते म्हणत. ह्याचें प्रत्यंतर नारायणरावांस ता. १५ नोव्हेंबर रोजीं आणखी एकदां आलें. इंदुरास एक्साइझ् मेंबर व चीफ जस्टिसच्या जागा भरावयाच्या होत्या. महाराजांच्या भोंवतीं असणारीं माणसें आपापलीं घोडीं पुढें ढकलण्याचा प्रयत्न करीत होतीं. प्रत्येकाला वाटत असावें कीं, महाराजांवर आपलें वजन आहे, तेव्हां ते आपल्या म्हणण्याप्रमाणें करणार. पण महाराज सर्वांना ओळखून होते ! आपापला हेतु साधण्यासाठीं हा सल्ला[२] असतो असें त्यांनीं सांगितलें व योग्य माणसांची निवड नारायणरावांनींच करावी असें त्यांनीं सुचविलें. त्याचवेळीं ते म्हणाले, "तुमचा यशस्वी कारभार पाहून मला फार समाधान वाटतें. केव्हांही माझी प्रजा इतकी सुखी व समाधानी मीं पाहिली नव्हती. माझ्या

---

१. I had never had such a reception before; it was due to your successful administration and it showed the contentment of the people.

२. Whoever offered any advice was. H. H. had found by experience, actuated by some motive of his own.

—*Extract from Diary*

आजोबांच्या वेळीं प्रजा फार सुखी, आनंदी व संतृप्त असे असें मी ऐकतों. परंतु अशाप्रकारें प्रजा सुखी व आनंदी असल्याचें अनुभवपूर्वक पहाण्याची संधि ह्यापूर्वी मला आली नव्हती."[१] संस्थानचें हित प्रथम पहावयाचें, मग बाहेरच्या संस्थांस देणग्या द्यावयाच्या असें धोरण सर नारायणरावांनीं ठेविलें होतें. एके दिवशीं नारायणरावांस महाराजांनीं कळविलें कीं, माझ्या मनांतून आर्यन् ब्रदरहुड संस्थेला पांच हजार रुपयांची व दुसऱ्या एका मराठ्यांसंबंधाच्या संस्थेस रु. एक हजार अशा देणग्या देण्याचा विचार आहे. ह्यासंबंधानें आपल्याला काय वाटतें तें कळवावें. आतां वास्तविक पहातां स्वतः सर नारायण आर्यन् ब्रदरहुडचे अध्यक्ष असल्यामुळें, महाराजांची ही योजना ऐकून त्यांस समाधान वाटावें व जातिभेदाविरुद्ध उघडपणें बंड पुकारणाऱ्या संस्थेस महाराज मदत करीत आहेत हें पाहून त्यांनीं महाराजांना प्रोत्साहन द्यावें; पण त्यांनीं तसें कांहीं केलें नाहीं. संस्थानचा पैसा जेवढा संस्थानच्या हिताकारणें लागेल तेवढा प्रथम लावला पाहिजे असा सल्ला त्यांनीं महाराजांस दिला. तसेंच एकदां संस्थानांतील एका धनिकाचे वाडे, शेतें, बंगले वगैरे गहाण ठेवून त्यास कांहीं लाख रुपये द्यावेत असा प्रश्न एका मोठ्या सरदार अधिकाऱ्यानें महाराजांपुढें आणिला असतां, सर नारायणांनीं महाराजांस स्पष्ट सल्ला दिला कीं, लोकांच्या पैशावर सावकारी करणें हा **संस्थानचा पेशा नव्हे.**

## महाराजांचें दुसरें लग्न.

अशाप्रकारें सर्व कारभार सुरळीतपणें चालला असतांना महाराजांच्या दुसऱ्या विवाहाचा प्रश्न पुन्हा एकदां जोरानें पुढें आला! सर नारायण ह्यांनीं प्रधानमंत्रीपद स्वीकारण्यापूर्वी वास्तविक पहातां महाराजांच्या द्वितीय विवाहाचा प्रश्न निकालांत निघाला होता. आतां तो प्रश्न पुन्हा पुढें येणार नाहीं असें आश्वासन मिळाल्यानंतर सर नारायण ह्यांनीं इंदुरास येण्याचें कबूल केलें होतें. त्यावेळीं लॉर्ड हार्डिंग व्हाइसरॉय होते व त्यांनीं महाराजांनीं हा द्वितीय विवाहाचा विचार सोडून द्यावा असा सल्ला महाराजांस दिला होता. त्याच्या जोरावर सर नारायण

---

१. I am very much gratified at the success of your administration. Never before had I seen my people so contented and happy. I have heard about the people being contented and happy during my grandfather's rule but till now I had no opportunity of witnessing and realising the happiness and contentment of my people.

त्यांस आश्वासन देण्यांत आलें होतें. परंतु विलायतेहून निघण्यापूर्वीच महाराजांनीं व्हाइसरॉयसाहेबांस एक भलेंभक्कम पत्र पाठवून हा विवाह झाल्यावांचून आपल्याला सुख लाभणार नाहीं, तेव्हां स्वतःच्या व संस्थानच्या हिताच्या दृष्टीनें विवाहास व्हाइसरॉयांनीं हरकत घेऊं नये अशी याचना केली होती व विलायतेहूनच ह्या मोठ्या पत्राची एक प्रत नारायणरावांस पाठविली होती! हें पत्र वाचून एक मोठें संकटच आपल्यावर येत आहे असें नारायणरावांस वाटलें.[१] एक पत्नी हयात असतां दुसऱ्या विवाहाच्या विरुद्ध सर नारायण आहेत, ह्याची जागृति महाराजांच्या ठिकाणीं असल्यामुळें ह्या विवाहाच्या कायदेशीरपणासंबंधानें नारायणरावांचें मत महाराजांनीं प्रथम विचारलेंच नाहीं! त्यांनीं १९१२ सालींच मुंबईच्या ॲडव्होकेट जनरलचा कायदेशीर सल्ला घेऊन ठेवला होता. तो अनुकूल असा मिळाला होता. त्याच्या जोरावर रेसिडेंटसाहेबांस मध्यस्थी घालून ह्या विवाहासंबंधानें सर नारायण ह्यांचें धोरण काय असेल याची विचारणा सुरू झाली! व्हाइसरॉयसाहेबांनीं महाराजांना मित्रत्वाच्या नात्यानें पूर्वीच कळविलें होतें कीं, माझें पूर्वीचेंच मत अद्याप कायम आहे. तुमच्या विवाहाच्या आड मी येऊं शकत नाहीं; परंतु ह्या लग्नापासून होणाऱ्या मुलांना संस्थानांतून वारसा हक्क मिळावयाचा नाहीं एवढें मात्र खरें.[२] नारायणरावांनीं मेजर हॅमिल्टन ह्यांच्यातर्फे द्वितीय विवाहासंबंधानें असें कळविलें कीं, एक पत्नी जिवंत असतांना दुसरा विवाह करणें हें माझ्या तत्त्वाविरुद्ध असल्यामुळें महाराजांच्या ह्या दुसऱ्या विवाहाच्या मी विरुद्धच आहें. द्वितीय विवाहाचा विचार महाराजांनीं सोडून दिला असें मला कळविलें म्हणून मी आलों. महाराजांचें दुसरें लग्न हा त्यांचा खाजगी प्रश्न असल्यामुळें ह्यांत माझ्या कारभाराचा कांहीं प्रश्न येतच नाहीं; आणि वेळ आलीच तर ह्या विवाहासंबंधानें माझें मत व वर्तन जाहीर करण्याची मला मोकळीक असली तरच मी माझा राजीनामा न देणें शक्य आहे. ह्या अटी महाराजांनीं मान्य केल्या व नारायणरावांस लग्नासंबंधानें कायदेशीर मत विचारलें.

---

१. This letter was like a bolt from the blue to me, considering that one of the grounds on which H. H. had specially induced me to accept service under him was that he was anxious to promote social reform in his state.

२. तसेंच ह्या बाबतींत आपले मित्र ग्वाल्हेरचे व बिकानेरचे महाराज यांचा व त्याचप्रमाणें ज्या 'थोर मनाच्या मुत्सद्यांना' (the high minded statesman) आपण संस्थानांत आणिलें आहे त्यांचा सल्ला घेण्याची सूचना व्हाइसरॉय साहेबांनीं केली होती.

नारायणरावांनीं योजिलेला विवाह कायदेशीर होईल असें ॲडव्होकेट जनरल प्रमाणेंच आपलें मत दिलें.[1] असो. नारायणरावांनीं मुख्य दिवाण ह्या नात्यानें ह्या विवाहासंबंधानें जें कांहीं करणें अवश्य होतें तें सर्व केलें व विवाहांत कोणत्याही रीतीनें भाग घ्यावयाचा नसल्यामुळें महाराजांच्या स्पष्ट परवानगीनें ते विवाहाच्या दिवसांत मुंबईस निघून आले.

विवाह ता. ८ डिसेंबर १९१३ रोजीं झाला व सर नारायण हे त्यापूर्वीच मुंबईस येऊन ता. ७ रोजींची उपासना त्यांनीं मुंबईत प्रार्थनामंदिरांत चालविली. ह्या विवाहासंबंधानें "खरा प्रकार" ह्या सदराखालीं **सुबोधपत्रिके**च्या ता. १४ डिसेंबर १९१३ च्या अंकांत पुढील मजकूर आला आहे:—

"ह्या विवाहप्रकरणांत खरा प्रकार लोकांस कळणें अगत्याचें आहे. महाराजांनीं द्वितीय विवाह करण्याचा आपला विचार रद्द केला असें समजून व महाराजांकडून फार आग्रह झाल्यामुळें सर नारायण ह्यांनीं दिवाणगिरी पत्करली. पण, विलायतेंत असतांना महाराजांनीं हा विवाह करण्याचें ठरविलें. आपल्याला हा विचार पसंत नाहीं, व आपण दुसऱ्या राणीसाहेब आणणार असें माहीत असतें, तर दिवाण होण्याचें कबूल केलें नसतें व इतउप्पर दिवाण राहून ह्या विवाहास संमति आहे असें लोकांस भासविण्यापेक्षां आपली रजा घेणें मला इष्ट वाटतें असें सर नारायण ह्यांनीं महाराजसाहेबांस स्पष्टपणें विदित केलें; पण महाराजांच्या अत्याग्रहावरून सर नारायण ह्यांनीं दिवाण राहाण्याचें कबूल केलें. आपला व ह्या विवाहाचा कांहीं संबंध नाहीं, आपल्या अनुमतीनें हा विवाह जुळून आलेला नाहीं व ह्या विवाहाच्या योगें आपल्या कामांत कोणत्याही रीतीनें अडथळा येणार नाहीं असें आश्वासन घेऊन महाराजांनीं सर नारायण ह्यांस ठेवून घेतलें आहे."

## पुढला प्रकार.

एकीकडे सर नारायण यांचा कारभार पूर्ण यशस्वी रीतीनें चालला होता. लोकांमध्यें आपली कर्तव्यदक्षता, प्रजेच्या हितरक्षणसंबंधाची आस्था, सर्व स्थितींतील लोकांशीं त्यांचें मिळूनमिसळून वागणें, महाराजांचा त्यांच्यावरील वाढता विश्वास, मधूनमधून बेकनच्या निबंधासारखा ग्रंथ महाराजसाहेबांनीं नारायणरावांकडून सम-

१. I can see no objection in point of law to the marriage, provided that in the caste to which Your Highness belongs there is a well established custom to intermarry Shudras, whether legitimate or illegitimate, of other shudra castes or persons of no caste at all.

जून घेणें, संस्थानचें व महाराजांचें हित सर्व कार्यांत पाहाणें, संस्थानांत अनेक सुधारणांचा उपक्रम करणें, व संस्थानचा दर्जा सर्व बाजूंनीं वाढविणें एवढ्याच हेतूनें नारायणराव जिवापाड श्रम घेत होते ह्याविषयीं महाराजांची अधिकाधिक खात्री होत होती; आणि दुसरीकडे नारायणरावांचें वजन वाढत आहे असें पाहून कित्येकांच्या पोटांत दुखूं लागलें होतें! हा पोटदुखीचा आजार १९१४ च्या ज्यान्युआरी महिन्यापासून नारायणरावांच्या ध्यानांत येऊन चुकला होता! एका अधिकाऱ्यानें त्यांना स्पष्टपणें बजाविलें होतें :—

"The Maharaja has not good advisers around him. The influence of...is not good. You, Sir Narayan, have not a bed of roses and I am sure there are and will be backbiters who will try to undermine your influence."

जवळचीं माणसें आपापले हेतू साधून घेण्यासाठीं व आपलें महत्त्व वाढविण्याच्या हेतूनें वरून साध्या दिसणाऱ्या गोष्टी दिवाणसाहेबांच्या विचारावांचून परस्पर ठरवूं लागलीं! ज्यान्युआरी महिन्यांत महाराजसाहेबांनीं फिरतीवर जावयाचें ठरविलें व त्याचा कार्यक्रम मुख्य दिवाणांच्या सल्ल्यावांचून ठरवून टाकला व मागाहून त्याची प्रत त्यांच्यापुढें ठेविली! सर नारायण ह्यांनीं महाराजांस झाला प्रकार हा गैर झाला, संस्थानच्या इभ्रतीच्या व एकंदर व्यवस्थेच्या दृष्टीनें ही पद्धत गैर आहे हें दाखवून दिल्यावर तें महाराजांस पटलें व ह्यापुढें असें मी होऊं देणार नाहीं असें महाराजांनीं आश्वासन दिलें. आपल्या भोंवतालचें वातावरण दिवसेंदिवस अधिकाधिक कलुषित होत आहे असा अनुभव घेत घेत नारायणराव आपली जबाबदारी पूर्णपणें ओळखून आपलें कर्तव्य करीत होते. इतक्यांत ऑगस्ट महिन्याच्या पहिल्याच आठवड्यांत महाराजसाहेब तापानें आजारी पडले! प्रथम दुखणें विशेष नाहीं असें वाटलें. डॉ. तांबे औषधोपचार करीत होते. परंतु ताप हटेना, वाढतच चालला असें पाहून महाराजांच्या इच्छेवरून मुंबईचे डॉ. राव ह्यांस बोलावण्यांत आलें. रेसिडेंटसाहेबांनीं मेजर स्मिथ ह्यांची देखरेख ठेविली व डॉ. स्मिथ ह्यांनीं रात्रीं व दिवसासाठीं दोन युरोपिअन नर्सिस आणून ठेविल्या. ह्या वेळीं दिवाणसाहेबांसही महाराजांस भेटतां येत नसे. त्यामुळें महाराजांच्या आज्ञेवांचून न होणारीं कामें तुंबून राहिलीं होतीं. रेसिडेंट साहेबांनीं **तीन वेळां** नारायणरावांस सुचविलें कीं, महाराजांच्या अशा स्थितींत महत्त्वाच्या कामासंबंधानें व्यवस्था होणें अगत्याचें आहे. पण प्रत्येक वेळीं महाराजांची भेट घेणें इष्ट नाहीं असें डॉक्टरांचें मत पडे व त्यामुळें अवश्य अशी व्यवस्था सर नारायण ह्यांस करतां आली नाहीं. इतक्यांत रात्रपाळीवरची नर्स

महाराजांस पसंत नाहीं, म्हणून महाराणी साहेबांच्या आजारांतील नर्स आणावी असें दिवाणसाहेबांस सुचविण्यांत आलें. परंतु मेजर स्मिथ ह्यांनीं ही नर्स आणिलेली असल्यामुळें त्यांच्या संमतीवांचून नर्स बदलणें रेसिडेंट ह्यांना व डॉक्टर राव ह्यांसही इष्ट वाटलें नाहीं. शिवाय जी नर्स रात्रपाळीसाठीं हवी होती तिच्या-विरुद्ध रेसिडेंट व डॉ. स्मिथ ह्यांचें मत होतें. तथापि महाराजसाहेबांच्या स्वास्थ्यासाठीं आपल्या सर्व हरकती बाजूस सारून त्या बाईला आणून ठेवण्यास डॉ. स्मिथ ह्यांनीं मोठ्या नाखुशीनें संमति दिली. महाराजांचा ताप उतरला असें पाहून व कांहीं दिवस उतारचढ होईल असें सांगून डॉ. राव मुंबईस परत आले. ह्या सर्व दिवसांत नारायणराव व रेसिडेंट ह्यांस महाराजांचें प्रत्यक्ष दर्शन घडण्याचा व महाराजांशीं दोन शब्द बोलण्याचा योग जुळून आला नाहीं. प्रत्येक वेळीं भेट होण्याच्या परिस्थितींत महाराजसाहेब येतांच पहिल्या प्रथम आपल्याला कळविण्यांत येईल असें सांगण्यांत येत असे! त्यामुळें प्रधानमंत्री व रेसिडेंट ह्यांची कुचंबणा झाली व महाराज चांगले बरे होऊन आपणास केव्हां बोलावतात याची वाट पहात बसणें सर नारायण ह्यांस प्राप्त झालें. ही गोष्ट ता. २० ऑगस्ट रोजीं संध्याकाळीं ७॥ वाजतां घडली व ह्यावेळीं डॉक्टरांनीं महाराज सरकारी कामकाज थोडें तरी पाहूं शकतील असें वाटतांच तुम्हांला तसें प्रथम कळवूं असें सांगतांना पुढील उद्गार काढल्याचा उल्लेख डायरींत सांपडतो:—

"Certainly, we will do that the moment H. H.'s condition improves to that effect."

ह्यानंतर ता. २१ रोजीं कांहींही विशेष उघडपणें घडल्याचें आढळत नाहीं. परंतु ता. २२ रोजीं सर नारायणरावांस संध्याकाळीं ४ वाजतां महाराजांचे सेक्रेटरी रायबहादूर बापना ह्यांचें पत्र आलें कीं, ५ वाजतां महाराजांनीं आपली भेट व्हावी अशी इच्छा प्रदर्शित केली आहे. ता. २० रोजीं महाराजांस भेटण्यासारखी स्थिति नसतां एका दिवसांत आपल्याला बोलावणें पाठविण्याइतकी ती सुधारली असें पाहून सर नारायण ह्यांस समाधान वाटलें असावें. ज्यावेळीं हें पत्र आलें त्यावेळीं रा. ब. भागवतही तेथें बसलेले होते. ते म्हणाले मलाही असेंच पत्र आलें आहे! म्हणून दोघेही बरोबरच राजवाड्याकडे गेले. तेथें खालच्या मजल्यावर स्टेट कौन्सिलचे कांहीं सभासद बसलेले होते. सर्व मंडळी पांच वाजतां महाराजसाहेब जेथें पडून होते तेथें गेली व उजव्या बाजूवरील खुर्च्यांवर बसली. डाव्या बाजूंच्या खुर्च्यांवर दोन्ही महाराण्या बसल्या. त्यानंतर महाराजसाहेब सर नारायण ह्यांस म्हणाले कीं, मी चांगला बरा होईपर्यंत मला संस्थानचीं कामें पहातां येणार नाहींत. म्हणून माझे सर्व अधिकार सीनियर राणीसाहेबांकडे सोंपवून त्यांना सहाय्य

करण्यास एक कौन्सिल नेमण्याचें ठरविलें आहे. असें म्हणून नारायणरावांच्या हातांत त्यांनीं एक पाकीट दिलें. आंतील मजकूर नारायणरावांनीं वाचला व जवळ जे दुसरे अधिकारी बसले होते त्यांच्या हातांत हुकूम दिला. तोंच एका निकटवर्ती अधिकाऱ्यानें[1] "पुरे आतां, खालीं जा आणि वाचा" असें प्रथम मराठींत नंतर Don't read it here, go downstairs and read it असें इंग्रजींत म्हटलें. त्याबरोबर सर्व मंडळी तेथून उठली व खालीं आली. तेथें सर्वांनीं हुकूम वाचल्यावर तो दिवाणसाहेबांपाशीं देण्यांत आला.

आतां ह्या हुकुमाच्या बाबतींत पुढील गोष्टी लक्षांत ठेविल्या पाहिजेत. महाराजांची गांठ घ्यावी अशी नारायणरावांची उत्कटेच्छा असतांना ती होऊं न देतां, त्याच्या दुसऱ्याच दिवशीं हा हुकूम तयार झाला व तो दुसऱ्या दिवशीं नारायणरावांच्या हातांत पडला ! महाराणीसाहेबांना अध्यक्ष नेमणें व कौन्सिलच्या सहाय्यानें काम चालविणें हा महत्वाचा मुद्दा नव्हता. परंतु मुख्य दिवाणांची भेट होऊं न देतां, त्यांच्या पाठीमागें खलबतें करून हा हुकूम शिजविण्यांत आला. महाराज पांच मिनिटेंही बोलूं शकत नाहींत अशी स्थिति दिवाण, रेसिडेंट, एजंट, वगैरेसाठीं असतांना, जो हुकूम दीड पान टाइप केलेला आहे त्याची चर्चा त्याच अगर दुसऱ्या रात्रीं होऊं शकते, हें पाहून महाराजांच्या आजारांत कांहीं तरी व्यवस्था झाली पाहिजे अशी सूचना ज्यांनीं तीन वेळां केली होती त्या रेसिडेंटसाहेबांच्या कानांवर नारायणरावांनीं ही हकीकत घातली व **संस्थानासंबंधाची कोणतीही गोष्ट मुख्य प्रधानांच्या सल्ल्यावांचून करावयाची नाहीं अशी अट स्वतः महाराजसाहेबांनीं मान्य केलेली असतांना हा हुकूम सुटणें हा अपमान होय** असें स्पष्ट सांगून नारायणरावांनीं आपण राजीनामा देणार असें निक्षून बजाविलें. परंतु रेसिडेंटनीं त्यांस तसें करूं दिलें नाहीं. त्यांनीं व एजंटांनीं पुढें चौकशी केली त्यावेळीं डॉ. स्मिथ ह्यांनीं ठेवलेली नर्स काढून दुसरी आणून ठेवण्याचा हेतु मुळीं **रात्रींच्या वेळीं** हीं खलबतें करावयास मिळावीं हा होता असें दिसून आलें ! आणि ह्यासाठींच रात्रीच्या पाळीवरी नर्स बदलण्यांत आली. रात्रींच्या वेळीं डॉ. स्मिथ ह्यांच्या विश्वासांतील नर्स नको होती. निकटवर्ति तीन धूर्तांना सर्व प्रकरणांत प्रश्न विचारतां परस्परविरोधी उत्तरें मिळून हें कारस्थान कसें रचलें गेलें असावें त्याची माहिती मिळाली. एकानें म्हणावें त्या हुकुमामध्यें काय मजकूर आहे त्याची मला आतांपर्यंत

---

१. नांवें मुद्दाम गाळलीं आहेत.

## सर नारायण ह्यांचें हस्ताक्षर व सही यांचे नमुने

3rdly: I made it a condition that in every State matter I should be consulted by H H beforehand that no order of his should be made without previous consultation with me. To that also he deliberately agreed

N. G. Chandavarkar

Pedder Road, Bombay.

April 19th 1923.

कल्पना नाहीं. दुसऱ्यानें प्रतिपादावें कीं हुकूम काय असावा हें जेव्हां ठरलें तेव्हां पहिले गृहस्थ हजर होते! एकानें सांगावें ह्या बाबतींत दिवाणसाहेबांचा सल्ला घ्यावा असें महाराजांनीं सुचविलें; तिसऱ्यानें निक्षून सांगावें कीं, दिवाणसाहेबांचें नांव महाराजांनीं कधींच घेतलें नाहीं! अशीं टोलवाटोलवीचीं उत्तरें पाहून खरा प्रकार काय झाला असला पाहिजे तें उघड व्हावयास वेळ लागला नाहीं. शिवाय, महाराजसाहेबांना जेव्हां संस्थानचे सर्व अधिकार देण्यांत आले त्यावेळीं खलित्यामध्यें एक कलम असें होतें कीं, रेसिडेंटसाहेबांच्या सल्ल्यावांचून महत्त्वाचें

कोणतेंही काम होऊं नये. महाराजांच्या आजारांत दिवाणांस न कळवितां कौन्सिल नेमण्याची वाटाघाट करणें व कौन्सिल नेमण्याचा हुकूम निघेपर्यंत व निघाल्यानंतरही रेसिडेंटचा सल्ला न घेणें ह्या गोष्टी गैर झाल्या असें रेसिडेंट ह्यांना वाटल्यावरून त्यांनीं एजंटांकडे व एजंटांनीं हिंदुस्थान सरकारकडे तक्रार केली; व हिंदुस्थानसरकारनें हा हुकूम खलित्यांतील कलमाविरुद्ध असल्यामुळें रद्द केला व महाराज जोंपर्यंत जातीनें सर्व व्यवहार पाहात नाहींत तोंपर्यंत मुख्य दिवाणांकडे महाराजांचे सर्व अधिकार असावेत असा हुकूम पाठविला! अर्थात् त्यामुळें सर्वच पारडें फिरलें! महाराज-साहेबांस स्वतः कोणत्याही प्रकरणाचा निकाल लावण्याची संधि मिळाली म्हणजे ते सरळ जें असेल तें करण्याचा प्रयत्न करीत. हा हुकूम तिघां धूर्तांच्या कार-वाईमुळें झाला व मुख्य प्रधानांची व्यदा संस्थानांतून घालविण्यासाठीं चोरट्या उपायांचा अवलंब करून व स्वतः महाराजसाहेबांनीं मान्य केलेल्या अटीच्या विरुद्ध त्यांना वागावयास लावून त्यांनीं आपला हेतु साध्य करून घेतला. पण तो त्यांचा व्यूह उघडकीस आला! ता. ४ सप्टेंबर रोजीं महाराजसाहेबांशीं सर नारायण ह्यांची जी मुलाखत झाली तींत महाराजसाहेबांनीं स्वतः असे उद्गार काढले:—"I regret I have done a wrong by not taking your advice before passing my order. I ought to have consulted you and you will, I hope, excuse me.' नंतर पुनः ते म्हणाले, I regret for what has occurred. नंतर ते मराठींत म्हणाले 'कशाचं काय झालं–वेळ आला–भलतंच झालं'–असो. पुनः एकदां, आतां जाऊं द्या, असें म्हणून From the day you came, I have given you my full trust असे उद्गार त्यांनीं काढले. ता. ७ रोजीं दुसऱ्या एका निकटवर्ती अधिकाऱ्याशीं नारायणरावांचें संभाषण झालें, त्यावेळीं, त्या गृहस्थांनीं सांगितलें कीं, "आपण येथून गेलांत म्हणजे कोणाकोणाच्या कार-स्थानामुळें तो हुकूम सुटला त्याची सर्व हकीकत आपल्याला सांगेन. आज महाराजांचा आपल्यावर विश्वास आहे व आपल्याविषयीं त्यांच्या ठिकाणीं आदर आहे. आपण सरळ, सच्चे असल्यामुळें आपण कडक आहां असें खालच्या लोकांना वाटलें, तरी ते व सर्व लोक आपल्या बाजूचे आहेत" "हें पहा" नारायणराव म्हणाले, "कोणी कारस्थानें रचिलीं हें मला कळलें असून त्यांच्या त्यांच्या तोंडूनच मीं सर्व वदविलें आहे." वरील गृहस्थांचें शेवटलें वाक्य असें होतें:—

"Be good and polite to all, but trust none of these fellows. Your position is wonderfully strong." ही स्थिति जरी ता. ७ रोजीं होती तरी पुढल्या दोन दिवसांत सर्व पारडें एकदम फिरलें! महाराजांच्या वृत्तींत विलक्षण फरक झाला व नारायणरावांसंबंधानें त्यांच्या भोंवतालचीं माणसें त्यांचें मन अधिकाधिक कलुषित करूं लागलीं. महाराजांचा हुकूम फिरविण्याची

कल्पना जरी नारायणरावांची नव्हती व त्यांनीं त्या बाबतींत जरी कांहींही खटपट केली नाहीं, तरी महाराजांच्या मनांत असेंच भरवून देण्यांत आलें होतें कीं, नारायणरावांनींच हें सर्व कारस्थान रचिलें. दुसरें कांहीं सांपडत नाहीं तेव्हां राहात्या बंगल्याच्या विजेचें बिल नारायणरावांनीं देण्याचें नाकारलें व अकाउंटंट जनरलला आपल्या ऑफिसांत बोलावून त्याचा उपमर्द केला असें महाराजांस सांगण्यांत आलें ! नारायणरावांनीं अॅकाउंटंट जनरललाच खरा प्रकार सांगावयास सांगितलें ! ते अधिकारी आपल्या पत्रांत म्हणतात :—

I never referred this case to you and there was no occasion for it. The matter was under correspondence between my office and the House Department. I have always had the honour of receiving most courteous treatment at your hands and I know of no case in which you ever showed annoyance what to speak of insulting me.

I may be permitted to remark here that on the occasion of your tours in the State last year, you did not draw any travelling allowance to which you were entitled under the rules.

मध्यंतरीं आपल्या सहीनें निघालेला हुकूम आपल्याला परत घ्यावा लागला व हें सर्व नारायणराव येथें असल्यामुळें झालें असें महाराजांच्या मनांत भरविण्यांत आलें. त्यामुळें सर नारायण ह्यांचें व महाराजांचें पुढें बनणें अशक्य झालें. ता. ८ रोजींच्या भेटींत तसें बोलूनही दाखविण्यांत आलें. त्यावेळीं नारायणरावांनीं महाराजांना असें स्पष्ट सांगितलें कीं, "आपल्या परस्परांमध्यें असें ठरलें होतें कीं, माझी कांहीं चूक झाली, तर ती आपण दाखवावी व आपली कांहीं चूक मला आढळली तर तिच्यासंबंधानें मी आपल्यापाशीं स्पष्ट बोलावें; मग आपण तसें कां केलें नाहीं ? संस्थानच्या हितासंबंधानें आपल्या व माझ्या कल्पना ह्यांमध्यें भेद होण्याचा संभव आहे. परंतु मीं जें जें कांहीं केलें तें संस्थानच्या व आपल्या स्वतःच्या हितासाठीं केलें असें माझें मन मला सांगत आहे. एवढेंच केवळ नव्हे, तर संस्थानच्या हितापलीकडे कोणताच विचार माझ्या मनांत आलेला नाहीं." अशा प्रकारें आपल्या धोरणाचा पाढा वाचीत असतां महाराज "तसें झालें खरें" Yes true, true असे शब्द मधून मधून म्हणत होते. अखेरीस ते म्हणाले, Sir Narayan, I recognise you have worked very hard and I know what it is to lose you. I know how much I would gain by your presence here. हिंदुस्थान सरकारनें महाराजांचा हुकूम रद्द केला ही बातमी महाराजांना ताबडतोब कळविली नाहीं ह्याचाही दोष सर नारायण ह्यांजवर लाद-

ण्यांत आला! त्यांत खरा प्रकार असा होता कीं, महाराजांच्या प्रकृतीच्या दृष्टीनें ह्या हुकुमाची बातमी त्यांस तूर्त कळविणें इष्ट नाहीं, अशी मेजर स्मिथ ह्यांची ताकीद होती! असो. ह्याच संभाषणांतील शेवटलीं वाक्यें येथें दिलीं म्हणजे महाराज व सर नारायण ह्यांच्या मनांत अखेरीस परस्परांसंबंधानें कोणते भाव होते त्याची चांगली कल्पना होण्यासारखी आहे म्हणून ते येथें देतों:—

"But, Sir Narayan, I hope when we part we shall part as friends and remain friends."

"I have been a friend of yours ever since I came here. I will always be friendly. I shall always wish well of you and pray to God that He keep you out of harm's way. I have no feelings of resentment. I have endeavoured to the best of my powers, since I came here, to be unsparing in my work. I have toiled night and day and never shirked work and responsibility. I remained at my post even when my wife lay seriously ill in Bombay and you know when you brought me here against my will I came because you specially wanted me and you thought I would make a model ruler of you. But, however, God has made it otherwise. Therefore I part from you as friend."

"Good bye, Sir Narayan. You assure me that we part as friends?"

"I have always been a friend since I came here and I am sure I shall always be friendly, praying to God to keep you out of harm's way."

हें भाषण झाल्यानंतर सर नारायण दुसऱ्याच दिवशीं इंदूर सोडणार ही बातमी एजंट, रेसिडेंट, इतर अधिकारी व प्रजा ह्यांस कळली; तेव्हां सर्वांस हळहळ वाटली व इंदूर संस्थानासंबंधानें वाटत असलेली आशा आतां विफल होणार किंवा कसें हा विचार लोकांच्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं. सर नारायण इंदुरास केवळ दिवाण म्हणून गेले नव्हते. कांहीं विशिष्ट हेतूनें महाराजांनीं त्यांना नेलें होतें, तो हेतु सफल होणें शक्य नाहीं असें आढळून आल्यावर नारायणरावांनीं तेथें राहण्यांत कांहीं स्वारस्य नव्हतेंच. वास्तविक पहातां अत्यंत निस्पृहतेनें मुख्य दिवाण ह्या नात्यानें ते तेथें वागत होते. कोणाला त्यांची निस्पृहता अति कोटीला गेली होती असें वाटण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, संस्थानच्या कामासाठीं बाहेर फिरतीवर गेल्यावर सरकारी नियमांप्रमाणें बिल न करणें ही कोठली निस्पृहता असें

कोणास वाटण्याचा संभव[1] आहे. दुसरी एक गोष्ट पहा. नारायणरावांचे ज्येष्ठ चिरंजीव श्री. विठ्ठलराव ह्यांचा विवाह मुंबईस १९१४ च्या जून महिन्यांत झाला. त्यावेळीं सर हुकुमचंद वगैरे मोठमोठ्या लोकांनीं मुद्दाम आपले मुनीम इंदुराहून मुंबईस पाठविले. अर्थात् त्यांच्याबरोबर कोणी मौल्यवान् वस्तू तर कोणी रोख रुपये बक्षिसादाखल पाठविले. परंतु नारायणरावांनीं त्यांचा स्वीकार करण्याचें साफ नाकारलें! मुनिमाच्या मालकांचे त्यांनीं आभार मानिले, पण वस्तू घेतल्या नाहींत. मुनिमांना वस्तू अगर पैसे परत आणण्याचा हुकूम नसल्यामुळें तसें सांगून ते परत गेले; परंतु इंदुरास परत गेल्यावर सर्व रुपये व वस्तू आभाराचीं पत्रें लिहून नारायणरावांनीं परत केल्या! असल्या निस्पृहतेचें इंदुरास चीज झालें नाहीं हें महाराजांचें व प्रजेचें दुर्दैव होय असें आम्ही समजतों. पुढें महाराजांच्या भोंवतीं भलतींसलतीं माणसें कशीं आलीं, चांगल्या प्रवृत्तीच्या राजास योग्य मार्गदर्शक न मिळाल्यामुळें व सुवृत्त व्यक्तींचें त्यांचेवर वजन नसल्यामुळें तुकोजी महाराजांस राज्यत्याग कसा करावा लागला तें सर्वांस विदित आहेच. लोक म्हणतात सर नारायण तेथें असते, तर कदाचित् एथपर्यंत मजल गेली नसती! परंतु सर नारायण परत आले तें एकाअर्थीं फार नामी झालें; कारण परतआल्यानंतर शिक्षण व विशेषतः राजकारण क्षेत्रांत त्यांनीं जें कार्य केलें व ज्याला मोल नाहीं, त्याला अखिल हिंदुस्थान मुकला असता!

---

१. नेमणूक सरकारी गॅझेटांत जाहीर करितांना ज्या अटी प्रसिद्ध झाल्या होत्या त्यांत अमुक भत्ता, ब्रॉड गेजवरून प्रवास करतांना फर्स्ट क्लास डबा, अरुंद गेजवरून प्रवास करतांना फॅमिली फर्स्ट क्लास डबा वगैरे अटी प्रसिद्ध झाल्या आहेत. तरीही सर नारायण ह्यांनीं केव्हांच भत्ता घेतलाच नाहीं!

## प्रकरण तेरावें

# राजकारण

१८८५ सालीं राष्ट्रीयसभेची स्थापना झाली व तिची पहिली बैठक मुंबई शहरांत मोठ्या उत्साहानें पार पडली. त्यावेळीं नारायणराव विलायतेपर्यंत हिंदुस्थानचें गाऱ्हाणें पोंचवून परत आले होते. ह्याच वर्षी बॉंबे प्रेसिडेन्सी अॅसोशिएशनची स्थापना झाली. ही स्थापना होण्याच्या पूर्वीच मुंबई व पुणें येथें राजकीय दृष्ट्या नवजीवनास प्रारंभ झाला होता. ह्याच वेळीं Forces at Work ह्या सदराखालीं त्यांचे अनेक लेख टाईम्सपत्रामध्यें आले होते. नारायणरावांनीं मुंबई व पुणें येथील नवजीवनाची यथार्थ कल्पना करून देणारे अनेक लेख इंदुप्रकाशांत लिहिले, मात्र ते संपादकीय म्हणून प्रसिद्ध केले नाहींत. याचें कारण बहुधा असें असावें कीं, प्रचलित विषयासंबंधानें विशेष टीकापर लेख एखादें टोपण नांव घेऊन प्रसिद्ध केले कीं त्यांच्याकडे लोकांचें विशेष लक्ष वेधतें, त्यांवर उलटसुलट टीका सढळपणें होते व असे लेख लोकांमध्यें विशेष खळबळ करून सोडतात. नारायणरावांच्या ह्या लेखांचें असेंच झालें. एकतर 'पोलिटिकल ऋषि' असें मोठें नांव त्यांनीं[1] धारण केलें आणि अशा लेखांत निर्भीडपणें टीका चालविली ! त्यामुळें लेखांसंबंधानें पुष्कळ चर्चा झाली, निरनिराळे तर्क सुरू झाले, पण लेख संपादकीय नसल्यामुळें कोणीही नारायणरावांकडे बोट दाखवीत नसे व इकडे नारायणराव सर्व मौज पहात असत ! कोणाला वाटलें हे लेख बहुतकरून मामा परमानंदांनीं लिहिले असावेत; कित्येकांनीं माधवराव रानड्यांवांचून ही लेखमाला दुसरें कोणी लिहिणें शक्य नाहीं असा निश्चयात्मक अभिप्राय देऊन टाकला ! कोणाला असेंही वाटलें कीं, ज्याअर्थी पारशी समाजासंबंधानेंही लेखमाला आली आहे त्याअर्थी ह्या सर्वांचें जनकत्व मलबारी शेटकडे पोंचवावयास कांहीं हरकत नाहीं. लेखमाला संपादकाची

---

१. ज्यावेळीं मुंबई व पुणें येथील नवजीवन ह्या लेखमालेवर बरीच चर्चा होऊं लागली त्यावेळीं ही लेखमाला मींच लिहिली असें स्वतः नारायणरावांनीं वासुदेवराव भांडारकरांस सांगितलें होतें.

नाहीं असें गृहीत केल्यावर मग पुढल्या कल्पनांना पूर्ण वाव मिळाला ह्यांत कांहीं नवल नाहीं. असो. अशाप्रकारें तत्कालीन सुशिक्षित समाजांत ज्या लेखांनीं बरीच चळवळ करून सोडली त्या लेखांचा सारांश येथें दिल्यास नारायणरावांचीं राजकीय ध्येयें, कार्य करण्याचे मार्ग, व त्यावेळचीं कर्ती माणसें ह्याविषयीं योग्य कल्पना होईल, मुंबई व पुणें येथील एकंदर वातावरणांतील फरक ध्यानांत ठेवून नारायणराव कसे लेख लिहीत होते ह्याचीही कल्पना होईल; म्हणून "**मुंबईंतील नवजीवन**" व "**पुण्यांतील नवजीवन**" ह्या लेखांतील बराचसा भाग येथें देतों :-

## मुंबईंतील नवजीवन

राजकीय बाबतींत हिंदी लोकांच्या अडचणी काय आहेत, त्याचप्रमाणें त्यांच्या आकांक्षा काय आहेत त्यांची सरकारला योग्य कल्पना करून देणारी संस्था आजपर्यंत ( १८८५ ) ह्या शहरांत नव्हती. अशा प्रकारची संस्था आजपर्यंत कां स्थापन झाली नाहीं हें माझ्यासारख्याला एक कोडेंच होतें. कारण मुंबई शहर म्हणजे अखिल हिंदुस्थानांतील राजकारणविषयक उत्तम व वेंचीव विचारांचें केंद्रस्थान, असें वरिष्ठ सरकारच्या कौन्सिलच्या सरकारी मेंबरनें नुकतेंच म्हटल्याचें मला स्मरतें. आतांपर्यंतची वहिवाट म्हणजे अशी कीं ज्या ज्या वेळीं कांहीं विशेष भानगडीचे प्रश्न निघतील, त्या त्या वेळीं मुंबईच्या पुढाऱ्यांनीं एकत्र व्हावयाचें व मग मात्र त्या त्या विषयाचा, संघटित रीतीनें विचार करावयाचा आणि तेवढें काम झालें म्हणजे पुन्हां आपला पूर्वीचा विस्कळितपणा कायमचा कायम ! असें असूनहि सर्व प्रांतांचें राजकारणांतील पुढारीपण आतां मुंबईकडे येत आहे असें नुकतेंच एका बंगाली गृहस्थानें म्हटलें. पांच वर्षांपूर्वी कोणताही बिकट राजकीय प्रश्न निघाला कीं सर्व प्रांतांचे डोळे बंगालकडे लागत. बंगालच्या पुढाऱ्यांचे राजकीय बाबतींतील जे विचार तेच सर्व प्रांतांस मान्य होत, त्यामुळें साहजिकपणें सर्व प्रांतांचें पुढारीपण बंगालकडे आलें होतें. पण आतां ती परिस्थिति बदलली आहे असें अलीकडलीं मुंबईच्या पुढाऱ्यांचीं भाषणें, त्यांचे लेख, त्यांनीं केलेलें संघटित कार्यें पाहातां म्हणावें लागतें. बंगाली बाबूच्या वक्तृत्वानें आजपर्यंत सर्व प्रांत मोहून गेले होते. बंगाली बाबू पुढारी आणि इतर प्रांतांचे सर्व लोक त्यांचे अनुयायी असा प्रकार पाहावयास मिळत असे. आपण पुढारी असणें हा आपला जन्मसिद्ध हक्कच आहे असें बंगाली बाबूंना वाटत असे. पण आजचा मनु पालटला आहे. कोणताही महत्वाचा प्रश्न निघाला कीं मुंबईच्या पुढाऱ्यांचें म्हणणें काय आहे, ते पुढें आलेल्या प्रश्नाचा विचार कोणत्या रीतीनें करीत आहेत इकडे सर्व प्रांतांचें लक्ष लागलेलें असतें. आणि जसें मुंबईकरांचें मत तसें सर्व हिंदुस्थानचें

मत असा प्रकार आज पहावयास सांपडतो. १८८३ सालीं लॉर्ड रिपन ह्यांच्या कारकीर्दींत ज्या वेळीं इलबर्ट बिलासंबंधीं मोठा कडाक्याचा वादविवाद चालला होता त्यावेळीं तडजोडीच्या स्वरूपांत ह्या बिलाचा निकाल लागला हें सर्वश्रुत आहे. त्यावेळीं अखिल हिंदी बंगाल खवळून जाईल असें वाटलें होतें. परंतु मुंबईच्या पुढाऱ्यांनीं होत आहे तोच निकाल योग्य आहे असें फर्मान काढलें व सर्व प्रांतांनीं हा तडजोडीचा निकालच मान्य करावा असें सुचविलें व लॉर्ड रिपन ह्यांच्या पक्षास मिळावें असें सुचविलें. ह्याचा परिणाम यक्षिणीनें कांडी फिरवावी तसा झाला! ह्यावेळीं अँग्लो इंडिअन लोकांच्या मनांत लॉर्ड रिपन ह्यांची फजीती व्हावी असें फार होतें व ह्या हेतूनें त्यांनीं निरनिराळ्या मार्गांचें अवलंबन करून लाटसाहेबांची सारखी निंदा चालविली होती. परंतु मुंबईच्या पुढाऱ्यांचें मत प्रसिद्ध झाल्यावर सगळा बंगाल व्हाइसरायांच्या बाजूचा झाला व उलट अँग्लो-इंडियनांची फटफजीती झाली. ह्यायोगें मुंबईच्या पुढाऱ्यांचें नांव सर्वतोमुखीं झालें व आधींच मुंबईच्या पुढाऱ्यांच्या विषयीं लोकांमध्यें आदरभाव जागृत झाला होताच व सर्व प्रांतांचें पुढारीपण मुंबईकडे येऊं लागलेंच होतें; पण ह्या चळवळीनें मुंबईकडे साहजिकपणेंच पुढारीपण आलें व इतर प्रांत मागें पडले. त्यामुळें बंगालचें पुढारीपण मुंबईनें ओढून घेतलें असें लोक मानूं लागले. दुसरें उदाहरण लॉर्ड रिपन स्वदेशीं जावयाचे वेळीं त्यांचा मुंबईंत जो अभूतपूर्व सन्मान झाला त्याच्या योगें मुंबईच्या पुढाऱ्यांच्या कीर्तींत भर पडली; हें पाहून मुंबईच्या पुढाऱ्यांच्यासंबंधानें आदराची भावना जागृत झाली असली, तर त्यांत कांहीं आश्चर्य मानण्यासारखें नाहीं. परंतु राजकारणांतील अडचणी राजकारणांतील पुढाऱ्यांसच कळतात व त्या मुंबईच्या पुढाऱ्यांस माहीत नाहींत असें नाहीं. सध्यां ह्या पुढाऱ्यांसंबंधानें जो प्रश्न विचारांत आहे तो असा कीं, आज मुंबईकडे जें एकाएकीं पुढारीपण आलें आहे तें कायमचें आहे कीं दुसरा एखादा प्रांत तें बळकावण्याची तयारी हळुहळू करूं लागला आहे. ज्याप्रमाणें हें पुढारीपण एकाएकीं प्राप्त झालें आहे त्याचप्रमाणें तें अल्प काळ टिकून नाहींसें होण्याची भीति नाहीं काय? मला तर असें वाटतें कीं, जरी कांहीं बाबतींत मुंबईची सरशी आहे, तरी लवकरच असा दिवस येईल कीं ज्यावेळीं मुंबईला मागें टाकून पुण्यानें अखिल हिंदुस्थानचें पुढारीपण पटकावलें आहे असें अनुभवांतीं दिसून येईल. कारण, पुणें दक्षिणप्रांताचें केंद्रस्थान असून पुण्याची राजकीय बाबतींत हळूहळू सारखी प्रगति होत आहे. ही प्रगति निःसंशय हळूहळू जरी होत असली तरी गेल्या वीस वर्षांकडे पाहिलें कीं, लवकरच राजकीय चळवळीच्या बाबतींत पुण्यानें सर्व प्रांतांस मागें टाकून जर आघाडी मारली, व पुण्याचें मत तें इतर प्रांतांचें मत असें जर झालें तर त्याचें मला तरी कांहीं आश्चर्य

वाटावयाचें नाहीं. म्हणजे आज मुंबई जें कार्य करीत आहे, तेंच उद्यां पुणें करणार आहे. मुंबईला जर आपलें उच्च स्थान कायम ठेवावयाचें असलें तर निरनिराळ्या रीतीनें कार्यास लागलें पाहिजे. ज्यावेळीं राजकीय वातावरण प्रक्षुब्ध झालेलें असतें त्यावेळची मुंबई आणि ज्यावेळीं सर्वत्र शांतता असते, कोणतीही राजकीय विषयक चळवळ लोकांपुढें नसते त्या वेळची मुंबई ह्यांमध्यें जमीनअस्मानाचें अंतर दिसून येतें. जेव्हां कांहीं तरी विशेष खळबळ उत्पन्न करणारा विषय लोकांपुढें असतो, त्याचवेळीं गुहेंत निजून राहिलेल्या सिंहाप्रमाणें मुंबई खडबडून जागी होते आणि त्यावेळीं आपलें सर्व सामर्थ्य एकवटून मुंबईचे पुढारी कार्यास लागतात. तेवढी वेळ निघून गेली म्हणजे पुढारी अंतर्धान पावतात. साधेसुधे प्रसंग येतात जातात. पण तिकडे ह्यांचें लक्ष फारसें जात नाहीं. म्हणजे ह्याचा सरळ अर्थ असा कीं, मुंबईची कीर्ति मोठी, पुढारी फार थोर गृहस्थ, तेव्हां मोठ्याच प्रसंगीं त्यांचें कर्तृत्व दिसून यावयाचें ! आणि थोर कर्तृत्व पाहून किंवा त्याची कीर्ति ऐकून शांततेच्या वेळीं त्यांची ओळख करून घ्यावयास, किंवा त्यांच्याशीं संभाषण करून आपल्या ज्ञानांत भर घालण्याच्या हेतूनें कोणी ह्या शहरीं आला तर कोठल्या तरी एका ठिकाणीं, अगर कोठल्या तरी एका वेळीं हीं बडीं माणसें एकत्र झालेलीं दिसतील असें म्हटलें तर तें शक्य नाहीं. त्यानें एकेकाच्या घरीं अगर ऑफिसांत जाऊन त्यांच्या त्यांच्या सोयीप्रमाणें त्यांच्या गांठी घेऊन आपली जिज्ञासा तृप्त करून घेतली पाहिजे. असा प्रकार विशेष खळ-बळीच्या वेळीं होत नाहीं. त्यावेळीं सर्व पुढारी वारंवार एकत्र होतात व आपल्या पुढें असलेल्या प्रश्नाची चर्चा करितात व एकमतानें कार्याची दिशा ठरवितात. पण एरव्हीं तसें होत नाहीं. याचा परिणाम अत्यंत अनिष्ट असा होतो. ह्याचें एकच उदाहरण येथें देतों. सर रिचर्ड टेंपल ह्यांच्या भक्तांनीं व चहात्यांनीं एक जाहीर सभा भरवून आपल्या आवडत्या देवतेची पूजा करण्यासाठीं ह्या देवतेचा एक पुतळा उभारण्याचें ठरविलें. हा प्रसंग ह्या पुढाऱ्यांना तिरस्करणीय वाटला, नाहीं असें नाहीं. तरी पण मुंबईकरांच्या वतीनें पुतळा उभारण्याचें ठरलें. नाहीं म्हणा-वयास एकट्या फेरोजशहा मेथा ह्यांनीं बॉंबे गॅझेट पत्रामध्यें एक सणसणीत पत्र लिहून मुंबईच्या लोकांची ह्या चाललेल्या उदोउदोस सहानुभूति नाहीं असें दाखविलें व कांहीं देशी पत्रांनीं थोडी ओरड केली. पण ह्या पलीकडे ही चळवळ वेळींच हाणून पाडण्यासाठीं कांहींच उपाययोजना झाली नाहीं, त्यामुळें सर रिचर्ड टेंपल ह्यांच्या भक्तांनीं चार दिवस मुंबईकरांच्या नांवावर मोठेपणा मिरविला. हें उदाहरण दृष्टीपुढें ठेवून हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, इतर सर्व कार्यांप्रमाणें राजकीय चळवळीचें कार्यही अळंटळं करून केलें असतां त्याचा उपयोग होत नाहीं, तें देखील सतत, निश्चयपूर्वक व पद्धतशीर रीतीनें करीत

राहिलें पाहिजे, तरच इष्ट फलप्राप्ति होण्याचा संभव असतो. ह्यापेक्षां प्रसंग मोठा असो अगर लहान असो, कार्य बिकट असो अगर सुलभ असो, लोकांची सहानुभूति असो अगर नसो, नित्य निश्चयात्मकपणें हातीं घेतलेल्या कार्यास आपल्याला वाहून घेणारा पुण्याचा राजकारणी पुरुष हा मुंबईच्या पुढाऱ्यांपेक्षां मला अधिक पसंत आहे, कारण तो आपल्या अशा मेहनतीनें अशक्य कोटींत आहे असें भासणारें कार्य आपल्या उद्योगाच्याद्वारें शक्य कोटींत आणितो.

ज्या ह्या दोषांच्यायोगें मुंबईच्या पुढाऱ्यांचें पुढारीपण डळमळीत झालें आहे त्यांविषयीं त्यांच्या ठिकाणीं जागृति होऊं लागली आहे हें मी जाणून आहें. त्यांच्यांत नवी उमेद, नवा हुरूप दिसून येत असून एक राजकीय संस्था स्थापण्याचा प्रयत्न हें त्याचेंच निदर्शक होय. आज मुंबईच्या पुढाऱ्यांमध्यें अशी एक ज्ञानवृद्ध व अनुभववृद्ध व्यक्ति आहे कीं ज्यांची कार्य करण्याची पद्धत, शिक्षण, स्वभाव व संवयी ह्यांच्यायोगें ते सर्व राजकीय चळवळींचे सर्वांचे पुढारी होण्यास सर्वपरि लायक आहेत. ही व्यक्ति म्हणजे आपणामध्यें हल्लीं असलेले पूज्यवर शेट दादाभाई नवरोजी हे होत. जुने पुढारी व नवे ह्या सर्वांस ते सारखे आदरणीय असून कितीही अडचणी व प्रतिकूल परिस्थिति असली तरी तीस धीरानें टक्कर देऊन कार्य करणारे व निरनिराळ्या विचारांच्या लोकांना सार्वजनिक हिताकारणें एकत्र आणण्याचें सामर्थ्य असणारे ते एकटेच आहेत. त्यांच्याशीं कमीअधिक संबंध आला असतां त्यांच्याविषयीं तात्काल आदर उत्पन्न होतो. त्यांस देशाच्या हितासाठीं अव्याहत कार्य करितांना पाहिलें म्हणजे आपल्या आळसाची आपल्याला लाज वाटूं लागते व देशाच्या हितासाठीं अशाप्रकारें राबणें हें भूषणावह होय असेंही पटतें. एकंदर जनतेवर त्यांचें इतकें वजन आहे कीं, त्यांच्या अभावीं मुंबईची गत ज्याप्रमाणें मेंढपाळावांचून मेंढरांची गत, त्याप्रमाणें होणार आहे. दादाभाईनंतर मुंबईचे दुसरे सन्माननीय पुढारी म्हणजे शेट नौरोजी फरदुनजी हे होत. हे मुंबईचे जुने पुढारी असून त्यांच्यावांचून आज चालावयाचें नाहीं. त्यांच्याकडे पाहिलें म्हणजे वृद्धापकाळामुळें ते थकले आहेत असें वाटतें, पण त्यांची काम करण्याची धडाडी, त्यांचा उत्साह पाहिला म्हणजे ते आपल्या वयासही कसे लाजवीत आहेत तें अनुभवानें कळून चुकतें. मुंबईचे बहुमोल तिसरे पुढारी म्हणजे रावसाहेब मंडलीक हे होत. त्यांची निर्भीड व स्वतंत्र वृत्तीविषयीं ख्याति आहे, त्यामुळें अनेक कार्यांत त्याचा उपयोग झालेला आहे. पारशी बॅरोनेट सर जमशेटजी जीजीभाई हे राजकीय बाबतींत इतकें मन लावून कार्य करीत आहेत कीं सर्व धर्मांच्या व जातींच्या लोकांत त्यांच्याविषयीं जो आदर उत्पन्न झाला आहे व

त्यांच्याविषयीं जी विश्वासाची वृत्ति जागृत झाली आहे ती योग्यच आहे असें वाटल्यावांचून राहात नाहीं. पुढारी ह्या नात्यानें त्यांस जें असाधारण यश प्राप्त झालें आहे त्याचें रहस्य हेंच आहे कीं, इतर पुढाऱ्यांतील दोषांपासून ते अलिप्त आहेत. दुसरें असें कीं, दुसऱ्या कोणी कांहीं हितकारक उपाय सुचविला तर ते तात्काळ त्याचा स्वीकार करितात व इतरांचे विचार मान्य नसले तरी त्यांच्याविषयींचा आपला आदरभाव ते कमी होऊं देत नाहींत, ह्यामुळें ते सर्वांच्या आदरास पात्र झाले आहेत. त्याचप्रमाणें मुंबईकरांत हल्लीं कायदेपंडित त्रिमूर्ति लोकांपुढें आहे. अर्थात् हे तीन गृहस्थ म्हणजे बद्रुद्दिन तय्यबजी, फेरोजशाह मेथा व काशिनाथपंत तेलंग हे होत. मुसलमान, पारशी व हिंदु ह्या तीन धर्मांतील तीन गृहस्थ एकत्र होऊन तिघांनीं एकमतानें राजकीय सुधारणेसाठीं खपणें हा मुंबईच्या इतिहासांतील अपूर्व योगच होय ह्यांत कांहीं संशय नाहीं. ध्येयाच्या दृष्टीनें जरी ते सारखे आहेत, तरी स्वभाव पहातां ते सारखे नाहींतही. तेलंग हे फार सावधगिरीनें वागणारे गृहस्थ आहेत. कोणी असें म्हणतात कीं त्यांना एकदम चिडविणें, किंवा क्रोधवश करून त्यांना धडाडीनें कार्यास लावणें हें अशक्य आहे. कोणतेंही कार्य हातीं घेण्यापूर्वी ते शांतपणें साधकबाधक प्रमाणांचा विचार करितात, मग तो विषय कितीही तांतडीचा असला तरी असा विचार केल्यावांचून ते कार्यास लागत नाहींत. परंतु मि. मेथांचें तसें नाहीं. त्यांस आत्मविश्वास भरपूर आहे आणि त्यांच्यांत तरतरीही विशेष आहे. त्यामुळें त्यांस एकदम एखाद्या कार्यास उद्युक्त होणें कठिण जात नाहीं. सारांश, एक धिमे, दूरवर विचार करणारे, तर दुसरे तरतरीत, धडाडी स्वभावाचे असल्यामुळें ह्या दोघांच्याही हातून कांहीं चूक होण्याचा संभव नाहीं; कारण, परस्पर परस्परांना संभाळून घेणारे आहेत आणि यदाकदाचित् तसें नाहीं झालें, तर हुशार, चाणाक्ष म्हणून प्रसिद्ध असलेले बद्रुद्दिन ह्या दोघांसही आंवरावयास सिद्ध आहेतच! शिवाय हिंदुस्थानच्या सांपत्तिक स्थितीसंबंधानें, किंवा दुसऱ्या तशाच महत्त्वाच्या विषयाविषयीं कांहीं उपाययोजना सुचविणें असल्यास मुंबईचे "केर्ड" मि. जव्हेरिलाल उमियाशंकर याज्ञिक हे आहेतच. शेवटीं, येथील एका उदयोन्मुख जातीच्या, उदयोन्मुख पुढाऱ्याचा येथें उल्लेख करणें अगत्याचें आहे. ही जात म्हणजे भाटिया जात व हिचे उदयोन्मुख तरुण पुढारी म्हणजे मि. दामोदरदास विठ्ठलदास ठाकरसी हे होत. हे गृहस्थ नुकतेच राजकारणांत मन घालावयास लागले असून ते बुद्धिमान् आहेत असें दिसून आलें आहे. थोड्या दिवसांनीं ते ना. मुरारजी गोकुळदास ह्यांची जागा भरून काढतील असें मानावयास कांहीं हरकत नाहीं. मुंबईंत आणखीं दुसरीं नांवें घेण्यासारखीं माणसें आहेत, पण ज्यांचीं नांवें मीं वर दिलीं आहेत त्यांच्यावर राजकीय बाबतींत

चळवळ करण्याची जबाबदारी असून त्यांच्यापैकीं बहुतेक साधारण वर्गांतून वर आलेलीं माणसें आहेत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ह्यावरून मुंबईचें पुढारीपण केवळ श्रीमंत अगर बड्या लोकांकडून निघून साधारण स्थितींतील लोकांकडे कसें येऊं लागलें आहे तें दिसून येतें. राजकारणांत पुढाकार घेणारी ही जी नवीन संस्था निघाली आहे तिचें देखील ध्येय हेंच आहे हें संस्थेच्या सभासद होण्याच्या अटी पाहतां उघड होतें. मध्यम वर्गांतील लोकच आतां पुढें येणार व सार्वजनिक चळवळींचीं सूत्रें आपल्या हातीं घेणार ह्याचीं हीं पूर्वचिन्हें होत.

पण येथें एक सावधगिरीची सूचना देणें अगत्याचें आहे. कांहीं तरी मोठी चळवळ असली तरच मुंबईच्या पुढाऱ्यांचें तिकडे लक्ष लागतें व ते पुढाकार घेऊन चळवळ नांवारूपास आणतात असें वर म्हटलेंलेंच आहे. अशा रीतीनें एकदां तिनें पुढाकार घेतला म्हणजे ती बाकीच्या सर्व इलाख्यांस मागें टाकते. दुसरा असा दोष आढळतो कीं अशा प्रकारें पुढारी जेव्हां कार्यास लागतात तेव्हां ते एकाच वेळीं अनेक गोष्टींस हात घालतात. नवीन संस्था जरी निघाली आहे तरी वरील जुना दोष कांहीं अद्याप सुटला नाहीं. आतां राजकीय चळवळ करण्यासाठीं इतके दिवसांनीं एक नमुनेदार संस्था निघाली तर ती चांगली नांवारूपास आणण्यापूर्वींच एक दैनिक काढण्याची लहर आली आहे! खरें पाहातां ह्या दैनिकावांचून आजच कांहीं अडलेलें नाहीं. आज नवीन काढलेली संस्था नांवारूपास आणणें हेंच ह्या पुढाऱ्यांचें कर्तव्य आहे आणि असें झालें तरच आपली कीर्ति कायम राहील; म्हणून एकेकच गोष्ट हातांत घेऊन ती योग्य रीतीनें पार पाडावी अशी माझी त्यांना मित्रत्वाच्या नात्यानें प्रेमाची सूचना आहे.

## पुण्यांतील नवजीवन

(१८८५.)

मुंबईच्या राजकारणी पुढाऱ्यांची अशी साधारण समजूत आहे कीं, सर्व प्रकारच्या सार्वजनिक चळवळींत जर यश यावयाचें असेल तर श्रीमंत लोकांचें त्या त्या कार्यांत सहकार्य मिळविलें पाहिजे. ही अशी समजूत होण्याचें एक कारण असें असलें पाहिजे कीं पूर्वीं श्रीमंत लोकच जनतेचे खरे पुढारी अशी सरकारची समजूत होती व त्यामुळें त्यांचें सरकारदरबारांत चांगलें वजन असे. त्यावेळीं साधारण जनता तितकी पुढें आलेली नव्हती, आपणच जनतेचे खरे पुढारी आहोंत अशी जागृति त्यांच्यामध्यें उत्पन्न झालेली नव्हती, जनतेचे विचार सरकारपुढें ठेवण्याचा हक्क आपलाच असें त्यांस वाटूं लागलें नव्हतें. पण आतां काळ बदलला

आहे. मात्र मुंबईच्या पुढाऱ्यांच्या ही साधी गोष्ट जशी लक्षांत यावी तशी अद्याप आलेली नाहीं. येथें एकच उदाहरण सांगतों. कांहीं दिवसांपूर्वी मुंबईच्या पुढाऱ्यांनीं एक मोठा क्लब काढावयाचें ठरविलें. त्यांत सर्व जातींचे व सर्व धर्मांचे लोक घ्यावयाचे व अशा प्रकारें सर्व धर्मांच्या व सर्व जातींच्या लोकांत दळणवळण वाढवून त्यांच्यांत मैत्री उत्पन्न करावयाची अशी स्तुत्य इच्छा मनांत योजून ही कल्पना पुढें आली. ह्या संस्थेंत सामाजिक व राजकीय विषयांची चर्चा करावयाची अशीही एक योजना होती. ह्यांत कांहींही वावगें नव्हतें. परंतु ही आपली योजना आचरणांत आणावयाचें सोडून, किंवा एकदम कार्यास लागावयाचें सोडून ही मंडळी नियम उपनियम, कोणास सभासद करावयाचें, कोणास पेट्रन होतां येईल ह्याविषयीं वाद करूं लागली ! म्हणजे इंग्रजींत ज्याला घोड्यापुढें गाडी असें म्हणतात तसा कांहींसा हा प्रकार झाला. ह्या नियमांची व योजनेची वार्ता कर्णोपकर्णीं होऊन खुद्द गव्हर्नर-साहेबांपर्यंत गेली, त्यांनीं एकंदर उद्देशांकडे लक्ष देऊन स्वतः पेट्रन होण्याचें कबूल केलें ! त्याचप्रमाणें कित्येक श्रीमंत व सुखवस्तु लोकांनींही गव्हर्नरसाहेबांचें उदाहरण पाहून संस्थेस उदार आश्रय देण्याचें आश्वासन दिलें. त्यावेळीं ह्या लोकांनीं संस्थेसंबंधानें फार मोठ्या प्रमाणावर मनोराज्य रचिलें होतें. संस्थेसाठीं एक मोठी इमारत व्हावयाची होती, तेथें सर्व आर्यबंधु एकत्र जमून नाना विषयांची चर्चा करणार होते व ही एक नमुनेदार संस्था करण्यासाठीं पुढारी माणसें झटत आहेत असें वाटत होतें. पण अखेरीस डोंगर पोखरून उंदीरही निघाला नाहीं ! क्लब स्थापला गेला नाहीं व इमारतही उभारली गेली नाहीं. सर्व कांहीं एकदम मोठ्या प्रमाणावर करावयाचें, गरीब व मध्यम स्थितींतील लोकांची सहानुभूति मिळवावयाच्यापूर्वी श्रीमंतांस व मोठमोठ्या लोकांस आपल्याकडे ओढून घ्यावयाचें ह्याच्यामागें लागल्यामुळें एक स्तुत्य कार्य मागें पडलें. ह्यावरून असें उघड होतें कीं ह्या मंडळीला जनहितविषयक चळवळींचें एक मुख्य तत्त्वच अद्याप चांगलें समजलें नाहीं. तें तत्त्व असें आहे कीं, कर्तीं माणसें पुढें येऊन तीं कामास लागलीं कीं, दुसरीं माणसेंही मिळतात, पैसाही काम पाहून चालून येतो. कॉब्डनला खुल्या व्यापाराच्या बाबतींत जें यश प्राप्त झालें तें त्यानें मुंबईकरांचा मार्ग जर स्वीकारला असता तर त्यास कधींच प्राप्त झालें नसतें. तो मोठ्या धैर्यानें कामास लागला. त्याला आपलें उद्दिष्ट कार्य पुढें दिसत होतें व तें कसें साध्य होईल इकडे त्याचें सर्व लक्ष होतें. आपल्याला साहाय्य करावयास माणसें कशीं मिळतील, आपल्याला पैसा कसा मिळेल ह्या विवंचनेंत तो पडला नाहीं, किंवा नियम उपनियम ह्यांचा पसारा त्यानें मांडला नाहीं. तो एकदम कार्यास लागला व त्यास पुढें गोरगरीबांस भाकर स्वस्त मिळवून

घ्यावयाची ह्या स्तुत्य हेतूनें जॉन ब्राइट येऊन मिळाला. त्यांच्या ध्येयाप्रमाणें ध्येय आपल्यापुढें ठेवून कार्य करावयास उत्सुक असणारीं माणसें पाहिजेत. आपल्यामध्यें अशाच प्रकारें निर्धारानें, शांतपणें, कोणत्याहि प्रकारें गाजावाजा न करितां सतत इष्ट कार्यास वाहून घेतलेली व वरील तत्त्वानुसारच कार्य करणारी एक संस्था आहे. ही संस्था म्हणजे येथील हिंदु युनियन क्लब ही होय. पुष्कळ लोकांना ह्या संस्थेची कांहीं माहिती नाहीं. ती संस्था कोठें आहे, काय काम करीत आहे, ह्याची कोणास फारशी कल्पना नाहीं. तिचा प्रारंभ लहानशा प्रमाणावर झाला. आपली संस्था कशी निभावेल याची निष्कारण चिंता करीत न बसतां संस्थेचे चालक कामास लागले व त्यांस यश आलें. ह्या संस्थेविषयीं मला अभिमान आहे. तिच्या कार्यास यश येत आहे, तिचें वजन वाढत आहे आणि **अशाचप्रकारें**[1] ती नेहमीं कार्यरत राहिली तर ती मुंबईची एक नांवारूपास आलेली संस्था म्हणून लवकरच प्रसिद्धीस आल्यावांचून राहणार नाहीं. मुंबईच्या संस्थेनें अशाचप्रकारें कामास लागलें पाहिजे. तिची स्थापना मोठ्या थाटानें झाली आहे. तिची घटना सुंदर आहे. परंतु वर्तमानपत्रद्वारें तिला प्रसिद्धी मिळाल्यानें, किंवा मोठमोठीं माणसें तिचे सभासद झाल्यानें, अगर कामगारांच्या यादींत त्यांचीं नांवें झळकल्यानें, कार्य-भाग व्हावयाचा नाहीं. लोकांना माहिती व्हावयास अशा प्रकारच्या जाहिरातीची जरूरी आहे असें कोणास वाटण्याचा संभव आहे; परंतु तिच्या जन्मोत्सवाच्या वेळीं जीं मोठमोठीं भाषणें झालीं तीं जर सार्थ करावयाचीं तर तशाच प्रकारची पुण्यास जी संस्था[2] आहे तिच्याच धोरणावर व तिच्याच पावलांवर पाऊल टाकून मुंबईच्या संस्थेनें कार्यास लागलें पाहिजे. आणि पुण्याची वाढ, किंवा पुण्यांतील नवजीवनसंचार कांहीं एका दिवसांत झालेला नाहीं. आज पुण्याकडे पाहिलें म्हणजे असें वाटतें कीं, राजकारण जणूंकाय त्याच्या बारशास पुजलें आहे! एखादें महत्त्वाचें कार्य ह्या संस्थेस दाखवून द्यावें व त्याचें महत्त्व व उपयुक्तता संस्थेस पटल्यास जोंवर दुसरें कसें करावें, काय करावें ह्याचा विचार करीत आहेत, तितक्या अवधींत पुण्याची संस्था तें कार्य करून दाखविते! ही संस्था नेहमीं जणूंकाय डोळ्यांत तेल घालून बसलेली असते व एखाद्या नवीन विचाराचा अगर विषयाचा ह्या संस्थेला वास लागतांच त्याविषयीं सर्व माहिती मिळवून कार्यकारी मंडळी कामास लागतात व तो विषय अगर तो विचार आप-

१. 'अशाच प्रकारें' कार्यरत राहण्याचें तिचें ध्येय गेलें, पुढें त्या संस्थेस बिलीयर्ड क्लबचें स्वरूप प्राप्त झालें आणि आतां ती नामशेष झाली आहे.

२. सार्वजनिक सभा.

लासा करून दाखवितात. विचार करावयास, निश्चय करावयास व कामास लागावयास तिला कांहीं वेळच लागत नाहीं. उन्हाळ्याच्या दिवसांत पुणें कसें कामास लागतें पहा. वर्षाचे ११ महिने रिकामपण असणारांना बाराव्या महिन्यांत पुणें आपल्याकडे ओढून घेतें. आणि ज्यावेळीं खुद्द पुण्यांतले कित्येक मोठमोठे लोक गिर्यारोहण करितात, त्यावेळीं ह्या व दुसऱ्या कित्येक लोकांना एकत्र आणून पुणें त्यांस कामास लावितें व ह्यावेळीं पुण्यांत बौद्धिक मेजवानीच होत असते असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. तथापि ह्या वसंतव्याख्यानमालेस प्रारंभ झाला कसा, दिवसेंदिवस तिचें महत्त्व कसें वाढत गेलें, ह्याचा इतिहास आज म्हटलें तर कोणास माहीत नाहीं. पुण्याचें नांव सर्वतोमुखीं व्हावयास कारण झालेली दुसरी संस्था म्हणजे न्यू इंग्लिश स्कूल ही होय. चार तरुण पदवीधर एकत्र होतात व एक शाळा प्रथम लहानशाच प्रमाणावर रूसु करण्याचें ठरवितात. त्या त्यांच्या प्रयत्नास यश येण्यासाठीं त्यांनीं केलेले प्रयत्न, त्यांनीं सोसलेली झीज, त्यांच्यावर झालेला टीकेचा भडिमार ह्यांकडे पाहतां त्यांना प्राप्त झालेलें यश त्यांच्या स्वतःच्या अंदाजापलीकडचें आहे असें दिसतें. त्यांच्या ह्या दीर्घ प्रयत्नामुळें पुणें शहराची कीर्ति अजरामर झाली आहे. त्याचप्रमाणें स्त्रियांच्या उच्च शिक्षणासाठीं पुण्यास नुक्तीच स्थापन झालेली संस्था पाहा. ह्या संस्थेचा इतिहास पाहिला म्हणजे पुण्यास केवळ विचारजागृतीवरच मुक्काम होत नाहीं, तर मनांत आलें म्हणजे विचार व आचार ह्याचें एकीकरण करावयास ते तयार असतात व त्याचप्रमाणें त्यांचा निश्चय झाला म्हणजे कोणत्याही इष्ट कार्यासाठीं पैसे मिळविण्याचे मार्ग त्यांस कसे सांपडतात हें दिसून येतें. पुण्याच्या लोकांच्या उत्साहाची कांहीं कल्पना जर तुम्हांस करून घ्यावयाची असेल तर पुण्याच्या वक्तृत्वसमारंभाच्या वेळचा उत्साह पाहा. ह्यावेळीं मोठमोठ्या महत्वाच्या, त्याचप्रमाणें क्षुद्र विषयांवर व्याख्यानांची धुमश्चक्री चालू असतां लोक तासच्यातास गभीरपणें तीं व्याख्यानें ऐकत बसतात. त्यावरून पुण्याच्या लोकांना नेहमीं कांहींतरी करावयास पाहिजे, म्हणजे सतत उद्योग हा त्यांचा गुणधर्म आहे असें दिसून येतें. ह्या दृष्टीनें पाहातां गेल्या थोड्या वर्षांत पुण्यानें जी कामगिरी बजाविली आहे ती पाहिली म्हणजे पुण्याचें महत्व ध्यानांत येतें. पुण्याच्या लोकांच्या अनेक गुणांमुळें पुणेकर पुढारी मुंबईकर पुढाऱ्यांना कधीं कधीं कसे लाजवितात ह्याचा अनुभव थोड्या दिवसांपूर्वीच आलेला लोकांच्या स्मरणांत आहेच. व्हाइस ऑफ इंडिया नांवाचें वृत्तपत्र काढण्याची सूचना पुढें आली, त्याबरोबर मुंबईचे हिशोबी लोकांनीं हें शक्य आहे काय, पत्र सुरू केलें तर त्याचा सर्व त्रास आपल्या हातून होईल काय, तें सुरू करावयास लागणारें भांडवल उभें करतां येईल काय, अशा

बारा पंचाइती सुरू केल्या; पण पुणेकरांनीं जेव्हां निक्षून सांगितलें कीं, तुम्हांला जर हें काम होत नसेल तर आम्ही इकडे तें करून दाखवावयास तयार आहों, त्यावेळीं मुंबईकरांचे डोळे चटकन् उघडले. दुसऱ्या एका वेळीं पुण्याच्या पुढाऱ्यांनीं मुंबईच्या पुढाऱ्यांना असेंच जागें केलें. दक्षिणा फंड असाच लोळत पडला होता. पुणेकरांच्या खटपटीमुळेंच त्याचा पत्ता लागला व दक्षिणा प्राइझ कमिटीची स्थापना झाली. राजकीय बाबतींतही पुणेकरांनीं मुंबईस जागें केलें तर किती बहार होईल! तुम्हीं मोठें नांव धारण करून संस्था काढिली आहे, पण पुढें काय झालें, योग्य प्रकारें कामास सुरवात केली किंवा नाहीं असें विचारण्याचा हक्क पुणेकरांस आहे. हें थोडें विषयांतर झालें. मुख्य लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही आहे कीं, नेहेमीं जागृत राहून कोठें काय चाललें आहे तें नीट काळजीपूर्वक पाहाणें व लागलीच जरूर दिसतांच कामास लागणें ही जी पुणेकरांत वृत्ति दिसते तिच्यामुळें पुणेकरांनीं नांव केलें आहे. पण हें कांहीं एकदोन दिवसांचें काम नव्हे, किंवा कामास लागलेले असतांना त्यांना कांहीं अडचणी आल्या नाहींत अशांतला भाग नाहीं; त्यांना अडचणी व संकटें आलीं व त्यांवर त्यांनीं जय मिळविला म्हणून ते आज हे दिवस पाहात आहेत. सर थॉमस मन्रो ह्यांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं तत्त्वज्ञान्यांप्रमाणें मी वादविवाद करीत बसत नाहीं. आजचा दिवस वाईट गेला, उद्यां त्याच्यापेक्षांही अधिक वाईट दिवस जाण्याचा संभव आहे असें रडगाणें गात न बसतां, वाईट दिवस आले तरी त्यांनाही अंत आहेच असें म्हणणाराच्या वर्तनांत जें धोरण दिसतें तें पुणेकरांचें आहे, असें म्हणणें मला अधिक सयुक्तिक दिसतें. पुणेकर पुढाऱ्यांना नेहमींच भरभराटीचे दिवस गेले आहेत असें कोणासही म्हणतां यावयाचें नाहीं. त्यांच्यावर बिकट प्रसंग आले, त्यांचें धैर्य कसास लावण्याचे प्रसंग त्यांच्यावर आले, त्यावेळीं त्यांनीं चिकाटी धरिली, आत्मविश्वास दाखविला, आणि त्याचें फळ आज त्यांना मिळत आहे. पुण्याच्या सार्वजनिक सभेला आजचे बरे दिवस येतील असें भाकित कोणीं केलें होतें? राजकीय बाबतींत चळवळ करणें म्हणजे अराजकतेचा प्रसार करणें होय असें ज्यावेळीं सरकारी अधिकाऱ्यांस वाटत होतें, त्यावेळीं सार्वजनिक सभेचा जन्म झाला. मूठभर माणसांनीं एकत्र व्हावें आणि भपकेबाज नांव धारण करून राजकीय विषयांचा खल करण्यासाठीं एक संस्था काढावी व त्या ठिकाणीं प्रजेच्या वतीनें प्रजेच्या हक्कांविषयीं चर्चा करून सरकारी अधिकाऱ्यांच्या वर्तनावर टीका करावी ही गोष्ट अधिकारी वर्गास त्यावेळपर्यंत अगदींच अपरिचित होती. वरच्या अधिकाऱ्यानें खालच्या अधिकाऱ्याच्या कारभारावर हक्कानें टीका करावयाची एवढीच गोष्ट त्यांच्या अंगवळणीं पडलेली. म्हणून डिझ-

रायलीला ज्याप्रमाणें गोल्डविन स्मिथ हा शिळ्या अराजकतेच्या बाता झोंकणारा असें वाटत होतें त्याप्रमाणें ही संस्था आहे असें सरकारी अधिकारी मानीत होते. आणि त्यांना असेंही वाटत होतें कीं, जोंपर्यंत ही संस्था केवळ वाचाळताच करीत बसली आहे, तोंपर्यंत तिच्यापासून कांहींही नुकसान व्हावयाची भीति नाहीं. अशीच कांहीं काळ बडबड चालवून संस्था एके दिवशीं राम म्हणेल अशी त्याची अपेक्षा होती. पण दरवाजा ठोठावीत राहा म्हणजे तो उघडला जाईल, ह्या साधु पुरुषाच्या शिकवणीनुसार ह्या संस्थेनें चिकाटी धरून सारखे प्रयत्न चालू ठेविले. कधीं कधीं भलताच दरवाजा ठोठावण्याची चूकही संस्थेच्या हातून झाली आहे, परंतु तिनें कांहींना कांहीं कार्य सतत चालू ठेविलें. अशा प्रकारच्या कार्यसातत्यामुळें तिचें सामर्थ्य वाढत गेलें आणि अधिकाऱ्यांना देखील संस्थेच्या टीकेकडे नेहमींच दुर्लक्ष करणें कठीण जाऊं लागलें. तथापि नंतर लवकरच असा कांहीं जमाव जमून आला कीं, त्यावेळीं उच्चासनीं लॉर्ड लिटनसाहेब व्हाइसराय ह्या नात्यानें विराजमान झालेले आणि त्यांच्या पायांपाशीं मुंबईकडे सर रिचर्ड टेंपल बसलेले. ह्या दोघांनीं वर्तमानपत्रांप्रमाणें सार्वजनिक सभेच्या तोंडाला खीळ घालण्याचा घाट घातला. परंतु असल्या धमकावण्यांना सभेनें मुळींच भीक न घालतां आपला उद्योग चालू ठेविला! सभेच्या हालचालीवर सक्त देखरेख ठेवण्यांत आली व बंगालमधून गुप्तपणें सरकारला माहिती पुरविणारीं माणसें पाठविण्यांत आलीं! त्यावेळीं अशा प्रकारचें कार्य करून बढती मिळविण्याचें एक साधनच अशा लोकांना प्राप्त झालें होतें. परंतु असले दिवसही सभेनें धैर्यानें घालविले. इकडे सरकार आपले सभेसंबंधाचे कारभार अगदीं गुप्तपणें जरी चालवीत होतें तरी सभेला सर्व कांहीं कळत असे! सभेच्या एखाद्या कामगाराची ओळख करून देते वेळीं गव्हर्नरसाहेब सर रिचर्ड टेंपल ह्यांच्या तोंडावरील मंद हास्य जणूंकाय असें संबोधीत असे कीं, बाबांनों, तुम्हांला दुसरा कांहीं कामधंदा नाहीं काय कीं तुम्ही ह्या सभेचे कामगार होत आहां, त्याचाही अर्थ ते जाणून असत! ते दिवसही सभेनें धैर्यानें घालविले आणि हें सभेचे कर्णधार धैर्यानें व चिकाटीनें काम करणारे पूज्य गणेश वासुदेव जोशी होते व सेक्रेटरीच्या हुद्यावर सीताराम हरि चिपळूणकर व शिवरामपंत साठे ह्यांच्यासारखीं कार्यदक्ष व मेहनती माणसें होतीं म्हणून. त्यांची अशी खात्री होती कीं, आपण जें कांहीं करीत आहों त्यांत गैर अगर गैरकायदा असें कांहींच नाहीं. सरकारची दृष्टि आज वक्र आहे, तीही कांहीं काळानें सरळ झाल्यावांचून राहाणार नाहीं. त्यांनीं आपलीं डोकीं शांत ठेविलीं व निर्धारपूर्वक आपल्या ठरलेल्या पद्धतीनुसार ते कार्य करीत राहिले. अशा प्रकारें हीं माणसें दक्षतेनें व शांत डोकें ठेवून वागूं लागल्यावर मग सरकार तरी

काय करणार ? सर रिचर्ड टेंपल हेही मोठे चाणाक्ष गृहस्थ होते. त्यांचें इतिहासाचें वाचन परिपक्व असल्यामुळें ते हें जाणून होते कीं, आपणास विरुद्ध वाटणारी एखादी पद्धतशीर चळवळ व त्या चळवळीच्या द्वारें राज्यकारभारावर होणारी विरुद्ध टीका ह्यांच्या द्वारें अशा संस्थांची भरभराटच होते; पण जोंपर्यंत कोणतीही संस्था पद्धतशीर रीतीनें आपलें टीकेचें कार्य करीत आहे तोंपर्यंत सरकारला त्या संस्थे-विरुद्ध कांहींही करितां येत नाहीं, हें जरी ॲशबर्नरसाहेबांस कळत नव्हतें, तरी टेंपल साहेबांना चांगलें कळत होतें. कारण, अशा टीकेचा रोंख कॉन्स्टिट्यूशनच्या विरुद्ध नसतो. ह्याचा परिणाम असा झाला कीं जरी कांहीं लोकांना सभेला फांसावर चढवावें असें वाटलें तरी ॲशबर्नरसाहेबांचा पक्ष उघडपणें कोणीही उचलला नाहीं आणि ते एकटेच फजीत पावल्यासारखे झाले. असें जरी त्यावेळीं झालें तरी ॲशबर्नरसाहेबांचें नशीब शिकंदर असल्यामुळें त्यांस फार दिवस थांबावें लागलें नाहीं. सर रिचर्ड टेंपल साहेब गेले आणि त्यांच्या जागीं सर जेम्स फर्ग्युसनसाहेब आले. हे साहेब अगदींच नवे, ह्यांना हिंदुस्थानची कांहींच माहिती नाहीं असें पाहून ॲशबर्नरसाहेबांनीं गव्हर्नर साहेबांवर आपल्या विचारांची छाप बसवि-ण्यास सुरवात केली आणि पहिली जी गोष्ट त्यांनीं केली ती अशी कीं त्यांनीं फर्ग्युसनसाहेबांची अशी समजूत घातली कीं, सार्वजनिक सभा ही स्वनिर्मित पुढाऱ्यांची सभा असून तिच्यावर एकदम प्रहार करणें अत्यंत अगत्याचें आहे. त्यामुळें गव्हर्नर साहेबांना मानपत्र अर्पण करण्याची आपल्याला परवानगी मिळावी अशी सार्वजनिक सभेची विनंति होतांच सभेवर सरकारचा घुस्सा झाला! तुमची पत काय आहे, तुमचे अधिकारी कोण कोण आहेत, तुमचे सभासद कोण आहेत, असें सभेला विचारण्यांत आलें व कार्यकारी मंडळाच्या कित्येक सभासदांना कांहीं प्रश्न व उलट प्रश्न विचारले गेले. त्यावरून सभेची इतिश्री होण्याची वेळ जवळच आली कीं काय अशी जबर शंका उत्पन्न झाली. परंतु संस्थेच्या कारकीर्दीला त्या वेळेपासून खरी सुरुवात झाली असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. सभेचे अध्यक्ष औंध संस्थानचे प्रतिनिधि व त्यांच्या बरोबर काम करणारीं माणसें खंबीर होतीं. त्यांनीं धीर सोडला नाहीं. कांहींची गाळण उडाली. परंतु संस्थेच्या सभासदांत धैर्यवीर पुष्कळ होते. ते मुळींच डगमगले नाहींत. इकडे गव्हर्नर साहेबांनीं मानपत्र घेण्याचें नाकारलें व तात्पुरता आपल्याला मोठी विजयश्री मिळाल्याचा आनंद ॲशबर्नरसाहेबांस झाला. परंतु लॉर्ड रिपन ह्यांनीं सार्वजनिक सभेनें देऊं केलेलें स्वागतपर मानपत्र सन्मानपूर्वक स्वीकारण्याचें कबूल केल्यामुळें ॲशबर्नरसाहेबांचा आनंद अल्प काळच टिकला व नंतर तर एकंदर सर्व पारडें फिरलें! अधिकाऱ्यांत सहानुभूति व सरळपणा

दिसून येऊं लागला व कांहीं काळ लोटल्यावर अनुभवाबरोबर फर्ग्युसन साहेबांचीही वृत्ति निवळली! ते खरेखरे ब्रिटन असल्यामुळें सांगोपांगीवर विश्वास न ठेवतां, सर्वकांहीं स्वतः पाहून नंतर आपलें मत बनविणें त्यांना अधिक पसंत पडलें. सार्वजनिक सभा अराजक चळवळ करणारी संस्था आहे अशी आड्डन गोळी अधिकारी मारीत होते. परंतु तुमचें म्हणणें सिद्ध करून दाखवा असें म्हणतांच अधिकाऱ्यांचें धाबें दणाणलें! आणि सभेच्या अर्जांतील सौम्य भाषा, सबळ पुरावा, योग्य मागण्या वगैरे पाहून लॉर्ड रिपन ह्यांनीं सार्वजनिक सभा ही एक उपयुक्त संस्था आहे असें जेव्हां म्हटलें, तेव्हां आपल्या सर्व श्रमाचें योग्य चीज झालें असें सभेच्या जबाबदार सभासदांना वाटलें. लॉर्ड रिपन ह्यांच्या उद्गारांत ही जी सहानुभूतीची झुळुक दिसली, तिच्यायोगें संशयाचें वातावरण नाहींसें झालें. आजपर्यंत आपला गैरसमज करून दिलेला असल्यामुळें जबाबदार माणसांनीं चालविलेल्या एका उपयुक्त संस्थेसंबंधानें आपण कशी भलतीच समजूत करून घेतली होती हें सर जेम्स ह्यांच्या ध्यानांत यावयास मग वेळ लागला नाहीं. सार्वजनिक सभेसंबंधाचें सरकारचें धोरण आतां सहानुभूतीचें व उत्तेजनपर असतें आणि ह्याबद्दल लॉर्ड रिपन व सर जेम्स फर्ग्युसन ह्यांस धन्यवाद देणें योग्य आहे. आतां तर सभेचें कांहीं विषयांवरील मत सरकारतर्फे विचारण्यांत येतें व तें लिहून आलें म्हणजे सरकार त्याचा काळजीपूर्वक विचार करीत असतें. पूर्वीचे दुराग्रह आतां राहिले नाहींत, सरकार व सभा हीं परस्परांस समजून वागत आहेत. पूर्वी सार्वजनिक सभा म्हणजे अराजनिष्ठ लोकांची टोळी असा समज होता, पण आतां सभेचें एकंदर कार्य, काम करण्याची पद्धत, तिची सरळ, निर्भीड टीका, सत्य व न्याय ह्यांविषयीं सभेच्या ठिकाणीं असलेला आदर ह्यांमुळें सरकारदरबारांत आदराची भावना उत्पन्न झाली आहे. आणि हें केवळ ज्यांनीं पुण्याला आजची स्थिति प्राप्त करून दिली आहे त्यांच्या व्यवहारचातुर्याचें फळ होय.[1] ह्या गृहस्थांसंबंधानें सविस्तर विवेचन आज ह्या ठिकाणीं स्थलाभावामुळें करितां येत नाहीं, परंतु पुण्यांतील नवजीवन व तेथील नाना चळवळी ध्यानांत घेतल्या म्हणजे त्यांच्या कर्तृत्वाची चांगली कल्पना होते. ज्यांनीं रात्रंदिवस पुण्याची चिंता वाहिली, निर्भीडपणें पुण्याच्या कल्याणासाठीं जे झटले ते सार्वजनिक काका, ऊर्फ गणेश वासुदेव जोशी जरी आज शरीररूपानें नाहींत तरी त्यांचा आत्मा त्यांच्या कार्याच्या रूपानें पुण्यांत चिररूपानें वास्तव्य करून आहे. सार्वजनिक सभेच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष मि. नूलकर आणि विशेषतः सभेचे चिटणीसद्वय चिपळूणकर व साठे

१ हे उद्गार माधवराव रानड्यांसंबंधानें आहेत.

ह्यांच्याकडे पाहिलें म्हणजे सार्वजनिक कार्कांच्या पावलावर पावलें कशीं टाकलीं जात आहेत त्याची कल्पना होते. वयोवृद्ध नूलकर हे सर्व प्रकारच्या अनुभवाचा लाभ सभेस देत आहेत. त्यांना सरकारी कामाचा व निरनिराळ्या प्रकारच्या सरकारी अंमलदारांचा प्रत्यक्ष अनुभव असल्यामुळें कुठें अडण्यासारखें आहे व कुठें कोणत्या प्रकारची खबरदारी घेतली पाहिजे हें त्यांना चांगलें कळतें. रा. साव्यांसारखीं माणसें आतां दिवसेंदिवस कमी होत आहेत. त्यांनीं एके काळीं उत्तम प्रकारची सेवा बजाविली आहे. मि. चिपळूणकर हे तरुण गृहस्थ संस्थेला लाभले आहेत ही फार समाधानाची गोष्ट आहे. ते हुशार व चाणाक्ष असून आपल्या सभोंवतालीं काय चाललें आहे व कोणत्या प्रकारच्या माणसांशीं आपला संबंध येत आहे याचें चांगलें निरीक्षण करून व पुष्कळशा गोष्टी ध्यानांत ठेवून विचारपूर्वक वागणारे गृहस्थ आहेत. शांतपणें व निर्धारपूर्वक काम करणारे असे दुसरे गृहस्थ म्हणजे रा. राजमाचीकर हे होत. अशाप्रकारें काम करणारीं माणसें पुण्यास आणखीं कित्येक आहेत. पुण्यास गेल्यावर तेथील परिस्थितीचें निरीक्षण करीत असतां हीं माणसें आढळतात. ह्यांच्या सर्व कामाचा विचार करितां ह्यांच्या सर्व कार्यांमागें एक अचाट बुद्धिमत्ता, अलौकिक कर्तृत्वशक्ति असून ती सर्व कार्यांस व योजनांस योग्य दिशा लावून देत असून शहरास भूषणभूत झाली आहे असें दिसून येतें. त्याचप्रमाणें हीच देवता आजच्या कार्यास दिशा लावून पुढील कार्याचें धोरण आंखून देत असल्याचें कळून येतें.[१]

पुण्याच्या ह्या कर्त्या लोकांमध्यें जे दोष असतील त्यांचेंही विवरण मीं करावें, अशी वाचकांची अपेक्षा असण्याचा संभव आहे. कारण ते सर्व प्रकारच्या दोषांपासून अलिप्त आहेत असें माझें मत असण्याचा संभव असणें शक्य नाहीं. पुण्याच्या लोकांमध्यें दोषही आहेत; परंतु गेल्या अल्प काळांत राजकीय विषयांची चर्चा करण्याच्या बाबतींत त्यांनीं इतकी सुधारणा केली आहे व त्यांची चर्चा व टीका करण्याचें धोरण इतकें पायाशुद्ध असतें कीं फक्त एकाच बाबतींत धोक्याची सूचना द्यावीशी वाटते. आजचे कार्य करणारे पुढारी आहेत तोंपर्यंत सर्व कांहीं ठीक आहे; परंतु त्यांच्या मागें ही जबाबदारी कोणाच्या शिरावर पडणार ? आजच्या धोरणानेंच काम करावयास तयार असणारे तरुण त्यांनीं आपल्या तालमींत तयार केले पाहिजेत, म्हणजे आजचेंच धोरण कायम राहून आजच्या लोकांना पुढील कार्य पाहून आपलेंच काम पुढें चाललें आहे असें वाटावें. अशाप्रकारें काम सतत चालू राहावयास पुण्यास व मुंबईस ह्या कार्यास

---

१. हेंही वर्णन माधवराव रानडे ह्यांस उद्देशून आहे.

वाहून घेणाऱ्या माणसांची फार आवश्यकता आहे. जनतेचें कल्याण साधण्यासाठींच सर्व कांहीं करावयाचें हा उच्च आदर्श पुढें ठेवून सर्व कार्यें निरपेक्षतेनें होऊं लागलीं म्हणजे सरकारलासुद्धां त्या कार्याकडे लक्ष देण्यावांचून गत्यंतरच नसतें.

इंदुप्रकाश पत्र हातीं असतांना ज्यांनीं त्यावेळच्या राजकारणासंबंधानें माहिती भरलेले स्पष्टोक्तिपूर्ण लेख लिहिले, ते स्वतः राजकारणापासून अलिप्त राहणें शक्य नव्हतें. ह्यावरून पाहतां १८८५ हें साल नारायणरावांच्या चरित्रांत राजकारणाच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें होतें असें दिसून येईल. ह्याच सालीं त्यांनीं मुंबई व पुणें येथील नवजीवनासंबंधीं तुलनात्मक लेख लिहून स्वतःचें मुंबईंत कायमचें वास्तव्य असूनही, अभिमानास बळी न पडतां, पुण्यांतील नवजीवनाची श्रेष्ठता कारणें देऊन त्यांनीं विशद केली. ह्याच सालीं स्थापन झालेल्या बॉंबे प्रेसिडेन्सी ॲसोशिएशनशीं त्यांचा संबंध जडला व तो पुढें अखेरपर्यंत टिकून राहिला. ह्याच सालीं विलायतेंतील जनतेपुढें हिंदुस्थानचें गाऱ्हाणें ठेवण्याची अपूर्व संधि त्यांस प्राप्त झाली. तेथें त्यांनीं आपल्यावर सोंपविलेलें कार्य किती उत्तम रीतीनें केलें त्याची माहिती मागें विलायतेंतील कामगिरी ह्या भागांत येऊन गेलीच आहे. ह्याच वर्षीं २९ दिसेंबर रोजीं ते विलायतेहून परत आले, व दुसऱ्या दिवशीं पहिल्याच राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनांत त्यांच्या महनीय कार्याचा उल्लेख करतांच सर्वांनीं मनःपूर्वक व उत्साहानें त्यांचा गौरव केला. हिंदुस्थानचे अत्यंत यशस्वी व लोकप्रिय व्हाइसराय लॉर्ड रिपन यांचा उत्तेजन देणारा संदेश कीं, "तुम्ही निराश होण्याचें कांहीं कारण नाहीं. पार्लमेंटच्या निवडणुकीच्या वेळीं जरी हिंदुस्थानच्या मित्रांस अपयश आलें आहे, तरी ह्या अपयशास हिंदुस्थानसंबंधींचा कोणताही प्रश्न कारण झालेला नाहीं. चर्च व आयर्लंडचा लढा ह्यांमुळें त्यांस अपयश आलें" हा ह्याच वर्षीं त्यांनीं अखिल हिंदुस्थानाची प्रातिनिधिक संस्था जी **राष्ट्रीय सभा** तीस निवेदन केला. ह्या वर्षींच्या राष्ट्रीय सभेंत त्यांस अधिक कार्य करणें शक्य नव्हतें.

राष्ट्रीय सभेची दुसरी बैठक कलकत्ता येथें झाली व तिचा रिपोर्ट पुढें मि. ए. ओ. ह्यूम ह्यांनीं तयार केला. ह्या वर्षीं नारायणरावांनीं राष्ट्रीय सभेच्या बैठकींत कौन्सिलच्या सुधारणेसंबंधानें फार महत्त्वाचें, मुद्देसूद, व्यवस्थित भाषण केलें. त्यांचें भाषण इतकें परिणामकारक झालें कीं, पुढें राजकारणांत महत्त्वाचें कार्य ह्यांच्या हातून होणार अशी अटकळ पुष्कळांनीं केली व मि. ह्यूम ह्यांनीं त्यांना कळविलें कीं, तुमचें भाषण सर्वांत अधिक महत्त्वाचें होतें असें मला स्वतःला जरी वाटत आहे, तरी सर्वांचें असें मत आहे कीं जीं चार महत्त्वाचीं भाषणें कॉंग्रेसमध्यें झालीं त्यांत

तुमचें होतें ह्यांत कांहीं संशय नाहीं.[१] ठरावाचा विषय मुख्यत्वें कौन्सिलची सुधारणा, ती करितांना कौन्सिलांस प्रातिनिधिक स्वरूप मिळण्याची आवश्यकता व तें स्वरूप कोणत्या प्रकारचें असावें हें त्या ठरावांत दर्शविलें होतें. पहिलें भाषण सुरेंद्रनाथ बानर्जी ह्यांचें झाल्यानंतर नारायणरावांचें भाषण झालें.[२] ह्या भाषणांत त्यांनीं प्रारंभींच असें सांगितलें कीं कौन्सिलें प्रातिनिधिक स्वरूपाचीं व्हावीं ही आमची मागणी केवळ भावनेला वश होऊन आम्ही करीत नाहीं. राष्ट्रीय सभा लोकांची प्रतिनिधी आहे. अर्थात् अशा प्रातिनिधिक स्वरूपाच्या संस्थेनें कौन्सिलें प्रातनिधिक असावीं अशी मागणी करणेंच रास्त होय. कॉंग्रेसच मुळीं लोकांची प्रतिनिधी नाहीं असें आमचे टीकाकार म्हणत आहेत हें मला माहित आहे. परंतु गतवर्षी ज्या आमच्या एका टीकाकाराला हें प्रातिनिधिक स्वरूप मुळींच मान्य नव्हतें, एवढेंच नव्हे, तर जेवढे लोक सभेस जमतात तेवढ्यांचीच ही सभा असें म्हणत होता तोच टीकाकार आतां म्हणूं लागला आहे कीं, राष्ट्रीय सभा ही हिंदु राष्ट्रीय सभा आहे ! अशाच प्रकारें त्याची दृष्टी निवळूं लागली तर त्यास लवकरच कॉंग्रेसचें प्रातिनिधिक स्वरूप मान्य होईल असें मानावयास हरकत नाहीं ! ह्या व्याख्यानांत मुख्यतः नारायणरावांनीं पांच मुद्यांचा विचार केला होता. ( १ ) प्रातिनिधिक स्वरूपाच्या संस्थांच्या वाढीस हिंदुस्थान आज अनुकूल नाहीं असें म्हणणारांस त्यांनीं योग्य उत्तर दिलें होतें. ( २ ) खुद्द ब्रिटिश सरकारची स्थापना ह्याच तत्त्वावर झाली आहे. ( ३ ) हें तत्त्व हिंदुस्थानास लागू कारण्याचा काळ आतां आला आहे. ( ४ ) राष्ट्रीय सभेनें प्रातिनिधिक स्वरूपाची योजना तयार करण्यापूर्वी कित्येक अनुभवी अँग्लो-इंडिअन गृहस्थांनीं अशाच प्रकारच्या योजना सुचविल्या आहेत. हिंदुस्थानांत जर राज्य करावयाचें आहे, तर हिंदी लोकांचें सहाय्य घेऊन त्यांच्या विचारानें तें करा, एवढेंच सांगणें. प्रातिनिधिक स्वरूपाच्या संस्था हिंदुस्थानाला माहीतच नव्हत्या हें म्हणणें चुकीचें आहे. जुना इतिहास सांगत आहे कीं, पूर्वी खेड्यापाड्यांत पंचायती व म्युनिसिपालिटी सारख्या संस्था असत. ह्या प्रातिनिधिक स्वरूपाच्या असत व त्यांचा जनतेवर इष्ट परिणाम होत असे, असें सर थॉमस मन्रो म्हणतो. त्यानें आणखी असेंही म्हटलें आहे कीं,

---

१. Your speech, if not the most important of the whole Congress, as I think it, is on all hands agreed to be one of the four most important, and it is desirable to have it in its best form.

२. नारायणरावांचें हें भाषण त्यांचीं भाषणें व लेख ह्यांच्या संग्रहांत २७१-२७८ ह्या पृष्ठांवर सविस्तर आलें आहे.

हिंदी लोकांच्या सहाय्यानें आम्हीं राज्य मिळविलें व तें त्यांच्या सहकार्यानेंच आम्हांला चालवितां येईल.[१] सर बारट्ल फ्रीअरसारख्या अनुभवी अधिकाऱ्यानें १८७१ सालीं लंडन येथें दिलेल्या व्याख्यानांत हिंदुस्थानांत सर्व सार्वजनिक व्यवहार प्रातिनिधिक स्वरूपाचे असतात असें म्हटलें आहे. जातींच्या प्रतिनिधींच्या सभा भरून जातिविषयक प्रश्नांचा निकाल लागतो व गांवाचे प्रश्न गांवपंचायती सोडवितात. सारांश, लोकांच्या सहाय्यावांचून अगर सहकार्यावांचून केलेलें राज्य एकतर्फी होतें व हेंच १८५३ सालीं सर चार्लस वूड ह्यांनीं सांगितलें होतें. "आम्ही व हिंदी लोक मिसळत नाहीं. आम्ही जातों, आम्ही राज्य करतों व आम्ही परत येतों." ( There is no mixture of the English population with the native population. We go, we govern and we return. ) दुसरें असें कीं, लोकांना आपल्या विश्वासांत घेऊन कारभार करणेंच उभयपक्षीं हितकारक आहे हें तत्त्व कित्येक मोठ्या अधिकाऱ्यांनीं पूर्वींच मान्य केलें आहे. मग आतांच सरकारला कां हरकत असावी ! सर डोनल्ड मॅक्लोडी हे पंजाबचे लेफ्टनंट गव्हर्नर असतांना ईस्ट इंडिया फायन्यान्स कमिटीनें मिठावरील कर वाढवावा काय असा जेव्हां त्यांना प्रश्न विचारला तेव्हां त्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं, मी माझें मत देण्यापूर्वीं प्रथम हिंदी लोकांचें मत मी विचारांत घेईन. कारण, कर वाढविल्यानें काय परिणाम होतील हें आपल्यापेक्षां त्यांनाच अधिक कळणें शक्य आहे. आणि हीं माझीं मतें पूर्ण विचारांतीं झालीं आहेत व माझ्या बरोबरीनें, माझ्या पूर्वीं, माझ्या हाताखालीं व माझ्या सभोंवार ज्यांनीं कामें केलीं त्यांच्यापैकीं पुष्कळांचीं अशींच मतें होतीं. हे विचार पंधरा वर्षांपूर्वीं प्रदर्शित केले होते.[२] त्यावेळीं शिक्षणाचा इतका फैलाव झालेला नव्हता. आज सरकार व प्रजा ह्यांचे हेतु परस्परांस समजावून देणारे लोक पुढें आले आहेत. आणि आतां हिंदुस्थानांत प्रातिनिधिक व्यवस्थेचें बीं रुजावयाचें नाहीं असें कसें म्हणतां येतें ? म्हणून माझें असें मत आहे कीं, आपण कौन्सिलें प्रातिनिधिक स्वरूपाचीं असावीं हें दाखवावयाचें व तीं कोणत्या रीतीनें तशीं होतील हें सुचवावयाचें. माझा स्वतःचा असा विश्वास आहे कीं, आपण ब्रिटिश सत्तेखालीं आहों त्याअर्थीं प्रातिनिधिक स्वरूपाच्या सत्तेचा विकास झाल्यावांचून राहणार नाहीं; आम्हांला जें हवें आहे तें आजच, अगर उद्यां कदाचित् मिळणार नाहीं. कारण, ह्या सभेचें बीजच मुळीं

---

१. We could never have conquered India without the assistance of the natives of the country and by them can we preserve it.

२. नारायणरावांनीं हे उद्गार १८८६ सालीं काढले होते.

" प्रतिनिधित्व " ह्यांत आहे. पुढें १८८७, १८८८, व १८८९ सालच्या राष्ट्रीय सभेच्या वैठकींत नारायणरावांनीं भाग घेतले. १८८७ सालीं मद्रास येथें भरलेल्या बैठकींत आर्म्स ॲक्ट मुळीं काढून टाकावा अशी जी मूळ सूचना होती व जिच्यासंबंधानें एक अशी उपसूचना पुढें आली होती कीं, शस्त्राच्या कायद्यांतील हरकत घेण्याजोगे जे भाग आहेत ते काढून टाकण्यांत यावे, तिच्यातर्फे नारायणरावांनीं भाषण केलें होतें. त्यावर्षी सुरेंद्रनाथ बानरजी ह्यांनीं प्रथम मूळ सूचनेवर जोरदार भाषण करून लोकांच्या टाळ्या मिळविल्या होत्या. त्याचप्रमाणें " उदयोन्मुख वक्ते[1] " बिपिनचंद्र पाल ह्यांनीं आवेशयुक्त भाषण करून लोकांस रिझविलें होतें. परंतु नारायणराव, दाजी आबाजी खरे वगैरे वकिलांचीं भाषणें झाल्यानंतर सुरेंद्रनाथांनींही सुधारलेली उपसूचनाच मान्य केली ! अलाहाबाद येथें १८८८ सालीं भरलेल्या राष्ट्रीय सभेंत सिव्हिल सर्विस परीक्षा लंडन व हिंदुस्थान येथें एकाच वेळीं व एकाच स्वरूपाची होण्याची आवश्यकता व ज्युरीची पद्धत अनेक प्रांतांत सर्वत्र सुरू करणें, ज्युरीच्या मतास न्यायाधिशानें मान देणें व वारंटाच्या खटल्यांत आपला खटला ज्यूरीपुढें चालावा अशी मागणी करण्याचा आरोपीस हक्क असणें ह्या विषयांवर नारायणरावांनीं भाषणें केलीं होतीं. १८८९ सालीं कॉंग्रेस पुन्हां मुंबईस भरली होती. त्यावेळीं सर विल्यम वेडरबर्न हे राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. नारायणरावांची व वेडरबर्न ह्यांची ह्यापूर्वीच ओळख झाली होती. ती पुढें दाट झाली व अखेरपर्यंत सर वुइल्यम व नारायणराव ह्यांचा पत्रव्यवहार चालू होता. त्यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या ह्या वर्षीच्या अधिवेशनांत नारायणरावांकडे कंठाळी ठराव सभेपुढें मांडण्याचें काम होतें. परंतु ठरलेल्या वेळांत पूर्वीच्या वर्षी ठराव केलेल्या दहा विषयांवर थोडें थोडें बोलण्यापेक्षां अधिक महत्त्वाच्या विषयांवर बोलणें नारायणरावांस अधिक पसंत पडलें. त्यांनीं प्रथम असें दाखविलें कीं, ह्या ठरावांतर्गत दहा विषयांत कांहीं विषय असे आहेत कीं, त्यांच्यासंबंधानें कॉंग्रेसनें सुचविलेल्या सुधारणा सरकारी अधिकाऱ्यांसही मान्य आहेत. ह्या बाबतींत मूळ कल्पना कॉंग्रेसची असें म्हणण्याची आवश्यकता नाहीं. कारण, गेल्यावर्षी आपल्या सभेंत भाग घेणारे, पण आतां न्यायमूर्ति झाल्यामुळें ज्यांस आपण मुकलों आहों, त्या तेलंगांनीं गतवर्षीच आपणास सांगितलें कीं राजकारणांत मूळ अस्सल कल्पना आपली असें म्हणूं नये. तथापि एवढें खरें कीं न्यायखातें व अम्मलबजावणी खातें हीं निराळीं झालीं पाहिजेत, त्याचप्रमाणें पोलिसच्या कारभारांत सुधारणा झाली पाहिजे, ह्या दोन गोष्टी सरकारी अधि-

---

१. नारायणरावांनीं त्यांना Rising Orator असें म्हटलें होतें.

काऱ्यांनीं मान्य केल्या आहेत. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत लष्करी शिक्षण देणाऱ्या संस्था असाव्यात व सँढर्स्ट सारखें इंडियन सँढर्स्ट कॉलेज येथें असावें ह्या विषयीं हिंदुस्थानचे कमांडर इन चीफ ड्यूक ऑफ कनॉट ह्यांचें मत अनुकूल आहे असें आज खात्रीलायक माहितीवरून म्हणतां येतें. दुसरे कांहीं विषय असे आहेत कीं, कॉंग्रेसनें ठरविलेल्या सुधारणांसंबंधानें सरकारी अनुकूलता दिसत नाहीं, तरी कॉंग्रेसनें जे पुरावे पुढें ठेवून कांहीं गोष्टी सिद्ध केल्या आहेत ते पुरावे खरे नाहींत असें कांहीं सरकारला म्हणतां येत नाहीं. उदाहरणार्थ, मिठावरील वाढविलेला कर घ्या. मीठ हें गोरगरिबांच्या जीवनास अत्यंत आवश्यक आहे. विलायतेंतल्या लोकांना चहा, साखर किंवा कोको ह्यांची जितकी आवश्यकता भासते त्यापेक्षांही हिंदुस्थानच्या गरीब लोकांना मिठाची गरज आहे. पण तेथें चहा वगैरे वस्तूवरील कर वाढविण्याची कल्पना चॅन्सलर ऑफ एक्स्चेकरला सुचणार नाहीं, पण आमच्या इकडे लेखणीच्या एका फटकाऱ्यासरशीं विरोधास न जुमानतां मिठावरील कर वाढविण्यांत आला! दुसरी अशीच गोष्ट वाढत्या लष्करी खर्चासंबंधाची होय. हा खर्च वाढत आहे हें सरकारला मान्य आहे. दोन वर्षांपूर्वी तो १,६०,००,००० पौंड होता, तो दोन वर्षांनीं २,००,००,००० वर आला आहे, आणि यासाठीं दुष्काळाच्या वेळीं उपयोगी पडणारा फंड काढावा लागला होता, त्याचा गैर उपयोग करणें भाग पडलें व आतां असा फंडच काढला नव्हता असें म्हणण्यापर्यंत पाळी आली आहे![1] शेवटीं मला सांगावयाचें एवढेंच कीं, ह्या ठरावांत जे अनेक विषय आहेत त्यांचा गोरगरिबांच्या कल्याणाशीं अत्यंत निकट संबंध आहे, म्हणून आपण सर्वांनीं त्यास मान्यता द्यावी.

यानंतर सुमारें १० वर्षें नारायणराव राष्ट्रीय सभेच्या बैठकीसाठीं निरनिराळ्या प्रांतीं गेल्याचें दिसत नाहीं. एवढ्यावरून ते राजकारणापासून अलिप्त होते असें मात्र नव्हे. कारण, त्यांचा बॅंबे प्रेसिडेन्सी ॲसोसिएशनशीं जिव्हाळ्याचा संबंध होताच. ह्या संस्थेचे ते १८८९ पासून १९०० पर्यंत चिटणीस होते व १८९६ सालीं कराची येथें भरलेल्या प्रांतिक परिषदेचे ते अध्यक्षहि होते. १९०० सालीं लाहोर येथें जी राष्ट्रीय सभा झाली, व त्या पूर्वींच्या दहा वर्षांच्या बैठकींत त्यांनीं हजर राहून भाग घेतलेला नसतांना अध्यक्षस्थानीं त्यांची जी योजना,

---

१. The Government has been reduced to the necessity of starting a famine insurance and afterwards using it for another purpose, ultimately denying that such a fund was ever created or existed !

झाली त्यावरून अन्यरीतींनीं राजकारणांत ते पुढाकार घेतच होते, हें सिद्ध होतें, आणि तें त्यांच्याच पुढील उद्गारांवरून उघड होत आहे :-

This is the first Congress that I attend, after an absence of ten years, having attended all the previous Congresses and though I have never been alienated from it, I cannot conceal from you my feeling that I return to my old love.

## प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष

कराची येथें प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष ह्या नात्यानें त्यांनीं १८९६ सालीं जे भाषण केलें तें अनेक दृष्टींनीं अभ्यसनीय व आजही बोधपर आहे. कारण, राजकीय चळवळीचें ध्येय काय असावें ह्याचा खुलासा त्यांनीं ह्या भाषणांत केला आहे. अध्यक्ष ह्या नात्यानें आपलें भाषण संपवितांना नारायणरावांनीं अशी आशा प्रदर्शित केली कीं, सर्व भाषणांत अघळपघळ गप्पा नसाव्यात, आपलें म्हणणें साधार असावें, व तर्कशुद्ध विचारसरणी व योग्य टीका त्यांत असावी ( Accuracy of statement, cogency of reasoning and moderation of criticism ). 'सामर्थ्य आहे चळवळीचें' हें खरें आहे. परंतु खरी माहिती, रीतसर टीका, आवेशाच्या भरांत वहावून न जाणें, व आपलें जें कार्य आहे तें पवित्र कार्य आहे हा विश्वास हें खरें पहातां आपल्या सामर्थ्याचें बीज आहे.[१] दुसरी महत्त्वाची गोष्ट त्यांनीं येथें सांगितली ती अशी कीं, आपण जे ह्या ठिकाणीं येतों ते केवळ टीका करण्याच्या हेतूनें, किंवा सरकारचा मार्ग अधिक कंटकमय करण्यासाठीं नव्हे, तर त्यांना सहाय्य करण्यासाठीं; लोकमत काय आहे याची त्यांस कल्पना करून देण्यासाठीं. त्याचप्रमाणें आम्ही जेव्हां प्रजेच्या गरजा सरकारपुढें ठेवितों व प्रजेच्या हक्कांची जाणीव सरकारांत उत्पन्न करण्याचा प्रयत्न करितों, त्याच वेळीं आमच्यावरील जबाबदारी व प्रजेच्या हितासाठीं निरपेक्षबुद्धीनें झटणें हें आमचें कर्तव्य आहे ह्याची आमच्या ठिकाणीं जाणीव असते. आणि त्याच हेतूनें आम्ही येथें जमलों आहों.[२]

---

१. I am sure that we all feel that our strength lies in our *facts*, in our *moderation* and above all in the *righteousness* of our cause.

२. In claiming rights and asking for the redress of grievances from Government on behalf of the people we recognise our own responsibilities and duties—the duty we owe to our countrymen of devoting ourselves to the cause of their welfare and progress. It is the due sense of that duty that has brought us here together.

ह्यावरून नारायणराव आपल्या भाषणांभोंवतीं पावित्र्याचें कवच कसें सिद्ध करीत असत तेंही सहज दिसून येतें.

कराची येथें केलेल्या अध्यक्षीय भाषणांत प्रथमतः प्रांतिक परिषदेची आवश्यकता व परिषदेच्याद्वारें होणारें कार्य ह्यांविषयीं त्यांनीं विवेचन केलें आहे. मागें एकदां अध्यक्ष ह्या नात्यानें भाषण करितांना ना. जव्हेरिलाल याज्ञिक ह्यांनीं प्रांतिक परिषदेची उपयुक्तता दाखविली. नारायणरावांनीं सांगितलें कीं, असली परिषद उपयुक्तच नव्हे, तर अत्यंत आवश्यक आहे. कारण, पूर्वी शिक्षणाचा इतका प्रसार झालेला नव्हता; सरकारच्या कानावर कांहीं गाऱ्हाणें घालावयाचें झालें कीं, जगन्नाथ शंकरशेट, डॉ. भाऊ दाजी, सर मंगळदास नथूभाई, नौरोजी फर्दुनजी, रावसाहेब मंडलीक इ० पुढाऱ्यांनीं चालविलेल्या **बॉंबे असोसिएशन** कडे सर्वांस धांव घ्यावी लागे. परंतु १८७० सालीं पुण्यास सार्वजनिक सभेची स्थापना दक्षिणेंतील गाऱ्हाणीं सरकारपुढें ठेवण्यासाठीं झाल्यापासून इलाख्यांतील राजकीय चळवळीस निराळेंच स्वरूप प्राप्त होऊं लागलें. जुन्या संस्थेनें आपल्या वेळीं फार उपयुक्त कामगिरी केली, पण आतां बाहेरच्या सर्व लोकांत जागृति होत आहे; म्युनिसिपालिट्या, लोकल बोर्डे, कौन्सिलें ह्यांच्या रचनेंत विशेष फेरफार होत आहेत, अशा वेळीं बाहेरच्या जिल्ह्यांतील मंडळीनीं आपापले विचार इलाख्याच्या ठिकाणीं कळवून त्यांचा खल करून जनतेचे विचार सरकारला कळविण्याचें काम अशा प्रकारची प्रांतिक परिषदच योग्यप्रकारें करूं शकते. शिवाय राष्ट्रीय सभा निरनिराळ्या प्रांतांच्या लोकांना एकत्र आणून निरनिराळ्या जातींच्या व धर्मांच्या लोकांमध्यें एकभाव उत्पन्न करण्याचें महत्कार्य करीत आहे. तेंच कार्य अल्प प्रमाणावर प्रांतापुरतें प्रांतिक परिषद करीत असते. अशा अर्थाची प्रस्तावना केल्यानंतर सिंधविषयीं त्यांनीं उद्गार काढतांना म्हटलें कीं, "एकेकाळीं सिंध प्रांत दुर्दैवी म्हणून गणला जात असे; सरकारचें इकडे लक्षही नसे; ह्या प्रांताची आबाळ होत असे. कराचीला पूर्वीच्या काळीं एकदां सर जॉर्ज क्लार्क (लॉर्ड सिडनॅह्याम् नव्हेत) नामक गव्हर्नर आले, हैद्राबादच्या बोटींत बसले, दोन दिवसांनीं तसेच परत आले. झालें! सिंध प्रांताची भेट घेतली! असा प्रकार पूर्वी होत असे. आतांचा मनु पालटला आहे. आतां ह्या प्रांताच्या भरभराटीकडे सर्व गव्हर्नरांचें लक्ष असतें. दुसरी एक गोष्ट अशी आहे कीं, ज्यावेळीं हा सिंध प्रांत खरोखरीच मागासलेला होता; येथें महत्त्वाचीं हुद्याचीं कार्यें करणारीं माणसें उपलब्ध नव्हतीं, अशा वेळीं मुंबई, पुणेंकडल्या थोर इसमांनीं येथें येऊन निरनिराळ्या कार्यांस उत्तम दिशा लावण्याचें श्रेय संपादिलें आहे. रावसाहेब मंडलीक, रा. ब. नूलकर, मामा परमानंद, रामकृष्णपंत भांडारकर, लक्ष्मण जगन्नाथ वैद्य, शंकरराव पंडित, वामनराव मोडक,

माधवराव कुंटे इ० व्यक्ति येथें येऊन त्यांनीं येथें शिस्तीचे पाये घातले, येथील अनुभवाच्या जोरावर पुढें हे गृहस्थ नांवारूपास आले आहेत. आतां येथें दयाराम जेठमल कॉलेज स्थापन झालेलें आहे, त्यामुळें आतां बाहेरचीं माणसें येथें आणण्याची गरज राहिलेली नाहीं. बारा वर्षांपूर्वी येथें सिंधसभा स्थापन झालेली असून आपल्या प्रांताच्या हिताकारणें झटणारीं अनेक लायक माणसें पुढें आलीं आहेत. आजपर्यंत प्रांतिक सभा अगर राष्ट्रीय सभा ह्या संस्थांस सिंधकडून जितकें सहाय्य व्हावयास पाहिजे होतें तितकें झालें नसेल; पण पुढें तें तसें होईल ह्यांत कांहीं संशय नाहीं. राजकीय चळवळीचें वारें सर्वत्र संचारत आहे. सिंधमध्येंही तें आलें आहे याची साक्ष दूरदूरचीं व निरनिराळ्या व्यवसायांतील माणसें आज एका हेतूसाठीं एकत्र होत आहेत ह्यावरून सिद्ध होत आहे."

प्रांतिकसरकारची शिल्लक व हिंदुस्थान सरकारकडून त्या शिलकेची होत असलेली व्यवस्था ह्यांविषयीं बोलतांना नारायणराव म्हणाले, "प्रांतिक सरकारांच्या तिजोरींत साल अखेर ठरलेल्या रकमेपेक्षां अधिक शिल्लक राहिली तर त्याच प्रांताच्या लाभासाठीं तिचा उपयोग करितां येईल असें आश्वासन हिंदुस्थान सरकारकडून मिळालें होतें. मात्र तसेंच कांहीं संकट ओढवलें व त्याच्या निवारणासाठीं हिंदुस्थान सरकारची शिल्लक संपली, सर्व लोकसुधारणेचीं कार्यें बंद ठेवण्याची पाळी आली, तर प्रांतिक सरकारच्या शिलकेचा उपयोग व्हावयाचा, असेंही ठरलें होतें. पण हल्लीं काय होत असतें ? प्रांतिक सरकारापाशीं शिल्लक आहे असें आढळतांच हिंदुस्थान सरकार त्यावर झडप घालतें व न्यूजंट साहेबांनीं एकदां बोलून दाखविलें कीं, शिल्लक अधिक ठेवावयाची नाहीं असा धडा ह्यावरून मुंबई सरकारनें घेतला आहे ! खरोखर प्रांतांची तक्रार अशी आहे कीं, श्रीमंत प्रांतांपेक्षां गरीब प्रांतांना प्रमाणतः अधिक रक्कम हिंदुस्थान सरकारच्या तिजोरींत भरावी लागते. उदाहरणार्थ, मद्रासनें पांच कोटी, एन. डब्ल्यु प्रॉविन्सिसनें साडेपांच कोटी, आणि बंगालसारख्या श्रीमान व अधिक लोकसंख्या असलेल्या प्रांतानें फक्त ४॥ कोटी रुपये भरावयाचे ही हिस्सेरशी बरोबर नाहीं. मुंबई इलाख्याच्या खर्चाच्या मानानें जरी फक्त पावणेतीन कोटीची भर हिंदुस्थान सरकारकडे झाली आहे, तरी लोकसंख्येचा विचार केला तर प्रत्येक पुरुष, स्त्री अगर मूल हिंदुस्थान सरकारच्या तिजोरींत दीड रुपया भरीत आहे असें दिसून येईल. मद्रास एक रुपया पांच आणे, पंजाब रुपयापेक्षां कमी, औंध १ रुपया तर बंगाल फक्त १० आणे ! यावरून ही विभागणी न्याय्य पद्धतीनें होत नाहीं असें आढळून येतें."

"तसेंच अबकारीखातें दारू-बंदी अगर दारूचा कमी प्रसार करणें ह्याकडे लक्ष न देतां वसूलवाढीकडेच लक्ष देत आहे ही फार खेदाची गोष्ट होय. पूर्वीं ताडी

मुबलक मिळत असे, व गरीब लोकांचें ताडीवर भागत असे. मि. दांत्रासारखे तज्ज्ञ सांगत आहेत कीं, ताजी ताडी अपायकारक नाहीं. परंतु आतां गांवठी दारूपासून सरकारचा अधिक फायदा होतो म्हणून ताडीच्या दुकानांस बंदीच करण्यांत येत आहे![1] [पोलीस खात्यांत सुधारणा व्हावयास पाहिजे असा ठराव सालोसाल राष्ट्रीयसभा करीत असते.] हें लक्षांत घेऊन ते म्हणाले, "१८९४ सालाच्या पोलिस कारभारासंबंधानें सरकारचा जो ठराव प्रसिद्ध झाला आहे त्यांत म्हटलें आहे कीं, आतां वरच्या दर्जाचीं माणसें पोलिस खात्यांत येऊं लागलीं आहेत, ही समाधानाची गोष्ट आहे. कारण अलीकडे असे पुष्कळ खटले उघडकीस आले आहेत कीं ज्यांत पोलिस अधिकाऱ्यांनीं आपल्या सत्तेचा पुष्कळ दुरुपयोग करून मारहाण केली आहे. अशा कांहीं खटल्यांची मी सहज नोंद ठेविली आहे. पुण्यांत नुक्ताच दोन लष्करी शिपायांवर खुनाचा आरोप ठेवून खटला चालू होता. सेशन जज्जानें ह्यांतील पुष्कळसा बनावट पुरावा पोलिसांनीं पुढें आणिला असें म्हटलें आहे. नाशिकच्या एका खटल्यांत "बेकायदेशीर अटक करण्यापूर्वी आरोपींनीं कांहीं सांगितलें नव्हतें" असें म्हटलें असून अयोग्य उपायांचा उपयोग केल्याबद्दल पोलिसास हायकोर्टानें दोष दिला आहे. विजापूर जिल्ह्यांतील एका खटल्यासंबंधानें सेशन्स जज्जांनीं असें म्हटलें आहे कीं, पोलिसच्या जुलमामुळें कबुली जबाब देण्यांत आला होता. यावरून पोलिसचा कारभार कोणत्या रीतीनें चाललेला आहे व त्यांत सुधारणेस किती जागा आहे तें दिसून येतें."

गेलीं नऊ वर्षें कराची म्युनिसिपालिटीला आपले दोन प्रतिनिधि कराची पोर्टट्रस्टचे दोन सभासद निवडण्याचा हक्क होता. परंतु कराची पोर्टट्रस्ट–बिल आणून म्युनिसिपालिटीचा हा हक्क हिरावून घेण्याची कारवाई चालली होती. म्युनिसिपालिटीनें ह्या आपल्या हक्काचा गेल्या ९ वर्षांत केव्हांही दुरुपयोग केलेला नसतां तिच्या हक्कावर आलेल्या धाडीविरुद्ध जी जोराची चळवळ झाली ती ध्यानांत घेऊन सरकारनें आपलें बिल परत घेतलें. ह्या बाबतींत कराची म्युनिसिपालिटी सर चार्लस आलिव्हंट ह्यांची ऋणी आहे. कारण, म्युनिसिपालिटीला मिळालेला हा हक्क काढून घेणें योग्य होणार नाहीं असें स्पष्टपणें त्यांनीं सरकारला कळविलें होतें.

---

१. The Abkari department has with a set purpose done everything in its power to wage a continuous crusade against it ( Toddy ) with a view to expelling artificially all demand for it, a policy at once opposed to the promotion of temperance and injurious to the health of the people.

सिंध प्रांताला स्वतःच्या गरजा आहेत व त्याच्या कांहीं तक्रारीहि आहेत. लॉर्ड सँडहर्स्ट येथें आले असतां सिंध सभेनें त्यांना जें मानपत्र दिलें त्यांत ह्यांचा उल्लेख आहे. पहिली गोष्ट म्हणजे येथील न्याय खात्याचें उत्पन्न पुष्कळ वाढलें आहे, पण खर्च मात्र आहे तेवढाच आहे! पुष्कळ वर्षें येथें सदर कोर्ट आहे, त्याचें चीफ कोर्ट करावें व तेथें तीन न्यायाधीश असण्याची आवश्यकता आहे, त्याचप्रमाणें ह्या प्रांतांत पोलिसखात्याची सुधारणा व न्यायखातें व अम्मल बजावणी खातें हीं निराळीं करण्याची आवश्यकता आहे. ह्या बाबतींत कौन्सिल-मध्यें ह्या प्रांताचे प्रतिनिधि मीर अल्लाबक्ष खान ह्यांनीं तक्रार करून वस्तुस्थिति सरकारपुढें ठेवली; पण तेवढें पुरेसें नाहीं. ह्या बाबतींत केवळ सिंधचें लोकमत जागृत करून उपयोगाचें नाहीं. सगळ्या प्रांतांनीं एक होऊन सिंधशीं सहकार्य केलें पाहिजे. सर्वांच्या अडचणी बहुतेक सारख्याच आहेत; तेव्हां सहकार्य व्हाव-यास अडथळा नसावा. परंतु तुमच्या स्वतःच्या अडचणी व गाऱ्हाणीं असलीं व त्यांच्यासाठीं अर्ज करणें, चळवळ करणें, हें सर्व जरी चालू असलें, तरीसुद्धां तुमच्या अडचणींच्या निवारणासाठीं सगळ्या इलाख्यानें एक होऊन एकमतानें तक्रार पुढें मांडली तर त्याचें वजन निःसंशय अधिक पडेल. आजपर्यंत सिंधच्या अडचणी काय आहेत, तक्रारी काय आहेत याचीच मुळीं बाहेरच्या लोकांना कल्पना नव्हती. म्हणून ह्या प्रांताकडे लक्ष नव्हतें असें त्यांनीं सुचविलें.

## मि. ह्यूम व नारायणराव

'Your life is an example to us all and may we always derive inspiration from it.' —*Chandavarkar*.

१८८६ सालीं मि. ह्यूम ह्यांनीं The Star in the East ह्या नांवाचें एक लहानसें पुस्तक त्या वेळच्या पुढाऱ्यांच्या इच्छेवरून लिहिलें. त्यावेळीं लॉर्ड डफरीन हे व्हाइसरॉय होते व राष्ट्रीय सभेसंबंधानें आंतून त्यांची पूर्ण सहानुभूति होती. हिंदी लोकांना सारखे हक्क असावेत हा त्या पुस्तकाचा विषय होता व त्याच्या प्रसिद्धीच्या बाबतींत ह्यूमसाहेबांनीं नारायणरावांचें साह्य मागितलें होतें. ह्या बाबतींत येथें विशेष जोरदार चळवळ झाल्यावांचून विलायतेंतल्या मित्रांस आपल्या वतीनें काम करण्यास उत्साह यावयाचा नाहीं, म्हणून त्यांनीं ता. १३ सप्टेंबरच्या पत्रांत हिंदुस्थानांतील सर्व वर्तमानपत्रांस हालविण्याचें काम नारायण-रावांवर सोंपविलें. कारण, नारायणराव केवळ जोरदार लेखकच नव्हते, तर त्यांचें इतर वर्तमानपत्रकर्त्यांवरही पुष्कळ वजन होतें; म्हणून नारायणरावांनींच

हें कार्य करावें अशी त्यांची इच्छा होती.[१] नारायणरावांनीं त्यावेळपर्यंत जें काम केलें होतें तें पाहून पुढें ह्यांच्या हातून पुष्कळ कार्य होईल अशी त्यांना मोठी उमेद होती. मी आणि माझ्यासारखे दुसरे पडद्याआड झाले म्हणजे हिंदुस्थानासाठीं तुम्ही उत्तम कार्य कराल अशी आमची भावना आहे.[२] तुम्ही तरुण आहांत, व त्यामुळें परमेश्वराच्या कृपेनें बहुत वर्षें हिंदुस्थानची सेवा तुमच्या हातून होणार आहे. मी आतां म्हातारा झालों आहें व पायाखालची जमीन एव्हांच ढांसळूं लागल्यासारखें वाटत आहे. मला आशा आहे कीं, हिंदुस्थानाला त्याचें योग्य स्थान मिळालेलें व आजच्या स्थितींतून त्याची सुटका झालेली तुम्हांस दिसेल ! अशाप्रकारें दोन वर्षें पत्रव्यवहार केल्यावर मि. ह्यूम ह्यांनीं नारायणरावांच्यापुढें एक विशेष सूचना ठेविली.

राष्ट्रीय सभेची बैठक वर्षाच्या अखेरीस एकदां होऊन भागत नाहीं. १८८८ सालीं मि. ह्यूम ह्यांना असें वाटलें कीं, सिंध व पंजाबमध्यें दोनतीन महिने फिरून शहरोशहरीं सभा भरवून राष्ट्रीय सभेची माहिती देण्याची आवश्यकता फार आहे. म्हणून नारायणरावांस ह्यूमसाहेबांनीं विचारलें कीं, तुम्हांला हें काम अंगावर घेतां येईल का ? तुमच्या हातांत एक वर्तमानपत्र आहे, आणि तुमचें कोर्टाचें वाढतें काम संभाळून दोन महिने तुम्हांला बाहेर प्रवास करणें शक्य होईल किंवा नाहीं याची मला खात्री नाहीं ![३] पण तुम्ही जर हें काम अंगावर घेऊन करावयास तयार नसाल तर मग दुसरा लायक इसम ह्या कामासाठीं कोण पहावा तेंच मला समजत नाहीं ![४] खरें सांगावयाचें म्हणजे माझा बंगाली वक्त्यांवर विश्वास नाहीं ![५] एकदां सुरेंद्रनाथ पंजाबांत गेले. तेथें कांहीं बरें करण्याच्या ऐवजीं आपल्या कार्याची

---

१. You are not only a powerful writer yourself, but you have great influence with other journalists and what I have to ask of you is that you will personally and through all those with whom you have influence do your utmost.

२. You are one of those to whom my friends look hopefully for sterling work for India after I and some others have gone " to where beyond these voices there is peace."

३. There is a pressing necessity for a really able and discreet political missionary to take a two or three months' tour holding public meetings and lecturing at all towns of any size in Sindh and the Punjab.

४. If I cannot get you, I do not know whom we can get.

५. I cannot trust Bengali orators.

हानि मात्र त्यांनीं केली. आणि अधिकाऱ्यांनीं आपल्याविरुद्ध जोराचें धोरण स्वीकारिलें[१]! तुमचें तसें नाहीं. तुम्ही एक तर कोणाला विनाकारण दुखविणार नाहीं आणि अधिकाऱ्यांची योग्य निवड करून त्यांना आमंत्रणें देऊन व्याख्यानास आणाल, आणि योग्य माणसांचीच अध्यक्षस्थानीं योजना कराल. दुसरें असें आहे कीं, ह्या अधिकारी लोकांना बंगाली लोक आवडत नाहींत व त्यांचेवर अधिकाऱ्यांचा विश्वासही नाहीं! मुंबईच्या लोकांसंबंधानें असा त्यांचा ग्रह झालेला नाहीं.[२] नारायणरावांवांचून हें काम करावयास लायक असा दुसरा कोणी इसम त्यांस आढळला नाहीं, म्हणून त्यांनीं नारायणरावांस आग्रह केला व नारायणरावांनीं पंजाबपर्यंत कॉंग्रेस प्रचार कार्यासाठीं बाहेर जाण्याचा बेत केलाही. बद्रुद्दिन तय्यबजी वगैरे पुढारी त्यांस ओळखीचीं पत्रें देणार होते. शिवाय त्यावेळीं राष्ट्रीय सभेसंबंधानें सरकारची दृष्टी दूषित झालेली नव्हती. पंजाबच्या ले० गव्हर्नरची व सिंधच्या कमिशनरची ओळख करून देणारें पत्र मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड रे ह्यांचेकडून आपण मिळवूं असें आश्वासन मि. ह्यूम ह्यांनीं नारायणरावांस दिलें होतें.[३] अखेरीस सिंध येथें उन्हाळा अतिशय आहे, मे महिन्यांत तेथें फार त्रास होईल, म्हणून फक्त पंजाबचा बेत कायम झाला. वाटल्यास वाटेंत अहमदाबादला उतरून प्रो. आबाजी विष्णु काथवटे[४] ह्यांच्या येथें उतरावें, ते तेथील व्याख्यानांची सर्व पूर्वतयारी करितील असें ठरलें होतें. लाहोर येथें जोगेंद्र चंद्र बोस, एम. ए. वकील ह्यांच्या येथें मुक्काम करावयाचा असें नक्की मुकरर झालें. ज्या ज्या ठिकाणीं ते जातील तेथली दिवाबत्ती, हॉल वगैरे संबंधाचे खर्च त्या त्या ठिकाणच्या लोकांनीं करावे असेंही ठरलें, पण अखेरीस कोठें तरी माशी शिंकली! राष्ट्रीयसभेच्या अधिकारी लोकांनीं जिल्हानिहाय कमिट्या नेमल्या, व प्रत्येक ठिकाणच्या

---

१. Surendra once went to the Punjab, but he did more harm than good and put the District officers against us worse than ever. ( *9–1–88* )

२. Besides they all distrust and dislike Bengalis but have no such feeling towards the Bombay people.

३. We might induce Lord Reay to give you an introduction to the Commissioner of Sind and to the Governor of the Punjab.

४. हे त्यावेळीं गुजराथ कॉलेजांत संस्कृतचे अध्यापक होते. श्री. काथवटे एल्फिन्स्टन हायस्कूलमध्यें शिक्षक असतांना नारायणराव त्या शाळेंत दाखल झाले होते व काथवट्यांच्या सूचनेवरून लॅटिन सोडून त्यांनीं संस्कृत भाषा घेतली होती.

कमिटीनें आपापल्या प्रांतांमध्यें राष्ट्रीयसभेची माहिती देण्याचें ठरलें, त्यामुळें राष्ट्रीयसभेचे एक सेक्रेटरी मि. ह्यूम ह्यांनीं केलेले सर्व बेत ढांसळले! मग ही हकीकत येथें देण्याचें कारण काय असा प्रश्न येथें उद्भवतो. त्याचें उत्तर असें आहे कीं, कॉंग्रेस प्रचारक ह्या नात्यानें मि. ह्यूम ह्यांनीं नारायणरावांसंबंधानें केलेली योजना आजपर्यंत कोठें प्रसिद्ध झालेली नाहीं. ह्यूमसाहेब किती दूरदृष्टि ठेवून माणसांची पारख करून आपल्या योजना ठरवीत होते, आणि त्यावेळीं व्हाइसरॉय, गव्हर्नर ह्यांची राष्ट्रीयसभेसंबंधाची दृष्टी दूषित झालेली कशी नव्हती हेंही ह्या सर्व माहितीवरून सर्वांच्या लक्षांत आणून द्यावें हाही वरील माहिती देण्याचा एक हेतु होता.

मि. ह्यूम ह्यांच्याशीं १८८६ सालीं नारायणरावांचा संबंध जडला, तो ह्यूम साहेबांच्या बहुतेक अखेरपर्यंत टिकून राहिला होता, हें येथें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ह्यूमसाहेब वयाच्या ८४ व्या वर्षी १९१२ सालीं ता. ३१ जुलै रोजीं पर-लोकवासी झाले, आणि १९१० पर्यंत नारायणरावांस त्यांचीं पत्रें येत असत. त्यांची शेवटलीं पत्रें बहुतेक नाताळाच्या सुमारास नारायणरावांस उत्तरादाखल आलेलीं आहेत. ह्यावरून स्वतः नारायणराव त्यांच्याशीं जडलेला संबंध कायम ठेवण्याचा प्रयत्न करीत असत असें दिसून येतें. १९०८ च्या नाताळांत लिहिलेल्या पत्रांत ते म्हणतात, "आज हिंदुस्थान व हिंदी लोक ह्यांच्या कल्याणासाठीं जें कांहीं होत आहे तें सर्व मी मागें राहून, नांवाची प्रसिद्धि न होऊं देतां करीत असल्यामुळें, हिंदुस्थानच्या लोकांना माझा विसर पडणें हें अगदीं साहजिक आहे; तथापि तुमच्या पत्रांसारखीं पत्रें आलीं म्हणजे हिंदुस्थानच्या ह्या एकनिष्ठ सेवकास व मित्रास सर्वच लोक विसरले नाहींत व कांहींना तरी अद्याप त्याचें प्रेमपूर्वक स्मरण होत असतें एवढें तरी खरें असा विचार मनांत येऊन जातो." ह्या नंतरचा त्यांच्या पत्रांतील भाग तसाच देणें बरें.

I am hopeful that we are now, despite the criminal mistakes of some few impatient and foolish persons, on the way to better things and better time for India's people and old though I be, I venture to hope that I may yet live to see a really substantial commencement of a freer and better rule in our Indian realm. ( *24-12-08* )

ह्यावेळीं नवीन सुधारणा लोकांपुढें आलेल्या होत्या व मद्रास येथें भरणारी राष्ट्रीयसभा, त्यांसंबंधानें कोणतें धोरण स्वीकारते त्यावर पुष्कळ गोष्टी अवलंबून राह-तील असें ह्यूम साहेबांस वाटत होतें म्हणून ते म्हणतात :—

I remain very anxious as to the outcome of this Madras Congress because I know how much the practical embodiment of the Reform sketched out by Lord Morley may, nay, will depend, on this.

ह्यावरून राष्ट्रीय सभेकडे त्यांचें किती लक्ष होतें त्याची आपल्याला कल्पना होते. शेवटीं नव्या हिंदुस्थानास आपला आशीर्वाद देतांना ते म्हणतात:—

"I do believe that as India's picked men gradually (and it is intended *here*, that they should) get their hands upon the reins, a growing measure of prosperity will soften the hard and cruel features of the misery and poverty in which so many of India's children are ever struggling and fainting and so in God's good time lead up to a rejuvenated India, happier and better, than it has ever been within historic times."

१९०९ सालीं ह्यूम साहेब बरेच आजारी होते. जुलैच्या प्रारंभीं त्यांना नारायणरावांचें ता. १९ जूनला लिहिलेलें एक पत्र[१] गेलें होतें. त्यानंतर त्या पत्राचें उत्तर एक विस्तृत पत्र लिहून द्यावें असा ह्यूम साहेबांचा विचार होता. तें पत्र त्यांनीं नित्य आपल्या दृष्टीपुढें ठेविलें. शेवटीं इतर कामें व आजार ह्यांमुळें त्यांस उत्तर लिहावयास सवड झाली नाहीं. पण नंतर लहानसें तर लहानसें पत्र लिहिणें बरें, कारण, थांबलों तर मुळींच कदाचित् पत्र लिहिणें शक्य होणार नाहीं, असें म्हणून त्यांनीं पत्र लिहिलें आहे.[२] नारायणरावांसंबंधानें ह्यूम साहेबांना एक विशेष प्रकारचा आपलेपणा वाटत असे. पूर्वीपासून त्यांची नारायणरावांकडे विशेष ओढ असे व जरी कधीं कधीं त्यांना त्यांच्या (नारायणरावांच्या) विचारांचा अंत कळत नसे, तरी त्यांची अशी खात्री होती कीं, नारायणराव एक विशेष कर्तृत्ववान् पुरुष आहेत, आणि त्यांनीं कोणतेंही कार्य हातीं घेतलें तरी त्यांत त्यांना यश आल्यावांचून राह-

---

१. ह्यूम साहेबांचा ८१ वा वाढ दिवस होऊन गेल्यानंतर लिहिलेल्या पत्रांत नारायणराव म्हणतात:—

I am writing after the event but better late than never, and my deep regard for you and India's grateful recollection of all you have done for her prompt men to offer my felicitations. Your life is an example to us all and may we always derive inspiration from it.

२. I feel that I must write *now*, even though it be a poor letter, lest perhaps I should never write at all.

णार नाहीं.[१] इतका त्यांना नारायणरावांविषयीं निकटपणा वाटत असे. ज्याप्रमाणें एखाद्या वडीलधाऱ्या माणसानें आपल्या कुटुंबांतील एखाद्या कर्त्या व्यक्तीस पत्र लिहावें त्याप्रमाणें ह्यूम साहेब नारायणरावांस मोठ्या कळवळ्यानें पत्रें लिहीत. ह्याच पत्रामध्यें त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, वेडरबर्न[२] आणि मी इतरांच्या सहाय्यानें हिंदुस्थानच्या कारभारांत कांहीं महत्त्वाच्या सुधारणा घडवून आणण्यासाठीं खटपट केली. कारण आमचा असा विश्वास आहे कीं, हिंदुस्थानाला हक्क मिळालेच पाहिजेत आणि आमच्या राज्यकारभारांत ज्या रशिअन पद्धति शिरल्या आहेत त्या समूळ काढल्या पाहिजेत. परंतु इतकें करूनही ज्यांना मी चांगला ओळखीत आहें, अशा कित्येक चांगल्या लोकांना त्यांची चौकशी न करतां,

---

१. नारायणरावांविषयीं ह्यूम साहेबांना किती ओढा वाटत असे तें पुढील वाक्यांवरून ध्यानांत येण्यासारखें आहे.

"My dear friend, I have always, as you know, liked you sincerely, and though I could not altogether at times understand your position, I have ever been deeply interested in you and sincerely and earnestly hopeful that you would succeed in whatever you undertook and lead a happy and useful life and so far as I know and have heard my good wishes for you have been more or less accomplished.

२. Our dear friend Wedderburn and I have, with others, laboured hard to bring about some of the more important reforms which India's people are justly entitled to and to root out for ever from the British administration of our dear Indian land those shameful Russian methods and regulations, under which, still, despite all the pressure we have collectively brought and ought to bring to bear upon on the authorities here, numbers of prefectly innocent Indians, some of them as I know personally, thoroughly good men and true have been for months eating away their lives and health in jails, uncharged, untried victims to the fears and folly of incompetent rulers and dishonest subordinates. It is very sad ! But it has been whispered to me that our combined efforts have not been wholly vain and that before very long something of what we have hoped and laboured for may come about. (*5-8-1909.*)

अगर त्यांच्यावर कांहीं आरोप न ठेवतां त्यांना तुरुंगांत डांबून[१] ठेवलेलें आहे. परंतु आम्हांला असें कळलें आहे कीं, आमचे आतां पर्यंतचे प्रयत्न व्यर्थ गेले नसून ह्या लोकांची लवकरच सुटका होणार आहे. नालायक अधिकारी व त्यांच्या हाताखालचे अप्रामाणिक नोकर ह्यांच्या भीतीला व अविचाराला हीं चांगलीं माणसें बळी पडलीं आहेत असें ह्यूम साहेबांनीं स्पष्ट म्हटलें आहे. शेवटीं त्यांनीं असेंही म्हटलें आहे कीं, जेथें गेल्यानंतर कोणी कोणाला दिसत नाहीं अशा ठिकाणीं येथून कायमचा जाण्यापूर्वी, आज जी बातमी आहे ती खरी ठरली तर मला अतिशयच आनंद होईल.[२] शेवटीं सर्वांचा निरोप घेतांना नारायणरावांच्या पत्रांत सर्व लोकांना असें बजावून सांगितलें आहे कीं, पुढेंमागें तुम्ही कांहीं निराळ्या योजना केल्यात व त्यांत तुम्हांला यश प्राप्त झालें, तर नेहमीं हें लक्षांत ठेवा कीं, जे स्वार्थाचा तिळमात्र विचार न करितां इतरांच्या कल्याणासाठीं राबतात त्यांच्याकडे सर्व यशाचा वांटा जावयाचा असतो![३]

१९०९ सालीं हिंदुस्थानांत अशी बातमी आली होती कीं, ह्यूमसाहेब हिंदुस्थानाला एकदां लवकरच भेट देणार आहेत! नारायणरावांनीं देखील "लवकरच तुम्ही मुंबईस येणार हें ऐकून मला फार आनंद झाला. कारण तुम्ही येथें आलांत म्हणजे तुमच्या सहवासाचा लाभ होईल व कांहीं चळवळी तुमच्या सांनिध्यांत राहून करितां येतील." असें १२ डिसेंबरच्या पत्रांत लिहिलें. पण तें पत्र बहुतकरून मि. ह्यूम ह्यांचें पोंचण्यापूर्वीचें असावें. त्यांनीं सौ. लक्ष्मीबाई चंदावरकर ह्यांना लिहिलेल्या पत्रांत म्हटलें आहे कीं, लोक मला विचारतात कीं, मी मुंबईस एकदां येऊन कां जात नाहीं! त्याचप्रमाणें कांहीं लोक असेंही विचारतात कीं हिंदुस्थानांत येऊन कोट्यवधी लोकांच्या कल्याणासाठीं तुम्ही कां झटत नाहीं? ह्या प्रश्नांना उत्तर देतांना त्यांनीं म्हटलें आहे कीं मी तिकडे येऊन करणार काय? सर्वांनीं एकजुटीनें जेथें काम करावयास पाहिजे तेथें निरनिराळे पक्ष होऊन त्यांनीं महत्त्वाच्या विषयांची अशी विभागणी केली आहे कीं मी तेथें येऊन

---

१. बाबू कृष्णकुमार मित्र इ. गृहस्थांस उद्देशून हें लिहिलें आहे.

२. My heart is very full with this matter and it would be a great joy to me if before I go hence to be no more seen of men, I could hear of the actual advent of what is rumoured to be coming.

३. If your schemes and plans succeed never forget that the chief blessing and crown is reserved for those labours undertaken unselfishly for the good of others.

काय करणार हेंच मला समजत नाहीं.[१] दुसरें असें कीं, माझी प्रकृति इतकी दुबळी झाली आहे कीं, एक आठवडाभरही मला प्रवासाचा त्रास सोसवेल असें वाटत नाहीं. त्यापेक्षां येथें शांतपणें व गुप्तपणें आपल्या सर्वांपुढें जें ध्येय आहे तें आटोक्यांत आणण्याच्या कामीं जेवढें कांहीं करतां येईल तेवढें करणें एवढयांतच आतां मी तृप्त असलें पाहिजे.[२]

आमच्या हातीं आलेलें ह्यूमसाहेबांचें ता. २५ डिसेंबर १९१० चें पत्र हेंच नारायणरावांस आलेलें त्यांचें शेवटचें पत्र असें वाटतें. निदान नारायणरावांच्या संग्रहांतलें तरी हें शेवटलें पत्र होय. ह्या पत्रांत आपली प्रकृति आपल्या कल्पनेच्या बाहेर सुधारल्याचें त्यांनीं म्हटलें आहे! प्रकृति इतपत सुधारली आहे असें पाहून डॉक्टरांसही नवल वाटत आहे असें विधान ह्या पत्रांत त्यांनीं केलें आहे. प्रकृति अशीच सुधारली तर एकदां हिंदुस्थानांत जाऊन यावें असें त्यांना ह्या वेळीं फार वाटूं लागलें होतें! परंतु हवेंत होणारा फेरबदल, एवढा लांबचा प्रवास, खाण्यापिण्यामध्यें होणारी गैरसोय आतां सहन होईलसें वाटत नाहीं असें त्यांनाच वाटत होतें; तथापि प्रकृतीच्या अशा स्थितींतही हिंदुस्थानच्या भावी स्थितीसंबंधानें त्यांस फार आशा वाटत होती. ते म्हणतात, हिंदुस्थानाला बरे दिवस यावे, लोकांच्या हातीं अधिक सत्ता यावी यासाठीं तुम्ही व ज्या दुसऱ्या कित्येक मित्रांनीं माझ्याबरोबर सहकार्य करून प्रयत्न केले त्यांची मला वारंवार आठवण होते. आपल्यांतले जे कोणी वांचून मागें राहतील त्यांच्या अद्यापही पुष्कळ निराशा व्हावयाच्या आहेत हें मी जाणून आहें. परंतु कितीहि विरोध झाला आणि वारंवार कितीहि निराशा झाली, त्याचप्रमाणें नवीन हक्क मिळावयास कालावधि लागला, तरी ज्याप्रमाणें संध्याकाळीं मावळलेला सूर्य हिंदुस्थानांत, त्याचप्रमाणें आमच्याकडेही खात्रीनें दुसऱ्या दिवशीं उदय पावतो, त्याप्रमाणें हिंदी लोकांना ह्यापुढें बरे दिवस येणार हें तितकेंच निश्चयात्मक रीतीनें खरें आहे.[३] ”

---

१. Parties have so divided the issues which ought to work in entire harmony for India's cause that I do not see what I *could* do to any purpose if I did come out.

२. But here working silently and so to say secretly I am still able to do a little towards the ends we all aim at and with this have to be content.

३. Despite all opposition, we may feel perfectly certain that though it be cruelly dilatory in arriving that better time for India's people is now as certain to come as the sun is certain to r ise, with you in the East as with us in the West.

ह्या पत्राच्या अखेरीस Ever yours, dear Chandavarkar, your sincere friend, असें म्हणून ह्यूमसाहेबांनीं सही केली आहे. खरें पहातां वर ह्यूमसाहेबांच्या ज्या पत्रांचा उल्लेख आम्हीं केला आहे व ज्यांतील कांहीं उतारे घेतले आहेत तीं पत्रें ह्यूमसाहेबांनीं नारायणरावांना लिहिलीं त्यावेळीं ते हायकोर्टाचे न्यायाधीश असल्यामुळें प्रत्यक्षपणें राजकारणांत कोणत्याही प्रकारें भाग घेत नसत. असें असूनही ह्यूमसाहेब व नारायणराव ह्यांचें पूर्वीं जडलेलें नातें परस्परांनीं कायम ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. नारायणराव जरी न्यायाधीश होते, तरी त्यावेळच्या राष्ट्रीयसभेचें राजकारण त्यांस मान्य होतें. आणि त्यांच्याठिकाणीं स्वतः ह्यूमसाहेबासंबंधानें किती प्रेमाची व आदराची भावना होती हें नारायणरावांनीं ह्यूमसाहेबांना वाढदिवसास उल्लेखून पाठविलेल्या पत्रावरून आपणास कळून चुकलें आहेच.

## राष्ट्रीयसभेचे अध्यक्ष

विद्यार्जन संपल्याबरोबर नारायणराव हिंदी राजकारणाच्या क्षेत्रांत उतरले. वृत्तपत्राचे संपादक या नात्यानें त्यांनीं राजकारणाचा अभ्यास केल्यावर त्यांनीं कॉँग्रेसच्या चळवळीमध्यें भाग घेण्यास प्रारंभ केला व त्या कार्यांत त्यांनीं पहिल्या दर्जाच्या कार्यकर्त्यांमध्यें स्वतःची गणना होईल अशी योग्यता संपादन केली; तेव्हांच्या राजकारणांत आतांच्याप्रमाणें कोणत्याहि व्यक्तीची राजकीय योग्यता ठरविणाऱ्या कांहीं मानाच्या जागा निश्चित होत्या. त्यांपैकीं पहिली मानाची जागा म्हणजे प्रांतिक राजकीय परिषदेचें अध्यक्षस्थान ही असून तिच्यावर विराजमान होण्याची संधी नारायणरावांना १८९६ सालीं मिळाली वगैरे इतिहास पूर्वीच्या कथाभागांत येऊन गेलेला आहे. हिंदी राजकारणांत अव्वल दर्जाच्या मानाची जागा म्हणजे राष्ट्रीयसभेचें अध्यक्षस्थान ही होय. आज राष्ट्रीयसभेच्या कार्याची आणि विचाराची दिशा पार बदलून गेलेली असली तरी तिच्या अध्यक्षत्वाचा मान पूर्वीसारखाच कायम आहे. कॉँग्रेसच्या अखिल राष्ट्रीय अधिवेशनाच्या अध्यक्षस्थानाची माळ नारायणरावांच्या गळ्यांत १९०० सालीं पडली. ज्यावेळीं त्यांना अध्यक्ष नेमण्याची वाटाघाट कॉँग्रेसच्या कार्यकर्त्यांमध्यें चाललेली होती त्याचवेळीं सरकारांत त्यांना मुंबई हायकोर्टाच्या न्यायमूर्तींच्या जागीं बसविण्याची वाटाघाट चालली होती; हा योगायोग विलक्षण असून लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट ही कीं, कॉँग्रेसच्या अध्यक्षस्थानावरून उतरतांच न्यायाधीशाच्या आसनावर बसावयाचें इतकें स्पष्ट झालें असतांही नारायणरावांनीं आपल्या मतांच्या आविष्करणांतील निर्भीडपणाला नरम होऊं दिलें नाहीं. लाहोर

शहरीं १९०० सालीं काँग्रेसचें अधिवेशन झालें तेव्हां देशांत दुष्काळाची भयानक पीडा सुरू होती. प्रांतचे प्रांत उजाड बनतात कीं काय असा धोका अधिकाऱ्यांना उत्पन्न होऊन लॉर्ड कर्झनसारख्या करारी व कर्तबगार व्हाइसरॉयांच्या नेतृत्वानें हिंदुस्थानास वारंवार पछाडणाऱ्या दुष्काळाच्या प्रश्नाकडे राज्याधिकाऱ्यांचें लक्ष गुंतलें होतें. दुष्काळाच्या घोर आपत्तीची छाया देशभर थैमान घालीत असतां नारायणरावांना दुसऱ्या कोणत्याच राजकीय विषयाचा आपल्या भाषणांत विचार करतां आलेला नाहीं. परंतु दुष्काळ हा विषय एक प्रकारें सगळ्या मानवी जीवनाच्या पाळामुळांपर्यंत जाऊन भिडणारा आहे. अवर्षणानें, अतिवृष्टीनें किंवा टोळधाडीसारख्या संकटानें दुष्काळाचा उपद्रव इतर देशांतून देखील जनतेला अधूनमधून सोसावा लागतो; परंतु हिंदुस्थानांत त्याचे जसे परिणाम आढळतात, तसे ते इतर देशांतून दृष्टीस पडत नाहींत. हिंदी शेतकऱ्याला दुष्काळाशीं क्षणभरसुद्धां सामना करवत नाहीं. दुष्काळाच्या दर्शनासरसा तो कोलमडून पडतो. याचें कारण त्याच्यापाशीं सांपत्तिक त्राण मुळींच असत नाहीं हें होय. अशी निस्त्राण स्थिति हिंदी शेतकऱ्याची कां व्हावी याची मीमांसा करूं लागल्यास नाना मतें पुढें येतात; नारायणरावांनीं या साऱ्या मतांची छाननी आपल्या भाषणांत केलेली असून हिंदुस्थानांतील दुष्काळ या विषयाचा अभ्यास करूं इच्छिणारांना आज देखील तें भाषण उपयुक्त वाटल्याशिवाय रहाणार नाहीं. हिंदुस्थानी प्रजा अतिशय दरिद्री असल्याबद्दल काँग्रेसनें प्रारंभापासून सरकारच्या कानीं हाकाटी चालविली होती. दुष्काळांत हिंदी शेतकऱ्याला टिकाव धरतां येत नाहीं, याचें एक मुख्य व महत्त्वाचें कारण म्हणजे निस्सीम दारिद्य असल्यानें तेंच प्रथम आपल्या विचारांत घेऊन नारायणरावांनीं म्हटलें आहे कीं, 'मोठाल्या सुधारणांची गति नेहमींच मंद असते आणि पुष्कळदां तर दैवयोगाच्या अनुकूलतेशिवाय या गतीला वेग चढत नाहीं, अशा तात्पर्याचीं उदाहरणें सांपडतात. आजचा दुष्काळ हा दैवयोग अशाच स्वरूपाचा आहे. राज्यकर्त्यांना दुष्काळामुळें शेतकऱ्यांच्या खऱ्या स्थितीकडे लक्ष देण्याची जरूरी भासूं लागली असून काँग्रेसची हिंदी दारिद्याविषयींची हाकाटी व्यर्थ नव्हती, अगदीं रास्त होती असें सिद्ध झालें आहे.' ही वेळ ब्रिटिश मुत्सद्दी फुकट दवडणार नाहींत, अशी आशा व्यक्त करतांना नारायणरावांनीं लॉर्ड रोजबरीच्या शब्दांत 'ब्रिटिशांना आली वेळ कशीतरी मारून न्यावयाची आणि पुनः वेळ येईपर्यंत स्वस्थ राहावयाचें' ही संवय असल्याचा इषारा दिला आहे. यानंतर नारायणरावांनीं आपल्या भाषणाचा ओघ शेतकऱ्यांच्या स्थितीकडे वळविला असून पहिल्या प्रथम 'शेतकरी कर्जबाजारी असतो' या सिद्धान्ताचे धागेदोरे पारखले आहेत. शेत-

करी कर्जबाजारी कां होतो याचीं अनेक व भिन्नभिन्न कारणें सांगण्यांत येतात. शेतकरी लग्नकार्यांत पैशाची उधळपट्टी करतो व म्हणून त्यास सावकाराकडे उसनवारी करावी लागते ! या मताचा समाचार घेतांना नारायणरावांनीं दक्षिणेंतील शेतकऱ्यांना सावकारी जाचांतून सोडविण्याकरितां निर्माण करण्यांत आलेल्या कायद्यासंबंधींचे अहवाल समोर ठेवून असें दाखवून दिलें आहे कीं, 'शेतकऱ्याला सावकाराच्या जाळ्यांत पडण्याची पाळी येऊं नये म्हणून कसलाच उपाय सरकारानें त्या कायद्यांत योजिलेला नाहीं. शेतसारा शेतकऱ्याला बिनतक्रार सरकारी तिजोरींत भरावा लागतो आणि वरील कायदा शेतकऱ्याशिवाय इतर देवघेवीच्या व्यवहारांतील जुलमापासून शेतकऱ्याचा बचाव करण्यासाठीं आहे. ही देवघेव अर्थातच शेतसाऱ्याच्या मानानें गौण स्वरूपाची असते. वास्तविक शेतकऱ्याच्या वसुलीचा जो कडकपणा आहे, त्याला कोणताच कायदा स्पर्श करीत नाहीं.'

याच सुमारास शेतकऱ्यांकरितां सहकारी तत्त्वावर बँका काढण्याचा विचार प्रांतोप्रांतीं चालला होता. मुख्य प्रश्नाच्या मानानें हा विचार एक प्रकारें क्षुद्रच समजला पाहिजे असें सुचवून नारायणरावांनीं याही बाबतींत सरकारनें चालढकलीचें धोरण कसें स्वीकारलें आहे याचा खुलासा केला आहे. एका ठिकाणीं कल्पना निघाली, ती थोडी मूर्तावस्थेला आली तोंच प्रांतिक अधिकाऱ्यांच्या हातांतून त्या कल्पनेचा कारभार काढून घेऊन हिंदुस्थान सरकारानें सार्वत्रिक योजना अंमलांत आणण्याच्या निमित्तानें जो दीर्घसूत्रीपणा स्वीकारला त्याला कसलाच धरबंद नाहीं. 'यद्भातद्भा भविष्यति' (जें घडेल तें घडेल) असलें अनिश्चित व अस्थिर धोरण सरकारनें पत्करलें असून हिंदी शेतकऱ्याच्या दारिद्र्याचा प्रश्न कांहीं केल्या सुटण्याच्या मार्गास लागत नाहीं, असें नारायणरावांनीं स्पष्ट शब्दांत दाखवून दिलें आहे. कर्झनसाहेबांच्या अंमलदारीचा तो काळ होता आणि कर्झनसाहेबांच्या अंगच्या गुणांचा प्रभाव खऱ्या राजकारभारांत दिसूं लागल्यामुळें त्यांची लोकप्रियता वाढत्या प्रमाणांत होती. नारायणरावांनीं कर्झनसाहेबांच्या कर्तबगारीचा योग्य शब्दांनीं गौरव व्यक्त केला असला तरी कर्झनसाहेबांच्या द्वारें दृष्टीस पडणाऱ्या ब्रिटिश राष्ट्राच्या सहानुभूतींतील मर्म उघडकीस आणण्याला ते विसरले नाहींत. त्यांच्या भाषणांत पुढील उद्गार आहेत :— "ब्रिटिश राष्ट्राचें थोर अंतःकरण हिंदी दुष्काळाच्या आपत्तीनें हेलावलें आहे, यांत संशय नाहीं; कारण ब्रिटिश राष्ट्र हिंदी राष्ट्रावर उपकार करण्याला सज्ज झालें आहे. ब्रिटिशांप्रमाणेंच अमेरिका व इतर राष्ट्रांनाही आमच्या विपत्तीची अटकळ होऊन तींही मदतीकरितां सरसावत आहेत. पण हिंदुस्थानास हा मेहेरबानीचा मामला समाधान देऊं शकणार नाहीं. जॉन ब्राइटच्या वचनाचें या वेळीं स्मरण झाल्याशिवाय रहात

नाहीं. मोठ्या अनर्थांशीं झगडतांना मेहेरबानीचें धोरण उपयोगी पडत नाहीं; अशा झगड्यांत न्यायाची भावना विजयी ठरते, असें एकदां जॉन ब्राइट म्हणाले होते व त्यांचा अभिप्राय आमच्या प्रकरणासही तंतोतंत लागू पडणारा आहे."

याप्रमाणें दुष्काळग्रस्ततेची प्रस्तावना करून नारायणरावांनीं लोकांच्या दुबळेपणाचा एकेक मुद्दा परीक्षणास घेतला आहे. 'लोकांत कां त्राण नाहीं'? याचें कोणी असें उत्तर देतात कीं, हिंदुस्थानाची लोकसंख्या अपरिमित वाढून येथील धनधान्य पुरवठ्यास येईनासें झालें आहे. नारायणरावांनीं या प्रश्नाच्या खंडनार्थ उलट सवाल विचारला आहे कीं, 'हिंदुस्थानांतील प्रजावृद्धीच्या मानानें जलद् व कितीतरी पट अधिक प्रजावृद्धि युरोपांतील ज्या देशांत होत आहे, त्या देशांत दुष्काळानें हवालदीलपणा उत्पन्न झाल्याचा अनुभव कां येत नाहीं?' हिंदी शेतकऱ्याची नालस्ती सुचविणारा दुसरा मुद्दा उधळपट्टीचा आहे व त्याचा निर्देश वर आलेला आहे. नारायणरावांनीं याचाही पोकळपणा साधार निदर्शनास आणिला आहे. ते म्हणतात— "शेतकऱ्यानें उधळपट्टी करण्याचे प्रसंग लग्नासारखे असतात. पण शेतकरी उधळपट्टी करतो म्हणजे काय करतो याकडे लक्ष दिल्यास त्याची उधळपट्टी बिनमोबदल्याची नसते असें गळीं उतरण्याला उशीर लागणार नाहीं. शेतकरी दागदागिन्यांत पैसा खर्च करतो, पण दागदागिन्यांच्या रूपानें तो पैसा अडीअडचणीच्या वेळीं उपयोगी पडतो, हें विसरून चालणार नाहीं!" पण नारायणरावांनीं शेतकरी उधळ्या असूं शकेल काय याची शहानिशा करतांना अगदीं मुळाशीं हात घातला आहे. खुद्द कर्झनसाहेबांनीं देशांतील शेतकीच्या उत्पन्नाचा हिशोब करून दरसाल दर माणशीं वीस रुपये उत्पन्न निघतें, असा सिद्धान्त स्थापित केल्याचें सर्वांस माहीत आहे. "या उत्पन्नापैकीं दीड रुपया शेतसाऱ्याकडे जातो आणि दीड रुपयाला अप्रत्यक्ष स्वरूपाच्या करापायीं शेतकरी अंतरतो. शेवटीं त्याच्या पदरांत अवघे १७ रुपये उरतात आणि ही रक्कमसुद्धां सालीना उत्पन्नाची आहे! दर माणशीं सालीना इतकी कमी मिळकत असलेला शेतकरी दुसऱ्या कोणत्या देशांत दाखवितां येईल? आणि तरीसुद्धां हिंदी शेतकऱ्यावर उधळपट्टीचा आरोप व्हावा ना?" अशा रीतीनें खर्चीकपणाच्या आरोपाचें निरसन करून नारायणराव म्हणतात, "आमच्या शेतकऱ्यांना इतर कांहीं नांवें ठेवावयाचीं असल्यास खुशाल ठेवा, पण उधळेपणाचा आरोप त्यांच्या बाबतींत कधींच यथार्थ ठरणार नाहीं. हिंदी राष्ट्राचें ध्येय वैराग्य आहे; मल्लाच्या चढाईखोरपणाचें ध्येय हिंदी राष्ट्राला मुळींच माहीत नाहीं. आमच्या लोकांची वैराग्यसंपन्नता हेंच उधळपट्टीच्या आरोपाला खरमरीत उत्तर आहे; दारिद्र्याच्या सगळ्या दोषांचें खापर शेतकऱ्याच्या माथीं फोडणारांना नारायणरावांनीं आणखी एक मार्मिक प्रश्न

विचारला आहे–' शेतकऱ्याच्या खर्चीकपणाचा प्रसंग म्हणजे लग्नकार्यें, हें जर सर्वांना कबूल आहे, तर त्यावरून जर कोणी शेतकरी आपल्या जीवनांत एकदां तरी आनंद उल्हास निर्माण व्हावा म्हणून लग्नकार्यांच्या निमित्तानें कांहीं जास्त खर्च करीत असल्यास त्याबद्दल त्याच्यावर जळफळण्यांत काय हंशील आहे, असें कोणी म्हटल्यास चुकीचें किंवा फाजील कैवाराचें ठरेल काय ?'

हिंदी शेतकऱ्याच्या दारिद्र्याची व त्याच्या कारणाची अशी चर्चा केल्यावर नारायण-रावांनीं हा प्रश्न बिकट व गुंतागुंतीचा असल्याचें अगदीं मोकळ्या मनानें म्हटलें आहे. या प्रश्नाचा दोन तऱ्हांनीं विचार केला जातो. सरकारचें सामर्थ्य मर्यादित असल्याचें कोणी सांगतात तर कोणी दैवावर हवाला टाकतात. हे दोन्ही पक्ष आपापल्यापरी अंशतः खरे असले तरी ते अतिशयोक्तीचा आश्रय करणारे आहेत, असें आपलें मत नारायणरावांनीं स्पष्ट नमूद केलें आहे. सरकारचें सामर्थ्य मर्यादित आहे, पण त्याचा सरकारनें मुळींच उपयोग केलेला नाहीं, असें नारायणरावांनीं म्हटलें असून पुराव्यादाखल त्यांनीं न्यायखात्याची हजेरी घेतली आहे. सावकार हा प्राणी इंग्रजी राज्य हिंदुस्थानांत होण्यापूर्वीदेखील येथें होता. तो तेव्हां आपल्या कुळाच्या हिता-हिताशीं तादात्म्य पावलेला असे. त्याची जागा साहसी मारवाड्यांनीं घेतली. साव-कारांच्या तडाक्यांतून शेतकऱ्याला सोडविणें अवश्य आहे, पण सावकाराचे उंबरठे शेतकऱ्याला झिजवावे लागतातच. सावकारावांचून त्याचें चालत नाहीं. शेतकऱ्याला सावकारांच्या तावडींतून बाहेर काढण्याचे प्रयत्न चालू आहेत, पण ते कितपत सफल होत आहेत याचा विचार करावयास नको काय ? शेतकऱ्यांना न्यायखात्यानें कांहीं सवलती ठेवलेल्या आहेत, पण त्यांचा फायदा शेतकऱ्याला मिळत नाहीं. शेतकरी व सावकार यांच्या दरम्यान न्यायमंदिरांत जें नाटक चालतें त्यांत शेतकरी हें एक पात्र महत्त्वानें मिरवितांना दिसतें खरें; पण–नारायणरावांनीं येथें वकिलीच्या धंद्यांतील एक अनुभवाचें गुपीत उघड करून म्हटलें आहे—त्याच्या मागें–शेतकऱ्यामागें दुसऱ्या व्यक्ति असतात व शेतकऱ्याचें बुजगावणें पुढें करून त्या सावकाराशीं झुंजत असतात. आणि अशा व्यक्तींच्या खिशांत कायद्यानें शेतकऱ्यांसाठीं ठेवलेल्या सवलतींचा फायदा उतरतो म्हणजे शेवटीं एक सावकार जाऊन दुसरा सावकार शेतकऱ्यांच्या मानगुटीस बसतो असें कबूल करणें भाग पडतें! शेतकऱ्याला न्यायमंदिराकडे उठल्यासुटल्या धाव मार-ण्याची वाईट खोड लागली आहे व त्यामुळें तो आपलें दारिद्र्य वाढवितो असा एक आरोप कोणी उपस्थित करीत असतात, नव्हे कर्झनसाहेबांनीं आपल्या एका भाषणांत त्याचा उच्चार केला होता, त्याकडे वळून त्याचाही धुव्वा नारायणरावांनीं उडविला आहे. याच सुमारास व्हाइसरॉयच्या कायदेमंडळांत एका युरोपियन गृहस्थानें न्यायखात्या-

मार्फत सरकारच्या तिजोरींत कशी सालोसाल वाढत्या प्रमाणामध्यें भर पडत आहे, याची वाच्यता केली होती. सदर आक्षेपाचें थोतांड पटविण्यासाठीं नारायणरावांनीं त्या युरोपियन वक्त्याचे उद्गार आपल्या भाषणांत दाखल केले आहेत. 'आमच्या न्यायमंदिरांचा कारभार लोकांचें दारिद्र्य वाढविणारा आहे.' असें त्या युरोपियन इसमानें स्वच्छ म्हटलें होतें. नारायणरावांनीं कोर्टांत गुदरल्या जाणाऱ्या खटल्याची आंकडेवारी विवेचनास घेऊन शेंकडा ६० प्रमाणाइतके खटले ५० रुपये किंमतीच्या मिळकतीनिमित्त कोर्टांतून दाखल केले जातात, असें सांगितलें आहे. यावरून कोणालाही चटकन तर्क करावासा वाटेल कीं, ५० रुपयांसारख्या क्षुद्र रकमेसाठीं हिंदी जनता कोर्टांत हेलपाटे घालण्यास धजते तर तिला कज्जेकफावतीची अनिवार चटक आहे; पण नारायणरावांनीं हा तर्क आपल्या प्रतिपक्षावर उलटवून सुचविलें आहे कीं, हिंदी दारिद्र्याचें मोजमाप या खटल्यांवरून करण्याला हरकत नाहीं. कोर्टांत जाणाऱ्या लोकांपकीं शेंकडा साठ आसामींना अवघ्या पन्नास रुपयांची मिळकत बहुमोल वाटण्याइतकी हिंदी जनता सांपत्तिक दृष्ट्या खालावली आहे.

एकीकडे शेतकऱ्याची अवस्था वर वर्णिल्याप्रमाणें जास्त जास्त क्लिष्ट आणि हलाखीची होत असतां पंजाबांत शेतकऱ्याचे आपल्या जमिनीवरील हक्क मर्यादित करणारा कायदा अमलांत आला होता व त्याचा प्रयोग इतर प्रांतांतून करण्याचें घाटत होतें. शेतकऱ्यांना आपल्या जमिनी विकतां येऊं नयेत असा या कायद्याचा उद्देश होता. या कायद्याच्या उपयुक्ततेबद्दल नारायणरावांनीं शंका प्रदर्शित केली असून निर्णय दिला आहे कीं, कदाचित् हा कायदा यशस्वी झाला तरी त्याची योग्यता बाह्योपचाराहून जास्त श्रेष्ठ प्रतीची ठरणार नाहीं. रक्त नासून अंगावर फोड उठल्यास फोडावर मलमपट्टी करण्यासारखे हे उपाय आहेत. रक्त नासण्याचीं कारणें बंद करण्याचा हा उपाय ठरू शकत नाहीं. दारिद्र्याचा वेताळ असल्या उपायांनीं शेतकऱ्याचा पिच्छा सोडणार नाहीं, असा नारायणरावांनीं आपला अभिप्राय निर्भीडपणें नमूद केला आहे. शेतकरी दारिद्र्यानें गांजलेला आहे व त्याकरितां शेतसारा कमी करणें अपरिहार्य आहे. हाच एक उपाय दारिद्र्याच्या रोगाचें उन्मूलन करणारा आहे, अशा हिंदी राजकीय पुढाऱ्यांच्या विचारसरणीस कर्झनसाहेबांनीं एक आडदांड प्रश्न विचारून गप्प बसविण्याचा प्रयत्न केला होता. मद्रास महाजनसभेच्या मानपत्राला उत्तर देतांना कर्झनसाहेब मोठ्या तोऱ्यानें म्हणाले होते कीं, 'शेतसारा शेकडा पंचवीस टक्क्यांनीं कमी केल्यास दुष्काळ, दारिद्र्य, दैन्य या संकटांतून हिंदी शेतकऱ्याची कायमची मुक्तता होईल, पुनः त्यांचें दर्शन हिंदुस्थानांत घडणार नाहीं अशी कोणी प्रामाणिकपणें हमी देईल काय?' नारायणराव या प्रश्नाचें स्वरूप

आपल्या श्रोतृसमाजाला उघड करून दाखवीत असतां प्रारंभीं नम्रपणानें म्हणाले: ‘अशी हमी कोण घेऊं शकेल? शेतसारा एकदम पंचवीस टक्के कमी केल्यानें शेतकरी सुखाचा धनी होईल असें मानणें धाष्टर्याचें आहे; कारण दारिद्र्य अनादि असून शेतसारा कमी केला तरी त्याची साथ आमच्याशीं रहाणारच.’ याप्रमाणें अगदीं नम्रपणें सुरवात करून वादकौशल्याच्या पद्धतीनें वरील प्रश्नांतील दंभाचा स्फोट नारायणरावांनीं केला आहे. ‘जेथें शेतसारा मागील शेतपहाणीच्या वेळीं पंचवीस टक्क्यांनीं वाढलेला आहे तेथें तो तेवढा कमी केल्यास दुष्काळांतील मदत या नात्यानें त्याचा खचीत उपयोग होईल. दुष्काळाच्या वेळीं दुष्काळी कामें उभीं करून जर मजुरीच्या रूपानें, घेतलेला शेतसारा तेवढ्या प्रमाणांत शेतकऱ्याला द्यावाच लागतो, तर तितका सारा कमी केल्यास कोणता अनर्थ कोसळणार आहे? शेतसारा कमी केल्यानें कोणते परिणाम दृष्टीस पडतील हें सांगणें कठीण असलें तरी शेतसारा वाढविल्यानें काय परिणाम घडतो त्याकडे पाहून शेतसाऱ्याच्या पद्धतीबद्दल योग्य निर्णय देणें अशक्य नाहीं. सारावाढीच्या दहशतीनें शेतकरी पीकपाण्याच्या वाढीकडे बुद्धिपुरस्सर दुर्लक्ष करतात, अशीं उदाहरणें अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आलीं आहेत. शेतकरी आळशी झाले आहेत, असा कांहीं अधिकाऱ्यांचा शेतकऱ्यांसंबंधीं शेरा आहे. पण तो सपशेल खोटा आहे. शेतसारा वाढण्यापूर्वी जो शेतकरी कष्टाळू व उद्योगी होता, तो शेतसारा वाढल्यावर आळशी व्हावा हें विधान सकृद्दर्शनींच चमत्कारिक भासणारें आहे. वास्तविक शेतसाऱ्याच्या वाढीला घाबरून त्यानें बागाइती सारखीं उत्पन्नें साफ सोडून दिलीं आहेत. शेत यथेच्छ पिकवावें, अशी त्याला हिम्मत होत नाहीं; कारण शेतांत सुबत्ता दिसली कीं, सारावाढीचें पिशाच बोकांडीस बसल्याशिवाय रहात नाहीं, या अनुभवाचा त्याला धाक वाटतो. हा मुद्दा बऱ्याच अधिकाऱ्यांनीं निर्विवाद कबूल केला आहे.

नारायणरावांचें वर नमूद केलेलें विवेचन जो कोणी मननपूर्वक पाहील त्याला कर्झनसाहेबांच्या घमेंडखोर युक्तिवादाच्या पोटांत आपल्या तर्ककौशल्याची सूक्ष्म धार खुपसून नारायणरावांनीं त्याच्या कशा चिंधड्या उडविल्या आहेत, याचा बोध सहज होईल. शेतसारा कमी करण्याची आवश्यकता मांडल्यावर नारायणरावांनीं शेतकीखात्याच्या धामधुमीकडे आपली नजर फेकली आहे. शेतकीची सुधारणा करून शेतकीला जोडधंदे पुरवावे ही ब्रिटिश राज्यकर्त्यांची फार दिवसांची इच्छा असली तरी तिच्या मुळाशीं कांहीं भ्रम निःसंशय वसत आहे. हिंदी शेतकरी शेतकीच्या विद्येचीं मूलतत्त्वेंसुद्धां ओळखीत नाहीं, तो अत्यंत जडमूढ किंवा नादान आहे, अशी कल्पना उराशीं बाळगणारे अधिकारी जसे तेव्हां होते तसे आतांही आहेत. नारायणरावांनीं या कल्पनेचा रोखठोक समाचार घेतला आहे. हिंदी शेत-

कऱ्याला आपल्या व्यवसायाचें जरूर तेवढें ज्ञान आहे. तो ठोंव्या नाहीं किंवा शेतकीच्या विद्येंतील आचार्यही नाहीं. तरीपण आजतागायत त्यानें ज्या पद्धतीचा अवलंब करून शेतकी केली ती पद्धती अजीबात सोडून देण्यास त्याला सांगणें चुकीचें आहे. प्रत्यक्ष शेतकीच्या कामांत तो आपल्या पुस्तकी विद्वत्तेची पोपटपंची करणाऱ्या गुरुजीहून जास्त शहाणा आहे, असें समजण्यास हरकत नाहीं. पण त्याला नवे शास्त्रीय शोध शिकवूं नयेत असा वरील विधानाचा आशय नाहीं. तरीसुद्धां जोरजबरदस्ती केल्यानें त्याची सुधारणा होणार नाहीं, हें लक्षांत बाळगलें पाहिजे. धिमेपणानें व सुसंगत रीतीनें शेतकऱ्यांना शिकविल्यास तो नव्या शास्त्रीय शोधांना नाकें मुरडीनासा होईल. पण केवळ शेतकी खात्यानें निभाव लागणार नाहीं. शेतकी खात्याप्रमाणेंच औद्योगिक खात्याच्या स्थापनेची जरूरी असल्याचें नारायणरावांनीं सांगितलें आहे. नारायणरावांनीं या विषयावर जोर देण्याला तसाच एक आधारही त्यांच्याजवळ होता. दुष्काळ कमिशनानें आपल्या अहवालांत उद्योगधंद्याची वाढ झाल्यानें दुष्काळाला केव्हांच डोकें वर काढण्याला अवसर फावणार नाहीं, असा एक सिद्धान्त मांडला होता. दुष्काळाच्या विवरणांत औद्योगिक उत्कर्षाला महत्त्वाचें स्थान असल्यावर दुष्काळाच्या निमित्तानें हिंदी जीवनाचा सर्वांगीण विचार करतांना नारायणराव त्याची उपेक्षा कशी करतील ?

पण हा विषय सर्वमान्य असला तरी त्यासंबंधांत शंका प्रतिशंकांचा बुजबुजाट पुष्कळच आहे. 'हिंदी पुढाऱ्याच्या जिभेवर औद्योगिक उत्कर्षाचा विषय सदैव नाचत असतो. त्याविषयाचें हिंदी वक्तृत्वाला विलक्षण आकर्षण आहे' असे कुत्सित उद्गार कित्येकांनीं या सुमारास काढले होते. वाचाळता वाईट खरी, पण सगळीच वाचाळता क्रियाशून्य नसते. कोणत्याही सुधारणेचा जेव्हां आधीं तासचे तास पुनः-पुन्हां खल केला जातो, तेव्हां तिचा निर्णय लागतो आणि खल करावयाचा म्हटला कीं वाचाळता आलीच. बीं पेरून त्याचें पीक निघेपर्यंत मेघांची छाया व सूर्याचा प्रकाश यांचा खेळ आलटून पालटून कितीदां तरी होऊन जातो, अशा अर्थाचें जॉन ब्राइटचें एक वाक्य उद्धृत करून वाचाळतेचा आरोप नारायणरावांनीं विल्हेस लावला आहे. वाचाळतेचा आक्षेप निकालांत निघाल्यावर जो पहिला मुद्दा नजरेसमोर येतो, तो मांजराच्या गळ्यांत घंटा बांधण्याच्या स्वरूपाचा ठरतो. हिंदुस्थानांत उद्योगधंद्याची वाढ केली पाहिजे याबद्दल कोणाचेंही दुमत नाहीं, पण ती वाढ व्हावी कशी ? लोकांचा उत्साह आणि सरकारचें उत्तेजन असे या प्रकरणाचे दोन घटक आहेत. लोकांनीं आपल्याकडून पुष्कळ उत्साह दाखविला; खुल्या व्यापाराचें धोरण सोडून सरकारनें संरक्षणाकडे मोर्चा वळवावा म्हणून मागणी केली, पण सरकारनें तिकडे कानाडोळा चालविला आहे. संरक्षण म्हणजे

यादवीला निमंत्रण देणें होय, असे उद्गार या बाबतींत लॉर्ड सॅलिसबरींनीं बारा वर्षांपूर्वी काढले आहेत. ब्रिटिश कारखानदाराला संरक्षण दिलें जात नाहीं हें खरें, पण संरक्षणापेक्षां सुद्धां जास्त फायदा त्याला मिळत असतो व तो म्हणजे देशोदेशींच्या बाजारपेठांचा. बरें, खुल्या दरवाजाचें तत्त्व तरी कोठें योग्यरीतीनें पाळलें जात आहे ? मुक्तद्वाराच्या तत्त्वाचें थोतांड पटविण्यासाठीं नारायणरावांनीं दक्षिण आफ्रिकेंत हिंदी लोकांना जी मानहानी सोसावी लागत होती, तिचा निर्देश केला आहे व प्रश्न केला कीं, अशा तऱ्हेचा पंक्तिप्रपंच पाहिल्यावर खुल्या दरवाजाचें तत्त्व इमानानें पाळलें जातें असें कोण मानील ? यावर कोणी तर्क करतील कीं, साम्राज्यांत इतर हिंदी प्रजेला दुजा भावानें वागविण्यांत आलें तरी हिंदुस्थानांत उद्योगधंद्यांना विपुल क्षेत्र मोकळें असून त्याचा उपयोग करणें शक्य आहे; पण नारायणरावांनीं मुंबईच्या गिरण्यांवरील कराचा बोजा व राज्यकारभाराचा डोईजड होत जाणारा वाढता खर्च यांकडे बोट दाखवून हा तर्क निराधार असल्याचें सिद्ध केलें आहे. राज्यव्यवस्थेपायीं अतोनात खर्च होत असल्यानें इतर लोकोपयोगी कामाकडे लावण्याला सरकारपाशीं पैसाच उरत नाहीं, असें नारायणरावांनीं आपल्या भाषणांत म्हटलें आहे, व राज्यकारभाराचा खर्च वाढत चालल्याबद्दलचे मोठमोठाल्या अधिकाऱ्यांचे कबूलीजबाब आणि वेल्बी कमिशनसारख्या मंडळाचे निर्णय नमूद करून आपल्या विधानास आधार दाखविला आहे व शेवटीं त्यांनीं कॉंग्रेसनें यासंबंधांत चालविलेल्या कामगिरीचा आढावा घेतला आहे. कॉंग्रेस ही एक तक्रारखोर संस्था असल्याचा आक्षेप तिची स्थापना झाली तेव्हांपासून बोलला जात होता. त्याला नारायणरावांचें उत्तर पुढीलप्रमाणें आहे–" ब्रिटिश राज्यकारभारानें कॉंग्रेसला जन्म दिला असून या संस्थेविषयीं ब्रिटिशांनासुद्धां भूषण व अभिमान वाटला पाहिजे. कॉंग्रेससारखी संस्था व चळवळ उत्पन्न व्हावी हें कालाच्या ओघाला अनुसरूनच आहे. हिंदुस्थानाचें कल्याण नजरेसमोर ठेवून हिंदुस्थानाचा बचाव चालढकलीच्या बिनधोरणी राज्यकारभारानें होणार नाहीं, अशा स्वरूपाची जागृति करीत रहाणें हें आमचें अपरिहार्य कर्तव्य आहे. "

नारायणरावांनीं कॉंग्रेसच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणाचा जो गोषवारा वर दिला आहे, त्याकडे पाहिल्यास त्यामध्यें केवळ दुष्काळाचें विवरण अधिक दिसलें तरी त्या अनुरोधानें सगळ्या बहुजनसमाजाच्या जीवनाचा विचार आल्याचें सहज दृष्टीस पडेल. बहुजनसमाजाचें जीवन कसें त्राणरहित झालें आहे, ह्याविषयीं निघणारे आक्षेप कसे फोल अथवा अन्यायाचे व अनुदारपणाचे आहेत, हिंदी जीवनाला धष्टपुष्ट व प्रगमनशील करावयाचें असल्यास कोणते उपाय

योजण्याची आवश्यकता आहे, योग्य उपाय सुचविल्यास हिंदी पुढाऱ्यांची कशी अवहेलना घडते, त्यांची हाकाटी अरण्यरुदनाप्रमाणें वाया कशी जाते, हिंदुस्थानांतील शेतकी खालावली असून उद्योगधंद्यांची कोणत्या प्रकारें उपेक्षा चालली आहे, व या हलाखीच्या माथीं राज्यकारभाराच्या वाढत्या खर्चाचा भार कसा लादला जात आहे, राज्यकर्त्यांना ही स्थिति समजत असून उमजत कशी नाहीं वगैरे सर्व प्रश्नांचा ऊहापोह नारायणरावांच्या भाषणांत साधार व स्पष्ट आहे. हिंदुस्थानांत ब्रिटिशांनीं सुरू केलेल्या राज्यकारभाराचे दोष त्यांनीं अगदीं निर्भीड-पणानें चव्हाट्यावर मांडले असले तरी त्यांनीं असभ्य किंवा कुत्सित भाषाप्रयो-गाची कांस कोठेंच धरलेली आढळणार नाहीं. राज्यकर्ते चुका करीत आहेत याचे मासले सांगत असतांना त्यांनीं खरमरीतपणाच्या नांवाखालीं बेजबाबदार विधानें केलेलीं नाहींत. कॉंग्रेस अस्तित्वांत येऊन १९०० सालीं सोळा वर्षें झालीं होतीं. कॉंग्रेसच्या कार्याचें स्वरूप त्यावेळीं चढाईच्या लढाऊपणाचें नव्हतें. राज्यकर्त्यांशीं भल्याबुऱ्या साधनानें सामना देत राहून लोकांच्या राजकीय असंतोषाला भलतीच गति देईल असा आवेश चढूं द्यावयाचा नाहीं, याबद्दल खबरदारी घेणारे त्या काळांतील कॉंग्रेसचे पुढारी होते. राज्यकारभाराविषयीं दारुण निराशा लोकांत तेव्हां प्रसार पावलेली नव्हती. याप्रमाणें तत्कालीन परिस्थिति लक्षांत घेऊन नारायण-रावांच्या भाषणाचें परिशीलन केल्यास तें पुष्कळच सडेतोड असल्याचा प्रत्यय आल्याशिवाय रहात नाहीं.

## नंतरचें कार्य व लेखन

१९०१ सालीं न्यायासनावर आरूढ झाल्यानंतर देशांतील सक्रिय राजकारण नारायणरावांना साहजिकच पारखें झालें. हायकोर्टांतील न्यायासनावरून ते इंदूर येथें दिवाणगिरीच्या पदावर चढले. तेथून परत आल्यावर त्यांनीं राजकारणाकडे नजर टाकण्याच्या सुमारास १९१४ सालीं युरोपखण्डांत महायुद्धाचा वणवा पेटला आणि ब्रिटिश साम्राज्यांतच नव्हे, तर साऱ्या जगांत नव्या नव्या राजकीय कल्प-नांनीं लोकांचें मन वेधून घेतलें. हिंदुस्थान देशावर ब्रिटिश साम्राज्यांतील घटक या नात्यानें जी जबाबदारी पडली व ती लादतांना ब्रिटिश साम्राज्यकर्त्यांनीं जीं आश्वासनें उच्चारलीं, त्या योगानें हिंदी जनतेमध्यें नव्या राजकीय महत्त्वाकांक्षांचें चैतन्य संचरावें यांत आश्चर्य नाहीं. महायुद्ध सुरू झाल्यावर फंदफितुरीचे व बंडाळीचे प्रयत्न आवरून धरण्याकरितां हिंदुस्थानांत देशरक्षणाचा कायदा अस्तित्वांत आला. या कायद्याप्रमाणें स्थानिक अधिकाऱ्यांना फंदफितुरीच्या अथवा बंडाळीच्या त्या त्या गुन्ह्यांसंबंधांत मनसोक्त वागण्याची मुभा मिळाली;

परंतु हा जुलमी कायदा अस्तित्वांत आला म्हणून राजकीय चळवळीचा जोर थंडावला नाहीं. महायुद्ध सुरू होण्याच्या आधीं थोडे दिवस प. वा. टिळक मंडालेच्या तुरुंगांतून सुटून स्वस्थानीं आले होते. याच सुमारास बेझंटबाईंना राजकारणांत पडण्याविषयीं प्रेरणा झाली होती. दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रहाचा लढा संपवून श्री. गांधींनीं हिंदुस्थानांत रहाण्याचें याच वेळीं ठरविलें. महायुद्ध १९१४ च्या ऑगस्ट महिन्यांत सुरू झालें, परंतु १९१५ मध्यें हिंदी राजकीय चळवळीला तीव्रता आली. बेझंटबाईंनीं 'होमरूल'च्या आंदोलनाचें निशाण सर्वांच्या आधीं उभारलें. टिळकांनीं त्या आंदोलनांत थोडें मागाहून पाऊल टाकलें. गांधी तेव्हां आपल्या सत्याग्रहाचे बारीकसारीक प्रयोग करून देशाला आपल्या तत्त्वाची कार्यक्षमता पटविण्यांत गुंतले होते. परंतु त्या दिवसांत गांधींना देशव्यापी राजकीय सामर्थ्याची योग्यता मिळालेली नव्हती. १९१५ हें साल आणखी एका दृष्टीनें महत्त्वाचें आहे. या वर्षी गोखले व फेरोजशहा हे काँग्रेसचे तत्कालीन सर्वमान्य पुढारी दिवंगत झाले आणि त्यामुळें बेझंट, टिळक यांनीं आरंभलेल्या चळवळीचा मार्ग बराच मोकळा झाला होता. फेरोजशहांचे अनुयायी व गोखल्यांचे संप्रदाय बंधु या नात्यानें नारायणरावांकडे गोखले फेरोजशहांच्या राजकीय धोरणाचा वारसा येणें क्रमप्राप्तच होतें. नारायणराव हे नुकतेच सेवानिवृत्त झाले असतांही सार्वजनिक आयुष्याच्या आवडीमुळें ते उत्साहपूर्वक निरनिराळ्या कार्यांत भाग घेऊं लागले. १९१५ सालापासून पुढें त्यांनीं वृत्तपत्रांच्या द्वारें आपलीं मतें प्रतिपादन करण्याचा क्रम अविश्रान्त ठेवलेला दिसतो. त्यांनीं तेव्हां व्यक्त केलेल्या मतांचें दिग्दर्शन आतां येथें करावयाचें आहे.

महायुद्धापूर्वी हिंदी राज्यकारभारांत सुधारणा घडवून आणण्याकरितां राज्यकर्त्यांमध्यें खल चाललेला होता. **रॉयल पब्लिक सर्व्हिस कमिशन** हें मंडळ राज्यकारभाराच्या सुधारणेकरितांच नेमलेलें होतें. महायुद्ध सुरू होतांच हिंदी जनतेमध्यें जो राजकीय आकांक्षांच्या तृप्तीचा क्षोभ दिसूं लागला त्याकडे नजर देऊन गोखल्यांनीं आपल्या मृत्यूपूर्वी आपल्या राजकीय आकांक्षांचा एक आराखडा तयार करून ठेवला होता व त्याची देशांत चर्चा सुरू होती. नारायणरावांनाही याबद्दल आपले विचार सांगण्याविषयीं मुंबईंत निघणाऱ्या माजी ॲडव्होकेट पत्राच्या संपादकानें विनंती केली आणि १९१५ च्या ऑगस्ट अखेरीस नारायणरावांनीं एक लेख लिहून आपलें मत लोकांसमोर ठेविलें. इंग्लंडनें महायुद्धांत भागीदार होतांना स्वातंत्र्य, लोकसत्ता वगैरे कल्पनांचें संगोपन व संवर्धन करण्याचें कर्तव्य आपल्यापुढें असल्याबद्दल डांगोरा पिटला होता, तोच विचारांत घेऊन ब्रिटिशांच्या स्वातंत्र्यप्रेमाचा इतिहास नारायणरावांनीं आपल्या लेखांत प्रथम सांगितला आहे.

हिंदी शिपाई युरोपच्या रणभूमीवर नेण्यांत येऊन ते आपल्या ब्रिटिश व्यवसाय बांधवांशीं खांद्याला खांदा भिडवून लढतात, यावरून आशियाचे लोक हीन आणि युरोपिअन तेवढे श्रेष्ठ हा भेदभाव निमाला असें नारायणरावांनीं भाकीत केलें आहे व पुढील किमान मागण्या नमूद केल्या आहेत. ( १ ) हिंदी लोकांना लष्करांत युरोपिअनांच्या बरोबरीच्या जागा देण्यांत याव्या. ( २ ) शिक्षणाचा प्रसार करावा. कारण शिक्षणानेंच अशिक्षित बहुजनसमाजाला महायुद्धाच्या रहस्याचें स्पष्टीकरण करून त्याच्या अंतःकरणांतील ब्रिटिश साम्राज्याविषयींची निष्ठा अभंग रहाण्याला मदत केली आहे. शिक्षितांचा वर्ग साम्राज्याचा शत्रु नसून त्याच्या बळकटीचें साधन असल्याचें महायुद्धानें सिद्ध केलें आहे. ( ३ ) स्त्रियांच्या शिक्षणाचा फैलाव झाला पाहिजे; कारण महायुद्धांत स्त्रियांनीं पुरुषांना कशी मदत केली, हें स्पष्ट झालें आहे. ( ४ ) हिंदुस्थानाला ब्रिटिश साम्राज्यान्तर्गत स्वराज्य दिलें पाहिजे. तें पुढें मागें मिळाल्याशिवाय रहाणार नाहीं. म्हणून आपण साम्राज्याचे घटक आहों ही भावना न सोडतां लोकांनीं सर्वांसाठीं ब्रिटिशांना प्रिय असलेल्या स्वातंत्र्याची मागणी करणें अवश्य आहे.

ॲडव्होकेट पत्रांत जो लेख प्रसिद्ध केला त्यांत **साम्राज्यविचार** (Imperial thought) अशी कल्पना नारायणरावांनीं मांडली होती. 'सामाज्यविचार' म्हणजे काय याचा जास्त खुलासा होण्यासाठीं त्यांनीं १९१५ च्या सप्टेंबर महिन्यांत टाइम्स ऑफ इंडियामध्यें एक मोठा लेख लिहिला आहे. याचा सारांश पुढें दिला आहे. सर हेन्री लॉरेन्स यानें १८५५ सालीं लिहिलें होतें कीं तत्त्वाखातर अद्यापि युद्धें झालेलीं नाहींत; तो मजकूर समोर घेऊन नारायणरावांनीं युरोपियन महायुद्ध कांहीं तत्त्वानिमित्त सुरू झालें आहे, असें आपल्या लेखांत विवेचन केलें आहे. इंग्लंडनें अनेक देशांना स्वातंत्र्य मिळवून देण्याच्या कामीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष मदत केल्याचे दाखले आहेत. आठव्या हेन्रीच्या कारकीर्दींत साम्राज्यभाव इंग्लंडांत उत्पन्न झाला. स्पेन, ग्रीस, इटाली वगैरे देशांना इंग्लंडनें मदत केली. गुलामगिरीच्या व्यापाराला आळा घातला आणि नेपालियनचा पराभव करून युरोप खण्डाला वांचविलें. यापुढें नारायणराव म्हणतात :—" ब्रिटिश साम्राज्याचा संबंध हा सोनेरी धागा हिंदी जनतेनें तुटूं देऊं नये. कायदा आणि राज्यव्यवहार बदलला तरी हिंदी लोक आपल्या जुन्या कल्पनांचा बुरसा झाडून मोकळे झालेले नाहींत. तथापि साम्राज्याच्या भावनेशीं तादात्म्य पावून आपलें जीवित कंठण्याला हिंदी जनतेला हरकत नाहीं. वेदापासून आजतागायत हिंदुस्थानांत एकच ध्येय पसरलेलें दिसतें. धार्मिक स्वातंत्र्य हें हिंदी जीवनाचें ध्येय असून ब्रिटिश साम्राज्यानें त्या ध्येयाच्या साफल्याला जरूर ती संधी मिळवून दिली आहे.

हल्लीं इंग्लंड आपल्या अवतारकार्यांची घोषणा करीत असून हिंदुस्थानसुद्धां आपलीं कर्तव्यें काय आहेत याच्या विवंचनेंत पडलेलें दृष्टीस पडतें. प्रत्येक नागरिकाचे समान हक्क हें ब्रिटिश साम्राज्याचें धोरण आहे."

नारायणरावांनीं साम्राज्यवादाची जी एक तात्त्विक दिशा वरील लेखांत व्यक्त केली आहे, तिलाच त्यांनीं वाढवून वेगळ्या रीतीनें टाइम्स ऑफ इंडियामध्यें १९१५ च्या सप्टेंबर महिन्यांत एका लेखाच्या द्वारें लोकांसमोर ठेविलें आहे असें मागें म्हटलेंच आहे. त्यातील कल्पनांचा सारांश असा कीं, "जगांतील सर्व जनता स्वातंत्र्याचा उपभोग घेणारी व्हावी हें तत्त्व ब्रिटिश जनतेच्या हाडींमाशीं खिळलेलें असून ब्रिटिश साम्राज्याची वाढ पारखल्यास तिच्यामध्यें या तत्त्वाचें सूत्र दृष्टीस पडल्याशिवाय रहाणार नाहीं. आपण स्वातंत्र्य भोगावें, दुसऱ्यांच्या स्वातंत्र्याचा आदर करावा; न्यायाच्या व सदयतेच्या भावनेला हक्कापेक्षां श्रेष्ठ मानून ह्या भावनांच्या अनुरोधानें प्रसंगविशेषीं दुसऱ्यांच्या स्वातंत्र्याच्या रक्षणासाठीं झटावें, इत्यादि तत्त्वांच्या पायावरच गेल्या २०० वर्षांच्या प्रगतीची इमारत उभारली गेली आहे. इंग्लंड व हिंदुस्थान या दोन देशांचा संबंध ज्या दैवयोगानें जडला त्याची यथार्थ मीमांसा करण्यास तशाच लोकोत्तर प्रतिभेचा पुरुष जन्मास आला पाहिजे. कारण, पुष्कळांच्या मतें या दैवयोगाचा इंग्लंड व हिंदुस्थान यांच्या दृष्टीनें भिन्नभिन्न अर्थ होत असतो." यानंतर नारायणरावांनीं हिंदुस्थानांत चाललेल्या धर्मकलहाचा थोडक्यांत आढावा देऊन धार्मिक स्वातंत्र्याकरितांच हा कलह असल्याचें सुचविलें आहे. साम्राज्य म्हणजे एका तत्त्वाच्या प्रेमानें एकमेकांशीं सहकारितापूर्वक व्यवहार करणाऱ्या अनेक राष्ट्रांचा संघ अशी कल्पना अस्पष्टपणें नारायणरावांच्या या लेखांत डोकावतांना दिसते. "परस्परांच्या प्रेमाशिवाय कोणी कोणावर प्रभुत्व गाजवूं शकत नाहीं. एकमेकांच्या अंतःकरणांत जर प्रेम नांदत असेल तर एकाच्या आज्ञेला दुसरा सेवकाप्रमाणें मान देतो. ब्रिटिश साम्राज्यांतील राष्ट्रांत अशाच तऱ्हेचा सलोखा उद्भवणें शक्य आहे," असें दाखवून नारायणरावांनीं या लेखाची समाप्ति केली आहे.

महायुद्धाचीं चारपांच वर्षें हिंदुस्थानाला अतिशय खळबळीचीं गेलीं व हें सांगण्याची जरूरी नाहीं कीं, त्या खळबळीच्या लाटा अद्यापि शान्त झालेल्या नाहींत. महायुद्धांत गुंतल्यामुळें ब्रिटिश राज्यकर्त्यांची वृत्ति कठोर आणि विशेष जागरूक बनली होती. हिंदुस्थान देशाची सहकारिता त्यास आर्जवून मिळवावी लागल्यानें या सहकारितेचा मोबदला राज्यसुधारणांच्या रूपानें लोकांना द्यावा आणि त्यांस ऋणी करून ठेवावें, असें त्यांना वाटत असलें तरी राज्यसुधारणांच्या प्राप्तीकरितां

हिंदुस्थानांत सुरू झालेल्या चळवळीला उतास जाऊं न देण्याकरितां दडपशाहीचा अमल त्यांनीं जारी ठेवला होता. १९१५ मध्यें बेझंटबाईंच्या नेतृत्वानें होमरूलच्या आंदोलनाचें वारें देशभर वाहूं लागलें. त्यांतच टिळकांच्या स्वराज्यविषयक चळवळीची भर पडून सर्वत्र अशान्तीचा फेरा अनुभवास येत चालला. तिकडे बंगालमध्यें अराजकांच्या अत्याचारांचा सुळसुळाट माजतो कीं काय अशी भीति पडली, अशा स्थितींत लोकमताला योग्य मार्गावर आवरून राखण्याची जबाबदारी आपल्या-वरही आहे, अशी मनाची समजूत करून घेऊन नारायणरावांनीं १९१६ पासून पुढच्या तीनचार वर्षांत निरनिराळ्या वृत्तपत्रांतून पुष्कळच लेख लिहिलेले आहेत. हिंदुस्थानांतील दडपशाहीनें क्रान्तिकारकांना ठेंचून रगडून टाकण्याचा जो प्रकार चालविला होता, त्याकडे नारायणरावांना रौलॅट कायद्याच्या वेळीं लक्ष देणें भाग पडलें. पण त्यापूर्वी बेझंटबाईंना अटक झाल्यावेळीं त्यांस या कायद्याच्या परिणा-मांचा प्रथम विचार करावा लागला. बेझंटबाईंच्या अटकेमुळें सौम्य वृत्तीचे लोकही क्षुब्ध झाले होते. नारायणरावांनीं या विषयावर लिहिलेल्या लेखांत काय-द्याच्या तत्त्वाप्रमाणें कायद्याच्या इतिहासाचें आणि चळवळीमागें असणाऱ्या मनो-वृत्तींचेंही ज्ञान प्रदर्शित केलें आहे. हिंदुस्थानांतील प्रागतिक मताच्या लोकांवर तेव्हां अँग्लो-इंडियन वृत्तपत्रांनीं ताळ सोडून सरकाराला दोष दिल्याचा आरोप लादला होता. त्यालाहि उत्तर देण्याची पाळी नारायणरावांवर आली. कसलेल्या कायदेपंडिताला शोभेल अशा रीतीनें प्रथम प्रतिपक्षाचे मुद्दे निःपक्षपातानें मांडून मग त्यांनीं आपल्या बाजूचें समर्थन या लेखांतून केलें आहे. ब्रिटिश राज्यकारभारा-पोटीं हिंदुस्थानांत राज्यसुधारणासंबंधी चळवळी उत्पन्न व्हाव्या यांत अस्वा-भाविक कांहीं नसल्याचें मत नारायणरावांनीं या काळांत अनेकवार व्यक्त केलें होतें. ज्या चळवळी होतात, त्यांचें मूळ राज्यकारभाराच्या दोषांत असतें. चळ-वळीस जन्म देणारे आपल्या राज्यव्यवस्थेंतील दोष दडपशाही केल्यानें ब्रिटिशांना उडवून लावतां येणार नाहींत. चळवळीची जबाबदारी ब्रिटिशांना सर्वथैव टाळतां येणें शक्य नाहीं; म्हणून लोकांना संतोष देण्याजोगी राज्यकारभाराची दुरुस्ती करावी असें त्यांनीं आपल्या लेखांतून वारंवार म्हटलें आहे. बेझंटबाईंना फार दिवस अटकेंत रहावें लागलें नाहीं. त्यांची लवकरच सुटका झाली; पण तेवढ्यानें अटकेचा विषय संपणारा नव्हता. बंगालच्या अराजक अत्याचारांचा बंदोबस्त करण्यासाठीं सरकारनें रौलॅट नांवाच्या एका ब्रिटिश न्यायाधीशाला पुढाकार देऊन एक अराजक पंथाच्या अत्याचारांची चौकशी करणारें मंडळ नेमलें व या मंडळाच्या शिफारशीवरून एक कायदा करण्याचें सरकारनें योजिलें.

रौलॅट कायद्याचा कच्चा खर्डा १९१९ च्या प्रारंभीं ज्यावेळीं कायदेमंडळांत

प्रविष्ट झाला, त्यावेळीं कायदेमंडळांतील बहुतेक सर्व हिंदी सभासदांनीं त्यास विरोध केला. कायदेमण्डळांत त्या खर्ड्याच्या प्रत्येक कलमाची छाननी करण्यांत आली. नारायणरावांनीं त्या खर्ड्याविरुद्ध जो अभिप्राय दिला तो कायदेमंडळांतील हिंदी सभासदांच्या उपयोगी पडला नाहीं, असें म्हणतां यावयाचें नाहीं. नारायणरावांची नेहमींची पद्धती अशी होती कीं, प्रत्येक विषयाच्या मुळापर्यंत जावयाचें. या कायद्याचें परीक्षण त्यांनीं अशाच मूलग्राही पद्धतीनें केलेलें आहे. युद्धाच्या काळांत भारतरक्षणाचा ( डिफेन्स ऑफ इंडिया ) कायदा अस्तित्वांत होता. तो युद्ध संपलें म्हणून रद्द करणें भाग आहे, पण राज्यरक्षणाची आवश्यकता संपलेली नाहीं, म्हणून नवीन कायद्याशिवाय चालणार नाहीं; शिवाय हिंदुस्थानांत क्रान्तीचीं कारस्थानें चालू आहेत, याचा विसर पडूं देणें योग्य होणार नाहीं; अशी कायद्याच्या तरफदारीची विचारसरणी होती. राज्यरक्षणाकरितां दडपशाहीचा स्वतंत्र व कायमचा कायदा जन्मास घालणें हा प्रघात एकंदर ब्रिटिश राज्यव्यवस्थेच्या धोरणास सोडून आहे, असा अभिप्राय देऊन नारायणरावांनीं वरील विचारसरणीच्या मुळावर घाव घातला आहे. नंतर नारायणरावांनीं योग्य राज्यव्यवस्था हाच सर्व प्रकारचीं अंतर्बाह्य क्रान्तिकारक कारस्थानांचीं पाळेंमुळें खणून काढण्याचा उपाय आहे, असें हिंदुस्थानांतील लोकांना संतोष देणाऱ्या ब्रिटिश राजवटीचा इतिहास सांगून सिद्ध केलें आहे. सगळ्या देशभर लोक संतुष्ट राहतील अशी राज्यव्यवस्था अमलांत आणण्याचें काम कालावधीचें आहे असें क्षणभर मानलें तरी असंतोषाच्या कारणांकडे दुर्लक्ष करणें अनिष्ट होय, असें नारायणरावांनीं स्पष्ट म्हटलें आहे. ज्यांच्यावर राज्यकारभाराची जबाबदारी असेल त्यांना बेजबाबदार कायदेमंडळाच्या विरोधाची पर्वा बाळगून चालणार नाहीं, ह्या कोटिक्रमाला नारायणरावांनीं ठणठणीत उत्तर दिलें कीं, लोकमतास जबाबदार असणारी राज्यपद्धती सुरू करा. सारांश, दडपशाहीनें लोकांचे अंत:करणाला खोल व्यथा होऊन ज्या करितां दडपशाहीचा प्रयोग करावयाचा, ते राजकीय असंतोषाचे अनिष्ट प्रकार चालू रहातात, असा नारायणरावांनीं एकंदर लेखांच्या द्वारें निदर्शनास आणिलें आहे. नारायणरावांनीं रौलॅट बिलांचा निषेध टाइम्स ऑफ इंडिया पत्रांत लेख लिहूनच केलेला नव्हता तर 'इंडियन सोशल रिफॉर्मर' वगैरे दुसऱ्या नियतकालिकांतूनही त्या कायद्याची हजेरी घेण्याचें काम त्यांनीं चालविलें होतें. नारायणरावांसारख्या समतोल विचाराच्या व्यक्तीनें रौलॅट कायद्याचा निषेध केल्यामुळें नारायणरावांचा समाचार घेण्यास कायद्याच्या तर्फे कांहीं टीकाकार पुढें आले आणि नारायणरावांना त्यांचा कोटिक्रम खोडून टाकणें भाग पडलें.

येथवर नारायणरावांनीं समकालीन राजकारणांत कोणत्या रीतीनें कामगिरी

केली याची हकीकत संक्षेपानें सांगितली; परंतु १९१५ नंतर त्यांना हिंदी राज्यकारभाराच्या सुधारणेच्या विषयांत मन घालावें लागलें आणि बुद्धि शिणवावी लागली, हें निवेदन केल्याशिवाय त्यांच्या राजकीय कामगिरीचा वृत्तान्त पूर्ण व्हावयाचा नाहीं. महायुद्धांतील सहकारितेचा मोबदला या नात्यानें ब्रिटिश राज्यकर्ते हिंदुस्थानाच्या पदरांत कांहीं राज्यसुधारणा टाकणार आहेत, असें दृष्टीस पडून ब्रिटिशांच्या मनोगताची वाच्यता होऊं लागल्याबरोबर १९१६ सालीं नारायणरावांनीं हिंदुस्थानांतील ब्रिटिश राजवटीचा विकास कसकसा होत गेला यासंबंधांत एक वाचनीय लेखमाला लिहिली. ब्रिटिश राजवटीचा प्रारंभ कोणत्या स्थितींत झाला; त्या राजवटीला पुढें ईस्ट इंडिया कंपनीनें कोणतें रूप दिलें, कंपनीचें राज्य संपुष्टांत आल्यावर ब्रिटिशांनीं कायदेमंडळें स्थापन करून व लोकमताला प्रकट होण्यास कायदेमंडळांत वाव देऊन जें धोरण स्वीकारलें, त्याचा विस्तार मोर्ले-मिंटो सुधारणांपर्यंत कसा झाला, लोकांच्या आकांक्षा व राज्यकारभारांतील उणीवा कोणकोणत्या आहेत वगैरे अनेक विषयांचा ऊहापोह या लेखमालेंत केलेला आहे. हिंदुस्थानांतील विचारवंत लोकांना राज्यसुधारणा कोणत्या दिशेनें व्हाव्या असें वाटतें याचा खुलासा या नात्यानें ऐतिहासिक दृष्टया या लेखमालेला बरेंच महत्त्व देतां येईल; परंतु त्यांतील विचारांचें तपशीलवार दिग्दर्शन करण्याची आवश्यकता नाहीं. एका वाक्यांत त्या लेखमालेचें तात्पर्य असें सांगतां येईल कीं, लोकमतास मान देणारी राज्यव्यवस्था अस्तित्वांत आल्याशिवाय लोकांतील राजकीय असंतोषास मूठमाती दिली जाणें अशक्य आहे.

१९१७ सालीं पार्लमेंटांत भारतमंत्र्यांनीं राज्यसुधारणा करण्यासंबंधाचें जाहिर आश्वासन उच्चारलें आणि १९१८ सालीं भारतमंत्री मॉंटेग्यू हे हिंदुस्थानांतील राजकीय परिस्थिति आणि विचारधारा यांचें निरीक्षण करण्यासाठीं हिंदुस्थानांत आले. यामुळें सर्व राजकीय पक्षांत आपल्या राजकीय विचारांची संघटना करण्याची जरूरी वाटली. हिंदुस्थानांतील प्रागतिकांनाही आपले राज्यकारभाराविषयींचे विचार सुसंगत रीतीनें एकत्र मांडणें अवश्य होतें. या उद्योगांत १९१७–१८ सालीं नारायणरावांचा बराच काळ खर्ची पडला. १९१६ सालीं कॉंग्रेसनें मुस्लीम लीगशीं एकोपा साधून राज्यसुधारणांचा खलिता तयार केला. त्याला जास्त खुलाशाची पुस्ती म्हणून मुंबईतील सर दीनशा वाच्छा, भालचंद्र कृष्ण भाटवडेकर, सर चिमणलाल सटेलवाड प्रभृति १० प्रागतिक पुढाऱ्यांनीं एक खर्डा लिहून काढला. या दहा जणामध्यें नारायणराव होते, हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं. दहाजणांच्या नांवांकडे पाहिल्यास ज्या दोघांवर हा खर्डा तयार करण्याची जबाबदारी पडली असेल, त्यामध्यें नारायणराव अग्रेसर होते हें सहज लक्षांत येणारें आहे. १९१८

च्या उत्तरार्धापर्यंत काँग्रेस व प्रागतिक यांचा उघड बेबनाव झालेला नव्हता. १९१८ सालीं तो काँग्रेसच्या धोरणामुळें झाला. मॉटेग्यू व तत्कालीन व्हाइसरॉय चेम्सफर्ड या दोघांनीं प्रसिद्ध केलेला राज्यसुधारणांचा अहवाल कांग्रेसनें रद्दीच्या टोपलींत टाकण्याच्या लायकीचा ठरविल्यानें प्रागतिकांना आपली निराळी छावणी उभारणें भाग पडलें; प्रागतिकांची देशव्यापी संघटना करण्याच्या कामीं नारायण-रावांनाही श्रमाचा वाटा उचलावा लागला. शेवटीं मॉटेग्यू चेल्मफर्ड सुधार-णांचा कायदा पार्लमेंटांत पास होऊन अमलांत आला. दरम्यान श्री. गांधींनीं राजकारणांत उडी घेऊन आपल्या सत्याग्रहाच्या निशाणाखालीं प्रचंड लोक-संख्या गोळा केली. काँग्रेसनें १९१८ सालीं पुकारलेल्या धोरणाची–सत्याग्रहाची चळवळ ही सरळ स्वाभाविक पुरवणीच होती म्हटल्यास चालेल. नारायणरावांना अर्थातच गांधींच्या सत्याग्रहाची धामधूम पसंत नव्हती. १९१९ सालीं एकदां या चळवळीचा प्रयोग अयशस्वी होऊन त्या चळवळीच्या परिणामांचा अनुभव येऊन गेला होता. अद्यापि सत्याग्रहाला अनुकूल अशी परिस्थिति देशांत उत्पन्न झालेली नाहीं, असा कबूली जबाब देऊन गांधींनीं आपलें सत्याग्रहाचें शस्त्र १९१९ सालीं मागें घेतलें होतें. परंतु १९२० सालीं राज्यसुधारणा अंमलांत येण्याच्या वेळीं गांधींनीं पुनः एकदां असहकारितेचा सत्याग्रह सुरू करण्यासाठीं देशभर आपल्या शिकवणीचा प्रसार चालविला. राज्यसुधारणा लोकांस अग्राह्य असतांही त्या लोकांवर जबर-दस्तीनें लादल्या जात आहेत, यासाठीं त्यांचा असहकारितेनें प्रतिकार करावयाचा आणि खिलाफतीच्या प्रकरणांत मुसलमानांस न्याय मिळाला नाहीं, म्हणून त्यांनाही सत्याग्रहाच्या जोरावर न्याय मिळवून द्यावयाचा, असे गांधीचे दुहेरी हेतु जाहीर झाले होते. ता. १ ऑगस्ट १९२० रोजीं सत्याग्रहाचें सूतउवाच करून गांधींनीं असहकारितेचा तपशीलवार कार्यक्रम त्या वर्षाच्या सप्टेंबरांत कलकत्त्यास भरलेल्या काँग्रेसच्या जादा बैठकीपुढें आणिला व बहुमताच्या पाठिंब्यानें पास करून घेतला. तथापि देशांतील बरेच पुढारी असहकारितेच्या इष्टफलाविषयीं साशंक होते. गांधींनीं त्यांस १९२० सालीं नागपुरास भरलेल्या काँग्रेसच्या अधिवेशनांत आपल्या पक्षांत ओढून घेतलें आणि १९२१-२२ या वर्षांत गांधींच्या प्रभावानें सारा देश व्यापून टाकला. नारायणरावांना असहकारितेचीं तत्त्वें आणि कार्यक्रम हीं दोन्ही पटत नव्हतीं, त्यामुळें त्यांनीं या कालावधींत असहकारितेशीं लेखनद्वारें झगड-ण्याचे प्रयत्न अविश्रांत केले.

गांधींची असहकारितेची चळवळ वादळाप्रमाणें सर्वत्र गरजत उठली. या चळवळीनें हिंदी जीवनाच्या साऱ्या शाखा मोडून टाकण्याची उमेद धरली होती. सरकाराकडून मिळालेल्या पदव्यांच्या त्यागापासून तों शेतसारा किंवा कर न

देण्यापर्यंत जितक्या म्हणून सरकाराशीं संबंध आणणाऱ्या बाबी असतील तेवढ्या सर्व टाळून अगदीं स्वतंत्रपणें स्वावलंबनाच्या आधारावर जगण्याचा उपाय गांधींच्या असहकारितेनें लोकांच्या कानांत भरला. शाळा-कोर्टांवर बहिष्कार, विदेशी मालावर बहिष्कार, आणि खादीचा स्वीकार, दारूबंदीसाठीं दारूच्या दुकानावर आणि लिलावावर नाकेबंदी, वगैरे सत्याग्रहाच्या विचित्र प्रकारांनीं राज्यकारभाराची अडवणूक करावयाची, असा कार्यक्रम गांधींनीं आंखला. इंग्रजी राजवटीनें हिंदी जनतेच्या जीवनाला जें वळण लावून दिलें, तें मुळासकट उलथून टाकून काल्पनिक स्वावलंबनाचें नवें वळण लावण्याचा गांधींचा प्रयत्न देशाच्या हानीस कारणीभूत होईल, असें नारायणरावांस वाटत होतें. १९२० सालअखेरीस नागपूर शहरीं कॉंग्रेसची बैठक उरकल्यावर गांधींच्या विजयाचें सत्याग्रहप्रसारक वारें देशांत सर्वत्र जोरानें वाहूं लागलें. मुलें व तरुण शाळा-कॉलेजांतून बाहेर पडून खेड्यांतून काम करण्याच्या मोहिमेवर निघाले; लवादकोर्टें स्थापण्याची धामधूम सुरू झाली; मुसलमान स्त्रीपुरुषांनींच खिलाफतीच्या प्रकरणांत न्याय देण्याची ब्रिटिश साम्राज्य-सरकार कुचराई करतें या समजुतीनें देशान्तरवासासाठीं देशान्तराची वाट धरली. क्षणभर असें दृष्टीस पडलें कीं, देश हादरून जनतेचें जीवन अस्ताव्यस्त होऊन गेलें आहे. अशावेळीं देशाच्या कल्याणाची मनःपूर्वक चिन्ता वहाणारांना स्वस्थ रहाणें अशक्य व्हावें, यांत नवल नाहीं. नारायणरावांनीं या प्रसंगीं गांधींनीं असह-कारितेच्या कार्यक्रमाचा जो जाहीरनामा काढला होता, त्याचें खंडन करणाऱ्या मुंबईंतील पुढाऱ्यांच्या जाहीरनाम्याच्या रूपानें आपली लेखणी हातीं घेतली. गांधींनीं ज्यावेळीं मुंबईंतील पुढाऱ्यांच्या जाहीरनाम्यावर हल्ला करून स्वमताच्या बळकटीकरितां नानाविध ऐतिहासिक आधार पुढें केले, तेव्हां नारायणरावांना आपल्या ज्ञानभाण्डारांतील माहिती उघडकीस आणून गांधींच्या स्वमतसम-र्थनांतील चुकीच्या अथवा पोकळ विधानांची व विचारांची हजेरी घेण्याची संधी लाभली. नारायणरावांनीं या प्रसंगीं कळकळीच्या आवेशानें गांधींच्या समजुतींचा परामर्श घेतला आहे. सत्याग्रहाची चाल फार जुनी आहे, एखाद्याच्या दाराशीं धरणें धरून प्रायोपवेशन करीत बसण्याची प्राचीन प्रथा अर्वाचीन सत्याग्रहाची पूर्वज म्हणण्यास हरकत नाहीं; परंतु असला सत्याग्रह ज्या काळीं यशस्वी होत असे, तो काळ गेला. सत्याग्रहानें कोणी आपल्या दाराशीं जीव दिल्यास त्याच्या हत्येचें पाप आपल्या कुळाचा व राज्याचा उच्छेद करील अशी भावना उराशीं बाळगणारे राज्यकर्ते आतां उरलेले नाहींत; उलट जीव देण्याच्या धाकाची जबरदस्ती कोणी करूं लागेल तर त्याला गुन्हेगार ठरवून शिक्षा देणारे कायदे आज अमलांत आहेत. गांधींचा विश्वास सनदशीर

चळवळीवर नाहीं; यामुळें ते जर असहकारितेचें प्रतिपादन करीत असतील, तर त्यांना सनदशीर चळवळीच्या परिणामांचें यथार्थ ज्ञान नाहीं असें म्हणावें लागेल. बर्कनें वॉरन हेस्टिंग्सवर फिर्याद भरली, ती शेवटीं निष्फळ झाली, पण त्या फिर्यादीनें कंपनीच्या राज्यकारभारांतील दोष चव्हाट्यावर आणून त्या राज्यकारभाराची सुधारणा करण्याकडे ब्रिटिश जनतेचें व कर्तबगार लोकांचें लक्ष वेधून घेतलें, हा अप्रत्यक्ष लाभ विसरून चालणार नाहीं; तसाच अप्रत्यक्ष लाभ जालियनवाला प्रकरणांत न्याय मिळाला नसला तरी ब्रिटिश जनतेचा सदसद्विवेक जागृत झाल्यामुळें हिंदी जनतेच्या वांट्यास आला आहे; अशा रीतीनें गांधींच्या कल्पनांची हजेरी घेऊन शाळाकोर्टांचा बहिष्कार वगैरे कलमांचें तपशीलवार परीक्षण नारायणरावांनीं आपल्या लेखमालेंत केलें आहे. नारायणरावांनीं सत्याग्रहाचा एक अनिष्ट परिणाम सुचविला आहे व तो ध्यानांत बाळगण्याजोगा आहे. हिंदी जनतेला राज्यघटनेच्या कायद्यानें चालणाऱ्या राज्यकारभाराची ओळख कधीं नव्हती. एक राजा जाऊन दुसऱ्यानें त्याचा ताबा बळकाविल्यास हिंदी जनता त्यांतील बरा कोण आणि वाईट कोण इतक्यापुरताच निष्क्रिय विचार करीत असे. राजा वाईट असल्यास त्याला आपल्या प्रजेचें हित करावयास भाग पाडण्याची विद्या हिंदी जनतेला पूर्वीच्या काळीं केव्हांच कळलेली नव्हती. इंग्रजी राज्यांत त्या विद्येशीं परिचय होऊन तिचा प्रयोग हिंदी जनता करूं लागली आहे; पण गांधींच्या असहकारानें त्या विद्येचें उच्चाटण होऊन पुढाऱ्यांच्या बेबंदशाहीला अवकाश मिळण्याला व त्यामुळें आजतागायत केलेल्या राजकीय प्रगतीवर बोळा फिरण्याचा संभव फार आहे, असें नारायणरावांनीं एका ठिकाणीं म्हटलें आहे. शाळाकोर्टांचा बहिष्कार किंवा असहकारितेचे दुसरे प्रकार परिणामीं फोल ठरणार हें सर्वांनाच दिसत होतें. नारायणरावांनींही त्यांचा फोलपणा विवेचनपूर्वक निरनिराळ्या देशांच्या इतिहासांतील उदाहरणें देऊन लोकांना स्वच्छ करून दाखविला. आज असहकारितेच्या कार्यक्रमांतील पुष्कळशीं कलमें विस्मृतीच्या खाईंत जाऊन पडल्यामुळें त्यांचा निर्देश करण्याची जरुरी नाहीं. प्रस्तुत विषयाची रजा घेण्यापूर्वी गांधींच्या योग्यतेची जाणीव नारायणरावांना किती व कशी होती ह्याचा एक मासला दाखल करणें अवश्य वाटतें. असहकारितेच्या कार्यक्रमाच्या आपल्या विवेचनानें चिंधड्या उडवीत असतां एका ठिकाणीं त्यांनीं गांधींबद्दल पुढील अभिप्राय सादर केला आहे:—" गांधींची असहकारिता म्हणजे विलक्षण भ्रम आहे, असें दाखविल्यानें गांधींच्या योग्यतेचें बिनचूक व यथाप्रमाण महत्त्वमापन होत नाहीं; गांधींनीं हिंदीजनतेवर प्रचण्ड उपकार करून ठेवले व त्यासंबंधांत देशाला कृतज्ञतेचा भार सदैव आपल्या शिरीं वहावा लागेल. त्यांना

महात्मा, वीरपुरुष, विभूति वगैरे संज्ञा अर्पण केल्यानेंसुद्धां त्यांच्या योग्यतेचें मोज-माप लक्षांत येणार नाहीं. ते भविष्यदर्शी युगप्रवर्तक ( Prophet ) पुरुषांपैकीं आहेत. हल्लींच्या युगांत भौतिक शास्त्राची बोलबाला चालली असून अर्थशास्त्र हें सर्वांचें उपास्य दैवत होऊन बसलें आहे. धोरण, मुत्सद्देगिरी या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या कर्तृत्वप्रकारानें धर्म, समाज, राजकारण या सर्व कार्यक्षेत्रांत घुसून मानवजातीला क्लेशांत लोटलें आहे. गांधी या भौतिकशास्त्राच्या बडेजावीचे विरोधक आहेत. त्यांना आपल्या आध्यात्मिक जीवनाचें उष्णतामापक यंत्र म्हटल्यास शोभेल; कारण ते आत्मबलाचे उपासक आहेत. त्यांच्याद्वारें हिंदी जनतेचा आत्मा जागृत झाला असून गांधींच्या मुखानें तो बोलूं लागला आहे. भौतिक सुखाच्या महात्म्याच्या या युगाचे दुष्परिणाम टाळण्याची इशारत गांधींच्या द्वारें आपणास मिळत आहे. ते भविष्यदर्शी युग-पुरुष असल्यानें त्यांच्या उपदेशाकडे आपण लक्ष दिलें पाहिजे; शक्य असल्यास त्या उपदेशाप्रमाणें आचरण करण्यास झटलें पाहिजे. कारण ते अंतरात्म्याला जागृत करणारे आहेत. एकंदर समाजव्यवस्थेच्या अंगोपांगांत सांठलेल्या एकंदर रोगांची हकालपट्टी करण्यासाठीं त्यांच्या तोंडून निघणाऱ्या उद्गारांचें आपण श्रद्धापूर्वक श्रवण केलें पाहिजे; पण ते जेव्हां विशिष्ट रोगावर विशिष्ट स्वरूपाचा उपाय सांगतील तेव्हां आपण आपल्या सारासारविवेकाचा कौल घेऊन वागणेंच उचित व श्रेयस्कर ठरेल. असें करतांना युगपुरुषानें चेतविलेल्या प्रकाशाचा सुद्धां उपयोग करावा, पण त्यानें सांगितलेलाच उपाय तेवढा खरा असें समजून वागणें इष्ट होणार नाहीं. एकाद्या रोगाच्या उपायाबद्दल मतभेद झाला तरी युगपुरुषाच्या योग्यतेची हानी होत नाहीं."

## शेवटला लेख

नारायणरावांनीं इंदूरहून परत आल्यापासून अगदीं अखेरपर्यंत आपला लेखन-व्यवसाय सारखा चालू ठेविला होता. वरील विवरणांत त्यांच्या अनेक लेखांची रूपरेषा आंखिली आहे व त्यांच्या विचारांची दिशा दाखविली आहे. त्या व्यति-रिक्त नारायणरावांनीं पुष्कळ लेख बाहेरच्या वर्तमानपत्रांसाठीं लिहिले आहेत, हें येथें नमूद करणें अगत्याचें आहे. ज्या ज्या वेळीं कोणत्याही प्रचलित विषयावर चर्चा झाली व प्रागतिकांच्या विचारांची जनतेस ओळख करून देण्याची आवश्यकता नारायणरावांस पटली त्या त्या वेळीं त्या त्या विषयावर आपले विचार स्पष्टपणें लोकांपुढें ठेवावयास ते पुढें आले. त्यांच्या कोणत्याही लेखांत असंदिग्ध असें कांहीं नसे. अशाप्रकारें लोकशिक्षणाचें कार्य चालू असतां १९२३ सालीं Lenin and Gandhi ह्या १९२७ सालीं प्रसिद्ध झालेल्या ग्रंथाचे कर्ते

मि. रेने फुलाप-मिलर ह्यांचें ज्यान्युआरी महिन्यांत लिहिलेलें पत्र नारायणरावांस आलें होतें. त्यांत त्यांचा मुख्य मुद्दा असा होता कीं, लढाया करून जगाची उन्नति झालेली कांहीं दिसत नाहीं. त्यामुळें गांधीजींच्या मार्गाकडे लोकांचें अधिक लक्ष लागणें साहजिक झालें आहे. म्हणून युरोपखंडाच्या उन्नतीच्या दृष्टीनें गांधीजींच्या मार्गाचा कितपत उपयोग होण्यासारखा आहे असें त्यांनीं नारायणरावांस विचारिलें होतें. त्यांचे प्रश्न मुळांतच येथें दिले असतां त्यांचें खरें स्वरूप वाचकांच्या लक्षांत येईल म्हणून ते येथें देतों :—

(1) What is the significance, for all mankind, of the practical experiment of non-violence as exercised by Gandhi in the universal combat for liberty and particularly for Europe ?

(2) Do you consider it right and possible that the oppressed races, classes and people of Europe shall likewise carry out their struggles for liberty by means of non-violence ?

(3) Do you believe that this method of combat applied to Europe could there also lead to the deliverance of oppressed mankind as in India, where, although Gandhi is a captive, the British colonial policy threatens more and more to be wrecked on the non-violence tactics of Gandhi's adherents ?

ह्या तीन प्रश्नांपैकीं दोन प्रश्नांचींच नारायणरावांनीं उत्तरें दिलीं आहेत व तिसऱ्याचें उत्तर दुसऱ्या प्रश्नाच्या उत्तरांत आलें असल्याचें त्यांनीं दाखवून दिलें आहे. वास्तविक पहातां ह्या प्रश्नांसंबंधानें नारायणरावांनीं जे विचार प्रदर्शित केले आहेत, ते नवीन नाहींत; त्यांचें स्वरूप पूर्वविवेचनावरून आपणास कळून चुकलें आहे; तथापि हीं उत्तरें सर नारायण ह्यांनीं **ता. १९ एप्रिल १९२३** रोजीं लिहून त्यावर आपली सही[१] केली आहे. सार्वजनिक महत्त्वाचा त्यांच्या लेखणींतून उतरलेला हा शेवटचाच लेख होय असें मानावयास जागा आहे. ह्यानंतर एक महिन्याच्या आंत, ता. १४ मे रोजीं बंगलोर मुक्कामीं त्यांस परलोकवास प्राप्त झाला. म्हणजे निःशस्त्र प्रतिकार, असहकार ह्यासंबंधानें आयुष्याच्या अगदीं अखेरीससुद्धां त्यांचीं काय मतें होतीं त्याची ह्या उत्तरावरून सुस्पष्ट कल्पना होणार आहे; म्हणून ह्या उत्तराचें सार पुढें दिलें आहे :—

सरकारकडून जुलूम, जबरदस्ती होऊं लागली म्हणजे प्रजेनें निःशस्त्र प्रतिकार व असहकार करावयाचा हा उपाय हिंदुस्थानांत तरी नवीन नाहीं. ब्रिटिश सत्तेस प्रारंभ होण्यापूर्वीच हा उपाय अमलांत आणिला गेला होता. सर जॉन माल्कम ह्यांच्या Political History of India ह्या ग्रंथांत ह्या संबंधाची माहिती सांप-

१. हा सहीचा नमुना ३६३ पृष्ठावर तारखेसह जशाच्या तसा छापला आहे.

डेल. काशीच्या सर्व लोकांनीं १८१२ सालीं सरकारनें बसविलेल्या करास विरोध करण्याच्या हेतूनें सर्व व्यापार बंद ठेवला, दुकानें बंद केलीं, लोकांनीं कामधंदे सोडले. पण कोणत्याही प्रकारें दंगाधोपा कांहीं केला नाहीं. त्याचा परिणाम असा झाला कीं, सरकारला कर उठवावा लागला! दुसरें उदाहरण १८३०-३१ मधलें असून तें एका संस्थानासंबंधानें आहे. राजेसाहेबांच्या जुलमाला कंटाळलेल्या प्रजेनें स्थानत्याग केला, जमिनी पेरण्याचें नाकारलें, अधिकाऱ्यांना बाहेर हांकून लाविलें, कर कोणास देऊं दिले नाहींत व वसूल करूं दिले नाहींत. त्यांच्यापाशीं शस्त्रें नव्हतीं, म्हणून सर्व लोक जंगलांत जाऊन राहिले व रात्रीं अपरात्रीं चोरून ते आपल्या घरांतून धान्य घेऊन जात व आपली उपजीविका करीत. १८५५ सालीं सर मार्क कबन ह्यांनीं ब्रिटिश सरकारला रिपोर्ट करतांना असें स्पष्ट म्हटलें आहे:—

The several modes by which the natives (of India) have corrected abuses, or have got rid of tyrranical masters are familiar to them. None is common or so effectual as to withdraw from Government altogether.

ह्यावरून गांधीजी ज्या उपायांची योजना करीत आहेत ते नवीन नसून जुनेच उपाय ते पुन्हां सुरू करीत आहेत असें दिसून येईल. मग ह्या उपायाचा उगम केव्हां झाला असावा त्याचा छडा जर लावावयाचा तर महाभारताच्या काळापर्यंत आपल्याला जावें लागेल. महाभारतांत लढाई ही जीत व जेते ह्या दोघांस सारखीच अधोगतिकारक (Curse) आहे असें म्हटलें आहे. ख्रिस्तापूर्वी तीनशें वर्षें आधीं गौतमबुद्धानें अहिंसेचें तत्त्व पुकारिलें व लोकांनीं त्याचा स्वीकार केला. सारांश, आज गांधीजी निःशस्त्र प्रतिकार व असहकार ह्या उपायांची योजना सुचवीत आहेत त्याचें रहस्य हें आहे कीं, राजसत्ता प्रजेचें स्वातंत्र्य हिरावून घेईल, परंतु आत्म्याचें स्वातंत्र्य जें आहे तें कोणासही हिरावून घेतां येणार नाहीं. आणि तरवारीच्या जोरावर जो कोणी जय मिळवितो त्याच्यावरही त्याच साधनाच्याद्वारें दुसरा कोणी जय मिळवितो! सारांश, आत्म्याच्या आध्यात्मिक सामर्थ्याच्याद्वारें जय मिळविण्याची उपाय योजना गांधीजी सुचवीत आहेत.

जुलूम करणें, शस्त्रास्त्रांचा उपयोग करणें, लढाई करणें ह्यांपेक्षां हे उपाय अधिक चांगले ह्यांत कांहीं संशय नाहीं. परंतु युरोप काय किंवा दुसरा कोणताही देश घेतला तरी आज ह्या उपायांचें अवलंबन करणें श्रेयस्कर आहे असें मला वाटत नाहीं. ह्या उपायांचें अवलंबन करावयाचें तर त्यास पूर्वतयारीही तशीच असावी लागते. म्हणजे हे उपाय अमलांत आणावयास जीं माणसें पुढें येतील तीं सर्व

संयमी असलीं पाहिजेत. कोणत्याही प्रकारें चीड आणणारे प्रकार घडले तरी शांति ढळूं न देतां, क्रोधास बळी न पडतां वागणारीं माणसें पाहिजेत. परंतु गेल्या तीन वर्षांत असा अनुभव आला आहे कीं, गांधींच्या ह्या उपायांच्या घोषणेचा परिणाम पुढें मागें दंगेधोपे, मारहाण, लुटालूट, रक्तपात व शस्त्रें घेऊन हत्या करणें असा होतो![१] आणि हिंदुस्थानासारख्या ३५० लक्ष लोकांच्या वस्तीच्या देशांत ह्या उपायास अपयश आल्यावांचून कधींही राहाणार नाहीं. आणि आज ह्या चळवळीला अपयश येत असल्याचें दिसूनही येऊं लागलें आहे.[२] आतां युरोपविषयीं म्हणाल तर आजच्या स्थितींत ह्या उपायाला तेथें स्थानच कोठें आहे तें कळत नाहीं. तेथें सर्वत्र लोकसत्तात्मक सरकार आहे. लोकांसाठीं राज्य आणि तेंहि लोकच चालवीत आहेत. तेथें ह्या उपायांचें अवलंबन केलें तर आपणांशींच असहकार करावयाचा किंवा निःशस्त्र प्रतिकाराचा उपाय अमलांत आणावयाचा असें होणार आहे.[३] शेवटीं एवढेंच सांगावयाचें कीं गांधींचे उपाय हे आपल्या देशांत आजच्या स्थितींत करून पहाण्यासारखे आहेत असें मला केव्हांच वाटलें नाहीं; ते अमलांत आणिल्यानें देशाचें कल्याण होणार नाहीं असेंच माझें मत आहे.[४]

---

१. Mr. Gandhi's experiment, so far as he has tried it in these three years, has tended to prove that the preaching of the doctrine of non-violence leads sooner or later to violence, bloodshed, and loss of life and property and the brutal force of an armed rebellion.

२. And signs are not wanting in India to show that the movement is failing.

३. As to the peoples of Europe, I do not see how there is room for this experiment when in all countries of Europe the Government has come to be the Government of the people, by the people and for the people.

४. I have never approved of Mr. Gandhi's experiment as being suited to or for the good of India in its present conditions.

प्रकरण चवदावें

# शिक्षणविषयक कार्य व विचार

नारायणरावांचा फेलो ह्या नात्यानें मुंबई विद्यापीठाशीं १८८७ सालीं संबंध जडला, तो अखेरपर्यंत कोणत्या ना कोणत्यारूपानें कायम होता. वास्तविक पहातां सुशिक्षित तरुणांच्या कल्याणाच्या प्रश्नाकडे त्यांचें विशेष लक्ष त्यापूर्वीच लागलें होतें. कारण, Responsibilities of students ह्या विषयावर त्यांचें जें अत्यंत महत्त्वाचें व्याख्यान विल्सन कॉलेजच्या लिटररी सोसायटीच्या विद्यमानें झालें तें १८८६ सालीं झालें होतें. अर्थात् त्या सालीं त्यांनीं इतकें विचारपरिपूर्ण व्याख्यान देणें ही गोष्ट त्याच्या आधींपासून त्यांचें तरुणांकडे विशेष लक्ष होतें असें सिद्ध करावयास पुरेशी आहे. पुढें १८८९ सालीं त्यांनीं विल्सन कॉलेजमध्येंच Aims of life अशा विषयावर व्याख्यान दिलें. पूर्वीच्या काळीं, म्हणजे १९०४ सालचा युनिव्हर्सिटी ॲक्ट अंमलांत येण्यापूर्वी, मुंबईचें विद्यापीठ हें ठरलेल्या अभ्यासक्रमानुसार परीक्षा घेण्याचें यंत्र होतें. ही गोष्ट प्रत्यक्ष मुंबई विद्यापीठालाही अमान्य नाहीं,[1] हें पुढील वाक्यावरून सिद्ध होत आहे :—

Until the passing of the Indian Universities Act of 1904, which revised the powers of the Indian Universities, the Bombay University like the others, was limited to the function of examining candidates and arranging for the courses of study which led up to their degrees. असा खरा प्रकार असल्यामुळें बाहेरच्या क्षेत्रांत वावरणाऱ्यांना अभ्यासक्रमांत विशेष फेरफार करणें, व नियमांत फेरबदल करणें ह्या पलीकडे कांहीं काम नसे. नेहमींचे अभ्यासक्रम पूर्वी सिंडिकेटच ठरवीत असे, त्यामुळें फेलोजना तेथें विशेष काम नसे. सेनेटच्या सभा वारंवार भरत नसत व प्रवास-खर्च मिळण्याची व्यवस्था नसल्यामुळें, विशेष कारण असल्या-

---

१. १९२१-२२ व १९२२-२३ सालांचें युनिव्हर्सिटी क्यालेंडर, व्हॉल्यूम १, पृ. ७०५ पहा.

वांचून परगांवीं रहाणारे फेलो युनिव्हर्सिटीच्या कारभारांत फारसें मन घालीत नव्हते, असें युनिव्हर्सिटीचीं जुनीं कॅलेंडरें पहातां कोणाच्याही ध्यानांत येईल. ह्यावरून असें दिसून येईल कीं, १९०२ सालीं इंडिअन युनिव्हर्सिटी कमिशन जेव्हां नेमण्यांत आलें, तेव्हांपासून उच्च शिक्षणाच्या बाबतींत मुंबईत नवयुगास प्रारंभ झाला. ह्या कमिशनवर मुंबई इलाख्याच्या वतीनें डॉ. मॅकीकन ह्यांस नेमिलें होतें व कमिशन मुंबईस आलें होतें तेवढ्या काळापुरते म्हणजे ता. २८ फेब्रुआरीपासून ता. ७ मार्च १९०२ पर्यंत नारायणरावांस कमिशनचे सभासद नेमले होते. त्यावेळीं डॉ. मॅकीकन् हे व्हाइस चॅन्सलर होते. ह्या कमिशनसंबंधानें लोकांमध्यें पुष्कळ गैरसमज उत्पन्न झाला होता. रिपोर्टामध्यें

In a rightly governed University, examination is subordinate to teaching, in India teaching has been made subsidiary to examination, असें स्पष्ट म्हटलें होतें व त्याच्या अनुरोधानें विशेष फरक सुचविले होते. पूर्वीच्या काळांतील युनिव्हर्सिटीच्या फेलोंची यादी जे कोणी पहातील त्यांस विद्यापीठांतील शिक्षणाच्या बाबतींत कांहींही सूचना करण्याची, अगर सुधारणा सुचविण्याची ज्यांची पात्रता नाहीं, अशाही माणसांची भरती तींत केलेली आढळून येईल. खुद्द डॉ. मॅकीकन ह्यांचें धोरण असें होतें कीं, युनिव्हर्सिटीचें आजपर्यंतचें धोरण पूर्वीच्या काळास अनुरूप जरी असलें, तरी आतां काळाबरोबर आपण गेलें पाहिजे व सुधारणा करण्यास प्रवृत्त झालें पाहिजे. व्हाइसरॉयकडून रिपोर्ट जेव्हां युनिव्हर्सिटीकडे आला, व युनिव्हर्सिटीला कांहीं बाबतींत आपले विचार प्रदर्शित करण्याची संधी मिळाली, त्यावेळीं एकंदर धोरणास विरोध करण्याचेंच तत्त्व मान्य झाल्याचें दिसून आलें. मूळ रिपोर्टांतील अनेक महत्त्वाच्या सूचनांस नेमलेल्या कमिटीनें विरोध केला. ह्या कमिटींत नारायणराव नव्हते. अखेरीस कमिटीच्या व सेनेटच्या सूचनांचा विचार होऊन १९०४ चा ॲक्ट पास झाला व त्याच्या द्वारें युनिव्हर्सिटीचें एकंदर स्वरूप बदललें. नारायणरावांना अनेक बाबतींत बदललेलें स्वरूप मान्य होतें व विद्यापीठांतील त्यांच्या हातून झालेली सर्व महत्त्वाची कामगिरी ह्या पुढल्याच काळांतील आहे असें म्हणतां येतें. खरें पहातां पूर्वीच्या काळीं विद्यापीठाचा व कॉलेजांचा प्रत्यक्ष संबंध मुळींच येत नसे. एकदां कॉलेज स्थापण्यास मान्यता मिळाली कीं, तुम्ही आमचे कोणी नव्हत, व आम्ही तुमचे कोणी नव्हत असा संबंध असे. विद्यापीठाचें कार्यकारी मंडळ म्हणजे सिंडिकेट, पण एकाद्या कॉलेजमध्यें कसें काय शिकविलें जात आहे तें पहाण्याचें जर ह्या सिंडिकेटच्या मनांत आलें, तर पूर्वीच्या नियमांनुसारें सिंडिकेटला हें कार्य हातीं घेण्याचा अधिकार नव्हता! एवढेंच केवळ नव्हे तर

स्वतः युनिव्हर्सिटी एकाद्या विषयाचा अध्यापक नेमून तो विषय एम्. ए. सारख्या उच्च परीक्षेच्या विद्यार्थ्यांस शिकवावयाचा म्हटलें, तर तसें करण्याचा अधिकार सिंडिकेटला नव्हता! तथापि १९०४ च्या कायद्यानें युनिव्हर्सिटीला एखाद्या विषयाचें शिक्षण देण्याची व्यवस्था करणें, वरील कार्यास उपयुक्त असे लहान मोठे ग्रंथ प्रसिद्ध करणें व युनिव्हर्सिटीचा व्याप वाढविण्यासाठीं अनेक योजना करणें इ० गोष्टी करण्यास अधिकार प्राप्त झाला. आणि विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, मुंबई विद्यापीठानें स्वतः एम. ए. च्या विषयांपैकीं एका विषयाचें शिक्षण द्यावें ही योजना नारायणराव व्हाइस-चॅन्सलर असतांनाच मुकरर झाली आहे. नारायणरावांच्या कारकीर्दीत विद्यापीठाच्या एकंदर धोरणामध्यें शिक्षण देणारी संस्था ह्या दृष्टीनें इष्ट असे फेरफार व्हावयास सुरुवात झाली. आणि ही सुरुवात व्हावयास हिंदुस्थान सरकारची उदार वृत्ति कारण झाली हें येथें स्पष्टपणें नमूद केलें पाहिजे. हिंदुस्थान सरकारनें युनिव्हर्सिटी कमिशन नेमलें, हिंदुस्थान सरकारच्या खटपटीमुळें सर्व जुन्या पीठांस नवीन रूप प्राप्त झालें व पूर्वीचें केवळ परीक्षा घेणारी संस्था हें रूप घालवून शिक्षण देणारी संस्था असें म्हणून घेण्याची पात्रता मुंबई विद्यापीठाच्या ठिकाणीं १९०४ च्या कायद्यामुळेंच आली ह्यांत कांहीं संशय नाहीं. परंतु पूर्वी न करतां येणाऱ्या गोष्टी करण्याची कायदेशीर सत्ता जरी प्राप्त झाली, तरी द्रव्याच्या अभावीं त्या दिशेनें कांहींही प्रयत्न झाले नाहींत. नाहीं म्हणावयास युनिव्हर्सिटीच्या कामकाजासाठीं परगांवाहून येणाऱ्या फेलोंना देण्यासाठीं सरकारकडून दहा हजार रुपयांची सालिना देणगी मिळूं लागल्यामुळें फेलोंच्या प्रवास-भत्त्याची मुबलक सोय झाली! परंतु सर्व सभांना फेलो हजर राहिल्यानें विद्यापीठाची सुधारणा होत नसते. सुधारणा करावयाच्या तर त्याला पैशाची जरुरी असते. आणि त्या दिशेनें खर्च करण्याचें सामर्थ्य त्यावेळीं मुंबई विद्यापीठाच्या ठिकाणीं नव्हतेंही. ह्या सर्व गोष्टींचा विचार करून नारायणरावांच्या कारकीर्दीत हिंदुस्थान सरकारकडून सालिना पंचेचाळीस हजार रुपयांची व एकरकमेनें तीन लक्ष रुपयांची देणगी मिळाल्यामुळें विद्यापीठाचें एकंदर स्वरूप बदलण्यास प्रारंभ झाला. पुष्कळशा सुधारणा नारायणरावांची कारकीर्द संपल्यानंतरच जरी अमलांत आल्या, तरी त्यांची वाटाघाट ते व्हाईस-चॅन्सलर असतांनाच झाली, एवढेंच केवळ नव्हे, तर भावी सुधारणांची सर्व रूपरेषा ठरविण्यांत नारायणरावांनींच पुढाकार घेतला होता, हें युनिव्हर्सिटीचीं कॅलेंडरें चाळणारांसही सहज कळण्यासारखें आहे.

पूर्वी मुंबई विद्यापीठाचा व पाली भाषेचा कांहीं संबंध नसे. डॉ. भांडारकरांच्या पुढाकारामुळें पाली भाषेचा विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत प्रवेश झाला. कारण, पुरातन चालीरीतींच्या व विचारांच्या संशोधनाच्याच दृष्टीनें पालीचें महत्त्व आहे

असें नसून, एकंदर धर्मांची सुधारणा, सामाजिक व धर्मविषयक स्थित्यंतरें ह्यांचें तौलनिक ज्ञान होण्यासाठीं पालीचें ज्ञान अवश्य आहे असें डॉ. भांडारकरांचें मत होतें व तें नारायणरावांच्या कारकीर्दींत मान्य होऊन पालीच्या अभ्यासास विद्यापीठांतील अभ्यासक्रमामुळें उत्तेजन मिळालें.

नारायणरावांची व्हाइस चॅन्सलर ह्या नात्याची कारकीर्द पुष्कळ गाजली. त्यांच्या काळांत ज्याप्रमाणें पुष्कळ महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या त्याचप्रमाणें पुष्कळ गैरसमज झाले, त्यांच्या हेतूंसंबंधानें बुद्धिपुरस्सर गैरसमज केले गेले, व त्यामुळें त्यांस पुष्कळ मानसिक त्रास झाला. युनिव्हर्सिटीच्या बगिच्यामध्यें इमारत बांधण्यासाठीं सर कावसजी जहांगीर ह्यांनीं देऊं केलेल्या देणगीच्या बाबतींतही एकंदरींत बराच त्रास झाला. प्रथमतः ही देणगी स्वीकारण्याचें ठरलें, पण कांहीं थोरामोठ्यांनीं बगिच्यामध्यें इमारत उभारण्यास हरकत घेतली, व सरकारच्या परवानगीवांचून बागेच्या जागेंत इमारत होणें शक्य नसल्यामुळें, त्याचप्रमाणें रस्त्याकडील जमिनीचा लांबच्या लांब तुकडा प्रत्यक्ष सरकारी मालकीचा असल्यामुळें, सर कावसजी ह्यांच्या देणगीवर पाणी सोडण्यावांचून दुसरा उपायच नव्हता.[१] ह्याच वेळीं सरकारतर्फे रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्सच्या भव्य इमारतीच्या कामास प्रारंभ झालाच होता, त्यालाच जोडून एक हॉल बांधण्यासाठीं गव्हर्नर साहेबांच्या हवालीं ती देणगी करण्यांत आली. युनिव्हर्सिटीच्या परीक्षांसाठीं मोठा हॉल असावा म्हणून सर कावसजी ह्यांनीं जी देणगी देण्याचें ठरविलें होतें, ती अंशतः पुरी व्हावी म्हणून युनिव्हर्सिटीकडून मोठी रक्कम घेऊन रॉयल इन्स्टिट्यूटमध्यें परीक्षांचे विद्यार्थि बसविण्याची व्यवस्था झाली. पण पुढें ही व्यवस्था गैरसोयीची ठरल्यामुळें युनिव्हर्सिटीचें रॉयल इन्स्टिट्यूटमध्यें परीक्षा भरविण्याच्या हक्काबाबत दिलेले एक लक्ष रुपये युनिव्हर्सिटीला परत देण्यांत आले व रॉयल इन्स्टिट्यूटच्या इमारतीशीं युनिव्हर्सिटीचा आर्थिक संबंध राहिला नाहीं. युनिव्हर्सिटीच्या जागेंत इमारत बांधली जाऊं नये हा पक्ष प्रथम सर फेरोजशहा मेथा ह्यांनीं घेतला होता. रॉयल इन्स्टिट्यूटची इमारत आपल्या कारकीर्दींत पुरी होऊन ती संस्था सुरू व्हावी अशी सर जार्ज क्लार्क ह्यांची फार फार इच्छा होती, परंतु त्यांच्या मार्गांत बरेच अडथळे आल्यामुळें ते फार अधिरे झाले होते![२]

---

१. No building can be erected on the University Garden site without Government sanction, which will not be given, besides a strip is owned by Government.

*—Chancellor to Vice-Chancellor*

२. Perhaps I am too impatient but you well know how diffi-

लोकांनीं युनिव्हर्सिटीच्या बागेंत इमारत उठविली जाऊं नये असे अर्ज करून सरकारला कळविलें, तें त्यावेळीं सरकारच्या पथ्यावर पडलें; सर कावसजी ह्यांची सर्व देणगी त्यामुळें सरकाराकडे गेली, व त्या देणगीमुळें हल्लींचा सर कावसजी जहांगीर हॉल अस्तित्वांत आला.

आतां नारायणरावांच्या कारकीर्दींत जी एक मोठी गोष्ट झाली व जी निरनिराळ्या प्रकारचे गैरसमज उत्पन्न व्हावयास कारण झाली, तिच्याविषयीं माहिती देण्यापूर्वी एका महत्त्वाच्या गोष्टीचा येथें उल्लेख करणें अगत्याचें आहे. मुंबई विद्यापीठाचा जर इतिहास पाहिला तर असें दिसून येईल कीं, विद्यापीठाची सर्व व्यवस्था सिंडिकेट व व्हाइस-चॅन्सलर ह्यांच्याकडून होत आली आहे. कांहीं नव्या योजना, अभ्यासांतील फेरफार, किंवा दुसरे कांहीं फेरफार करणें असले, तरी त्यांचा उगम सिंडिकेटमध्यें प्रथम होत आला आहे. विशेषतः ह्या सर्व गोष्टींचा व गव्हर्नरसाहेब जे विद्यापीठाचे चॅन्सलर असतात त्यांचा प्रथमतः तादृश कांहीं संबंध नसे. परंतु सर जॉर्ज क्लार्क ह्यांच्या कारकीर्दीमध्यें सर्वांस फार निराळा अनुभव आला व त्यामुळेंच नानाप्रकारचे गैरसमज झाले व व्हाईस. चॅन्सलर सर नारायण ह्यांच्या अमदानींत नवीन सूचनांचा खल झाल्यामुळें लोकांनीं त्यांच्यासंबंधानें बरेच गैरसमज करून घेतले. सर जॉर्ज क्लार्क ह्यांना येथें येण्यापूर्वी शिक्षणविषयक अनुभव होता. त्यामुळें सेनेटनें कांहीं ठराव करावयाचे व त्यांस चॅन्सलर ह्यांनीं मान्यता द्यावयाची किंवा द्यावयाची नाहीं असा प्रकार त्यांच्या वेळीं नव्हता. त्यांनीं प्रथम मुंबई विद्यापीठाची स्थिति लक्षपूर्वक अवलोकिली. विद्यापीठाचे गुणदोष त्यांनीं ध्यानांत घेतले व प्रवेशपरीक्षेची स्थिति पाहिली; प्रवेशपरीक्षा व उच्च शिक्षण ह्यांचा संबंध लक्षांत घेतां कोणकोणत्या बाबतींत सुधारणा होणें अवश्य आहे ह्याचा विचार त्यांनीं आपल्या मनाशीं ठरविला व १९०८ सालच्या डिसेंबर महिन्यांत त्यांनीं सरकारी सूचनांचें पत्र युनिव्हर्सिटीकडे पाठविलें. त्यावेळीं डॉ. सेल्बी व्हाइस-चॅन्सलर होते. परंतु नारायणरावांच्या कारकीर्दीत ह्या पत्राचा खल झाला. चॅन्सलरनीं स्वतः जातीनें विद्यापीठाच्या कारभारांत ह्यापूर्वी इतकें मन घातलें नव्हतें. चॅन्सलर साहेबांनीं मेडिकल कोर्स, बी. एस. सी. कोर्स व बी. ए. कोर्स, अॅग्रिकल्चर कोर्स ह्यांत मन घातलें. पहिल्या दोन शाखांत

---

cult it is to push things through in India and my time among you is running out. As it is I shall never see the splendid building which will be erected or be allowed to play any part in starting the work of the Institution.

—*The Chancellor to the V. C.*

विशेष रणें माजलीं नाहींत. म्हणून आर्टस् कोर्ससंबंधानें सरकारच्या काय सूचना होत्या त्याची स्थूल कल्पना देतों. आपल्या बी. ए. व बी. एससी.च्या सायन्स अभ्यासक्रमांत फेरफार सुचविण्यासाठीं युनिव्हर्सिटीनें निरनिराळ्या कमिट्या नेमल्यानंतर सरकारचें ता. १८ डिसेंबर १९०८चें पत्र आलें. त्याचा विचार करण्याकरितां १९०९ च्या मार्च महिन्यांत एक कमिटी नेमली गेली. सरकारच्या सूचना अशा होत्या कीं, (१) मॅट्रिक्युलेशन परीक्षा फार अवजड[1] झाल्यामुळें ती बंद करावी. ही परीक्षा निरनिराळ्या कॉलेजांनीं घ्यावी. (२) प्रीव्हिअस् परीक्षा युनिव्हर्सिटीनें न घेतां कॉलेजांस घेण्याची परवानगी असावी. (३) इंटरमीजिएट् पासून पुढल्या परीक्षा युनिव्हर्सिटीनें घ्याव्या. (४) कॉलेजच्या प्रवेश परीक्षेंतून केमिस्ट्री व ॲस्ट्रोनॉमी हे विषय काढून टाकावे. (५) इंटरमीजिएटला इंग्रजी, पूर्वी पसंत केलेली दुसरी भाषा व गणित किंवा तर्कशास्त्र इतकेच विषय असावेत. (६) बी. ए. ला इंग्रजी व दुसरी भाषा किंवा मॅथमॅटिक्स व एक ऐच्छिक विषय एवढेच विषय असावेत. सरकारच्या पत्रामध्यें दुसऱ्या पुष्कळ सूचना आहेत. त्या सर्वांचा येथें विचार करावयाचा नाहीं. कारण पुढील भांडणाचें मूळ वरील सूचनांमध्येंच आहे. ज्यावेळीं स्वतः युनिव्हर्सिटीनें अभ्यासक्रमाची उजळणी करण्यासाठीं निरनिराळ्या कमिट्या नेमल्या किंवा ज्यावेळीं सरकारचें नव्या सूचनांचें पत्र आलें त्यावेळीं १८९१ मध्यें ठरलेले अभ्यासक्रम चालू होते. ते ठरविण्याच्या बाबतींत बर्डवूड, तेलंग, मॅकीकन व जार्डिन ह्यांनीं पुढाकार घेतला होता. १८९१ सालीं जे अभ्यासक्रम अमलांत आले होते त्यांचें तत्त्व स्वतः तेलंगांनीं असें प्रतिपादिलें होतें कीं, कोणत्याही एका विषयाची पारंगता बी. ए. झालेल्या व्यक्तींत येण्याची अपेक्षा करणें नलगे. बी. ए. झालेल्या मनुष्याला इकडचें तिकडचें सर्वसाधारण ज्ञान असावें व पुढल्या प्रगतीस बी. ए. पदवी पायाभूत व्हावी. त्याला इंग्रजी, एक प्राचीन भाषा, गणित, तर्क, अर्थशास्त्र, भौतिक शास्त्रें व इंग्लंड व हिंदुस्थान ह्यांचा इतिहास एवढे विषय कळले पाहिजेत.[2] सरकारकडून आलेल्या पत्राचा विचार करण्यासाठीं

---

१. १९०९ सालीं फक्त ३४३४ उमेदवार होते. आतां ही संख्या वीस हजारांवर गेली आहे!

२. A B. A. cannot be and ought not to be expected to be as master of any particular subject and an authority upon it immediately after his graduation. A B. A. should, I think, be a man who has had the general cultivation which ought to be the basis of all special cultivation. He should know English and a classic language, should have had the discipline which mathematics give,

सेनेटनें १६ इसमांची कमिटी ३ मार्च १९०९ रोजीं नेमली व तिच्या १३ बैठकी झाल्यानंतर जो रिपोर्ट १९१० च्या ज्यानेवारींत सेनेटपुढें विचारासाठीं आला त्यावर फक्त ६ जणांनीं सह्या केल्या ! ह्या सहांपैकीं तिघांनीं कांहीं बाबतींत असंमतिदर्शक विचार ( Minutes of Dissent ) प्रदर्शित केले ! ह्या तिघांतच डॉ. मॅकीकन व फादर ड्रेकमन, विल्सन व सेंट झेविअर कॉलेजचे प्रमुख होते ! सर नारायण, मि. शार्प, प्रिन्सिपॉल कॉव्हर्नटन्, डॉ. मॅन, रँग्लर परांजपे, प्रो. राजवाडे व कर्नल स्ट्रीट ह्यांनीं आपल्या विचारांची भिन्नमतपत्रिका जोडली; डॉ. स्कॉट ह्यांनीं निराळेंच मतपत्र लिहिलें व युनिव्हर्सिटीचे रजिस्ट्रार ह्यांनीं एकंदर युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमावर जें लिखाण लिहिलें आहे त्यानें कॅलेंडरचीं बारीक टाइपांत छापलेलीं बावीस पानें अडलीं आहेत ! खा. ब. दस्तूर ह्यांस सरकारनें सुचविलेल्या बहुतेक सूचना मान्य होत्या व त्यांचा स्वीकार केल्यास उच्च शिक्षणाची प्रगतीच होईल असें त्यांचें मत त्यांनीं प्रदर्शित केलें होतें.[१] आतां सर नारायण वगैरे कमिटीच्या सात सभासदांनीं जी भिन्नमतपत्रिका तयार केली होती ती सर नारायण ह्यांनींच तयार केलेली असल्यामुळें त्यांच्या विचारांची कल्पना आपण करून घेतली पाहिजे.

परीक्षा अगर अभ्यासक्रम ह्यांच्या संबंधानें आपल्या सूचना पुढें मांडण्यापूर्वी चार महत्त्वाचीं तत्त्वें त्यांनीं पुढें ठेविलीं होतीं :—

( १ ) अनेक विषयांचें थोडें थोडें ज्ञान असणें ही गोष्ट १८ वर्षांपूर्वी पुरी वाटत असली, तरी आज ती अपुरी आहे. थोड्या विषयांचा विशेष अभ्यास करणें हें आतांचें ध्येय आहे. विद्यापीठांच्या अभ्यासक्रमांत सर्वत्र फेरफार होत आहेत, व ते ह्याच तत्त्वावर होत आहेत. म्हणून अभ्यासक्रमांतील पुष्कळसे विषय कमी करून, ऐच्छिक विषय अधिक ठेवावे व त्यांत अधिक पारंगतता मिळविण्याकडे लक्ष असावें. (२) जे विषय निवडावयाचे त्यांचा एकमेकांशीं संबंध असावा. ज्याला बी. ए. ची परीक्षा पास व्हावयाची आहे त्याला फिजिक्स-केमिस्ट्री सारख्या विषयांत गुंतवूं नये. कारण, परीक्षेसाठीं त्याला त्या विषयांत जें ज्ञान मिळवावयाचें

---

should know the elements of logic, deductive and inductive, and of Political Economy and physical sciences and have a general knowledge of the History of India and England.

—*K. T. Telang*

१. As in my opinion Government scheme is based on sound principles and is well calculated to advance the cause of higher education in this Presidency, I would accept it.

—*Fardunji M. Dastur*

असतें तें अल्प असतें. शास्त्रोक्त पद्धत ऐच्छिक विषयांचें अध्ययन करितांना संपादतां येईल. ( ३ ) एकदां अभ्यासाला सुरुवात केली म्हणजे ते विषय शेवटपर्यंत अभ्यासले जावेत. उदाहरणार्थ, प्रवेश-परीक्षेंत सायन्स असतें, पुढें प्रीव्हिअसमध्यें त्याचा कांहीं संबंध येत नाहीं, मग इंटरमीजिएट्मध्यें फिजिक्स डोकावतें, तर पुढें पुन्हां कांहीं नाहीं ! तसेंच प्रीव्हिअसमध्यें ग्रीक अगर रोमच्या इतिहासाची अल्पशी ओळख होते, पण इंटरमध्यें त्या विषयाचा कांहीं संबंध नाहीं, मग पुढें संबंध आलाच तर बी. ए. मध्यें. ( ४ ) साधारणतः अभ्यासनीय सर्व विषयांची योग्यता शिक्षणाच्या दृष्टीनें सारखी मानिली पाहिजे व पुष्कळसे विषय बी. ए. च्या विद्यार्थ्याला आलेच पाहिजेत हें ध्येय आतां उपयोगाचें नाहीं. व्यक्तीला आपल्या आवडीच्या विषयांत गति करण्याची संधि विद्यापीठानें दिली पाहिजे. म्हणून आज अभ्यासक्रमांतील विषय काढून टाकूं नयेत, पण त्यांना ऐच्छिक विषयांचें रूप देऊन विद्यार्थ्यांना विषयांची निवड करावयास पुष्कळ अवसर ठेवावा.[१]

ज्यांचा शाळांशीं कोणत्याही प्रकारचा संबंध येत नाहीं असे बॅरिस्टर, संपादक, विलायतेहून नुकतेच आलेले तरुण ह्यांना मॅट्रिक्युलेशनचे परीक्षक नेमल्यामुळें त्यांच्या पेपरच्या धोरणानुसार सगळें खालचें शिक्षण होत असतें. ह्या लोकांना शाळांतून व कॉलेजांतून काय शिकविलें जातें ह्याची कल्पना नसते. म्हणून ह्या बाबतींत पुष्कळ फेरफार झाले पाहिजेत. आर्टस् कॉलेजच्या प्रिन्सिपाल्सचा एक बोर्ड स्थापून त्यांच्या हवालीं प्रवेश परीक्षा केली पाहिजे, व मॅट्रिक्युलेशनच्या बरोबरीच्या ज्या इतर परीक्षा असतील त्या पास होणारांना मॅट्रिक्युलेशन पास होण्याची जरूरी नाहीं असें झालें पाहिजे. प्रीव्हियस परीक्षा कॉलेजांच्या हवालीं करण्याच्या सूचनेस नारायणरावांनीं मान्यता दिली होती. प्रीव्हिअस व इंटर ह्या दोन्ही परीक्षांत नारायणरावांनीं सुचविलेली भिन्नता होती पण संबद्धताही होती. बी. ए च्या साध्या पास परीक्षेला इंग्रजी, एक दुसरी भाषा किंवा गणितशास्त्र व ऐच्छिक विषयांत इतिहास व अर्थशास्त्र, किंवा तत्त्वज्ञान, किंवा आणखी एक भाषा अगर उच्च गणित शास्त्र असे विषय सुचविले होते. ऑनर्स कोर्सही त्यांनीं सुचविला होता. ह्यांत खोल अभ्यास असावा अशी अपेक्षा होती.[२] पूर्वी बी. ए. साठीं एकच

---

१. The aim of a University should be to give a man a chance of self-development, not to impose an arbitrarily chosen system of knowledge on an individual mind.

२ The Honours Degree should be essentially intended to test depth rather than width of knowledge though we consider that

अभ्यासक्रम असे. ज्यांना गुणांचें शेंकडा ४५ प्रमाण पडेल त्यांना दुसरा वर्ग, व ज्यांना शेंकडा साठ पडेल त्यांस पहिला वर्ग मिळे. नव्या योजनेंत ऑनर्स साठीं अधिक अभ्यास असावेत अशी योजना सुचविली होती. नारायणरावांनीं सुचविलेली योजना १८९१ मध्यें अमलांत आलेल्या योजनेहून तत्त्वतः निराळी होती. आणि भांडणाचें मूळ इंग्लंडचा इतिहास आवश्यक विषयांतून काढून ऐच्छिक विषयांत घालणें ह्यांत होतें. आतां ह्या बाबतींत एक गोष्ट जी प्रथम लक्षांत घेतली पाहिजे तिच्याकडे पुष्कळांचें लक्ष जात नाहीं. लॉर्ड कर्झन ह्यांनीं नेमलेल्या युनिव्हर्सिटी कमिशनचा रिपोर्ट बाहेर पडल्यानंतर हिंदुस्थान सरकारनें रिपोर्टांतील कांहीं मुद्यां-वर निरनिराळ्या युनिव्हर्सिटींना विशेष पत्रें लिहून कांहीं सूचना केल्या होत्या. लॉर्ड कर्झन ह्यांनीं केलेल्या सूचनांमध्यें बी. ए. च्या परीक्षेंत इतिहास व अर्थशास्त्र अवश्य विषयांत असूं नये अशी सूचना होती. १९०३-०४ सालाच्या कॅलेंडर-मधील वरील पत्रांतील सूचनांची सेनेटनें जी विल्हेवाट लावली आहे तिचें स्वरूप जे कोणी पहातील ( पृ. ५७०-५७२ ) त्यांस हें स्पष्ट दिसून येईल कीं, लॉर्ड कर्झन ह्यांची ह्या बाबतींत ढवळाढवळ नको आहे असेंच सेनेटला दाखवावयाचें होतें. म्हणून सर्व सूचनांसंबंधाचे ठराव अशा स्वरूपाचे होतेः—

That the Senate is unable to approve of the exclusion of History and Political Economy from the Compulsory Arts Course.

ह्या ठरावावरून मूळ सूचना कोणत्या स्वरूपामध्यें असली पाहिजे त्याची कल्पना होते. म्हणजे इतिहास व अर्थशास्त्र आवश्यक विषयांत असूं नयेत ही मूळ कल्पना लॉर्ड कर्झन ह्यांची, ती १९०८ सालीं सर जॉर्ज क्लार्क ह्यांनीं केलेल्या सूचनांमध्यें समाविष्ट झाली व १९१० सालीं नारायणरावांनीं लिहिलेल्या भिन्नमतपत्रिकेमध्यें ऐच्छिक विषयांत तिचा समावेश झाला. आतां १८९१ मधला अभ्यासक्रम व १९१० सालीं इतिहासाच्या बाबतींत केलेली सूचना ध्यानांत घेतां ह्या अभ्यास-क्रमांत मूलतःच जो फरक आहे त्याच्याकडे लक्ष न जातां अगर लक्ष न देतां, सर्व वाद निरर्थक माजला होता, असें आज म्हणतां येतें. तेलंगांच्या वेळीं अनेक विष-यांचें थोडें थोडें ज्ञान असावें असें धोरण होतें व विशेष ज्ञान बी. ए. नंतर संपादा-वयाचें अशी अपेक्षा होती. ह्यासाठीं बी. ए. च्या प्रत्येक विद्यार्थ्याला इंग्लंडचा इतिहास व अर्थशास्त्र ह्यांचें थोडेंसें ज्ञान अवश्य असावें अशी योजना होती. नव्या सूचनेंत हा विषय ऐच्छिक विषयांत घालून त्याचें ज्ञान प्रमाणतः अधिक होईल अशी व्यवस्था योजिली होती. सेनेटमध्यें ह्या विषयावर जीं रणें माजलीं

---

in some subjects ( *e. g.* literature ) a more extended course of reading is implied in greater depth of knowledge.

व ज्या नाना सूचना, उपसूचना आल्या, त्यांच्यासंबंधानें जे कोणी खोलवर विचार करितील त्यांना असें दिसून येईल कीं, १९०३ सालांतल्या अनुभवाची ही पुनरावृत्ति होती. त्यावेळीं व्हाईसरॉयची सूचना होती, १९०८ सालीं ती व दुसऱ्या अनेक सूचना प्रांतिक सरकारकडून आल्या एवढाच त्यांतला फरक होता! अभ्यासक्रम ठरविण्याच्या बाबतींत सेनेटला पूर्ण स्वातंत्र्य असावें, गव्हर्नर साहेबांनीं त्यांत ढवळाढवळ करूं नये, अशी सेनेटच्या कित्येक पुढाऱ्यांची इच्छा होती व तीच सर्व विरोधाच्या मुळाशीं होती. आणि ह्यासाठींच हें सर्व प्रकरण होतांहोईल तों लांबणीवर ढकलण्याचा प्रयत्न सुरू होता. सर जॉर्ज ह्यांची पांच वर्षांची मुदत पूर्ण होत आली होती, ती पूर्ण होण्यापूर्वीं ह्या प्रकरणाचा निकाल लागला नाहीं, म्हणजे मग ते स्वदेशीं गेल्यावर सगळ्या प्रकरणाचा आपल्याला हवा तसा निकाल लावून घेतां येईल असा विरोधकांचा डाव आहे असें सर जॉर्ज ह्यांस वाटत होतें! व अखेरीस विरोधकांचेच हेतु अंशतः तडीस गेले व आपल्याला अपयश आलें अशीच त्यांची भावना झाली होती. केवळ शिक्षणविषयक सुधारणांचा असा विपर्यास केला जाईल व कांहीं सभासद पद्धतशीर विरोध करून विपर्यास करितील असें जर आपल्याला पूर्वींच वाटलें असतें तर आपण ह्या भानगडींतही पडलों नसतों असे उद्गार त्यांनीं एका पत्रांत काढले आहेत.[1]

हें इतिहास प्रकरण पुढें कसें मिटलें याची माहिती देण्यापूर्वीं स्वतः चॅन्सलर सर जॉर्ज क्लार्क ह्यांच्या पात्रापात्रतेसंबंधानें येथें दोन शब्द लिहिले असतां ते अस्थानीं होणार नाहींत. सर जॉर्ज क्लार्क ह्यांनीं विद्यापीठाच्या कारभारामध्यें केवळ ढवळाढवळ करण्याच्या बुद्धीनें हा सर्व प्रकार केला, किंवा इतिहास हा त्यांचा विषय नव्हे, असें कांहीं कोणास म्हणतां यावयाचें नाहीं. सर जॉर्ज हे इतिहास-विषयाचे मर्मज्ञ होते ह्यांत कांहीं संशय नाहीं. त्यांचे कित्येक ग्रंथ पाहून लॉर्ड ऑकलंड ह्यांनीं दोन विशेष काळांसंबंधानें त्यांचे जवळून ग्रंथ लिहवून घेतले. अर्थात् इतिहास ह्या विषयाच्या बाबतींत ते अधिकारी होते ह्यांत कांहीं संशय नाहीं. शिक्षण-शास्त्राचा त्यांनीं अभ्यास केला होता व इतिहास हा त्यांचा आवडीचा विषय होता. असें

---

१. My time is nearly over and I have done my utmost for the University. But for the opposition organised by a few senators, we might have placed ourselves in the forefront of Educational progress in India. I feel therefore that I have failed and had I realised all the heat and misconceptions which would be engendered, I think I should have left higher education alone.

*—From a letter to the Vice-Chancellor*

असून ते गव्हर्नर आहेत व युनिव्हर्सिटीच्या बाबतींत ढवळाढवळ करीत आहेत हें पाहून त्यांच्या विरुद्ध लोकमत तयार करण्यांत आलें, ह्याबद्दल त्यांस खेद होत होता.[१] सर जॉर्ज क्लार्क ह्यांनीं अर्थशास्त्रासंबंधानें बी. ए. च्या परीक्षेस लावलेल्या डेव्हास ह्यांच्या ग्रंथासंबंधानें तक्रार केली होती. आतां हें सर्वांस मान्य होण्यासारखें आहे कीं, इतिहास, अर्थशास्त्र व तत्त्वज्ञान ह्या विषयांवरील ग्रंथ लिहितांना लेखकानें आपल्या स्वतःच्या धर्माचें विशिष्टत्व ध्यानांत ठेवून ते ग्रंथ लिहिल्यास त्यांचा सार्वत्रिक उपयोग होणें इष्ट नाहीं. इतिहास हा रोमन क्याथलिक दृष्टींतून लिहिला तर तो सर्वांस निरुपयोगी आहे. आणि अर्थशास्त्र Political Economy चें तसेंच आहे, आणि तत्त्वज्ञानास हाच नियम लागू आहे हें कोणास अमान्य व्हावयाचें नाहीं. ह्या डेव्हासच्या ग्रंथासंबंधानें स्वतः सर जॉर्ज ह्यांनीं आक्षेप घेतांना म्हटलें होतें :—

" As a work on Political Economy the book appears entirely unsuited for use as a University Text Book. It is apparently written from a Catholic partison standpoint for especial use in Ireland and is really not only a wild but even an absurd treatise on the subject...It is full of objectionable passages."

प्रो. वाडियासारख्या अर्थशास्त्रज्ञाला हा विचार पटला व अखेरीस ह्याच्या ऐवजीं दुसरा ग्रंथ लावण्यांत आला. सेनेटला गव्हर्नरसाहेबांनीं केलेला हा अव्यापारेषु व्यापार होय असें जर वाटलें नाहीं, तर इंग्लंडच्या इतिहासाच्या बाबतींत तरी तो कां वाटावा ह्याचा उलगडा सहज होणें नाहीं. इंग्लंडच्या इतिहासाच्या बाबतींत अधिकारयुक्त वाणीनें बोलण्याचा अधिकार सर जॉर्ज ह्यांस होता हें अभिमानास पेटून नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. शिवाय इंग्लंडचा इतिहास आमच्या मुलांनीं शिकूं नये असें त्यांचें म्हणणें थोडेंच होतें? बी. ए. पर्यंत शिकलेल्या मुलांना तुम्ही इंग्लंडचा इतिहास वाचूं नका, अगर शिकूं नका असें सांगणें हा वेडेपणा होणार आहे. आवश्यक विषयांमध्यें इतिहास ढकलल्यानें इतिहास ह्या दृष्टीनें त्याचें शिक्षण होत नाहीं, सर्व अभ्यास परीक्षेपुरताच होतो, असें त्यांचें म्हणणें

---

१. In this case so much seems to have been done to mislead opinion and raise false issues. It is annoying to me to be told that my views on the question of History have no weight considering that Lord Acton selected me to write on two important periods in his great history solely because he had come across some of my historical work.

—*Sir George Clarke to Sir Narayan, 6-8-11*

होतें. ह्या विषयावर लिहितांना देखील त्यांनीं असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, अभ्यास-क्रमामध्यें पुष्कळ गोंधळ व भलत्याच गोष्टींचा समावेश झाला आहे. त्यांत सुधारणा करावी एवढाच हेतु युनिव्हर्सिटीला पत्र लिहिण्यांत आहे. (I have only one wish at heart and that is to improve a system in which much is wrong.)त्यांचें असें निश्चित मत झालें होतें कीं, जर इतिहास हा विषय योग्यप्रकारें शिकविला गेला तर परस्परांस तसें शिक्षण लाभदायक होईल; तथापि तशा प्रकारचें शिक्षण देणाऱ्या संस्था इंग्लंडमध्येंही आज फार थोड्या आहेत आणि हिंदुस्थानांत तशा शिक्षणाची व्यवस्था करणें आज अशक्य असल्यामुळें Political and Constitutional History हा विषय कॉलेजांतून शिकविल्या जाणाऱ्या विषयांतून गाळावा असें त्यांनीं सुचविलें होतें. स्वतः नारायणरावांचें असें पूर्वींपासूनचें मत झालें होतें कीं, आपल्या देशांत इतिहास ज्या रीतीनें शिकविला जावयास पाहिजे, त्या रीतीनें तो शिकविला जात नाहीं.[1] परंतु चॅन्सलरसाहेबांची ही विचारसरणी पुष्कळ लोकांस पसंत पडली नाहीं. कदाचित् वरील प्रकारचा विषय शिकवितांना चालू राजकारण व चालू एकंदर व्यवस्था ह्यावर बोलण्याचा व स्वतःचे विचार प्रदर्शित करण्याचा मोह अध्यापकास होण्याचा संभव आहे आणि ह्या बाबतींत सर्व कॉलेजांच्या अध्यापकांच्या विचारांत सारखेपणा असण्याचा संभव नसल्यामुळें ह्या विषयाच्या शिक्षणांत एकसूत्रीपणा असणार नाहीं म्हणून तो विषय आवश्यक विषयांतून गाळण्याची सूचना केली असावी. १९११ सालीं युनिव्हर्सिटीनें ठरविलेला अभ्यासक्रम ज्या वेळीं विचारांत घेण्याची वेळ आली, त्यावेळीं सेनेटपुढें सरकारचें जें पत्र ठेविलें होतें त्यांत असें स्पष्ट म्हटलें होतें कीं,

"Government regard the study of English History, Political and Constitutional, as necessarily advantageous if time and adequate teaching power are available; but they are impressed with the extreme undesirability of enforcing it on all Arts students. They are inspired by one wish only, which the Senate will share and that is to make the training provided by the University of Bombay the best in the interest of the students and of the intellectual advancement of the Presidency."

ह्या बाबतींत मूळ कमिटीची सूचना अशी होती कीं, आवश्यक विषयांत इंग्रजी बरोबर English History व English Constitutional History हे विषय असावेत व इतिहासाच्या ऐच्छिक विषयांत पास डिग्रीला (a) History of Greece (b) History of Rome (c) European History (d) Political Economy

---

१. पृष्ठ ३८ पहा.

इतके विषय असावेत असें सुचविलें होतें. व हे विषय फार आहेत, अवघड आहेत, व ते नेमले गेले तर विद्यार्थ्यांचें अकल्याणच होईल असें सरकारचें मत व्यक्त करण्यांत आलें होतें.[१] ता. १७ जुलै १९११ रोजींच्या सभेंत मि. नटराजन ह्यांनीं अशी उपसूचना आणिली कीं, आवश्यक विषय फक्त इंग्लिश हा असावा व अनेक ऐच्छिक विषयांत History and Economics हा विषय असावा व त्यांतच Political and Constitutional History of England हाही विषय असावा. ही उपसूचना पुष्कळ वाटाघाटीनंतर ४१ विरुद्ध ३७ अशा मतांनीं सेनेटनें मान्य केली ! आतां खरें पहातां येथें हें इतिहाससंबंधाचें प्रकरण संपलें होतें. परंतु सेनेटचा निकाल कांहीं मंडळींना जसा हवा तसा न झाल्यामुळें, सर फेरोजशहा मेथांनीं पूर्वीचा ठराव नष्ट करणाऱ्या उपसूचना आणिल्या व त्यासंबंधानें भाषण करण्याची इच्छा त्यांनीं प्रदर्शित केली (Sir Pherozshah desired to address on the point of order relating to his amendments). परंतु व्हाइस-चॅन्सलरनीं *no speech shall be made* on a point of order ह्या **युनिव्हर्सिटीच्याच** नियमानुसार भाषण करण्याची परवानगी दिली नाहीं. ह्याचा परिणाम असा झाला कीं, पुढल्या सभेंत मिनिट्स्‌मध्यें

The Hon. Sir Pherozshah Metha desired to address on the point of order relating to his amendments, but the Vice-Chancellor declined to allow him to address.

असा शोध घालण्यांत आला. आतां सर नारायण ह्यांनीं हा निकाल जरी युनिव्हर्सिटीच्या नियमानुसारच दिला होता व स्वतः सर फेरोजशहा जर व्हाइसचॅन्सलर असते, तरी सुद्धां तोच निकाल त्यांनीं दिला असता, अशी आमची खात्री आहे; परंतु सर फेरोजशहा ह्यांना तो निकाल पसंत नसल्यामुळें त्यांनीं ह्या बाबतींत सगळे नियमच बदलण्याची सूचना आणिली, व ती पास करून घेतली ! परंतु पुढें जरी नियमांत थोडे फेरफार झाले, तरी Besides stating the precise point of order raised, *he shall not make a speech* हें वाक्य सुधारलेल्या नियमांतही आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ह्यावरून त्यावेळीं सर नारायण ह्यांनीं दिलेलाच निकाल नियमांस अनुसरून होता व आपल्या इच्छेनुसार व्हाइस-चॅन्सलर वागले नाहींत म्हणून सर फिरोजशहांची सर नारायण ह्यांचेवर इतराजी झाली एवढाच इत्यर्थ

---

१. "The subjects in question would be learned from Textbooks and the examinations would be tests of memory and not of intellectual strength, of originality, or of powers of independent thought."

निघतो. सर नारायण ह्यांनीं १९१२ च्या ऑगस्ट महिन्याच्या २१ तारखेस आपल्या व्हाइस-चॅन्सलरच्या जागेचा राजीनामा दिला व ता. २८ रोजीं तो सरकारनें मान्य केला. त्यांच्या ह्या चार वर्षांच्या कारकीर्दीत विद्यापीठाच्या एकंदर कार्यांमध्यें पुष्कळच फेरफार झाले. युनिव्हर्सिटीला निराळें व इष्ट स्वरूप प्राप्त झालें. बी. ए. च्या परीक्षेमध्यें महत्त्वाचे फेरफार झाले; बी. एसूसी. च्या अभ्यासाची आमूलाग्र सुधारणा झाली; रॉयल सायन्स इन्स्टिट्यूटची इमारत तयार झाली; कॉमर्सच्या पदवीची पूर्वतयारी झाली; शेतकी व वैद्यकीय परीक्षांच्या अभ्यासक्रमांत सुधारणा झाली व दुसऱ्या अनेक सुधारणा त्यांच्या कारकीर्दीत झाल्या हें लक्षांत ठेवलें पाहिजे. शिवाय सिंडिक, व्हाइस-चॅन्सलर व निरनिराळ्या कमिटींचे प्रमुख सभासद ह्या नात्यानें त्यांनीं लिहिलेलीं मिनिटें जे कोणी वाचून पहातील त्यांस सर नारायण ह्यांच्या युनिव्हर्सिटींतील कधींही बाहेर न दिसणाऱ्या कामाची कल्पना होईल. कोणालाही मानपत्र वगैरे द्यावयाचें असलें म्हणजे किंवा कमिट्यांचे रिपोर्ट लिहावयाचे असले, म्हणजे तें काम नारायणरावांवरच पडत असे. बादशहा हिंदुस्थानांत आले त्यावेळीं युनिव्हर्सिटीनें दिलेलें मानपत्र सर नारायण ह्यांनींच लिहिलेलें आहे.

नारायणराव व्हाइस-चॅन्सलर असतांना त्यांच्या कांहीं जुन्या मित्रांचा त्यांच्यावर रोष झाला होता. सरकारनें अगर चॅन्सलरनें विद्यापीठाच्या कार्यांत ढवळाढवळ करूं नये, असें ह्या मित्रांस वाटत होतें म्हणून त्यांचा सर्व विरोध होता हें वर दाखविलेंच आहे. पुढें सर फेरोजशहा ह्यांस परलोकवास प्राप्त झाला. सर नारायण ह्यांच्या परलोकवासानंतर सरकारनें युनिव्हर्सिटीच्या सर्व बाबतींत चौकशी करून सुधारणा सुचविण्यासाठीं एक कमिटी नेमिली. त्यावेळीं ज्यांनीं पूर्वी सर नारायण ह्यांस कित्येक बाबतींत मनापासून कसून विरोध केला होता ते सर चिमणलाल सेटलवाड व्हाइस-चॅन्सलर होते, व तेच सरकारनें नेमलेल्या कमिटीचे अध्यक्ष होते. ह्या कमिटीच्या रिपोर्टांत युनिव्हर्सिटीच्या एकंदर स्वरूपासंबंधानें पुढील उद्गार काढले आहेत :—

During the last ten years the conception of the University has changed. The ideal of a corporate body of teachers and students co-operating in the culture of the mind and the pursuit of knowledge has taken possession of men's minds and the University has steadily moved towards the realisation of the ideal.

ह्यावरून सर जॉर्ज क्लार्क म्हणजे लॉर्ड सिडनह्याम ह्यांच्या कारकीर्दीत विद्यापीठाच्या सर्वांगीण सुधारणेचा पाया घातला गेला हें सर चिमणलाल ह्यांस मान्य झालें, असें उघड होत आहे!

# पदवीदान समारंभाच्या वेळचीं भाषणें

नारायणरावांचें सर्व काम विचारांत घेतलें तरी व्हाइस-चॅन्सलर ह्या नात्यानें त्यांनीं तीन वर्षांच्या पदवीदान समारंभाच्या वेळीं जे विचार प्रदर्शित केले ते विचारांत घेतल्यावांचून व्हाइस-चॅन्सलर ह्या नात्यानें त्यांनीं केलेल्या कार्याची योग्य कल्पना व्हावयाची नाहीं. म्हणून येथें त्यांतील विचारांची दिशा दाखवितों.

नारायणरावांनीं आपल्या व्हाइस-चॅन्सॅलरच्या कारकीर्दीत तीन वर्षें दिलेलीं व्याख्यानें जर आजपर्यंतचीं पदवीदान समारंभाच्या वेळीं झालेलीं व्याख्यानें एकत्र केलीं, तर फार महत्त्वाचीं आहेत असें आढळून आल्यावांचून राहणार नाहीं. १९०९ सालीं दिलेल्या व्याख्यानांत नारायणरावांनीं मुंबई विद्यापीठाच्या इतिहासांतील तीन महत्त्वाच्या टप्प्यांचा उल्लेख केला आहे. सर अलेक्झांडर ग्रँट ह्यांच्या काळांत विद्यापीठाची पहिली अमदानी होती व त्यावेळीं अनेक विषयांचें थोडें थोडें ज्ञान म्हणजेच उदार शिक्षण[१] असें मानलें जाई व त्या धोरणानें अभ्यासक्रम ठरविले जात. त्यावेळच्या अभ्यासक्रमाचा एक विशेष असा होता कीं, संस्कृतसारखी दुसरी भाषा कॉलेजच्या प्रत्येक विद्यार्थ्यास शिकावी लागे व त्यामुळें डॉ. बूल्हर, किल्हॉर्न व भांडारकर ह्यांच्या देखरेखीखालीं संस्कृत भाषेचें अध्ययन उत्तम प्रकारें झालें; आपल्या पुरातन ग्रंथभांडाराचें महत्त्व त्यावेळच्या नव्या पिढीस कळलें, संशोधनाची गोडी लागली व त्याचा परिणाम अत्यंत इष्ट असाच झाला. विद्यापीठांतील दुसरा टप्पा म्हणजे सर रिचर्ड टेंपल चॅन्सलर होते त्यावेळेचा. त्यावेळीं भौतिक शास्त्रांच्या अध्ययनास उत्तेजन मिळालें. युनिव्हर्सिटीनेंही धांवत्या काळाबरोबर गेलें पाहिजे ही विचारसरणी मान्य झाल्यामुळेंच भौतिक शास्त्रांचा प्रवेश अभ्यासक्रमांत झाला हें उघड आहे. परंतु ह्याचवेळीं आमच्या पदवीधरांनीं सामाजिक बाबतींत उलट खाल्ल्याचें आढळून आल्याचें दिसून आलें होतें. सुधारकांवर कडक टीका, पाश्चात्यांच्या सर्व संस्थांची निंदा व आपल्या रूढी, आपल्या चाली, आपले ग्रंथ सर्व प्रकारें उत्तम असें एकंदर धोरण होतें व त्यास आळा घालण्यासाठीं बी. ए. च्या अभ्यासक्रमामध्यें इतिहास व अर्थशास्त्र हा विषय घालण्यांत आला. आणि आज उच्च शिक्षणाविरुद्ध जो आरोप आहे तो विशेषतः असा आहे कीं, विद्यापीठीं मिळणाऱ्या शिक्षणाचा जे लाभ घेत असतात त्यांचा मुख्य हेतु आपल्या ज्ञानांत भर पडावी, निरनिराळ्या संस्कृतींचें आपल्याला ज्ञान व्हावें, शीलसंवर्धनाच्या कामीं त्याचा उपयोग व्हावा असा नसून

---

१. Liberal Education consisted in knowing something of everything and everything of something.

केवळ सरकारच्या खात्यांत नोकऱ्या मिळाव्या एवढाच असतो. आपल्या ज्ञानांत भर पडावी हा कांहीं मूळ हेतु नसतो. ह्याहीपेक्षां गंभीर स्वरूपाचा जो आरोप आहे तो असा कीं, हल्लींचें उच्च शिक्षण हें देवधर्म विरोधी असल्यामुळें विद्यार्थ्यांमध्यें अनादराची भावना जोरावत आहे व त्यामुळें सर्वत्र गोंधळ माजला आहे. पण नारायणरावांस हा आरोप सर्वांशानें खराही वाटला नाहीं व त्याबद्दल इतकी काळजीही त्यांस वाटली नाहीं. असा आरोप सर्व ठिकाणीं विद्यार्थ्यांवर एके काळीं केला जातो. बाकी, आपल्या इकडे एकदां अज्ञेयवादाची लाट येऊन गेली हें खरें आहे. कारण स्वतः सर नारायण ह्यांस त्याचा अनुभव आलेला होता. तो काळ मिल व स्पेन्सर ह्यांच्या विचारांच्या प्राबल्याचा होता. परंतु नारायणरावांना सरांस आमचे विद्यार्थि अज्ञेयवादी अगर नास्तिक होतील अशी भीति केव्हांच वाटली नाहीं. कारण धर्माचें बाळकडू आम्हांस बाळपणींच पाजलेलें असतें. आमच्या रोमरोमांत धर्म शिरलेला असतो. रानड्यांनीं एकदा एका पारशी गृहस्थांस सांगितलें होतें कीं कांहीं काळ आम्ही जरी धर्माचा त्याग केला तरी धर्म आमचा पाठलाग करीत आल्यावांचून राहणार नाहीं, तेंच खरें आहे ! नारायणरावांनीं ह्या बाबतींत असें सुचविलें आहे कीं, आमच्या शिक्षणाचा मुख्य दोष असा आहे कीं, हल्लीं राजकारण, राजकीय चळवळी, राजकीय विषय ह्यांचें आपल्यावर फार मोठें दडपण आहे व त्याचा शिक्षणावर परिणाम होत आहे. खरें पाहिलें तर [१] बेजबाबदार विचार, बेजबाबदार लेखन, खूनप्रवृत्ति, हे सर्व प्रकार पाश्चात्य व आपल्या संस्कृतींतील जो उत्तमांश आहे त्याच्याशीं फारकत झाल्यामुळें होत आहेत. पण ह्याला उपाय काय ? आमच्या तरुणांच्या शिक्षणाच्या बाबतींत सारासार विचारास मान्य अशा पद्धतींचा आम्ही उपयोग करूं लागणें हाच तो उपाय होय[२] असें नारायणरावांनीं सांगितलें आहे. व्यक्ति व देश ह्यांच्या उन्नतींत साधर्म्य आहे. व्यक्तीच्या उन्नतीपलीकडे देशाची उन्नति नाहीं. आणि शिक्षणकाळाचा विचार केला तर हा काळ इतर काळांपेक्षां फार निराळा आहे. हा तयारीचा काळ. तो स्वतंत्र असला पाहिजे. त्यावेळीं विद्यार्थ्यांच्या मुख्य ध्येयसाधनांत व्यत्यय येतां नये. विद्यार्थ्यांचें लक्ष

---

१. Anarchism, rash thinking, wild writing are all developments of Western Politics divorced from the deep intellectual and spiritual purpose which is at the heart of Western as of Eastern civilisation.

२. What is the remedy ? The remedy in my humble opinion, lies in the adoption of commonsense methods in the Education and training of our young men.

केवळ आपल्या अध्ययनांत पूर्णपणें गढलें पाहिजे. पण, आज दारूच्या गुत्त्यांवर बहिष्कार घालावयाचा आहे, घ्या मुलांची अगर मुलींची मदत; उद्यां विलायती मालाविरुद्ध चळवळ करावयाची आहे, आणा पिकेटिंग करण्यासाठीं मुलांची सेना; उद्यांपासून प्रभातफेरी सुरू करावयाची आहे, किंवा रस्त्यांनीं गाणीं म्हणत राजकीय चळवळीसंबंधानें मिरवणूक काढावयाची आहे, जमवा मुलांना व लावा त्यांना गावयाला, असें जर व्हावयाला लागलें तर त्यांचें अभ्यासाकडे लक्ष लागावें कसें?[१] ह्यावरून कोणी गैरसमज करून घेऊं नये, असा इषारा द्यावयास नारायणराव विसरले नाहींत. "राजकीय चळवळींविषयीं माझी पूर्ण सहानुभूति आहे. ज्याप्रमाणें देशांत गरीब लोक नेहमीं असणारच त्याचप्रमाणें राजकारण हें आमच्या पांचविलाच पुजलेलें आहे. आजच्या राजकीय परिस्थितींत, राजकारणांत पुढाकार घेणाऱ्यांविरुद्ध सरास टीका करणें माझ्या हातून होणार नाहीं." परंतु त्यांनीं इतकेंच सुचविलें कीं, ज्या वयांत मुलांनीं आपलें सर्व लक्ष अभ्यासाकडे देण्यासाठीं सर्व चळवळींपासून आपल्याला निवृत्त करून घेतलें पाहिजे, त्याचवेळीं त्यांना प्रचलित राजकारणांत खेंचणें हें त्यांच्या मुख्य ध्येयाच्या आड येणार आहे. तसें पाहिलें तर विद्यापीठासंबंधानें आमचें पुरातन ध्येय काय असे? आमचीं विद्यापीठें अरण्यांत एकान्तांत असत व तेथें कुलपति आपल्या विद्यार्थ्यांना घेऊन त्यांचें शिक्षण आपल्या देखरेखीखालीं चालवीत असे. हेतु हा असे कीं, शहरांतील सर्व चळवळी व चैनींपासून त्यांस दूर न्यावयाचें व त्यांच्या अध्ययनांत कांहीं व्यत्यय येऊं द्यावयाचा नाहीं. गुरुगृहीं रहाणाऱ्या अशा विद्यार्थ्याला अंतेवासिन् असें म्हणत व त्याला साधारणतः वयाच्या २५ व्या वर्षापर्यंत गुरुगृहीं अध्ययन करीत रहावें लागे. येथें कडक शिस्तीखालीं त्याचें शिक्षण होत असे. सर्व शिक्षण चालू असतां आत्मसंयमन व सत्यप्रीति ह्यांवर विशेष जोर असे व परमात्म्याचें ज्ञान प्राप्त करून घेणें व जें ज्ञान प्राप्त होईल त्याचा आपल्या सर्व आयुष्यांत उपयोग करणें हें ध्येय विद्यार्थ्यांपुढें ठेविलें जात असे. परंतु आज शिक्षणविषयक पुरातन ध्येयें आपल्याला आत्मसात् करतां येत नाहींत. आज विद्यापीठांची स्थापना रानावनांत आपल्याला करतां यावयाची नाहीं. परंतु पुरातन ध्येयें दृष्टीपुढें ठेवून तरी कांहीं व्यवस्था करणें शक्य आहे. विशेषतः शिस्तीच्या बाबतींत आपल्याला सर्व प्रकारची दक्षता बाळगतां येईल. प्रच-

---

१. How can a boy or a child, or a girl learn the habit of concentration, if every now and then he or she is liable to be called away to act as picket to prevent people from buying foreign goods, or country liquor, or to sing songs in glorification of this or that politician.

लित चळवळींपासून व वर्तमानपत्रांतील वादांपासून विद्यार्थ्यांना दूर ठेवणें हें अत्यंत अगत्याचें आहे. त्याचप्रमाणें आमच्या कॉलेजांत जें एकतर्फी शिक्षण मिळत असतें, त्यामुळें विद्यार्थि साधारणतः एककल्ली होतात. उदाहरणार्थ, तत्त्वज्ञानाचाच विषय घ्या. खरें पहातां ह्या बाबतींत आज जें कार्य जर्मन प्रोफेसर करीत आहेत, तें आमच्या कॉलेजांतून आमच्या अध्यापकांनीं केलें पाहिजे. आमच्या मुलांना कॉलेजांतून कांट, हेगेल, सिज्विक, मार्टिनो ह्यांचें तत्त्वज्ञान शिकविलें जातें. परंतु शंकराचार्य, रामानुजाचार्य किंवा मध्वाचार्य ह्यांनीं प्रतिपादिलेल्या तत्त्वज्ञानाचा त्यांस गंध नसतो. ह्याचा परिणाम असा होतो कीं, कॉलेजांतील तत्त्वज्ञान आमच्या अंतःकरणाला जाऊन भिडत नाहीं व कॉलेजांत जें शिकावें लागतें त्याचा बाहेर पडल्यावर विसर पडतो! नारायणरावांची योग्य वेळीं, योग्य स्थळीं योग्यच शब्द व वाक्यरचना करण्यांत हातखंडा असे. ही संवय त्यांना ते सेंट मेरीमध्यें शिकत होते तेव्हांच लागली होती. फादर विलीनें त्यांना सांगावें कीं, ज्याला बिनचूक बोलतां व लिहितां येत नाहीं तो गृहस्थच नव्हे! पातञ्जलीचेंही असेंच म्हणणें आहे कीं, आपले विचार व्यक्त करण्यासाठीं अवश्य त्याच शब्दांची योजना केल्यानें आपलें आध्यात्मिक कल्याण होतें व व्याकरणाच्या दृष्टीनें चुकीची शब्दयोजना करणें हें पाप आहे.[१]

अगदीं भौतिक शास्त्रासारखा नियमबद्ध व कोरडा विषय असला, तरी शिक्षकाला त्याच्या द्वारेंही नीतिशिक्षण देतां येईल. एकदां एका अध्यापकाला रसायनशास्त्रापासून आपण काय शिकावें असा एका विद्यार्थ्यानें प्रश्न विचारला असतां त्यानें दिलेलें उत्तर लक्षांत ठेवण्यासारखें आहे. Young man, Chemistry teaches us that we can utilise any kind of waste except waste of time! हिंदुस्थानांत धर्मशिक्षणाचा प्रश्न मोठा बिकट आहे ह्यांत कांहीं संशय नाहीं. परंतु तेवढ्यावरून शाळांत व कॉलेजांत नीतिशिक्षणही देतां येणें शक्य नाहीं असें होत नाहीं. पूर्वीच्या काळीं शाळा व कॉलेजांतून नीतिशिक्षण देतां येणें शक्य नाहीं असें एक मत होतें. पण, तो मिलचा काळ होता. त्याच्या विचारांचा तो परिणाम होता. पण, त्यानंतर पुष्कळ घडामोडी झाल्या आहेत, आपलीं शिक्षणविषयक ध्येयें बदललीं आहेत, आणि गत वर्षीच (१९०८) लंडनसारख्या ठिकाणीं सर्व जगांतील शिक्षणशास्त्रवेत्त्यांच्या परिषदेंत सर्व शिक्षणविषयक संस्थांत नीतिशिक्षण देण्याची व्यवस्था असावी असें जें एकमतानें ठरलें

---

१. The use of correct words to express our thoughts leads to spiritual good and the use of ungrammatical words is a sin.

त्यावरून आतां मिलचें मागचें प्रस्थ संपलें असेंच सिद्ध होत आहे. ह्याच वर्षी अखेरीस त्यांनीं नव्या पदवीधरांस उपदेश करतांना सांगितलें कीं, प्रत्येक पदवीधरास मोठा विद्वान होणें कदाचित् शक्य होणार नाहीं, पण प्रत्येकाला शीलवान होणें शक्य आहे. आत्मसंयमन, सत्यप्रीति, शांति व इतरांविषयीं कळवळा ह्यांच्याद्वारें शीलसंवर्धन होत असतें. त्यांनीं तरुणांस कळकळीचा उपदेश केला कीं, हातीं घेतलेलीं सर्व कार्यें मनापासून अंतःकरणपूर्वक करण्याचा निश्चय करा, शांतपणें विचार करून कार्यप्रवृत्त व्हा, सर्व वेळीं सदाचरणानें वागा ह्यांतच तुमचें कल्याण आहे.

१९१० सालीं व्हाइस-चॅन्सलर ह्या नात्यानें जें व्याख्यान दिलें त्यांत साहजिकपणें नाशीकचे कलेक्टर मि.जॅक्सन ह्यांच्या खुनाचा उल्लेख, त्यांच्या योग्यतेचें सुंदर वर्णन नारायणरावांनीं केलें आहे. ह्याच वेळीं त्यांनीं आपले मामा **शामराव विठ्ठल**[१] ह्यांच्यासंबंधानें आपला आदर जाहीर रीतीनें व्यक्त केला. कन्नड भाषेचे तज्ज्ञ ह्या दृष्टीनें सेनेटमध्यें एकटे शामरावच होते व त्यांची जागा सध्यांतरी रिकामीच आहे असे उद्गार त्यांनीं काढले आहेत. ह्या उभ्या वर्षांत सेनेटमध्यें अनेक महत्त्वाच्या विषयांवर जी चर्चा चालू होती तिचा उल्लेख नारायरावांनीं केला असून त्यावरून त्यांच्या कारकीर्दीमध्यें किती महत्त्वाच्या गोष्टी निकालांत निघाल्या ह्याचीही कल्पना होते. (१) प्रीव्हिअस परीक्षा बंद करून पहिल्या वर्षाची परीक्षा कॉलेजांच्या हवालीं करणें,[२] (२) एल. एम. अँड एस. परीक्षा बंद करून फक्त एम. बी. बी. एस. हीच परीक्षा चालू ठेवणें. ( ३ ) आर्ट्स् व सायन्सच्या परीक्षांत आमूलाग्र फरक करणें, ( ४ ) कायद्याच्या परीक्षांतील सुधारणा, ( ५ ) दुसरी भाषा ह्या दृष्टीनें विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत **पालीचा** प्रवेश, ( ६ ) शेतकीच्या परीक्षांतील अभ्यासक्रमाची सुधारणा, ( ७ ) जीं पुष्कळशीं बक्षिसें देतां येत नाहींत, त्यांची व्यवस्था, वगैरे प्रश्न सेनेटपुढें आले होते. देशांत निरनिराळ्या विद्यापीठांची स्थापना करण्याची जी चळवळ त्यावर्षी सुरू होती, तिचा उल्लेख नारायणरावांनीं आपल्या व्याख्यानांत केला आहे. मिसेस बेझंट ह्यांच्या हिंदु विद्यापीठ स्थापन करण्याच्या चळवळीचा त्यांनीं प्रामुख्यानें गौरवपूर्व

---

१. His place in the senate, so far as Canarese scholarship goes remains unfilled.

२. ही परीक्षा कॉलेजांच्या हवालीं केल्यानें युनिव्हर्सिटीचा फायदाच झालेला आहे. कारण परीक्षा वगैरे घेण्याचा त्रास करावा न लागतां, परीक्षा पास झालेल्या प्रत्येक विद्यार्थ्याच्यामागें युनिव्हर्सिटीच्या तिजोरींत १० रुपये पडतात.

उल्लेख केला. आगाखान ह्यांचा मुस्लिम विद्यापीठ स्थापण्याचा प्रयत्न व कांहीं पारशी बंधूंच्या मनांत असलेल्या आपल्या धर्मबंधूंसाठीं पारशी विद्यापीठाची स्थापना करण्याच्या कल्पनेचाही त्यांनीं उल्लेख केला. अशाप्रकारें निरनिराळ्या धर्मांच्या तरुणांसाठीं स्वतंत्र विद्यापीठांची स्थापना करणें हें हितावह आहे किंवा नाहीं हा वादग्रस्त प्रश्न आहे. परंतु विद्यापीठाचा जो मूळ हेतु (A University is intended to fit a young man for the conduct of life by broadening his mind and widening his sympathies) तो ध्यानांत ठेवून विद्यापीठांची स्थापना झाली तर त्यास कांहीं हरकत नाहीं, असा आपला अभिप्राय नारायणरावांनीं व्यक्त केला होता. शिक्षित लोकांमध्यें त्यावेळीं बरीच खळबळ उडाली होती. शिक्षित तरुणांनीं क्रांतिकारक चळवळींत भाग घेतल्यामुळें उच्च शिक्षणाचाच हा दोष होय असा आक्षेप लोक घेऊं लागले होते. परंतु नारायणरावांनीं स्पष्ट सांगितलें कीं, ही विचाराची दिशा आपल्याला मान्य नाहीं. आजचे पदवीधर सर्वगुणसंपन्न नसतील, परंतु एकंदरींत पूर्वपिढींतील लोकांपेक्षां ते एकंदर वर्तनांत श्रेष्ठ आहेत हा अभिप्राय त्यांनीं पुन्हां एकदां नमूद केला. तथापि तरुणांमध्यें ज्या अनिष्ट प्रवृत्ति मधूनमधून दिसून येतात, त्या उच्च शिक्षणांत धर्मशिक्षणास कोठेंच स्थान नाहीं म्हणून असा आक्षेप घेण्यांत येतो. धर्मशिक्षणाचा प्रवेश शाळांतूनच झाला पाहिजे व अमूक अमूक पद्धतीनें धर्मशिक्षण द्यावें अशा ज्या सूचना त्यावेळीं पुढें येत होत्या त्यांचा विचार करितांना धर्मशिक्षणाचें महत्त्व कमी करण्याचा माझा उद्देश नाहीं, पण हा विषय लोकांना वाटतो तितका सुलभ नाहीं, असें त्यांनीं म्हटलें आहे. तरुणपिढीचें शिक्षण धर्मास प्राधान्य देऊन होणें इष्ट आहे हें खरें परंतु शाळांत अगर कॉलेजांत धर्मशिक्षण दिल्यानें हल्लींची स्थिति बदलेल किंवा तींत सुधारणा होईल असें जर कोणास वाटत असेल, तर त्याची मला शंकाच आहे! कारण, धर्माचें शिक्षण कसें दिलें जात आहे व तें कोण देत आहे ह्यावर पुष्कळ अवलंबून आहे. कुठेंकुठें शाळांतून भगवद्गीता शिकविली जाते असें माझ्या ऐकिवांत आहे. जेथें प्रौढ माणसांना देखील ज्ञान, कर्म, धर्म, भक्ति, ध्यान, मनन, इ० विषयीं तेथील विवेचन गुंतागुंतीचें वाटतें, तेथें लहान मुलांना गीतेंतील प्रतिपाद्य विषय कसे समजणार? आणि आजकाल कांहीं लोक गीतेच्या शिकवणीचा उपयोग आपले राजकीय विशिष्ट हेतु सिद्ध करण्यासाठीं करूं लागले आहेत.[२]

---

१. It all depends on how religion is taught and by whom it is taught.

२. The Gita has been perverted by designing persons to suit their political ends!

तसेंच हल्लींच्या बेशिस्तीच्या वर्तनाबद्दल शाळांतील शिक्षक व कॉलेजांचे अध्यापक ह्यांस जबाबदार धरण्याची एक टूम निघाली आहे. परंतु मुलें सर्व वेळ कांहीं शिक्षक व अध्यापक ह्यांच्या ताब्यांत नसतात. त्यांचीं स्वतःचीं घरें व त्यांचे समाज ह्याही त्यांच्या शाळाच आहेत. येथें नानाप्रकारें त्यांचें शिक्षण होत असतें. ते जें कांहीं येथें पहातात त्याचा त्यांच्या मनावर परिणाम होत असतो. मुलें काय वाचतात, कोठें जातात, त्यांना कोणाची संगति आहे याचा विचार कोण करीत असतो? कुटुंब व समाज ह्यांचा त्यांचेवर सतत परिणाम होत असतो. आणि वाइटाकडे जर त्यांची प्रवृत्ति होत असेल तर त्याची पुष्कळशी जबाबदारी कुटुंब व समाज ह्यांवर येऊन पडते ह्यांत कांहीं संशय नाहीं. पूर्वीच्या काळीं आमचें सर्व जीवन आचार-प्रधान होतें व आमचे सर्व आचार धर्मप्रधान होते.[1] पूर्वीच्या काळीं पित्यावर पुत्राच्या धर्मशिक्षणासंबंधानें फार मोठी जबाबदारी असे. तोच त्यास गुरुस्थानीं असे. धर्मप्रवेश त्याच्याच हातून होत असे. त्याच्या प्रत्यक्ष आचरणाचा मुलावर इष्ट परिणाम होऊन मुलगा आपल्या पिताश्रीच्या पावलावर पाऊल टाकण्यास सिद्ध होत असे. मी सर्व पूर्व पद्धतींचा स्तुतिपाठक नाहीं. परंतु आज ज्यावेळीं आम्ही शाळांतील शिक्षकांस व कॉलेजांतील अध्यापकांस जबाबदार धरण्यास सिद्ध होत आहों त्यावेळीं आम्ही आमच्या स्वतःच्या जबाबदारीचा विचार करीत नाहीं! पूर्वी आज्ञाधारकपणा हा शिक्षणांतील मोठा भाग होता. पण हल्लींचें युग हें टीका-युग आहे, हें जाणून आम्ही घरीं दारीं लोकांवर सारखी टीका करीत असतों. इत-रांचीं व्यगें दाखवितांना आपल्या स्वतःच्या व्यंगांची व त्यांच्या सुधारणेची आप-ल्याला आठवण होत नाहीं. आणि आपापल्या कुटुंबांत मुलांबाळांसमक्ष लहान-मोठ्या, सन्माननीय, पूज्य मानलेल्या व्यक्तींवर अवासवा व भलतीसलती टीका करीत असतों. अशामुळें थोरांमोठ्यांसंबंधानें किंवा वडीलधाऱ्या माणसांविषयीं आद-राची भावना कमी झाली तर आश्चर्याचें असें काय आहे? वडील माणसांचीं उदाहरणें पाहून मुलें देखील वाटेल त्याचेवर टीका करूं लागतात; आपल्या तीर्थरूपां-प्रमाणेंच वाटेल त्याचेवर टीका करण्याचा आपल्याला हक्क आहे असें त्यांना वाटतें. ह्याचा जो परिणाम व्हावयाचा तोच होत आहे. आजकाल सार्वजनिक सभांचे पुढारी अननुभवी तरुण झाले आहेत आणि सर्व विषयांवरील आपलीं मतें सांगा-वयास त्यांस जाहीर परवानगी असते. मागें मुंबईस कांहीं व्याख्यानांनंतर मुलें अशीच भरमसाट टीका करूं लागलीं होतीं, त्यावेळीं तेलंगांनीं भाषणानंतर वादविवादच

१. Every rule was prescribed with a view to make every moment of his life one of worship, living as it were in communion with the Supreme Spirit, the *Parabrahma*.

करावयाचा नाहीं असा नियम केल्यामुळें त्यांच्यावर जिकडून तिकडून टीकेचा वर्षाव झाला होता. आम्ही आमच्या मुलांना वाटेल तीं वर्तमानपत्रें वाचूं देतों, ज्यांमध्यें प्रचलित राजकारणावर व लोकपुढाऱ्यांवर बेजबाबदार टीका गलिच्छ भाषेंत केली आहे, अशीं पदें धर्माच्या नांवावर म्हणूं देतों. जेथें मोठीं माणसें व तरुण वाचावयास येतात अशा लायब्ररींमध्यें गेल्यावर कोणत्या प्रकारच्या पत्रांवर उड्या पडतात तें दिसून येतें. कांहीं वर्षांपूर्वीं ग्रेट थॉट्स् व यंग मॅन हीं मासिकें अधिक लोकांनीं वाचावीं ह्या दृष्टीनें मीं स्वतः प्रयत्न केला, पण लोकांना असलीं सुंदर मासिकें नको आहेत असें मला आढळून आलें ! तसेंच एकदां डॉ. सेल्बी हे डेक्कन कॉलेजचे प्रिन्सिपाल असतांना मला म्हणाले कीं, आपल्यापेक्षां वयानें, ज्ञानानें, अनुभवानें थोर असणाऱ्या व्यक्तींवर अनादरपूर्वक टीका करण्याची प्रवृत्ति तरुणांत वाढत आहे हें पाहून फार खेद होतो. त्यावेळीं त्यांना मीं सांगितलें होतें कीं, ह्या बाबतींत सर्व दोष तरुणांचा नाहीं. आम्ही मोठीं माणसें त्यांच्यापुढें जीं उदाहरणें ठेवतों त्यांचें ते अनुकरण करीत असतात. आणि मला तर असें वाटतें कीं वडीलधाऱ्या माणसांच्या एकंदर वर्तनांत फरक झाल्यावांचून तरुणांस निराळें वळण लागण्याची आशा करणें व्यर्थ आहे. आपल्याला कदाचित् ही गोष्ट क्षुल्लक आहे असें वाटेल, परंतु मोठ्या गोष्टींचा प्रारंभ लहान गोष्टीमिळूनच होतो.[१] आज खरा प्रकार असा आहे कीं, थोरांना सामाजिक व धर्मविषयक बाबतींत आपण काय केलें पाहिजे याची कल्पनाच नाहीं, त्या दृष्टीनें ते त्या विषयांचा विचारच करीत नाहींत.[२] पूर्वीच्या काळीं जुन्या लोकांनीं सामाजिक व धर्मविषयक बाबींकडे लक्ष दिलें व त्यांत मन घातलें; परंतु पुढें सर्व पारडें फिरलें; जातींकडून त्रास व लोकांमध्यें अनादर हें बक्षिस मिळूं लागतांच ह्या विषयांकडे दुर्लक्ष झालें व मग रहातां राहिला एक राजकारणाचा विषय. तिकडेच लोकांचें विशेष लक्ष लागलें. आज जें भलतेंच वळण नव्या पिढीला लागत आहे त्याचा ओघ जर बदलावयाचा तर प्रयत्नही भगीरथ झाले पाहिजेत.

ह्या बाबतींत पुष्कळशी जबाबदारी आतां पदवीधरांवर आहे. ही त्यांच्या परीक्षेची वेळ आहे. त्यांनीं लोकांमध्यें सत्याची आवड उत्पन्न केली पाहिजे. त्यांनीं स्वतःच्या आचरणानें लोकांना सारासार विचार, सत्यप्रीति, नम्रपणा, ज्ञानलालसा, सत्याचरण ह्यांची गोडी लाविली पाहिजे. स्वतः पवित्र राहून लोकांस पावित्र्याचा धडा घालून दिला पाहिजे. वितंडवाद, अवास्तव टीका ह्यांचा त्याग करून,

१. Big issues arise out of added small causes.

२. The Hindu elder, with all his advance, has no well directed, clearly defined convictions as to his duties, religious and social.

ज्यांचा आपल्याशीं संबंध येतो, त्यांच्या त्यांच्याशीं समभावानें व प्रेमानें वागून लोकांस मार्ग दाखविला पाहिजे.

ता. २० फेब्रुआरी १९१२ रोजीं पदवीदान समारंभाच्या वेळीं सर नारायण ह्यांनीं जें भाषण केलें तें त्यांचें तिसरें व व्हाइस-चॅन्सलर ह्या नात्यानें केलेलें अखेरचें भाषण होय. ह्या भाषणांत प्रामुख्यानें दोन गोष्टींचा उल्लेख झालेला आहे. एक बी. ए. च्या अभ्यासक्रमांत झालेले फेरफार व बादशहा व महाराणीसाहेब ह्यांनीं हिंदुस्थानास दिलेली भेट. अभ्यासक्रमांतील फेरफारासंबंधानें बोलतांना त्यांनीं जे विचार प्रदर्शित केले त्यांचें स्वरूप साधारणतः पुढीलप्रमाणें होतें :

बी. ए. च्या अभ्यासक्रमामध्यें जे फेरफार करण्यांत आले त्यांत मुख्यतः वादाचे प्रश्न दोन होते. बी. ए. मध्यें ' इंग्लिश हिस्टरी " हा विषय आवश्यक विषयांत असावा किंवा तो ऐच्छिक विषयांत मात्र असावा. ह्या विषयावर जीं एवढीं रणें माजलीं त्यांचा विचार करतां विशेषतः असें दिसून आलें कीं, स्वातंत्र्यासंबंधानें ज्या पाश्चात्यांच्या कल्पना आहेत त्या इंग्लंडचा इतिहास शिकल्यानें आमच्या तरुणांना आवडूं लागतील, आणि सरकारला तें नको आहे, म्हणून इतिहास आवश्यक विषयांत घालण्याच्या विरुद्ध सरकार आहे अशी आमच्या कांहीं लोकांनीं कल्पना करून घेतली. पण खरा प्रकार असा नाहीं. आणि सरकारला तसें पुष्कळ वाटलें, तरी केवळ इंग्लंडच्या इतिहासावर आवश्यक विषयांत बहिष्कार घातल्यानें स्वातंत्र्यासंबंधाच्या विचारांवर बहिष्कार पडणें शक्य आहे असें मला वाटत नाहीं.[१] कारण, इंग्लंडचा इतिहास ही केवळ भूतकालीन कथा नव्हे, आजही तो घडत आहे, आणि प्रत्यक्ष काळ त्याचीं पानें लिहीत आहे. म्हणून ह्या विषयाचा विचार त्याची योग्यता ठरवून व्हावयास हवा होता आणि तो तसाच झाला आहे. विश्वविद्यालयीन शिक्षणाचा हेतु म्हणजे मन उदार करणें, अवश्य ती माहिती काळजीपूर्वक जमविण्याची संवय लावणें, योग्यायोग्य विचार करण्याची संवय लावणें व जे निकाल लावावयाचे ते सर्व विचाराचा आश्रय करून शहाणपणानें लावणें. जात, धर्म, पंथ ह्यांचा विचार मनांत न आणतां हीं सर्व कार्यें करण्याची संवय लावणें हा उच्च शिक्षणाचा मुख्य उद्देश. इतिहास, भाषा, तर्कशास्त्र, तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र, अर्थशास्त्र ह्यांपैकीं कोणताही विषय घेतला व त्याचें योग्यप्रकारें अध्ययन केलें तर त्याचा परिणाम एकंदर दृष्टी उदार करण्याकडे होतो. परंतु त्या त्या विषयासंबंधानें त्याला स्वतःला आवड असली पाहिजे. आवड नसतांना एखादा विषय विद्यार्थ्यावर लादला तर विद्यार्थ्याला तें

---

१. I do not believe it myself and even if I believe I do not think that by proscribing a study of English History, ideas of liberty and independence can or will be proscribed.

एक ओझेंच वाटूं लागतें. त्या विषयाचा केवळ परीक्षेपुरता तो अभ्यास करतो व नंतर त्याचा त्याला पूर्ण विसर पडतो. इंग्रजांचा इतिहास शिकल्यानें इंग्रजांची सत्ता व धोरण याची कल्पना होते असें कांहींचें म्हणणें आहे. ह्या म्हणण्यांत सत्यांश नाहीं असें नाहीं, तथापि ग्रोट अगर ग्रीनच्या इतिहासांचीं पानें अभ्यासासाठीं वाचल्यानें हें कार्य व्हावयाचें नाहीं. आजकाल इतिहासाचा एकेक काळखंड घेऊन विशेष आस्थेनें त्याचें अध्ययन करण्याकडे तज्ज्ञांचा कल आहे. आणि आपल्या येथें ऐच्छिक विषयांत अशीच व्यवस्था केली गेली आहे. ह्या सर्व गोष्टींचा विचार केला तर बी. ए. च्या अभ्यासक्रमामध्यें जे फेरफार करण्यांत आले आहेत ते योग्य दिशेनेंच केले आहेत असें दिसून येईल. कोणी म्हणतात कीं, अभ्यासाचे विषय इतके थोडे आहेत, विद्यार्थि आपला बहुतेक वेळ कसातरी घालवितील व शेवटीं शेवटीं कशी तरी तयारी करून येतील झालें! परंतु अशा प्रकारें काळाचा अपव्यय करण्यास मुलांना अवसर द्यावयाचा किंवा नाहीं हें विद्यार्थ्यांच्या अध्यापकांवर अवलंबून राहील. दोनच विषयांचा जर सखोल अभ्यास करावयाचा मनांत आणिलें तर सबंध दोन वर्षांत त्यांच्यांत प्राविण्य मिळवितां येईल. आणि एक ना धड भाराभर चिंध्या जमविण्यापेक्षां दोन विषयांचा सांगोपांग अभ्यास करणें हें अधिक कल्याण-कारक आहे ह्यांत संशय नाहीं.

आणि जे फेरफार केले आहेत त्यांच्या योगें आमच्या पदवीधरांच्या मगदुरामध्यें कांहीं सुधारणा होईल किंवा नाहीं हें सांगणें मात्र कालाधीन आहे. आजकाल सर्वत्र विद्यापीठांपुढें असेच प्रश्न आहेत. उदाहणार्थ, जें शिक्षण दिलें जात आहे त्याच्या योगें शीलवान तरुण माणसें तयार होत आहेत किंवा नाहींत. गेल्या शतकाच्या इतिहासाकडे थोडेसें विहग दृष्टीनें जर आपण पाहिलें, तर आपल्याला असें आढळून येईल कीं, स्वातंत्र्य व समता ह्यांस अनुकूल वातावरण सिद्ध होत होतें. मतदानाच्या हक्काची वाढ, व्यापाराची भरभराट, अप्रतिबंध व्यापार, गुलामगिरीचा अस्त व शिक्षणाचा प्रसार ह्यांच्याद्वारें नवयुगास प्रारंभ झाला होता. जुने आचार, विचार व अज्ञान हीं ज्ञानप्रसारामुळें मागें पडलीं होतीं. परंतु पुढें भौतिक शास्त्रांची प्रगति झाली; संपत्ति वाढली, नवीन नवीन प्रश्न उपस्थित झाले, नव्या आकांक्षा, नवें धोरण, जसें पुढें आलें तशा नव्या अडचणी व नवीं संकटेंही उद्भूत झालीं. आणि आजकाल Wealth, War व Waste ह्या तीन गोष्टी दैवाचे खेळ खेळत आहेत. आपल्या हिंदुस्थानचा विचार केला तरी गेल्या शतकांतील अखेरचा उत्साह आतां राहिला नाहीं. पूर्वींच्या आशा, उत्साह जाऊन त्या ठिकाणीं औदासिन्याचें साम्राज्य दिसून येत आहे. परंतु ही कांहीं खरी स्थिति नव्हे. हा आपला एक पक्ष आहे. खरोखर सर्व दिशांनीं आमची जी उन्नति झाली आहे ती आम्ही विचारांत घेत नाहीं. वर-

वर जे पहातात त्यांची अशी निराशा होते व दिशाभूल होते. म्हणून आज सर्वत्र जो प्रश्न पुढें आहे तो असा कीं, देशकार्यासाठीं शील, सुशिक्षण, नीति व विकसित बुद्धि ह्यांनीं मंडित तरुण माणसें सिद्ध करणें हें जें विद्यापीठाचें मुख्य कार्य तें विद्यापीठाकडून होत आहे किंवा नाहीं ? अलीकडे शील ( Character ) ह्या शब्दाला बरेंच महत्त्व प्राप्त झालें आहे. परंतु सर्वांच्या मनांत एकच अर्थ असतो किंवा नाहीं याची शंकाच आहे ! पुष्कळ वेळां कित्येक इंग्रज लोक असें बोलतांना आढळतात कीं, ज्या पूर्वींच्या पिढीला हल्लींचें शिक्षण मिळालें नव्हतें, त्या पिढींतले लोक हल्लींच्या सुशिक्षित लोकांपेक्षां अधिक शीलवान् होते ! शीलवान् असणें म्हणजे तोंडपुजेपणा असा जर अर्थ केला तर साहेबांचें हें म्हणणें बरोबर आहे ![1] पूर्वींचे लोक साहेबांपुढें अगदीं गरीबीनें वागत, लांगूनचालन करीत, साहेबांची व त्यांच्या अधिकाराची तोंडावर स्तुति करीत आणि खासगी रीतीनें म्लेच्छांची ही सत्ता असें म्हणून मनापासून तिचा तिरस्कार करीत ! असो. शीलवान् माणसें पाहिजेत असें जेव्हां म्हटलें जातें, तेव्हां सारासार विचार करणारीं, आजच्या काळीं योग्य काय अयोग्य काय, ह्याचा धिमेपणानें विचार करून विचार व आचार ह्यांच्याद्वारें सत्य आचरणांत आणणारीं माणसें असें समजावयास कांहीं हरकत नाहीं. अशीं माणसें विद्यापीठांतून बाहेर पडलीं पाहिजेत. पोटापाण्याची चांगली व्यवस्था व्हावी एवढ्याच हेतूनें जे कोणी विद्यापीठीय शिक्षण घेत असतील त्यांनीं तें मध्येंच सोडून दुसऱ्या कोठें तरी शिक्षण घेऊन आपला हेतु पूर्ण करून घ्यावा असें डॉ. वर्डस्वर्थ म्हणत असत तें ह्याचसाठीं. पोटापाण्याची व्यवस्था करणें, बेकारी घालविणें हा विद्यापीठाचा विषय नव्हे. जो विषय पुढें असेल त्याचे विषयीं सांगोपांग विचार करावयास शिकविणें, साधकबाधक प्रमाणांचा विचार करावयास लावणें, सत्यनिष्ठा, नीतिनिष्ठा ह्यांच्यावरील प्रेम जागृत करणें, चालत्या काळीं जो ओघ दिसेल तो ध्यानांत घेऊन, त्यांतील जें सत्य व उत्तम असेल त्यास अनुसरून वागणें हें आधुनिक शिक्षिताचें कर्तव्य आहे. असलीं शीलवान् माणसें आम्हांला आज हवीं आहेत आणि तशीं माणसें विद्यापीठांतून जर बाहेर पडत नसतील तर आमचीं विद्यापीठें आपलें कार्य योग्यप्रकारें करीत नाहींत असेंच म्हणावें लागेल.

ह्याच वर्षी बादशाहा पांचवे जार्ज साहेब ह्यांनीं हिंदुस्थानाला भेट दिली होती. तिच्या संबंधानें आदरपूर्वक उल्लेख ह्या व्याख्यानांत केलेला आहे. राजा हा देवाचा

---

१. आपल्या काळची तरुण पिढी नीतीच्या बाबतींत पूर्वपिढीपेक्षां श्रेष्ठ आहे असें नारायणरावांचें मत होतें.

अवतार होय ही भावना हिंदूलोकांत दृढमूल आहे व महाराणी व्हिक्टोरियाच्या काळापासून लोकांना ती कल्पना अनुभवानें पटली आहे. पुष्कळवेळां पाश्चात्य लोक Materialist वास्तववादी व आम्ही हिंदी लोक धार्मिक असें म्हणून पश्चिम ती पश्चिम आणि पूर्व ती पूर्व असें म्हणून हीं दोन जवळ येणें शक्य नाहीं असें लोक म्हणतात. पण त्यांत कांहीं तथ्य नाहीं. ब्रिटन पुरातनाभिमानी, न्याय व कायदा ह्यांस मान देणारा, असा असला तर हिंदी मनुष्याचीही तीच स्थिति आहे. आपल्या घरकुल्याविषयीं हिंदी माणसाला जर विशेष प्रेम आहे, तर ब्रिटिश माणसाची अवस्था तशीच आहे हें Home, Sweet Home संबंधाच्या त्याच्या ओढ्यावरून प्रत्ययास येत आहे. सारांश विचार करून पाहिलें तर अशा कित्येक सारख्या आवडी आहेत तिकडे अधिक लक्ष गेलें पाहिजे. आजकाल लोक असें म्हणत आहेत कीं, क्लब, पार्ट्या, संमेलनें ह्यांच्याद्वारें प्रेमाचें वर्धन करावें. ह्यांचाही फायदा आहे. पण तो कांहीं मर्यादेपर्यंत. पण राष्ट्राराष्ट्राचा सलोखा व्हावयास, प्रेम वाढावयास, खरें पहातां परस्परांतील ग्रंथ-संपत्ति, धर्म, तत्त्वज्ञान, ह्यांच्यांतील सारखे विचार, सारख्या कल्पना, सारखीं ध्येयें यांची अधिक ओळख झाली पाहिजे. परस्परांतले मतभेद, चुकीचे समज, हितसंबंधांतील भेद हे नेहमीं आपल्यापुढें आहेतच. पण त्यांचेंच स्तोम जर माजविलें, तर आजच्या काळीं आपलें जें कर्तव्य आहे त्यापासून आपण निःसंशय पराङ्मुख होऊं; म्हणून ज्यांना विद्यापीठांतील उच्च शिक्षणाचा प्रेमळ लाभ झाला आहे, त्यांनीं असत्य व सत्य ह्यांची भेसळ झाली आहे हें जाणून त्यांतून सत्य निवडून काढिलें पाहिजे. किंवा सोनें इतर धाणींत मिसळलें आहे, तें गाळ जाळून शोधून काढलें पाहिजे. त्याचप्रमाणें पदवीधरांनीं दोन्ही संस्कृतींतून जें नित्य तें घेतलें पाहिजे. आधुनिक शिक्षणाच्या योगें जातिबंधनें शिथिल होतील व बंधुभावाची वाढ व्हावयास मदत होईल असा जो समज होता त्यास आजकालच्या जातिविषयक चळवळी, जातींकडील वाढता ओढा पाहून मोठा धक्का बसला आहे खरा; परंतु हा परिणाम काय शिकवीत आहे तिकडे आपलें लक्ष गेलें पाहिजे. ब्रिटिश सत्तेखालीं प्रत्येक जातीला आपापली उन्नति करून घ्यावी, आपण पुढें यावें असें वाटूं लागलें आहे. प्रत्येक जात, किंवा पंथ आपलें व्यक्तित्व[१] स्थापूं पहात आहे. ह्या अशा संक्रमणकाळीं इतरांस मागें टाकणें, किंवा इतरांसंबंधानें अनुदारपणा दाखवून आपलेंच घोडें पुढें दामटण्याची इच्छा प्रबल होणें हें अगदीं साहजिक आहे. प्रत्येक जातीला वाटत आहे कीं, आपलीच जात,

---

१ The spirit of individuality or personality is speaking in and through each.

आपलाच पंथ[१] सर्वांत श्रेष्ठ. त्यामुळें इतरांशीं ऐक्य करण्याचा विचारच मुळीं त्यांस सुचत नाहीं. तथापि निराळेपणा हें जरी आजचें विशिष्टत्व असलें, तरी ह्यांतूनच पुढें ऐक्याची भावना जागृत होणार आहे. भौतिक शास्त्रांचेंही कांहीं अंशीं असेंच झालें आहे. बहुत काळपर्यंत भूगर्भशास्त्र, रसायनशास्त्र, वगैरे भौतिक शास्त्रें परस्परांपासून अगदींच भिन्न वाटत होतीं. चेतन अचेतन हीं परस्पर विरुद्ध समजलीं जात होतीं. परंतु सर्व भौतिकशास्त्रांतून एक सूत्र धांवत असून त्यांस भिन्नत्व देणारा पडदा अगदीं झिरझिरीत असल्याचें आतां दृष्टोत्पत्तीस येऊन चुकलें आहे. सारांश, दूरवर दृष्टी नसणारीं माणसें हा सर्व प्रकार अवलोकून, मतभेद व आकुंचित वृत्ति, निरनिराळ्या जातींची व पंथांची स्वार्थपरता ह्यांतच भर घालण्याचा प्रयत्न करितील, परंतु शहाणीं व विचारी माणसें दूरवर दृष्टी पोंचवून आपल्याशींच प्रथम विचार करून आपल्या स्वतःच्या आचरणाच्याद्वारें ह्या बेकींतूनच ऐक्य कसें निघणार तें दाखवून द्यावयाचें धोरण ठेवितील, तर आज ज्या गोष्टी परस्परांस दूर करीत आहेत त्या त्यांस एक करण्यास, अधिक सन्निध यावयास मदत करितील असें आढळून येईल. हें कार्य करावयास पदवीधरांनीं पुढें आलें पाहिजे. दिवसेंदिवस आपल्या सभोंवतालची स्थिति अधिकाधिक बिकट होत चालली आहे हें आपण पहात आहों. एखादी खुळचट समजूत, ज्ञान व विवेक ह्यांच्याद्वारें नाहींशी केली, तर दुसरी तिची जागा घ्यावयास तयार असतेच. म्हणून आज जे अगत्याचे विषय आहेत त्यांचा शांतपणें विचार करून सहानुभूतिपूर्वक त्याचा मार्ग काढला पाहिजे. प्रेम व सेवा ह्यांच्याद्वारें आपल्याला आपला मार्ग काढतां येईल. आज सर्वत्र जी चढाओढ चालली आहे, जातीजातींत वैमनस्य व उच्चनीच भाव जो दिसत आहे व ज्याच्यामुळें एवढा शिक्षणाचा प्रसार झाला तो व्यर्थच काय असाही विचार मनांत येऊं लागला आहे अशा वेळीं पदवीधरांनीं प्रेम, सेवा व उदार धोरण ह्यांच्याद्वारें जय मिळविला पाहिजे.

---

१. Each creed and each caste seems to look to itself as if it was and ought to be all in all.

प्रकरण पंधरावें

# चरित्र संगति.

नारायणरावांच्या चरित्राची ह्या ग्रंथांत कार्यानुसार विभागणी केली असल्यामुळें ह्या लहानशा भागांत त्यांच्या चरित्रांतील कित्येक प्रसंगांचा संगतवार उल्लेख करण्याचें योजिलें आहे.

## विलायतेंतील कामगिरी व लोकमत

इंदुप्रकाशपत्राचे संपादक असतांनाच हिंदुस्थानासंबंधानें विलायतेंत चळवळ करण्यासाठीं त्यांना लंडन येथें जाण्याचा कसा योग आला व तेथें त्यांनीं किती उपयुक्त कार्य केलें याची कल्पना 'इंग्लंडांतील अनुभव व कामगिरी' ह्या प्रकरणावरून वाचकांस झालीच आहे. ह्या कामगिरीची हकीकत ते स्वदेशीं परत येण्यापूर्वीच येथें येऊन पोचली होती. त्यामुळें पहिल्या राष्ट्रीयसभेच्या अधिवेशन प्रसंगीं सभास्थानीं जातांच त्यांना उत्साहपूर्वक उत्थापन देण्यांत आलें. आणि तेथील कार्याच्या हकीकतीचें लहानसें पुस्तक जेव्हां १८८७ सालीं प्रसिद्ध झालें त्या वेळीं त्यांच्या हातून झालेल्या कार्याचा भरीवपणा सर्व लोकांच्या स्पष्टपणें ध्यानांत आला. त्यावेळीं तें लहानसें पुस्तक वाचून नारायणरावांस अनेक पत्रें आलीं व तीं लिहिणारांनीं त्यांच्या विलायतच्या कामगिरीबद्दल योग्य स्तुति केली होती. मि. चार्लस आलिव्हंट ह्यांनीं आपल्या पत्रांत त्यांना सुचविलें कीं, ज्याप्रमाणें विलायतेंत जाऊन इंग्लिश समाजाच्या राजकीय परिस्थितीचें तुम्ही अध्ययन केलें, त्याचप्रमाणें लवकरच पुन्हां तेथें जाण्याची संधि आली म्हणजे तेथील सामाजिक जीवनाचें तुम्ही परीक्षण करावें, असें मी सुचवितों. ज्याप्रमाणें तुम्ही राजकीय बाजूविषयीं लिहिलें आहे त्याचप्रमाणें जर सामाजिक वस्तुस्थितीविषयीं लिहिलें, तर आमच्या राष्ट्रीय शीलाची जी बाजू येथल्या लोकांना फारशी अवगत नाहीं व जी बाजूच खरोखर महत्त्वाची आहे, ती लोकांपुढें ठेविल्यास सर्वांस लाभदायक वाटल्या वांचून

राहणार नाहीं. हल्लीं राजकारणांत जे पक्ष झाले आहेत त्यांत न मिसळतां दूर राहून कायकाय होत आहे तें पहाणारे लोक तुम्ही म्हणतां त्यापेक्षां निःसंशय अधिक आहेत. मीही अशांपैकींच एक आहें. तुम्ही विलायतेंत जें कार्य केलें त्याबद्दल जरी ज्या मार्गाचें अवलंबन करून तुम्हीं कार्य केलें तो मला सर्वांशीं पसंत नसला तरी[१] मी तुमचें मनःपूर्वक अभिनंदन करितों. कारण कांहीं बाबतींत मतैक्य व इतर बाबतींत मतभेद ह्यास आपली सिद्धता असली पाहिजे हें तुमचें तत्त्व मला मान्य आहे.

दुसऱ्या एका युरोपियन गृहस्थांनीं असें म्हटलें कीं, तुम्ही विलायतेंत गेलांत व तेथें सर्व लोकांत मिसळून कार्य केलें म्हणून लोकांचें तुमच्याकडे थोडेंबहुत लक्ष वेधलें हें खरें आहे. परंतु माझ्या दृष्टीनें तुमच्या मार्गातील खरी अडचण जी आहे ती अशी आहे: तेथें जाऊन तुम्हीं काम करावयाचें म्हणजे राजकारणांत तेथें जे मोठे पक्ष आहेत त्यांपैकीं एखाद्याच्या भक्षस्थानीं पडावयाचें! म्हणजे तुमच्या पासून तो पक्ष आपला फायदा करून घेतल्यावांचून राहाणार नाहीं! बरें, तुम्हीं आपल्या हिताच्या दृष्टीनें कोठलाही एक पक्ष उचलला‍त, कोठलाही एक पक्ष पकडलात तर मग दुसरा मोठा पक्ष तुमच्या विरुद्ध गेल्यावांचून राहाणार नाहीं! आणि तुम्ही दुसऱ्या पक्षाचा जितका विरोध कराल, तितका विरोध तुम्हांला होऊं लागेल. खरा प्रकार असा आहे कीं, इंग्लिश राजकारणाच्या कक्षेच्याबाहेर हिंदुस्थान आहे. आणि उभयपक्षांत हिंदुस्थानाचें हित चिंतणारे लोक आहेत. म्हणून पार्लमेंटमधील सर्वपक्षीय एक लहानशी इंडियन पार्लमेंटरी कमिटी पुढें मागें करावी असें आज मी स्वप्नसृष्टींत तरी ठरवीत आहें! पण हें कितपत होण्यासारखें आहे तें आजच सांगणें कठीण आहे.[२] सर वुइल्यम वेडरबर्न ह्यांनीं म्हटलें आहे कीं एक फार महत्त्वाचें कार्य उत्तम प्रकारें पार पाडल्याची ही हकीकत आहे (The record of a very important work thoroughly well performed) एकंदरींत ह्या हकीकतीमुळें लोकांना नारायणराव व त्यांच्या बरोबरचे मित्र ह्यांनीं केलेल्या कार्याची चांगली कल्पना झाली एवढें खरें.

---

१. "Though I may not think that the course adopted was in all respects the best."

२. The truth is that India lies outside the ordinary field of English politics and Indian interests and Indian aspects have got as many friends on one side of the House as the other. The formation of a compact Parliamentary Indian party recruited from all sides of the House is my dream of the future.

# लेडी डफरिन स्मारक–फंड.

सन १८८६ सालीं डफरिन फंडाची मुंबईत शाखा काढावी ह्या हेतूनें लेडी रे ह्यांनीं येथील टाऊन हॉलमध्यें एक मोठी सभा भरविली होती. त्यावेळीं नारायणरावांनीं अत्यंत मुद्देसूद व अस्खलित भाषण केलें. त्याच्या योगें आपल्या योजिलेल्या कार्यी नारायणरावांसारख्यांचें सहाय्य झाल्यास कार्य सुलभ होईल असें त्यांस वाटलें. त्या सभेंत त्यावेळचे मुंबईचे लॉर्ड बिशप हजर होते, त्यांनीं त्या भाषणाची स्तुति केली. पण त्याचा परिणाम असा झाला कीं, नारायणरावांना फंडासाठीं वर्गणी जमविण्याच्या कामीं पुढाकार घेऊन मदत करावी लागली व ती त्यांनीं मोठ्या आनंदानें केली. त्यांना लेडी रे ह्यांनीं फंडाच्या जनरल कमीटीचे सभासद केलें व त्यांच्या सहकार्यामुळें लेडी रे ह्यांस पुष्कळ उत्तेजन मिळाल्यासारखें झालें व नारायणरावांनीं मोठ्या उत्साहानें कार्यास प्रारंभ केला. स्त्रियांसाठीं स्त्रियांनीं चालविलेलीं इस्पितळें जागोजाग स्थापावयाचीं, तेथें नर्सिसच्या शिक्षणाची सोय करावयाची, शिष्यवृत्त्या देऊन हिंदी स्त्रियांस असें शिक्षण घ्यावयास उत्तेजन द्यावयाचें; डॉक्टरीचा अभ्यास करणाऱ्या स्त्रियांस शिष्यवृत्त्या द्यावयाच्या, स्त्रियांच्या प्रकृतीस जपणें व मातांच्या प्रकृतीविषयीं काळजी घेणें, मुलांचें आरोग्य कसें राखावयाचें त्याचें ज्ञान देणें व बाळंतिणी व लहान मुलें ह्यांच्या मृत्यूचें प्रमाण कमी करण्यासाठीं कोणकोणत्या उपायांची योजना करितां येण्यासारखी आहे त्याची जनतेस कल्पना देणें अशा हेतूंनीं हिंदुस्थानांतील सर्व मोठमोठ्या शहरीं लेडी डफरिन ह्यांचें स्मारक म्हणून शाखा स्थापन झाल्या. मुंबईची शाखा स्थापन झाल्यानंतर नारायणराव फंड जमवितांना डफरिन स्मारकाचे हेतु किती उच्च आहेत व हें स्मारक आपल्या लोकांच्या कल्याणासाठीं कसें कार्य करीत आहे त्याची कल्पना करून देत असत. हें कळल्यानंतर लेडी रे ह्यांनीं नारायणरावांस लिहिलेल्या पत्रांत त्या म्हणतात:—

I am extremely obliged to you for the trouble you are kindly taking in interesting people in the Medical Aid Fund and in collecting donations. This is a great encouragement to me when I meet with help and sympathy from those most directly interested and whom the association is so anxious to benefit, for without health life is very hard to bear and the stronger the women, the stronger the next generation of boys and girls will be.

ह्या पत्रावरूनही फंडाची योजना कोणतें थोर कार्य करण्यासाठीं झाली त्याची कल्पना होते. पुढें ह्या फंडाशीं नारायणरावांचा अधिकाधिक निकट संबंध येऊं लागला. आणि लेडी नार्थकोट जेव्हां ह्या फंडाच्या अध्यक्ष झाल्या त्यावेळीं त्यांनीं नारायणरावांस

फंडाच्या कार्यकारी मंडळींत घेतलें. त्यानंतर नवीन नियम वगैरे करून मुंबई शाखेची पुनर्घटना मुख्यतः नारायणरावांच्या मदतीनें करण्यांत आली. १९०४ सालीं लेडी लॅमिंग्टन ह्यांनीं त्यांना फंडाचे व्हाइस प्रेसिडेंट नेमिलें.

## युनिव्हर्सिटी फेलो

१८८७ सालीं लॉर्ड रेनीं नारायणरावांस मुंबई युनिव्हर्सिटीचें फेलो नेमिलें. तेव्हांपासून अखेरपर्यंत ते युनिव्हर्सिटीचे फेलो होते. एवढ्या अवधींत–१८८७ ते १९२३–त्यांनीं युनिव्हर्सिटीची अनेकप्रकारें सेवा केली. पुष्कळांच्या बाबतींत असें होतें कीं, एकदां ते व्हाइस-चॅन्सलरच्या हुद्यापर्यंत चढले, आणि ती त्यांची कारकीर्द संपली म्हणजे मग युनिव्हर्सिटीच्या कारभाराकडील त्यांचें लक्ष कमी होतें. बहुत करून जेथें मुख्याधिकारी म्हणून काम केलें तेथें कमी प्रतीच्या हुद्यावर रहाणें कित्येकांस पसंत पडत नसावें. युनिव्हर्सिटीच्या कारकीर्दींत ह्यास उल्लेखनीय अपवाद जे झाले त्यांत नारायणरावांची गणना प्रामुख्यानें केली पाहिजे. पहिला अपवाद म्हणजे डॉ. मॅकीकन् ह्यांचा. त्यांना तीन निरनिराळ्या प्रसंगीं व्हाइस-चान्सलरचा महनीय हुद्दा प्राप्त झाला, पण तो हुद्दा नसतांना सिंडिक ह्या नात्यानें कार्य करण्यांत त्यांस कोणत्याही प्रकारचा कमीपणा वाटला नाहीं. १९०९ सालीं नारायणरावांस व्हाइस-चॅन्सलर नेमण्यांत आलें. १९११ सालीं त्यांची तेथें फेर नेमणूक झाली. १९१२ सालच्या आगस्ट महिन्यांत नारायणरावांनीं व्हाइस-चॅन्सलरच्या हुद्याचा राजीनामा दिला. पण इंदूरहून परत आल्यावर त्यांनीं अधिक उत्साहानें युनिव्हर्सिटीच्या कारभारांत भाग घेतला. त्यांनीं युनिव्हर्सिटीमध्यें किती महत्त्वाची कामगिरी केली आहे त्याची माहिती **शिक्षण विषयक कार्य व विचार** ह्या प्रकरणांत आलेली असल्यामुळें त्याचा येथें विस्तार करण्याची आवश्यकता नाहीं. मात्र एवढें येथें सांगणें जरूर आहे कीं, १९१७ सालीं तुम्ही व्हाइस-चॅन्सलर, व्हावयास तयार आहां काय असें चॅन्सलर साहेबांनीं नारायणरावांस विचारिलें त्यावेळीं कारपोरेटर होण्याच्या बाबतींत १९१५ सालीं जें उत्तर दिलें तेंच ह्या वेळींही त्यांनीं दिलें.[१]

## कारपोरेटर

नारायणराव तीन वर्षें गिरगांव वार्डाच्या वतीनें म्युनिसिपल कॉरपोरेशनचे सभासद होते. ता. १५ एप्रिल १८८८ रोजीं डॉ. पीटरसन ह्यांच्या राजीनाम्यामुळें रिकाम्या झालेल्या जागीं त्यांची निवडणूक झाली होती. ह्यावेळीं

---

१. हें उत्तर पुढील पृष्ठावर दिलें आहे.

त्यांच्या हातीं इंदुप्रकाश पत्राचें काम होतेंच व त्यांची वकिलीही चांगल्या प्रकारें चालूं लागली होती. डफरिन फंड, युनिव्हर्सिटी वगैरे संस्थांशीं संबंध असूनही त्यांनीं ही अधिक जबाबदारी आपल्यावर घेतली. पुढल्या निवडणुकीच्या वेळीं ते उमेदवार म्हणून पुढें आले नाहींत. कारण, त्यांस कारपोरेशनच्या सभांस हजर रहावयास पुरेसा वेळ मिळत नसे. जें काम आपल्या हातून आपल्या मनाप्रमाणें होत नाहीं तें करावयाचें नाहीं, असा त्यांचा बाणा होता. परंतु जीं तीन वर्षें ते कारपोरेशनमध्यें होते तेवढ्या काळांत त्यांनीं पुष्कळ उपयुक्त कार्य केलें ह्यांत कांहीं संशय नाहीं. खेतवाडी सारख्या दाटवस्तीच्या जागेंत कॉलरा इस्पितळ आणून बसविण्याचा विचार होता. नारायणरावांनीं ह्या सूचनेस कसून विरोध करून आपल्या वॉर्डाची उत्तम सेवा बजाविली. त्याचप्रमाणें पूर्वीं जिला Joint Schools Committee म्हणत असत त्या कमीटीचे नियम नारायणरावांनींच तयार केले होते. पुढल्या वेळीं ते कारपोरेशनच्या निवडणुकीस उभे राहिले नाहींत, त्यावेळीं लोकांस तें बरें वाटलें नाहीं. ह्या तीन वर्षांनंतर कारपोरेशनचा व त्यांचा कांहीं संबंध आला नाहीं. तथापि १९१५ सालीं सर फेरोजशहा मेथा ह्यांच्या मागें त्यांनीं कारपोरेशनचें सभासद व्हावें अशी कित्येक पुढाऱ्यांची इच्छा होती. जस्टिस ऑफ धी पीस ह्यांच्या तर्फें आपण कारपोरेशनमध्यें येण्याचें कबूल करा, पुढली सर्व खटपट आपण करूं असा संदेश घेऊन सर (त्यावेळीं मिस्टर) फेरोज सेटना व मि. मॅक्वेन हे सर नारायण ह्यांच्याकडे गेले होते. 'परंतु सामाजिक व धर्मक्षेत्रांतील कार्यांत माझें मन अधिक रमतें. त्या कार्याकडे माझें सर्व लक्ष आहे. तें सोडून अगर त्या कामाकडे सर्व लक्ष न देतां, म्युनिसिपालिटीच्या कामाचा व्याप मी आपल्यामागें लावून घ्यावा असें मला वाटत नाहीं' असा जबाब नारायणरावांनीं त्या वेळीं दिला.

## १८९२-१८९६

१८९२ सालच्या संमतिवयाच्या बिलाच्या चळवळीच्यावेळीं नारायणरावांनीं कसा पुढाकार घेतला होता त्याचें वर्णन सामाजिक सुधारणेच्या प्रकरणांत झालें आहे. तरीपण संगतिसाठीं येथें हें सांगावयास पाहिजे कीं, नारायणरावांनीं हें दाखवून दिलें कीं, आजपर्यंत सामाजिक बाबतींत सरकारनें कायदे केले आहेत; त्यांनीं बॉंबे गॅझेट पत्रामध्यें ह्या विषयाचें जें ऐतिहासिक दृष्ट्या समालोचन केलें तें स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्धही झालें होतें.

ह्याच १८९२ सालीं तिकडे इंग्लंडमध्यें एक अभूतपूर्व गोष्ट घडून आली. जी गोष्ट १८८५ सालीं घडली नाहीं, म्हणजे मि. घोष पार्लमेंटचे सभासद म्हणून निवडून आले नाहींत तीच गोष्ट १८९२ सालीं सेंट्रल फिन्सबरीच्या लोकांनीं

करून दाखविली. त्यांनीं दादाभाई नवरोजी ह्यांची पार्लमेंटमध्यें सेंट्रल फिन्सबरीच्या मतदारांच्या वतीनें निवडणूक केली व हिंदुस्थानचें गाऱ्हाणें हिंदी मनुष्याच्याद्वारें पार्लमेंटपुढें ठेवावयास मिळालें पाहिजे, ही जी राष्ट्रीय सभेची मोठी इच्छा ती पूर्ण झाली म्हणून सर दिनशा पेटिट ह्यांच्या अध्यक्षतेखालीं मुंबईच्या टाऊन हॉलमध्यें सेंट्रल फिन्सबरीच्या मतदारांचे आभार मानण्यासाठीं भरलेल्या जाहीर सभेंत नारायणरावांनीं जें भाषण केलें तें संस्मरणीय असेंच झालें. त्यांच्या भाषणाचा मुख्य विषय India's gratitude to the Central Finsbury असा होता. ह्या भाषणांत हिंदुस्थाननें फिन्सबरीसंबंधानें कृतज्ञ कां रहावयाचें त्याचा स्पष्ट उल्लेख त्यांनीं केला होता, व तें अत्यंत परिणामकारक झालें होतें. ह्यानंतर त्यांच्या चरित्रांतील विशेष महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे १८९६ सालीं मद्रास येथील हिंदु सोशल रिफॉर्म ॲसोशिएशनच्या वार्षिकोत्सवासाठीं त्यांनीं दिलेलें व्याख्यान. १८९५ सालीं ह्याच संस्थेच्या उत्सवाच्या वेळीं गुरुवर्य डॉ. भांडारकरांनीं अध्यक्षस्थान मंडित केलें होतें. पुढल्या सालीं त्यांचे शिष्यवर नारायणराव ह्यांची त्या जागीं योजना झाली हें उत्तमच झालें. नारायणरावांनीं ह्यावेळीं जें फार महत्त्वाचें अध्यक्षीय भाषण केलें त्याचा उल्लेख सामाजिक सुधारणा ह्या प्रकरणांत केलेला आहे. ह्याच वर्षी नारायणरावांची कराची येथें भरलेल्या प्रांतीय राजकीय परिषदेच्या अध्यक्षस्थानीं निवडणूक झाली. त्यावेळीं त्यांनीं जें भाषण केलें त्याचा विचार "राजकारण" ह्या प्रकरणांत केलेला आढळेल. पण येथें एका गोष्टीचा सहज उल्लेख करणें युक्त होण्यासारखें आहे. आधीं राजकीय मग सामाजिक सुधारणा अशा मताचे नारायणराव नव्हते. व्यंग दोन्ही बाजूला आहे, तर एक बाजू खुशाल सडत ठेवून, दुसरीकडेच लक्ष पुरवावें हा विचार त्यांस मान्य नव्हता. म्हणूनच जणूं काय सामाजिक व राजकीय विषयांवर अध्यक्षीय भाषण करण्याचे योग त्यांस एकाच वर्षांत आले!

## लेजिस्लेटिव्ह कौन्सिल

१८९७ सालीं जव्हेरिलाल उमियाशंकर याज्ञिक हे परलोकवासी झाले. ते युनिव्हर्सिटीच्या तर्फे कौन्सिलचे सभासद होते. याज्ञिकांविषयीं नारायणरावांच्या ठिकाणीं अत्यंत आदर असे. नारायणरावांचा एक विशेष गुण असा असे कीं, त्यांचीं सामाजिक बाबतींत अत्यंत प्रागतिक मतें, त्या मतांस विरोध करणाऱ्या पण राजकीय बाबतींत पूर्णपणें प्रागतिक मतें असणाऱ्या **शीलवान** माणसाशीं सहकार्य करण्याच्या बाबतींत आड येत नसत. हें मंडलिकांविषयीं त्यांच्या ठिकाणीं जो अत्यंत आदर असे त्यावरून आपण पाहिलें आहे. जव्हेरिलाल ह्यांच्यासंबंधानें

असाच प्रकार होता.[१] सामाजिक बाबतींत त्यांचे विचार अगदीं जुने असत. राजकीय बाबतींत एवढे प्रागतिक असून सामाजिक बाबतींत इतके आकुंचित विचार कसे असा विचार मनांत येऊन नारायणराव त्यांच्याशीं वादविवाद करण्याचा प्रयत्न करीत, पण त्यासही त्यांची तयारी नसे व मला आपलें जुन्या वळणांत राहून मेलेलें आवडेल असें ते म्हणत! याज्ञिकांविषयीं माहिती देतांना **सुबोध पत्रिकेंत** पुढील फार महत्त्वाचा उल्लेख आढळतो :—

" He handled no question without before hand perfectly studying it in all its aspects and as a controvertialist he distinguished himself by the moderation with which he invariably expressed himself and the sound judgment which he brought to bear on all he said and wrote.

जव्हेरिलाल ह्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या जागेसाठीं जे चार उमेदवार प्रथम उभे राहिले, त्यांत नारायणराव ज्याप्रमाणें होते त्याचप्रमाणें डॉ. भालचंद्रही होते! डॉ. भालचंद्र व नारायणराव चांगले मित्र, आणि विष्णूपंत तर त्यांचे अगदीं विश्वासांतले मित्र. " विष्णूला " भेटल्यावांचून नारायणरावांचा एकही दिवस जात नसे. असें असतांना एकाच जागेसाठीं हे दोघे मित्र उभे राहिलेले पाहून दोघांच्या मित्रांना मोठा पेंच पडला होता! पण, ह्या दोघांची आपसांत समजूत अशी होती कीं, आपणां दोघांपैकीं कोणीही निवडून आलें तरी हरकत नाहीं, पण, तिसराच मध्यें यावयास नको! सुदैवानें ह्या दोघां मित्रांत चुरस लागण्याचा प्रसंगच आला नाहीं! कारण, डॉ. भालचंद्र ह्यांना सरकार निवडून देणार असें खात्रीलायक माहितीवरून कळल्यावर एक काळजी निवारण झाली. नारायणरावांचे दुसरे प्रतिस्पर्धि म्हणजे एक डॉ. मॅकीकन व दुसरे मि. रतिलाल दवे. रतिलाल दवे हे प्रतिस्पर्धी असून नसल्यासारखेच होते. पण डॉ. मॅकिकन एका मोठ्या कॉलेजचे प्रिन्सिपाल असल्यामुळें व मतदारांचा व त्यांचा परिचय असल्यामुळें त्यांच्याशीं स्पर्धा करणें जोखमीचेंच होतें.

१. We used to have discussions on the subject of Social Reform but Mr. Javerilal had no liking for even discussions on them and loved, as he often has said, to live and die a simple orthodox Hindu. Though he differed from him on that subject and regretted that as an educated man he did not take a more liberal view of the progressive necessities of his country, yet he could not but respect and admire the ring of simplicity and genuinenes there was about Mr. Javerilal's Hindu orthodoxy.

—*Chandavarkar on Javerilal*

तथापि ही स्पर्धा झाली व नारायणराव प्रचंड बहुमतानें निवडून आले. खरें पहातां जव्हेरिलाल याज्ञिक यांच्या जागीं नारायणरावांनीं युनिव्हर्सिटीच्यातर्फे निवडून येणें हें विशेष होतें. कारण जव्हेरिलाल व नारायणराव एकाच राजकीय धोरणाचें अवलंबन करणारे, दोघेजण प्रेसिडेन्सी ॲसोशिएशनचे सभासद, शिक्षणविषयक धोरणही दोघांचें सारखेंच तेव्हां एक गेल्यानंतर त्याच्या मित्रानें त्याजागीं येऊन आपल्या गतमित्राचेंच कार्य, तेंच धोरण दृष्टीसमोर ठेवून, पुढें चालविणें हेंच युक्त होतें.[1] ह्या वेळीं नारायणरावांची वकिली विशेष चांगल्या रीतीनें चालत होती, आणि असें असतांही नवीन जबाबदारी त्यांनीं जाणूनबुजून अंगावर घेतली. ह्याचवेळीं त्यांनीं आजपर्यंत परमेश्वरानेंच आपल्याला मार्ग दाखविला असें पत्र आपल्या मामांना लिहिलें होतें.[2] कौन्सिलमध्यें गेल्यानंतर त्यांनीं तेथें न्यायमूर्ती होईपर्यंत उत्तम काम केलें. त्यांच्या कारकीर्दीत अनेक महत्त्वाचीं बिलें कौन्सिल-पुढें आलीं असतां नारायणरावांची पुष्कळ प्रसंगीं सिलेक्ट कमीटीवर नेमणूक होत असे. कोणत्याही बिलासंबंधानें सांगोपांग विचार करावयाचा असला म्हणजे सिलेक्ट कमिटी नेमिली जाते. तिचेवर फार मोठी जबाबदारी असते. लोकांची बाजू काय, खरोखर अडचणी काय आहेत, उपाययोजना योग्य आहे कीं अपुरी आहे, तें स्वतंत्र सभासदांस ह्यावेळीं अधिकाऱ्यांच्या नजरेस आणून देतां येतें. पोलीस बिल, डिस्ट्रिक्ट म्युनिसिपालिटीचें बिल, धी ॲडल्टरेशन बिल वगैरे बिलांचा विचार चालू असतां नारायणरावांनीं कौन्सिलांत उत्तम कामगिरी केली.

---

१. नारायणरावांच्या निवडणुकीनंतर सुबोध पत्रिकेंत पुढील उल्लेख आढळतो :-

Mr. Chandavarkar has been returned with an overwhelming majority to represent the University in the Legislative Council. ...Mr. Chandavarkar combines in him rare culture with intellectual and moral forces of a high order. Besides being a distinguished graduate of the local University and a successful pleader at the local bar, he has, ever since entered upon his professional career, actively identified himself with the growing religious, social and political aspirations of his countrymen. His public addresses and speeches are full of that genuine patriotism that catholicity of spirit and that keen insight into the practical affairs of the day which is indespensable to one who would help in legislating for the many-sided interests and often conflicting claims of the different parts and peoples of the Presidency.

२. पृष्ठ १५१ पहा.

त्याचप्रमाणें खोती बिलासारख्या अनेक बिलांचा विचार होत असतां त्यांनीं आपल्या ज्ञानाचा व विचाराचा लाभ देऊन बहुमोल सेवा केली. १८९७ सालच्या दुष्काळांत बाहेर गांवीं कामासाठीं गेल्यानंतर त्याठिकाणीं दुष्काळी कामें सुरू असलीं तर तीं जातीनें जाऊन पहाणें व तेथें एकंदर व्यवस्था कशी आहे त्याचा तपास करणें हीं कामें ते करीत असत. त्यामुळें कौन्सिलमध्यें दुष्काळासंबंधानें भाषण करितांना त्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं,

I have myself been in some of the Famine Districts and have been able to ascertain the popular opinion and the result of my enquiries has been that to the skill, wisdom and care of the famine administration in this Presidency, we owe the fact that there has not been a single death from starvation.

नारायणरावांचीं बजेटावरील भाषणें माहितीनें पूर्ण भरलेलीं अशीं असत. एकंदर कारभारामध्यें सुधारणा व्हावी ह्या हेतूनें त्यांची टीका होत असे. ते कौन्सिलचे सभासद असतांना अनेक प्रसंगीं कौन्सिलचे अध्यक्ष म्हणजे गव्हर्नर साहेब ह्यांनीं कौन्सिलचे सभासद ह्या नात्यानें जें कार्य नारायणरावांच्या हातून झालें त्याच्या चांगुलपणाबद्दल आपलें समाधान व्यक्त केलें. कौन्सिलचे सरकारी मेंबर सर चार्लस आलिव्हंट ह्यांनींही त्यांच्या कार्याबद्दल त्यांची मनःपूर्वक स्तुति केली होती. शेवटल्या वर्षी म्हणजे १९०० सालीं न्यूजंट साहेबांनीं सर्व बजेट तयार केलें, पण तें कौन्सिलपुढें येण्यापूर्वीच त्यांचा अंत झाला. कौन्सिलमध्यें न्यूजंट साहेबांविषयीं भाषण करितांना नारायणरावांनीं न्यूजंट साहेबांसंबंधाचा आपला अनुभव सांगितला. ते म्हणाले, कौन्सिलचें खरें काम सिलेक्ट कमिटींच्या बैठकींत होत असतें. कारण, सरकारच्या कौन्सिलच्या सभासदांचा व बिनसरकारी सभासदांचा तेथें निकट संबंध येतो व त्याचवेळीं सरकारी सभासदांच्या जबाबदारीची आमच्यासारख्यांना वास्तविक कल्पना होते. आणि त्या दृष्टीनें पहातां न्यूजंटसाहेब मोठे वाकब व शांतपणें काम करणारे अधिकारी होते असा मला अनुभव आला. त्यांच्यासारखा मोठा अधिकारी सरळ वृत्तीचा, पण दृढ निर्धारानें वागणारा असावा लागतो आणि तसे मि. न्यूजंट होते. पूर्वग्रहानें दृष्टि दूषित होऊं न देतां ते विषयाचा विचार करीत, विरुद्ध विचार शांतचित्तें ऐकून घेत व आपली चूक कबूल करावयास नेहेमीं सिद्ध असत. ते स्वतः खुल्या दिलाचे असल्यामुळें इतरांतील ती वृत्ति पाहून त्यांस समाधान होत असे, मात्र त्यांना असत्य, ढोंगीपणा, आढ्यता ह्यांचा अत्यंत तिटकारा असे. सभोंवार अत्यंत चिंताजनक स्थिति असली तरी आपली समाहित वृत्ति ढळूं न देतां, उलट आनंदी वृत्ति ठेवून ते कार्य करीत. एवढेंच केवळ नव्हे तर आपलीं भाषणें करितांना आपली बाजू मुद्देसूद पुढें मांडून त्यांत विनोदाची भर घालीत!

ह्याच वर्षीं बजेटवर भाषण करितांना त्यांनीं सरकारला एक फार महत्त्वाची सूचना केली व पुढें ती सूचना अमलांत आलीही. त्यांनीं त्या वर्षीं असें दाखवून दिलें कीं, शिक्षण व इतर खात्यांतील वरचे अधिकारी रजेवर गेल्यामुळें पगाराच्या बाबतींत बरीच बचत झाली आहे. रजेवर गेलेल्या लोकांचें काम त्यांच्या हाताखालील अगर त्या त्या खात्यांतील कमी पगाराच्या इसमांनीं केलें. कामें जशीं व्हावयास हवीं होतीं तशीं झालीं. पण सरकारला बचत झाली. म्हणून त्यांनीं अशी सूचना केली कीं गणितशास्त्रासारख्या विषयासाठीं विलायतेहून मुद्दाम प्रोफेसर आणण्याची व त्याला भारी पगार देण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. गणितशास्त्रासारख्या विषयांत आमच्या लोकांनीं उत्तम पारंगतता मिळविली आहे. त्यांनीं केलेल्या कामाबद्दल सर्वांनीं संतोष व्यक्त केला आहे.[१] एवढ्यावरून सर्व विषयांसाठीं देशीच प्रोफेसर असावेत असा माझा आग्रह आहे असा कोणी गैरसमज करून घेऊं नये. विशेषतः युरोपिअन प्रोफेसर्सच्या सहवासाचा, ज्ञानाचा व अध्यापनाचा मला लाभ झालेला असल्यामुळें मी तसें म्हणणें शक्य नाहीं. माझें म्हणणें असें आहे कीं, इंग्रजी, इतिहास, अर्थशास्त्र व तत्त्वज्ञान हे विषय शिकविण्यासाठीं नामांकित अध्यापक विलायतेहून आणिले पाहिजेत. संस्कृतचें तसें नाहीं. फार लांबची गोष्ट नाहीं. १८ वर्षांपूर्वीं लॅटिन, ग्रीक वगैरे भाषांचें ज्ञान असणारा इसम संस्कृतच्या जागेसाठीं विलायतेहून आणिला पाहिजे असें आमच्या सरकारला वाटत असे.[२] सरकारचे विचार ह्या बाबतींत आतां उदार झाले आहेत व आतां संस्कृत शिकविण्यासाठीं परदेशाहून अध्यापक आणावयाचा विचार सरकारला केव्हांही सुचणार नाहीं. गणितशास्त्राच्या बाबतींत तसेंच होवो म्हणजे झालें.

ह्याच वर्षीं लॉर्ड सँढर्स्ट ह्यांची कारकीर्द संपून लॉर्ड नॉर्थकोट ह्यांच्या कारकीर्दीस प्रारंभ झाला. लॉर्ड सँढर्स्ट ह्यांची कारकीर्द विशेष महत्त्वाची झाली. कारण, दुष्काळ व प्लेग ह्या दोन आपत्तींनीं इलाखाभर कहर उडविला. विशेषतः प्लेगनें सर्वांस जेरीस आणिलें. ग्रंथियुक्त तापाचा हिंदुस्थानांत अनुभव नसल्यामुळें सरकार व प्रजा ह्यांस भांबावल्यासारखें झालें तर त्यांत आश्चर्यकारक असें कांहीं नाहीं. १८९७–९८ ते १८९९–१९०० ह्या तीन सालांत प्लेगसाठीं जवळजवळ १ क्रोड रुपये वरिष्ट सरकारनें खर्चासाठीं दिले होते. दुष्काळ व प्लेग ह्यांसंबंधाचा अनुभव ताजा असतांनाच लॉर्ड सँढर्स्ट ह्यांची कारकीर्द संपली त्यावेळीं त्यांचा निरोप घेतांना कौन्सिलांत गोकुळदास पारेख, इब्राहिम रहिमतुल्ला, बमनजी पेटिट, रा. ब.

१. प्रो. फरदुनजी दस्तूर ह्यांस उद्देशून हे उद्गार होते. प्रो. दस्तूर ह्यांना पुढें प्रोफेसरची जागा देण्यांत आली.

२. डॉ. पीटरसन ह्यांच्या नेमणुकीस उद्देशून हे उद्गार आहेत.

चुणीलाल वेणीलाल व नारायणराव यांचीं भाषणें झालीं. हीं सर्व भाषणें अध्यक्ष ह्या नात्यानें लॉर्ड सँढर्स्ट ह्यांच्या वागणुकीसंबंधानें स्तुतिपर होतीं. नारायणरावांनीं असें सांगितलें कीं, अध्यक्षांनीं आम्हांला आपलें म्हणणें कौन्सिलपुढें ठेवावयास पूर्ण सवलती दिल्या. आम्ही जें कांहीं बोलूं तें ते शांतपणें ऐकून घेत, कधीं चिडत नसत. आमच्यासारख्या सभासदांच्या सोई गैरसोईचा विचार करीत. आम्ही आमचीं गाऱ्हाणीं त्यांच्यापुढें ठेविलीं असतां त्यांचा ते सहानुभूतिपूर्वक विचार करीत. अशा प्रकारें अनेक सभासदांनीं एकामागून एक लॉर्ड सँढर्स्ट ह्यांच्या कारकीर्दीसंबंधानें स्तुति केली. ह्याच ठिकाणीं नारायणरावांनीं लॉर्ड सँढर्स्ट ह्यांच्या स्मरकासंबंधाच्या सभेंत केलेल्या भाषणाचा विचार करणें युक्त होईल. आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या दोन वर्षांत त्यांनीं जीं कार्यें केलीं त्यांयोगें त्यांची गणना अत्यंत लोकप्रिय गव्हर्नरांमध्यें त्यावेळीं होत असे. येथें आल्यानंतर कॉरपोरेशनचे अध्यक्ष मि. अबदुल्ला धरमसी ह्यांच्याशीं वाटाघाट करून म्युनिसिपालिटी व पोलिस चार्जिसचा प्रश्न त्यांनीं सोडविला. सेंट्रल डिव्हिजनतर्फे कौन्सिलमध्यें एक सभासद असावा अशी पुष्कळ दिवसांची विनंति त्यांनीं कांहीं हरकत न घेतां मान्य केली. १८९४ च्या दंग्यानंतर पुण्यावर जो जादा पोलिसबद्दल आकार होत असे तो रद्द केला. त्यांनीं इस्पितळें पाहिलीं, मराठी शाळांस भेटी दिल्या, गरीब लोकांच्या वस्तींतून ते फिरले आणि पुष्कळ प्राथमिक शाळा घाणेरड्या घरांत आहेत, हवा व उजेड तेथें पुरेशीं नाहींत हें पाहून त्यांनीं पन्नास हजार रुपयांची ग्रँट प्राथमिक शिक्षण फंडाकडे दिली. दोघां हिंदी गृहस्थांना कलेक्टर नेमलें; रायगड येथें सार्वजनिक शिवाजी उत्सव करण्यास परवानगी दिली व बद्रुद्दिन तय्यबजी ह्यांची हायकोर्टच्या न्यायाधिशाच्या जागीं नेमणूक केली. पण त्यानंतर दुर्दैवाच्या फेऱ्यानें आपल्या इलाख्याला गांठलें. लॉर्ड सँढर्स्ट ह्यांच्या कारकीर्दीचा विशेष हा होता कीं, बिकट आपत्तीच्या वेळीं धैर्यानें पण सहानुभूतिपूर्वक त्यांनीं सर्व कारभार करून दाखविला. प्लेगनें जेव्हां कहर उडविला तेव्हां सरकारला फुकटचा उपदेश करणाऱ्या लोकांसही ऊत आला! कोणी म्हणावें, सर्व व्यवस्था सरकारनें आपल्या हातीं घ्यावी; कोणी सांगूं लागले, सगळ्या शहराला आग लावा! कोणी सूचना केली कीं, शहराच्या भोंवतीं लष्करी पहारा ठेवावा; कोणी म्हणूं लागले कीं सरकारनें आपलें ठाणें येथून उठवावें व तें कराची अगर सुरत येथें न्यावें, मागें शहराचें काय व्हावयाचें असेल तें होईल! अशा वेळीं लॉर्ड सँढर्स्ट स्वतः भांबावून गेले नाहींत. त्यांनीं म्युनिसिपालिटीला आपली शिकस्त करण्यास पूर्ण वाव दिला व परळ येथील गव्हर्नमेंट हाऊस प्लेगच्या रोग्यांच्या शुश्रूषा करण्यासाठीं म्युनिसिपालिटीच्या हवालीं केलें. परंतु पांचसहा महिने होऊन गेले, प्लेगचें मान

वाढत चाललें, सर्व शहर ओसाड व भयाण दिसूं लागलें, व्यापार बंद पडला, लोक अत्यंत हवालदिल झाले असें पाहून त्यांनीं जनरल गॅटकर ह्यांस मुख्य नेमून एक प्लेग कमिटी नेमली व १८९७ च्या जूनमध्यें ते स्वदेशीं जाईपर्यंत ह्या कमिटीनें पुष्कळ चांगलें काम केलें म्हणून त्या प्लेग कमीटीकडेच पुढल्या वर्षींही त्यांनीं प्लेग-संबंधाची व्यवस्था सोंपविली. परंतु ही १८९८ ची कमिटी लोकप्रिय झाली नाहीं. तिच्या विरुद्ध पुष्कळ तक्रारी आल्या व त्यांची चौकशी गव्हरनरसाहेब करूं लागले; एकदमच त्यांना ही कमिटी मोडतां येईना. परंतु सोल्जर लोकांनीं पुष्कळ अनर्थ केला असल्यामुळें त्यांस दूर केल्यावांचून लोकांत शांतता स्थापन होणार नाहीं असें त्यांना कळवितांच त्यांनीं सोल्जरांस कामावरून काढलें व नंतर निवडक लोकांना गव्हर्नमेंट हाऊसमध्यें बोलावून लोकांच्या काय तक्रारी आहेत त्या ऐकून घेऊन त्या ते दूर करूं लागले.[१] त्याचप्रमाणें दंग्यानंतर त्यांनीं टाऊन हॉलच्या सभेंत असें स्पष्ट सांगितलें कीं, लोकांच्या खऱ्या तक्रारी असल्या म्हणजे त्यांच्या म्हणण्या-प्रमाणें करणें हें दुबळेपणाचें लक्षण नसून त्याच्या उलटच आहे.[२] आपल्या ठरलेल्या धोरणाविरुद्ध कृति आहे, म्हणून ती करावयाची नाहीं असा विचार त्यांस शिवला नाहीं. त्यांनीं लोकांचीं गाऱ्हाणीं ऐकून घेऊन उपाययोजना करण्यासाठीं कोर्टाची स्थापना केली व अधिकाऱ्यांना सर्व प्रकारची मदत देण्यासाठीं लोकां-पैकींच स्वयंसेवक नेमिले. त्याचा परिणाम सर्वांस लाभदायक असाच झाला. बिकट संकटाच्या वेळीं डोकें शांत ठेवून ते वागले. झालेली चूक कबूल करून लोकांच्या गरजा व अडचणी समजून घेण्याचा त्यांनीं प्रयत्न केला व त्यामुळें आज मुंबईची

---

१ The moment it was represented to Lord Sandhurst that the employment of soldiers was creating a great deal of irritation in the native community he arranged for a conference of certain native gentlemen and the President of the Plague Committee and as a result of that conference ordered the soldiers to be withdrawn. He then set himself to the task of inviting representative native gentlemen to the Government House with the view of ascertaining what the people's grievances were and he had been in consultation with them arranging to remedy before the riots broke out.

२ Lord Sandhurst, with a candour and dignity worthy of his high office, publicly declared that in his opinion to yield when the people had a real grievance was a mark of strength, not of weakness.

स्थिति व्यापाराच्या दृष्टीनें खालावलेली नाहीं ह्याचें सर्व श्रेय लॉर्ड सँढर्स्ट ह्यांसच आहे.[1]

१८९६–९७ सालचा दुष्काळाचा कारभार फार व्यवस्थित व चांगल्या रीतीनें सहानुभूतिपूर्वक करण्यांत आला हें सर्वांस मान्य आहे. १८७६–७७ सालच्या दुष्काळाच्या वेळीं पुष्कळ खेडीं सोडून लोक चालते झाले, १८९६–९७ सालच्या दुष्काळांत एकही खेडें अशा प्रकारें ओसाड पडलें नाहीं. मागच्या दुष्काळांत ३½ लक्ष एकर शेती जमीन लोकांनीं सोडून दिली, पण १८९६–९७ सालच्या प्रसंगीं अशा प्रकारें जमीन सोडल्याचें उदाहरण नाहीं. जिकडे तिकडे दुष्काळी कामें सुरू करण्यांत आलीं होतीं, जेथें जेथें मदतीची आवश्यकता होती तेथें ती देण्यांत आली, तकावीच्या रूपानें साडेतीस लक्ष रुपयांची मदत देण्यांत आली. गुरें ढोरें विकत घेण्यासाठीं शेतकऱ्यांना उदारहस्तें मदत झाली, ह्या सर्व गोष्टी कोणासही अमान्य नाहींत. १८९६ च्या डिसेंबर महिन्यांत जाहीर सभा बोलावून वर्गणी गोळा करण्याच्या कार्यास सुरवात झाली. ज्यानेवारी महिन्यांत दुष्काळपीडित जिल्ह्यांत दौरा काढला व सर्व स्थिति लॉर्ड सँढर्स्ट स्वतः पाहून आले व तेवढ्यानेंच तृप्त न होतां पुन्हा पुढल्या मार्चमध्यें दौरा काढून त्या भागांतील व्यवस्था त्यांनीं स्वतः पाहिली व विजापूर जिल्ह्यांतील दुष्काळी अधिकाऱ्यांशीं विचारविनिमय केला. ह्याचा परिणाम असा झाला कीं, लोकांस योग्य वेळीं सहाय्य मिळालें; हजारों लोकांचे प्राण वांचले, आणि विजापूर जिल्ह्यांतील मुख्य दुष्काळी अधिकारी जेव्हां परत जावयास निघाले त्यावेळीं हजारों लोक शहरांत त्यांच्या जावयाच्या रस्त्यांत एकत्र झाले व ज्यानें आपल्यावर आईप्रमाणें अगर बापाप्रमाणें प्रेम केलें असा अधिकारी आपल्याला सोडून जात आहे म्हणून लोक ढळढळां रडले![2] प्लेगच्या वेळीं ज्या चुका झाल्या त्यांवर नारायणरावांनीं झांकण घालण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्या झाल्या त्याबद्दल लॉर्ड सँढर्स्ट ह्यांस खेद वाटला व त्या त्यांच्या ध्यानांत येतांच त्यांनीं उपाययोजना ताबडतोब केली हें त्यांनीं दाखवून दिलें.

---

१. Never sensitive to criticism accessible to all- kind and genial he has borne himself with a coolness of head and a cheerfulness of heart which has enabled him to preserve the name, the reputation and the trade of Bombay.

२. When the Famine Officer of the district left the district thousands of men and women and children lined the streets and cried, because he whom they considered their father and mother was leaving them. हे त्या वेळचे दुष्काळी कामदार डॉ. पोलन होत.

# अध्यक्ष व न्यायमूर्ति

१९०० सालांत नारायणरावांच्या चरित्रांत दोन फार महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. ह्या पूर्वी दाहा वर्षें राष्ट्रीयसभेच्या बैठकांस हजर राहणें त्यांस जमलें नाहीं. मात्र ह्याचा अर्थ त्यावेळच्या राजकारणावरून त्यांचें मन उडालें होतें असा नव्हे. ह्यावेळीं ते प्रेसिडेन्सी ॲसोशिएशनचे सेक्रेटरी होतेच. अर्थात सेक्रेटरी ह्या नात्यानें राजकारणांत त्यांस मन घालावेंच लागे. शिवाय १८९६ सालीं प्रांतिक परिषदेचें अध्यक्षस्थानही त्यांनीं स्वीकारिलें होतें. तथापि त्यावर्षी अगर पुढल्या तीन वर्षांच्या राष्ट्रीयसभेच्या अधिवेशनांत ते हजर नव्हते. असें असून १९०० सालीं लाहोर येथें भरणाऱ्या राष्ट्रीयसभेचें अध्यक्षस्थान जेव्हां त्यांस देण्यांत आलें तेव्हां ते प्रथम मोठ्या बुचकळ्यांत पडले. राष्ट्रीयसभेच्या मंडपांत आपली सतत दहा वर्षांची गैरहजेरी असूनही ज्या अर्थी देश आपल्यावर विश्वास ठेवून हें कार्य करण्याची संधि देत आहे, त्याअर्थी देशाची आज्ञा मान्य करून जबाबदारी स्वीकारणें हें आपलें कर्तव्य होय असा विचार करून त्यांनीं अध्यक्षपद स्वीकारलें व आपल्या भाषणाच्या प्रारंभींच अशा आशयाचे उद्गारही काढले.[1] आणि इकडे अध्यक्षीय भाषणाची तयारी झाल्यानंतर हायकोर्टाचे चीफ जस्टिस मि. लॉरेन्स जेन्किन्स ह्यांनीं त्यांना बोलावून विचारिलें कीं, तुम्ही राष्ट्रीयसभेचे अध्यक्ष होणार आहां हें सरकारला माहित आहे. सरकारच्या मनांतून न्या. मू. रानडे ह्यांच्या रजेंत तुमची नेमणूक करावी असें आहे, तरी ही जागा पत्करण्यास तुम्ही तयार आहां काय ? नारायणरावांनीं त्याचवेळीं उत्तर दिलें नाहीं. कांहीं दिवसांनीं उत्तर दिलें कीं, गव्हर्नरसाहेबांच्या इच्छेनुसार मी जागा पत्करावयास तयार आहें. दोन आठवडे त्यांनीं काम केलें नाहीं तों न्या. मू. रानडे ह्यांचा आकस्मिक रीतीनें अंत झाला. नंतर त्यांस पुढें कायम करण्यांत आलें. वकील व न्यायमूर्ति ह्या नात्यानें त्यांच्या कारकीर्दीचें सविस्तर वर्णन स्वतंत्र प्रकरणांत झालेंच आहे. पुढल्या तेरा वर्षांच्या काळांत प्रत्यक्ष राजकारणाचा व त्यांचा कांहीं संबंध आला नाहीं. कायदे कौन्सिलमध्यें १८९९ सालीं त्यांची फेरनिवडणूक झाली होती. त्या जागेचा, त्याचप्रमाणें प्रेसिडेन्सी ॲसोशिएशनच्या सेक्रेटरीचा न्यायमूर्ति होतांच त्यांनीं राजीनामा दिला. परंतु ह्या काळांत त्यांचें दुसरें काम प्रमाणाबाहेर वाढलें असें म्हणणें भाग आहे. न्यायमूर्ति रानडे ह्यांचें सामाजिक परिषदेचें काम त्यांनीं घेतलेंच; शिवाय दुसरीं पुष्कळ कामें त्यांनीं आपण होऊन घेतलीं व कांहीं त्यांस करावीं लागलीं. न्यायमूर्ति असतांनाच

---

१. त्यांच्या अध्यक्षीय भाषणाचें साधारण स्वरूप ‘ राजकारण ’ ह्या प्रकरणांत पहावयास मिळेल.

१९०२ व नंतर १९०६ सालीं त्यांची एज्यूकेशन कमिशनवर नेमणूक झाली. युनि-र्सिटीच्या कामांत कौन्सिलचे मेंबर व सेनेटचे सभासद ह्या नात्यानें पूर्वी ते मन घालीत. १९०६ सालीं अस्पृश्यता-निवारक मंडळीची स्थापना झाली. श्री. विठ्ठल-राव शिंदे ह्यांनीं अस्पृश्यता निवारण्याच्या बाबतींत जी प्रचंड सेवा केली व जें लोकजागृतीचें काम केलें तें सर्व नारायणरावांच्या देखरेखीखालीं झालें. न्यायमूर्ति झाल्यानंतर ते सिंडिकेटचे एक मेंबर झाले व तेथें ते केवळ भूषण म्हणून नव्हते. जो प्रश्न आपल्यापुढें येईल त्याचा पूर्ण विचार करून आपलीं मतें ते लिहून काढीत व त्यांचा त्या त्या विषयाच्या वादाच्यावेळीं पुष्कळ उपयोग होत असे. लॉर्ड नार्थकोटच्या कारकीर्दींत जो दिल्लीदरबार झाला त्यावेळीं त्यांचेच पाहुणे ह्या नात्यानें त्यांस आमंत्रण होतें. डॉ. सेल्बी व्हाइस चॅन्सलर असतांना सर्व बाबतींत नारायणरावांचें त्यांस भरपूर सहाय्य मिळत असे. डॉ. सेल्बी ह्यांना LL. D. ही बहुमानाची पदवी अर्पण करितांना त्यांची ओळख करून देण्याचें काम नारायणरावांवरच सिंडिकेटनें सोंपविलें होतें. त्यावेळीं एक तत्त्वज्ञ, उत्तम अध्यापक, प्रिन्सिपॉल व शिक्षणशास्त्रज्ञ ह्या नात्यानें डॉ. सेल्बी ह्यांची योग्यता किती थोर आहे हें आपल्या भाषणांत नारायणरावांनीं दाखविलें. पुढें नारायण-रावांचीच युनिव्हर्सिटीच्या व्हाइस चॅन्सलरच्या जागीं सर जॉर्ज क्लार्क ह्यांनीं नेमणूक केली. त्यावेळच्या त्यांच्या कार्याची कल्पना स्वतंत्र रीतीनें करून दिलेली आहे. न्यायमूर्ति असतांनाच स्टूडंट्स ब्रदरहूड, सोशल सर्व्हिस लीग, होलिका सम्मेलन कमिटी, अस्पृश्यतानिवारक मंडळी, सोशल रिफॉर्म ॲसोशिएशन, स्टूडंट्स लिट-ररी ॲंड सायंटिफिक सोसायटी, चिल्ड्रन्स ॲड सोसायटी, प्राणी दुःखनिवारण मंडळी, जे. जे. हॉस्पिटलची नर्सिंग ॲसोशिएशन, रायल एशियाटिक सोसायटी वगैरे संस्थांशीं त्यांचा कमीअधिक संबंध आला. १९०७ पासून १९१३ पर्यंत ते रॉयल एशिआटिक सोसायटीच्या मुंबईच्या शाखेचे अध्यक्ष होते. नंतर पुन्हा १९१९ सालीं त्यांची निवडणूक झाली व अखेरपर्यंत म्हणजे १९२३ पर्यंत ते अध्यक्ष होते. इतक्या संस्थांशीं निकट संबंध ठेवून प्रार्थनासमाजाच्या अध्यक्षाचें काम, बाहेरच्या वर्तमानपत्रांसाठीं लेख लिहिणें, इंडियन सोशल रिफॉरमर व सुबोधपत्रिका यांसाठीं सामाजिक व आध्यात्मिक विषयांवर लेख लिहिणें व प्रार्थनामंदिरांत उपासना वारंवार चालवून अनुभवानें ओथंबलेलीं धर्मपर व्याख्यानें देणें, अनेक ग्रंथांचें वाचन सतत चालू ठेवणें, व वाचलेल्या पुस्तकांतील विशेष भाग स्वहस्तें उतरून ठेवणें अगर त्याचा सारांश लिहिणें, सर्व पत्रव्यवहार स्वतः करणें, इ० कामें जातीनें करावयास त्यांस फुरसूद सांपडे ! Tooka's Tool असें नांव धारण करून A Wrestling Soul ह्या सदराखालीं जेव्हां ते लेख लिहीत तेव्हां

दर आठवड्यास ठरलेल्या दिवशीं ते लेख संपादकाकडे येत एवढेंच केवळ नव्हे, तर कधीं दोन दोन अंकांचा मजकूर येत असे !

## सर झाल्यानंतर.

अशा प्रकारें त्यांचें लोकसेवेचें कार्य चालू असतांना १९१० सालीं ता. १ ज्यान्युआरी रोजीं त्यांस बादशहांनीं सर हा बहुमानाचा किताब दिला. ह्या वर्षी बादशहा अशाप्रकारें आपला सन्मान करणार आहेत याची त्यांना कांहीं कल्पना नव्हती. त्यांचे मित्र श्री. नटराजन ह्यांचेपाशीं मि. बेहरामजी मलबारी यंदा नारायणरावांस नाइटहूड मिळण्याचा संभव आहे असें बोलून गेले होते. पण हा केवळ तर्क होता, नारायणरावांनीं त्यास कधींच महत्त्व दिलें नव्हतें व ह्या वाऱ्या-वरील बातमीचा त्यांना पूर्ण विसरही पडला होता. परंतु ता. ३१ डिसेंबर १९१० रोजीं रात्रौ १० वाजतां त्यांना त्यांच्या भय्यानें एक तार आणून दिली, ती व्हाइसरायच्या कडून होती व तींत बादशहांनीं त्यांना सर केल्याचें वृत्त होतें ! सर नारायण ह्यांनीं ह्या बहुमानाची अपेक्षा केली नव्हती एवढेंच केवळ नव्हे तर तिकडे त्यांचें लक्षच नव्हतें.

मानसन्मान ह्यांच्याद्वारें मला समाधान वाटेनासें झालें आहे, अशा अर्थाच्या त्यांच्या उद्गारांचा[१] खरेपणा सर हा किताब मिळाल्यानंतर विशेष रीतीनें प्रत्ययास आला. बहुमान मिळाल्याचें जाहिर होतांच व्हाइसराय, गव्हर्नर्स, राजे, महाराजे, सर-दार, उमराव, हायकोर्ट जज्जीस, कलेक्टर्स, श्रीमंत व गरीब माणसें, स्वधर्मी व विधर्मी लोक ह्यांचेकडून आलेल्या अभिनंदनपर तारांचा व पत्रांचा नारायणरावांवर पाऊस पडला. आणि सर्वांना नारायणरावांनीं एकतर स्वहस्तें उत्तरें पत्रें लिहून अगर स्वहस्तें तारा पाठवून दिलीं ! तथापि हा बहुमान प्राप्त होतांच एका विशिष्ट दिशेनें त्यांचें विचारचक्र सुरू झालें होतें ! ता. ३१ डिसेंबर रोजीं रात्रीं जेव्हां ही तार आली त्यावेळीं त्यांच्या मनांत एक विशेष विचार घोळत होता. त्यापूर्वी त्यांनीं बायबलमधील विशिष्ट भाग वाचला होता, येशू ख्रिस्त भेटावयास येणाऱ्या प्रत्येक पुरुषाला अगर स्त्रीला भेटला व प्रत्येक व्यक्तीशीं त्याचा त्याचा मगदूर जाणून सहानुभूतिपूर्वक भाषण त्यानें केलें व हें कोणीं इसम विरोधक असला तरी सुद्धां त्यानें केलें. ह्या प्रसंगावर पुढील विचार

Here I said was a lesson for us–to put ourselves in the situation of those whom we wish to reform and idealise that situation.

---

१ मि. नाईट ह्यांस उत्तर देतांना हे उद्गार काढले असून त्यांचा उल्लेख ताई महाराज प्रकरणाच्या अखेरीस पृ. १९४ वर आढळेल.

नारायणरावांच्या मनांत घोळत असतांना व्हाइसराय साहेबांची तार आली ! लॉर्ड बिषप ह्यांच्या अभिनंदनपर पत्रास उत्तर[१] देतांना नारायणराव म्हणतात :—

This experience has been suggestive to me and I hope and pray that it may have a beneficial influence on my thoughts and actions in life.

परंतु ह्याहीपेक्षां बंगालचे चीफ जस्टीस सर लॉरेन्स जेन्किन्स व न्या. मू. चौधरी ह्यांना उद्देशून त्यांनीं जीं पत्रें लिहिलीं आहेत त्यांतील विचार हृदयस्पर्शी आहेत. सर लॉरेन्स ह्यांना लिहिलेल्या पत्रांत नारायणराव म्हणतात "दोन प्रकारें ह्या पदवीमुळें मी चकित झालों आहें. एक तर अशा प्रकारची पदवी मिळेल अशी अपेक्षा नसतांना ती मला मिळाली आहे. आणि दुसरें, आणि त्याबद्दल खरोखर मला फार आश्चर्येही वाटत आहे तें अशासाठीं कीं सर्व जातींच्या, धर्मांच्या व सर्व प्रकारच्या लोकांना मला मिळालेल्या पदवीमुळें मोठें समाधान वाटत आहे. खरें पहातां मी लोकांमध्यें फारसा मिसळणारा मनुष्य नाहीं आणि मला मित्र जोडतां येत नाहींत ह्याबद्दल मी आजपर्यंत स्वतःलाच दोष देत आलों आहें. विशेषतः सामाजिक व धर्मविषयक बाबतींत आणि कधीं कधीं राजकीय बाबतींतही माझ्या भाषणांच्या द्वारें मी लोकांस नाराज केलें आहे आणि असें असून सर्व दर्जाच्या व सर्व स्थितींतील व सर्व मतांच्या लोकांकडून अभिनंदनपर पत्रांचा व तारांचा मजवर सारखा वर्षाव होत आहे ! आपल्याला वाटतें त्याच्यापेक्षां आपल्या सभोंवतालचें जग किती चांगलें आहे त्याची अशा वेळीं कल्पना होते.[२]न्या. मू. चौधरींना लिहिलेलें पत्र अशाच स्वरूपाचें आहे. त्यांतही स्वतःचा Unsociable

---

१. मिसेस ॲन्डरसन ह्यांच्या पत्रास उत्तर देतांनाही अशीच हकीकत नारायण-रावांनीं लिहिली आहे.

२. This honour has been a revelation to me in two ways: I did not expect it and it has come. But what has surprised me more than that is the infinite gratification it seems to have afforded among all castes, classes and creeds. I have not been a sociable man and have always cursed myself that I have not the nack of making friends. I have often displeased people by my utterances in public especially in religious and social matters and also sometimes on political questions. But now I have been simply overwhelmed with letters and telegrams from people of all creeds and sects and shades of opinion. Oh ! How kinder the world is than we take it to be !

nature माणसांत मिळून मिसळून वागण्याचा कंटाळा व तुटकपणा Brisque manners ह्यांचा उल्लेख आहे. पण ह्या पदवीनें मला माझा फार जुना मित्र मिळवून दिला हा मोठा उपकार केला असें म्हटलें आहे![1] पदवी मिळाल्याची बातमी जाहीर होतांच ता. १ रोजीं सकाळीं प्रार्थनासमाजाचे कांहीं सभासद त्यांच्याच घरीं एकत्र झाले व घरीं एक लहानशी उपासना झाल्याचें नारायण-रावांनीं नमूद करून ठेविलें आहे.

आणखी एका पत्राचा येथें उल्लेख करण्यासारखा आहे. नारायणरावांना मुंबईत आणिल्यानंतर त्यांच्या मामांनीं त्यांना प्रथम सेंट मेरी स्कूलमध्यें घातलें हें प्रसिद्ध आहे. खरें पहातां हा संबंध जरी अल्पकाळ होता तरी त्याचा विसर स्वतः नारायणरावांना पडला नाहींच, पण त्या संस्थेला व जुन्या विद्यार्थ्यांनाही पडला नाहीं. १९१० सालीं सेंट मेरीचे फादर शेफर ( For Schaefer) प्रमुख होते त्यांचें अभिनंदनपर पत्र आलें त्यास नारायणरावांनीं उत्तर देतांना म्हटलें आहे कीं, आपलें अभिनंदन म्हणजे आपल्या संस्थेच्या एका जुन्या शिष्याला आशीर्वादच होय असें मी समजतों. कारण, आपल्या संस्थेनें माझ्या मनावर केलेला परिणाम मी केव्हांही विसरणें शक्य नाहीं. ती स्मृति माझ्या अंतःकरणांत ताजी असते.[२]

ह्या वेळीं अनेक संस्थांनीं सर नारायण व सौ. लेडी लक्ष्मीबाई ह्यांचा सन्मान केला, अनेक संस्थांच्या वतीनें पानसुपारीचे समारंभ झाले. परंतु १४ मार्च १९१० रोजीं स्टूडंट्स ब्रदरहूडच्या वतीनें मान[३]पत्र अर्पण करण्यासाठीं झालेला

---

१. १८८५ सालीं नारायणराव विलायतेस गेले त्यावेळीं मनमोहन घोषमुळें नारायणरावांची व मि. चौधरी ह्यांची मैत्री जमली. दोघेही ब्राह्मधर्मानुयायी. पण पुढें त्यांचा संबंध आला नाहीं. नारायणराव सर झाल्याचें कळतांच चौधरींनीं फार प्रेमळ पत्र लिहिलें; त्यास उत्तर देतांना But above all the knighthood has brought a friend to me and that is your good self. That is a gain which I value highly I assure you असे उद्गार नारायणरावांनीं काढले आहेत.

२ I regard your congratulations and good wishes as blessings given to an old pupil of your Institute whose influence on me has never faded and which I cherish fondly in the warmest corner of my heart. 5-1-10

३ सदरहू मानपत्रांतील कांहीं भाग पुढें दिला आहे:—

Your kindness of heart, your sweetness of disposition, your

समारंभ चिरस्मरणीय होय. ब्रदरहूडची सेवा त्यावेळेपर्यंत नारायणरावांनीं जी केली होती ती ध्यानांत घेऊन बहुमानाचा किताब मिळाल्याची संधी साधून हें मानपत्र अर्पण करण्याचें ठरविण्यांत आलें व त्यासाठीं हिंदुस्थान सरकारची परवानगी घेण्यांत आल्यावर सर जॉर्ज क्लार्क ह्यांच्या अध्यक्षतेखालीं हा समारंभ पार पडला. हें मानपत्र सुंदर नकशी केलेल्या रुपेरी करंड्यांत घालून दिलें होतें व त्यांत सर नारायण ह्यांच्या कित्येक गुणांचा, त्यांच्या लोकसेवेचा, त्यांच्या शीलाचा व ब्रदर-हूडच्याद्वारें शीलसंवर्धनार्थ त्यांच्याकडून झालेल्या प्रयत्नांचा उल्लेख होता. ह्या मान-पत्रास उद्देशून बोलतांना अध्यक्षांनीं म्हटलें होतें कीं, सर नारायणराव ह्यांच्या ज्या गुणांचें वर्णन मानपत्रांत करण्यांत आलें आहे त्यांची योग्यता मी पूर्णपणें जाणून आहें. कारण, त्यांच्या व माझ्या परिचयाचे अनेक प्रसंग आले आहेत त्यावेळीं त्या गुणांचा मला स्वतः अनुभव आलेला आहे व त्यावेळीं अनेक विषयांवरील त्यांच्या विचारांचीही उत्तमप्रकारें ओळख झाली आहे. त्यामुळें माझा मोठा फायदा झालेला असल्या-मुळें त्यांची गाढ विद्वत्ता, त्यांचा सारासारविचार, त्यांची उदार वृत्ति, त्यांचा दयाळू स्वभाव ह्या गुणांच्याद्वारें सर्व मंडळींत ते लोकप्रिय व आदरणीय व्हावेत

---

courtesy of manner towards all, high and low, rich and poor alike, your earnest and manifest interest in the well-being of your fellow-citizens, irrespective of race, class or creed, have endeared you to all sections of the community and have made them feel a peculiar sense of participation in your honour and exaltation and as if in you it was their city that was honoured and exalted...

With the Students' Brotherhood your connection has been peculiarly close and honourably you have served and helped this society in numerous ways. For a number of years you gave it the benefit of your teaching, a teaching so full of suggestion, inspiration and stimulus. As its President, you have largely contributed to its prestige and influence. Above all your life of stainless purity and high endeavour is an example and an inspiration to all its members. The Brotherhood can never adequately repay the debt of gratitude it owes to you; but on an occasion like the present when the entire community is expressing its gratification at your elevation to the order of knighthood, it is our delight as well as duty not only to join in the general rejoicing but also to express our peculiar sense of joy and satisfaction.

हें साहजिक आहे.[१] केवळ एक उत्तम, कर्तव्यदक्ष, शहाणे न्यायाधीश ह्या नात्यानेंच त्यांची आठवण कायम राहणार नाहीं. आजच्याकाळीं ह्या देशाला खऱ्या मार्गदर्शकांची फार आवश्यकता आहे. त्यांच्या योग्यतेचीं माणसें आज देशांत फार थोडीं आहेत. सर्व वेळीं योग्य सल्ला देणारे उत्तम मार्गदर्शक व मुंबईचे एक अत्यंत थोर रहिवाशी One of the greatest citizens of Bombay अशा स्वरूपानें ते सदैव ओळखले जातील.

ह्या मानपत्रास सर नारायण ह्यांनीं दिलेलें उत्तर आत्मपरिक्षणपर होतें. 'माझ्यावर आज जो स्तुतीचा वर्षाव झाला आहे तो पाहून मला कॉलेज सोडतांना प्रो. वर्डस्वर्थ ह्यांनीं जो उपदेश केला त्याची आठवण झाली. स्तुति केली कीं तिकडे दुर्लक्ष करावें! स्तुति लागू नाहीं म्हटलें तर तिचेसंबंधानें चर्चा करावी लागते व मौन धरिलें तर ती पत्करल्यासारखें होतें! परंतु असले प्रसंग मला नेहमीं आत्मसंशोधनास प्रवृत्त करितात. मेरी कारपेंटरनें आपल्या एका व्याख्यानांत स्त्रियांची उन्नति व विशेषतः विधवांची स्थिति सुधारणें ह्या विषयाकडे सुशिक्षित लोकांनीं लक्ष देण्याची आवश्यकता डोळ्यांत आंसवें आणून ज्यावेळीं प्रतिपादिली तो प्रसंग मला आठवतो. ह्या कार्याला स्वतःला वाहून घेण्याचा मीं निश्चय केला. पण तें कार्य माझ्या हातून जसें व्हावयास पाहिजे होतें तसें झालें नाहीं ह्याची जागृति मला आहे. माझ्या हातून जे अल्पस्वल्प प्रयत्न झाले असतील त्यांस आलेल्या यशाचा विचार करितां माझ्या दोषांची मला आठवण होते. कित्येक सामाजिक प्रश्नांकडे आम्ही विशेष लक्ष पोंचविल्यावांचून आमच्या बाकीच्या चळवळी व्यर्थ होणार आहेत असाही विचार मनांत येतो. ह्या बाबतींत जेव्हां मी लोकांना दोष देतों तेव्हां मी देखील स्वतः दोषाचा वाटेकरी असतोंच.'

## अस्पृश्यतानिवारण पहिली परिषद्

ह्या चरित्राच्या पृ. २२९ वर आर्यन ब्रदरहूड ह्या संस्थेच्या विद्यमानें सर्व जातींचें जें सहभोजन झालें त्याचा उल्लेख आहे. येथें हें उल्लेखनीय आहे कीं,

१ I well understand how surely his great knowledge, sobriety of judgment, broad sympathies and true kindness of heart have endeared him to all communities. Taking into consideration all varied elements which combine to make the higher life of modern Indian Society, it is probably not too much to say that Sir Narayan has made himself the foremost Indian citizen of Bombay.

१९१२ सालींच गुरुवर्य डॉ. रामकृष्णपंत भांडारकर ह्यांच्या अध्यक्षतेखालीं पुणें येथें आक्टोबर महिन्यांत तीन दिवस **अस्पृश्यता निवारण** परिषद फर्ग्युसन कॉलेजच्या अँफी थिएटरमध्यें भरली होती. ह्या परिषदेंत डॉ. कुर्तकोटी व इचलकरंजी संस्थानाधिपति ह्यांनीं भाग घेतला होता. त्यावेळीं बाहेर गांवाहून आलेले सर्व जातींचे पाहुणे व प्रतिनिधी ह्यांनीं कोणत्याही प्रकारें जातिभेद न पाळतां पाहुणचार घेतला. जें मुख्य सहभोजन झालें त्यांत ३५० 'अस्पृश्य' वर्गाचे आणि ५० ब्राह्मण वगैरे 'उच्च'वर्गाचे पाहुणे होते. ही सर्व मंडळी एकाच पंक्तीस बसली होती.

सर नारायणराव १९१३ सालीं हायकोर्ट जज्जाच्या जागेचा राजीनामा देऊन व येथील पेन्शन घेऊन इंदुरास चीफ मिनिस्टर ह्या नात्यानें गेले हें सर्वश्रुत आहे. त्यापूर्वी एकदां त्यांस इंदूरचें बोलावणें आलें होतें. परंतु इकडली नोकरी अपुरी सोडून तिकडे जाणें हितकर नाहीं असें ठरल्यामुळें त्यांनीं त्यावेळीं जाण्याचें नाकारलें. परंतु पुढें महाराजसाहेबांनीं येथें येऊन त्यांची गांठ घेऊन जेव्हां त्यांस आग्रह केला व आपल्या संस्थानांत अनेक सुधारणा घडवून आणावयाच्या असून त्यासाठीं आपल्या सारखाच मुख्य दिवाण पाहिजे असें त्यांनीं म्हटलें, त्यावेळीं सर नारायणरावांनीं महाराजांच्या विनंतीस मान्यता दिली. १९१३ मध्यें ते इंदुरास जाण्यापूर्वी मुंबईस अनेक ठिकाणीं त्यांस पानसुपाऱ्या झाल्या. प्रार्थनासमाजतर्फे मंगळदास वाडींत मोठा समारंभ झाला; स्टूडंट्स ब्रदरहूड संस्थेनें एक मोठा समारंभ करून त्यांस चिरस्मरण राहण्यासाठीं एक बहुमोल आल्बम दिलें. याची हकीकत 'सर नारायण व तरुण पिढी' ह्या प्रकरणांत आली आहे. ता. ३० मार्च १९१३ रोजीं कानडा सारस्वत ॲसोशिएशन तर्फे त्यांना निरोप देण्यासाठीं मुझाफराबाद हॉलमध्यें एक मोठा समारंभ झाला. त्यावेळीं आपल्या जातीकडून होणाऱ्या समारंभास आपण हजर आहों व जातीच्या एका संस्थेकडून सन्मान करून घेत आहों, हें कोणास अनुचित वाटण्याचा संभव आहे म्हणून त्यांस उत्तर देण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. ते म्हणाले जातिभेद, उच्चनीच भाव मानावयाचा नाहीं हें माझें एक स्वीकृत तत्त्व आहे, व मार्गांत अनेक अडचणी आल्या व गैरसमज झाले तरी ह्या तत्त्वानुसार वागण्याचा मी प्रयत्न करीत असतों, हें सर्वांस माहीत आहे. तथापि हें जरी माझें तत्त्व आहे व त्या तत्त्वानुसार मी वागत आहें, तरी माझ्या रोमरोमांत सारस्वत रक्त खेळत आहे ह्याचा मला विसर पडलेला नाहीं. तसेंच माझ्या लहानपणीं सारस्वत मातापिता, सारस्वत आजोबा व आजी व इतर सारस्वत लोक ह्यांच्याशीं आलेल्या संबंधाचें मला चांगलें स्मरण असून त्यांच्या सहवासाचा झालेला परिणाम माझ्या दृष्टीपुढें आहे. स्वतः जाति-

भेद न मानणारे सर नारायण आहेत हें पूर्णपणें माहीत असून त्यांच्या सहवासाचा व ज्ञानाचा लाभ घ्यावयास ज्ञातीचे लोक तयार असले म्हणजे ते त्यांच्या हितार्थ कार्यें करावयास सिद्ध असत. सारस्वतांसाठीं ज्ञानेश्वरीवर त्यांनीं दोन व्याख्यानें दिलीं व कांहीं मंडळी जर एकत्र झाली, तर आपण त्यांचेबरोबर ज्ञानेश्वरीचें अध्ययन करावयास सिद्ध असल्याचें त्यांनीं कळविलें, पण तसल्या वाचनाची गोडी नसल्यामुळें[१] ज्ञानेश्वरीच्या अध्ययनाचा योग जुळून आला नाहीं. सर नारायण व लेडी लक्ष्मीबाई ह्यांनीं ता. २ एप्रिल १९१३ रोजीं ज्यावेळीं मुंबई सोडली त्यावेळीं त्यांस निरोप देण्यासाठीं स्टेशनवर फारच मोठा जनसमूह हजर होता.

## इंदूरहून परत आल्यावर

नारायणराव इंदूर येथें सुमारें १८ महिने चीफ मिनिस्टरचें काम करून १९१४ सालीं आक्टोबर महिन्यांत मुंबईस परत आले. ह्या अठरा महिन्यांतील तेथील कार्य व त्यांस परत येण्यास झालेलीं कारणें ह्यांचा चरित्रांतील संगति दाखविणाऱ्या प्रकरणांत विचार करण्याची आवश्यकता नाहीं. कारण इंदूर प्रकरणासंबंधानें देण्यासारखी सर्व माहिती स्वतंत्र प्रकरणांत दिलेलीच आहे. नारायणराव पांच वर्षें इंदुरास राहिले असते तर त्यांच्या हातून पुष्कळ सुधारणा झाल्या असत्या, यांत कांहीं संशय नाहीं. तसें झालें असतें तर ते कदाचित् आणखीही राहिले असते. तथापि इंदुरांत राहून त्यांनीं जितकें कार्य केलें अगर केलें असतें, त्यापेक्षां अनेक पटींनीं अधिक महत्त्वाची कामगिरी राजकीय बाबतींत इंदूरहून परत आल्यावर त्यांनीं केली, ह्यांत कांहीं संशय नाहीं. ह्या कामगिरीची योग्यता इतकी थोर आहे कीं, त्यांचे सातआठ वर्षांतील राजकीय विषयांवरील लेख जे कोणी आस्थापूर्वक वाचतील त्यांस त्यांच्या कामगिरीची स्पष्ट कल्पना होईल. नारायणरावांनीं आपल्या पूर्व चरित्रांत राजकारणाच्या बाबतींत जें कार्य केलें त्यापेक्षां पुढल्या सात–आठ वर्षांच्या काळांतील त्यांच्या कामगिरीचें महत्त्व अधिक आहे. अखिल हिंदुस्थानांत तो काळ अत्यंत धामधुमीचा होता. राजकीय चळवळीस निराळेंच स्वरूप प्राप्त झालें होतें; अत्याचारांची सांथ आली होती. त्यांस आळा घालण्यासाठीं लोकांच्या विरोधास न जुमानतां कायदे केले जात होते. दंगेधोप्यांस

१ He gave two discourses on the Dnaneshvari and had even expressed his willingness to conduct a reading circle. But as intellectual treats were not popular, reading circle could not be formed. —*The Kanara Saraswat-July, 1923*

ऊत आला होता. अशा वेळीं अनेक प्रचलित विषयांचें स्वतः काळजीपूर्वक अध्ययन करून, लोकांच्या माहितीसाठीं सर नारायण ह्यांनीं अनेक लेख लिहिले व त्यांच्याद्वारें लोकांस खरोखर आपल्यापुढें जे प्रश्न आहेत त्यांचें सत्यस्वरूप काय आहे त्याची स्पष्ट कल्पना करून दिली. **मागील इतिहास व अनुभव ह्यांचा विचार करून लेख लिहिण्याचे श्रम करण्यासाठीं सगळ्या हिंदुस्थानांत एकटे नारायणराव पुढें आले.** ह्यावरूनही त्यांची अध्ययनशीलता व त्यांनीं बजाविलेली कामगिरी याची कल्पना होते.

## अस्पृश्यतानिवारण दुसरी परिषद्

पहिली अस्पृश्यता निवारण परिषद झाल्यानंतर साहा वर्षांनीं ता. २३ व २४ मार्च १९१८ रोजीं मुंबई येथें श्री. सयाजी महाराज गायकवाड ह्यांच्या अध्यक्षतेखालीं दुसरी अस्पृश्यता निवारण परिषद भरली होती. ह्या परिषदेंत सर नारायण ह्यांनीं प्रामुख्यानें भाग घेतलाच होता. त्यांच्याशिवाय रँगलर परांजपे, मिसेस बेझंट व बळवंतराव टिळक ह्यांनीं भाग घेतला होता. ह्या परिषदेचें मुख्य काम म्हणजे अस्पृश्यता आम्ही जातीनें मोडूं असा व्यक्तिविषयक प्रतिज्ञेचा एक जाहीरनामा काढून त्यावर हिंदु वरिष्ठ जातींतील ३८० प्रमुख पुढाऱ्यांच्या सह्या मिळविल्यानंतर जाहीरनाम्याची प्रसिद्धि, बळवंतराव टिळकांनीं परिषदेंत भाग घेतला, राष्ट्रीय सभेनें हा प्रश्न हातीं घ्यावा अशी सूचना केली, पण अनुयायांच्या भिडेला पडून जाहीरनाम्यावर सही मात्र केली नाहीं !

अशा प्रकारें सर नारायण ह्यांचें कार्य चालू असतांना १९१९ सालीं

## गिरणीकामगारांचा प्रचंड संप

झाला. हा संप मिटविण्याच्या कामीं सर नारायण जर पडले नसते, तर तो कोणत्या थरावर गेला असता त्याची कल्पनाच केली पाहिजे. हा सार्वत्रिक संप होता. सर्व गिरण्या महिन्याहून अधिक काळ बंद होत्या. कामगार लोक अगदीं हवालदिल झाले होते, त्यांच्या कुटुंबांची उपासमार होत होती, तरी संपाचा जोर कमी होण्याचीं चिन्हें मुळींच दिसत नव्हतीं. अशा वेळीं संप मिटविण्याच्या कमीटीवर नारायणरावांची नेमणूक झाली. त्यांची नेमणूक होतांच ज्या कांहीं लोकांना आपणच गिरणी कामगारांचे खरे पुढारी आहोंत असें वाटत होतें, आपल्याच हातांत संपाचीं सर्व सूत्रें आहेत अशी ज्यांनीं आपली समजूत करून घेतली होती, त्यांनीं आपलें अंग काढून घेतलें व त्यांच्या सहकार्याची आशा न करितां नारायणरावांस आपलें कार्य करावें लागलें. हा संप त्यांनीं कसा मिटविला ? मोठमोठीं व्याख्यानें देऊन संपवाल्यांपुढें त्यांच्या मालकांनीं केलेल्या अन्यायाचीं चित्रें त्यांनीं

ठेविलीं काय ? त्यांच्या हालाचीं भेसूर चित्रें त्यांनीं रंगविलीं काय? किंवा मालकांच्या श्रीमंतीचीं रसभरित वर्णनें करण्याच्या भानगडींत ते पडले काय ? त्यांनीं हें कांहीं केलें नाहीं. त्यांनीं सर्व संपवाल्यांना वारंवार एकत्र करून तुकाराम व ज्ञानदेव ह्यांच्या वचनांच्याद्वारें संसारामध्यें कमीअधिक प्रमाणानें अडचणी ह्या यावयाच्याच, अशावेळीं साधुसंतांच्या वचनांवर विश्वासून आपण धैर्यानें आपली सुधारणा कर- ण्याचा प्रयत्न केला पाहिजे, जें अशाश्वत आहे, त्याला अधिक महत्त्व न देतां शाश्वतावर भर देऊन वागलें पाहिजे. परमेश्वर सर्वांचा पाठीराखा आहे, तो दीनांचा वाली आहे, तो आपला मार्गरक्षक आहे, हात धरून वाट दाखविणारा आहे. त्याला आपण विसरतों, त्याच्या इच्छेच्या विरुद्ध वागतों, अशाश्वतामध्यें सर्वस्वी गुरफटतों व मग आपल्या कर्तव्यासही विसरतों, असें सांगून त्यांचीं प्रक्षुब्ध मनें त्यांनीं प्रथम शांत केलीं. नारायणरावांचा असा उपदेश चालू असतां कामगारांचीं अंतःकरणें उचंबळून येत, त्यांच्या नेत्रावाटे अश्रुप्रवाह चालू लागे व त्यांना नारायणरावांचें म्हणणें पटे. सर्व संपवाल्यांचा नारायणरावांवर पूर्ण विश्वास बसला. साहेब जें करितील तें आपल्या कल्याणाचेंच असेल असें त्यांच्या मनानें घेतलें. आणि इकडे नारायणरावांनीं गिरण्यांच्या मालकांच्या हातापायां न पडतां, किंवा अटींचे खलीते पाठविण्याचा त्रास न करितां उभय पक्षास लाभदायक, न्याय्य व सर्वांस मान्य होईल असा संपाचा शेवट लाविला. त्यांनीं प्रेमाच्या, गोड शब्दांच्या, समजुतीच्या जोरावर जें हें महत्कार्य करून दाखविलें तें पाहून सर्व थक्क झाले. त्यावेळपर्यंत पुष्कळ संप झाले होते, व नंतरही पुष्कळ संप झाले; परंतु संपवाल्यांच्या तक्रारी रास्त असूनही कोणत्याही संपाच्यावेळीं संप करणारांस ह्या वेळेप्रमाणें समाधान प्राप्त झालें नाहीं. ह्याचें मुख्य कारण म्हणजे हा प्रचंड संप मिटविण्याची सर्व जबाबदारी नारायणरावांसारख्या धर्मनिष्ठ, पापभीरू व संतांच्या वाणीच्याद्वारें आपलें हृद्गत संपवाल्यांपुढें ठेवणारा पुढारी लाभला हेंच होय.

## श्री. सौ. लेडी लक्ष्मीबाई चंदावरकर[1]

अशाप्रकारें नारायणरावांचीं लोकहिताचीं कामें चालू असतांना संसारांतील सर्वांत मोठी आपत्ति त्यांच्यावर येऊन कोसळली. सौ. लक्ष्मीबाई चंदावरकर ह्यांस ता. २६ ज्यानुआरी १९२० रोजीं परलोकवास प्राप्त झाला. लक्ष्मीबाईंची वास्तविक योग्यता फार थोर होती व त्यांच्या सहकार्यामुळेंच नारायणरावांचें

१ ह्या लेखांतील कांहीं वाक्यें पृ. २४२–२४६ मध्यें येऊन गेलीं आहेत. तीं काढल्यास संगति नष्ट होईल म्हणून तीं ह्या लेखांत तशींच ठेवून दिलीं आहेत.

कौटुंबिक जीवन आदर्शवत् झालें होतें. अशा थोर स्त्रीविषयीं नारायणरावांच्या चरित्राच्या वाचकांस योग्य कल्पना होणें अत्यंत अगत्याचें आहे असें वाटल्यावरून त्यांच्यासंबंधानें ता. १ फेब्रुआरी १९२० च्या **सुबोधपत्रिकेच्या** अंकांत जो लेख प्रसिद्ध झाला व जो चरित्र–लेखकानेंच लिहिला होता, तो येथें मुद्दाम दिला आहे :—

Death has no power over what is of God within us. Death changes and purifies and perfects us. Death brings us nearer to God, where we shall meet again those that are God's and love them with that Godly love which can never perish.

—*Max Muller*

Through sorrow we learn sympathy. Had we never known sorrow, we had never known Hope. Fortitude, Compassion, Gentleness, Justice, Sincerity, Peace, Love are all the fruits of sorrow.

—*Life's Inspirations*

आपला प्रेमळ व गोड स्वभाव, प्रखर कर्तव्यनिष्ठा, संसारदक्षता, परांविषयीं सक्रीय कळकळ, औदार्य, साधेपणा व आनंदी वृत्ति इ. गुणांनीं ज्या लोकादरास पात्र झाल्या होत्या त्या सौ. लेडी लक्ष्मीबाई चंदावरकर ह्यांस सोमवार ता. २६ ज्यानुआरी १९२० रोजीं रात्रौ ९। वाजतां देवाज्ञा झाली हें नमूद करण्यास आम्हांस फार वाईट वाटतें. बाइची प्रकृति आज बरेच दिवस नादुरुस्त होती, तथापि गेल्या वर्षाच्या शेवटीं लोणावळें येथें त्यांस बरीच हुषारी वाटूं लागली होती; परंतु मुंबईस आल्यावर त्यांस पुन्हां ज्वरानें गांठलें व दिवसेंदिवस प्रकृति क्षीण होत जाऊन त्यांची वर म्हटल्याप्रमाणें इहलोकींची यात्रा संपली. बाईंना आपला अंत समीप आला आहे हें डॉक्टरांनीं कोणास सांगावयाच्या पूर्वींच कळून चुकलें होतें. सोमवार ता. १९ रोजीं त्यांनीं स्पष्टपणें सांगितलें होतें कीं, मी आतां आठ दिवसांची मैत्रीण आहें, आणि तें अक्षरशः खरें झालें. त्यांचें मृत्युभय सर्व नाहींसें झालें होतें. त्या पुष्कळ दिवस जरी बिछाना धरून होत्या, तरी शेवटपर्यंत त्या चांगल्या शुद्धीवर असून त्यांचा अंत अगदीं शांतपणें व त्या समाधानाच्या स्थितींत असतांना झाल्यासारखें दिसत होतें.

सौ. लक्ष्मीबाई चंदावरकर ह्यांच्या कांहीं विशेष गुणांची आजच्या तरुण पिढीला ओळख करून देणें अगत्याचें आहे. कारण, त्यांच्यामध्यें कांहीं असामान्य गुण होते व त्यांची वाढ त्यांनीं आत्मप्रयत्नानें केली होती. नारायणराव चंदावरकर वकील असतांनाच्या लक्ष्मीबाई व ते न्यायमूर्ति झाल्यानंतरच्या बाई

त्यांच्यामध्यें अनेक बाबतींत अंतर पडलें होतें, ही एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. पूर्वी बाईंना मोठाल्या सभांमध्यें जाणें आवडत नसे, गेल्यावर त्यांची अस्वस्थता वाढावी. त्याच बाई नंतर मोठमोठ्या सभांमध्यें विचारपरिप्लुत भाषणें करूं लागल्या. त्यांनीं इंग्रजीचें चांगलें ज्ञान संपादिलें व त्या आपले विचार संभाषणामध्यें इंग्रजींत व्यक्त करूं लागल्या. त्यांच्याशीं संभाषणाचा पुष्कळ मोठमोठ्या अधिकाऱ्यांस योग येत असे. त्यावेळीं त्यांचें सौजन्य, थोरपणा, तरतरीत बुद्धि, धोरणी वर्तन व समतोलपणा पाहून त्यांच्याविषयीं सर्वांच्या ठिकाणीं आदर जागृत होत असे. आपल्या विद्वान पतीचें कार्यक्षेत्र विस्तृत होऊं लागतांच त्या विस्तृत क्षेत्रांमध्येंही लक्ष्मीबाई नारायणरावांस आपल्या पोक्त विचारांचें सहाय्य देऊं लागल्या. अनेक प्रसंगीं त्यांचाच सल्ला योग्य ठरल्याचें आज सर नारायण कृतज्ञतेनें स्मरत आहेत. तथापि पूर्वीच्या स्थितींत जरी पुष्कळ प्रकारें फेरबदल झाला, विपुल संपत्ति आली, वैभव वाढलें, मोठमोठे अधिकार प्राप्त झाले, मानमरातब वाढला, तरीपण बाईंच्या स्वभावांत, वागणुकींत, इतरांशीं येणाऱ्या संबंधांत मात्र कांडीचाही फरक पडला नाहीं; गर्व हा त्यांच्या वाऱ्याला आला नाहीं; कठोरपणा त्यांस शिवला नाहीं; बेपर्वाई त्यांच्या गांवीं वसली नाहीं; मात्र ह्या त्यांच्या साधेपणाचें व निगर्वी वृत्तीचें इंदुरास चीज झालें नाहीं. मुख्य दिवाणाच्या पत्नीनें भिकारड्यांशीं प्रेमानें वागणें म्हणजे आपला कमीपणा करून घेणें होय अशा कल्पनेनें वेडावलेल्या कांहीं बायांना बाईंचें वर्तन चमत्कारीक वाटलें तर त्यांत नवल काय?

बाईंची परहिताची कळकळ सक्रिय होती असें आम्हीं वर म्हटलें आहे. आपल्या हातून होईल तितकें लोकांचें बरें करण्यासाठीं त्या झटत. इतरांचें दुःख हलकें करण्यासाठीं त्यांनीं कितीतरी श्रम करावे! त्यांची दृष्टी सर्वत्र असावयाची. नोकरमाणसांकडे कांहीं घरगुती अडचण उपस्थित झाली कीं त्याची काळजी बाईंना! माळ्याच्या मुलांना लोणावळ्यासारख्या ठिकाणीं फार थंडी वाजत असेल म्हणून बाईंनीं कापड खरेदी करावें, बाईंनीं कपडे बेतावे व बाईंनीं ते स्वतः शिवून मुलांना द्यावे! अशा अनेक गोष्टी त्या सहज अगदीं करीत व आपण कांहीं विशेष करीत आहोंत हा विचार त्यांना केव्हांही शिवत नसे. आपल्या स्वतःच्या अडचणींस न जुमानतां त्यांनीं परांसाठीं खपावें व हें सर्व कोणत्याही प्रकारचा गाजावाजा न करितां त्या करीत असत. त्या स्वभावानें अत्यंत प्रेमळ व मनानें उदार होत्या. त्यांची प्रेमाची वाढ सारखी होत होती. एकदां त्यांनीं कोणास आपलें म्हटलें म्हणजे त्यांच्या प्रेमाचा वर्षाव त्या व्यक्तीवर सारखा व्हावा. उपकारांची फेड व्हावी अशी त्यांची केव्हांही अपेक्षा नसे. उपकारांचें स्मरण नसल्यासारखी जरी कोणाची वर्तणूक असली, तरी तिकडे त्यांनीं दुर्लक्ष करावें. संकटाच्या प्रसंगीं मदत करावयास,

वियोगाच्या वेळीं धीर द्यावयास, आजाराच्या वेळीं आपल्या प्रेमाचा आधार देऊन उत्साह आणावयास त्या एका पायावर तयार असत. अशा वेळीं स्वतःच्या प्रकृतीचें अस्वास्थ्य, आपल्या अडचणी ह्यांचा विचारही मनांत न आणतां इतरांच्या सहाय्यासाठीं, दोन प्रेमाचे गोड शब्द बोलून इतरांचा दुःखभार हलका करण्यासाठीं त्या कशा धांव घेत असत ह्याचा प्रत्यक्ष अनुभव ह्या लेखकास आला आहे. त्यांच्या संबंधानें कोणी आदर व प्रेम दाखविलें, तर त्याचा त्यांना केव्हांही विसर पडत नसे. त्यांच्या प्रेमळ स्वभावामुळेंच व त्यांत कर्तव्याच्या दिव्य कल्पनेचें प्राबल्य झाल्यामुळें मुंबईस आल्यावर त्यांची प्रकृती बिघडली, तापानें त्यास पुन्हां गांठलें व ह्या दुखण्यांत त्यांचा अंत झाला.

लक्ष्मीबाईंची सर्व कार्यांतील दक्षता विशेष होती. त्यांची बुद्धि तीक्ष्ण व परिस्थितीविषयींचें त्यांचें अनुमान बिनचुक असे. संसारकार्यांतील त्यांची दक्षता, इतरांच्या सुखाविषयींची त्यांची दक्षता आणि स्वतःच्या कर्तव्याविषयींची त्यांची जाज्वल्य जागृति ह्या त्यांच्या असामान्य गुणांमुळें त्यांनीं कितीतरी लोकांना सुखी केल्याचें आम्हांस माहित आहे. ऐन संकटाच्या वेळीं योग्य सल्ला देऊन किती तरी कुटुंबांचें स्वास्थ्य त्यांनीं राखिलें आहे. किती तरी उपवर मुलींना योग्य वर पाहून देऊन त्यांनीं सुखी केलें आहे. संकटाच्या वेळीं धीर देऊन कितीतरी व्यक्तींना त्यांनीं कर्तव्याचे मार्ग दाखविले आहेत. आपण स्वतः सर्व स्थितींत आनंदी राहून कितीतरी माणसांना त्यांनीं आनंदी केलें आहे. त्यांच्याशीं संभाषणाचा योग आला म्हणजे त्यांची तीक्ष्ण बुद्धि, निश्चयी वृत्ति, प्रबल इच्छाशक्ती, अनेक प्रचलित विषयांविषयींचें त्यांचें बिनचुक ज्ञान, सामाजिक बाबतींतील त्यांचे उदार विचार, त्यांची सत्यनिष्ठा व त्यांचा करारी स्वभाव ह्यांची जाणीव होत असे.

लक्ष्मीबाईंचा अनेक सार्वजनिक संस्थाशीं संबंध असे, पण त्या सर्वांत आर्य महिलासमाजाशीं त्यांचा असलेला संबंध फार निकट असे. जवळजवळ १९–२० वर्षें त्या ह्या सभेच्या अध्यक्ष होत्या. मुंबईस असल्या म्हणजे नित्य नियमानें त्यांनीं सभेला यावें, तरुण स्त्रियांना त्यांनीं प्रोत्साहन द्यावें, अनेक विषयांवरील आपले निश्चित विचार तेथें सांगावे, आपला अनुभव आपल्या भगिनींपुढें ठेवावा व आपल्या प्रेमळ सहवासाचा लाभ देऊन सर्व स्त्रियांचें मन सहज लीलेनें आपल्याकडे ओढून घ्यावें. आर्य महिला समाजासंबंधानें त्यांना विलक्षण आपलेपण वाटत असे. शनिवार हा सभेचा दिवस, म्हणून त्यांनीं होतां होईल तों ह्या दिवशीं दुसरीं कामें घेऊं नयेत व अगदीं वेळेवर आपल्या कुटुंबांतील मुलींसह ४॥ ला प्रार्थनामंदिरांत दाखल व्हावें. मागच्या त्यांच्या एका बिकट आजारानंतर त्यांचा एक पाय थोडा अधू झाला होता, परंतु तो अतिशय दुखत असतांनाहि लंगडत

लंगडत त्यांनीं मंदिरांत वेळेवर यावें ! एकदां कोणतेंही काम हातीं घेतलें कीं मग त्यांत कुचराई करणें हें लक्ष्मीबाईंना बिलकुल माहीत नव्हतें. अलीकडे कांहीं वर्षांपासून आर्य महिला समाजाच्या कामाचा विस्तार वाढत आहे असें पाहून त्यांना कितीतरी आनंद व अभिमान वाटत असे. आपल्या समाजानें नवीं नवीं कामें अंगावर घ्यावींत, आपल्या उपयुक्ततेचें वर्तुळ अधिकाधिक वाढवावें अशी त्यांची वाढती इच्छा असे. आर्य महिला समाजानें फुकट दूध वांटण्याचें फंडाचें मोठें काम अंगावर घेण्याच्या विचारास त्यांनीं मोठ्या उत्साहानें अनुमति दिली व १०० रुपयांची ताबडतोब मदत दिली. गेल्या वार्षिकोत्सवाच्या वेळीं त्यांना हजर राहातां आलें नाहीं ह्याबद्दल त्यांना कितीतरी हळहळ वाटली, व आपल्या कन्येबरोबर त्यांनीं तसा निरोपही पाठविला.

सौ. लक्ष्मीबाई ह्या आपल्या कुटुंबाच्या साक्षात् लक्ष्मी होत्या. हें जाणूनच लोणावळें येथील बंगला जेव्हां तयार झाला तेव्हां सर नारायण ह्यांनीं " लक्ष्मीगृह " असें त्याचें नामकरण केलें असावें. लक्ष्मीबाईंची नेहमींची वृत्ति अशी असे कीं, आपल्या सभोंवतालच्या माणसांचें सुख तेंच आपलें सुख, त्यांचा आनंद तो आपला आनंद, त्यांचें दुःख तें आपलें दुःख व त्यांचीं संकटें तीं आपलीं असें मानून त्यांच्या सुखांत व आनंदांत त्या भर घालीत, व इतरांच्या संकटांसंबंधानें कष्ट व विवंचना करीत करीत त्यांनीं आपली इहलोकींची यात्रा संपविली.

संसारांतील अनेक आपत्तींमध्यें प्रिय पत्नीवियोग ही एक अति कष्टमय व दुःसह्य आपत्ति आहे. ती आमचे पूज्य अध्यक्ष ह्यांजवर आतां येऊन पडली आहे. त्यांस आपल्या प्रिय पत्नीचा ४५ वर्षांचा दीर्घ परिचय झालेला, इतकीं वर्षें परस्पर विचारविनिमय केलेला, इतकीं वर्षें अत्यंत निकट सहवासानें दोन जीव एकजीव झालेले, आपल्या आकांक्षा, सुखदुःख, आपत्ति, वैभव, अधिकार, व जबाबदारी ह्या सर्व बाबतींत पत्नीची सहकारिता त्यांनीं अनुभविलेली तेव्हां त्यांस हा आपल्या प्रिय पत्नीचा वियोग अत्यंत असह्य होणें हें अगदीं साहजीक आहे. त्यांचें समाधान कोण कसें करणार ? परंतु हें मात्र खरें कीं मृत्यूच्या योगें आपणास आपल्या प्रिय व्यक्तीचा वियोग झाल्यासारखें जरी वाटतें, तरी एका अर्थीं मृत्यु त्या व्यक्तीला आपल्या अधिक जवळ आणितो. मृत्यु आपल्या प्रिय गत व्यक्तीचा चिर सहवास करून देतो व ती गत व्यक्ति आपल्याला वाटेल त्यावेळीं आपल्या समोर येऊं शकते व तिचा सहवास होऊं शकतो. मृत्यु हा आध्यात्म अनुभव-शास्त्रामध्यें कःपदार्थ आहे. विरहामुळें पोळण्याचें सामर्थ्य त्याच्यांत आहे, अंतःकरण विव्हल करण्याचें त्यास सामर्थ्य आहे, हें त्रिवार सत्य होय. परंतु तो

काय हिरावून घेतो ? गत व्यक्तीचें पावित्र्य तो हिरावून घेतो काय ? गत प्रिय व्यक्तीच्या प्रेमाला तो काय स्पर्श करितो ? गत व्यक्तीचें तेज काय तो लपवून टाकतो ? हें पावित्र्य, हें प्रेम, हें तेज नित्य मागें राहिलेल्यांसाठीं राहतें. त्यांची स्मृति, त्यांचा आध्यात्मिक सहवास यांपासून होणारा आनंद हिरावून नेण्याचें यत्किंचित् तरी सामर्थ्य मृत्यूमध्यें आहे काय ? वियोगानें होरपळत असलेल्या, गत व्यक्तीच्या प्रेमानें वेडावलेल्या, सहवासानें धन्य झालेल्या व्यक्तींना हा विचार समाधान, शांति व बळ देऊं शकतो असा समदुःखी अधिकारी जनांचा अनुभव आहे. व प्रेमळ वृत्तीचे सर नारायण अध्यात्म अनुभवामध्यें अधिकारी असल्यामुळें हा अनुभव त्यांस आजही येत असला पाहिजे. दुसरी गोष्ट, सौ. लेडी लक्ष्मीबाई ह्यांच्या मृत्यूमुळें समाजांतील सर्व बंधुभगिनी आज हळहळत आहेत. बाईंची योग्यता ज्यांनीं जाणली आहे अशीं सर्व दर्जाचीं माणसें आज समदुःखी आहेत हें पाहून सर नारायण ह्यांनीं व त्यांच्या मुलांनीं आपलें दुःख आवरलें पाहिजे. त्यांच्या मुलांनीं आपल्या प्रिय मातेचे गुण आपलेसे करून त्यांची स्मृति कायम ठेवावी.

## एलएल. डी. पदवी.

लक्ष्मीबाईंच्या मृत्यूनंतर नारायणरावांच्या चळवळींकडे त्यांच्या निकटवर्तीयांचें विशेष लक्ष होतें. पत्नीचा वियोग ते मोठ्या धीरानें सहन करीत होते. परंतु त्यांनीं आपल्या दुःखाचें प्रदर्शन केलें नाहीं. वियोगाचा आपल्या नेहमींच्या कार्यांवर त्यांनीं कोणत्याही प्रकारें परिणाम होऊं दिला नाहीं. आपल्या दुःखाचें पावित्र्य संभाळून ते पूर्वीप्रमाणेंच सर्व कार्यें करूं लागले. वर्तमानपत्रांत लेख लिहिणें, व्याख्यानें देणें, उपासना चालविणें, युनिव्हर्सिटीचीं अनेक महत्त्वाचीं कामें करणें, हा सर्व क्रम पूर्वीप्रमाणेंच चालू होता व त्यांच्या दांडग्या पत्रव्यवहारामध्यें कोणत्याही प्रकारें खंड पडलेला आढळत नसे. सर नारायण आपला अनुभव आपल्या मित्रांस सांगावयास नेहमीं सिद्ध असत. असा त्यांचा कार्यक्रम चालू असतां १९२० सालीं डिसेंबर महिन्यांत एक विशेष गोष्ट घडली तिचा येथें उल्लेख केला पाहिजे. लॉर्ड सिंह ह्यांची एकंदर कामगिरी, त्यांची पहिले हिंदी गव्हर्नर ह्या नात्यानें झालेली नेमणूक वगैरे लक्षांत घेऊन मुंबई युनिव्हार्सिटीनें त्यांस एलएल. डी. ही बहुमानाची पदवी देण्याचें ठरविलें. सर नारायण यांची विद्वत्ता, त्यांनीं फेलो, सिंडिक, डीन, व्हाइस चॅन्सलर वगैरे नात्यानें केलेली सेवा लक्षांत घेऊन त्यांस व त्यावेळचे व्हाइस-चॅन्सलर व सरकारच्या कौन्सिलचे सभासद सर चिमणलाल सेटलवाड ह्यांसही युनिव्हर्सिटीनें एलएल. डी. पदवी त्याचवेळीं देण्याचें योजिलें.

ह्या पदवीदानाच्या वेळीं व्हाइस-चॅन्सलर सर चिमणलाल व चॅन्सलर सर जॉर्ज

लॉइड ह्यांनीं सर नारायण ह्यांच्या योग्यतेचें सुंदर वर्णन केलें आहे. सर चिमणलाल ह्यांच्या भाषणांत पुढील वाक्यें आहेतः —

He has always been a friend of the students to many of whom he has given a helping hand. He has always delighted to associate with students and his work in the Students' Brotherhood, where for many years he expounded English classical works every week which will always be gratefully remembered. He has taken a keen interest in female education and his deep solicitude for the uplift of depressed classes and his sustained efforts in that behalf will always endure as a monument of his work for forcing National advancement. It is the earnest student, the deep scholar, the patriot and the devoted worker in the cause of education, that the Senate delights to honour this evening in the person of Sir Narayan Ganesh Chandavarkar.

सर चिमणलाल ह्यांनीं केलेल्या वर्णनावर बरीचशी भिस्त ठेवून चॅन्सलर साहेबांनीं आपल्या भाषणांत म्हटलें,

As befits one so qualified, his influence has pre-eminently been that of a thinker, and which none of us will forget his many years on the Bench or the part he has played in the Indian National Congress or as a Representative of this University on the Legislative Council, it is as one whose breadth of view and calm outlook on life have made him a valuable influence in moulding contemporary thought both within and without the walls of this University that I base his lasting title to fame.

## सर नारायण व लॉर्ड सिंह

ह्या दिवशीं आपल्या नव्या जबाबदारीसंबंधानें लॉर्ड सिंह ह्यांचें सर नारायण ह्यांच्याशीं भाषण झालें. देशांत एकंदर परिस्थिति फार चिंताजनक आहे. अत्याचारी लोकांच्या चळवळी थंडावलेल्या नाहींत, हिंदी गव्हर्नराच्या मार्गांत अडचणी हिंदीच माणसें आणणार असा रंग दिसत आहे, अशा वेळीं कसें वागावें तें कळत नाहीं असे उद्गार लॉर्ड सिंह यांनीं काढले. त्यावेळीं पूर्वीचे एक गव्हर्नर जनरल सर जॉन शोर ह्यांचें उदाहरण नारायणरावांनीं दिलें होतें व मोठ्या अडचणीच्या वेळीं ते जसे वागत असत त्याप्रमाणें वागण्याचा तुम्ही प्रयत्न करावा असें नारायणरावांनीं त्यांस सुचविलें होतें. दुसऱ्याच दिवशीं ह्यासंबंधानें नारायणरावांनीं लॉर्ड सिंह ह्यांस खुलासेवार लिपत्र हिलें आहे. त्यांत त्यांनीं पुढील मुद्दे आणिले होते :—

"सर जॉन शोर ह्यांच्या वेळीं एकंदर वातावरण बिघडलेलें होतें. अस्वस्थता सर्वत्र माजलेली होती. अशावेळीं त्यांच्यासंबंधानें असें लिहून ठेवलेलें आहे कीं, त्यांनीं मन शांत ठेवून मोठ्या धैर्यानें, निश्चितपणें कारभार चालविला, आणि त्यांस यश प्राप्त झालें. ते विशेष बिकट परिस्थितींत असले म्हणजे त्यांनीं एखाद्या शांत ठिकाणीं जावें, तेथें देवाची प्रार्थना [1] करावी. देवाजवळ असें मागावें कीं, देवा, माझ्या बुद्धीला योग्य वळण लाव, माझ्यापुढें असलेल्या प्रश्नासंबंधानें जे दोन मार्ग आहेत त्यांतील योग्य तो कोठला हें ठरविण्याच्या बाबतींत तूं मला सहाय्य कर. माझ्या हातून कोणत्याही प्रकारें पक्षपात होणार नाहीं असें माझें धोरण राहील असें कर. अशी प्रार्थना केल्यानंतर स्तुति व निंदा ह्यासंबंधानें पूर्णपणें बेफिकीर राहून त्यांच्या हातून आपलें कर्तव्य होत असे. तुम्ही व मी एकाच धर्माचे अनुयायी आहों तेव्हां अडचणीच्यावेळीं प्रार्थनेनें किती सहाय्य होतें ह्याचा अनुभव एका गव्हर्नरजनरलला जो आला तो आपल्याला निवेदन केला तर आवडेल अशी माझी खात्री आहे म्हणून वरील मजकूर लिहून कळविला आहे. लॉर्ड बीकन्सफील्डच्या चरित्रकारानें असें म्हटलें आहे कीं, आत्मसंयमन, शांति व आत्मपरीक्षणाची आवड हे जे तीन गुण त्यांच्यांत विशेष प्रकारें दिसत होते ते सतत ४० वर्षें झालेली टीका सहन करूनच त्यांच्यांत आले असावे. हें देखील आपण लक्षांत ठेवण्यासारखें आहे."

## नव्या कौन्सिलचे अध्यक्ष

ह्यानंतर १९२१ च्या ज्यान्युआरी महिन्यांत सर नारायण ह्यांच्या आयुष्यांतील शेवटची फार महत्त्वाची गोष्ट घडली. नवीन सुधारणांचा अंमल १ एप्रिल पासून सुरू होणार होता. पूर्वीच्या कायदे कौन्सिलचे स्वतः गव्हर्नर अध्यक्ष असत. नव्या कौन्सिलचे पहिले अध्यक्ष सरकारकडून नेमले जावयाचे होते. अध्यक्षांचें काम अगदींच नवीन प्रकारचें होतें. त्या जागीं योग्य मनुष्याची नेमणूक होणें अगत्याचें होतें. नव्या घटनेंतील हें पहिलें कौन्सिल होतें. ह्यावेळीं जी पद्धत पाडली जाईल, जे निकाल देण्यांत येतील त्यांचा पुढें उपयोग होणार होता. गव्हर्नर साहेब व त्यांचें कौन्सिल ह्यांनीं ह्या गोष्टीचा पूर्ण विचार करून सर नारायण ह्यांची ह्या जागीं नेमणूक करावी असें योजिलें. ता. २६ जान्युआरी रोजीं ड्यूक ऑफ कॅनाटच्या स्वागतासंबंधानें शेरीफांनीं एक खासगी सभा

---

१ स्वतः सर नारायण बिकट खटल्यांत न्यायपत्रक लिहिण्यापूर्वी असेंच करीत असत.

भरविली होती. ती सभा संपल्यानंतर सरकारच्या कौन्सिलचे एक सभासद सर चिमणलाल ह्यांनीं जर गव्हरनेरनीं कौन्सिलच्या अध्यक्षाची जागा तुम्हांला देऊं केली, तर ती तुम्ही पत्कराल का असें विचारिलें. विचार करून उद्यां उत्तर पाठवितों असा नारायणरावांनीं त्यावेळीं जबाब दिला व पूर्ण विचार करून ही जागा पत्करण्याची आपली तयारी आहे असें उत्तर सर चिमणलाल ह्यांस दुसऱ्या दिवशीं पाठविलें. सोमवार ता. ३१ ज्यान्युआरी रोजीं गव्हरनेर साहेबांनीं त्यांना भेटीस बोलावून कौन्सिलच्या अध्यक्षांची जागा आपण पत्करावी अशी विनंति केली. त्यावेळीं ते म्हणाले, ह्या जागेचें महत्त्व पटवून देणारे, सर्वपरि लायक, विद्वान, लोकादरास पात्र झालेले असे जे तुम्ही त्यांना मी प्रथमच कां विचारिलें नाहीं अशी शंका तुम्हांस येण्याचा संभव आहे. ह्या जागेवर प्रमाणतः तरुण गृहस्थाची नेमणूक करावी असा माझा विचार होता. तीन नांवें माझ्यापुढें होतीं. पण ते दोघेही कौन्सिलचे सभासद असल्यामुळें त्यांना नेमतां येत नाहीं. तिसरे मला मान्य नाहींत. तरुण माणसें सोडलीं, तर तुमच्या वांचून अधिक लायक इसम दुसरा कोण आहे? असें भाषण झाल्यावर सर नारायण ह्यांनीं तूर्त एक वर्षापुरती अध्यक्षाची जागा मी पत्करतों असें गव्हर्नेर साहेबांस सांगितलें. त्यांनीं जरी प्रथम एक वर्षापुरतीच ही जागा पत्करली होती, तरी १९२३ सालीं देखील तेच अध्यक्ष होते हें सर्वांस विदित आहेच.

ही जागा स्वीकारल्यानंतर 'पार्लमेंटरी प्रोसीजर' त्यांनीं उत्तम प्रकारें आत्मसात केलें व त्या संबंधाच्या सूचना स्वतःसाठीं लिहून काढल्या. प्रत्येक अडचणीच्या वेळीं ह्या माहितीचा उपयोग करून ते योग्य निकाल देत असत.[१] त्यांनीं स्वतःसाठीं लिहिलेल्या ह्या पुस्तकाची कीर्ति विठ्ठलभाई पटेल पर्यंत गेली व असेंब्लीच्या अध्यक्षाच्या जागीं जेव्हां त्यांची नेमणूक झाली त्यावेळीं त्यांनीं तें हस्तलिखित पुस्तक सर नारायण ह्यांच्याजवळून मागून नेलें होतें असें कळतें. एकदां कौन्सिलसंबंधानेंच सर स्टॅन्ले रीड ह्यांच्याशीं बोलत असतांना ते म्हणाले: "रीझर्व्हड्" विषयांवर कौन्सिलची सत्ता नाहीं असें सकृद्दर्शनीं वाटतें, परंतु "रीझर्व्हड्" विषयांसंबंधानें सरकारचें धोरण जर कौन्सिलला पसंत नसलें, तर ट्रॅन्सफर्ड विषयांवर पैसा नाकारण्याचा हक्क कौन्सिलला आहे.[२] दोन वर्षें सर नारा-

१. I have as a point of procedure laid down for my Legislative Council the rule of the collcetive responsibility of Government including ministers, borrowing that rule from the British Cabinet.

२. In our Councils though Council has no power over *reserved*

यण कौन्सिलचे अध्यक्ष होते. तेवढ्या अवधींत अध्यक्ष ह्या नात्यानें त्यांनीं केलेल्या कामाची सर्वत्र प्रसंशा झाली.

ता. १९ नोव्हेंबर १९२२ रोजीं सकाळीं सर नारायण फिरावयास गेले असतां त्यांच्याबरोबर त्यावेळीं सरकारी वकील असलेले श्री. पाटकर होते. मलबार हिलवरील बागेंत मि. बेळगांववाला व मि. तेरसी ह्यांची गांठ पडली. तेव्हां मि. बेळगांववाला व सर नारायण ह्यांच्यांत झालेलें संभाषण येथें नमूद करण्यासारखें आहे.

**बेळ०**–साहेब ! असहकार्य करणारीं माणसें कौन्सिलमध्यें जाणार, त्यासंबंधानें आपल्याला काय वाटतें ?

**चं०**–मी स्वतःच कौन्सिलचा अध्यक्ष असल्यामुळें, मी कांहींच मत न देणें बरें, असें नाहीं तुम्हांला वाटत ?

**बेळ०**–मला आपलें स्वतःच्या माहितीसाठीं आपलें मत हवें होतें.

**चं०**–मी माझें स्वतःचें मत तुम्हांला सांगितलें असतें, पण, तुमचा वर्तमानपत्रांशीं संबंध असल्यामुळें, तुम्ही माझें मत कोठेंतरी प्रसिद्ध कराल !

**बेळ०**–आपल्याला आमचा संशय कां येतो ?

**चं०**–संशय कां येतो ? कोणाचाही, विशेषतः हिंदी माणसाचा, उगीचच संशय घेणें हा माझा स्वभावच नाहीं. परंतु आमचे लोक एकंदरींत संशयखोरच आहेत व त्यामुळें राष्ट्र ह्या दृष्टीनें आमची प्रगति होत नाहीं.

**बेळ०**–पण मी आपलें मत कोठेंही प्रसिद्ध करणार नाहीं.

**चं०**–बरें, मग मी तुम्हांला असें विचारतों, कीं हे नॉन कोऑपरेटर्स कौन्सिल मध्यें येण्याचा जो प्रयत्न करीत आहेत तो कशासाठीं ? तीं मोडण्यासाठींच ना ?

**बेळ०**–होय–पण तें करणें शक्य आहे काय ?

**चं०**–असहकारवाद्यांचा पराजय करण्यास सरकार सर्वसमर्थ आहे. परंतु आधीं कौन्सिलमध्यें मुद्दाम प्रवेश करून घ्यावयाचा व मग तें मोडावयाचा प्रयत्न करावयाचा हा प्रामाणिकपणा नव्हे. मि. गांधीजींची तरी ही विचारसरणी नाहीं आणि ते प्रामाणिक आहेत.

**बेळ०**–गांधींवगैरेविषयीं तुमचें जर असें मत आहे, तर मग तुम्ही त्यांना तुरुंगांत कां पाठवूं दिलें ? ( Why have you allowed him to be sent to Jail ? )

---

Subjects, it could refuse money to transferred subjects if it did not approve of Government policy as to the reserved.

*Sir Narayan to Sir Stanley Reed.*

चं०–तुम्ही काय विचारीत आहां तें तुम्हांला नीट कळत नाहीं असें दिसतें! मी गांधींना तुरुंगांत कां पाठवूं दिलें ह्या प्रश्नांत अर्थ काय आहे ? मी जितकें त्यांस पाठवूं दिलें, तितकेंच तुम्हीही पाठवूं दिलें ! पण असल्या प्रश्नांत अर्थच कांहीं नाहीं.

अध्यक्ष ह्या नात्यानें सर नारायण ह्यांनीं बजाविलेल्या कामगिरीसंबंधानें सर्व हिंदुस्थानभर मुंबईच्या कौन्सिलची स्तुती होत असे. एकदां ता. २९ ज्यान्युआरी रोजीं मि. डी. सी. मेथा नारायणरावांबरोबर फिरत असतांना त्यांनीं सांगितलें कीं, परवां गव्हर्नमेंट हाऊसमध्यें कांहीं सभासद मुक्तकंठानें तुमची स्तुति करीत होते. तुमचे निकाल, तुमचे आधार ह्यांसंबंधानें सर्वांस कौतुक वाटतें. एक गृहस्थ म्हणाले, He is a wonderful old man ! दुसऱ्या एका प्रसंगीं डॉ. दादाचांदजी ह्यांनीं सांगितलें कीं, पार्लमेंटरी प्रोसीजरच्या दृष्टीनें मुंबईचें कौन्सिल सर्व कौन्सिलांच्या दृष्टीनें सर्वांत उत्तम गणलें जात आहे.[1] त्याचप्रमाणें एकदां ना. चुनीलाल मेथा ( त्यावेळीं ते सर नव्हते ) ह्यांजपाशीं मि. स्टॅग्मन म्हणत होते कीं, सर नारायण कौन्सिलचें काम फार कुशलतेनें चालवितात. त्याच वेळीं सर नारायण ह्यांनीं सांगितलें कीं, 'असल्या स्तुतींत कांहीं अर्थ नसतो !' पण मि. स्टॅग्मन ह्यांनीं केलेली स्तुति तशा प्रकारची नव्हती. त्यांनीं अनेक उदाहरणें देऊन व बरीचशी चर्चा करून सर नारायण ह्यांचें एकंदर कार्य उच्च प्रकारचें असतें असें म्हटलें होतें.

## शेवटचें दुखणें व अखेर !

१९२३ सालच्या कौन्सिलच्या पहिल्या बैठकींत अनेक महत्वाचीं कामें झालीं व विश्रांतीसाठीं म्हणून सर नारायण बंगलोर येथें गेले. तेथें बरोबर एक मोठा रिपोर्ट लिहिण्याचें काम ते घेऊन गेले होते. ह्या रिपोर्टामुळेंच त्यांस फार त्रास झाला असावा. कारण रिपोर्टलेखन त्यांनीं एका दिवसांत संपविलें होतें. शनिवार ता. ५ मे १९२३ रोजीं रात्रौ सर नारायण एकाएकीं आजारी झाले; त्या रात्रीं त्यांचे नेहमींचे डॉक्टर जरी येऊं शकले नाहींत, तरी डॉ. झिराड व दुसरे एक डॉक्टर ह्यांनीं सर्व रात्रभर अनेक उपचार केले, त्यामुळें दुखणें वाढलें नाहीं. परंतु सकाळीं नेहेमींचे डॉक्टर आल्यानंतर त्यांनीं प्रकृति पाहून सर्वांस अत्यंत काळजी वाटण्यासारखा निकाल सांगितला ! सर

---

१. "The Bombay Legislative Council was regarded as the best of the Legislative Councils in India in point of Parliamentary procedure." Jan. 1923

नारायण ह्यांचें दुखणें साधेंसुधें नसून ह्यांतून ते उठणें शक्य नाहीं असेंही ते म्हणाले. त्याबरोबर मुंबईहून दोघेही चिरंजीव बंगलोरास गेले. डॉ. परमानंदही जावयाचे, परंतु प्रकृतीस पुष्कळ आराम आहे असा संदेश आल्यामुळें ते राहिले. रविवार ता. ६ पासूनच सर नारायण ह्यांचे प्रकृतीस आराम पडूं लागला. ज्या डॉक्टरांना दुखणें असाध्य वाटलें होतें त्यांचीही भीति कमी झाली. शुक्रवार व शनिवार ता. ११ व १२ रोजीं त्यांस चांगलें बरें वाटूं लागलें होतें, म्हणून श्री. प्रभाकरपंत आपल्या पूज्य तीर्थरूपांची रजा घेऊन मुंबईच्या मार्गास लागले. त्यापूर्वी सर नारायण घरामध्यें हिंडूं फिरूं लागले होते; मुलांशीं हंसणें खेळणें, त्यांच्याकडून करमणूक करून घेणें, स्वतः वाचणें व वाचवून घेणें हे सर्व प्रकार चालू झाले होते. सोमवार ता. १४ रोजीं नित्याच्या वहिवाटीस अनुसरून पहांटे ४॥ वाजतां उठून त्यांनीं भजनप्रार्थना केली; कांहीं धर्मपर ग्रंथांचें वाचन झालें व आतां आपली प्रकृति पूर्ववत् झाली असे ते सर्वांस सांगत होते. त्यांस इतकें बरें वाटत होतें कीं, मोटारमध्यें बसून एक फेरफटका मारून येण्याची त्यांची तयारी होती. अशाप्रकारें सकाळीं ९ वाजेपर्यंत वेळ गेल्यावर त्यांच्या कन्येनें त्यांस एक पेलाभर पेज आणून दिली. नंतर बहिर्क्रियेस जात असतां एकाएकीं त्यांचे हातपाय कापूं लागले; त्यांनीं विठ्ठलरावांस मोठ्यानें हांक मारिली. त्यावेळीं तीर्थरूपांची प्रकृति अगदीं ठीक आहे असा तारेचा मजकूर आपल्या बंधूसाठीं ते लिहीत होते! तसेच उठून ते पित्यापाशीं धांवले व त्यांस आपल्या बाहुपाशांत धरतांच सर नारायण ह्यांचें प्राणोत्क्रमण झालें! प्राणोत्क्रमण झाल्यावरही मृत्यूनें आपला डाव साधला ह्याची बराच वेळ खात्री पटली नाहीं. त्यांच्या शरीरावरील नेहमींचें तें तेज तसेंच कायम होतें व आत्मा ह्या शरीरास सोडून गेला आहे असें मानावयास कोणी धजला नाहीं!

अशा प्रकारें जवळ जवळ अर्ध शतक ज्यांनीं नानाप्रकारें देशहितकारक कार्यें केलीं, आपल्या प्रेमळ सहवासाचा सर्व लोकांस लाभ दिला, उदार विचार, प्रेमळ स्वभाव, धर्मशीलता, ज्ञानलालसा, स्वानुभवकथन, प्रार्थनेवरील दृढ विश्वास, विशाल वाचन, पवित्र व कोमल अंतःकरण, साधा, सरळ व उमदा स्वभाव, गोरगरिबांशीं मिसळून वागणें, पवित्राचरण, पोक्त विचार, दूरदर्शित्व, शिस्त, जें मनास पटलें तें आचरणांत आणण्याची तळमळ, सर्वांगीण उन्नतीचें ध्येय आचरणांत आणून आदर्शवत् चरित्राची मिळविलेली जोड, सर्व धर्म व धर्म ग्रंथ ह्यांविषयीं सर्वांतील सत्यांश ग्रहण करण्याची तत्परता, इ० गुणांचा ज्यांनीं आपल्या चरित्राच्या द्वारें सर्वांस अनुभव आणून दिला ते सर नारायण एकाएकीं गेले हें ऐकून सर्वांस अत्यंत खेद झाला. बंगलोर येथें मंगळवारीं त्यांची प्रेतयात्रा निघाली, त्यावेळीं गांवांतील प्रति-

ष्ठित मंडळी व इतर लोक ह्यांचा फार मोठा समुदाय एकत्र झाला होता. प्रेतयात्रा निघण्यापूर्वी ब्राह्म मिशनरी श्री. सुबुकृष्णय्या ह्यांनीं घरीं प्रार्थना केली. स्मशानांत सर विश्वेश्वरय्या ह्यांनीं सर नारायण ह्यांच्या गुणांचें वर्णन करून त्यांच्या सार्वजनिक कार्याविषयीं विवेचन केलें. सरकारी वकील श्री. शंकर नारायणराव ह्यांनीं त्यांच्या अनेक गुणांची ओळख करून दिली. श्री. सुबुकृष्णय्या ह्यांनीं ब्राह्मसमाज व अस्पृश्य वर्ग ह्यांच्या सेवेचें वर्णन केलें. शेवटीं श्री. महादेव मुदलिआर ह्यांनीं प्रार्थना केल्यावर दुःखित अंतःकरणानें चंदनाच्या चितेवरील सर नारायण ह्यांच्या देहास अग्नीस अर्पण करण्यांत आलें.

## अस्थियात्रा.

सर नारायण प्रकृति सुस्थितींत असतां, विश्रांति घेण्यासाठीं पुष्कळसें काम बरोबर घेऊन बंगलोर येथें गेले, पण तेथेंच त्यांस विश्रांतीची अखेरची शांति मिळून, त्यांच्या अस्थींचा सत्कार करण्याचा दुर्धर प्रसंग ता. २० मे रोजीं मुंबईकरांवर कोसळला. त्यावेळीं हा दुर्दैवाचा विलक्षण खेळ होय असें पुष्कळांस वाटलें. अस्थींचें दर्शन घेण्यासाठीं पुण्याच्या प्रार्थनासमाजाचे कित्येक सभासद व हितचिंतक पुण्याच्या स्टेशनावर आले होते. तेथें डॉ. भांडारकरांचा पवित्र संदेश वाचून दाखविण्यांत आला. खडकीच्या स्टेशनावर एक वृद्ध डॉक्टर मुद्दाम आले होते. आपला व सर नारायण ह्यांचा जुना स्नेह नव्हे, परंतु बाहेर रस्त्यावर फिरत असतां त्यांची भेट होत असे व त्यांच्या संभाषणाचा अलभ्यलाभ व्हावयाचा; आतां त्यांचें दर्शनही व्हावयाचें नाहीं, म्हणून त्यांच्या अस्थींचें शेवटचें पवित्र दर्शन घेण्यासाठीं आलों असें म्हणून अश्रूपूर्ण नेत्रांनीं त्यांनीं दर्शन घेतलें. मुंबईत अस्थियात्रेसंबंधाची बातमी पूर्वीच आलेली असल्यामुळें स्टेशनवर अस्थींचें दर्शन घेण्यासाठीं फार मोठा लोकसमूह हजर होता. गाडी स्टेशनांत येतांच सर्व जमलेल्या जनांचीं जड पावलें अस्थिदर्शनासाठीं पुढें पुढें पडूं लागलीं. प्रथमतः तेथें हजर असलेल्या स्काउट्सनीं सलामी दिल्यावर श्री. विठ्ठलराव अस्थिकरंडक हातीं घेऊन गाडीच्या डब्यांतून बाहेर पडून मार्गक्रमण करूं लागले. बरोबर त्यांचे बंधु श्री. प्रभाकरपंत होते. अस्थिदर्शनासाठीं उत्सुक असलेली सर्व जनता दुतर्फा उभी होती. मधून गत थोर पुरुषाचे हे दोन चिरंजीव जड पावलें टाकीत होते. ह्यावेळीं सर नारायण ह्यांच्या सतेज शरीराच्या छायेच्या दर्शनाची त्यांच्या चिरंजिवांनीं केलेली व्यवस्था पाहून सर्व लोकांस फार बरें वाटलें. ज्याप्रमाणें निद्रावश मनुष्य दिसतो त्याप्रमाणें शांत स्थितीमध्यें निश्चेष्ट पडलेल्या त्या थोर पुरुषाच्या शरीराची ती छाया पाहून पुष्कळांच्या अंतःकरणांत भडभडून आलें व

नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. अस्थीस सलामी झाल्याबरोबर सर नारायण ह्यांचें भजनाचें एक आवडतें पद, जें त्यांनीं आपल्या प्रिय पत्नीस स्मशानयात्रेच्या वेळीं मुद्दाम म्हणवयास सांगितलें होतें तें—**दीनानाथ माउली** हें म्हणवयास सुरवात झाली. नंतर प्रार्थनासमाजाच्या वतीनें श्री. गिरिजाशंकर त्रिवेदी ह्यांनीं अस्थि पुष्पहारांनीं मंडित केल्यावर इतरांनींही पुष्पहार घातले व सर्वांनीं दर्शन घेतल्यावर अस्थियात्रा तेथून निघून प्रार्थनामंदिरांत येऊन दाखल झाली. येथें राममोहन स्कूलच्या स्काउट्स्‌नीं समाजाच्या अध्यक्षांच्या अस्थीस सलामी दिल्या-नंतर भजन करीत करीत मंदिरांत अस्थिप्रवेश झाला! ता. १८ मार्च रोजीं सर नारायण ह्यांनीं मोठ्या उल्हासानें मंदिरांत प्रवेश करून आपल्या नेहमींच्या पद्धतीस अनुसरून प्रार्थनासमाजाचा संदेश सर्वांस मोठ्या उत्साहानें व प्रेमानें कळविला. आणि ता. २० मे रोजीं त्यांच्या अस्थि चिरंजिवाच्या हस्ताचा आश्रय करून मंदिरांत प्रवेश करित्या झाल्या! अस्थींचा सन्मान करण्यासाठीं मंदिरामध्यें पूर्वीच पुष्कळ मंडळी येऊन बसली होती. प्रथमतः प्रार्थनासमाजाचे उपाध्यक्ष श्री. वासुदेव गोपाळ भांडारकर ह्यांनीं प्रसंगास उचित अशी प्रार्थना केल्यावर सर गोकुळदास पारेख, सर लल्लुभाई शहा, डॉ. राणीना, रेव्ह. ग्रे, प्रो. अहमदी, श्री. वाघमारे इ० भाषणें झालीं. श्री. वाघमारे ह्यांच्या अत्यंत कळकळीच्या भाषणाचा सर्वांच्या मनावर तात्काळ परिणाम झाला.

## आधुनिक काळांतील एकनाथ महाराज

ते म्हणाले 'सर्वांचे सर नारायण गेले, पण त्यांत आमचे आधुनिक काळांतले एक-नाथ महाराज आम्हांला सोडून गेले! नाथांनीं एका पोराचा शेंबूड पुसला व त्याला कडेवर घेतलें. व महाराच्या घरचें अन्नसेवन केलें; पण हे ह्या युगांतले प्रत्यक्ष नाथमहाराज आम्हा सर्वांचा शेंबूड पुसून आम्हांला बाहेरून व आंतून स्वच्छ करून आमची उन्नति करण्यासाठीं रात्रंदिवस खपले! ह्यांच्या गृहांत प्रवेश करा-वयास आम्ही भ्यावें, लाजावें; परंतु ह्या नाथ महाराजांनीं माझ्यासारख्या फाटक्या माणसालाही मोठ्या सत्कारानें वर न्यावें व आपल्याजवळ बसवून स्वतः चहा द्यावा! वारंवार सहभोजनाचे प्रसंग घडवून आणून आमच्या पंक्तीस बसून आम्हांला पावन करावें! दुर्दैव आमचें हे नाथ महाराज आम्हांस अधिक काळ लाभले नाहींत.' त्या दिवशीं भाषणें झाल्यावर अस्थि घरीं नेण्यांत आल्या. घर सोडतांना जें शरीर निकोप स्थितींत होतें त्याच्या अस्थींचा ता. २० मे रोजीं त्याच गृहांत प्रवेश झाला! एकेवर्षी उन्हाळ्याच्या सुटीनंतर नारायणराव परत आले त्यावेळीं आपल्या खोलींतून दिसणाऱ्या झाडांनीं आपल्या प्रसन्नतेच्याद्वारें व कावळ्यांनीं आपल्या

खिडकींत येऊन ओरडून ओरडून आपलें स्वागत केलें असें त्यांनीं म्हटलें होतें. वरील दिवशीं त्या गृहांत असलेल्या सर्व व्यक्तींच्या दु:खाश्रूंनीं त्यांचें स्वागत केलें !

## दु:ख प्रदर्शन.

१४ मे १९२३ रोजीं सर नारायणराव ह्यांचें इहलोकींचें वास्तव्य एकाएकीं संपलें. त्यांच्या मृत्यूनंतर हिंदुस्थानांतील शेंकडों वर्तमानपत्रांत त्यांच्यासंबंधानें आलेले लेख जर एकत्र केले तर तो एक मोठा ग्रंथच होईल. म्हणून त्यांचा उल्लेख येथें करीत नाहीं. ता. २३ मे १९२३ रोजीं मुंबई सरकारचा त्यांच्यासंबंधाचा दु:ख-वव्याचा ठराव त्यावेळचे चीफ सेक्रेटरी मि. चॅट्फील्ड ह्यांच्या सहीनें बाहेर पडला. त्यांतून कांहीं भाग येथें घेतला आहे :—

" As a Judge he was noted for his deep study and knowledge of Hindu Law and as Vice-Chancellor for his exemplary efforts to raise the tone of Education in India...In 1921 he returned to public life as first President of the Reformed Legislative Council which office he continued to fill up to the time of his death. In this capacity he displayed a wide knowledge of Parliamentary precedent and custom and established in the Legislative Council a procedure founded upon the best traditions of the House of Commons. His authority was held in the greatest respect by the Council; and its members always accepted his rulings as just and final. His services as President have been invaluable to a newly created popular assembly whose traditions were yet to be formed.

Apart from his professional and official career Sir Narayan Chandavarkar was a man of wide interests and many-sided activities. As a politician he was always a sane and moderate Reformer who has exercised the best possible influence on the younger generation. His humanitarian activities were also very great and varied. He was intimately connected with the foundation and administration of the Bombay Branch of the Countess of Dufferin Fund, of which he was appointed Vice-President in 1904 and he also took very active part in the movement for the raising of the Depressed Classes. He was always on the side of social reform and ready to lend his influence to any movement having for its object the advancement of human happiness in whatever class or creed.

By his death Western India and particularly the city of Bombay loses one of her most distinguished citizens whose abilities and achievements in public life, great though they were had always to yield pride of place to those outstanding qualities of uprightness, honesty, and unfailing courage which were so specially his. It was in consideration of his high character and wide sympathies that he was Knighted in 1910 and the honour he had so well earned as a Judge of the High Court and Vice-Chancellor of the University of Bombay was as jealously guarded. throughout the remainder of his career culminating in the high office of President of the Legislative Council.

न्या. मू. रानडे ह्यांच्या मृत्यूनंतर सर नारायण ह्यांची प्रार्थनासमाजाच्या अध्यक्षाच्या जागीं नेमणूक झाली होती, व १९२३ सालींही समाजाचे तेच अध्यक्ष होते. त्यांच्या आकस्मिक मृत्यूनंतर समाजाच्या व्यवस्थापक मंडळीनें जो दुखवट्याचा ठराव केला त्यावरून त्यांच्यासंबंधानें प्रार्थनासमाजाचा किती आदर होता त्याची कल्पना होणार आहे. हा महत्त्वाचा ठराव पुढें दिला आहे:—

The Managing Committee of the Prarthana Samaj, Bombay, places on record its profound grief at the decease of its President Sir Narayan Ganesh Chandavarkar while still in full possession and active exercise of his mature intellectual, moral and spiritual faculties. During his long connection with this Samaj, as a member, its secretary, a trustee and its President, he rendered invaluable services to it, in the administration of its affairs, in guiding its counsels, and in maintaining and elevating its spiritual tone. In spite of his manifold activities, which engrossed much of his time and energy he did not in any degree abate his devotion to this Samaj, but on the contrary considerably helped its cause, by pressing its ideals on the attention of his colleagues in such secular work. In his devoted work for the elevation of the depressed classes, his anxious endeavours to train the youth of this city in the cultivation of the higher life, in his unremitting labours in the interest of the oppressed womanhood of the land and in his active sympathy with distress generally, he carried out in practice the principles which this Samaj has cherished from the first. His spirituality, his force of character, his bold advocacy of great causes in spite of their unpopularity were an inspiration, whilst his close intimacy with the highest and best thought of Western

and Eastern prophets and seers was an acquisition which few men in the ordinary walks of life could hope to achieve. Great as was his eminence as lawyer, jurist and publicist, his spiritual fervour and the religious discipline, to which he submitted himself with such signal success whilst scrupulously doing whatever his secular duties required of him, will stand out for all times as a splendid example of a new type of Indian saint who combined whatever was best in the ancient Indian and the Western types of sainthood with an active life in a harmonius combination.

हायकोर्टाचे माजी अगर न्यायासनावर असलेले न्यायाधीश गत झाले, म्हणजे त्यांच्या मृत्यूसंबंधानें हायकोर्टांत जाहीर रीतीनें खेद प्रदर्शित करण्याची वहिवाट आहे. सर नारायण ह्यांस उन्हाळ्याच्या सुट्टींत देवाज्ञा झाल्यामुळें, ता. ३० मे रोजीं जरूरीच्या कामासाठीं जेव्हां कोर्ट उघडलें त्यावेळीं ॲक्टिंग चीफ जस्टीस सर लल्लूभाई शहा व न्या. मू. काजीजी ह्यांच्या कोर्टांत दुःखप्रदर्शक भाषणें झालीं. सर लल्लूभाई ह्यांनीं पुढील आशयाचे उद्गार काढले:–

"सुमारें पंधरा दिवसांपूर्वी बंगलोर मुक्कामीं सर नारायण चंदावरकर ह्यांचा जो आकस्मिक व खेदजनक मृत्यु झाला त्याचा आज उल्लेख करणें हें आमचें खेद-जनक कर्तव्य आहे. १८८१ सालापासून त्यांनीं ह्या कोर्टांत आपल्या वकिलीच्या धंद्यास सुरुवात केली. दीर्घ काल व पूर्ण यशस्वी रीतीनें त्यांनीं वकीली केल्यानंतर १९०१ सालीं त्यांची हायकोर्ट जज्जाच्या जागीं नेमणूक झाली. १९१३ सालीं त्या जागेचा राजीनामा देईपर्यंत ते त्या जागेवर बारा वर्षांपेक्षां अधिक काळपर्यंत होते. मृत्यूसमयीं ते मुंबईच्या कायदेकौन्सिलचे अध्यक्ष होते. वकील ह्या नात्यानें त्यांस आलेला अनुभव, कोणतीही गोष्ट त्वरित लक्षांत घेण्याची त्यांची हातोटी, त्यांचा दीर्घोद्योग व दृढ निर्धारपूर्वक त्यांनीं केलेलें अध्ययन, त्यांचें कायद्याचें ज्ञान व कायद्यावरील व विशेषतः हिंदुधर्मशास्त्रावरील त्यांचें प्रेम, केस लॉ ज्याला म्हणतात त्या विषयींची त्यांची माहिती, त्यांचा साधेपणा व त्यांचें पवित्र चरित्र ह्यांच्यायोगें जज्ज ह्या नात्यानें त्यांस आपलें कर्तव्य सहज-सुलभतेनें, आत्मविश्वासानें, व पूर्ण यशस्वी रीतीनें करितां आलें. ह्या कोर्टाच्या आजपर्यंतच्या जज्जांची मोठी मालिका आहे तींत सर नारायणरावांचा नंबर गुणांच्या दृष्टीनें पुष्कळच वर लागेल. त्यांच्या मृत्यूमुळें ह्या इलाख्यांतील एका नामांकित पुढाऱ्यास आपण मुकलों आहों. त्यांच्या मृत्यूमुळें रिकामी झालेली जागा सहज भरून निघण्यासारखी नाहीं." ह्यानंतर बॅरिस्टरांच्या वतीनें बोलाव-यास ॲडव्होकेट जनरल हजर नव्हते, म्हणून मि. बिनिंग बॅरिस्टर ह्यांनीं भाषण

करितांना असें सांगितलें कीं, न्या. मू. शहा ह्यांनीं जें म्हटलें आहे तें मला पूर्ण-पणें मान्य आहे. दुःखांत समाधान मानावयास थोडी अशी जागा आहे कीं, पुष्कळ वर्षें अत्यंत उपयुक्त व सन्माननीय अशा रीतीनें आयुष्य घालविल्यानंतर सर नारायण आपल्यामधून गेले आहेत. पुष्कळ वेळां बॅरिस्टर ह्या नात्यानें त्यांच्या कोर्टांत काम करण्याचे प्रसंग मला आले आहेत. ह्या सर्व वेळांचा माझा अनुभव असा आहे कीं, ते माझें म्हणणें शांतपणें ऐकून घेत व आमच्याशीं त्यांचें वर्तन मोठ्या सभ्यतेचें असे. सर नारायण हे वकील–बॅरिस्टरांचे मित्र होते. माझी अशी खात्री आहे कीं ह्या कोर्टांत त्यांची आठवण सन्मान व आदरपूर्वकच राहील. ह्यावेळीं श्री. सीताराम सुंदरराव पाटकर, माजी हायकोर्ट जज्ज, हे सरकारी वकील होते. त्यांनीं ह्या दिवशीं पुढील आशयाचें भाषण केलें:—

"सर नारायण चंदावरकर ह्यांच्यासंबंधानें आतांच न्यायमूर्तींनीं जे उद्गार काढले त्यांस मी सर्व वकिलांच्या वतीनें दुजोरा देतों. ते ह्या कोर्टाचे एक नामांकित जज्ज होते. सर नारायण ह्यांनीं वाङ्मयविषयक, धर्मविषयक, न्यायविषयक, सामाजिक, राजकीय व व्यवहारविषयक क्षेत्रांमध्यें आपली आठवण राहील असें कार्य केलें आहे. ह्या कोर्टाचा ज्यांचा संबंध नाहीं अशा त्यांच्या लोकसेवेच्या अनेक कार्यांचें वर्णन करण्याचें हें ठिकाण नव्हे, मात्र लेजिस्लेटिव्ह कौन्सिलच्या अध्यक्षपदाचा मान मिळणें ही त्यांच्या चरित्रांतील शेवटची व महत्त्वाची बाब होय एवढें येथें नमूद करणें अगत्याचें आहे. सर नारायण चंदावरकर ह्यांनीं ह्या कोर्टामध्यें १८८१ सालीं वकिली करण्यास प्रारंभ केला व त्यांची हुषारी, काम चालविण्याची उत्तम पद्धत, त्यांची परिणामकारक भाषण करण्याची शैली व नामांकित वकिलांचीं उदा-हरणें पुढें ठेवून काम करण्याची त्यांची रीत ह्यांमुळें ते लवकरच पुढें आले व त्यांस येथील व बाहेरगांवच्या कोर्टांमधून पुष्कळ कामें मिळूं लागलीं. १९०१ सालापर्यंत हुषार व नामांकित वकील अशी कीर्ति संपादन केल्यानंतर त्यांस ह्या कोर्टाचे एक जज्ज नेमण्यांत आलें. त्यांनीं कांहीं काळ चीफ जस्टिसचेंही काम केलें व शेवटीं १९१३ सालीं त्यांनीं पेन्शन घेतलें. त्यांनीं दिलेल्या निकालांचा विचार करितां त्यांस कायमच्या तत्त्वांचें बिनचूक ज्ञान आढळे व ज्याला केस लॉ असें म्हणतात त्याचें सर्व मुद्यांवरचें त्यांचें ज्ञान अगदीं अद्यावत असे. त्याचप्रमाणें त्यांचें वादकौशल्य, त्यांचें अगाध ज्ञान आणि कायद्याच्या फार बिकट प्रश्नांची सर्वांना समजेल अशा सुंदर भाषेंत मांडणी करण्याचें त्यांचें कौशल्य त्यांनीं दिलेल्या निकालांत दिसून येतें. हिंदुधर्मशास्त्राचा त्यांनीं मोठ्या आवडीनें व फार मेहनत घेऊन जो अभ्यास केला होता तो हिंदुधर्मशास्त्रासंबंधाच्या बिकट भागावरील त्यांच्या निकालांवरून स्पष्टपणें दिसून येतो. हे निकाल पाहणारास

त्यांची विद्वत्ता व हिंदुधर्मशास्त्राच्या क्षेत्रांत त्यांनीं केलेलें संशोधन व कित्येक गुंतागुंतीच्या प्रश्नांवर त्यांनीं जो प्रकाश पाडला त्याची कल्पना होते. त्यांची एकंदर विद्वत्ता, त्यांचें कायद्याचें बिनचूक ज्ञान, त्यांचें असाधारण भाषाप्रभुत्व, अल्पकाळांत महत्त्वाचे मुद्दे ध्यानांत घेण्याचें सामर्थ्य, न्यायाविषयीं आवड, त्यांची सरळ वृत्ति व सत्यप्रीति ह्यांमुळें त्यांच्याविषयीं सर्वत्र आदर वसत असे व ज्यांचा ज्यांचा त्यांच्याशीं संबंध येई त्यांच्या ठिकाणीं त्यांच्याविषयीं आदर व प्रेम वसूं लागे."

ना. गव्हर्नर सर जॉर्ज लॉइड ह्यांनीं १९२३ च्या जूनमध्यें कौन्सिलची सभा भरविली त्यावेळीं सर नारायण ह्यांच्यासंबंधानें दोन शब्द बोलावयाचे आहेत, म्हणून विशेषतः कौन्सिलची बैठक बोलाविली असें सांगून त्यांनीं गुणवर्णनपर सुंदर भाषण केलें. प्रेसिडेंट ह्या नात्यानें त्यांच्या कामासंबंधानें बोलतांना ते म्हणाले :—

Sir Narayan Chandavarkar's work in this council was to my mind of such far reaching importance that its greatness like that of all other great constructive pieces of work will never be fully realised by this generation. Upon him fell the task of creating by direct guidance and by the indirect influence of his personality a worthy tradition for the deliberations of the Reformed Councils...This House will, I am confident, find other Presidents who will make for themselves great reputation in the Chair, but I am equally sure that none will ever surpass him or earn in fuller measure the gratitude of this Presidency.

त्यांच्या इतर कार्यासंबंधानें बोलतांना ते म्हणाले :—

I have seldom met a public man who had such persistent honesty of vision and such staunchness in declaring and maintaining his views. He saw that India's greatest need was to free herself from the shackles imposed by the caste system and by existing social conditions and he never ceased to preach the need of that freedom and to work for it. If in nothing else he has his reward, at best in this that his memory will live long in the grateful thoughts of many thousands of those for whom he worked and it is I believe, the reward he would most have prized.

ह्या सभेंत मुख्य दुखवट्याचा ठराव दि. ब. गोडबोले ह्यांनीं कौन्सिलपुढें मांडून भाषण केलें. त्याचप्रमाणें पुष्कळ सरकारी व बिनसरकारी सभासदांनीं प्रसंगोचित भाषणें केलीं. डेप्युटी प्रेसिडेन्ट रा. सा. हरिलाल देसाई ह्यांनीं सांगितलें कीं, १९२१ व १९२२ सालीं सिमल्यास कौन्सिलांचे अध्यक्ष व उपाध्यक्ष ह्यांच्या ज्या

परिषदा झाल्या त्यावेळीं सर नारायण ह्यांचें वादविवादामध्यें मोठेंच सहाय्य होत असे. त्यांच्या विचारांस योग्य मान मिळे व त्यांच्या सूचना सर्वांस मान्य होत. सरकारी सभासदांच्या वतीनें बोलतांना पूर्वीचे न्या. मू. सर मॉरिस हेवर्ड ह्यांनीं महत्त्वाचें भाषण करतांना पुढील उद्गार काढले:—

He must testify personally, as an intimate colleague on the bench, to his deep erudition and learning, to his high character and wide sympathies, and those qualities of uprightness, honesty and unfailing courage which were his so conspicuously both in private and public life. They would be ever grateful each one of them for his kindly help in all their difficulties, technical or otherwise and for all that he had done for informing them of the right tradition and for his assiduous devotion to duty, which had set a noble example to be followed by succeeding generations both of executive officers and of Legislators in the Presidency.

ह्याच वेळीं सर नारायण ह्यांच्या जागेवर नेमलेले कौन्सिलचे प्रेसिडेंट सर इब्राहिम रहिमतुल्ला ह्यांनींही महत्त्वाचें भाषण केलें. १८८५ सालीं हिंदुस्थानच्या वतीनें कामगिरी करून परत आल्यानंतर त्यांचें जें पहिलें भाषण ऐकिलें त्यांचा सर्वांवर तत्काळ परिणाम झाला, व आपल्या इलाख्याचे हे एक भावी पुढारी होणार असें आम्हांस वाटलें असें ते म्हणाले.

सर नारायण ह्यांच्या स्मरणार्थ अनेक सभा झाल्या. अनेक संस्थांनीं दुखवट्याचे ठराव केले. स्काऊट संस्थेचे ते प्रॉव्हिन्शिअल कमिशनर असल्यामुळें बेडन पॉवेल स्काऊटसची जाहीर सभा झाली. स्टूडंट्स ब्रदरहूड, रॉयल एशियाटिक सोसायटी, आर्यन् एक्सेलसिअरलीग वगैरे संस्थांच्या वतीनें सभा झाल्या. व त्यांनीं आपापल्या संस्थांस उद्देशून ठराव केले. शेवटीं टाऊन हॉलमध्यें शेरिफ सर तेमुळजी नारिमन ह्यांच्या आमंत्रणावरून गव्हर्नर साहेबांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या सभेचा उल्लेख करून हा दुःखप्रदर्शनाचा भाग संपवितों. गव्हर्नर साहेबांनीं ह्या सभेंत स्वतंत्र भाषण न करितां कौन्सिलच्या बैठकींत केलेल्या भाषणावर हवाला देऊन असें सांगितलें कीं,

No greater President could have been selected for the post to give dignity, order and honour to the proceedings of the Bombay Legislative Council. In his private life as in his public career he deserved the very best tribute that the people of India can possibly give to him.

ह्या सभेंतला ठराव सर लल्लूभाई शहा ह्यांनीं सभेपुढें ठेवून सर नारायण ह्यांचे-

संबंधानें भाषण केलें. त्या भाषणांत त्यांनीं विशेषतः असें सांगितलें कीं, संमति-वयाच्या बिलाच्या वेळीं नारायणरावांनीं जो पुढाकार घेतला होता तेव्हांपासून त्यांच्या चरित्राकडे माझें विशेष लक्ष लागलें. तेलंगांच्या आठवणी वाचून नारायणरावांच्या एकंदर उदार धोरणाबद्दल खात्री पटली. नंतर वकील ह्या नात्यानें त्यांच्या कामा-कडे पहात असतां त्यांची थोर योग्यता व सरळ रीतीनें आपलें काम करण्याची पद्धत ह्यांचा माझ्या मनावर इष्ट परिणाम झाला. परंतु १९०० सालीं त्यांचा स्वदेशाभिमान व त्यांचें धैर्य कसास उतरलें.[१] त्यावर्षी त्यांनीं राष्ट्रीय सभेचें अध्यक्षपद स्वीकारलें व लागलीच थोड्या दिवसांनीं त्यांना हायकोर्टाचे जज्ज नेम-ल्याचें प्रसिद्ध झालें. त्यावेळीं ते सरकार व जनता ह्यांच्या आदरास पात्र झाले. सेवानिवृत्त झाल्यानंतरच्या आठ-दहा वर्षांत त्यांच्या कार्यासंबंधानें त्यांच्या चरित्र-काराला पुष्कळ माहिती सांपडेल. आपला वेळ कसा घालवावयाचा हा त्यांच्यापुढें प्रश्न नसे, तर जो वेळ आहे त्यांत पुष्कळशीं कामें कशीं करावयाचीं ह्याचा त्यांना विचार पडे. म्हणजे रात्र थोडी व सोंगें फार असा कांहींसा प्रकार होत असे. सर नारायण सामाजिक, धार्मिक, राजकीय अशा कोणत्याही महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार करूं लागले म्हणजे त्याचा मागील इतिहास व त्याचा भविष्य काळीं होणारा परिणाम ह्यांचा प्रथम विचार करीत. त्याचप्रमाणें ते स्वतः थोर कायदेनिष्णात असल्यामुळें प्रत्येक विषयाची Constitutional बाजू ते अवश्य विचारांत घेत.[२] ह्या दिवशीं श्री. के. नटराजन ह्यांचें झालेलें भाषण फार महत्त्वाचें होतें. श्री. नटराजन ह्यांचा सर नारायण ह्यांच्याशीं पंचवीस वर्षें निकट परिचय होता. त्यांच्याशीं सर नारायण ह्यांचीं संभाषणें, वादविवाद व विचारविनिमय वारंवार होत असे. ह्या निकट परि-चयामुळें श्री. नटराजन ह्यांस सर नारायण ह्यांची खरी योग्यता कळण्यास पुष्कळ साधनें मिळालीं. म्हणून दुसऱ्या कोणाच्याही भाषणांत जेमुद्दे आले नाहींत ते त्यांच्या भाषणांत आले. सर्व बाबतींत आंत एक व बाहेर निराळें असा त्यांचा प्रकार नसे. बाहेर बोलावयाचें एक व घरीं करावयाचें निराळें हा प्रकार त्यांस माहीत नव्हता. पूर्ण विचार करून सर्व गोष्टी करावयाच्या हा त्यांचा बाणा असे. आज लोकांचीं व सगळ्या देशाची सुधारणा करावयास सर्वच सिद्ध होत असतात. इतरांच्या सुधारणेसारखें दुसरें सुलभ कार्य नाहीं. परंतु आपल्या स्वतःच्या सुधारणेकडे,

१ On that occasion he showed a happy combination of patriotism and courage which won for him the respect of Government as well as the people.

२ As a great constitutional lawyer, he considered every subject from the constitutional point of view.

स्वतःच्या दोषजागृतीकडे व दोषनिवृत्तीकडे कोणाचें लक्ष असत नाहीं. पण, सर नारायण हे सतत आपले स्वतःचे दोष घालविण्याचा प्रयत्न करीत असत.[१] अशा वेळीं ते स्वतःच आरोपी, स्वतःच ज्यूरी व स्वतःच न्यायाधीश असत व ते आपल्या समोरील आरोपीसंबंधानें कधीं कधीं न्यायनिष्ठूर असत, त्यापेक्षां स्वतःसंबंधानें ते अधिक निष्ठुरता दाखवीत. आणि ते एक धर्मनिष्ठ गृहस्थ होते. त्यांचा विश्वास दृढ होता व आंतबाहेर धर्म्य आचरण ठेवण्याचा त्यांचा प्रयत्न असे.

ह्याच सभेंत सर जमशेदजी जीजीभाई, सर चिमनलाल सेटलवाड, सर फिरोझ सेटना, सर मॅक्नाटन, दि. ब. गणपत सदाशिव राव, सर पुरुषोत्तमदास, न्या. मू. काजीजी, मि. एच्. पी. मोदी वगैरेंचीं भाषणें झालीं. दि. ब. राव ह्यांनीं सांगितलें कीं, हिंदु कायद्यासंबंधानें नारायणरावांनीं दिलेले निकाल सर रेमंड वेस्ट व सर मायकेल वेस्ट्रूप ह्यांनीं दिलेल्या निकालांच्या तोडीचे असून ते अजरामर झाले आहेत.

ह्या सभेंत ठरल्याप्रमाणें सर नारायण ह्यांच्या स्मारकासाठीं वर्गणी जमविण्यांत आली व एल. एल. बी. च्या परीक्षेंत पहिल्या वर्गांत पास होऊन हिंदुधर्म शास्त्रांत सार्वंत अधिक गुण मिळविणाऱ्या व पुढें एल. एल. एम. ह्या परिक्षेचा अभ्यास करण्याऱ्या विद्यार्थ्यास स्कॉलरशिप देण्यासाठीं दहा हजार रुपये मुंबई विद्यापीठाच्या हवालीं करण्यांत आले.

---

१ The great thing that impressed any one who came in close contact with Sir Narayan was his constant endeavour to overcome his own little human shortcomings...He was habitually more severe to himself than he ever was to the worst criminal that came before him.

प्रकरण सोळावें

# कांहीं संभाषणें

सर नारायण हे पुष्कळ प्रसंगीं थोरामोठ्यांशीं होणारीं अगर दुसरीं महत्वाच्या विषयावरील संभाषणें लिहून ठेवीत. ग्रंथविस्ताराच्या भयास्तव तीं सर्व येथें देतां येत नाहींत. म्हणून कांहीं ह्या प्रकरणांत दिलीं आहेत :—

## ज्ञानेश्वरींत अर्थशास्त्र, निशःब्द् प्रार्थना

एके दिवशीं सायंकाळीं नारायणराव लोणावळें येथें डॉ, भांडारकरांच्या भेटीस गेले असतां त्यांच्यांत व भांडारकरांत पुढील संभाषण झालें :—

**सर नारायण**—अलीकडे केवळ ऐहिक कल्याणाची दृष्टी ठेवून आपल्या बहुतेक संस्था स्थापन होत असतात. ज्ञानेश्वरांनीं बाराव्या अध्यायांत ब्रम्हविद्येची याचना केली आहे आणि त्यांनीं म्हटलें आहे कीं घेणें देणें सुखचिवरी । हों देईं जगा. ह्यावरून मी असा बोध घेतों कीं, देशाच्या सांपत्तिक वगैरे उन्नतीचा पाया आध्यात्मिक उन्नति हा असावा. देणें घेणें म्हणजे मागणी व पुरवठा, आयात निर्गत, एक्सचेंज वगैरे. अर्थशास्त्रांतील सर्व तत्त्वांचा ह्या दोन शब्दांत समावेश होतो.

**सर रामकृष्ण**—ज्ञानेश्वरांच्या मनांत हे सर्व अर्थ होते हें तुम्ही कशाच्या आधारावर म्हणतां ?

**सर नारायण**—ज्ञानेश्वरांनीं जेव्हां ही शब्दयोजना केली त्यावेळीं त्यांना अर्थशास्त्र अवगत होतें, अगर त्या शास्त्रांतील विशेष शब्दांच्या व्याख्यांची त्यांना कल्पना होती असा माझ्या म्हणण्याचा भाव नाहीं. त्यांना अर्थशास्त्राची कांहीं कल्पना नव्हती व त्यांनीं धर्माच्या भावनेनेंच त्या शब्दांचा उपयोग केलेला आहे हेंही मला मान्य आहे. मला इतकेंच सुचवावयाचें आहे कीं त्या शब्दांचा तशा तऱ्हेचा अर्थ आज होणें शक्य आहे.

**सर रामकृष्ण**–ज्ञानेश्वरांच्या त्या शब्दांचा त्यांच्या मनांतील अर्थ काय आहे हें पहाण्यासाठीं प्रथम मागचा पुढचा संबंध पाहिला पाहिजे. ज्ञानेश्वरीवर प्रवचनें देणारे काय अर्थ करितात तें पाहिलें पाहिजे; त्याचप्रमाणें ज्ञानेश्वरीवरील इतर टीकाकार त्यांचा काय अर्थ लावितात तेंही ध्यानांत घेऊन अर्थ ठरविला पाहिजे. ज्ञानेश्वरी हा एक फार कठिण ग्रंथ आहे, तो नीट समजावा अशी ज्यांची इच्छा आहे त्यांनीं वरील सर्व गोष्टी ध्यानांत धरून त्या ग्रंथाचें अध्ययन केलें पाहिजे. सारांश, तुम्ही आपला अर्थ सुचविण्यापूर्वी लोकमान्य अर्थ लक्षांत घेतला पाहिजे. कोणत्याही ग्रंथाचें रहस्य समजून घेण्याची शास्त्रोक्त व विद्वानांस मान्य अशी ही पद्धत होय. ह्याच पद्धतीनें ज्ञानेश्वर अगर तुकाराम ह्यांचें हृद्गत समजून घेण्याचा आपला प्रयत्न असावा. डॉ. मॅक्निकल ह्यांनीं म्हटलें आहे कीं, विद्वान् मंडळी तुकारामाच्या अभंगांचे निरनिराळे अर्थ लावितात. तें अगदीं खरें आहे. ज्ञानेश्वरी एकदम समजावयास तर कठीण आहेच, पण तुकारामाचे अभंग देखील कित्येक ठिकाणीं समजावयास कठीण आहेत.

**सर नारायण**–आपण म्हणतां तें अगदीं बरोबर आहे. पण तुकारामानेंच म्हटलें आहे ना, "तुका म्हणे वादें। वायां गेलीं ब्रम्हवृंदें॥" किंवा "ज्ञानियांचे घरीं चोजविता देव। तेथें अहंभाव पाठी लागे॥" विद्वानांनीं आपलें विद्वत्व खर्चून नानाप्रकारचे अर्थ सुचवून आपल्या विद्वत्तेचें खुशाल प्रदर्शन करावें, पण जीं गरीब साधीं भावडीं माणसें[1] आहेत त्यांना सहज रीतीनें सुचणारा सुलभ अर्थ त्यांनीं कां पुढें करूं नये, व आपला अनुभव व आपलें ज्ञान ह्यांच्या अनुरोधानें अर्थ समजून घेण्याचा प्रयत्न कां करूं नये? आतांचेंच उदाहरण आपण घेऊं. ज्ञानेश्वरांच्या "देणेंघेणें" ह्या शब्दांचा मीं सुचविलेला अर्थ भलताच ( Extravagant ) असें कां म्हणावें? माझें म्हणणें इतकेंच आहे कीं, ज्ञानेश्वरांना आधुनिक अर्थशास्त्र जरी माहित नसलें तरी त्यांच्या ह्या शब्दांचा तसा अर्थ होणें शक्य आहे.

**सर रामकृष्ण**–कोणताही अर्थ सुचवावयास माझी कांहींच हरकत नाहीं, माझें म्हणणें इतकेंच आहे कीं, चमत्कारिक, मनःकल्पित ( Fanciful ) अर्थ सुचवूं नये!

**सर नारायण**–टिळकांनीं आपल्या गीतारहस्यांत गीतेमध्यें कर्ममार्गच सांगितला आहे असें जें म्हटलें आहे त्यासंबंधानें आपलें काय म्हणणें आहे?

**सर रामकृष्ण**–त्यांनीं आपला पक्ष अति कोटीला नेला आहे असें मला वाटतें व पुष्कळ शास्त्री व पंडित लोकांनीं त्यांच्या ह्या आग्रहाविरुद्ध सप्रमाण

---

१ येथें सर नारायण आपण स्वतः एक साधा भावडा माणूस असल्याची ग्वाही देत आहेत.

टीका केली आहे. ( नंतर प्रार्थने संबंधानें बोलणें निघालें असतांना ) संसारांतील बिकट प्रसंगांमुळें दुःखाचा माझ्या मनावर पगडा असतांना **हा तो नव्हे कांहीं निराशेचा ठाव** व इंदुप्रकाश प्रतींतील ह्याच्या पूर्वींचे साहासात अभंग ह्यांच्या द्वारें मनाला कितीतरी शांति व समाधान प्राप्त होतें. ह्यांच्यामध्यें साधारणपणें एकाच प्रकारची विचारसरणी आहे आणि वर म्हटल्याप्रमाणें ते मनाला दुःखाच्या वेळीं शांति प्राप्त करून देणारे आहेत. आतां तुम्हीच माझ्या आजच्या स्थितीकडे पहा. मी आतां लोणावळ्यास आलों आहें आणि ह्या घरांत एकटाच राहात आहें. ह्याच माझ्या घरांत कांहीं वर्षांपूर्वीं मी माझें कुटुंब, माझे मुलगेमुली, त्यांचीं मुलेंबाळें अशीं राहात होतों. पण आतां पहा माझें कुटुंब गेलें, माझी ज्येष्ठ कन्या निवर्तली, माझा ज्येष्ठ पुत्रही माझ्या समोर गेला आणि मीं ह्या पूर्वीं एकदा मुलांमाणसांनीं भरलेल्या घरांत एकटा येऊन राहिलों आहें. हे विचार मनांत आले म्हणजे तें दुःखानें व्याप्त होतें; पण देवाचा विचार मनांत आला, त्याला शरण गेलों, त्याची प्रार्थना केली म्हणजे मनाला शांति प्राप्त होते, असा माझा अनुभव आहे.

**सर नारायण**–आपण Fellowship of Silence हा ग्रंथ वाचला असेलच. त्यांत जें शांत रहाणें असें म्हटलें आहे त्याचा अर्थ गप्प रहाणें असा होतो काय? आपल्या मनाशींही कांहीं बोलावयाचें नाहीं व फक्त देवालाच बोलूं द्यावयाचें असा त्याचा अर्थ समजावयाचा काय? असा जर त्याचा अर्थ केला तर आत्मगत भाषणापासून किंवा विचारापासून मनाला परावृत्त कसें करावयाचें? मन हें कांहीं शांत बसत नाहीं. त्यांत नाना प्रकारचे विचार येत असतात. बरें, कांहीं विचार मनांत अगदीं येऊं द्यावयाचेच नाहींत असें म्हटलें तर कंटाळा येऊन डोळे पेंगावयास लागतात, म्हणून मनाला देवाशीं संभाषण करूं द्यावेंच लागतें असा माझा अनुभव आहे.

**सर रामकृष्ण**–निःशब्द प्रार्थना ( Silent Prayer ) असें जिला आपण म्हणतों तिचा अर्थ मनालाही निर्व्यापार ठेवणें असें नव्हे. कारण आपण जागे असलों तर मन कांहीं निर्व्यापार राहूं शकत नाहीं. आणि जेव्हां तोंडावाटे शब्द न काढतां देवाची प्रार्थना करावयाची त्यावेळीं ह्या आपल्या मनाला देवाशीं बोलूं दिलेंच पाहिजे. निःशब्द प्रार्थना म्हणजे तोंडावाटे शब्द काढल्यावांचून आपलें देवाशीं बोलणें व आपल्या मनांत देवाचे उमटणारे शब्द ऐकणें.

**सर नारायण**–उपनिषदांत व गीतेंत देवाच्या व्यक्तित्वाबद्दल Personality जें विवरण आढळतें त्यांत स्थूलमानानें कोणता विशेष भेद दाखवितां येईल?

**सर रामकृष्ण**–अंतःकरणामध्यें गूढरूपानें वास करणारें जें परमेश्वराचें तत्त्व आहे त्याचेविषयीं ज्याप्रमाणें विवरण आहे त्याचप्रमाणें परमात्म्याविषयीं मनन

ह्याविषयीं विचार असून हें विवरण परमेश्वर हा व्यक्ति आहे असें दर्शवितें. परमेश्वर मनुष्य प्राण्याच्या अंतःकरणांत वास करीत आहे हें तत्त्व गीतेंत[1] असून मनुष्य प्राण्याच्या उद्धारासाठीं कर्माची आवश्यकता, परमेश्वराचें प्रेम व व्यक्तित्व ह्याच्या-संबंधानें स्पष्ट विवेचन गीतेंत आहे, तसें उपनिषदांत नाहीं. गीतेचा कर्मावर भर आहे, परंतु ते निर्हेतुक, निस्वार्थ बुद्धीनें केलेलें, परमेश्वरास आत्मा सर्वभावें अर्पण करून कोणत्याही प्रकारच्या फळाची आशा न करितां केलेलें असावें असें आहे. उपनिषदांत मननावर अधिक भर असून त्याच्याद्वारें आनंदाचा लाभ करून घ्यावा असें आहे.

## भगवद्गीता, ज्ञानेश्वरी, सर नारायण व प्रतुलचंद्र सोम.

सर नारायण ह्यांचा मुक्काम कलकत्त्यास चिरंजीवाच्या येथें असतांना एके दिवशीं सकाळीं ते भगद्गीतेच्या ३ ऱ्या अध्यायांतील ७ वा श्लोक वाचीत होते. यांत म्हटलें आहे कीं, जो पुरुष मनासह ज्ञानेंद्रियांचें नियमन करून कर्मेंद्रियांनीं कर्में करीत राहातो तो श्रेष्ठ होय. ह्याचवेळीं त्यांच्या येथें इंडिअन मेसेंजरचे संपादक बाबू प्रतुलचंद्र सोम हे आले. त्यांस त्यांनीं

**यस्त्विद्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।**
**कर्मेंद्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥**

हा श्लोक वाचून दाखविला. नंतर सर नारायण म्हणाले, ज्ञानेश्वरी म्हणून गीतेवर जो भाष्यात्मक ग्रंथ आहे त्यांत ज्ञानेश्वर ह्याच श्लोकाच्या भाष्यांत म्हणतात कीं, जो निश्चयानें दृढ, अंतःकरणपूर्वक ज्याचें जीवन परमेश्वरमय झालेलें, बाहेरील सर्व कार्यें करणारा, आपलीं लौकिक कर्तव्यें करीत असतो, जो ह्या संसारामध्यें एकाद्या साधारण संसारी माणसाप्रमाणेंच दिसतो, परंतु ज्याचें निरीक्षण केल्यास ज्याचें एकंदर स्वरूप गूढ असल्याचें दिसून येतें तोच खरा मुक्त व योगी होय. नंतर सर नारायण ह्यांनीं ७ व्या श्लोकावरील ज्ञानेश्वरींतील ज्या ओळी प्रतुलबाबूंस वाचून दाखवून त्यांचें भाषांतरही करून दाखविल्या त्या ह्या :—

**आतां देइ अवधान । प्रसंगें तुज सांगैन ।**
**एया निराशाचें चिन्ह । धनुर्धरा ॥**
**जो आंतरी दृढु । परमात्मरूपी गूढु ।**
**बाह्ये तरी रूढु । लौकिकु जैसा ॥**
**जो इंद्रिया आज्ञा न करी । विषयांचें भय न धरी ।**
**प्राप्त कर्म नाव्हेरी । उचित जें जें ॥**

---

१ "ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेर्जुन तिष्ठति"

कर्मेंद्रियें कर्मीं। राहटता तरी न नियमी।
परि तयेंचिया उर्मीं। झांकोळे ना॥
जो कामनामात्रे न घपे। मोहमळ न लिंपे।
जैसे जळीं जळे न शिंपे। प्रद्मपत्र॥
तैसा संसर्गामाजी असे। सकळासारिखा दिसे।
जैसे तोयसंगे आभासे। भानुबिंब॥
तैसा सामान्यत्वें पाहिजे। तरी साधारणचि देखिजे।
यऱ्हवि निर्द्धारिता नेणिजे। सोय जेयाची॥
ऐसा चिन्हीं चिन्हतु। देखसी तोचि मुगतु।
आशापाश रहितु। ओळख पां॥
अर्जुना तोचि गा योगी। विशिषिजे जगीं।
म्हणोनि ऐसा होय यालागीं। म्हणिणें तूतें॥

**प्र. सोम**–ज्ञानेश्वरांचें हें भाष्य किती सुंदर आहे! विशेषतः योगी अगर कर्मरत मनुष्यानें एखाद्या साधारण माणसाप्रमाणेंच दिसलें पाहिजे हा विचार किती महत्त्वाचा आहे! खरी लोकसत्तात्मकता ती हीच आणि हिंदु धर्मानें हिचाच प्रचार केला आहे. आपल्या एकंदर समाजामध्यें सन्याशी जे फिरत असतात ते ह्याचसाठीं असें मला वाटतें. गीतेच्या बाराव्या अध्यायांत देवाला प्रिय जीं माणसें सांगितलीं आहेत त्यांत अनिकेतन जीं, म्हणजे ज्यांना रहावयाला स्वतःचें ठिकाण नाहीं, अशीं माणसें–तीं प्रिय असल्याचें म्हटलें आहे. येशूनेंही असेंच म्हटलें आहे. आपल्या हिंदुस्थानांत व इतरत्रही जगापासून दूर रहाणें, पण तें मोठ्या थाटामाटांत रहाणें हें मोठेपणाचें समजलें जातें. परंतु ज्याला लोकांचें कल्याण करावयाचें आहे तो लोकांपैकींच असला पाहिजे. आतां ज्ञानेश्वरीमधून जो उतारा आपण वाचला तो इतका सुंदर व अर्थपूर्ण आहे कीं हा ग्रंथ मराठींत असून ती भाषा न येणारांस त्याचा लाभ घेतां येणें शक्य नाहीं हें पाहून मला माझ्यासारख्यांची दयाच येते.

**सर नारायण**–ज्ञानेश्वरांनीं आपल्या टीकेंत ज्याचें वर्णन केलें आहे तें वर्णन आब्राहाम लिंकनसारख्या थोर पुरुषास उत्तम रीतीनें लागूं पडतें. एकदां कोणीसें आब्राहाम लिंकनला सांगितलें कीं कोणी एक मनुष्यानें लिंकन हा मूर्ख आहे असें म्हटलें. त्यावर आब्राहामनें उत्तर दिलें कीं, तो जर तसें म्हणतो तर त्याचें म्हणणें बरोबर असलें पाहिजे. मी जाऊन त्याला भेटेन. लिंकन-संबंधाच्या व्याख्यानांत एकदां प्रो. बेन्सन ह्यांनीं म्हटलें आहे कीं, लिंकननें आपल्याला सर्वस्वीं देवाच्या हातीं दिलें होतें, तो देवाच्या हातचें बाहुलें झाला होता.

जसजशी त्याची आध्यात्मिकता वाढत गेली तसतशी त्याची गोरगरिबांसंबंधाची सहानुभूति वाढत गेली, ती इतकी कीं दिवसभर काम केल्यानंतरही रोज तो निदान एका तरी गरीब मनुष्याच्या घरीं चालत जाऊन त्याची भेट घेतल्यावांचून स्वतःच्या घरीं जात नसे.

**बाबू प्र. सोम**—पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांचेंही वर्तन असेंच असे. एकदां ते आपल्या एका श्रीमंत मित्राबरोबर रस्त्यानें फिरत चालले होते. तेव्हां त्यांना आपल्या ओळखीचा एक गरीब मनुष्य दिसला. कोणीही आपल्या वरिष्ठाला ज्याप्रमाणें दादा ठाकूर असें संबोधितो त्याप्रमाणें पंडित ईश्वरचंद्र ह्यांच्यासंबंधानें आपला आदर व्यक्त करण्याकरितां त्यांस नेहमीं दादा ठाकूर असें म्हणत असत. त्याला पहातांच पंडितजी त्याच्याजवळ गेले, त्याची विचारपूस केली, त्याच्याशीं दोन प्रेमाचे शब्द ते बोलले व नंतर आपल्या श्रीमंत मित्राकडे परत आले, तोंपर्यंत त्यास रस्त्यांत वाट पहात तिष्ठत उभें राहावें लागलें. दुसरी एक गोष्ट ह्यावेळीं मला आठवते. दुसऱ्या एका प्रसंगीं त्यांच्या एका मित्रानें पंडित ईश्वरचंद्रांना एका भिकारड्या दुकानांत हुक्का पीत बसलेलें पाहिलें. एवढ्या विद्वान व थोर पुरुषानें एका गरीब माणसाच्या लहानशा दुकानांत हुक्का पीत बसणें ह्या माणसास कमी-पणाचें वाटलें व तुम्हीं असें करणें बरें नाहीं असें तो त्यांना म्हणालाही. तेव्हां पंडितजींनीं त्याला स्पष्ट सांगितलें कीं, मी एखाद्या श्रीमंत अगर सुशिक्षित माण-साच्या मैत्रीपेक्षां ह्या माणसाच्या मैत्रीला अधिक किंमत देतों. राजा राममोहन रायांच्या संबंधानेंही अशाच गोष्टी प्रसिद्ध आहेत. हेलकऱ्याच्या ओझ्याला हात लावावयास त्यांना कमीपणा वाटत नसे.

( ह्यानंतरच्या संभाषणांत ब्राह्मसमाज हा विषय निघाला. )

**मि. प्रतुलचंद्र सोम**–साधारण ब्राह्मसमाजाला आज जी महनीय स्थिति प्राप्त झालेली आहे ती पंडित शिवनाथ शास्त्री ह्यांच्यामुळेंच होय असें मला वाटतें. ज्ञानेश्वरांच्या म्हणण्यानुसार जो खरा योगी त्याचें पंडित शिवनाथ शास्त्री हे एक प्रत्यक्ष उदाहरण आहेत ( १९१६ सालीं पंडितमहाशय जीवमान होते ) ते दिसावयास अगदीं साधे व एखाद्या साधारण माणसाप्रमाणें दिसतात पण त्यांच्या त्या साधेपणाखालीं त्यांचें प्रज्वलित व्यक्तित्व जणूं काय आच्छादित आहे. ब्राह्मसमाजाचे प्रचारक होण्यापूर्वी ते सरकारी चांगल्या पगाराच्या नोकरी-वर होते व तेथेंच जर ते टिकून राहिले असते तर प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें संस्कृत भाषेचे अध्यापक झाले असते व पुढें संस्कृत कॉलेजचे प्रिन्सिपॉल होऊन त्यांस दरमहा १००० रु. पगार मिळूं लागला असता. परंतु हें सर्व त्यांनीं सोडून दिलें. कारण, आपण ब्राम्हसमाजाचे प्रचारक व्हावें अशी

देवाची इच्छा आहे असें त्यांना वाटलें. ते आपल्या जागेचा राजीनामा देऊन ब्राम्हसमाजाचे मिशनरी होण्याच्या विचारांत आहेत असें त्यावेळचे शिक्षणखात्याचे प्रमुख सर आल्फ्रेड क्राफ्ट ह्यांना कळलें; तेव्हां त्यांनीं तुम्ही राजीनामा देऊन आपलें अकल्याण करून घेऊं नका असा त्यांस निरोप पाठविला व त्यांच्या पुष्कळ मित्रांनीं त्यांस त्यांच्या निश्चयापासून ढळविण्याचा प्रयत्न केला; तेव्हां अल्प-काळ पंडितजींचें मन द्विधा झालें होतें. ऐहिक दृष्ट्या आपलें कल्याण करून घेऊन होईल ती ब्राम्हसमाजाची सेवा करावी कीं, ऐहिक लाभालाभाचा कांहीं एक विचार न करितां देवाची इच्छा आहे त्याप्रमाणें सर्वस्वीं आपल्याला ब्राम्हसमाजाच्या सेवेला अर्पून घ्यावें हा प्रश्न त्यावेळीं त्यांचेपुढें होता. अखेरीस आपल्या मनाची झालेली ही द्विधा स्थिति सहन न होऊन त्यांनीं देवाच्या इच्छेनुसार राजीनामा देण्याचा निश्चय केला व तो देतांना अधिकाऱ्यांना कळविलें कीं, मनाची चाललेली धरसोड थांबविण्यासाठीं व मनास शांति प्राप्त करून देण्यासाठीं देवाच्या आज्ञेनुसार वागण्याचा मीं निश्चय केला आहे. आज अशी स्थिति आहे कीं जेथें जेथें पंडित महाशय जातात तेथें तेथें ते आपला साधेपणा जणूं काय आपल्या बरोबर घेऊन जातात. आपली विद्वत्ता अगर आपलें पवित्रकार्य यांचा बाजार कोठेंही मांडीत नाहींत.

**सर नारायण**–होय, अगदीं खरें. जेथें जेथें ते जातात अगर आपण त्यांना पहातों तेथें तेथें ते प्रेमाचें वातावरण आपल्याला न कळत उत्पन्न करतात. आपला साधेपणा, प्रेम दाखविण्याचे साधारण मार्ग व दयाळूपणा ह्यांच्याद्वारें ते आपल्याला आपल्याकडे आकर्षून घेतात. त्यांच्या सहवासांत आपण असलों म्हणजे आपण आपल्या घरच्या माणसांत बसल्यासारखें वाटूनसुद्धां आपल्या समोर एक उच्च आदर्श आहे असें आपल्याला वाटतच असतें.

**मि. सोम**–पण सर नारायण मला असें वाटतें कीं, केशवचंद्र सेन व प्रताप चंद्र मुझुमदार ह्यांनीं ख्रिस्ती धर्माचें व बायबलचें बरेंचसें स्तोम माजविल्यामुळें ब्राम्हसमाजाचें फारच नुकसान झालें आहे. त्यांना संस्कृत भाषेचें ज्ञान नव्हतें. उपाध्याय गौर गोविंद राय हे संस्कृत पंडित होते व ते त्यांस ह्या बाबतींत माहिती सांगत असत. अखेरीस अखेरीस केशवचंद्र सेन ह्यांना आपली चुकी ध्यानांत आली, पण त्यावेळीं त्यांना विभूतिपूजेचें वेड लागलें!

**सर नारायण**–हो, बरी आठवण झाली. काय हो, केशवचंद्र रामकृष्ण परम-हंस ह्यांचे शिष्य बनले होते असें म्हणतात तें खरें काय?

**मि. सोम**–हें विवेकानंदांच्या अनुयायांनीं उठविलें आहे. पण खरा प्रकार कांहीं तसा नव्हता. उलट रामकृष्ण परमहंसांनीं स्वतः म्हटलें आहे कीं केशव-

चंद्रापासून मला पुष्कळच लाभ झाला आहे. खरें पाहिलें तर परस्परांना परस्परांचे गुण कळून चुकले होते व परस्परांस परस्परांविषयीं अत्यंत आदर वाटत असे. परमहंस कालीचे पुजारी होते व कालीचे मोठे भक्त होते हें सर्वांस माहीत आहेच. ते नेहेमीं म्हणत कीं मी केशवचंद्र सेनच्या जवळ असलों कीं माझी कालीमाता देखील वितळून जाते, म्हणजे ह्याचा अर्थ असा कीं केशवच्या सान्निध्यानें मला निराकार परमेश्वराची भेट होते. माझें स्वतःचें असें मत झालें आहे कीं ही आपली ब्राह्मसमाजाची चळवळ राष्ट्रीय झाली पाहिजे. मागें आपण आमच्या मंदिरामध्यें नचिकेतावर व्याख्यान दिलें व दुसऱ्या दिवशीं सकाळीं मंदिरांत उपासना चालविलीत, त्यावेळीं पंडित सीतानाथ तत्त्वभूषण मला म्हणाले कीं सोम बाबू पाहिलेत ना, सर नारायण आपल्या ब्राह्म धर्माला कसें राष्ट्रीय स्वरूप देत आहेत तें! आपणही असेंच केलें पाहिजे बरें!

## शब्दोच्चारावांचून देवपूजा

**सर नारायण**–निःशब्द देवपूजन शक्य आहे काय? म्हणजे असें कीं आपल्या मनांतल्या मनांतही शब्दोच्चार न करितां देवाची प्रार्थना करणें शक्य आहे काय?

**डॉ. भांडारकर**–होय आहे, पण ती अत्युच्च स्थिति होय.

**सर नारायण**–ती स्थिति प्राप्त होणें फार कठीण आहे हेंच खरें. माझें असें होतें कीं जेव्हां मीं शब्दोच्चार न करितां प्रार्थना करितों त्यावेळीं ते शब्द मनांत मी देवापाशीं बोलतों.

**डॉ. भांडारकर**–तेंही निःशब्द देवपूजनच असें मी समजतों. त्यावेळीं तुमचें मन बोलतें, पण तें तोंडावाटे बाहेर पडणाऱ्या शब्दांच्या द्वारें नव्हे. अशा वेळीं देवही आपल्याशीं बोलत आहे असें आपणांस वाटतें. तो कांहीं शब्दांच्या द्वारें नव्हे तर तुकाराम बुवांनीं म्हटल्याप्रमाणें "पुरवूं खुणेखुणा" खुणांच्याद्वारें, चिन्हांच्याद्वारें; हीं चिन्हें आपल्या आत्म्यास अवगत होतात, आत्मा तीं झालीं असतांना उल्लसित होतो, तुमच्या मनाला इतकें समाधान वाटूं लागतें, तुम्हांला इतक्या अवर्णनीय शांतीचा लाभ झाल्याचा अनुभव येतो कीं प्रत्यक्ष परमेश्वरच तुमच्या सन्निध आहे, तुमच्याशीं भाषण करीत आहे असा तुम्हांस अनुभव येतो.

**सर नारायण**–शब्दोच्चार न करितां प्रार्थना करण्याच्या संवयीचा एक विशेष फायदा माझ्या अनुभवास आला आहे तो असा कीं, जेव्हां एखादा विशेष विचार किंवा कल्पना मनांत येऊन आपण प्रार्थना करितों तेव्हां त्या विचाराच्या किंवा कल्पनेच्या साहाय्यानें रोज नवा नवा प्रकाश पडत जातो.

आतांच आपण तुकारामाच्या वचनाची आठवण देऊन देव प्रत्यक्ष शब्दोच्चार करून न बोलतां खुणांच्याद्वारें, अनुभवाच्याद्वारें, निरनिराळ्या चिन्हांच्याद्वारें बोलतो असें सांगितलें ती अनुभवसिद्ध गोष्ट आहे. एकदां ह्या वचनाचाच मी विचार करीत असतां देव माता व बालक ह्यांच्याद्वारें कसा साक्षात्कार देत असतो तें माझ्या अंतःकरणास पटलें; नंतर देवाची भाषा सार्वत्रिक आहे, तिला देशमर्यादा नाहीं, तो सर्वांच्या भाषेंत बोलतो, परमात्मा आत्म्याशीं बोलतो असा अनुभव आला.

**डॉ. भांडारकर**–होय, आपल्या अंतःकरणांत उमटणारी ही वृत्ति, हा दिव्य प्रकाश, ही दिव्य ज्योति, हा अनुभव आपल्याला देवाचें दर्शन घडवितो. पूर्वींच्या काळीं देवाचें अस्तित्व सिद्ध करण्याचे नाना प्रकार असत. वाद करावयाचे, नाना प्रकारचे आधार द्यावयाचे, युक्तिवाद करावयाचा, वगैरे. आतां तसें कोणी करीत नाहीं, आतां ती विचाराची स्थिति उलटली, आतां ही अनुभवाचीच गोष्ट आहे असेंच म्हणावें लागतें. त्या मार्गाला जो जातो त्याला तो अनुभव येतो. जे आपल्याला रॅशनॅलिस्टस् असें म्हणवितात त्यांना हेंच पटत नाहीं. व्यक्तीचा अनुभवच ही गोष्ट आतां पटवितो. प्रार्थना, मनन, ध्यान ह्यांच्या द्वारें मनाला स्फूर्ति प्राप्त होते, उल्हास प्राप्त होतो ह्याचेवर त्यांचा विश्वास बसत नाहीं.

**सर नारायण**–होय, आपल्या तुकाराम साधूनें अनुभवावरच किती जोर दिला आहे हें **जंव नाहीं अनुभव गोडी, अनुभवें कळों येतें** वगैरे त्याच्या उद्गारांवरून आपल्याला दिसून येतें. ह्यासाठींच आत्मानुभवाचें महत्त्व फार आहे. सेंट आगस्टिननें म्हटलें आहे कीं वादविवादाच्या द्वारें कोणाचेंही तारण होत नाहीं, तें अगदीं खरें आहे.

**डॉ. भांडारकर**–सेंट आगस्टिननें जें म्हटलें आहे तें अगदीं बरोबर आहे व आपला अनुभव तेंच सांगत आहे.

**सर नारायण**–काल[१] आपण मांजर आणि तिच्या पिलाची गोष्ट सांगितली ती किती अर्थपूर्ण आहे!

**डॉ. भांडारकर**–होय तें खरें, पण आमचीं शास्त्रें पूर्वजन्मींच्या ज्ञानामुळें हें झालें असें म्हणणार. कालिदासानें आपल्या शांकुतलांत असें म्हटलें आहे कीं एखादी सुंदर वस्तु पाहून आपल्याला आनंद होतो तेव्हां हें त्या सौंदर्याचें ज्ञान आपल्याला पूर्वजन्मींच्या संस्काराच्या योगें होत असतें.

**सर नारायण**–प्लेटोचें कांहींसें तसेंच म्हणणें आहे व त्याचा उल्लेख मार्टिनोनें आपल्या "अवर्स ऑफ थॉट" ह्या पुस्तकांत केला आहे.

---

१. कर्वे ह्यांची स्त्रियांची युनिव्हर्सिटी व धर्म हें संभाषण पहा.

**डॉ. भांडारकर**–अशा प्रकारच्या विषयांवर संभाषण झालें म्हणजे मनाला किती तरी समाधान वाटतें. मन उच्च वातावरणांत विहार करीत आहे असा अनुभव येतो. पण काय हो, मुंबईंत अशा प्रकारचें संभाषण करणारी, अगर अशा संभाषणास प्रोत्साहन देणारी, किंवा अशा संभाषणांत भाग घेणारी मंडळी तुम्हांला आढळतात कीं नाहीं !

**सर नारायण**–होय आहेत. वैद्य, कोरगांवकर, ते जोशी ह्यांना अशा विषयांवर संभाषण करण्याची आवड आहे. पण पुण्याचें काय ?

**डॉ. भांडारकर**–कोणी नाहीं म्हटलें तरी चालेल. आमचे शिवरामपंत आहेत, त्यांच्याशीं मी नेहमीं बोलत असतों अशा विषयांवर. आंजरलेकरही आहेत, पण त्यांच्याशीं अशा विषयांवर फारशीं भाषणें होत नाहींत. शिवरामपंताचें असें आहे कीं त्यानें जरी फार कांहीं वाचलेलें नाहीं तरी त्याला ह्या विषयाची आवड आहे आणि मी आध्यात्मिक अनुभवासंबंधानें वगैरे बोलूं लागलों कीं तें त्याला ताबडतोब पटतें व तें तो चांगलें ध्यानांत ठेवितो. शिवरामपंत एका मुसलमान साधूचा उद्‌गार नेहेमीं बोलून दाखवितो " कहीं बाब समजता हय, लेकिन कहनेको नही आती " म्हणजे आध्यात्मिक बाबतींतील सत्य कोणी सांगितलें कीं तें पटतें, पण त्याचा इतरांस पटविण्याइतका उच्चार करतां येत नाहीं.

## डॉ. मॅक्‌निकल, अद्वैत, डॉ. भांडारकर व सर नारायण चंदावरकर.

गुरुवर्य डॉ. भांडारकरांशीं होणारें संभाषण म्हणजे एक आनंददायक व स्फूर्तिकारक प्रसंग होय. आणि यंदाच्या माझ्या लोणावळ्याच्या मुक्कामांत हे असे संभाषणाचे योग वारंवार आल्यामुळें हें वर्ष व हा मुक्काम मला चिरस्मरणीय वाटत आहे. आजच्या ह्या लेखांत माझ्या गुरूशीं माझें एके दिवशीं झालेलें संभाषण येथें देत आहें. डॉ. मॅक्‌निकल ह्यांचा Indian Theism ह्या नांवाचा एक ग्रंथ १९१५ सालीं प्रसिद्ध झाला आहे. त्याचप्रमाणें त्यांनीं Hindu Devotional Mysticism अशा विषयावर International Review of Missions च्या अंकांत लिहिलेला एक लेख प्रसिद्ध झाला असून ह्यावेळीं वरील ग्रंथ व सदरील लेख हेच आमच्या संभाषणाचे विषय झाले.

**सर नारायण**–डॉ. मॅक्‌निकल ह्यांचा Indian Theism हा ग्रंथ व मिशन रिव्ह्यूमधला Hindu Devotional Mysticism हा लेख आपल्या अवलोकनांत आलेच असतील.

**डॉ. भांडारकर**–डॉ. मॅक्निकल ह्यांनीं आपला ग्रंथ व लेख दोन्ही कृपाकरून पाठविलीं व दोन्हीं मीं वाचलीं. माझ्या मनांत त्यांना विस्तृत उत्तर द्यावें असें फार होतें. कारण, ह्या दोहोंतील कित्येक विचार व सिद्धांत मला मान्य नाहींत. परंतु मुख्यतः दृष्टी अधू झाल्यामुळें व इतर कामांच्या गर्दीमुळें तें काम राहून गेलें आहे.

**सर नारायण**–आपल्या लेखांत Monism अद्वैत वेदांत हा हिंदुस्थानचा प्रचलित धर्म आहे असें डॉ. मॅकनिकल म्हणतात. आपल्यालाही असेंच वाटतें काय कीं, Monism ( अद्वैत ) हा हिंदुस्थानाचा प्रचलित धर्म आहे ?

**डॉ. भांडारकर**–नाहीं, मला असें मुळींच वाटत नाहीं. लौकिकदृष्ट्या पाहिलें तर आजचा धर्म अनेक देवतापूजन ( Polytheism ) हा आहे. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें त्याला Dualism द्वैतवाद किंवा भेदवाद अगर Pluralism असें म्हणतां येईल. ( मोनिझम ) वेदांत प्रचारांत असून वरील स्थिति आहे.

**सर नारायण**–डॉ. मॅक्निकल पुढें असेंही म्हणतात :—

India's prevaling monism on the one hand, and the superstitious belief, on the other, in the power of magic spells, have helped to encourage in India, as nowhere else, the quietism and self-hypnotization that are peculiar perils, of the mystic. " आपल्याला असें वाटतें काय ?

**डॉ. भांडारकर**–डॉ. मॅक्निकल म्हणतात त्याप्रमाणें ही स्थिति सार्वत्रिक आहे असें कांहीं मला वाटत नाहीं. Self-hypnotization म्हणजे समाधि, Quietness म्हणजे मौन धारण करून बसणें, ह्या दोन्ही गोष्टी सार्वत्रिक आहेत, म्हणजे सर्वत्र पुष्कळ प्रमाणांत आढळतात असें म्हणतां येत नाहीं. कांहीं थोडे योगी निर्विकल्प समाधि घेतात. त्यावेळीं ते स्वतःला विसरतात व एकरूप होतात ( mere absorbtion into unity ) असें म्हणतात.

**सर नारायण**–डॉ. मॅक्निकल आणखी असेंही म्हणतात कीं, हिंदुस्थानांतल्या लोकांनीं देवाचें Imminent ( अंतरस्थ ) जें स्वरूप तें जितकें ओळखिलें आहे तितकें Transcendent (सर्वव्यापक) स्वरूप आपलेंसें केलेलें नाहीं, हें खरें काय ?

**डॉ. भांडारकर**–खरा प्रकार ह्याच्या उलट आहे ! व्यक्ति ह्या अर्थानें (God as Person ) देवाची पूजा हिंदुस्थानांत सर्वत्र आज प्रचलित आहे. देव सर्वांतरयामी आहे असें जेव्हां म्हटलें जातें त्यावेळीं तो सर्व विश्वामध्यें भरलेला आहे असें मानिलें जातें. डॉ. मॅक्निकल जेव्हां असें म्हणतात कीं, देवाचें Imminent सर्वांतरयामित्वापेक्षां त्याच्या सर्वव्यापकत्त्वाकडे लोकांचा अधिक कल आहे तेव्हां ते वस्तुस्थितीचा विपर्यास करीत आहेत असें मला वाटतें. खरा

प्रकार ह्याच्या उलट आहे असें जें मीं प्रारंभीं म्हटलें आहे तेंच बरोबर आहे. वैष्णवांचा एक पंथ देवाला वैकुंठांत नेऊन बसवितो, तर दुसरा त्याची गोलोकांत स्थापना करितो. शैव त्याला कैलासांत स्थापितात. आणि बृहदारण्यकासारख्या उपनिषदांकडे तुम्हीं जर पाहिलेंत व त्यांतील जे अनेक उतारे मी माझ्या वैष्ण-विझमच्या शेवटल्या भागांत घेतले आहेत, त्यांवरून हें आपल्या ध्यानांत येईल कीं, त्यांत देवाचें स्वरूप वर्णन करितांना तो एकपक्षीं सर्वव्यापी, प्रत्येकाच्या आत्म्यांत वास करणारा, सर्व विश्वाची व्यवस्था चालविणारा, असें म्हटलें असून उलटपक्षीं तो सर्वश्रेष्ठ असून ह्या सर्वांतील आहे, निराळा आहे, असें म्हटलेलें आहे. "तो सर्व कांहीं पहातो, पण त्याला कोणी पाहूं शकत नाहीं, तो सर्व कांहीं जाणतो, पण त्याला कोणी पूर्णत्वें ओळखूं शकत नाहीं."

अपाणिपादो जवनोग्रहीता पश्यत्यचक्षुःसशृणोत्यकर्णः
स वेत्ति वेद्यं न च तस्यास्ति वेत्ता तमाहुरग्र्यं पुरुषं महान्तम् ॥

"हातापायांवांचून तो त्वरित सर्व वस्तूंचें ग्रहण करितो, डोळ्यांविणें पहातो आणि कानांविणें ऐकतो. सर्व गोष्टी तो जाणतो, परंतु त्यास जाणणारा कोणी नाहीं; तो मोठा सर्वश्रेष्ठ आदिपुरुष असें त्यास म्हटतात."

बहुतेक उपनिषदांत हीच विचारसरणी आपल्याला आढळते. त्याचप्रमाणें सर्वच ब्रह्मरूप अगर ईशरूप होणें ह्या दृष्टीनें उपनिषदांत अद्वैतवादही आहे यांत कांहीं शंका नाहीं. Spinoza चा Pantheism आकुंचित आहे. म्हणजे त्याच्या मतानुसार विश्वांत, सृष्टींत दृग्गोचर होणारा देव सृष्टीबरोबर विनाश पावणारा आहे. उपनिषदांचा देव असा मर्यादित स्वरूपाचा नाहीं. उपनिषदांच्या मतानुसार ब्रम्हा-पासून अखिल विश्वाची उत्पत्ति झाली आहे हें खरें, परंतु त्याला स्वतंत्र अस्तित्व असून तो ह्या सर्व सृष्टीच्या पलीकडेही आहे. डॉ. मॅक्निकल ह्यांचें म्हणणें असें आहे कीं, परमेश्वर सर्वांतस्थ आहे, ह्याच विचाराचें प्राबल्य हिंदुस्थानांत सर्वत्र आहे; पण हें खरें मानणें म्हणजे आज लोकांमध्यें देवपूजेचे जे नाना प्रकार आहेत त्यांच्याकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करण्यासारखें आहे. आपापलीं गांवें सोडून हजारों लोक जे पंढरपूर काशी प्रयाग वगैरे तीर्थांच्या ठिकाणीं यात्रेला जातात ते काय देव सर्वत्र आहे अशी भावना सर्वत्र अधिक प्रमाणांत जागृत आहे म्हणून जातात काय? तीर्थांच्या ठिकाणीं देवाचें वास्तव्य आहे हा विश्वास काय दर्शवितो?

**सर नारायण**—मॅक्निकलसाहेब म्हणतात कीं, एकंदरींत हिंदी मनावर अद्वैतत्त्वाचा पूर्ण परिणाम झालेला असल्यामुळें, किंवा रोमरोमांत अद्वैत शिरलें असल्यामुळें, म्हणजे सर्वच ब्रम्ह अशी भावना झाल्यामुळें, सामाजिक जीव-नास आवश्यक अशी नैतिक दृष्टि, चांगलें वाईट ह्यांच्यांतील भेददृष्टि, तीही

त्यांच्यांत नष्ट झालेली दिसते. ( Obliteration of distinctions that are vital to the moral life and to personal religion ) आपल्याला हा विचार मान्य आहे काय ?

**डॉ. भांडारकर**—असें जेव्हां ते म्हणतात तेव्हां Pantheism हा शब्द ते ह्यावेळीं कोणत्या अर्थानें योजीत आहेत तें पाहिलें पाहिजे. मी आतांच ज्या अर्थानें हा शब्द योजिला तोच अर्थ जर डॉ. मॅक्निकल ह्यांच्याही मनांत असेल, तर हें उघड आहे कीं, देवानें आपलें सत्यस्वरूप गुप्त ठेवून ह्या ज्या बाह्य वस्तू आहेत एतत्स्वरूप तो झाला आहे. म्हणजे ह्या वस्तूंचें रूप त्यानें धारण केलें आहे. परंतु Pantheism ( अद्वैत ) ह्याचा अर्थ दृष्टीच्या पलीकडे ह्याअर्थें पहातां इष्टानिष्ट, सत्‌असत् ह्यांतील भेद नाहींसा होत नाहीं. श्वेताश्वतर उपनिषदामध्यें परमेश्वर हा पावित्र्य प्राप्त करून देणारा व पापविनाशक आहे असें म्हटलें आहे. परंतु आपण जें जें कांहीं पहातों त्यांत परमेश्वर परमात्मा आहे ही भावना डॉ. मॅक्निकल Pantheism शब्दाच्याद्वारें जर व्यक्त करीत असले, आणि वर्डस्वर्थ ह्यांचा विशेषतः Tintern Abbey वरील काव्यांत हीच भावना आहे तर मग त्यांचा Pantheism वरील भेदभाव नष्ट करीत नाहीं असेंच म्हटलें पाहिजे, आणि वर्डस्वर्थनें वारंवार दाखविलें आहे त्याप्रमाणें आपल्या अंतःकरणांत उच्च विचार उत्पन्न होतात व त्यांच्यायोगें मनाला शांति प्राप्त होते.

**सर नारायण**—पण डॉ. मॅक्निकलनीं आपल्या विचारांच्या स्पष्टीकरणार्थ पुढील उदाहरण दिलें आहे. एका भगवीं वस्त्रें परिधान केलेल्या पवित्र माणसाला देव किती आहेत असा प्रश्न विचारला असतांना त्यानें "दोन" असें म्हणून आपले दोन डोळे दाखविले ! भक्तिभावनेचा हिंदुस्थानांत कसा दुरुपयोग केला जात आहे हें ह्या पवित्र बैराग्यानें दिलेल्या उत्तरावरून व्यक्त होत आहे असेंही मॅक्निकल साहेब म्हणतात !

**डॉ. भांडारकर**—डॉ. मॅक्निकलच्या ह्या पवित्र बैराग्यानें आपल्या दोन डोळ्यांकडे बोटें दाखवून दोन देव असें जेव्हां म्हटलें तेव्हां त्याचा अर्थ काय हें त्यानें स्पष्ट केलें काय ? किंवा त्याच्या म्हणण्याचा भाव डॉ. मॅक्निकल ह्यांच्या लक्षांत आला काय ? मला ह्या दोघांचेंही म्हणणें काय आहे तें कळत नाहीं. शिवाय हिंदुस्थानांत दोन डोळ्यांना दोन देव असें म्हटलेलें माझ्या कांहीं ऐकिवांत नाहीं. म्हणून हिंदुस्थानांत असें मत प्रतिपादणारा एखादा पंथ आहे असें समजण्यांत येऊं नये, उलटपक्षीं देवांनीं ज्यांचा यज्ञ केला त्यांच्या डोळ्यांपासून निघालेला जो सूर्य त्याचा सूचक पुरुषसूक्त होय असें म्हटलेलें आहे. सारांश, आतां आपण डॉ. मॅक्निकल ह्यांचें जें वाक्य वाचलें त्याच्या-

पासून कांहींच अर्थबोध होत नाहीं, आणि माणसांचे दोन डोळे हे दोन देव असा विश्वास मनुष्याच्या भक्तीच्या ऊर्मीच्या आड कसा येतो हेंही मला कांहीं कळत नाहीं !

**सर नारायण**–हा मुद्दा लांबविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण, डॉ. मॅक्‌निकल ह्यांनींच म्हटलें आहे कीं, त्या बैराग्यानें आपले दोन डोळे हे दोन देव असें म्हणणें हें हिंदी गूढवादप्रियतेचें सूचक आहे. आपले साधुसंत व त्यांचा गूढतत्त्ववाद (Mysticism) ह्या संबंधानें ते म्हणतातः हे संत व भक्त म्हणजे वेदांतवादि भक्त होत (Devotional mystics) हे संत सृष्टिसौंदर्य, संसारांतील नित्याचे अनुभव, ह्यांचा परमेश्वराविषयींचा विचार, शोध व अनुभव ह्यांच्या बाबतींत सढळ उपयोग करितात. डॉ. मॅक्‌निकल असेंही म्हणतात कीं, ख्रिस्तानें ज्याप्रमाणें ह्या संसारांतील अनुभवाचा व सृष्टिसौंदर्याचा वगैरे आपल्या संभाषणांत उपयोग केला त्याप्रमाणें ह्या संतांनींही केलें आहे. त्यांची जी परमेश्वराच्या भेटीची तळमळ तिची त्यांनीं स्तुति केली आहे. परंतु त्यांच्या वेदांताच्या किंवा गूढवादाच्या परिणामांत त्यांनीं एक मोठें व्यंग दाखविलें आहे. तें असें कीं, आपल्या साधुसंतांनीं जें साधन केलें, जी देवदर्शनाची तळमळ दाखविली, जें अंतःकरणाचें परीक्षण केलें त्याचा एक परिणाम त्यांस शांति प्राप्त झाली हा झाला खरा, पण ही शांति कर्तव्यास उत्तेजन देणारी, इतरांना प्रेम करावयास लावणारी नव्हती, तर कर्तव्यपराङ्मुख करणारी, स्वस्थ बसावयास लावणारी, स्वतःस विसरावयास लावणारी होती. सारांश, त्यांच्या प्रतिपादनाचा रोख असा आहे कीं, ख्रिस्ताच्या भक्तांस प्राप्त होणारी शांति व समाधान हीं स्वस्थ बसूं देणारीं नाहींत. तीं लोकांमध्यें जाऊन त्यांच्यांत मिसळून समभोगी व समदुःखी व्हावयास लावतात. तसें आपल्या संतांचें झालेलें नाहीं. हें दाखविण्यास त्यांनीं तुकोबा व कबीर हीं दोन उदाहरणें पुढें केलीं आहेत.”

**डॉ. भांडारकर**–मला असें वाटते कीं, ह्यांत आमच्या साधुसंतांसंबंधानें अन्याय होत आहे. उदाहरणार्थ, आमचे तुकोबाच घ्या. इतरांच्या उपयोगी पडावयाचें, किंवा दुसऱ्याच्या कल्याणासाठीं आपण स्वतः हालअपेष्टा काढावयाच्या किंवा दुःख सहन करावयाचें ह्याविषयीं त्यांनीं वारंवार उद्गार काढले आहेत. हा अभंगच पहा :—

**निर्वैर व्हावें सर्व भूतांसवें । साधन बरवें हेंचि एक**
**तरिच अंगिकार करील नारायण । बडबड तो सीण येणेंविण**
**सोयरें पिशुन समानचि घडे । चित्त पर ओढे उपकारीं**
**तुका म्हणे चित्त झालिया निर्मळ । तरिच सकळ केलें होय**

ह्या अभंगांत तुकोबा स्पष्ट सांगत आहेत कीं सर्वांशीं निर्वैर होणें हेंच उत्तम साधन होय. असें झालें तरच आपण देवास ग्राह्य होतों. आणि हें जर आपल्या हातून होत नसेल तर बाकीची व्यर्थ बडबड होय, बाकीची खटपट व्यर्थ शीण होय. शत्रू मित्र सारखे लेखून नेहमीं चित्त परोपकारीं लावावें असाही त्यांनीं उपदेश केला आहे. आपण आपलें चित्त शुद्ध करून जर सर्व उद्योग करूं तरच हे उद्योग सफळ झाले असें म्हणावयाचें. आणि हा तुकोबांचा अभंग त्यांच्या शेंकडो अशाच अभंगांपैकीं एक होय. दुसऱ्या एका अभंगांत ते म्हणतात,

**बुडत हे जन न देखवे डोळां । म्हणोनि कळवळा येत असे**

आतां Peace किंवा आपल्या संतांनीं "शांति" हा शब्द कोणत्या अर्थानें योजिला आहे तो पहा. एकनाथांनीं तर म्हटलें आहे कीं, आपल्या सभोंवतीं अन्याय, असत्य, नाना प्रकारच्या मोहांचें जाळें पसरलेलें असतांना आपण शांत व निष्क्रिय राहणें ही कांहीं शांति नव्हे. परंतु ज्यानें आपलें अहित केलें, त्याचें ज्यानें कल्याण केलें, किंवा आपल्या सत्कृत्याच्याद्वारें ज्यानें शत्रूला जिंकिलें त्याला प्राप्त झालेली शांति ती खरी शांति. आणि इतरांची सेवा करणें किंवा इतरांच्या कल्याणासाठीं आपण स्वतः हालअपेष्टा सहन करणें ह्यासंबंधानें भागवतांत म्हटलें आहे कीं, जे दुःखीकष्टी आहेत त्यांच्यासाठीं जे कोणी स्वतः दुःखकष्ट सोसावयास सिद्ध असतात तेच खरे भक्त होत. आणि हीच खरी भक्ति होय. आमचे साधुसंत ह्याच प्रकारचे उद्गार आपल्या काव्यांत काढीत असतात असें अनुभवास येतें. लोकांचीं दुःखें पाहून त्यांचीं मनें कळवळतात. परंतु एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे; देवाचें दर्शन ह्या संसारांत वरील मार्गाचें अवलंबन करून घ्यावयाचें अशी त्यांची सारखी तळमळ जरी असते तरी मृत्यूनंतर देवाच्या सहवासाचें पूर्ण सुख लाभावयाचें हा विचार त्यांच्या मनांत विशेषरीतीनें असतोच. आणि देवासाठीं ह्या लोकीं मनुष्यांच्या उपयोगीं पडावें, त्यांचा भार आपण हलका करावा, त्यांचीं दुःखें आपण सहन करावीं हे विचार परलोकीं परमेश्वराच्या सहवासाचा सतत लाभ व्हावा ह्या त्यांच्या ध्येयाच्या आड येत नाहींत, उलट ह्याच मार्गाचें अवलंबन केलें पाहिजे असें त्यांस वाटतें. पहा, गीतेंत म्हटलें आहे कीं, ज्यांच्या पापांचा क्षय झालेला आहे, ज्यांच्या चित्ताची अनिश्चितावस्था नष्ट झाली आहे, जे आत्मसंयमी आहेत, व जे इतरांचें कल्याण करण्यांत रत आहेत त्यांना (ब्रह्मांत) शांति प्राप्त होते. जो भाव अगर जी वृत्ति आमच्या संतांत नाहीं असें डॉ. मॅक्निकल ह्यांचें म्हणणें आहे ती त्यांच्यांत आहे. तथापि व्यवहारामध्यें त्याचें अनुसरण पश्चिम देशीं जितकें आहे तितकें आपल्या येथें नाहीं हें मात्र खरें आहे. अशोकाच्या वेळचे शिलालेख पाहिले म्हणजे

त्याच्या काळच्या बौद्धधर्मांत व्यवहारामध्यें वरील वृत्तीचें सर्वत्र अनुसरण होत होतें असें दिसून येतें.

**सर नारायण**–थोड्या दिवसांपूर्वीच डॉ. मॅक्निकल ह्यांनीं असें म्हटलें आहे कीं, कर्ता व करविता एकच आहे हें मत नीतिप्रधान धर्मांच्या आड येत नाहीं असें जे म्हणतात तें कसें हें मला तरी कळत नाहीं. हें त्यांचें मत पायाशुद्ध आहे असें आपल्याला वाटतें काय?

**डॉ. भांडारकर**–सर्वसाधारणपणें विचार करितां डॉ. मॅक्निकल ह्यांचें म्हणणें बरोबर आहे असें मला वाटतें. परंतु हिंदुस्थानासंबंधानें विचार करूं लागलें म्हणजे त्यांच्या हें ध्यानांत आणून दिलें पाहिजे कीं, हें शंकराचार्यांचें मत आहे. दुसऱ्या पंथांना अगर मार्गांना तें मत मान्य नाहीं. आणि शंकराचार्यांचे अनुयायी देखील अखेरच्या स्थितींत कर्ता व करविता एकच होतो असें म्हणतात. म्हणजे ज्यावेळीं मनुष्याचा आत्मा मुक्तावस्थेप्रत पोंचतो त्यावेळची ही अवस्था. त्यांच्या मताप्रमाणेंही एरव्ही ही स्थिति साध्य नसते. म्हणजे साधारण स्थितींत नीति-अनीति हा भेद नष्ट होतो असें होत नाहीं.

**सर नारायण**–आपण व न्या. मू. रानडे ह्यांच्यासंबंधानें डॉ. मॅक्निकल ह्यांचें म्हणणें असें आहे कीं, आपल्या अंतःकरणाला शांति मिळण्यासाठीं व समाधान प्राप्त होण्यासाठीं आपण उपनिषदांकडे न जातां तुकारामाच्या अभंगांचा आश्रय करितां. म्हणजे आपल्याला तुकोबा हा देवाशीं मध्यस्ती करणारा आहे असें वाटतें.

**डॉ. भांडारकर**–आमच्यासंबंधानें डॉ. मॅक्निकल ह्यांनीं हा भलताच ग्रह करून घेतला आहे असें म्हटलें पाहिजे. परमेश्वरासंबंधानें जेव्हां अत्यंत उच्च विचारांची ओळख करून द्यावयाची असते त्यावेळीं आम्हीं उपनिषदांचाच आधार घेत असतों. परंतु संसारांत राहून पावित्र्याचें संपादन, आत्मसंयमन, आत्मपरीक्षण, आत्मविजय यांच्यासंबंधानें जेव्हां बोलावयाचें असतें तेव्हां तुकोबांचा आधार मी घेत असतों. कारण तुकोबांनीं स्वतः हें सर्व केलें आहे;[1] परंतु उपनिषदकार काय किंवा तुकोबासारखे साधुसंत काय हे गुरूस्थानीं समजावयाचे असतात व तसेंच आम्हीं त्यांना मानतों. आम्हीं त्यांना मध्यस्थ (Mediators) समजत नाहीं. मध्यस्थाची कल्पना गुरूच्या कल्पनेहून अगदीं भिन्न आहे. वैष्णवपंथ व शैव-

---

१ तुकोबा व प्रार्थनासमाज ह्या आपल्या व्याख्यानांत डॉ. भांडारकर ह्यांनीं हेच आपले विचार विस्तारानें विषद केले आहेत. तें व्याख्यान जिज्ञासूंनीं वाचावें, अशी सूचना आहे.

पंथ ह्या माझ्या ग्रंथांतील एका भागावर टीका करितांना गुरू व मध्यस्थ एकच अशी कल्पना करून टीका झाली आहे. पण हा विचार सर्वथैव चूक आहे. गुरू हा आपल्या शिष्यांस बोध करितो, ज्ञान देतो, मार्ग दाखवितो. परंतु मध्यस्थ जो आहे तो इतरांच्या तारणासाठीं स्वतः सर्व कांहीं करीत असतो. म्हणजे इतरांनीं त्याचेवर पूर्ण विश्वास ठेवावयाचा व त्याच्या उदाहरणाचें अनुसरण करावयाचें. मी माझ्या ग्रंथांत असेंही म्हटलें आहे कीं, रामानुजांच्या ग्रंथांत हा जो विचाराचा भाग आला आहे तो ख्रिस्ती विचाराच्या संपर्काचा परिणाम होय. पण डॉ. मॅकूनिकल ह्यांस हा विचार मान्य नाहीं.

## तेलंग, रानडे आणि टिळक.

१९१६ सालीं तेलंगांचे लेख व भाषणें ह्यांचा पहिला भाग प्रसिद्ध झाला. त्यांसंबंधानें टाइम्स पत्रासाठीं सर नारायण ह्यांनीं एक लेख लिहावा अशी मि. नटराजन ह्यांनीं विनंति केली. त्याचवेळीं सर नारायण ह्यांस ताप येत असल्यामुळें लेख लिहिण्याचें त्यांस जमलें नाहीं. पण दुसऱ्या दिवशीं डॉ. भांडारकरांचें व त्यांचें संभाषण झालें त्यावेळीं हा विषय निघाला.

**सर नारायण**—मि. नटराजन म्हणतात कीं, “तेलंगांच्या चरित्राकडे पहातां त्यांनीं कांहीं मोठें धडाडीचें, अगर ज्याची मागें आठवण राहील असें सार्वजनिक स्वरूपाचें विधायक कार्य केलें असें म्हणतां येत नाहीं. रानड्यांनीं सामाजिक परिषद हातीं घेतली व तिच्याद्वारें आपलें कार्य केलें; अलीकडल्या काळांत गोखल्यांनीं आपलें भारत सेवक मंडळ स्थापून आपल्या कार्याची व आपल्या ध्येयाची दिशा ठरविली. तेलंगांनीं तसें कांहीं केलें नाहीं; एवढेंच केवळ नव्हे तर सामाजिक बाबतींत Least resistence चा मार्ग त्यांनीं स्वीकारिला. ह्या मार्गाचें अबलंबन करणारांतून विशेष कर्ती माणसें क्वचितच निघतात! असें असल्यामुळें तेलंगांचें आपल्या काळच्या लोकांवर जें वजन होतें त्याची मला चांगलीशी मीमांसा करणें सुलभ जात नाहीं.” तेलंगांनीं कांहीं विधायक कार्य केलें नाहीं, रानड्यांनीं तें केलें, असें जें मि. नटराजन ह्यांचें म्हणणें आहे त्यावर आपलें काय म्हणणें आहे?

**डॉ. भांडारकर**—रानड्यांचें खरें कार्य राजकीय स्वरूपाचें होतें. त्यांचें जें सामाजिक स्वरूपाचें कार्य होतें तें राजकीय कार्यास पुरवणीदाखल होतें. त्यांचे जे पुष्कळ अनुयायी व चहाते आणि भक्त असत त्यांच्यांतीलच कित्येक असें म्हणत कीं, रानडे स्वतः सरकारी नोकर असल्यामुळें राष्ट्रीयसभेच्या बैठकीच्या वेळीं सालोसाल मुद्दाम हजर राहाणें त्यांना जमलें नसतें. म्हणून त्या संस्थेशीं निकट संबंध ठेवणें सुलभ जावें ह्या सामाजिक परिषद स्थापण्याचा एक हेतु होता. आतां रानड्यांचें खरें काम ज्याप्रमाणें राजकीय होतें त्याचप्रमाणें तेलंगांचेंही होतें असें

मला वाटतें. तेलंगांनींच बॉंबे प्रेसिडेन्सी असोसिएशन स्थापिली नाहीं काय? मला तर माहित आहे कीं, हायकोर्टाचे जज्ज होईपर्यंत ती संस्था सर्वस्वी त्यांच्यावर अवलंबून होती व त्यांचेंही त्या संस्थेकडे सर्व लक्ष असे. जेव्हां असोसिएशनची स्थापना झाली त्यावेळीं व नंतरही असोशिएशनचे हेतु व कार्य, तें करण्याचे निरनिराळे मार्ग ह्यांसंबंधानें त्यांचें व माझें वारंवार संभाषण होत असे."

**सर नारायण**–तें सगळें खरें, पण रानड्यांच्या कार्याशीं तुलना करितांना तेलंगांनीं सामाजिक क्षेत्रांत फार थोडें कार्य केलें एवढें तर खरें ना?

**डॉ. भांडारकर**–बोलावयाचें एक आणि करावयाचें निराळेंच हें तेलंगांना माहित नव्हतें. सत्यावर माझा जो जोर असतो त्याबद्दल रानडे मला नेहमीं टोंचत असत. सगळेच लोक जर नेहमींच सत्याला बिलगूं लागले तर त्यांच्यावर मृत्यूचेच प्रसंग येतील, असें ते म्हणत. एकदां रानड्यांनीं तेलंगांना लिहिलें होतें कीं मोर्ले-साहेबांनीं Compromise ( तडजोड ) ह्या आपल्या ग्रंथांत विवेकास अनुसरूनच वागणें, सत्यास अनुसरणें वगैरे संबंधानें जें लिहिलें आहे, तें सर्व त्यांच्या देशांत ठीक आहे. तें ध्येय आमच्या देशांत चालावयाचें नाहीं. १८९२ सालीं रानड्यांनीं प्रायश्चित्त घेतलें म्हणून मी त्यांच्यावर फार कडक टीका केली. त्यावेळीं मामा परमानंदांनीं मला निरोप पाठविला कीं, रानड्यांवर मी असें तुटून पडूं नये. कारण, राजकीय क्षेत्रांत त्यांनीं पुष्कळ महत्त्वाची कामगिरी केली आहे. ( नंतर १९१६ सालीं जहालांनीं बेळगांव येथें जी प्रांतिक परिषद भरविली होती व राष्ट्रीय सभा आपण आपल्या ताब्यांत घेतली पाहिजे असें जें त्यावेळीं धोरण दिसलें त्यासंबंधानें टाइम्समध्यें आलेल्या लेखांविषयीं बोलत असतांना भांडारकर म्हणाले )

आतां जहालांनीं राष्ट्रीयसभेवर छापा घातला व ती आपल्या ताब्यांत घेतली म्हणजे तिची धडगत नाहीं. कारण, टिळकांच्या पक्षांत कांहीं विध्वंसक माणसें आहेत. तीं राष्ट्रीय सभेची वाट लावल्यावांचून स्वस्थ बसणार नाहींत. स्वतः टिळकांचें तसें नाहीं. त्यांची परी निराळीच आहे. ते संभावीत आहेत व त्यांच्या ठिकाणीं दयेची भावना आहे. एकदां त्यांनीं मला संभाषणांत असें स्पष्ट सांगितलें कीं, ह्या ब्रिटिश सरकारचीं सर्व बिंगें बाहेर काढणें हा आपला प्रधान हेतु आहे (My one great aim of life is to expose the British Government.)

**सर नारायण**–काय टिळकांनीं असें म्हटलें आणि तें केव्हां बरें म्हटलें असावें?

**डॉ. भांडारकर**–१९०८ सालीं त्यांना शिक्षा होण्यापूर्वी ते मजकडे वारंवार येत असत, त्या वेळीं हे असे उद्गार त्यांनीं पुष्कळदां काढले आहेत. मी ब्रिटिश सर-

कारचा तिरस्कार करीत आहें असें त्यांनीं केव्हांच म्हटलें नाहीं. त्यांच्या मार्गांत अडचणी उत्पन्न करावयाच्या, विघ्नें आणावयाचीं, व त्यांच्या मनाप्रमाणें कारभार करणें त्यांना अशक्य करावयाचें हा त्यांचा हेतु होता. हें एवढेंच त्यांच्या विरुद्ध बोलतां येईल, पण ते गृहस्थ आहेत, संभावीत आहेत ह्यांत कांहीं संशय नाहीं.

**सर नारायण**–ते निर्व्यसनी आहेत, नव्हे ?

**डॉ. भांडारकर**–होय, होय, ते अगदीं निर्व्यसनी आहेत. ( कांहीं वेळानें अहंकार व निंदा ह्यांचेसंबंधानें बोलतांना )

अहंकार हा मूलतः नष्ट करण्याचा दीर्घ प्रयत्न झाला पाहिजे. आणि मनुष्यानें आपली कितीही निंदा झाली, नानाप्रकारें त्याच्यावर आरोप ठेवण्यांत आले, तर त्यांस तोंड देऊं नये, आपली बाजू पुढें करून विरुद्धपक्षाचें स्वरूप उघड करून दाखविण्याचा प्रयत्न करूं नये. आपण सर्व सहन करावें, विरुद्ध टीकेकडे, निर्भर्त्सनेकडे दुर्लक्ष करावें. शांत रहावें म्हणजे कालें करून सर्व कांहीं नीट होतें. हें स्वतःसंबंधानें झालें. परंतु ज्याचें संरक्षण करणें, अगर ज्याचा बचाव करणें हें आपलें कर्तव्य आहे, अशा कोणा व्यक्तीची निंदा कोणी केली, अगर अपमान केला, तर त्याच्या संरक्षणार्थ आपण धांवून येणें हें आपलें कर्तव्य आहे.

## युरोपिअनांचा शिरजोरपणा.

एकदां युरोपिअन लोक हिंदी लोकांशीं आगगाड्यांत जे बेमुर्वतखोरपणें वागतात त्यासंबंधानें बोलणें निघालें होतें. संभाषणाच्या वेळीं डॉ. भांडारकर, सर नारायण व नारायणराव गोखले वकील हजर होते.

**डॉ. भांडारकर**– आगगाडींत जे युरोपिअन लोक हिंदी लोकांशीं असभ्यतेनें वागतात, त्यांना शिक्षा करण्यासाठीं सरकारानें एक स्वतंत्र कायदाच केला पाहिजे. असें झालें तरच हिंदी व युरोपिअन लोकांचा संबंध सुरुळीतपणें चालण्याचा संभव आहे. ह्याला लॉर्ड हार्डिंगसारखाच व्हाइसरॉय पाहिजे.

**नारायणराव**–लॉर्ड कर्झनच्या वेळीं एका युरोपिअन सोल्जरानें एका हिंदी इसमास गैररीतीनें वागविल्याबद्दल त्यांनीं योग्य हुकुम सोडल्यानंतर अँग्लो इंडिअन पत्रांनीं त्यांच्यावर किती कडक टीका केली त्याची आपल्याला आठवण असेलच. ह्या बाबतींत त्यांचें धोरण प्रथम हिंदी लोकांस अनुकूल असेंच होतें, परंतु त्यांच्यावर जेव्हां सारखा टीकेचा भडिमार होऊं लागला तेव्हां त्यांना आपलें धोरण बदलणें भाग झालें.

**डॉ. भांडारकर**–तें कांहीं नाहीं, सरकारनें प्रथम जाहीर केलें पाहिजे कीं जो युरोपिअन आगगाडींत गैरवर्तन करील त्यास कडक शिक्षा केली जाईल. आणि असें उदाहरण घडलें म्हणजे मग त्याप्रमाणें शिक्षा केली पाहिजे.

**सर नारायण**—सरकारनें अशी माहिती प्रसिद्ध केलीही आहे व सरकार शिक्षाही करतें, परंतु जोंपर्यंत आम्ही राजकर्त्यांपैकीं आहोंत व हिंदी लोक हे आम्हीं जिंकिलेले लोक आहेत ही भावना आहे तोंपर्यंत सरकारच्या नुसत्या कागदी सूचनांचा काय उपयोग ? हिंदी लोकांचा दर्जा हळुहळू तरी युरोपिअनांच्या बरोबरीचा झाला म्हणजे हें सर्व आपोआप मिटेल. आज देखील हिंदी लोक गरीबीनें वागतात तेथेंच आडदांड युरोपिअनांना फावतें व ते त्यांना मारतात. त्यांना कळून चुकलें आहे कीं हिंदी लोक भित्रे आहेत व ते उलट हात उगारीत नाहींत. पण ते शूर आहेत व ठोशास ठोसा द्यावयास सिद्ध आहेत असा त्यांस अनुभव येऊं लागला कीं हे प्रकार थांबतील!

एका देशानें दुसऱ्या देशाचा पराजय करून त्यावर जय मिळविण्यासंबंधानें बोलतांना नारायवराव गोखले म्हणाले:

खरा जय म्हणजे केवळ देश काबीज करून नव्हे तर लोकांचीं मनें व आत्मेही जिंकणें हा खरा जय होय.

**डॉ. भांडारकर**—अगदीं बरोबर. पहा, ग्रीक लोकांनीं आपली विद्वत्ता व तत्त्वज्ञान ह्यांच्या योगें रोमन लोकांवर जय संपादिला. रावसाहेब मंडलिकांनीं जेव्हां नेटिव्ह ओपिनिअन पत्र सुरू केलें त्यावेळीं त्यांनीं मामा परमानंदांस पहिले संपादक नेमिले त्यावेळीं मीं The Conquerors' Conqueror अशा मथळ्याखालीं एक लेख लिहिला होता व त्यांत मीं म्हटलें होतें कीं आमच्या राज्यकर्त्यांवर आजही आम्हांस जय मिळवितां येणें शक्य आहे. आमचें जें संस्कृत ज्ञानभांडार आहे त्याच्याद्वारें आम्हांस त्यांस जिंकितां येईल. हा माझा लेख नेटिव्ह ओपिनिअन पत्राच्या पांचव्या किंवा सहाव्या अंकांत आलेला आढळेल.

## प्रो. कर्वे ह्यांची स्त्रियांची युनिव्हर्सिटी व धर्म.

एके दिवशीं प्रो. कर्वे व प्रो. भाटे युनिव्हर्सिटीसंबंधाच्या कांहीं बाबतींत विचार-विनिमय करण्यासाठीं लोणावळें येथें येणार होते. ते आले म्हणजे आपल्या इच्छे-नुसार मी हजर राहीन पण वादविवादांत भाग घेणार नाहीं असें सर नारायण ह्यांनीं पूर्वींच सांगून ठेविलें होतें, त्याप्रमाणें त्यांनीं केलें. हे दोघे प्रोफेसर सर नारायणांकडे प्रथम गेले. त्यांस घेऊन नारायणराव डॉ. भांडारकरांकडे गेले व परततांना त्यांचा फराळही सर नारायण ह्यांच्याकडेच झाला. नंतर कांहीं दिवसांनीं डॉ. भांडारकर ह्या युनिव्हर्सिटीसंबंधाच्या एका सभेला जाऊन आल्यावर पुढील संभाषण झालें.

**डॉ. भांडारकर**—Indian Women's University च्या सेनेटच्या पहिल्या

सभेंत प्रो. कर्वे ह्यांनीं सांगितलें कीं, हल्लींच्या काळीं कोणालाही धर्माची आवश्यकता भासत नाहीं. हल्लींचें युग Rationalism चें युग आहे. म्हणून मीं त्यांना सांगितलें कीं, असें जर आहे तर स्त्रियांच्या विद्यापीठीं जर धर्मशिक्षण द्यावयाचें तर तें Theistic म्हणजे एकेश्वरी लाईनवर दिलें जावें; नाहींतर मुळींच देऊं नये असें माझें मत आहे.

**सर नारायण**–पण, प्रो. कर्वे Rationalism ह्याचा अर्थ तरी काय समजतात ?

**डॉ. भांडारकर**–जें इंद्रियांस गोचर आहे तें ( What is apparent to the senses ) प्रो. कर्वे ह्यांनीं सभेंत स्पष्ट सांगितलें कीं, आम्हांला धर्माची कांहीं जरूर नाहीं, तरीपण शीलसंवर्धनाची आवश्यकता आहे. (Building of character ) त्याचवेळीं खरें शीलसंवर्धन परमेश्वरावरील विश्वासावांचून शक्य नाहीं असें मीं स्पष्टपणें सांगितलें.

**सर नारायण**–फर्ग्युसन कॉलेज व सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटीचीं माणसें हींच मोठी काळजी उत्पन्न करितात. देवास बाजूस सारून नीतीचें आचरण हीच त्यांची नीतीची कल्पना आहे. परंतु देवावरील विश्वास जर काढून घेतला तर शीलाचा पाया किंवा शीलाचें उगमस्थान काय राहिलें ? ( If God is taken away where is the basis or impulse for Character ? )

**डॉ. भांडारकर**–ते म्हणतात, कर्तव्याची तीव्र जाणीव ( Strong sense of duty. )

**सर नारायण**–पण त्या कर्तव्याच्या जाणिवेच्या मागें जो मोठा आधार पाहिजे, जोर पाहिजे तो कोठून येणार ? फ्लॉरेन्स नाइटेंगेलनें एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, परमेश्वर केंद्रीभूत करून वागणें म्हणजेच शीलवान होणें होय. ( Character means being centered in God ).

**डॉ. भांडारकर**–होय. तुम्ही म्हणतां तें बरोबर आहे.

**सर नारायण**–माझ्यामतें केवळ कर्तव्याची तीव्र जाणीव असून भागत नाहीं. गीतेमध्यें ज्याला अमानित्व ( Humility ) म्हटलें आहे त्याच्या पायावर ह्या कर्तव्याच्या जाणीवेची उभारणी झाली पाहिजे. ह्याविषयीं ज्ञानेश्वरांचें म्हणणें लक्षांत घेण्यासारखें आहे. ज्ञानेश्वरांच्या म्हणण्याप्रमाणें अमानित्वाचा अर्थ असा आहे कीं, आपण आपला स्वतःचा सन्मान झालेला डोळ्यांनीं पाहूं नये, आपली स्वतःची स्तुति कानांनीं ऐकूं नये आणि आपण कोणी तरी एक विशेष व्यक्ति आहोंत असेंही कोणी आपल्या संबंधानें म्हटलेलें आपण ऐकूं नये.

**डॉ. भांडारकर**–ज्ञानेश्वरांच्या ह्या त्या ओव्या :—

पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ति कानीं नायकावी ।
हा अमुका ऐसी नोहावी । सेचि लोकां ॥
तरी क्वणेंही विषयींचे । ज्ञान होणें न रुचे ।
संभावितपणाचें । वोझें जया ।
आथिलेचि गुण वानितां । मान्यपणें मानितां ।
योग्यतेचें येतां । अंगीं रूप ॥
तें गजबजो लागे कैसा । व्याधें रुंधला मृग जैसा । इ०

ह्यावेळीं काल सकाळीं पुण्यास घडलेल्या एका प्रकाराची आठवण होते. मी कॉफी घ्यावयास गेलों तों माझ्या मागोमाग दुध मिळावें म्हणून एक मांजरी माझ्या पाठोपाठ आली. ती दुधासाठीं म्यांव म्यांव करीत आहे तों वरून तिचें एक पिलूं खालीं पडलें व तिच्या ओटीस लागलें ! त्या पोराला ही बुद्धी कोठून आली ? देवाकडूनच नव्हे काय ?

**सर नारायण**—ज्यांचा देवावर विश्वास आहे अशीं कांहीं माणसेंही मानासाठीं हपापलेलीं असतात व निरपेक्षबुद्धीनें कर्तव्य करण्याची जाणीव त्यांच्यांत नसते हेंही अनुभवास येतें.

**डॉ. भांडारकर**— प्रो. कर्वे ह्यांच्या आत्मवृत्तांत त्यांच्या धर्मविषयक विचारांविषयीं एक प्रकरण आहे तें तुम्ही वाचा म्हणजे धर्मासंबंधानें त्यांचें म्हणणें काय आहे त्याची तुम्हांला यथार्थ कल्पना होईल.

---

(एके दिवशीं सकाळीं सर नारायण डॉ. भांडारकरांच्या भेटीस गेले असतांना स्टूडंट्स सायंटिफिक सोसायटीसंबंधानें व स्त्रियांच्या शिक्षणासंबंधानें बोलणें निघालें असतांना सर रामकृष्णपंत म्हणाले :—

१८५५ व १८५६ सालीं ज्यावेळीं मीं एल्फिन्स्टन कॉलेजांत अभ्यास करीत होतों त्यावेळीं सोसायटीच्या मराठी विभागाचा मी सेक्रेटरी होतों हें पुष्कळांस आज माहितही नाहीं. त्यावेळीं मीं त्या विभागासंबंधानें फारच मेहनत घेऊन काम करीत असें. मुलींच्या व स्त्रियांच्या शिक्षणाचा विषय त्यावेळेपासून आमच्या दृष्टीपुढें आहे, (पुढें कर्व्यांच्या अनाथ—बालिका—श्रमासंबंधानें बोलतांना ते म्हणाले :— )

होय, प्रो. कर्वे आतां स्त्रियांसाठीं युनिव्हर्सिटी काढण्याच्या खटपटींत आहेत, पण त्यांच्या अनाथ—बालिका—श्रमासंबंधानें एक सूचना मीं आज कित्येक दिवस करीत आहें तिच्याकडे त्यांचें लक्ष नाहीं. हा आश्रम स्थापन झाल्याला आतां विसाहून अधिक वर्षें झालीं. एवढ्या काळांत आमची एकही मुलगी अगर विधवा

स्त्री प्रवेश परीक्षाही पास झालेली नाहीं. आतांपर्यंत आश्रमामध्यें ज्या मुली वाढल्या व ज्यांचें शिक्षण आम्हीं केलें त्यांचें पुढें काय झालें, त्यांची काय स्थिति आहे, एकंदर समाजांत त्यांचा दर्जा काय आहे, त्या कुठेंकुठें पोटापाण्याचे धंदे करीत आहेत ह्याविषयीं जितकी मिळेल तितकी माहिती प्रसिद्ध केल्यानें लोकांचा आपल्यावर अधिक विश्वास बसेल व तितका अधिक लोकाश्रय आपल्याला मिळेल, पण त्या चांगल्या स्थितींत आहेत व त्यांचा दर्जाही चांगला आहे असा ठोकळ जबाब मला मिळतो, पण हें काम कांहीं मला हवें तसें होत नाहीं.

## ज्ञान, शहाणपणा, बंगालचे संत इ.

**सर रामकृष्ण**–हें पहा, मी आपल्या कारकुनाजवळून एमिअल्स जर्नेल वाचवून घेत आहें. हा येथें सांगत आहे कीं, खरें सुख शहाणपणांत आहे आणि विवेक व भावना ह्यांचें मिश्रण म्हणजे शहाणपणा, अशा स्थितींत आत्मा सम्यक स्थितींत असतो.

**सर नारायण**–म्हणजे ज्ञानेश्वरीच्या भाषेंत म्हणावयाचें म्हणजे

**साम्यत्व चित्ताचें तेंचि सार योगाचें**

**सर रामकृष्ण**–होय, तसेंच.

**सर नारायण**–आतां शहाणपणासंबधानें एमिअलनें जें म्हटलें आहे त्यासंबंधानें असें म्हणतां येतें कीं, असलें शहाणपण क्वचित् अनुभवावयास सांपडतें. टेनिसननें कोठेंसें अशा अर्थाचे उद्गार काढले आहेत कीं, जेव्हां ज्ञानाचा झपाट्यानें प्रसार होऊं लागतो तेव्हां शहाणपण रेंगाळूं लागतें!

**सर रामकृष्ण**–शाबास, फार चांगली आहे ही कल्पना! ( इतक्यांत लेडी लक्ष्मीबाई तेथें आल्या त्यांस–उद्देशून ) आपण येण्यापूर्वी मी एमिअल नामक एका ग्रंथकाराचें एक पुस्तक वाचीत होतों. त्याचें म्हणणें असें आहे कीं, सुखासाठीं मनुष्यास कांहीं तरी एक स्वतः ठरविलेलें साध्य, किंवा मध्यबिंदु असावा लागतो. आणि आपल्या पत्नीवरील प्रेम हा तो त्याचें मध्यबिंदु होय. माझें तें केंद्र गेलें आणि सर नारायण तुमचें तें आहे, देवानें तुम्हाला त्याचा पुष्कळ वर्षें लाभ द्यावा अशी माझी प्रार्थना आहे.

**सर नारायण**–बंगालच्या साधुसंतांविषयीं आपल्याला काय वाटतें?

**सर रामकृष्ण**–आपल्या महाराष्ट्रामध्यें जशी एक संतमालिका आपल्याला दाखवितां येते तसें बंगालचें नाहीं. त्याचप्रमाणें ज्या योग्यतेचे संत आपल्या महाराष्ट्रांत होऊन गेले त्या योग्यतेचे संत बंगालमध्यें झालेच नाहींत. नाहीं म्हणावयास तेथें एक चैतन्य देव होऊन गेले, तेच त्यांचे सर्वांत मोठे संत आणि दुसरे

नित्यानंद महाराज, पण ते तर चैतन्यांचे शिष्यच होत. दुसरी गोष्ट अशी कीं बंगालच्या साधुसंतांच्या लिखाणांत राधाकृष्णाच्या प्रेमाचा बाष्कळ पाल्हाळ येथून तेथून भरलेला आढळतो. आमच्या संतांच्या कृतींत देवाच्या सात्विक प्रेमाचें जें वर्णन आढळतें व जें वाचीत असतां आपण कांहीं तरी उच्च दर्जाचें काव्य वाचीत आहों असें आपल्याला वाटतें तसें त्यांत नाहीं. बंगाली लोक हे मूळ भावनाप्रधानच आहेत, शांत आणि गंभीरपणा हा त्यांच्यांत नाहींच. त्यांची भाषाच पहा ना. ती आपल्या मूळ स्वरूपास विसरून आतां वावरत आहे ! संस्कृताचे मूळ प्रत्यय वगैरे ह्यांस बेलाशक झुगारून देऊन तिचा व्यवहार चालला आहे. अगदीं राममोहन राय देखील माझ्यामतें impulsive होते.

**सर नारायण**–आपली जुनी संयुक्त कुटुंबपद्धति आतां बहुतेक गेलीच !

**सर रामकृष्ण**–होय. माझें ध्येय असें होतें कीं जुनी कुटुंबपद्धत कायम ठेवून तींत आधुनिक दृष्टीनें योग्य त्या सुधारणा करावयाच्या, पण तें माझें ध्येय साधलें नाहीं हें मला कबूल केलें पाहिजे. पहा परवां हिंदुस्थान सरकारनें स्त्रियांच्या शिक्षणासंबंधानें एक सर्क्युलर काढलें आहे त्यांत त्यांनींसुद्धां हें प्रतिपादिलें आहे कीं, हिंदूंतील जुनी संयुक्त कौटुंबिक पद्धति आतां बहुतेक नष्ट झाली आहे. पण त्यांच्याही ही गोष्ट कशी ध्यानांत आली ?

**सर नारायण**–त्यांत काय नवल आहे ? सर शंकरन् नायर ह्यांनीं ती माहिती पुरविली आहे.

**सर रामकृष्ण**–अस्सं, पण तें अगदीं बरोबर आहे. पहा, पितापुत्राचें भांडण होतें काय आणि बाप आपला सर्व पैसा मुलाला न देतां व त्याचा वारसा साफ तोडून फर्ग्युसन कॉलेजला आपला सर्व पैसा देतो काय ?

**सर नारायण**–पितापुत्रांच्या भांडणांचा त्या कॉलेजला फायदा मिळूं लागला आहे हें खरें काय ?

**सर रामकृष्ण**—मला तरी अशीं तीन उदाहरणें माहित आहेत कीं जेथें पितापुत्रांतल्या भांडणामुळें मुलांना कांहींही न देतां आपला सर्व पैसा फर्ग्युसन कॉलेजला द्यावयास बाप पुढें आले आहेत. हीं व अशीं दुसरीं उदाहरणें ध्यानांत घेतां आपली जुनी संयुक्त कुटुंबपद्धति कशी बिघडली आहे तें दिसून येतें. मुलांना आपल्या वडिलांचें वर्चस्व मान्य होत नाहीं. आणि प्रथम बायकांपासून ह्या धुसफुसीस प्रारंभ होतो. म्हणून मला असें वाटूं लागलें आहे कीं, एकदां मुलाचें लग्न झालें, म्हणजे नंतर एकत्र राहून तें तसें एकत्र भांडणास कारण होण्यापेक्षां, मुलानें निराळें बिन्हाड करून राहावें हें बरें. कारण, आईबाप व विवाहित मुलें एकत्र राहिलीं म्हणजे कांहींना कांहीं कारणांवरून सहजगत्या भांडणें उपस्थित होतातच.

पूर्वीचा प्रेमभाव नष्ट होत जातो व जुलमाचा रामराम चालू असतो. त्यापेक्षां प्रथमपासूनच ही सावधगिरी घेतलेली काय वाईट ?

## प्रिन्सिपाल हेरंबचंद्र मैत्र व सर नारायण.

ता. २१ एप्रिल १९१६ रोजीं कलकत्यास सर नारायण बाबू प्रतुलचंद्र सोम ह्यांच्या येथें चाहाला गेले होते. त्यावेळीं तेथें प्रिन्सिपॉल हेरंबचंद्र मैत्र, पंडित सीतानाथ तत्त्वभूषण, प्रो. सेन वगैरे मंडळी जमली होती. त्यावेळीं प्रि. मैत्र म्हणाले कीं, कांहीं काळापूर्वी ऑक्सफर्ड मिशनचे फादर लोक ब्राह्मसमाजाच्या मंडळींत अधिक मिसळून असत. कारण, त्यावेळीं त्यांस असें वाटत असे कीं, ब्राह्मसमाज व ब्राह्मधर्म हा ख्रिस्ती धर्माच्या अलीकडची एक पायरी आहे. पुढेंमागें ही सर्व मंडळी लवकरच ख्रिस्ताकडे येणार आणि म्हणून हे फादर लोक आमच्यामध्यें सढळपणें मिळून मिसळून वागत असत. परंतु इतक्या दिवसांच्या अनुभवामुळें हा त्यांचा ग्रह चुकीचा असल्याचा त्यांना अनुभव आल्यामुळें ते आतां आमच्यांत फारसे मिसळत नाहींत. एकदां अशाच चहाच्यावेळीं सर व्हॅलेंटाइन चिरोल, सर लॉरेन्स जेन्किन्स, एक ऑक्सफर्ड फादर रे. मि. होम्स व मी अशी मंडळी हजर होतों, त्यावेळीं ब्राह्मसमाजाचें बहुजनसमाजावरील वजन ह्यांसंबंधानें बोलणें निघालें. चिरोल साहेबांनीं मला विचारलें कीं ब्राह्मसमाजाचें लोकांवरील वजन कमी होत चाललें आहे असें जें म्हणतात तें खरें काय? त्यावर मीं त्यांना सांगितलें कीं, बहुजनसमाजावरील वजन मुळींच कमी झालेलें नाहीं. ह्यावर चिरोल साहेब मला म्हणाले कीं, अहो ते एस्. आर्. दास तेही ब्राह्म आहेत ना? ते तर मला सांगत होते कीं ब्राह्म समाजाचें आतां पूर्वीसारखें लोकांवर वजन राहिलें नाहीं, तें कमी झालें आहे. त्यावर मीं चिरोल साहेबांना सांगितलें कीं, मि. दास ह्यांना तसें वाटत असलें तर वाटो; मला तसें वाटत नाहीं. मी साधारण समाजाच्या कार्यकारीमंडळीचा सभासद आहें. मि. दास सभासद नाहींत; मी नियमानें उपासनेस हजर असतों; मि. दास नसतात आणि आमच्या साप्ताहिक उपासनांच्यावेळीं प्रचंड लोकसमूह हजर असतो. ह्यावर मला हिणविण्यासाठीं मि. होम्स म्हणाले होते कीं, उपासनेला तर बहुतेक बाहेरचे लोक असतात ! त्यांस मीं असें उत्तर दिलें होतें कीं, हे बाहेरचे लोक शेंकड्यांनीं हजर रहातात ह्याच्यावरूनही ब्राह्मसमाजाचें लोकांवरील वजन कायम आहे हें दाखवीत नाहीं काय ? असें जेव्हां मीं म्हटलें तेव्हां मि. होम्स ह्यांनीं कांहीं प्रत्युत्तर दिलें नाहीं.

ब्राह्म धर्माला दुसऱ्या एका दिशेनें विरोध होत असतो. कांहीं लोक असें म्हणतात कीं, गीतेंत आम्हांला श्रीकृष्णांनीं उपदेश करून ठेविला आहे कीं स्वधर्मे निधनं श्रेयः म्हणून आम्हांला तुमचा हा धर्म नको. आमचा आहे तो बरा आहे.

**सर नारायण**–ह्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण धर्म हा शब्द कर्तव्य ह्या अर्थानें तेथें योजिलेला आहे, धर्म ह्या अर्थानें नाहीं हें आतां सर्वमान्य झालें आहे.

**मि. मैत्र**—होय, अगदीं बरोबर. राजनारायण बसू महाशयांनीं एकदां एका पंडिताशीं वाद करितांना त्यांस निरुत्तर केलें होतें. राजनारायणांनीं विचारिलें, पंडितजी, तुम्ही स्वधर्म स्वधर्म म्हणतां, पण धर्म म्हणजे काय तें तर सांगा. धर्म? धर्म म्हणजे सत्य, असें पंडितजींनीं उत्तर दिलें. त्यावर बसू महाशय म्हणाले, पंडितजी, मग सत्य काय अनेक असतात? पंडितजी निरुत्तर झाले.

## भावनाप्रधान बंगाली.

**मि. मैत्र**–केशवचंद्र सेन विलायतेंत असतांना त्यांची व जॉन स्टुअर्ट मिल ह्यांची भेट झाली असतांना मिल केशवचंद्रांना म्हणाले कीं, तुम्ही बंगाली लोक भावनाप्रधान आहां, परंतु ज्या लोकांना जगांत नांव मिळवावयाचें आहे त्यांनीं बुद्धिप्रधान असलें पाहिजे.

**सर नारायण**–पण मिल स्वतः भावनाप्रधान होता त्याची काय वाट? तसें नसतें तर वर्डस्वर्थच्या कवितेवर त्याची आत्यंतिक भक्ति असती ना, त्याच्या बायकोविषयीं त्याच्या मनांत प्रेमाची भावना असती ना आणि सृष्टिसौंदर्यही त्याला इतकें आवडतें ना!

**मि. मैत्र**–खरें पहातां कल्पकता (इमॅजिनेशन) व विवेक (रीझन) ह्यांची आवश्यकता आहे.

**सर नारायण**–पण नीट विचार केला तर इमॅजिनेशन म्हणजे रीझन असें दिसून येईल. वर्डस्वर्थनें आपल्या प्रिल्यूडमध्यें म्हटलें आहे कीं इमॅजिनेशन, कल्पकता अति कोटीला नेणें म्हणजेच विवेक. खरें म्हटलें असतां कल्पकता म्हणजे दुसऱ्याच्या स्थितीमध्यें स्वतःस आणण्याची पात्रता.

## नैराश्य.

ह्यानंतर आयुष्यांतील नैराश्य, स्वतःचें आयुष्य व्यर्थ गेलें असें वाटणें इ० विषयासंबंधानें बोलणें निघालें असतांना मि. मैत्र म्हणाले, मलाही कधींकधीं अगदीं निराश वाटतें व आपलें आयुष्य अगदीं फुकट गेलें कीं काय असा विचार मनांत

येतो. असा विचार मनांत आला कीं, मी परमेश्वराचें स्मरण करितों व मनःपूर्वक त्याची प्रार्थना केल्यावर माझें मन शांत व समाहित होतें असा माझा अनुभव आहे. ह्या माझ्या संवयीमुळें माझा पुष्कळ फायदा झाला आहे. एकदां एका कमिटींत कांहीं मुद्यावर चर्चा चालू होती त्यावेळीं मीं माझे विचार कमिटीपुढें ठेवीत असतां नाअध्यक्षांनीं मला अपमानास्पद अशा शब्दांची योजना केली. मीं ते शब्द शांतपणें सहन केले व तितक्याच शांतपणें उत्तर दिलें. तें पाहून सभेनंतर किती तरी लोकांनीं माझें अभिनंदन केलें. एमरसननें जें एकेठिकाणीं म्हटलें आहे कीं, दुसऱ्यानें तुझा अपमान केला तरी हरकत नाहीं, पण तूं दुसऱ्याचा अपमान करूं नको, तें मीं नित्य आपल्या दृष्टीपुढें ठेवीत असतों.

**मि. मैत्र**–( सर गुरुदास बानरजीसंबंधानें बोलणें निघालें असतांना )

आजकाल लोकांचे पुढारी म्हणून जे लोक पुढें आलेले आहेत, त्यांत सर गुरुदास बानरजी हे एक अत्यंत शीलवान व आपल्या शीलाच्या जोरावर सर्व व्यवहारांत वागणारे गृहस्थ आहेत. लॉर्ड ल्यानस्डाऊन व्हाइसरॉय असतांना त्यांनीं सर गुरुदास ह्यांना पुन्हां व्हाइस चान्सलर होण्यासंबंधानें विनंति केली होती. पण एकाच माणसानें ती जागा घेऊन बसणें योग्य नाहीं ह्या तत्त्वावर त्यांनीं ती नाकारली.

**सर नारायण**–हें तत्त्व मलाही आवडतें. सर रामकृष्ण भांडारकर बी. ए. ला नेहमीं परीक्षक असत. पण तेलंगांना त्या जागीं नेमणें योग्य आहे असें त्यांस वाटल्यामुळें त्यांनीं त्या परीक्षेला परीक्षक होण्याचें नाकारलें. ( सर नारायण ह्यांनीं सरकारच्या अत्याग्रहावरून दुसऱ्या खेपेस व्हाइस चान्सलरची जागा जरी स्वीकारिली होती तरी ती फक्त कांहीं महिन्यांसाठींच असें प्रथम बजावून ! )

**पंडित सीतानाथ**–सर नारायण, आपण टिळकांची गीतेवरील टीका सबंध वाचली आहे काय हो ?

**सर नारायण**–नाहीं बुवा, मीं त्यांतले कांहीं भाग वाचले आहेत व कांहीं पानें चाळलीं आहेत. आपल्या टीकेचा त्यांनीं सहानुभूतिपूर्वक व पसंति दर्शवून विचार केला आहे असें मला स्मरतें.

**पं. सीतानाथ**–होय, दुसऱ्यांनींही मला असें सांगितलें आहे. मजजवळ टिळकांच्या ग्रंथाची एक प्रत आहेही. पण मला स्वतःला मराठी भाषेचें ज्ञान नसल्यामुळें मला त्या प्रतीचा कांहीं उपयोग करून घेतां येत नाहीं. मीं स्वतः टिळकांना माझें पुस्तक वाचून आपल्या पुस्तकांत त्याचा कोणत्या दृष्टीनें विचार केला आहे असें पत्र पाठवून विचारलेंही होतें. त्यांनीं मला उत्तर पाठविलें कीं मीं

त्यांचें पुस्तक सबंध वाचून पहावें व लवकरच मी माझ्या पुस्तकाची बंगाली व इंग्रजी आवृत्ति काढणार आहें.

**मि. मैत्र**—गीता फार जुना ग्रंथ आहे असें कांहीं म्हणतां येत नाहीं. उपनिषदांच्या दृष्टीनें तो अलिकडचाच ग्रंथ आहे असें म्हटलें पाहिजे.

**सर नारायण**—मग त्या दृष्टीनें पाहिलें तर आमची ज्ञानेश्वरी अगदींच अलीकडची समजली जाईल.

**मि. मैत्र**—गीतेंत निरनिराळ्या विचारांच्या शाखांचा समन्वय करण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे.

**सर नारायण**—होय, पण त्याच्यामुळें परस्पर विरुद्ध विधानेंही आलीं आहेत. मला तर असें वाटतें कीं होतां होईल तों तडजोड करावयाची व त्यायोगें मूळ तत्त्वाला बाध आला तरी हरकत नाहीं हा जो आपला दोष त्याला गीताकारही बळी पडला आहे !

## सर नारायण व रवींद्रनाथ ठाकूर.

१९२२ सालच्या नोव्हेंबर महिन्यांत रवींद्रनाथ ठाकूर ह्यांचा मुक्काम मुंबईत होता व त्यावेळीं त्यांचीं कांहीं व्याख्यानेंही मुंबईत झालीं होतीं. एका व्याख्यानाचे वेळीं सर नारायण अध्यक्ष होते. त्याच्यापूर्वी सर नारायण रवींद्रनाथांच्या भेटीस गेले असतांना पुढील संभाषण झालें.

**सर नारायण**—आमच्या महाराष्ट्रांत गीतेवर महाराष्ट्र भाषेंत एक टीका असून ती सर्वांत जुनी आहे हें आपल्याला माहीत असेलच. ही टीका अनेक दृष्टींनीं अलौकिक आहे. योग, योग्यता वगैरे शब्दांच्या व्याख्या आज सायकॉलजी, मानसशास्त्र ज्या रीतीनें करीत आहे तशा व्याख्या ज्ञानेश्वरांनीं केव्हांच करून ठेविल्या आहेत; माझ्या दृष्टीनें सत्य ह्या शब्दाची व्याख्या प्रेम ह्या एका शब्दानें चांगली करितां येते. रामदासांनीं अनन्यपणा ह्याचें जें स्पष्टीकरण केलें आहे किंवा भागवतांत समदर्शन ह्याचें जसें विवरण आहे तसें कोठल्याही इंग्रजी ग्रंथांत माझ्या अवलोकनांत आलेलें नाहीं.

**रवींद्रनाथ**—उपनिषदांच्या मतानुसार सत्य म्हणजे ऐक्य आणि ऐक्य म्हणजे प्रेम; पण, सर नारायण, आतां आपण ज्ञानेश्वरासंबंधानें जें विवरण केलें तें ऐकून मला असें वाटतें कीं, ज्ञानेश्वराविषयीं तुम्ही आमच्यासारख्या लोकांच्या लाभासाठीं एक ग्रंथ लिहिणें अवश्य आहे. आधुनिक काळच्या परिस्थितीस उपयुक्त होईल असें त्यांत जर विवेचन आहे तर अशा असामान्य ग्रंथाची सर्वांस अवश्य कल्पना झाली पाहिजे. आपल्याला आमच्या विश्वभारति विद्यापीठाची कल्पना माहीत आहेच.

विश्वांतील सर्व विद्वानांच्या विद्वत्तेचें हें केंद्र व्हावें अशी माझी इच्छा आहे. असें झालें म्हणजे हिंदुस्थानाच्या खऱ्या वैभवाविषयीं सर्व राष्ट्रांना योग्य कल्पना होईल. व हिंदुस्थानाला इतर देशांच्या संस्कृतीची कल्पना होईल आणि आमचा हा देश सर्व देशांना अत्युच्च आध्यात्मिक सिद्धांतांचा लाभ करून देण्यास कसा समर्थ आहे तें सर्व देशांस कळून येईल.

**सर नारायण**–आपल्या हिंदी लोकांपेक्षां युरोपिअन लोकांचें काम करण्याचें सामर्थ्य अधिक आहे असें म्हणतात तें आपल्याला खरें वाटतें काय ? म्हणजे ते सारखे आठआठ दहादहा तास काम करूं शकतात आणि आम्हांला तसें करितां येत नाहीं असें आपल्याला देखील वाटतें काय ?

**रवींद्रनाथ**–होय, मलाही तसेंच वाटतें, पण त्यांच्या कार्यसामर्थ्याकडे पहातां हा त्यांच्या देशाच्या हवेचा परिणाम आहे असें मला वाटतें.

**सर नारायण**–मग आमचे पूर्वीचें ऋषिमुनी कर्तृत्ववान म्हणून कसे पुढें आले ?

**रवींद्रनाथ**–ज्या ऋषीमुनींनीं उपनिषदांसारख्या ग्रंथांची निर्मिति केली ते इकडे खालीं सपाटीवर आलेच नाहींत. ते पर्वतांच्या उंच शिखरांवरील अत्यंत शीतल भागांत बसून आपले ग्रंथ निर्माण करीत होते, परंतु ते आतां गेले आणि त्याबरोबर आमचें सामर्थ्य लयास गेलें व आमची सर्व बाजूंनीं अधोगति झाली.

## मागसलेले व अस्पृश्य

( विठ्ठलराव शिंदे निपाणी येथें १९१६ सालीं भरलेल्या मागसलेल्यांच्या परिषदेस गेले होते. तेथून परत आल्यावर ते लोणावळें येथें सर नारायण ह्यांच्या भेटीस गेले होते. त्यावेळीं झालेलें संभाषण. )

**विठ्ठलराव शिंदे**––मी निपाणी येथें नुक्तीच जी मागसलेल्या वर्गाची परिषद झाली तिच्या बैठकीस गेलों होतों. ही परिषद पन्नास वर्षांपूर्वी जोतिबा फुले ह्यांनीं स्थापन केलेल्या सत्यशोधक समाजाच्या तर्फे भरली होती. परिषदेचा पुढाकार कोल्हापूरचे भास्करराव जाधव ह्यांनीं घेतला होता. परिषदेला पुष्कळ लिंगायत व जैन गृहस्थ आले होते. ब्राम्हणांच्या विरुद्ध परिषदेचा कटाक्ष होता. सुमारें १५०० माणसें जमलीं होतीं. त्यांत वरील गृहस्थांशिवाय माळी, तेली वगैरे जातींच्या लोकांचा अधिक भरणा होता. अस्सल मराठे जे आपल्याला क्षत्रीय म्हणवितात त्यांच्यापैकीं फार थोडे लोक परिषदेस हजर होते. दोन दिवस परिषदेची बैठक चालू होती. अनेक ठराव पास झाले, त्यांत ब्राम्हणांना कुटुंबांतील पुरोहितपणाचीं कार्यें करावयास बोलावूं नये व मागासलेल्या जातींत शिक्षणाचा

प्रसार जारीनें करण्याचे प्रयत्न करावे हे मुख्य विषय होते. ब्राम्हणांच्या विरुद्ध ह्या परिषदेंतून पुष्कळ भाषणें झालीं. ह्या परिषदेनंतर मागासलेल्या वर्गांच्या राजकीय हक्कांचें संरक्षण करण्यासाठीं काय केलें पाहिजे त्याचा विचार करण्यासाठीं निराळी राजकीय परिषद भरली होती.

**सर नारायण**–पण काय हो, ह्या परिषदेंत अस्पृश्य वर्गांच्या लोकांस येण्याची परवानगी होती काय ?

**विठ्ठलराव शिंदे**–त्यांचेकडून परवानगी मिळणें शक्य नाहीं, हें जाणूनच त्या वर्गांतील कोणी लोक आले नाहींत.

**सर नारायण**–तुम्ही तर अस्पृश्यतानिवारकमंडळीचे चिटणीस, त्यांच्या उन्नतीसाठीं झटणारे, आणि मग जेथें अस्पृश्यांना मज्जाव होता अशा परिषदेला तुम्ही हजर कसे राहिलांत ?

**विठ्ठलराव शिंदे**– त्यांनीं आपल्या परिषदेचें मला आमंत्रण दिलें आणि मी गेलों. माझ्याप्रमाणें सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटीचे नारायणराव जोशीही आले होते. परिषदेनंतर कित्येक जैन लिंगायत व इतर गृहस्थांनीं आपल्या मिशनच्या शाळा येऊन पाहिल्या. परंतु ते आपल्या परिषदेमध्यें अस्पृश्यांना येऊं देणार नाहींत, आमच्यासारख्यांची त्यांना सहानुभूति हवी आहे म्हणून त्यांनीं आम्हांला आमंत्रणें पाठविलीं इतकेंच.

**सर नारायण**– पण ह्या लोकांना अस्पृश्यांसंबंधानें कांहीं सहानुभूति तरी वाटते काय ?

**विठ्ठलराव शिंदे**–त्यांना कांहीं सहानुभूति वाटते असें मला वाटत नाहीं. माझा तर असा अनुभव आहे कीं, मागसलेले म्हणून आपल्याला म्हणविणाऱ्या लोकांपेक्षां अस्पृश्यांच्या उद्धाराविषयीं **ब्राह्मणांनाच अधिक कळकळ वाटत असून त्यांचीच ह्या कार्यीं अधिक सहानुभूति आहे** !

**सर नारायण**—दक्षिणप्रांतीं मीं गेलों होतो तेव्हां मलाही तुमच्या-सारखाच अनुभव आला.

## गांधीजींवरील लोकांची भक्ति.

( १९२१ सालीं डिसेंबर महिन्यांत प्रो. सी. एच. व्हॅन टाईन नांवाचे गृहस्थ सरकारचे पाहुणे म्हणून गव्हर्नमेंट हाउसमध्यें रहात होते. ते मिचिगन विद्यापीठाचे अध्यापक होते व हिंदुस्थानांतील सर्व परिस्थितीचें अवलोकन करणें हा त्यांच्या येथें येण्याचा मुख्य उद्देश होता. ता. २५ डिसेंबर रोजीं प्रो. व्हॅन व सर नारायण यांचें सकाळीं १० वाजतां सुमारें दोन तास संभाषण झालें. त्यांतील नमूद केलेला भाग पुढीलप्रमाणें होता :—)

**प्रो. टाइन**—सर नारायण, ह्या गेल्या आठवड्यांत सर्व प्रकारच्या राजकीय मतांच्या लोकांच्या व माझ्या भेटी झाल्या. ही मंडळी मला सर जमशेटजी ह्यांच्या येथें व मि. महमदभाई हाजीभाई ह्यांच्या येथें भोजन प्रसंगीं भेटली. जहाल मतांचीं जीं माणसें भेटलीं त्यांच्याशीं माझें जें बोलणें झालें त्याच्यावरून मला असें कळून चुकलें कीं, त्यांना काय हवें आहे, त्यासंबंधानें त्यांचे निश्चित विचार नाहींत. त्यांना स्वराज्य पाहिजे असें ते म्हणतात, पण, त्याविषयींही कांहीं विशेष विचार करून निश्चित मतें ठरविलेलीं मला आढळलीं नाहींत. एका भोजन प्रसंगीं रा. जयकर माझ्या शेजारींच बसले होते. गांधीजींविषयीं त्यांच्यापाशीं बोलणें काढलें, तेव्हां त्यांनीं मला सांगितलें कीं, गांधीजींचे व माझे विचार अनेक बाबतींत सारखे नाहींत. मात्र त्यांच्या साधुत्वाबद्दल माझ्याठिकाणीं अत्यंत आदरभाव वसत आहे. कांहीं प्रागतिकांशीं माझें संभाषण झालें. त्यावेळीं त्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं, आम्हांला गांधीजींची असहकारितेची चळवळ पसंत नाहीं. परंतु त्यांचें पवित्र शील व त्यांची सात्विकता ह्यांबद्दल आपल्या ठिकाणीं आदर आहे. तेव्हां, हें पहा सर नारायण, आपल्या परवानगीनें मी आपल्याला एक प्रश्न विचारतों. ज्यांच्याशीं माझें संभाषण झालें त्यांस मीं हा प्रश्न विचारिला. पण कोणाकडूनही मला त्याचें समाधानकारक उत्तर मिळालें नाहीं.

**सर नारायण**—काय बरें आपला असा प्रश्न आहे ?

**मि. टाइन**—माझा प्रश्न असा आहे : सर्व जातींच्या व धर्मांच्या, सर्व मतांच्या लोकांमध्यें गांधीजींविषयीं अत्यंत आदर आहे. सर्व लोकांवर त्यांचें इतकें वजन आहे तें कशामुळें ? ज्ञानी अज्ञानी श्रीमंत गरीब अशा सर्व लोकांवर त्यांचें वजन आहे असें दिसतें. त्यांच्या मुळाशीं काय आहे ? जहाल, राष्ट्रीय, प्रागतिक अशा सर्व लोकांना त्यांच्याविषयीं आदर वाटतो तो कां ? जरी मला इतरांकडून समाधानकारक उत्तर मिळालेलें नाहीं तरी आज आपल्याकडून मला तसें उत्तर मिळेल अशी माझी कल्पना आहे.

**सर नारायण**—मला ह्याचें कारण अगदीं उघड दिसत आहे. हिंदी संस्कृतीचें ध्येय त्यागमय वृत्तींत आहे. वेदकाळापासून संसारी व त्यागी ह्यांच्यांत द्वंद्व चालू आहे आणि सर्व वेळीं त्यागवृत्तीचें वर्चस्व स्थापित झालेलें आपल्याला आढळून येईल. पहा, कोणीही मनुष्यानें संसाराचा त्याग केला, शरीर केवळ जगवून धर्म-कार्य उत्साहानें करूं लागला, सर्व ऐषआराम सोडून दिले, खावयास प्यावयास मिळालें तर मिळालें, रहावयास जागा असली किंवा नसली, तरी त्यानें आपणास वाहून घेऊन त्यागयुक्त जीवन तो घालवूं लागला कीं, त्याचेविषयीं लोकांत आदर उत्पन्न होतो. तो इतरांपेक्षां विशेष आहे असें लोकांस वाटूं लागतें. आमच्या धर्म-

ग्रंथांतच नव्हे, राज्यकारणासंबंधाच्या पुस्तकांतही त्यागी तत्त्वज्ञानाची भरपूर स्तुति आढळून येते. सर्वत्र असें सांगितलें आहे कीं, साधारण जनांनीं, शहाण्या माणसांनीं घालून दिलेल्या मार्गानें चालावें. ह्या शहाण्या माणसांना शिष्ठ असें म्हटलें आहे. जो विद्वान् आहे, धर्मशील आहे व अल्प धान्य आहारासाठीं ज्यास पुरे होतें, म्हणजे कुंभिधान्य ज्यास पुरतें त्यांस शिष्ठ म्हणावें. ह्या अशा माणसांनीं कायदेकानू केले, स्मृति रचिल्या, राज्यांवर राजे आणिले व राज्यांवरून राजे काढून लाविले. म्हणून आमच्या राज्यप्रकरणीं कांहीं ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, लहान लहान गावांत बैराग्यांना राहूं देऊं नये. त्याचा मुख्य उद्देश असा आहे कीं ते खेड्यांत गेले कीं लोकांत मिसळतात व लोकांत आपल्या शिकवणीनें असमाधान, अशांति व अराजनिष्ठा उत्पन्न करितात. ह्या सर्वांचें Havell's Ancient India ह्या ग्रंथांत चांगलें वर्णन केलेलें आपल्याला आढळेल. तो ग्रंथ आपण वाचावा अशी मी शिफारस करतों. आतां गांधीजींचें सर्व लोकांवर जें इतकें वजन आहे तें त्यांच्या त्यागामुळें, त्यांच्या वैराग्यामुळें ह्यांत कांहीं संशय नाहीं. त्यांचा स्वार्थ असा कांहींच नसतो. सारांश, त्यांनीं राजकारण हाच आपला धर्म बनविला आहे. आतां टिळकांनीं धर्म आपल्या हाताशीं घेतला व धर्माचें राजकारणांत सहाय्य घेतलें, परंतु ते गांधीप्रमाणें त्यागी नव्हते. म्हणून गांधींप्रमाणें टिळकांचें सर्व लोकांवर वजन नव्हतें. गांधीजींच्या ह्या त्यागपूर्ण चारित्र्याप्रमाणें आजकालच्या परिस्थितीस अनुसरून इतर कांहीं गोष्टी त्यांची लोकप्रीति व त्यांचें लोकांवरील स्वामित्व वाढविण्यास कारण झाल्या आहेत. आजच्या एकंदर परिस्थितीकडे पाहूं लागलों कीं, आपल्याला आजकालच्या राज्यव्यवस्थेमुळें लोकांत झालेली राजकीय जागृति, सर्व वस्तूंचे वाढलेले भाव, ब्रिटिश ऑफिसरांचा उद्दामपणा हीं दिसतात. त्यांच्याद्वारेंही गांधीजींचें लोकांवरील वजन वाढावयास साह्य झालें आहे. पण, मुख्य कारण म्हणजे त्यांचा साधेपणा, त्यांचें दारिद्र्यास कवटाळणें, आणि जगांत राहून अलिप्त राहणें व संपूर्ण त्यागमूर्तीस शोभण्यासारखें त्यांचें वर्तन. इंग्लंड किंवा अमेरिकेंत असल्या चरित्राच्या व्यक्तीस राजकीय महत्त्व प्राप्त होणार नाहीं. परंतु हिंदुस्थानांत जीवनासंबंधानें आमची जी कल्पना आहे तीस हें चरित्र अनुरूप असल्यामुळें अशा चारित्र्यवान माणसाचें सर्व जनतेवर आत्यंतिक वजन असणें हें अगदीं साहजिक आहे.

**प्रो. टाइन**:—आतां माझ्या हा मुद्दा चांगल्या रीतीनें ध्यानांत आला! आपण ज्याप्रमाणें मला तो समजावून दिला त्याप्रमाणें कोणीही समजावून देण्याचा प्रयत्न केला नव्हता. आतां मला आपल्याला आणखी एक प्रश्न विचारावयाचा आहे.

**सर नारायण**—हो हो, विचारा !

**प्रो. टाइन**—खेड्यापाड्यांतल्या लोकांना गांधी हे कोण आहेत, त्यांची शिकवण काय आहे, त्यांचें स्वराज्य म्हणजे काय ह्याविषयीं कांहीं कल्पना आहे काय ? ते खरोखर त्यांचे भक्त बनले आहेत काय ? मी हा प्रश्न विचारीत आहें त्याचें कारण असें आहे कीं, इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस मि. ग्रिफिथ ह्यांना मी हाच प्रश्न विचारला होता. त्यांनीं मला असें चक्क सांगितलें कीं, खेड्यापाड्यांतल्या लोकांना गांधी कोण आहे तें माहीत नाहीं, त्यांच्या शिकवणीची कांहीं कल्पना त्यांना नाहीं आणि तें कळल्यावांचून आपलें कांहीं अडतें आहे असेंही त्यांना वाटत नाहीं.

**सर नारायण**—असेंच कांहीं मला वाटत नाहीं. मला असें वाटतें कीं, गांधींजींचे अनुयायी जें कांहीं म्हणतात व मि. ग्रिफिथ् ह्यांनीं तुम्हांला जें सांगितलें तीं दोन टोंकें मानिलीं तर त्यांच्या मध्यामध्यें सत्य आहे! गांधी ज्याला स्वराज्य म्हणतात त्याची यथातथ्य कल्पना खेड्यापाड्यांतल्या लोकांना आहे असें कांहीं म्हणतां येणार नाहीं. पण त्यांच्यामध्येंही निरनिराळ्या कारणांमुळें राजकीय बाबीं-संबंधानें थोडीबहुत जागृति झाली आहे ह्यांत कांहीं संशय नाहीं आणि गांधी हे मोठे साधु पुरुष आहेत आणि ते आपल्या हितासाठीं झटत आहेत हें त्यांच्या कानांवर आलें आहे, त्यामुळें खेड्यापाड्यांतल्या लोकांमध्येंही गांधींजींची कीर्ति पसरत असून त्यांच्या विषयींचा आदरभाव वाढत आहे असें दिसून येईल.

प्रकरण सतरावें

# सर नारायण ह्यांचें विशिष्टत्व

We are all born to be servants of one another. Service is the secret and sinew of life. We must lose ourselves in work that absorbs us, makes us forget our petty selves. And when that spirit of service grows upon us by the light of faith in God, it makes the world beautiful and lovely and life becomes a blessing, not a burden.

—o—

नारायणराव चंदावरकर ह्यांच्या चरित्रलेखनाची तयारी करीत असतांना, लेखन कार्य चालू असतांना व आज ह्या लेखास प्रारंभ करितांनासुद्धां जो विचार प्रामुख्यानें मनांत आला व येत आहे तो असा कीं, सर नारायण ह्यांच्यासंबंधानें भलतेच समज पसरले गेल्यामुळें त्यांची वास्तविक योग्यता पुष्कळांस मुळींच कळली नाहीं व पुष्कळांनीं ती कळून घेण्याचा प्रयत्न केलेला नाहीं. त्यांच्या हयातींत त्यांच्यासंबंधानें भलतेच ग्रह करून घेतलेच, परंतु त्यांच्या देहावसानानंतरही त्यांच्याविषयीं भलतेच ग्रह करण्याचे प्रयत्न झाले आहेत. उदाहरणार्थ, त्यांच्या मृत्यूनंतर महाराष्ट्रांतील एका पत्रानें असें स्पष्ट म्हटलें कीं, " सामाजिक बाबतींत त्यांना इंग्रजी नमुना तंतोतंत मान्य होता. " हें अगदीं लहानसेंच वाक्य आहे, परंतु तें नारायणरावांच्या सर्व सामाजिक कार्यासंबंधानें विपरीत भाव उत्पन्न करावयास पुरेसें आहे. तथपि जे कोणी त्यांचे लेख व व्याख्यानें वाचण्याचे श्रम घेतील, किंवा सामाजिक सुधारणेसंबंधानें ह्या चरित्रांतील विवरणावरून दृष्टी फिरवितील, त्यांस नारायणरावांस सामाजिक बाबतींत इंग्रजी नमुना तंतोतंत मान्य होता असें तर कोठेंच आढळावयाचें नाहीं, उलट त्यांस असें कळून येईल कीं, " सुधारणारूपी इमारत उभी करतांना आपला पाया पूर्वीचाच व अनुभवानें चांगला मजबूत ठरला आहे तो ठेवून आपण उपाययोजना केली पाहिजे " (पृ.२०३) असा स्पष्ट उपदेश त्यांनीं केला आहे. त्याचप्रमाणें आजपर्यंतच्या अनुभवाला ते महत्त्व देत नव्हते अगर पुरातन ऋषी, पुरातन ग्रंथ ह्यांविषयीं

त्यांच्या ठिकाणीं आदराची भावना नव्हती असेंही कोणास म्हणतां यावयाचें नाहीं. उलट त्यांनीं असा स्पष्ट खुलासा केला आहे कीं,

" We do not wish to make light of the past, nor do we desire to touch the ancient in either a spirit of irreverence or thoughtlessness. "

'आमच्या कॉलेजांत कांट मार्टिनो वगैरे तत्त्वज्ञांची ओळख होते परंतु शंकराचार्य, रामानुजाचार्य किंवा मध्वाचार्य ह्यांनीं प्रतिपादिलेल्या तत्त्वज्ञानाचा त्यांस गंध नसतो,' ही गोष्ट अनिष्ट असल्याची तक्रार नारायणरावांनींच १९०९ सालीं केली आहे याची आठवण त्यांच्या टीकाकारांस केव्हांच होत नाहीं!

अशी त्यांच्या विचारांची वास्तविक स्थिति असतांना व त्यांचें आचरण विचारांस अनुरूप असतांना, सुबुद्ध माणसेंसुद्धां त्यांच्या एकंदर धोरणासंबंधानें स्वतःच भलताच समज करून घेऊन त्याचा प्रसार करितात हें पाहिलें म्हणजे दूषित मन व पूर्वग्रह ह्यांचाच हा परिणाम आहे, व अशा महाभागांस सत्यान्वेषणाची कांहीं आवश्यकता वाटत नाहीं असें म्हणावें लागतें. असो. नारायणरावांचें सर्व चरित्र, त्यांचे विचार, कार्य व शिकवण ह्यांची येथवर केलेल्या विवेचनावरून वाचकांस सहज कल्पना होईल. आतां त्यांचें व्यक्तित्व, किंवा त्यांच्या चरित्राचें विशिष्टत्व ह्यासंबंधानें ह्या प्रकरणांत थोडेंसें विवरण करावयाचें आहे.

नारायणरावांसंबंधानें सर्व पूर्वग्रह बाजूस ठेवून विचार करूं लागलें म्हणजे त्यांचें अनेक बाबतींतील विशिष्टत्व आपल्याला दिसून येतें. आपल्याला जें ज्ञान प्राप्त झालें आहे त्याचा उपयोग स्वतःपुरताच न करितां, तें इतरांच्या हिताकारणें वेंचिलें पाहिजे, हा विचार तरुणपणांतच त्यांच्या अंतःकरणांत इतका बिंबला कीं, आपल्या सर्व प्राप्त ज्ञानाचा लाभ ते तरुणपणापासूनच तरुणांस देऊं लागले तरुणांच्या कल्याणाविषयींची त्यांची जिवंत जागृत तळमळ व कळकळ केव्हांही ओसरली नाहीं. आधुनिक काळीं कांहीं पुढारी तरुणांस आपलेकडे आकर्षतात. त्यांच्यामागें तरुणांच्या झुंडीच्या झुंडी लोटतात, त्यांना देवासमान मान देतात व त्यांचा प्रत्येक शब्द झेलावयास तयार असतात. हें आकर्षण विशिष्ट काळापुरतें, तसेंच विशिष्ट हेतुपूर्वक झालेलें असतें. पण नारायणरावांसंबंधानें विशेष गोष्ट ही होती कीं, ते तरुणांकडे आकर्षिले जात. ते त्यांच्याशीं निकट संबंध ठेवीत. त्यांच्याप्रमाणें हिंदुस्थानांतील कोणाही हिंदी पुढाऱ्यानें तरुणांशीं निकट संबंध ठेवून त्यांच्या कल्याणाची चिंता वाहिलेली नाहीं. स्टूडंट्स ब्रदरहूड ह्या संस्थेंत त्यांचा गेलेला काळ पाहिला म्हणजे तेथें तरुणांत मिसळून, त्यांच्यापैकींच आपण एक होऊन, त्यांच्या आकांक्षांशीं समरस होऊन,

त्यांचे मार्गदर्शक ते होत असत असें दिसून येतें. तरुणपिढीच्या कल्याणासाठीं घालविलेला काळ अत्यंत भाग्याचा काळ असें त्यांस वाटे. जोंपर्यंत त्यांच्याशीं अगर त्यांच्या लेखांशीं परिचय नसे, तोंपर्यंत पूर्वग्रहाचा मनावर ताबा चाले; परंतु प्रत्यक्ष परिचय अल्पकाळ जरी झाला, अगर त्यांच्या लेखांचें महत्त्व व योग्यता ध्यानांत आली, कीं मग परिवर्तन व्हावयास वेळ लागत नसे. मग सर्व पूर्वग्रह कसे नष्ट होतात हें श्री. एन्. के. फडके ह्यांच्या उदाहरणावरून (पृ. ३१४) दिसून आलें आहे. नारायणरावांनीं आपली तळमळ व कळकळ आपल्या पुरतीच ठेविली नाहीं. चाळीस वर्षें ते आपलीं ध्येयें तरुणांस पटविण्यासाठीं झटले. सोशल सर्विस लीग, सोसायटीची मुलींची शाळा, प्रार्थनासमाजाच्या विद्यमानें चाललेलें यंग थीईस्ट्स् यूनिअन वगैरे अनेक संस्था घेतल्या तर तरुणांच्या कल्याणासाठीं त्यांना किती कळकळ वाटत होती त्याची आपल्याला कल्पना होते. स्वतःच्या गैरसोयींचा विचार मनांत न आणितां ते तरुणांच्या कल्याणासाठीं झटत. कारण त्यांची शिकवणच तशी असे. त्यांनीं एका व्याख्यानांत तरुणांस सांगितलें कीं, रोज कांहीं तरी स्वतःची गैरसोय, अडचण इतरांच्या हितासाठीं सहन करण्यास शिका. केवळ साधींसुधीं कामें फावल्यावेळीं करण्यांत मोठासा पराक्रम नाहीं. त्यागाची कल्पना प्रत्येक दिवशीं आपण आपल्या आचरणानें खरी करून दाखविली पाहिजे. इतरांच्या हितासाठीं स्वतःची गैरसोय करण्यास शिकणें ह्यासारखा उदात्त रोजचा त्याग आणखी काय असूं शकेल !

पुढच्यास ठेंच आणि मागला शहाणा ह्या घरगुती म्हणीच्या अनुरोधानें ते आपल्या सर्व आयुष्यभर चालत होते. सामाजिक सुधारणा हा त्यांचा अत्यंत आवडीचा विषय होता हें आपण जाणत आहों. कोणतीही सुधारणा कृतींत येण्यापूर्वी ती जनतेस पटवून देण्याचे प्रयत्न लेख व व्याख्यानें ह्यांच्याद्वारें झाले पाहिजेत, हें तत्त्व त्यांना जरी मान्य होतें, तरी सुधारणेच्या इतिहासांत कांहींएक काळ फक्त बोलाचाच, जागृति करण्याचाच असतो, हें त्यांस मान्य नव्हतें. उदार विचार व उदार आचार ह्यांचा प्रचार एकसमयावच्छेदेंकरून झाला पाहिजे असें त्यांचें मत होतें म्हणूनच अगदीं निष्ठूरपणें त्यांनीं परमहंस सभेसारख्या संस्थेवर टीका केली आहे. कोणतीही सुधारणेची गोष्ट असली तरी वेळ येतांच तिचा प्रवेश आपल्या कुटुंबांत झाला पाहिजे अशी खूणगांठ परमहंस सभेचा अनुभव दृष्टीपुढें ठेवून त्यांनीं बांधली व आपल्या सबंध आयुष्यांत त्याप्रमाणें वागण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. जितकी पुरुषांची उन्नति झाली पाहिजे, तितकी स्त्रियांचीही झाली पाहिजे, आपल्या देशाची उन्नति पुरुष व स्त्रिया ह्या दोहोंच्या उन्नतीवर अवलंबून आहे हा कटु अनुभव मागील इतिहासानें त्यांस सुस्पष्टरीतीनें शिकविल्यामुळें स्त्रियांच्या

उन्नतीसाठीं जातीनें त्यांनीं मेहनत केलेली आपल्याला आढळून येते. तरुणपि-ढीशीं नारायणरावांइतका निकट संबंध ठेवणारा पुढारी क्वचितच आढळेल असें म्हटलें तर त्यांत मुळींच अतिशयोक्ति नाहीं असें दिसून येईल. साधारणतः चालू तरुण पिढीसंबंधानें बोलत असतांना पूर्वपिढीसंबंधानें प्रसंशोद्गार काढण्याची वहिवाट आहे. वृद्धांनीं आपल्या तरुणपणाचे गोडवे गावे व त्यांच्या तरुण काळापर्यंत गेल्यास त्यावेळचे वृद्ध आपल्या वेळच्या तरुणाचे गोडवे व चालू पिढीची निंदा करीत असें दिसून येणें हा नित्याचा अनुभव आहे. नारायणराव ह्या अनुभवास अपवाद होते. एकतर तरुणांत त्यांस पुष्कळ चांगले गुण दिसून येत, व दुसरी गोष्ट अशी कीं पूर्वपिढींतील कित्येक दोष त्यांच्या वेळच्या तरुण पिढींत दिसत नसत हें स्पष्टपणें नमूद करितांना पूर्वपिढी संबंधानें आपण अनादर व्यक्त करीत आहों असें त्यांस वाटत नसे. त्याचप्रमाणें तरुणपिढीच्या दोषांविषयीं त्यांच्या ठिकाणीं जागृति नव्हती असेंही नाहीं. तरुणांत थोडा उच्छृंखलपणा दिसला तरी तिकडे ते दुर्लक्ष करीत. तरुण पिढी ह्या प्रकरणांत गुणदोषांविषयीं त्यांची दृष्टी कशी होती त्याचें वर्णन वाचकांस आढळेल. तथापि तरुणांत सत्याची आवड अधिक प्रमाणांत दिसून येत आहे असें त्यांस वाटत असे. म्हणून त्यांनीं एकदां म्हटलें,

I am glad to find, whatever the weakness of the present generation, there is the younger generation which is to be the generation for the future, which seems to be fired with the idea that *you must not be insincere.* They hate a man who says one thing and does another.

अशा वृत्तीचीं तरुण माणसें भेटलीं म्हणजे ते प्रसन्नचित्त होत व त्यांस मोठ्या कळकळीनें सांगत कीं, सत्यप्रीतिबरोबर निश्चय व धैर्य हे दोन गुण तुम्ही आपलेसे करा. आपलें ध्येय प्रथम पूर्ण विचार करून निश्चयात्मक रीतीनें ठरवावयाचें, तें धैर्यानें गांठण्याचा प्रयत्न करावयाचा, आणि असे प्रयत्न करीत असतांना अवश्य असेल तेव्हां, रोजही, स्वतःची कसलीही गैरसोय सहन करावयाची, असें तुमचें वर्तन असलें पाहिजे. उन्नतीचें बीज Suffering व Struggling ह्यांत आहे. कष्ट करून, यशापयशाचा विचार मनांत न आणतां झटणें, त्रास झाला तर तो सहन करणें अशी ज्यांची वृत्ति असते त्यांची ह्या अशा वर्तनाच्या ओघांतच उन्नति होत असते, असें ते तरुणांस सांगत व स्वतः तसें वागण्याचा प्रयत्न करीत. ह्या बाबतींत नारायण-रावांचें विशिष्टत्व असें असे कीं, तरुणपिढीला केवळ उपदेशासाठीं उपदेश कर-ण्याच्या ते कधीं भानगडींत पडत नसत. त्यांच्या सर्व उपदेशाचा पाया स्वानुभव

असे. स्वतःच्या अनुभवाच्या, निरीक्षणाच्या, इतरांच्या अनुभवाच्या जोरावर त्यांच्या उपदेशाची इमारत रचलेली असे.

त्यांची अध्ययनशीलता व त्यांची मननशीलता असामान्य कोटींतील होती व हे त्यांचे दोन गुण त्यांचें विशिष्टत्व स्थापित करावयास पुरेसे आहेत. त्यांनीं आपल्या ज्येष्ठ चिरंजिवास ग्रंथ कसा वाचावा ह्या संबंधानें सूचना केल्या आहेत (पृ. ३२३ पहा.) त्या केवळ सूचना नाहींत. स्वतः त्यांचें वाचन अगदीं शेवट-पर्यंत तसें असे. त्यांनीं वाचलेल्या महत्त्वाच्या ग्रंथांचीं टिपणें पाहिलीं कीं कोणासही त्यांचें अध्ययन अत्यंत श्रेष्ठ दर्जाचें होतें असें पटल्यावांचून राहात नाहीं. ह्या अध्ययनशीलतेस मननशीलतेची जोड मिळाल्यामुळें, आणि त्यांतही महत्त्वाच्या ग्रंथांचें सार स्वहस्तें लिहिलें गेल्यामुळें जें वाचलें तें अगदीं वज्रलेप होत असे ! त्यांची स्मृति तीक्ष्ण असल्यामुळें आपल्या भांडारांतील ज्ञान त्यांच्या वाटेल तेव्हां उपयोगास येई व क्वचित् प्रसंगीं जर अनिश्चितपणा आढळून आला, तर त्यांचीं नोटबुकें त्यांच्या सेवेला हजर असत व त्यांतून हवी असलेली चीज ते अल्पाव-धींत शोधून काढीत ! त्यांचें मनन नित्य चालू असे. विशेषतः सकाळ-संध्याकाळीं ज्यावेळीं ते दूरदूर फिरावयास जात, बरोबर जर कोणी नसलें, तर त्यांचें मननच चालू असे हें त्यांच्या त्या त्या वेळच्या वृत्तीवरूनही कोणाच्याही ध्यानांत येत असे. ह्या वेळीं मनास पटलेले विचार पुष्कळ वेळां ते टिपून ठेवण्याचा प्रयत्न करीत. पुष्कळ वेळां हे विचार आत्मपरीक्षणपर असत; अनेक प्रसंगीं आत्मबोधपर असत; कधीं आत्मनिर्भर्त्सनपर असत, तर केव्हां केव्हां इतरां-विषयीं असत. सर्वदा स्वतःविषयीं तीक्ष्ण करडी दृष्टी व इतरांविषयीं उदारभाव अनुभवास येई. हें सर्व त्यांचें विशिष्टत्व स्थापित करतें ह्यांत तिळमात्र संदेह नाहीं. त्याचप्रमाणें ते जें कांहीं वाचीत त्याचा इतरांस लाभ देण्यास ते उत्सुक असत. आपल्या ज्ञानाचा तोरा मिरविण्यासाठीं नव्हे, तर जो विशेष विचार आपल्याला विशेष जागृतिकारक, अगर लाभदायक किंवा सूचक वाटला, तो इत-रांस तसा वाटावा व त्यांसही आनंद व्हावा हा त्यांचा उद्देश असे. वासुदेवराव भांडारकरांशीं असे विचारविनिमयाचे प्रसंग ते बडोद्यास जाईपर्यंत नित्य येत. विष्णूपंत भाटवडेकरांशीं अशी चर्चा नेहमीं चाले व मि. नटराजन् ह्यांच्याशीं निरनिराळे अनुभव, ग्रंथांतरींचे विचार, स्वानुभव ह्यांविषयीं विशेष रीतीनें विनि-मय होत असे. आणि अशा प्रकारें पक्क झालेलें व अनुभवास पटलेलें ज्ञान व्याख्यानांच्या व लेखांच्याद्वारें ते इतरांपुढें ठेवीत असत. आपलें ज्ञान, आपला अनुभव व आपला ज्ञानानंद आपल्यापाशींच रहावा असें त्यांस केव्हांच वाटलें नाहीं. ज्याप्रमाणें ट्रस्ट केलेली मिळकत इतरांच्या लाभासाठीं असते, त्याचप्रमाणें

आपणास प्राप्त झालेलें ज्ञान हें केवळ आत्मलाभासाठीं नसून इतरांच्या कल्याणासाठींही आहे असा त्यांचा दृढ विश्वास असे व त्याप्रमाणें ते वागत. हें त्यांचें विशिष्टत्व इतरांत फारसें आढळत नाहीं असें म्हटलें तर त्यांत तिळमात्र अतिशयोक्ति नाहीं हें सत्य होय. दुसरें असें कीं, आपण पेरलेलें ज्ञानबीज रुजत आहे असा त्यांस अनुभव आला म्हणजे स्वतःच्या ज्ञानांत ते अधिक उत्साहानें भर घालूं लागत ! त्यांचे प्रसिद्ध झालेले लेख जे कोणी एकत्र आणितील त्यांस आपल्या स्वतःच्या ज्ञानांत ते सारखी भर कशी घालीत असत हें ओघानें ज्याप्रमाणें कळेल त्याप्रमाणें इतरांस ज्ञानी करण्यांत त्यांस कसें समाधान वाटत असे, तेंही प्रत्ययास येईल.

अंतर्बाह्य पावित्र्यावर नारायणरावांचा विशेष भर असे. पवित्र विचार, पवित्र उच्चार व पवित्र आचार ह्यांस त्यांनीं आपल्या अखिल जीवनांत श्रेष्ठ स्थान दिलें होतें असें त्यांचे लेख, त्यांचीं व्याख्यानें व त्यांचें वर्तन ह्यांचें निरीक्षण करणारांस दिसून आल्यावांचून राहणार नाहीं. जो विचारानें पवित्र नाहीं तो आचारानें पवित्र कसा राहाणार असें ते म्हणत, ते ह्याचसाठीं. त्यांचें अंतर्बाह्य पावित्र्य त्यांच्या चर्येवरच स्पष्ट उमटलेलें दिसे. एकदां टाऊनहॉलच्या एका मोठ्या सभेंत नारायणराव प्लॅटफार्मवर बसलेले होते. हॉल चिक्कार भरला होता. परगांवाहून आलेले एक गृहस्थ प्रस्तुत लेखकाच्या जवळच बसले होते. त्यांनीं आपल्या शेजाऱ्यास विचारिलें, "प्लॅटफार्मवर सर्व शुभ्र पोशाख केलेले व फेटा घातलेले गृहस्थ जे दिसताहेत ते कोण ?" "ते सर नारायण चंदावरकर. कां बरें हा प्रश्न आपण केला ?" "तसें विशेष कांहीं कारण नाहीं. परंतु त्यांच्याकडे पाहिलें म्हणजे त्यांच्या व्यक्तित्वाचा तात्काल मनावर परिणाम होतो व ते कोणीतरी विशेष अधिकाराचे गृहस्थ आहेत असें वाटतें. नांव ऐकून माझें समाधान झालें." हा अनुभव अनेकांस येत असे, हें आम्हांस माहित आहे. तो जो परिणाम होत असे तो त्यांच्या अंतर्बाह्य पावित्र्याचा होय असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. त्यांच्या लेखांत व व्याख्यानांत ह्या पावित्र्याला थोर महत्त्व दिलेलें आपल्याला आढळतेंच; परंतु त्यांच्याशीं संभाषण करितांना, अगर इतरांशीं होणारीं त्यांचीं संभाषणें ऐकतांना पावित्र्यावरील त्यांची निष्ठा प्रत्ययास येत असे. पुष्कळांना लेखांत व व्याख्यानांत पावित्र्य साधतें. परंतु खासगी संभाषणाच्यावेळीं त्यांच्या तोंडून ओंगळ शब्दांचा सारखा प्रवाह चाललेला अनुभवास येत असतो. ज्ञानेश्वरीवर सुंदर प्रवचनें मंदिरांत व इतरत्र पूर्वी करणारे व आज परलोकवासी असलेले एक गृहस्थ आम्हांस माहीत आहेत. त्यांच्याशीं खासगी रीतीनें संभाषण करण्याची सोय नसे, इतकी गलिच्छ, ग्राम्य व अश्लील भाषा व शब्दयोजना ते करीत असत. एकदां ह्याच

गृहस्थांसंबंधानें बोलतांना नारायण म्हणाले होते, "त्यांच्या रसाळ वाणीची व सुंदर विवेचनाची तुम्ही नका भारी स्तुति करूं. मला त्याची कांहीं किंमत वाटत नाहीं. ही रसाळ वाणी ज्याला संभाषणांत आपल्या ताब्यांत ठेवतां येत नाहीं, व जो अत्यंत गलिच्छ शब्दयोजना बेलाशक करितो, त्याच्या स्वतःच्या मनावर ज्ञानेश्वरीच्या अध्ययनाचा कांहीं परिणाम झालेला नाहीं असें मला वाटतें. मी त्यांचें पांडित्य ऐकावयासही जाणार नाहीं!" ह्यावरून स्वतः नारायणराव पवित्र विचार व पवित्र उच्चार ह्यांस किती महत्त्व देत असत त्याची सहज कल्पना होते. त्यांचीं ह्याच चरित्रांत दिलेलीं कांहीं संभाषणें पहा. त्यांतील विषययोजना व संभाषणाची पद्धत पहा, म्हणजे त्यांच्या अंतर्बाह्य पावित्र्याची कल्पना होईल. संभाषणांतही क्षुद्र भाव प्रकट करणें त्यांच्या हातून होत नसे. एवढ्यावरून विनोद-बुद्धि अगर विनोदाची आवड त्यांच्यांत नव्हती असें मात्र नव्हे. त्यांना विनोद प्रिय असे पण पानचट विनोद त्यांस आवडत नसे. कांहीं व्यक्तींना विचारांतील व उच्चारांतील पावित्र्य साधतें, चांगलें साधतें; परंतु तदनुसार आचाराचा प्रश्न आला म्हणजे मग अंतर्बाह्य शुचीचें त्यांस मुळींच स्मरण राहात नाहीं, त्यांचें आचरण त्यांच्या स्वतःच्या विचारांच्या अगदीं विरुद्ध असतें व त्याबद्दल त्यांस कांहीं वाटत नाहीं! परंतु नारायणराव सर्व प्रसंगीं आपल्या पवित्र विचारांस आचाराचें रूप देण्यासाठीं झटले. ज्या ज्या प्रसंगीं विचारांस आचाराचें रूप देणें त्यांस साधलें नाहीं त्या त्यावेळीं त्यांनीं ध्येयच्युतीसंबंधानें आत्मनिर्भर्त्सन केलेलें आढळतें. समाजाच्या सुखाचा पाया अंतर्बाह्य पावित्र्य हा आहे असा त्यांचा कटाक्ष असे व हें पावित्र्य राखण्यासंबंधानें ते दक्षता राखीत ह्यांत कांहीं शंका नाहीं.[१]

थोर पुरुषांविषयींचा त्यांचा आदरही त्यांचा विशिष्टपणा व्यक्त करीत असे. जे आपल्या विचारांचे आहेत, अगर ज्यांचे विचार आपण आत्मसात केले आहेत, अशां-विषयीं मनांत आदरभाव जागृत असणें ह्यांत विशेष आश्चर्याचें कांहीं नाहीं. कमी-अधिक प्रमाणांत सर्वांचेंच तसें असतें. नारायणरावांसंबंधानें असा अनुभव येत असे कीं, व्यक्तीचे कांहीं विषयांवरील विचार जरी मान्य नसले, तरी त्या व्यक्तीसंबंधाचा त्यांचा आदर कमी होत नसे. श्री. गांधींचेंच उदाहरण घ्या. त्यांच्या विचारांवर

---

१. १९१० सालीं नाइटहूडचा किताब मिळाल्यानंतर स्टूडंट्स ब्रदरहूड ह्या संस्थेनें दिलेल्या मानपत्रांत म्हटलें आहे:—

Your life of stainless purity and high endeavour is an example and an inspiration to all its members.

नारायणरावांनीं टीका केली आहे व त्यांचे विचार कित्येक बाबतींत मान्य नाहींत असें अगदीं १९२३ सालीं मृत्यूपूर्वीं एक महिना आधीं त्यांनीं लिहून ठेविलें आहे. तथापि त्यांच्याविषयीं त्यांच्या ठिकाणीं असलेला आदर जाहीर रीतीनें मान्य करावयास ते कचरत नसत. दुसरें उदाहरण टिळकांसंबंधाचें घ्या. समाजिक बाबतींत नारायणरावांचें व टिळकांचें केव्हांच जमलें नाहीं. टिळकांची विचार व कार्य करण्याची पद्धत त्यांस मान्य नव्हती. असें असतां टिळक मुंबईत अत्यवस्थ असतांना नारायणराव प्रकृतीसंबंधानें चौकशी करण्यासाठीं सरदारगृहापर्यंत गेले, व मृत्यूनंतर सर्व मतभेद गिळून त्यांच्या गुणांचा गौरव, त्यांच्या व्यक्तित्वाची थोरवी एक सुंदर लेख लिहून त्यांनीं गाइली! म्हणजे थोर पुरुषांच्या व्यक्तित्वाकडे त्यांचें लक्ष असे, ह्याच्या आड स्वतःस मान्य नसणारे त्या व्यक्तीचे विचार येत नसत. हा त्यांचा विशिष्टपणा इतरांत फारसा आढळून येत नाहीं. साधारण प्रवृत्ति अशी असते कीं, मान्य नसलेल्या विचारांच्या मागील व्यक्तित्त्वाकडे लक्षच द्यावयाचें नाहीं. विचार व व्यक्तित्व वेगळें करणें सर्वांस जमत नाहीं. नारायणराव ह्या सर्वसाधारण प्रवृत्तीस अपवाद होते. एका संभाषणांत अमेरिकेहून आलेल्या प्रो. टाइन ह्यांच्या प्रश्नास उत्तरें देतांना नारायणरावांनीं गांधींजींच्या लोकप्रियतेची जी मीमांसा केली आहे ( पृ. ५२५–२७ पहा ) ती किती सहृदयतेनें केली आहे हें जे कोणी पहातील त्यांस थोरपुरुषांचें व्यक्तित्व त्यांच्या दृष्टीपुढें कसें असे त्याची चांगली कल्पना होईल. अशीच वृत्ति सर्वांची असावी अशी त्यांची इच्छा असे. तरुणांमध्यें ह्या वृत्तीची ओळखच नाहीं हें पाहून त्यांस फार खेद होत असे.

सर नारायण ह्यांच्या चरित्राचें जे कोणी निरीक्षण करितील त्यांस असें आढळून येईल कीं, त्यांचा पत्रव्यवहार जरी दांडगा होता, त्यांच्या ओळखी जरी सर्व धर्मांच्या व सर्व जातींच्या लोकांत होत्या तरी त्यांना जिवश्चकंठश्च मित्र असे फारच थोडे होते. कांहीं अंशीं माधवराव रानडे, रामकृष्णपंत भांडारकर ह्यांच्यासंबंधानें हाच अनुभव आहे. रानडे व भांडारकर ह्यांच्यापेक्षां त्या मानानें नारायणराव पुष्कळ बरे. मैत्री जोडणें अगर मित्र जमविणें हें आपल्याला साधत नाहीं व त्याबद्दल मी स्वतःला दोष देत असतों असें ते म्हणत. तरीसुद्धां आमच्या माहितींत सबंध आयुष्यांत त्यांना तीन मित्रांचा लाभ झाला होता ह्यांत कांहीं संशय नाहीं. वासुदेवराव भांडारकर, विष्णूपंत भाटवडेकर व मि. नटराजन हे त्यांचे दृढ मित्र होते ह्यांत कांहीं संशय नाहीं. बडोद्यास गेल्यानंतर कांहीं काळ वासुदेवराव

---

१ I have always cursed myself that I have not the nack of making friends.

व नारायणराव ह्यांच्यांत पत्रव्यवहार चालू होता. नारायणराव त्यांस My dear Kaka, किंवा My dear Vasu, असेंही लिहीत असत. पुढें अंतरामुळें पूर्वीचा निकटभाव राहिला नाहीं. व नंतर वासुदेवराव परत मुंबईस आल्यावर तो भाव पुन्हां स्थापित झाला नाहीं. मि. नटराजन हे त्यांचे प्रिय मित्र होते, कित्येक वर्षें रोज त्यांच्या भेटीगांठीं होत, अनेक महत्त्वाच्या विषयांवर संभाषण चाले, सोशल रिफॉर्मर पत्रासाठीं नारायणराव वारंवार लेख लिहीत व ज्या थोड्या मित्रांनीं रिफॉर्मर संबंधाची आर्थिक जबाबदारी पत्करली होती त्यांत नारायणराव प्रमुख होते हें आम्हांस माहीत आहे. तथापि शेवटल्या कांहीं वर्षीं पूर्वीइतका त्यांचा दाट परिचय नसे ह्यांत कांहीं संशय नाहीं. परंतु विष्णूपंतांसंबंधानें मात्र तसें म्हणतां यावयाचें नाहीं. सतत ३६ वर्षें त्यांची मैत्री होती व ती असाधारण स्वरूपाची होती. विष्णूपंतांसंबंधानें स्वतः नारायणराव लिहितात :—

"For thirty-six years from the time he and I formed between us the ties of intimate friendship, we were each a brother unto the other. His secrets were mine and mine were his. He could see the depth of my soul and I could see his...The difficutly in fully delineating the soul of my beloved Vishuu lies in the fact, lieterally true, that he was a *saint* and saints "live simply to express themselves;" language is inadequate to express them."

हें अगदीं अक्षरशहा जरी खरें असलें तरी जिवलग मित्रासंबंधानें नारायणरावांची काय दृष्टी होती त्याची वरील अवतरणावरून चांगली कल्पना होते. अशा परीक्षेस उतरणारे एकटे विष्णूपंतच त्यांना दिसले तर त्यांत आश्चर्य काय आहे ? नारायणरावांस विष्णूपंतांचा मोठा आधार असे. मनाच्या अस्वस्थ स्थितींत आपल्या मित्राच्या सहवासांत गेलेला काळ नारायणरावांस लाभदायक वाटे. त्यांचा शांत स्वभाव, मधुर वाणी, परिपक्व विचार, चित्ताची शांति, सरळपणा, व अत्यंत त्रस्त स्थितींतही स्वतःच्या वेदना विसरून वागणें, त्यांचा बालभाव, मुलांच्या गराड्यामध्यें त्यांच्याशीं समरस होण्याची त्यांची हातोटी, त्यांचें पवित्र आचरण ह्यांचा नारायणरावांच्या मनावर इतका परिणाम झाला होता[१] कीं, अखेरपर्यंत

१ Vishnu by temparament, training and heredity was a man of calm thought. He could meditate, sooth and suggest. And here lay his virtue. He was the soul of peace, the *shanti* of our scriptures, that blesses, restores and heals the world. As husband, father, brother, friend and citizen his was the saving sense of gracious manhood, because he took the joys and griefs of life with a cheerful countenance.

नारायणरावांना आपल्या "विष्णूचा" मुळींसुद्धां विसर पडला नाहीं. १९१२ सालीं दिल्ली दरबाराच्या दिवशीं आकस्मिक रीतीनें विष्णूपंतांना देवाज्ञा झाली. त्यावेळीं नारायणराव दिल्लीस होते! त्यांनीं वर्णन केलेला मित्र एकदां गेल्यावर त्यांना दुसरा मित्र लाभला नाहीं ह्यांत आश्चर्य काय? परंतु आपल्या गतमित्रां-संबंधाची त्यांची दृष्टीच मुळीं त्यांचें ह्या बाबतींतील विशिष्टत्व स्थापित करीत आहे. आपल्या मित्राचें नाशवंत, रोगानें जर्जर झालेलें शरीर गेलें, पण आपला मित्र गेला नाहीं, अशीच त्यांची भावना होती व हेंच त्यांचें समाधानाचें स्थान होतें, हें त्यांच्या पुढील उद्गारांवरून सिद्ध होतें :—

"Gone, gone art thou, beloved friend, and in this mortal sphere of life, I shall not see thee! But as I say so, thy image, I feel, is before me, to chide the sinful thought. No—thou art not gone. Thy body has disappeared but thou hast left thy image. And always thinking of thee, and holding converse with thee with the familiarity and love of intimate friendship, I shall strive to get inspiration from thy image."

सर्व स्वदेशी चळवळींसंबंधानें नारायणरावांच्या ठिकाणीं आदराची भावना होती; परंतु ज्याप्रमाणें निःशस्त्र प्रतिकार व असहकारिता ह्यांच्या ते विरुद्ध होते त्याचप्रमाणें चरख्याच्या द्वारें स्वराज्य-प्राप्ति हा गांधींचा मंत्र त्यांना मान्य नव्हता. आपल्या एका लेखांत ते म्हणतात. 'मी चरख्याचा तिरस्कार करतों असें कोणीं समजूं नये, किंवा त्याचें महत्त्व मी जाणत नाहीं, चरख्याचें आजपर्यंतचें वैभव मला माहीत नाहीं असेंही कोणी समजूं नये. सतराव्या शतकांत हिंदुस्थानांत चरख्यावर तयार झालेला जरीचा माल युरोपमध्यें जात असे व तो माल पाहून जनता सर्व चकीत होत असे, हें सर्व खरें आहे. परंतु आजच्या काळीं चरख्यावरच सर्वस्वी अवलंबून रहावयाचें म्हटलें तर तें चालावयाचें नाहीं. हल्लींचा काळ चढाओढीचा आहे. आणि भौतिक शास्त्रांच्या सहाय्यानें आपण पुढें पाऊल टाकीत गेलें पाहिजे. चरखा ही केवळ पहिली पायरी होती तेथेंच आम्ही थांबणार असूं तर इतर लोक आमच्या पुढें जातील ह्यांत नवल काय? म्हणून ते म्हणतात :—

The remedy lies in removing from modern Industry what makes it a curse, not by going back altogether to and substituting for it the spinning wheel. To go back would be to rebel against Nature's law and attempt the impracticable. What India needs for salvation and swaraj is not going back to the past but adjusting herself to the condition of modern civilization by the

light of that spirituality of truth which her saints, improving upon the past behind them, have taught her to cultivate and import into secular life.

सारांश, इतर बाबतींत त्याचप्रमाणें स्वदेशी उद्योग धंद्याच्या बाबतींतही प्रगति हें आमचें धोरण पाहिजे. आणि सर्व बाजूंनीं प्रगतीचीं साधनें इतकीं उपलब्ध असतांना आपण चरखा फिरवून स्वराज्य मिळवूं शकूं ही विचारसरणी नारायणरावांस केव्हांच मान्य झाली नाहीं.

नारायणरावांचें आणखी एका बाबतींतील विशिष्टत्व येथें दाखवून देणें अगत्याचें आहे. ते स्वतः मोठे अधिकारी होते, श्रीमान होते व विद्वानही होते; परंतु गोरगरीब, खालच्या वर्गांतील लोक ह्यांच्याविषयीं त्यांच्या ठिकाणीं तिळमात्र क्षुद्र भाव नसे; एवढेंच केवळ नव्हे, तर त्यांच्यामध्यें मिळून मिसळून वागावें, त्यांची समाजव्यवस्था, रीतिभाति जाणून घ्याव्या, त्यांच्या अडचणी काय आहेत त्या समजून घ्याव्या, त्यांच्याशीं देवधर्मासंबंधानें बोलून त्यांच्या अंतःकरणास हात घालावा असें त्यांना वाटत असे. खालच्या वर्गांतल्या लोकांशीं त्यांचीं वारंवार संभाषणें होत व त्यावरून ते स्वतः बोध घेत. ह्या चरित्रांत परिशिष्टरूपानें "**हिंदुधर्माचें अंतरंग**"[1] ह्या सदराखालीं नारायणरावांचे जे लेख दिले आहेत त्यांवरून गोरगरिबांशीं ते निकट संबंध ठेवण्याचा कसा प्रयत्न करीत असत, तें दिसून येतें. कौन्सिलचे अध्यक्ष ह्या नात्यानें पुण्यास मुक्काम असतांना नारायणराव बहुतकरून गणेशखिंड रस्त्यावर फिरत असत. शेतकरी, मजूर, दूधवाले, गवतांचीं ओझीं घेऊन जाणारे, ह्याच रस्त्यानें पुण्यास जात असतात. त्यांनीं असें पाहिलें कीं, औंधरोडपासून अगदीं गणेशखिंड रस्ता संपतो तेथपर्यंत डोकीवरलीं ओझीं उभ्या-उभ्या उतरतां येतील अशीं ठिकाणें रस्त्यावर नाहींत, त्यामुळें ह्या लोकांची फार अडचण होते व त्यांस फारत्रास होतो. त्यांनीं खटपट करून गणेशखिंड रस्त्यावर ओझें वर ठेवून खालीं बसतां येईल असे कोनाडे बांधवून घेतले, त्यामुळें ह्या लोकांनीं त्यांस दुवे दिले. ही गोष्ट त्यांच्या गरिबांच्या संबंधाचा कळवळा व्यक्त करिते. त्या रस्त्यानें जात असतां ओझ्याला हात लावण्याचे प्रसंग वारंवार येत. 'साहेब, आपल्याला कसें सांगावें हात लावाया' असें ओझेवाल्यानें म्हणावें, व 'अरे तूं जसा माणूस तसा मीही माणूसच, आणि मग मी थोडासा तुझ्या उपयोगी पडलों तर काय मी झिजेन!' असा जबाब नारायणरावांनीं द्यावा असा प्रकार नेहमीं चाले. एकदां एका मुंबईच्या भाजीवाल्या खारविणीच्या ओझ्याला हात लावतां लावतां तिनें नारायणरावांस ओळखलें! साहेब! मी बाईंकडे नेहमीं जात असें असें म्हणून ती तेथून निसटली!

१. पृ. ५४६ पहा.

स्त्रियांसंबंधानें आदर, कळवळा व अभिमान नारायणरावांच्या ठिकाणीं विशेष-रीतीनें होता हें कौटुंबिक जीवनासंबंधाच्या विवेचनांत आपण पाहिलें आहे. त्यांस ज्ञानी करावें, त्यांच्या कल्याणासाठीं झटावें, त्यांच्या मार्गांतील अडचणी दूर कराव्या, त्यांस अधिकाधिक अधिकार प्राप्त करून द्यावे, त्यांच्याविषयीं कोठें क्षुद्र-भाव दिसला तर तो कमी करावा, त्यांचा दर्जा किती थोर आहे त्याची साक्ष पटवून द्यावी, त्यांच्या शिक्षणासाठीं जातीनें खपावें, लोकसेवेचीं कार्यें करण्यास त्यांस प्रवृत्त करावें व त्यांस प्रोत्साहन द्यावें; त्यांस सहाय्य करावें; त्यांच्या निर-निराळ्या सभांमध्यें जाऊन पूर्वकालीन स्त्रियांची त्यांस माहिती द्यावी हीं सर्व कार्यें ते सहज लीलेनें करीत व स्त्रियांची उन्नति झाल्यावांचून सामाजिक सुधारणेच्या सर्व गप्पा व्यर्थ आहेत हें ते आपल्या आचरणानें सिद्ध करीत. अशाप्रकारें स्त्रियांच्या उन्नतींचें ध्येय आपल्या दृष्टीपुढें ठेवून वागणारे नारायणरावांसारखे गृहस्थ अखिल हिंदुस्थानांत कितीसे सांपडतील !

नारायणरावांच्या वेळचे व त्यांच्यानंतर झालेले पुढारी ह्यांच्यासंबंधानें विचार करितां नारायणरावांचें एकंदरींत विशिष्टत्व कशांत होतें हा प्रश्न आपल्यापुढें उभा राहतो. आम्हांला असें वाटतें कीं, माधवराव रानडे ह्यांच्या चरित्राचा विचार करीत असतांना नारायणरावांनीं जें विवरण केलें आहे त्यांतच वरील प्रश्नाचें उत्तर आहे. रानड्यांसंबंधानें १९०१ सालींच नारायणरावांनीं म्हटलें आहे: " गेलीं वीस वर्षें अनेक प्रकारच्या चळवळींत न्या. मू. रानडे ह्यांच्याशीं प्रत्यक्ष संबंध आल्या-मुळें व त्यांच्या सहवासाचा लाभ झाल्यामुळें मला तर असें वाटतें कीं, त्यांच्या एकंदर चरित्राची व त्यांनीं जें महत्कार्य केलें त्याची किल्ली कशांत आहे तें आपण लक्षांत घेतलें पाहिजे. अशी ही किल्ली हस्तगत व्हावी असें ज्यांस वाटत असेल त्यांनीं त्यांचें आध्यात्मिक जीवन प्रथम ध्यानांत घेतलें पाहिजे. ज्या कृतींच्या योगें त्यांची असाधारण बुत्तिमत्ता अनुभवास आली, त्यांचे नैतिक गुण स्पष्ट झाले, त्यांच्या भिन्नभिन्न प्रकारच्या चळवळी सर्व कांहीं त्यांच्या धर्मशीलतेचे परिणाम होत. त्यांनीं जीं जीं कार्यें केलीं तीं सर्व करीत असतां त्यांच्या धर्मशील-तेचें वर्चस्व अनुभवास येई...त्यांच्या चरित्राचें थोडक्यांत रहस्य सांगावयाचें म्हटलें तर मी सांगेन कीं, त्यांचा धर्मावरील विश्वास असाधारण होता. त्यांची असामान्य बुद्धिमत्ता, नैतिक श्रेष्ठता, अप्रतिहत उद्यमशीलता जें जें चांगलें आहे त्यासाठीं निस्वार्थ बुद्धीनें झटणें, आयुष्यभर ऐषआरामाचा त्यांनीं केलेला तिरस्कार, ध्येयाचा त्याग न करितां, अडचणी व त्रास आनंदानें सिद्ध करण्याची सिद्धता इ० त्यांचे गुणच त्यांच्या ठिकाणीं असलेल्या दैवी तेजाची साक्ष पटवीत असत."
रानडे व चंदावरकर ह्यांची तुलना करण्याचा आमचा उद्देश नाहीं. रानड्यांच्या संबंधानें

नारायणरावांच्या ठिकाणीं अत्यंत आदराची भावना असे. रानड्यांच्या मागून त्यांच्याच जागेवर आपली नेमणूक झाल्यामुळें आपल्यादृष्टीनें त्या जागेला पावित्र्य प्राप्त झालें आहे असें त्यांनीं आपल्या मित्रास कळविलें होतें. (पृ. १५६) तथापि नारायणरावांचें सर्व चरित्र काळजीपूर्वक जें कोणी पहातील त्यांच्या हें लक्षांत येईल कीं, धर्मास त्यांनीं आद्यस्थान दिलें होतें. सर्व चळवळी, सर्व कार्यें धर्मास महत्त्व देऊन ते करीत असत. राजकारण असो, सामाजिक चळवळ असो, शिक्षणविषयक कार्य असो, सर्व कार्यें ते धर्मबुद्धीनें करीत ह्यांत संदेह नाहीं. उपनिषदामध्यें **धर्मंचर** अशी स्पष्ट आज्ञा आहे. सर्व कार्यें करीत असतां धर्मानुसार वाग ही आज्ञा ते अक्षरशः पाळीत असत. त्यामुळें ज्याप्रमाणें स्वतः त्यांच्या बाबतींत आंत एक व बाहेर निराळें असें आढळत नसे, त्याचप्रमाणें त्यांचा तरूणपिढीस उपदेश असे कीं, speak as you do and do you speak बोला सारखी कृती ठेवा व कृतीस अनुसरून तुमची भाषा असूं द्या. नारायणराव मोठे आशावादी होते हें सर्वांस अवगत आहे. सभोंवतालीं इतरांच्या दृष्टीनें सर्वत्र निराशेस कारणें दिसत असतांना नारायणरावांच्या ठिकाणीं एवढा भरपूर आशावाद आला कोठून? त्यांनींच ह्याचें एकदां उत्तर देऊन ठेविलें आहे. "प्रथमतः व्यक्तीनें जीवन अंत-र्बाह्य निर्मल राखण्याचा प्रयत्न केला पाहिजे. म्हणजे मग बाह्य जीवन व अंतः-जीवन हें एक होईल" त्याचप्रमाणें धर्माचा आश्रय केल्यावांचून मनुष्य आशावादी होणें शक्य नाहीं, म्हणून त्यांनीं बजाविलें आहे कीं, onlyit is by means of religion that you can acquire a spirit of optimism, a spirit of hopefullness हीं त्यांचींच वचनें त्यांच्या चरित्राला लाविलीं कीं ते आशावादी कसे होते ह्याचें उत्तर आपल्याला सहज मिळतें.

नारायणरावांच्या आत्मपरीक्षणावरून त्यांचें विशिष्टत्व स्थापित होतें. कांहीं लोकांचें आत्मपरीक्षण त्यांस संपूर्णपणें निराशावादी करितें. त्यांना सर्वत्र दोष दिसतात. स्वतः-मध्यें अनेक दोष, इतरांमध्यें दोषांचा बुजबुजाट, कोठेंही आशेस जागा नाहीं, उन्नतीस वाव नाहीं अशी स्थिति झाल्यामुळें नेहमीं त्यांचें रडगाणें चालू असतें. नारायणराव प्रखर आत्मपरीक्षण करीत असत त्याची साक्ष आध्यात्मिक जीवन हें प्रकरण करून देत आहे. त्यांच्यासारखें आत्मपरीक्षण त्यांच्याबरोबरीच्यापैकीं कोणी करीत होतें किंवा नाहीं याची शंकाच आहे. परंतु त्यांची दृष्टी आशावादी झालेली असल्यामुळें सर्व बाबतींत त्यांची प्रवृत्ति विधायक झाली, आणि आपला हा सर्व संसार ज्या-प्रमाणें कर्मक्षेत्र आहे, त्याचप्रमाणें हें धर्मक्षेत्र आहे अशा भावनेनें ते वागत होते. म्हणून ते नेहमीं कार्यप्रवण असत. आणखी दोन गोष्टी त्यांचें विशिष्टत्व स्थापित करितात त्यांकडे तरुणपिढीचें लक्ष गेलें पाहिजे. त्यांचा परमेश्वरावरील दृढ विश्वास

व त्यांचें प्रार्थनामय जीवन. आपले सर्व व्यवहार परमेश्वराच्या साक्षित्वानें व्हावेत अशी त्यांची मोठी इच्छा असे व त्या इच्छेस अनुसरून ते वागत. ज्यांचें अखिल जीवन प्रार्थनामय असतें ते परमेश्वराच्या सहवासांत आपण नित्य आहोंत अशाच भावनेनें सर्व व्यवहार करीत असतात. नारायणरावांचें असेंच होत असे. त्यामुळें त्यांची स्वदोषजागृति इतकी तीव्र असे कीं, आपल्या हातून जें होऊं नये तें झालें असें त्यांच्या मनानें घेतलें, व कोणाचा अपराध आपल्या हातून घडला असें त्यांना वाटलें, तर त्याचें परिमार्जन केल्यावांचून ते स्वस्थ बसत नसत. त्यांचें जागृत मन त्यांना स्वस्थ बसूं देत नसे, इतकी त्यांची जागृति तेजस्वी असे. सारांश, त्यांचा अखिल जीवनप्रवाह परमेश्वराच्या साक्षित्वानें चालत होता अशी त्यांच्या चरित्रा-कडे पहातां मनाची खात्री झाल्यावांचून रहात नाहीं. त्यांनीं आपल्या आयुष्याचें सार्थक केलें; आपला देह सत्कार्यीं झिजविला; आपलें चित्त शुद्ध ठेवण्याचा सतत प्रयत्न केला; सतत परमेश्वराच्या चरणीं लीन राहून लोककल्याण साधलें व सर्वांस ह्या कर्मक्षेत्रांत राहून त्यास धर्मक्षेत्र कसें बनवितां येतें तें स्वतःच्या आचरणानें दाखवून दिलें. अशा प्रकारें त्यांचे अनेक गुण त्यांचें विशिष्टत्व स्थापित करीत आहेत यांत तिळमात्र शंका नाहीं.

( परिशिष्ट )

# हिंदु धर्माचें अंतरंग[1]

धर्मांच्या इलाख्यांत तत्त्वज्ञानानें प्रवेश केला कीं, धर्माचा नाश जवळच आला आहे असें समजावें अशी हेन नामक जर्मन टीकाकारानें केलेली टीका हिंदु धर्माचा विचार केला तर पटण्यासारखी नाहीं. कारण, पडत्या काळीं, किंवा उन्नतीच्या दिवसांत, हिंदुधर्म व तत्त्वज्ञान ह्यांची फारकत झालेली दिसत नाहीं. आणि आज देखील शास्त्रांनीं लाविलेले नवीन नवीन शोध, निरनिराळ्या विचारांच्या लोकांनीं हिंदु धर्मावर केलेले आघात, सुशिक्षित लोकांतील नव्या पिढींतील लोकांमध्यें धर्माविषयीं पसरलेलें औदासीन्य, उदार विचारांच्या लोकांनीं केलेली टीका ह्यांचा आपल्यावर कांहींच परिणाम होत नाहीं असें हिंदुधर्माचा प्रवाह दाखवीत आहे असें सकृद्दर्शनीं वाटतें. पण थोडा विचार केला तर खरा प्रकार असा केव्हांच नव्हता व आजही नाहीं असें दिसून येईल. वस्तुतः ज्याला हिंदुधर्म म्हणतात तो एक धर्म नाहीं. तो अनेक धर्मांचें, अनेक परस्परविरोधी विचारांचें व तत्त्वांचें मिश्रण व अनेक प्रसंगीं केलेल्या तडजोडीची साक्ष पटविणारा धर्म आहे. ह्यामुळें हिंदु धर्माची व्याख्या करणें फार बिकट कार्य झालें आहे. मागें एकदां हिंदुधर्म म्हणजे काय व हिंदु कोणास म्हणावें ह्या प्रश्नांवर रणें माजलीं होतीं.[2] एका पुरातन विचारांच्या न्यायमूर्तींनीं जो कोणी वेद हे साक्षात् ईश्वरप्रणीत मानावयास सिद्ध नाहीं

---

१. १९१२ सालीं सर नारायण चंदावरकर ह्यांनीं The Heart of Hinduism अशा शीर्षकाखालीं सात लेख लिहिले. त्यांचा अल्प सारांश येथें सादर केला आहे.

२ प. वा. बळवंतराव टिळकांनीं वेदांविषयीं ज्याची प्रामाण्यबुद्धि आहे तो हिंदु अशी व्याख्या केली व प. वा. गजानन भास्कर वैद्य यांनीं जो आपल्याला हिंदु म्हणवितो तो हिंदु अशी व्याख्या केली !

तो हिंदु नव्हे अशी व्याख्या केली होती. वर वर पाहातां ही व्याख्या बरी व सुटसुटीत आहे असें वाटण्याचा संभव आहे. परंतु इतिहासाची साक्ष, आजची परिस्थिति व लोकविचार ह्यांचा विचार केला तर ही व्याख्या समाधानकारक नाहीं असेंच वाटूं लागतें. सेन्सस कमिशनर मि. गेट ह्यांनीं मागें जें एक सरक्युलर काढलें होतें त्यांत हे दोन प्रश्न त्यांनीं उपस्थित केले व महार व इतर अस्पृश्य, हे हिंदु नव्हत असें जाहीर केलें! त्यावेळीं ह्या सरक्युलरला सर्वत्र हिंदूंनीं विरोध केला. वास्तविक पहातां अस्पृश्यांना वेदांविषयीं कांहींही कल्पना असणें शक्य नाहीं, आणि ज्यांना कांहीं कल्पना आहे त्यांनीं तर असें म्हटलें आहे कीं, ह्या वेदांनींच आम्हांला आजच्या स्थितीला आणिलें आहे, त्यांनींच आमचा घात करून आम्हांस माणसांतून उठविलें आहे. आणि तुकारामासारख्या थोर संतानें तर स्पष्टपणें असें म्हटलें आहे कीं, न कळे महिमा, वेद मौनावले; तरी तो हिंदु नाहीं असें कोणी म्हणत नाहीं. फार कशाला, प्रत्यक्ष वेदच, त्याचा आम्हांला थांग लागत नाहीं असें म्हणत आहेत. बौद्ध व जैन धर्मांनीं ज्यावेळीं हिंदु धर्मावर आघात केले व आम्ही वेदांचें प्रामाण्य मान्य करीत नाहीं असें जाहीर केलें, त्यावेळीं हिंदु धर्माच्या नेत्यांनीं व प्रवर्तकांनीं जैन व बौद्धधर्मियांना पाखंडी असें ठरविलें, तो प्रसंग ध्यानांत घेऊन ह्या न्यायमूर्तींनीं वरीलप्रमाणें ‘ हिंदु ’ ह्या शब्दाची व्याख्या केली असेल; परंतु हिंदुधर्माच्या प्रवर्तकांनीं जरी बौद्ध व जैनधर्मांना **पाखंडी** ठरविलें, तरी ज्या हिंदुधर्मानें त्या धर्मास त्याज्य ठरविलें, त्याच हिंदुधर्मानें ह्या त्याज्य व पाखंडी ठरविलेल्या धर्मांतील कांहीं विचार आत्मसात करून घेतलेच! आणि आज सर रामकृष्णपंत भांडारकरांसारखे विद्वान सांगत आहेत कीं जी प्रतिमापूजा आजकाल हिंदूंमध्यें सर्वत्र आढळून येत आहे ती वेदांच्या, उपनिषदांच्या व भगवद्गीतेच्या शिकवणींत आढळत नाहीं. बहुतकरून बुद्ध व जैनधर्मियांकडून आमच्या लोकांनीं हें प्रतिमापूजनाचें लोण घेतलें असावें. बुद्ध व जैनधर्मियांचा परमेश्वरावर विश्वास नाहीं. परंतु जेव्हां त्यांच्यापैकीं कोणीतरी थोर पुरुष मृत्युमुखीं पडे, तेव्हां ते त्याचे पुतळे करीत व त्यांची पूजाअर्चा करूं लागत, आणि हिंदूंनीं त्यांचें अनुकरण करण्यास प्रारंभ केला. असा वास्तविक प्रकार असतांना आज आमचे सुशिक्षित लोकच चिकित्सक बुद्धीला गुंडाळून ठेवून प्रतिमापूजन हेंच जणूं काय हिंदुधर्माचें रहस्य आहे असें आवेशपूर्वक प्रतिपादीत असतात. तसें जर असतें तर नामदेवासारख्या संतानें आपल्या एका गोड अभंगांत आपला ब्राह्मण गुरु विसोबा खेचर ह्याच्या जोरावर प्रतिमापूजनाचा निषेध जो केला आहे तो त्यानें केला नसता. नामदेवानें प्रतिमापूजनाचा निषेध केला, तरी त्याचा गुरु विसोबा व नामदेव ह्यांच्याविषयीं हिंदुसमाजांत

आदरच वसत आहे.[१] समर्थ रामदासांनीं प्रतिमाप्रतिमापूजन ह्यासंबंधानें तीव्र निषेधपरच उद्गार काढले आहेत, त्यांचा आशय असा आहे कीं, जिकडे तिकडे देवांचा सुळसुळाट व गलबला माजला आहे, पण खऱ्या देवाचा मात्र लोकांना विसर पडला आहे. व उपासनेची विडंबना होत आहे; लोकांची स्वतः विचार करण्याची शक्ति जणूंकाय नष्ट झाली आहे. ह्या सर्व घोटाळ्यांत खरा शास्त्रार्थ लोपला आहे व खरें काय व खोटें काय हें जाणण्याचें सामर्थ्यच नाहीसें झाल्यासारखें झालें आहे.[२] अर्थात् जेव्हां आमच्यापैकींच शहाणीं माणसें प्रतिमापूजनाचा मोठ्या आवेशानें पुरस्कार करितात व तेंच हिंदुधर्माचें रहस्य आहे असें आपल्या अधिकारवाणीनें प्रतिपादतात तेव्हां कित्येक ख्रिस्ती टीकाकारांना चांगलेंच फावतें व ते खुशाल चिकित्सकबुद्धीला न पटणारी टीका करितात. अगदीं अलीकडेच एक बड्या मिशनरीनें सर्वांना मोठ्या काकुळतीनें सांगितलें कीं आपण सर्व पतितांच्या (किंवा) मूर्तिपूजकांच्या देशांत रहात आहों म्हणून ख्रिस्तानें ज्याप्रमाणें 'देवा, त्यांना क्षमा कर, कारण त्यांना आपण काय करीत आहों तें कळत नाहीं' ही प्रार्थना केली त्याप्रमाणें ह्या लोकांसाठीं आपणही तीच प्रार्थना केली पाहिजे! खरें पहातां ही प्रार्थना मुळांत मूर्तिपूजकांस उद्देशून नसून ती Pharisees व Saducees ह्यांना

---

१ नामदेवांच्या ह्या अभंगांचा प्रारंभ

**पाषाणाचा देव बोलेचिना कधीं। हरी भवव्याधि केवीं घडे**

ह्या चरणानें झाला असून शेवटले दोन चरण असे आहेत:

**द्वादशीचे गांवीं झाला उपदेश। देवावीण ओस स्थळ नाहीं**
**तो देव नाम्या हृदयीं दाविला। खेचरानें केला उपकारू हा**

२. ह्या बाबतींत समर्थांच्या कांहीं ओव्या लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत:—

(१) **धातु पाषाण मृत्तिका। चित्रलेप काष्ठ देखा।**
**तेथें देव कैंचा मूर्खा। भ्रांति पडली॥**

(२) **देव जाले उदंड। देवांचें मांडलें भंड।**
**भूतदेवतांचें थोतांड। एकचि झालें॥**

(३) **मुख्य देव तो कळेना। काशास कांहींच मिळेना।**
**एकास एक वळेना। अनावर॥**

(४) **शास्त्रांचा बाजार भरला। देवांचा गल्बला झाला।**
**लोक कामनेच्या व्रताला। झोंबोन पडती॥**

(५) **ऐसें अवघें नासलें। सत्यासत्य हारपलें।**
**अवघें अनावेक जालें। चहूंकडे॥**

उद्देशून असल्यामुळें, जे लोक प्रतिमापूजन करीत आहेत त्यांस उद्देशून करणें योग्य होईल किंवा कसें हा प्रश्नच आहे. वास्तविक येशूचें त्यावेळचें वर्तन विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्यावेळीं त्या देशांत प्रतिमापूजनाचा सर्वत्र बुजबुजाट झाला होता. येशूच्या हें लक्षांत येऊन चुकलें होतें कीं, दगडांधोंड्याचें पूजन एवढीच प्रतिमापूजा त्यावेळीं अस्तित्वांत नव्हती. धनमान, अधिकार, गर्व, ह्या रूपानें idolatry सर्वत्र प्रचारांत होती. असो.

खरें पहातां, वेद किंवा प्रतिमापूजन ह्यांच्याद्वारें आपल्याला हिंदुधर्माचें रहस्य किंवा अंतरंग कांहीं कळत नाहीं. जे वेदांचा अधिकार मानीत नाहींत, किंवा ते ईश्वरप्रणीत आहेत असें समजत नाहींत व ज्यांनीं प्रतिमापूजनानें सत्यधर्माचा लोप होतो व माणसें नीचत्वाप्रत जातात असें प्रतिपादलें आहे अशीं माणसें हिंदूच म्हणून मान्यता पावत आहेत. आणि खरें पहातां हिंदुधर्माच्या अंतरंगाचा ठाव लागणें हें कांहीं सुलभ कार्य नाहीं. कारण, परस्परविरोधी शिकवण त्यांत आहे हें खरें आहे आणि हिंदुधर्म हा एक महासागर आहे असें जें म्हटलें आहे तें कांहीं खोटें नाहीं. आणि म्हणूनच हिंदुधर्माची व्याख्या करतांना लोकांची तारांबळ उडते. जेथें मोठमोठे नामांकित पंडित न्यायाधीश व विद्वान पुरुष हिंदुधर्म म्हणजे काय व हिंदु कोणास म्हणावें हें सांगू शकत नाहींत तेथें माझ्या-सारख्याला तें कसें शक्य होणार? म्हणून मीं एके दिवशीं सहज आमच्या शास्त्रीबोवांना म्हटलें,[1] शास्त्रीबोवा, "हिंदुधर्मासंबंधानें हल्लीं काय चर्चा चालली आहे तें आपल्या कानांवर आलें आहे काय?" "नाहीं. कायकाय चर्चा चालली आहे?" "अहो, मोठमोठीं माणसें हिंदुधर्माची व्याख्या करीत असून एकानें केलेल्या व्याख्येचा दुसऱ्यानें केलेल्या व्याख्येशीं मेळ बसत नाहीं." बराच वेळ विचारमग्न स्थितींत घालवून शास्त्रीबोवा म्हणाले, " हिंदुधर्माच्या व्याख्येसंबंधानें एकमत होत नाहीं ह्यावरून तो कसा सर्वसंग्रही आहे हें सिद्ध होत आहे. ज्या ब्रम्हाची हिंदुधर्म पूजा करितो त्याची व्याख्या ज्याप्रमाणें होत नाहीं तसेंच हिंदुधर्माचें आहे. पूर्व ऋषींनीं ब्रह्माची अस्तिपक्षीं व्याख्या करण्याचा प्रथम प्रयत्न केला, पण त्यांत यश न आल्यामुळें त्यांस तो हें नाहीं तें नाहीं असेंच म्हणावें लागलें." ही शास्त्रीबोवासारख्या लोकांची पद्धत झाली. त्यायोगें विषय निकालांत निघत नाहीं. बसू बिलाच्या वेळीं हा प्रश्न लोकांपुढें आला. बसूबिलाचा उद्देश हिंदु व हिंदु नसणारे ह्यांच्यांतील, त्याच प्रमाणें हिंदूंच्या निरनिराळ्या जातींतील विवाह कायदेशीर मानले जावेत हा होता. हें जर बिल पास झालें तर हिंदुधर्म बुडणार

१. हे लेख १९१२ मध्यें लिहिले त्यावेळीं सर नारायण न्यायाधीश होते.

अशी टीका होऊं लागली. त्यावेळीं हिंदुधर्म म्हणजे काय व हिंदु कोणास म्हणावयाचें हे प्रश्न प्रामुख्यानें पुढें आले. त्यावेळीं प्रतिपक्षाचीं तोंडें बंद करण्यासाठीं तर्कांच्या व विवेचक-शक्तीच्या जोरावर निरनिराळ्या व्याख्या करून आपापला पक्ष पुढें मांडणें युक्त असेल. परंतु केवळ तर्कशास्त्र लढविल्यानें पुराणीं मतें व विचार नष्ट होत नाहींत, किंवा केवळ तर्कावर सर्व भिस्त ठेवून आयुष्यांत भागत नाहीं. आज आपल्याला जें पहावयाचें आहे तें हें कीं, हिंदु-धर्माचें अंतरंग काय असावें व निरनिराळ्या सुखाच्या, दुःखाच्या, संकटांच्या काळांतही तें हिंदुधर्माचें रहस्य अगर खरें अंतरंग लोकांच्या जीवनांत कसें दिसून येत होतें त्याचा आपल्याला ठाव लावावयाचा आहे. ( Extremities ) शरिराचीं टोकें तपासून व्यक्तीच्या प्रकृतीचें मान कळतें असें म्हणतात. त्याचप्रमाणें कोठल्याही लोकांच्या धर्माचें अंतरंग जर पहावयाचें, तर त्या धर्मातील जे गोरगरीब, खालच्या वर्गातील लोक त्यांच्या जीवनाकडे पाहून धर्माच्या अंतरंगाचा ठाव लावण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. ज्यांच्या श्रमामुळें, काबाडकष्टामुळें आमचें जीवन सुलभ झालें आहे, ज्यांना चैन, मौजमजा, उधळपट्टी माहीत नाहीं, जीं माणसें लहान लहान व मोडक्यातोडक्या झोंपड्यांत रहातात, त्यांच्यांत मिसळल्यानें, त्यांच्याशीं संभाषण केल्यानें ज्याप्रमाणें आपल्याला हिंदुधर्माची स्पष्ट कल्पना होईल त्याप्रमाणें दुसऱ्या कशानेंही होणार नाहीं. त्यांचे संसार, त्यांचे विचार, त्यांच्यावरील संकटाच्या वेळचें त्यांचें वर्तन ह्यायोगें हिंदु धर्माचें रहस्य, त्याची थोरवी, त्याची शिकवण, व त्याचा वेळोवेळीं झालेला अधःपात ह्यांविषयीं स्पष्ट कल्पना करून देतील.

## संन्याशी कीं गृहस्थ ?

धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्या चार शब्दांचा अखिल हिंदु जनांवर सर्व वर्णांच्या व सर्व विचारांच्या-इतका परिणाम झालेला आहे कीं, आज हे शब्द कमीअधिक प्रमाणानें-श्रेष्ठ वर्गापासून अत्यंत कनिष्ठ मानलेल्या जातींस-सर्वांस अवगत असतातच. हे हिंदुसमाजरूपी मंदिराचे चार आधारस्तंभ आहेत. सर्व तत्त्वज्ञान, सर्व वादविवाद, सर्व अध्यात्म विषय ह्या चार पुरुषार्थाभोंवतीं जणू काय घिरट्या घालीत आहेत. हिंदु धर्मशास्त्रपंडिताला हे चार पुरुषार्थ दृष्टीपुढें ठेवून न्याय-शास्त्राच्या तत्त्वाचें प्रतिपादन करावें लागतें. आज ज्या हिंदुधर्मशास्त्रांच्या ग्रंथांच्या आधारें न्यायाचीं कोर्टें न्यायतत्त्वें समजून घेतात ते ग्रंथ ह्या चार पुरुषार्थांच्या पूरीकरणार्थच रचले गेले. वरच्या वर्गातील लोकांशीं संभाषण करते वेळीं ह्या चार पुरुषार्थसंपादनासाठींच हें जीवन असें ऐकावयास मिळतें. खालच्या वर्गातील लोकांच्या दृष्टीपुढें तोच आदर्श असतो, स्पष्टपणें हे शब्द-धर्म अर्थ काम व मोक्ष

त्यांस सांगतां येत नाहीं एवढेंच, त्यांचें ध्येयही तेंच असतें. त्या संबंधाच्या वचनांचा मुळीं स्पष्ट अर्थच असा आहे कीं, मनुष्याच्या जीवनाचा हाच हेतु आहे कीं, त्यानें आपलें कर्तव्य निष्ठापूर्वक करावें, आपल्या इच्छापूर्तीसाठीं धन मिळवावें व अंतीं आपला उद्धार करून घ्यावा, मोक्षप्राप्ति साधावी. जैमिनीनें स्थापन केलेल्या मीमांसक सांप्रदायाला हे सर्व हेतु मान्य नाहींत. कायद्यामध्यें कांहीं किचकट प्रश्न पुढें आला म्हणजे त्यासंबंधानें मीमांसक काय म्हणतात हें पहाण्याची प्रथा आहे. ह्या मीमांसकांस मोक्ष हा पुरुषार्थ मान्य नाहीं. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, धर्मसाधन म्हणजे कर्तव्य ह्याच्याद्वारेंच मुक्ति अगर मोक्ष प्राप्त होतो. परंतु वेदांताचा प्रणेता बादरायण हा म्हणतो कीं, मोक्षसाधन हा चवथा पुरुषार्थ आहे. ह्या पुरातन काळच्या विद्वानांच्या भांडणांत आपल्याला पडण्याची आवश्यकता नाहीं. पण एवढें मात्र खरें कीं, चार पुरुषार्थांत कर्तव्य, धर्म, हाच पुरुषार्थ सर्वत्र श्रेष्ठ मानला जातो. कारण दुसऱ्या तिन्ही पुरुषार्थांचें मूळ धर्म ह्या पुरुषार्थांत आहे असा सर्वत्र समज आहे. मग येथें सहजच प्रश्न उद्भवतो कीं, धर्म म्हणजे काय ? त्यांत कोणकोणत्या गोष्टींचा अंतर्भाव होतो ? प्रथम देवावर विश्वास व सर्व कार्यें–ऐहिक व परमार्थविषयक–शास्त्रें, समाजानें घालून दिलेले नियम ह्यांस अनुसरून करणें ह्या गोष्टींचा त्यांत अंतर्भाव होतो. आतां हीं कर्तव्यें कोणतीं, त्याचप्रमाणें सर्व बाबतींत वेदांचा आधार मानावयाचा किंवा कसें, वगैरे भानगडीच्या प्रश्नांत येथें पडण्याचें कारण नाहीं. साधारण माणसांच्या ध्येयांचा विचार केला तर मला असें वाटतें कीं, जो परमेश्वर परमात्मा सर्वांच्या अंतःकरणांत वसत आहे, त्याचें दर्शन घेणें, आत्मदर्शन, हेंच मनुष्याचें सर्वश्रेष्ठ ध्येय आहे. दर्शन हा शब्द आपणां हिंदूंमध्यें सर्वांच्या चांगला परिचयाचा आहे. रोज सकाळीं व संध्याकाळीं नियमानें भुलेश्वराकडे वल्लभाचार्यांच्या मंदिरांकडे जाणाऱ्या स्त्रीपुरुषांस तुम्ही कोठें जात आहां असें विचारिलें तर "दर्शनाला" असें उत्तर मिळेल. त्याचा अर्थ देवदर्शन असाच असतो. यात्रेकरू निरनिराळ्या ठिकाणचा जो प्रवास करितो तो देवदर्शनाच्याच हेतूनें. सारांश, आत्मदर्शन प्राप्त करून घेणें, आपल्या अंतःकरणांत जो परमात्मा वसत आहे त्याचें दर्शन घेणें, त्याच्या सन्निध जाणें, त्याच्याशीं समरस होणें हें आपलें सर्वश्रेष्ठ कर्तव्य होय. पण हें सर्व साधावयाचें कसें ? हिंदुधर्म व तत्त्वज्ञान ह्यांतील हा मोठा वादग्रस्त प्रश्न होऊन बसला आहे. कोणी म्हणतात कर्माच्या द्वारें हें ध्येय साध्य होईल; दुसरे म्हणणार, कर्माच्या द्वारें नाहीं; ज्ञानाच्या द्वारें हें ध्येय गांठतां येतें. आणि भागवतामध्यें देवाच्या तोंडूनच असें वदविलें आहे कीं, योगसाधनाच्या द्वारें, ज्ञानमार्गाच्या द्वारें, किंवा वेद अगर शास्त्र, त्यांचीं अंगेउपांगें हीं पढल्यानें, किंवा निरनिराळीं कर्में, कर्म-

कांडाचा पसारा माजविल्यानें, बलिदान दिल्यानें, धर्मादाय केल्यानें, अगर परोपकाराचीं कार्यें केल्यानें, अगर उपासतापास केल्यानें, व्रतें—वैकृत्यें केल्यानें, देवपूजेचा पसारा मांडल्यानें, किंवा मंत्र–तंत्रांचा उच्चार केल्यानें मी संतोष पावत नाहीं. तर संतांच्या संगतींत मला आनंद वाटतो, समाधान वाटतें. त्यांच्या सहवासापुढें दुसरें सर्व व्यर्थ आहे. आणि भगवद्गीता तर हे सर्व प्रकार बाजूस सारून परमेश्वर व मानवप्राणी ह्यांवर प्रेम करणें हेंच मनुष्याचें मुख्य ध्येय असें सांगत आहे आणि तें Love the lord, thy God, and love thy neighbour as thyself ह्या उपदेशाप्रमाणेंच आहे.

आतां प्रेमाच्या संबंधानें एक गोष्ट अशी लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं, प्रेम जर संपादावयाचें तर तें प्रथम आपण केलें पाहिजे. ( Love is an active quality ) मग आत्मदर्शन किंवा परमेश्वराचा साक्षात्कार व त्याच्यायोगें आपला उद्धार जर करून घ्यावयाचा, तर मग हें साधावयाचें कसें ? येथेंही विचाराचे दोन पंथ आहेत. एक पंथ म्हणणार, मनुष्याच्या आयुष्याचे चार विभाग केले पाहिजेत. प्रथम ब्रह्मचर्याश्रम. गुरुगृहीं विद्यार्जन करावयाचें व ज्ञानार्जन होत असतांना अविवाहित राहावयाचें. नंतर विवाह करून गृहस्थाश्रम स्वीकारावयाचा. नंतर वानप्रस्थाश्रम म्हणजे संसाराचा त्याग करून अरण्यावास पत्करावयाचा व चवथा संन्यासाश्रम. शेवटल्या आश्रमाचा स्वीकार केल्यावांचून त्यास मोक्ष मिळावयाचा नाहीं, त्याला आत्मदर्शन व्हावयाचें नाहीं. एवढेंच केवळ नव्हे तर पहिल्या तीन आश्रमांत त्याचें एकंदर वर्तन निर्दोष असलें, तर तो स्वर्गांत जाईल, पण त्याला पुनःपुन्हा मृत्युलोकांत यावें लागेल व चतुर्थाश्रम स्वीकारीपर्यंत त्याला ह्या जन्ममरणाच्या भोंवऱ्यांत पडावें लागतें ! पण दुसरा जो पक्ष आहे त्याचें म्हणणें असें आहे कीं, गृहस्थाला संन्यास घेण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. गृहस्थाश्रमीं असतांना त्यानें जनसेवा व स्वदेशसेवा केली तर त्याचें तारण संन्यासाश्रम न घेतां होईल, मात्र त्यानें धन प्रामाणिकपणें मिळविलेलें असलें पाहिजे, त्याचें मन उदार, अतिथींचें मनःपूर्वक आदरातिथ्य करणारा, पूर्वजांविषयीं प्रेमयुक्त आदर बाळगणारा, साधुसंतांविषयीं पूज्यबुद्धि असणारा व सर्व व्यवहारांत तो अत्यंत प्रामाणिक असला पाहिजे. भगवद्गीता, याज्ञवल्क्य, ह्यांचा हा पक्ष. याज्ञवल्क्य मनूपेक्षांही मोठा स्मृतिकार. आणि खरें पाहिलें तर हिंदुधर्मशास्त्राच्या घटनेस याज्ञवल्क्यांकडूनच स्फूर्ति प्राप्त झाली आहे. त्यांनीं स्वतः शेवटीं संन्यासाश्रम घेतला. परंतु त्यापूर्वी आपलें जें कांहीं होतें तें आपल्या दोन पत्नींमध्यें वांटून टाकलें. मनुष्य हा समाजप्रिय आहे व त्याच्यावर वैराग्य लादलें तर त्यायोगें सर्व समाजास कीड लागल्यावांचून राहणार नाहीं हें ते जाणून होते. आणि खरें पहातां त्यांची शिकवण

हिंदुधर्माचें अंतरंग स्पष्ट करीत आहे. ( His teaching constitutes the heart of Hinduism ) व्यवहारांत अशी म्हणच पडून गेली आहे कीं प्रत्येक हिंदु विवाह करण्यासाठीं जगतो. पण आमच्या जाति व रूढी ह्यांनीं विवाहाचें पावित्र्य व वैभव नष्ट करून आत्मदर्शनाच्या आड त्या येत आहेत. याज्ञवल्क्य मोठा दूरदर्शी होता. आमरण अविवाहित राहणें व वैराग्याचा जाहीर स्वीकार करणें ह्या गोष्टी समाज-कल्याणाच्या दृष्टीनें अत्यंत घातक आहेत हें तो उत्तम प्रकारें जाणत होता. आज फ्रान्स देशाच्या सामाजिक स्थितीकडे पाहिलें म्हणजे त्याच्या दूरदर्शित्वाची साक्ष पटते. त्यानें असा उपदेश केला आहे कीं, गृहस्थ व्हा व आपला संसार नीटनेटका करा. आणि ह्या त्याच्या उपदेशास अनुसरूनच नंतरच्या थोर पुरुषांनीं दंडक घालून ठेविला आहे कीं, ह्या कलियुगांत आजन्म अविवाहित राहणें किंवा संन्यास घेणें हे प्रयोग उपयोगाचे नाहींत.

ज्या विष्णुपुराणानें एमरसन्सारख्या अमेरिकन पंडितास मोहून टाकलें त्यांत परमेश्वरास गृहस्थाश्रमीच प्रिय होतो असें प्रतिपादिलें आहे. एवढेंच नव्हे, तर संन्या-साश्रमी माणसाची त्याच्यापुढें कांहींच योग्यता नाहीं, असलीच तर ती अगदींच अल्प आहे असें सांगितलें आहे. आणि भगवद्गीता तर कर्तव्यपराङ्मुख होणाऱ्यांस कर्तव्यनिष्ठ करण्यासाठींच रचिली गेली. देवाच्या, धर्माच्या नांवावर कर्तव्याला पाठ दाखविणाऱ्यास हा मार्ग चुकीचा आहे असें दाखविण्यासाठींच गीतेचा अवतार झाला हें सर्वश्रुत आहे. आणि समर्थ रामदासांनीं[1] तर संसार नीटनेटक्या रीतीनें, गृहस्थ ह्या नात्यानें करून परमार्थ विवंचना कर म्हणजे संसार व परमार्थ दोन्हीही साध्य होतील असा स्पष्ट उपदेश केला आहे. आणि तुकारामानेंही असाच[2] स्पष्ट उपदेश केला आहे.

---

१ आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थ विवेका ।
येथें आळस करूं नका । विवेकी हो ॥
प्रपंच सांडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल ।
प्रपंच करूनि चालवाल । तरी तुम्ही विवेकी ॥
प्रपंच सांडून परमार्थ केला । तरी अन्न मिळेना खायाला ।
मग ह्या करंट्याला । परमार्थ कैंचा ॥
संसारत्याग न करितां । प्रपंचउपाधि न सांडितां ।
जनामध्यें सार्थकता । विचारेंचि होय ॥

२ नको त्यजूं स्त्रिया पोर । बांधीं सोपे माड्या घर ।
आल्या अतिथा आदर । याहुनि धर्म कोणता ॥

सारांश, योग्य प्रकारें संसार करून, तो करीत असतांनाच, परमेश्वर साध्य करून घेणें, आत्मदर्शन घेणें, प्रत्येक व्यक्तिमात्राच्या अंतःकरणांत वसणारा जो परमेश्वर त्याचा साक्षात्कार करून घेणें, हें खरोखर प्रयेक हिंदूचें उच्च ध्येय आहे, त्याच्या धर्माचें हें रहस्य, हें अंतरंग आहे. परंतु वेदांत, अगर वैराग्य ह्याचा त्याच्या मनावर परिणाम पुष्कळ झालेला असतो. संसार असार, सर्व माया, सर्व व्यर्थ हें एकीकडे तोंडानें बोलून तो संसार करीत असतो, त्यामुळें धड हें नाहीं, धड तें नाहीं, असा त्याचा गोंधळ होऊन जातो. निरनिराळ्या रूढी, परस्पर विरोधी विचार ह्यांच्या भोवऱ्यांत तो सांपडतो! अशा स्थितींत हा सगळा गोंधळ बाजूस सारून त्याच्या अंतःकरणास पूर्वस्थिति प्राप्त झालेली जर आपणास दिसून येईल तर किती नामी होईल?

## मल्हारी महार

ब्रिटिश राज्याच्या स्थापनेच्या वेळीं, १८५७ च्या बंडाच्या वेळीं हिंदुस्थानांत हेन्री लॉरेन्स व जॉन लॉरेन्स ह्या नांवांचे दोन मोठे अधिकारी होते. त्यांपैकीं जॉन हा पुढें हिंदुस्थानचा व्हाइसराय झाला. त्यांचें परस्परांवर आत्यंतिक प्रेम होतें, पण दोघांचे दृष्टिकोण मात्र अगदींच भिन्न. मोठमोठ्या अधिकाऱ्यांची इभ्रत राखणें, त्यांचा मानमरातब योग्यप्रकारें ठेवणें, त्यांचा दरारा सर्वत्र राहील अशी योजना करणें इकडे हेन्रीचें सर्व लक्ष असे. जॉन हा अगदीं श्रद्धाळू ख्रिस्ती होता. लोकांची सुधारणा करावी, त्यांना सज्ञान करावें असें त्याला वाटत असे. तो म्हणत असे कीं, हिंदुस्थानांतला अगदीं नीच जातींतला अज्ञानी मनुष्य घेतला, एखादा कुली घेतला तरी तो आत्मा, परमात्मा, आत्म्याचें अमरत्व ह्याविषयीं अगदीं सहज असे विचार प्रदर्शित करितो कीं त्याच्यापुढें साक्रेटीस व प्लेटो ह्यांच्या काळचा एखादा अथेनिअन अगदीं फिक्का पडेल!

खालच्या वर्गांतील लोकांमध्यें जेव्हां आजहि आपण मिळून मिसळून वागूं लागतों, त्यांच्याशीं संभाषणाचे प्रसंग आले असतां त्यांस दूर न करतां त्यांच्याशीं एकजीव होऊन भाषण करूं लागतों त्यावेळीं वरील विधानाची सत्यता आपल्याला स्वानुभवानें पटते. मला तसे पुष्कळ अनुभव आले आहेत. हिंदुधर्माचें आच्छादित अंतरंग व्यक्त करून दाखववयास पुढील एक उदाहरण पुरेसें आहे.

---

**करी नामाचा गजर। जाणे संतांची कदर।**
**तुका म्हणे तोचि नर। ब्रम्हज्ञानी पुरता॥**

प्रार्थनासंगीत–पृ. ३०७.

लोणावळें येथें माझा मुक्काम असतांना अखिल हिंदुस्थानामध्यें मोठ्या धर्मनिष्ठ म्हणून ज्यांची ख्याति आहे अशा एका थोर बाईकडे त्यांना भेटण्यासाठीं मी गेलों होतों. ( ह्या बाई म्हणजे श्रीमती रमाबाई रानडे होत. रमाबाईंविषयीं सर नारायण ह्यांच्याठिकाणीं अत्यंत आदर वसत असे. ) त्यांच्या त्या गोड व शुद्ध भाषेंत त्या मजशीं एका विषयावर बोलत असतांना, त्या ठिकाणीं एक म्हातारा, आंधळा, घाणेरडे व तेही अपुरे कपडे घातलेला, व बायकोनें हात धरलेला असा आला व मोठ्यानें ओरडून म्हणाला " बाईसाहेब ! मल्हारीचा नमस्कार घ्या व त्याला कांहीं भिक्षा घाला. दोनचार दिवसांनीं मल्हारी दरवर्षाप्रमाणें पंढरीच्या यात्रेला जाणार आहे बाईसाहेब !" " हें बघ, मल्हारी, पंढरपूरला जाण्यापूर्वी एक दिवस आधीं ये पुन्हा, म्हणजे मी तुला पंढरपूरचें रेल्वेचें भाडें देईन बरें" " बाईसाहेब ! रेल्वेचें भाडें आणि ह्या मल्हारीला ! मला नको तें ! जोंपर्यंत माझ्या विठ्यानें दिलेले हे माझे दोन पाय धड आहेत, तोंपर्यंत तुमची आगीनगाडी मला नको ! ह्या माझ्या पायांनींच मी हळूहळू पंढरपुरास जाईन." " बरं, तसें कां होईना, पण जायला निघायच्या आधीं मला भेटून जा. काय द्यावयाचें तें मी त्यावेळीं देईन." इतकें त्यांचें भाषण झाल्यावर मल्हारी गेला व नंतर थोड्या वेळानें तो मला भेटला. तो चोखामेळा महार होता. त्यानें घरदार सोडलेलें होतें. प्रत्येक हिंदूच्या हाडामासांत शिरलेल्या वैराग्याच्या आणि वेदांताच्या सुरांत तो बोलूं लागला, "आपलें हें आयुष्य हा एक बंदिखाना आहे. त्यांत अडकलेले आपण बंदिवान आहोंत. पिंजऱ्यांत अडकलेला जसा पोपट ज्याप्रमाणें बाहेर जाण्यासाठीं धडपडत असतो तसेंच माणसाचें आहे. त्यानें जर संसाराचा तिरस्कार करून सन्मार्गानें आयुष्य कंठिलें असेल तर, मग शेवटीं देवाची व त्याची भेट व्हायची व तो देवाशीं एकरूप व्हावयाचा". साधारणपणें अर्धा तासपर्यंत त्याचें हें असें भाषण व मधुन मधुन पदें व अभंगगायन चाललें होतें. मग मीं त्याला विचारलें, "बाबा मल्हारी, आतां तूं सन्मार्गानें चालण्याविषयीं बोललास. मला तुझ्या स्वतः-विषयीं कांहीं माहिती सांगतोस काय ? तूं कोण आहेस, तुझी अशी स्थिती कां झाली आहे, तूं भिक्षा कां मागतोस ? तूं संसाराला तुरुंग म्हणतोस, पिंजरा म्हणतोस, संसाराचा तिरस्कार केला पाहिजे म्हणतोस तरी तूं स्वतः बायकोसह रहात आहेस आणि पोट भरण्यासाठीं दारोदार भिक्षा मागतोस हें कसें काय ?"

" महाराज, आपण तर माझ्या मर्मीच घाव घातला आहे ! काय उत्तर द्यावें तें साहेब मला कळत नाहीं. आपण धनी, मी एक गरीब महार. आपल्याशीं बोलण्याचें मीं कसें धैर्य करावें !" " हें पहा ! मला कांहीं तुझ्यावर टीका करावयाची नाहीं. खरंखरं असेल तें सांग" " बरें साहेब, ऐका तर मग माझ्या आयुष्याची

कहाणी. मी, साहेब, जन्माचाच कांहीं भिकारी नाहीं. माझ्या आईबापांनीं आम्हां तिघां भावांना मरते वेळीं जमीनजुमला ठेवला होता. हें जवळ खडकाळ गांव आहे, नव्हे का, तेथें ती आमची जमीन आहे. आम्हां तिघां भावांचीं लग्नें झालीं; आम्ही तिघे भाऊ व आमच्या बायका शेतांत काम करून आनंदांत होतों. माझ्या दोन भावांना मुलेंबाळें झालीं, त्यांचा संसार वाढला, मला मूल नव्हतें. पुढें कांहीं वर्षांनीं माझी दृष्टि अधू झाली, नंतर मी अगदींच आंधळा झालों. मला शेतावर काम करतां येईना, आणि माझ्या बायकोला पण माझ्यामुळें शेतावर जाणें अशक्य झालें. त्यामुळें घरांत धुसफूस सुरू झाली. माझे व बायकोचे हाल होऊं लागले. मग मला ह्या संसाराचा कंटाळा आला व वैतागून संन्यास घ्यावा असें वाटूं लागलें. पण बायको असतांना संन्यास कसा घ्यावयाचा ? म्हणून मी तुकारामाचें जें पवित्र जन्मस्थान देहू तेथें एकाद्या गुरूचा विचार घ्यावा म्हणून गेलों. एक गुरु भेटला. त्याला मीं म्हटलें कीं मला गुरुमंत्र द्या. तो म्हणाला "मल्हारी, तूं अज्ञानी आहेस; नाहीं तुला येत लिहितां कीं वाचतां, तेव्हां तुला रे बाबा, मी कसला मंत्र देणार ? मी सांगतों तसें कर. तुझें घर, जमिनी, भाऊबंद हीं सर्व दे सोडून, सगळं जग दे सोडून आणि हरिनामाचा गजर करीत राहा. वर्षांतून एकदां-तरी पंढरीस जा आणि भिक्षेवर रहा." "पण महाराज, माझी बायको आहे ना ? तिचें काय करूं ?" "जिकडे तूं जाशील तिकडे तुझ्या पाठोपाठ ती, जी तुझी गत ती तिची !" मला हा उपदेश पटला व मी जमीनजुमला, भाऊ व सर्व कुटुंब ह्यांना सोडून घराबाहेर पडलों. असा मी अर्धवट सन्यासी व अर्धवट संसारी आहें. रोज भीक मागावी व जें काय मिळेल त्यावर गुजराण करावी व कसातरी काळ लोटावा व घर चालवावें असें चाललें आहे आणि हें सर्व ह्या माझ्या भागूमुळें मला करावें लागत आहे" "बघा बघा, साहेब." मल्हारीची बायको भागू म्हणाली, "किती तोऱ्यामध्यें मला भागू म्हणून बोलत आहे ! माझी कांहींच किंमत नाहीं, मी ह्याला जड झालें आहें, आणि माझ्यामुळें ह्याला सन्यास घेतां येत नाहीं," "पहा महाराज, हिला किती राग आहे तो ? मी तिला तिच्या लाडक्या नांवानें भागू असें म्हणतों, पण दुसऱ्याशीं बोलतांना तिच्या भागिरथी ह्या सबंध नांवाचा मी उल्लेख करावा असें तिचें म्हणणें ! बायकांना प्रसन्न ठेवणें हें फार कठीण काम आहे साहेब ! पण माझ्या विठ्याला माझें माझ्या भागूवर किती प्रेम आहें तें माहीत आहे, आणि ह्या दुःखरूपी जगांत केवळ तिच्यासाठींच मी जगलों आहें हेंही त्याला ठाऊक आहे !"

"असें जर आहे, तर तुला मीं एक गोष्ट सांगतों. तूं म्हणतोस कीं, तुझ्या वडिलोपार्जित जमीन जुमल्यावर तुझा हक्क आहे, पण तुझे भाऊ तुझा भाग तुला

देत नाहींत, व आपणच सर्व उत्पन्न उपभोगीत आहेत. तर मग त्यांचेजवळ आपला भाग माग, जर त्यांनीं नाहीं म्हटलें तर वांटणीबद्दल त्यांच्यावर फिर्याद कर. मी तुला पैशाची मदत करीन." ही माझी सूचना त्याला पटली नाहीं. त्याचें तोंड गोरें मोरें झालें व तो म्हणाला, "महाराज ! हा मल्हारी अशानें मोहांत सांपडणारा नाहीं ! एकदां ज्या जमिनीवर व वाड्यावर लाथ मारून बाहेर पडलों, तें काय पुन्हां त्या जमिनीवर पाय ठेवून ह्या जगाच्या जंजाळांत पुन्हां अडकण्यासाठीं ? आणि तेंही एकदां विठ्याला माझें सर्वस्व वाहिल्यानंतर ? महाराज ! तुम्ही म्हणतां तसें करणें, म्हणजे संसाराचा त्याग केलेल्या ह्या मल्हारीनें नरकांत पडण्यासारखें आहे !" "हें पहा, मल्हारी, तूं उगीच आपल्या स्वतःला दूषण लावून घेत आहेस ! तूं सगळ्या जगाचा आणि संसाराचा त्याग केला आहेस असें कोण म्हणतो ? तुझी बायको आहे व तूं जिकडे जातोस तिकडे ती तुझ्याबरोबर येते व तूं तिच्यासाठीं व स्वतःसाठीं दारोदार हिंडून भीक मागतोस, तेव्हां तूं संसार सोडलास असें कसें म्हणतां येतें ?" "महाराज, हें कांहीं मला कळत नाहीं. मी आपला नीचांतला नीच असा एक महार आहें. आणि मला समाधानाचें इतकेंच स्थान आहे कीं, जेव्हां चोखोबाची पालखी निघते तेव्हां मला मोठ्या मानाची जागा मिळते. मला कुठें हें कळत आहे कीं, माझी बायको आहे, व नेहमीं माझ्याबरोबर असते, म्हणून माझा संसार सुटलेला नाहीं. व इतरांप्रमाणेंच माझी अवस्था आहे. मी आपला माझ्या गुरूनें सांगितलें त्याप्रमाणें चालत आहें. मग तुम्ही मला वाटेल तर संसारी म्हणा, सन्यासी म्हणा, माझा देव विठ्या व माझी बायको भागू ह्यांच्यासाठीं जगावयाचें एवढें मला माहीत आहे. ती तर माझी पार्वती आहे. मला ह्या दोघांनाही टाकावयाचें नाहीं. त्यांच्याच द्वारें माझें तारण होईल असा माझा विश्वास आहे. माझ्यासारख्या महाराला, किंवा दुसऱ्या कोणालाही ह्यापेक्षां आणखी अधिक तें काय हवें ?"

नंतर पुन्हां एकदां मला मल्हारी भेटला. तो त्यावेळीं अधिक दुबळा, पण पूर्वीचेच विचार, पूर्वीचाच कणखरपणा, ओबडधोबडपणा ! एक दिवस मी वाचनांत गर्क असतांना "हरि विठ्ठले" हा त्याचा ओळखीचा आवाज माझ्या कानीं पडला ! "महाराज, मल्हारी पुन्हां जिवंत परत आला आहे. त्यानें गेल्या कार्तिकीच्या वेळीं पंढरपुरासच देह ठेवण्याचे पुष्कळ प्रयत्न करून पाहिले. पण त्या चोर विठ्यानें, मला मरायला हवें होतें तरी दिलें येथें पाठवून !" "अरे मल्हारी ! काय हें ? ज्याला तूं देव मानतोस त्याच्याविषयीं असा अनादर ? त्याला तूं चोर म्हणावेंस ?" "अहो महाराज, त्या विठ्याला कां नये चोर म्हणूं ? तो आपण होऊन माझी सुटका करीत नाहीं, आणि मरून जाण्याचा माझा जो अधिकार तो माझ्या-

पासून हिरावून घेतो, तेव्हां त्याला मी चोर काय म्हणून म्हणूं नये ?" असें म्हणून पंढरपुरास जाण्यापूर्वी त्यांनीं कांहीं अभंग म्हटले, "महाराज, कदाचित् पुन्हां आपल्याला हा मल्हारी दिसणार नाहीं. माझी भागू ही माझी पार्वती आहे, तीच माझा सगळा संसार आहे. जर ह्या मल्हारीचें कांहीं बरेंवाईट झालें, तर ज्या भागूनें माझा सगळा संसार केला तिला सांभाळा!"

## कुटुंबवत्सल हरि

मल्हारी महरासंबंधानें मीं मागें लिहिलें आहे. त्याच्यासारखे लोक आपल्या स्वतःला संन्यासी अगर बैरागी असें समजून लोकांच्या औदार्यावर खुशाल चरत असतात! हे लोक आळशांचे राजे असतात व ह्यांची व्यवस्था कशी लावावयाची हा प्रश्न मोठ्या राजकारणधुरंधरांना देखील त्रास देत असतो. भीक मागणें हा एक धंदाच होऊन बसला असून, आमचे लोक धर्मबुद्धीनें त्याला उत्तेजन देत असतात. रोज कांहीं तरी दानधर्म करणें हें शास्त्रानुसार एक पवित्र कर्तव्य समजलें जातें व दाराशीं आलेल्या भिकाऱ्याला रिक्तहस्तें परत पाठविणें हें अधर्म्य होय असा लोकांचा विश्वास असतो. परंतु हा शास्त्रार्थ चुकीचा आहे. दान करावयाचें खरें, पण पात्रापात्रतेचा विचार करून करावें असें शास्त्राचें सांगणें आहे. जो दारापुढें येईल त्यास दान करावें असा शास्त्रवचनाचा अर्थ नाहीं. अगदीं साध्या रीतीनें रहातां यावें व ऐषआरामाकडे प्रवृत्ति होऊं नये म्हणून भिक्षेवर अवलंबून राहाणें हा ब्राह्मणांचा जन्मसिद्ध हक्कच होऊन बसला आहे. त्यांनीं प्रथम उदाहरण घालून दिलें आणि आतां कमीअधिक प्रमाणानें सर्व जाती त्याचें अनुकरण करीत आहेत. शिष्टांनीं अनुकरण करण्याचा हा मार्ग आहे, असें एक शास्त्रवचन आहे. ब्राह्मणांनीं एका विशिष्ट हेतूनें हा मार्ग पत्करला, पण इतरेजनांनीं निराळ्याच हेतूनें त्याचें अवलंबन केलें. परंतु मोठमोठ्या शहरीं रस्त्यांतून जागोजाग आपल्याला भिकाऱ्यांचे थवेच्या थवे दिसतात, म्हणून हिंदुधर्माच्या अंतरंगासंबंधानें आपण आपला गैरसमज करून घेणें हें उचित होणार नाहीं. शास्त्राचा आधार पाहिला काय, किंवा रूढाचार पाहिला तरी हिंदुमात्र हा गृहस्थाश्रमी असतो. आणि जे कोणी खेड्यापाड्यांत अगर तेथील झोंपडींत राहाणाऱ्या लोकांच्या रीतिभाति, विचार आचार, हें जाणत असतील त्यांस आपण गृहस्थ आहोंत याचा त्या खेड्यांतील लोकांना अभिमान असतो हें सांगणें नलगे. मोठमोठ्या शहरांत, बाजारहाटाच्या ठिकाणीं जो बेगुमानपणा दिसतो त्याच्यावरून ह्या विषयाचा नीट बोध होत नाहीं. खेड्यापाड्यांतून हिंडत असतांना किती वेळां तरी तेथील लोकांच्या कुटुंबवत्सलपणाचा, व आपल्या हिंदुधर्माचें अंतरंग खेड्याखेड्यांतील झोंपड्यांत कसें वसत आहे त्याचा

प्रत्यक्ष अनुभव आलेला आहे. एकच उदाहरण येथें देतों, आणि तेंहि विशेषतः अशासाठीं कीं त्याच्याद्वारें नम्रपणाचा धडा मला चांगलाच मिळाला आहे!

एके दिवशीं सकाळीं मी एका खेड्यांतून हिंडत असतांना कांहीं पुरुष, स्त्रिया व मुलें एके ठिकाणीं दिसलीं. ते सर्व मराठे होते. एका मोठ्या व दूरच्या शहरांतून आपल्या गांवाकडे बैलाच्या गाड्यांतून शेतीभाती करण्यासाठीं ही मंडळी चालली होती. विश्रांति घेण्यासाठीं त्यांनीं तेथें आपल्या गाड्या सोडल्या. अशावेळीं नेहमीं जो अनुभव येतो तो ह्यावेळींही आला! मुलें रडत होतीं, बायका आवराआवर करीत होत्या व पुरुष अपापसांत भांडत होते! मी जवळच उभा होतों तेव्हां एक मूल फारच कळवळून रडत होतें, कांहीं तरी खावयास त्याला हवें होतें. त्याच्या त्या किंचाळण्यानें त्याच्या आईला कांहीं सुचेनासें होऊन ती ओरडली; "मेल्या कारट्या, आतां गप्प बसतोस कीं नाहीं? ह्या जंगलांत तुला मी खायला रे काय देणार?" मला त्या मुलाची दया आली. मी बाईला म्हणालों, "बाई, तो पहा जवळच एक आंबेवाला बसला आहे, त्याच्याजवळून थोडे आंबे घेऊन त्याला द्या कीं! हे घ्या कांहीं पैसे!" मला वाटलें होतें कीं बाई मोठ्या उत्सुकतेनें पैसे घेईल! पण त्या बाईनें आपल्या मुलावरचा राग माझ्यावरच काढला! "आलाय मोठा बाजीराव पैसे द्यायला! तुला काय वाटतें कीं आम्ही काय रस्त्यावरचे भिकारी बिकारी आहोंत. तर तूं आमच्यापुढें मोठा आपल्या पैशाचा दिमाख दाखवितोस. ठेव ते पैसे आपल्यापाशीं! आमचे हात पाय आहेत धड, आणि आमी बी तुझ्यासारखे काम करून पैसे मिळवूं शकतों!" मी पैसे परत खिशांत ठेवून तिची समजूत घालूं लागलों. पण ती मला बोलूंच देईना, उलट वर म्हणाली, 'तूं जर मोठा बाजीराव असलास तर आपल्या घरचा. ठेव ते पैसे आपल्यापाशीं. आम्ही गरीब आहोंत म्हणून आमचा असा अपमान करूं नकोस;" ही सगळी गडबड पाहून त्या बाईचा नवरा जो जवळच उभा होता तो तेथें आला, त्याला मीं सर्व हकीकत सांगितल्यावर तो म्हणाला, "साहेब, माझी घरधनीण जें म्हणते तें बरोबर आहे. आम्ही मजूरी करून गुजारा करणारीं माणसें आहोंत. आम्ही गरीब आहोंत व श्रम करून जें कांहीं मिळतें त्यावर आम्ही राहतों. लोकांकडून पैसाअडका घेऊन त्यावर राहणें हें आम्ही अपमानकारक समजतों." आपल्या देशांत जे लाखों भिकारी रस्त्यांतून भटकत असतात, त्यांच्यापेक्षां वरीलप्रमाणें गरीबीच्या स्थितींत स्वाभिमानपूर्वक राहाणारे लोक किती तरी असले पाहिजेत. पहिल्या वर्गांतील लोक हिंदु लोकांच्या औदार्याचा किती दुरुपयोग होत आहे त्याची साक्ष पटवितात. दुसरीं उदाहरणें कौटुंबिक जीवनाचें व हिंदुधर्माचें श्रेष्ठत्व दर्शवितात.

कौटुंबिक जीवनाचें वैभव अगर श्रेष्ठत्व माझा मित्र हरि याच्या उदाहरणा-

वरून दिसून येतें. एके दिवशीं खेड्यांच्या बाजूनें हिंडत असतांना त्याची गांठ पडली. दोन अनोळखी शेतकरी रस्त्यानें चालले होते. एकाच्या हातांत एक पिंगट रंगाचें लुगडें होतें. लुगडें हातांत असणारा माणूस बोलत होता व दुसरा ऐकत होता, आणि त्याचें बोलणें ऐकूं येण्याइतक्या अंतरावरून मीं चालत होतों. आपली मजूरी वाढली आहे, पण त्याचप्रमाणें वस्तूंच्या किंमतीही वाढल्या आहेत, हा बोलण्याचा विषय होता. "मजुरी वाढली आहे, तशीच महागाईही मस्त झाली आहे. सगळी देवाची लीला आहे झालें, नव्हे का हरि?" हरीच्या हातांत लुगडें होतें. त्याच्या उत्तराची वाट न पहातां तो पुढें म्हणतो "हें बघ, ह्या सरकारच्या राज्यांत जिकडे तिकडे शांतता आहे. काम करावें, आणि चोर-चिलटाचें कांहीं भय नाहीं. आणि इतकें असून तूं कांहींही म्हण पैशाची किंमत कमी होत चालली आहे. माझ्या बाच्यावेळीं जी वस्तु एक रुपयाला मिळत असे ती आतां पांच रुपयाला नाहीं मिळत! हा देखील देवाचाच खेळ! हरिबा! तुला काय वाटतें?" बिचारा हरिबा, त्याला नाण्यांचा सुकाळ व महागाई ह्यांचा संबंध काय कळणार? पण हरि अगदीं गप्प आहे हें त्या दुसऱ्याच्या ध्यानांत आलें. "हरि, तुला आज काय झालें आहे? तूं अगदीं गप्प गप्प आणि असा उदास कां?" हरि शांतता भग्न करून एकदांचा बोलला! "अरे बाबा, ही साडी, हिनें मला बेचैन केलें आहे.!" "साडीनें? तें कसें काय बुवा?" "अरे, ही मीं साडी घेतली आहे ना, ती आहे जरा हलकी! तेव्हां ती माझ्या घरधनिणीला आवडेल कीं नाहीं याची चिंता मला पडली आहे." "अरे, ह्यांत मनाला लावून घेण्यासारखें काय आहे? आपण जें देऊं तें बायकांनीं घेतलें पाहिजे! नेसायला एक लुगडें मिळत आहे कीं नाहीं? अगदींच वेडा आहेस तूं! बायको ती काय, तिला घेतलेलें एक लुगडें तें काय आणि ही गोष्ट तूं आपल्या मनाला इतकी लावून घेतोस, काय म्हणावें तुला!" हें गणूचें तत्त्वज्ञान, पण कौटुंबिक जीवनासंबंधानें हरीची कल्पना उच्चतर होती. "गणू! तूं आतां इथें हें असें बोलत आहेस, पण आपल्या घरधनिणीच्या रागाला तूं किती भीत असतोस हें जसें कांहीं मला अगदीं माहीतच नाहीं! एक दिवस घरीं बायकोनें जेवायला न घालूं दे, म्हणजे घरांत बायको असून तिला नाखुष ठेवल्याचा काय परिणाम होतो तें कळेल!"

मी जर थोडी घाई करूनच मध्यें पडलों नसतों, तर त्या दोघांचें भाषण आणखी चाललें असतें व त्यांचें कौटुंबिक जीवनविषयक तत्त्वज्ञान मला अधिक ऐकावयास मिळालें असतें. परंतु हरीचें तें वाक्य ऐकून मला एकदम मध्यें पडावेंसें वाटलें व मी हरीबाला ओळखत आहें अशा भावनेनें म्हणालों, "शाबास हरीबा! पण तूं आपल्या बायकोसाठीं ती साडी घेतलीस तिच्याबद्दल तुला

एवढें वाईट कां वाटत आहे ? आणि ती तिला आवडणार नाहीं असें तुला कां वाटतें?" "साहेब, तें असें आहे, मी लगिनकार्याला, नाहींतर जातींतल्या दुसऱ्या कांहीं कार्याला जातों, तेव्हां सगळ्यांत चांगला पोशाक करून जातों कीं नाहीं ? मग माझ्या बायकोला अशावेळीं तसें कां वाटूं नये बरें ?" "पण, हरिबा, आतांच गणबानें सांगितलें ना, बायकांनीं काय, नवरे जे देतील तें घेतलें पाहिजे. आणि तुम्ही देखील नाहीं का मघांशीं दाखविलेंत कीं बायकोनें नवऱ्यासाठीं स्वयंपाक करावा आणि नवऱ्याची चाकरी करावी म्हणजे झालें! मग ती ह्या तिच्यासाठीं विकत घेतलेल्या साडीबद्दल काय म्हणेल याची एवढी तुला परवा काय म्हणून असावी ?" "साहेब, आपल्यांत एक म्हण आहे ना कीं, बायको करते संसार ? नाहीं बायको, नाहीं घर, नाहीं स्वर्ग![1]" "अरे भल्या माणसा, तूं हा इतका शहाणपणा शिकलास तरी कोठें ?" "महाराज ! शेतकरी कुठें हो शिकायला जाणार? आपल्या बापदाद्यापासून शिकलों आणि दुसऱ्या कोणापासून असणार ?" अशाप्रकारें आपल्या आढमुठी रीतीनें त्यानें जें सांगितलें तें मला महत्त्वाचें वाटलें. मग मीं त्याला म्हटलें, "हें पहा हरिबा ! तुम्हांला तुमच्या बायकोची किंमत कळत आहे आणि माझी खातरी आहे कीं तीही एक समजुतदार बाई असली पाहिजे. म्हणूनच तुम्ही तिच्या संबंधानें एवढें आदरानें बोलतां. पण, मला असें सांगा कीं तुमच्यामध्यें असे किती लोक आहेत कीं जे नेहमीं आपल्या बायकांना संतुष्ट ठेवण्याचा प्रयत्न करितात ? आणि बायकांना वाईट रीतीनें वागविणारे तुमच्यांत पुष्कळसे नाहींत का ?" "बायकांना वाईटरीतीनें वागविणारे ? असतील कांहीं थोडे तसे ! पण आम्हां कुणब्यांना आमच्या बायकांची किंमत चांगली कळते. बायको नवऱ्याच्या बरोबरीनें काम करिते. आणि नवऱ्यानें तिला मारलें, तर तिच्यावांचून त्याचें कांहीं चालावयाचें नाहीं, हें तो जाणून असतो. व मारण्यानें भलतेंच ती करील ह्याची त्याला भीति असते ! आणि हें पहा, साहेब, नवरे जर बायकांना मारूं लागले, तर उलट त्या त्यांना मारणार नाहींत, पण त्यांना बेजार कसें करावयाचें हें त्यांना चांगलें माहीत असतें !" "हां, आतां समजलों ! हलकी साडी आणल्याबद्दल असा कांहीं तरी प्रकार होईल असें तुला वाटत आहे म्हणून तूं इतका उदास दिसतो आहेस ! प्रेम नव्हे तुला भय वाटत आहे." "साहेब, ह्याला तुम्ही

---

१. १९१६ सालीं सर नारायण ह्यांच्याशीं भाषण करितांना डॉ. भांडारकर ह्यांनीं पुढील उद्गार काढिले होते. "आपलें आपल्या कुटुंबावर जें शुद्ध व सात्त्विक प्रेम असतें, व तिचेंही आपल्यावर जें प्रेम असतें, तिची जी भक्ति असते, त्याच्या योगें आपल्याला देवाच्या प्रेमाची ओळख पटते."

प्रेम म्हणा नाहीं तर भय म्हणा—आम्हांला शेतकऱ्यांना त्यांत काय कळत आहे? आम्हांला आमच्या बापदाद्यांनीं इतकें सांगितलें आहे कीं आपला संसार आपली बायको करते आणि तिला संतुष्ट ठेवणें हें आपलें कर्तव्य आहे." "हरिबा! तुम्हांला मुलेंबाळें आहेत काहो?" "देवाच्या दयेनें आहेत साहेब." "मग हें बघ ह्या साडीमुळें तुला जी काळजी वाटते आहे ती दूर करणारी तुला मी एक युक्ति सांगतों. हें पहा साडी थोडी हलकी आहे म्हणून तुझी बायको जर कुरकूर करूं लागली तर तिला सांग कीं ही साडी घेऊन जे पैसे वांचले ते तिच्यासाठीं व मुलांसाठीं वांचविले आहेत!" "साहेब, तुमची युगत लय चांगली आहे बघा! बायको आणि मुलांसाठीं पैसे वांचविण्याची ही कल्पना माझ्या मद्र डोक्याला मुळींच सुचली नसती. ह्यापेक्षां दिलेल्या किंमतींत दुसरी हिच्यापेक्षां चांगली साडी मिळत नव्हती एवढें मात्र खरें!"

## पुरुषाचें जें हित तेंच स्त्रीचें

आमच्यामध्यें कांहीं असे पट्टीचे स्वदेशाभिमानी लोक आहेत कीं ज्यांचा पाश्चिमात्य म्हणून जें कांहीं आहे त्या सर्वांविषयींचा दुराग्रह इतका तीव्र असतो कीं, जें जें कांहीं तिकडे झालें आहे, जे शोध लागले आहेत, मग तो डार्विनचा उत्क्रांतिवाद अगर विकासवाद असो, किंवा वाफेचा शोध, आगगाड्या, तारायंत्र अगर वीज, मोटार, एरोप्लेन किंवा एडिसनचा एखादा शोध असो हे सर्व आमच्या पूर्वजांना ज्ञात होते, युरोप व अमेरिका ह्यांसारख्या खंडांपासून आम्हांला कांहींही शिकण्यासारखें नाहीं! असें ते बेलाशक प्रतिपादितात. थोड्याच दिवसांपूर्वी[1] अशा एका अंध देशभक्ताचें पुण्यास व्याख्यान झालें त्यावेळीं त्यानें चक्क सांगितलें कीं अलीकडल्या युरोपिअन लोकांना केमिस्ट्री व फिझिऑलॉजीसंबंधानें जी कांहीं माहिती आहे त्यापेक्षां अधिक माहिती आमच्या पूर्वजांना ह्या विषयांसंबंधानें होती. आणि आजकालचे इंग्रजी वैद्यशास्त्र हें आमच्या पूर्वजांना जें वैद्यशास्त्र माहीत होतें त्याच्यापुढें पोरखेळासमान आहे—अशाप्रकारें भरमसाट् विधान करण्याच्या बाबतींत प. वा. न्या. मू. तेलंग एक मोठें मनोरंजक उदाहरण सांगत असत. पूर्वी एका संस्थानांत न्यायदानाचें काम करणारे व नंतर ती नोकरी सोडून मुंबईत वकिली करणारे हे गृहस्थ एकदां म्हणाले कीं, रामायणांतील प्रत्येक प्रसंग जसा घडला तसा लिहिलेला आहे, म्हणजे तो इतिहास आहे असा माझा पूर्ण विश्वास आहे! अशा प्रकारचा चिकित्सक बुद्धीचा अभाव हा नेहमीं प्रगतीच्या आड येत असतो. आम्हीं आपल्या पूर्व इतिहासासंबंधानें विचारपूर्वक चिकित्सा केल्यानें

१. हे लेख १९१२ मध्यें प्रसिद्ध झाले होते हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

कांहींही नुकसान न होतां आमचा लाभच होणें शक्य आहे. आपल्या देशांत पुरातनकाळीं अमुक गोष्टी नव्हत्या असें स्पष्ट म्हटल्यानें शास्त्र, साहित्य, धर्म ह्यांस कोणत्याही प्रकारें कमीपणा येत नाहीं. ज्याच्याविषयीं आपल्याला अभिमान व आदर वाटावा असें आमच्या पुरातन इतिहासांत पुष्कळ आहे. पण तें काय तें शहाणपणानें विचारपूर्वक ठरविलें पाहिजे.

अशी आदर वाटण्यासारखी गोष्ट म्हणजे स्त्रियांसंबंधानें तेथें आढळणारें उच्च ध्येय ही होय. स्त्रीचें हित तेंच पुरुषाचें हित ( Woman's cause is man's ) असें टेनिसननें आपल्या काव्यांत म्हटलें असून विद्यार्थिवर्गात आज तें सर्वतोमुखीं आहे. पण हिंदुधर्माच्या अंतरंगानें ह्यापेक्षां अधिक उच्च ध्येय आपल्यापुढें ठेविलें आहे. Man's cause is woman's पुरुषाचें ज्यांत हित आहे त्यांतच स्त्रीचेंही आहे. मल्हारी महार व गृहस्थ हरि ह्यांच्या जीवनाचे जे दोन आदर्श मीं मागील लेखांत वाचकांपुढें ठेविले आहेत त्यांच्यावरून हें स्पष्ट होण्यासारखें आहे कीं, अगदीं अशिक्षित किंवा अगदीं नीच मानिलेल्या वर्गातील मनुष्य घेतला तरी त्याच्या हें लक्षांत येऊन चुकलेलें असतें कीं, स्त्री ही संसाराची देवता आहे, ती त्याचा संसार घडविते किंवा बिघडविते. हा विश्वास पुरातनकाळापासून जरी चालत आला आहे,. तरी अनेक शतकांनंतर त्यास आतां भलतेंच स्वरूप प्राप्त झालें आहे. माता ही सर्वांत श्रेष्ठ गुरु आहे असें एक पुरातन वचन [1]आहे. पुरुष हा धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्यासाठीं संसार करितो. आणि त्या सर्वांचा लाभ व्हावयास विशेष रीतीनें स्त्री कारण होते असेंही वचन आहे. आणि आजही यांतलें मर्म हिंदूच्या हाडींमांसीं भिनलें आहे म्हणूनच माझा मित्र हरी ह्यांनीं म्हटलें कीं, जर बायको नाहीं, तर घर नाहीं आणि स्वर्गही नाहीं ! म्हणजे टेनिसनची अलीकडच्या काळांतील कल्पना अनेक शतकांपूर्वीं अधिक चांगल्या रीतीनें हिंदुधर्मानें आत्मसात् केल्याचें आढळून येतें.

संसाराच्या द्वारेंच आत्मदर्शनाचा, परमेश्वरदर्शनाचा, लाभ होतो असा सिद्धान्त स्थापित केल्यानंतर मनुष्यानें हा लाभ होण्यासाठीं संसारिक जीवन कोणत्या प्रकारें व्यतीत करावें ह्याचा खुलासा साधूंनीं पुढें केला आहे. गृहस्थाला प्रथम घर असलें पाहिजे. पण घर म्हणजे काय? चुनाविटांनीं बांधलेलें व चार भिंतींनीं वेष्टित असें रहाण्याचें ठिकाण काय? अपरार्क मुनींनीं ह्याचा चांगला खुलासा केला आहे कीं, घर म्हणजे पत्नी. तिच्यावांचून रहाण्याचें घर व्यर्थ, म्हणून तिला गृहिणी असें म्हणतात. ती जर गृहिणी, तर तिच्यावांचून ज्याला गृह असें म्हणतात

---

१. माताहि परमो गुरूः

तें व्यर्थ हें ओघानें आलेंच! आत्मा विहीनच तें! म्हणून गृहस्थाच्या कामाला व्यर्थ! हा भाव ध्यानांत घेतला म्हणजे पत्नी हेंच खरें गृह आणि तिच्यावांचून गृह व्यर्थ ह्या अर्थाच्या संस्कृत म्हणीचा अर्थबोध त्वरीत होतो.

स्त्रीसंबंधानें अशी कल्पना ऋषिमुनींची असल्यामुळेंच स्त्री ही जन्मतः शुद्ध व पवित्र असते असें म्हटलें आहे. आपल्या हिंदुधर्मशास्त्राचें आद्यप्रवर्तक श्री. याज्ञवल्क्य ह्यांनीं मेधया वैयोशितो ह्यातदा असें जें वचन लिहून ठेविलें आहे त्याचें रहस्य हेंच आहे. सीता, दमयंती, सावित्री व पुराणांत वर्णिलेल्या दुसऱ्या अनेक स्त्रिया अत्यंत पवित्र व आदरणीय म्हणून त्यांचीं नांवें सर्वतोमुखीं आहेत. पण मला असें वाटतें कीं, हिंदुधर्माचें अगदीं अंतरंग व त्यास संमत अशी स्त्रियांची खरी योग्यता ह्याविषयीं आपल्याला खरी कल्पना करून घ्यावयाची असेल तर आपल्याला रामायण व महाभारत ह्यांच्या पूर्वकालाकडे दृष्टि फेंकली पाहिजे.

हिंदुधर्माच्या अंतरंगाचा विचार करितां उपनिषदांमध्यें वर्णिलेलीं दोन चित्रें दृष्टीपुढें उभीं राहातात. एक तरुण नचिकेताचें व दुसरें उमा हिचें. पहिलें चित्र आदर्श तरुणाचें असून दुसरें आदर्श स्त्रीचें. थोडक्यांत नचिकेताची गोष्ट अशी आहे. नचिकेताच्या तीर्थरूपानें एक धर्मकार्य केलें व उपाध्यायास दक्षिणा म्हणून आपलें जें कांहीं होतें तें सर्व दिलें. त्यांतच कांहीं गाईही होत्या. पण त्या गाई रोडक्या, म्हाताऱ्या व भाकड झालेल्या अशा होत्या. आपल्या वडिलांनीं ब्राम्हणाला अशा गाई देणें हें नचिकेताला आवडलें नाहीं. 'अशा निरुपयोगी झालेल्या गाई तुम्ही ब्राम्हणांना कां बरें दिल्या' असें तिनदां त्यानें तीर्थरूपांना विचारिलें व त्याच्या प्रश्नांना कांहींही उत्तर मिळालें नाहीं. म्हणून त्यानें बापाला विचारिलें "बाबा, माझ्यावांचून ब्राह्मणाला तुम्ही सर्व कांहीं देऊन टाकलें. मग आतां मला कोणाला देणार आहां?" हा उद्धट प्रश्न ऐकून बापाला राग आला व त्या रागाच्या भरांतच तो म्हणाला "मृत्यूचा राजा जो यम त्याला मी तुला अर्पण करितों. म्हणून मर तूं आतां." नचिकेतानें हें ऐकलें व तो तडक उठून यमराजाकडे गेला! यमराजानें प्रथम सर्व हकीकत ऐकून घेतली. ती ऐकून नचिकेताचा आज्ञाधारकपणा, व बापाच्या धर्मकार्यासाठीं यमाकडे जाण्याची सिद्धता पाहून यमराज प्रसन्न झाला व म्हणाला "वत्सा, मी तुजवर प्रसन्न झालों आहें. मी तुला तीन वर दिले आहेत. त्या तीन वरांच्या द्वारें तुला जें कांहीं हवें आहे तें माग!" नचिकेतानें पहिल्या वरानें आपल्या वडिलांचा जो राग झाला आहे तो जावा असें मागितलें. दुसऱ्यानें दिव्यदृष्टि मागितली; तिसऱ्या वराच्यावेळीं तो म्हणाला "महाराज, मनुष्य मेल्यानंतर त्याचें काय होतें

हें मला कळावयास हवें. त्याचा अमर आत्मा कोठें जातो आणि त्याचें पुढें काय होतें? महाराज, मला हें शिकवा, असें तिसऱ्या वराबद्दल मी मागतों. " यम म्हणाला, "बाबा, आजपर्यंत पुष्कळ देवादिकांनीं हा प्रश्न विचारला व त्याचें उत्तर समजणें कठीण म्हणून तो तसाच सोडून दिला. तेव्हां तूं देखील ह्या प्रश्नाचें उत्तर मिळावें असा हट्ट न धरलेला बरा!" पण नचिकेत ऐकेना. यमानें त्याला धन-दौलत, राज्यें, सर्व सुखोपभोग वगैरे देण्याचें आश्वासन दिलें व हा एवढा प्रश्न मागें घे असें सुचविलें; पण नचिकेत म्हणाला, "महाराज आपण जें सर्व द्यावयाचें म्हणतां तें सर्व नाशवंत आहे, क्षणिक आहे, तें मला नको. मला आत्म्याचें भवितव्य कळावयास हवें आहे." अखेरीस बिचाऱ्या यमाला त्या निग्रही नचिकेताची विनंति मान्य करावी लागली.

तुम्ही आम्ही सर्व हिंदु लहानमोठे नचिकेतच आहों! आम्हां सर्वांना आत्म्याचें पुढें काय होत असावें हें कळण्याची मोठी जिज्ञासा असते. मात्र वृद्ध, मध्यम वयाचे किंवा तरुण आम्ही असे असलों तरी नचिकेताचा निग्रह, निर्धार व निष्ठा आमच्यामध्यें नसते एवढेंच! जर एखादा कोणी परलोकची सर्व व्यवस्था सांगूं लागला, तर आमच्यापैकीं दहांतले नऊ आपलें पुढें काय होतें तें कळण्या-साठीं त्याच्यामागें लागतील! दृश्यापेक्षां जें अदृश्य त्याच्याकडेच आमचा सर्व ओढा असतो. आम्हांला परलोकाचीं स्वप्नें पडतात, तिकडे आमचें लक्ष असतें व हेंही नाहीं व तेंही नाहीं अशी आमची गत होते. दिव्यदृष्टि ही प्रत्येकास प्राप्त झालेली असते. तिचा योग्य उपयोग केला तर ती आपल्या उन्नतीस पोषक होते. परंतु कल्पनेच्या खेळांतच आपण दंग झालों व कल्पनेच्या भराऱ्या हीच वास्तव स्थिति अशी कल्पना करून घेतली तर त्यायोगें हानि व्हावयाचीच. सारांश, सर्वांना, पुढें काय होईल तें कळण्याची जिज्ञासा असते. कधींकाळीं ख्रिस्ती धर्माच्या उपदेशकाचें परलोकासंबंधानें व्याख्यान असलें तर मिशनरींची हेटाळणी करणारे विद्यार्थिही तें ऐकतील; कारण पुढें काय होतें हें कळावें अशी जिज्ञासा त्यांना असते; मग एका कानानें ऐकलेलें ते दुसऱ्या कानानें सोडून देतील, हा प्रकार निराळा. आम्ही पुरुष जर कमीअधिक प्रमाणानें त्या नचिकेताच्या दुबळ्या प्रतिकृति, तर उपनिषदांतील उमेच्या पावलावर पाऊल टाकणाऱ्या आमच्या स्त्रिया आहेत असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. नचिकेताचें आम्हां पुरुषांमध्यें जितकें तेज आहे त्यापेक्षां स्त्रियांत उमेचें अधिक आहे एवढें खरें! थोडक्यांत उमेची हकीकत सांगावयाची तर ती अशी आहे. दैत्यांचा पाडाव केल्यामुळें देवांना गर्व झाला. आपल्या स्वतःच्या सामर्थ्याच्या जोरावर आपल्याला यश प्राप्त झालें असें त्यांना वाटूं लागलें. परमेश्वराकडून सामर्थ्यप्राप्ति झाली हा

विचार कांहीं त्यांना पटला नाहीं. म्हणून त्यांचें गर्वहरण करण्यासाठीं परमेश्वरानें उमेला पाठविलें व तिनें त्यांना त्यांचें सामर्थ्य किती अल्प आहे, परमेश्वर परमात्म्याच्या प्रेरणेवांचून सर्व व्यर्थ कसें आहे, सर्व सामर्थ्याचा उगम तो कसा आहे हें दाखवून त्यांचा गर्व नाहींसा करून त्यांच्या ठिकाणीं तिनें नम्रता उत्पन्न केली. ह्या गोष्टीचें मुख्य तात्पर्य हें आहे कीं, स्त्री मग ती आई असो, पत्नी असो, बहीण असो अगर मैत्रीण असो, पुरुषाला मार्गावर आणणारी, त्याचा पशुभाव नष्ट करणारी, त्याला योग्यवेळीं खरा मार्ग दाखविणारी देवता आहे.

## कौटुंबिक जीवन.

पुष्कळ वेळां कौटुंबिक जीवनामध्यें स्त्रीसंबंधानें जर असा अनुभव आला नाहीं तर तो दोष कोणाचा असतो ? आम्ही आमच्या स्त्रियांना निर्दयतेनें वागविलें आहे. ( ह्याच्या पुढील भाग २३६–३८ पृष्ठावर घेतला आहे. )

## आचार

आपल्या हिंदुसमाजापुढें वारंवार एक प्रश्न येतो, तो असा कीं, आपले सुशिक्षित तरुण अल्पायुषी कां होतात ?[१] पुष्कळ डॉक्टर व इतर लोकांनीं ह्या प्रश्नाचें उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. कोणाला असें वाटतें कीं, आमच्या तरुणांना एकंदरींत हल्लीं श्रम फार पडतात, म्हणून ते अल्पायुषी होतात. पण अधिक काम केल्यानें मनुष्य सहसा मरत नाहीं, हें असें उत्तर देणारे विसरतात ! हक्सलीनें ह्यासंबंधांत असें म्हटलें आहे कीं, "तरुण अल्पायुषी होण्याचें खरें कारण त्यांना करावें लागत असलेलें काम हें नसून खाने, रात्रींचीं जागरणें आणि एकंदर समाजांत नाचतमाशे चालतात ते होत." दुसरे असे म्हणतात कीं, अलीकडल्या काळांतील चिंता, कामाचा ताण, अत्यंत कष्ट ह्यांमुळें तरुण अल्पायुषी होतात. जणूं आपल्या पूर्वजांना कधीं चिंता वहाव्या लागत नसत, त्यांच्यावर कार्याचा बोजा पडत नसे व त्याचा ताण त्यांच्यावर बसतच नसे ! हीं कारणेंही सयुक्तिक दिसत नाहींत. मिताक्षराचा कर्ता विज्ञानेश्वर हा तर म्हणतो कीं, वयाच्या ७० व्या वर्षाच्यापूर्वी वार्धक्याला मुळीं प्रारंभच होत नाहीं, आणि जर एखादा शूद्र ८० वर्षें जगला, तर सर्व जातीच्या लोकांनीं त्याचेविषयीं आदर दाखविला पाहिजे. ह्यावरून आपल्या

---

१ आधुनिक काळीं डॉ. रामकृष्णपंत भांडारकर ह्यांनीं व्हाइस चॅन्सलर असतांना केलेल्या भाषणांत ह्या प्रश्नाचा उल्लेख केला. न्या. मू. रानडे ह्यांनीं याच विषयावर आपले विचार प्रदर्शित केले. आपले तरुण अल्पायुषी कां होतात ह्याचीं थोडीं निराळीं कारणें न्या. मू. रानडे ह्यांनीं दर्शविलीं आहेत.

देशांत केव्हां वार्धक्य सुरू होत असे त्याची आपल्याला स्पष्ट कल्पना होते. आणि मग आम्ही आपल्या अविचारास व बेताल जीवनास दोष न देतां हिंदुस्थानच्या हवेच्या नांवानें खडे फोडीत असतों ! हवेसाठीं व प्रकृतीच्या आरामासाठीं निरनिराळे देश भटकतों व आपली मूर्खांत गणना करून घेतों !'

आमचा हिंदुधर्म हा दैववादी आहे असें पुष्कळांचें म्हणणें आहे आणि सभोंवार दृष्टी फेंकली म्हणजे तें बहुतांशानें खरें आहे असें म्हणावें लागतें. तथापि हिंदु-धर्मशास्त्राचे एक प्रणेते याज्ञवल्क्य ह्यांना हा दैववाद बिलकूल मान्य नव्हता. त्यांच्यामतें संसारांत दैवावर अवलंबून वागणें हें अगदीं गैर होय. तो म्हणतो कीं, मागील जन्मीं केलेल्या कर्मांचीं फळें जर मनुष्य ह्या जन्मीं भोगूं शकतो, तर ह्या जन्मीं केलेल्या कर्मांचीं फळेंही तो येथें भोगतच असला पाहिजे. ह्या आयुष्यांत मागल्या जन्मीं केलेल्या कर्मांचीं फळें भोगणें म्हणजे मागें आपण जें कांहीं स्वतः केलें त्याचे परिणाम भोगणें असेंच नव्हे काय ?[१] मनुष्याच्या ठिकाणीं जें पौरुषत्व आहे, तेंच त्यास धाडसाचीं कार्यें करण्यास प्रोत्साहन देत असतें. मिताक्षराचा टीकाकार विज्ञानेश्वर ह्यानें असें सुचविलें आहे कीं, आपण आपल्या नित्याच्या व्यवहाराकडे पहा, म्हणजे पुष्कळसे परिणाम आपल्या स्वतःच्या प्रयत्नांवर अवलंबून असतात असें दिसून येईल. असें जर नसतें, आणि दैवावरच सर्व कांहीं अवलंबून असतें, तर मग आपलें वैद्यशास्त्र अगदीं निरुपयोगी ठरलें असतें !

हेंच तत्त्व दृष्टीपुढें ठेवून दीर्घायुष्यासंबंधानें हिंदुधर्माची नाडी काय दर्शविते तें आपण पाहूंया. हेन्री वार्ड बीचर ह्यानें असें म्हटलें आहे असें म्हणतात कीं, कोणाहि इसमाला वयाच्या ७० व्या वर्षापूर्वी आपल्या स्वतःला "वृद्ध" असें म्हणवून घ्यावयास लाज वाटली पाहिजे. आपला स्मृतिकार मनू तर ह्याच्याही पलीकडे गेला आहे ! शंभर वर्षापर्यंत आपल्याला जगतां न येणें ही खरोखर लाजिर-वाणी गोष्ट होय ! त्याचें असें म्हणणें आहे कीं, आपल्याला १०० वर्षेंपर्यंत जगतां येणें हें अगदीं शक्य आहे. मनू एके ठिकाणीं म्हणतो कीं एकाद्या व्यक्तीमध्यें कांहीं विशेष गुण नसले, तरी जर तो आचारसंपन्न असला, त्याचा विश्वास बळकट असला व त्याच्या ठिकाणीं इतरांचे दोष हुडकून काढण्याचा दोष नसला तर तो १०० वर्षेंपर्यंत जगूं शकतो.

ह्या वचनांत "आचार" ह्या शब्दाला विशेष महत्त्व आहे. हिंदूंच्या एकंदर जीवनास आचार-धर्मच बरें किंवा वाईट वळण लावावयास कारणीभूत झालेला आहे.

---

१. For what means reaping in the present life the fruit of actions of a past life but reaping now the result of the voluntary effort of a past life?

आचार म्हणजे सदाचार. आणि धर्माच्या दृष्टीनें आचार म्हणजे विधि, क्रिया इ. अगदीं जुन्या विचारांचा मनुष्य–विशेषतः एखादा ब्राम्हण–घेतला तर त्याचें सर्व जीवन क्रियाकलापामध्येंच अडकलेलें आपल्याला दिसून येतें. त्याच्या रोजच्या आन्हिका-संबंधाचे सर्व नियम सविस्तरपणें नमूद केलेले आहेत. त्यानें उठावयाचें कसें, उभें राहावयाचें कसें, बोलावयाचें कसें, प्रार्थना करावयाची कशी, निजावयाचें कसें, हीं सर्व कार्यें नियमबद्ध अशीं ठरलेलीं आहेत. प्रत्येक क्षणीं त्याला जगाचा विटाळ होण्याचा संभव आहे आणि त्यापासून त्याला वांचविण्यासाठींच हा सर्व प्रयत्न आहे ! अगदीं जुन्या चालीचा ब्राम्हण रस्त्यानें चालत नाहींच, तो सारख्या उड्याच मारीत असतो ! कारण, प्रत्येक पावलागणीक कशावर तरी पाय पडून आपल्याला विटाळ होईल अशी त्याला भीति असते ! म्हणून कन्नड प्रांतांतील कांहीं भागांत अशा ब्राम्हणांना कीं जे सरळ न चालतां बेडकासारखे नेहमीं टुण-टुण उड्या मारीत चालत असतात त्यांस skippers असें म्हणण्याचा प्रघात आहे ! मोठमोठ्या शहरीं आतां हा प्रकार क्वचितच पहावयास सांपडतो, पण खेडेगांवीं असले प्रकार नेहमीं दृष्टीस पडतात ! फार कशाला ? आपल्या ह्या शहरांत भुलेश्वरसारख्या ठिकाणीं आपण गेलों तर खऱ्याखुऱ्या जुन्या आचारांचे नमुने आपल्याला तेथें पहावयास सांपडतात ! असले प्रकार पाहिले म्हणजे आपल्याला हंसूं येतें ! पण असें हंसण्यापूर्वी तें आंवरून, अशा उड्या मारीत चालण्याच्या बुडाशीं काय असावें त्याचा विचार केला पाहिजे. एकच उदाहरण पहा. आमचे मुंबईचे हेल्थ ऑफिसर डॉ. टर्नर ह्यांनीं असें सुचविलें आहे कीं, जे कोणी रस्त्यावर थुंकतात त्यांस कायद्यानें शिक्षा झाली पाहिजे ! हल्लींच्या स्वातंत्र्याच्या काळांत असला कायदा झालेला कोणाला आवडणार नाहीं. परंतु जुने आचारप्रधान असा ज्यांचा धर्म आहे त्यांना ह्यांत कांहीं गैर वाटूं नये व त्यांनीं असा कायदा झाला तर त्यांत आनंदच झाला पाहिजे. जुना ब्राम्हण रस्त्यावरून जेव्हां उड्या मारीत चालतो तेव्हां त्याला रस्त्यांतल्या थुंकीवर आपला पाय पडून आपल्याला विटाळ होईल ही भीति असते. आणि आज शहरांतील सार्वजनिक रस्त्यावर जातांना तो जर उड्या मारीत चालत नसला, तर तोही स्वतः रस्त्यावर थुंकत असला पाहिजे. पूर्वकाळीं सर्व स्वच्छतेचा मक्ता ब्राम्हणांकडे व सर्व गलिच्छपणाचा शूद्रांकडे होता; पण आतां शूद्रांनीं आपल्याला अवनत स्थितींत ठेवल्याचा जणूं काय सूड घेण्यासाठीं ब्राम्हणांना आपल्या बरोबरीला आणिलें आहे !

हिंदूनें पाळावयाचे बारीकसारीक नियम पाहिले म्हणजे आज ते आपल्याला अगदीं कंटाळवाणे, अविचारमूलक व मूर्खपणाचे वाटण्याचा संभव आहे. पण ते समाज बाल्यावस्थेंत असतांना मार्ग दाखविण्यासाठीं आहेत. मुलें लहान

असतांना त्यांस चमच्यानें दूध पाजावें लागतें. पण मोठीं झालीं म्हणजे त्यांना चमच्याची आवश्यकता भासत नाहीं. आतां समाज पुष्कळ पुढें गेला आहे. म्हणून बाल्यावस्थेंतील नियम पाळण्याची आवश्यकता नाहीं. आतां आपल्या संतांनीं ह्या आचारप्रधान किंवा कर्मकांडप्रधान धर्मास बाजूस सारून देवाची भक्ति व मनुष्य-मात्रावर प्रेम करणें हा सोपा व सर्वांस साध्य असा उपाय सांगितला आहे. म्हणून आतां आपण हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं पूर्वीचे ते नियम व तें आचार जरी आपल्याला अवश्य वाटत नसले, तरी त्या नियमांतर्गत जें तत्त्व अंतर्बाह्य शुचिर्भूतपणा–तें अवश्य आहे. आणि हें तत्त्वच **हिंदुधर्माचें अंतरंग** होय. सारांश याज्ञवल्क्य व त्याचा टीकाकार विज्ञानेश्वर ह्यांनीं जें सांगितलें आहे त्याचें थोड-क्यांत असें सार सांगतां येईल कीं, आयुष्यांत प्रथम शरीराची योग्य निगा राखण्यापासून आरंभ करा आणि तसें करीत असतांना आपल्या आत्म्याची सुदृढ स्थिति ठेवणें हेंच आपलें साध्य आहे हें ध्यानांत ठेवा.

गृहस्थानें दररोज पहाटेस उठलें पाहिजे. ह्याच वेळीं रात्रीचा अंधार हळूहळू नाहींसा होऊन अरुणोदयाच्या पूर्वीचा अर्धप्रकाश हळूहळू स्पष्ट होत असतो. ह्यालाच ब्राम्हमुहूर्त असें म्हणतात. हाच वेळ परमेश्वराचें नामस्मरण करण्यास, त्याची प्रार्थना करण्यास व त्याचें ध्यानमनन करण्यास अत्यंत योग्य होय. इतकें केल्यावर मनुष्य आपल्या रोजच्या कामास प्रारंभ करावयास सिद्ध होतो. रोजच्या संध्येला म्हणजे परमेश्वरनाम-स्मरणाला व त्याच्या भजनप्रार्थनेस हा असाच सायंकाळचा वेळ योग्य होय असें सर्व सुसंस्कृत लोकांना वाटत असतें. आपल्या हिंदू धर्माच्या आचारांत दंतधावन, क्रिया व स्नान ह्यांचा फार महत्त्व दिलेलें आहे. दंतधावनाचा एक विधीच आहे. त्यावेळीं म्हणावयाच्या मंत्राचा अर्थ असा आहे :–हे डहाळे, मला दीर्घायुष्य, सामर्थ्य, यश, प्रकाश, बुद्धि, मुलेंबाळें, गुरेंढोरें व ह्या विश्वाचें ज्ञान, शहाणपण व दूरदृष्टि दे. " दांत स्वच्छ करण्याची ती काडी ती काय आणि तिला उद्देशून ही एवढी गंभीर प्रार्थना कशाला, असें कोणाला वाटण्याचा संभव आहे. परंतु मनुष्याचें आरोग्य व सर्व शक्ति ही त्याच्या दांतांच्या उत्तम स्थितीवर अवलंबून असते, असें वैद्यशास्त्र गर्जून सांगत आहे व आतां कोठें युरोपिअन लोकांनादेखील दांत स्वच्छ ठेवण्याचें महत्व कळूं लागलें आहे ! ह्यानंतर स्नानाचा विधि. त्यालाही शास्त्रांत फार मोठें महत्त्व दिलेलें आहे. आणि आतां आम्हां हिंदूलोकांपासून इंग्रज रोजच्या स्नानाचें महत्त्व शिकूं लागले आहेत. असो. आणखी अनेक आचार सांगून अधिक पाल्हाळ करीत नाहीं. इतकें सांगितलें म्हणजे पुरे कीं हा जो सर्व आचारधर्म आहे त्याचा मूळ हेतु इतकाच आहे कीं, शरीर व मन ह्यांची उत्तम प्रकारें जोपासना करून, सर्व कांहीं वेळच्यावेळीं करण्याचें व श्रम व शुद्ध मनोरंजनाचे

प्रकार उपभोगण्याचें सामर्थ्य प्राप्त व्हावें, व हें सर्व करीत असतां आत्म्याची उन्नति साधणें व परमेश्वराचें सान्निध्य संपादणें हें संधान चुकूं नये.

शरीराची वस्तुतः कांहीं किंमत नाहीं, आत्म्यालाच सर्व महत्त्व आहे अशी हिंदुधर्माची शिकवण आहे असें म्हणणें म्हणजे हिंदुधर्माचें अंतरंग विपर्यस्तरूपानें लोकांपुढें मांडणें होय. कांहीं पुराणें व स्वार्थी पुरोहित वर्ग ह्यांच्या शिकवणीचा हा परिणाम आहे, व त्यामुळें प्रत्येक हिंदूचें अत्यंत नुकसान झालें आहे. गरुड पुराणामध्यें दुसरा कांहींही गोंधळ असला तरी त्यांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, शरीरावांचून कोणासही धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे पुरुषार्थ साध्य होणें शक्य नाहीं आणि म्हणून शरीराची उत्तमप्रकारें जोपासना करणें व सदाचार पाळणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. पवित्र जीवनाला आरोग्याची किती आवश्यकता आहे हें ध्यानांत घेऊन नदी पुराणांत जे उदार पुरुष जनतेच्या हितासाठीं सार्वजनिक आरोग्यभुवनें ( Sanitoriums ) स्थापितात त्यांची पुष्कळ स्तुति केली आहे. ह्या दृष्टीनें पहातां माझे मित्र सर भालचंद्र कृष्ण ह्यांनीं कार्ला येथें आरोग्य-भुवनें स्थापून लोकांची उत्तमोत्तम सेवा केली आहे, पण त्यांच्या सहाय्यास धावून जाऊन द्रव्यरूपानें त्यास मदत करणें हें कार्य श्रीमंतांकडून मात्र जसें व्हावयास पाहिजे तसें झालेलें नाहीं. अशा आरोग्य भुवनांच्या प्रवेशद्वारीं पुढील वाक्यें कोरून ठेविलीं पाहिजेत :—

" जो कोणी उदारवृत्तीचा पुरुष आरोग्यभुवनें स्थापण्याकरितां पैसे देतो, अगर जो स्वतः आरोग्यभुवनें लोकांसाठीं उभारतो तो खरा उदार पुरुष होय. त्याचा आयुष्याचा हेतु पूर्ण झाला व तो पवित्र झाला असें समजावें." कारण असें कीं, परमात्म्यासंबंधानें स्वतःला कांहीं जर अनुभव यावयास पाहिजे, तर मनुष्यानें स्वतः विचार केला पाहिजे व त्या विचारानुसार वागलें पाहिजे. आणि मननाच्याद्वारें पवित्र व थोर विचार मनांत यावयाचे तर त्याचें शरीर निरोगी व पवित्र असलें पाहिजे. ह्यालाच सत्त्वशुद्धि असें म्हणतां येईल आणि शरीरास जर असें सामर्थ्य व पावित्र्य प्राप्त व्हावयास हवें तर चांगल्या व शुद्ध अन्नाचा आहार अवश्य आहे. ह्यालाच आहारशुद्धि म्हटलें आहे. पातञ्जलीनें जें ह्या बाबतींत सांगितलें आहे त्याचें हें सार आहे. इंग्रजीमध्यें Cleanliness is next to godliness अशी म्हण आहे. पण हिंदूधर्माचें अंतरंग असें सांगत आहे कीं शुचिर्भूतपणा हाच मुळीं दैवी अंश होय. त्याचा अर्थ इतकाच कीं, शरीर सर्व प्रकारें शुचिर्भूत असलें कीं, मन पवित्र राहूं शकतें व मन शुद्ध व सरळ असलें तर आपलें अखिल जीवन पवित्र होतें. सारांश, गृहस्थानें सर्व कांहीं वेळच्यावेळीं करावें, मनाला केव्हांहि भटक्या मारण्याची संवय लावूं नये, सात्विक व शुद्ध अशा मनो-

रंजनाच्या प्रकारांत मन रिझवावें आणि पहाटेच्या वेळीं परमेश्वराचें भजन, मनन, प्रार्थना करावी, हाच त्याचा सदाचार.

जुन्या विचारांनुसार हें आचारधर्मांचें सार असें म्हटलें कीं, आजच्या लोकांना हंसूं येतें. पण पूर्वींचा सर्व आचारधर्म अमलांत आणावयास कोणी सांगत नाहीं. त्याच्या बुडाशीं असलेलीं तत्त्वें चांगलीं होतीं व तींच आजही आपणांस हितकारक अशींच आहेत. आमच्यांतले पुष्कळ लोक अल्पवयी होतात, आणि जे दीर्घायुषी होतात त्यांच्यापैकीं पुष्कळ आचारधर्म न पाळल्यामुळें आत्मघातकी ठरतात. परंतु आतां थोडी जागृति होऊं लागली आहे. शरीरास कोणकोणत्या गोष्टी अवश्य आहेत, त्यांकडे आमचें लक्ष लागत आहे. व्यायामाची आवश्यकता व शरीर-स्वास्थ्यास आवश्यक असे नियम समजून घेणें इकडे अधिकाधिक कल होत आहे. परंतु ह्या प्रकाशा बरोबर अंधकारही आहेच हें विसरतां नये! क्लब, जिमखाने व सामाजिक मनोरंजनाचे प्रकार हे सर्व जोंपर्यंत प्रकृतिस्वास्थ्याची जोपासना म्हणजे पावित्र्य हा नियम आपल्या लक्षांत आहे तोंपर्यंत ठीक आहेत. ह्या बाबतींत एक धोक्याची सूचना ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. लंडनचे बिशप डॉ. इन्ग्राम ह्यांनीं एकदां म्हटलें कीं, पहिल्या प्रथम हे क्लब, जिमखाने इ. जेव्हां निघाले त्यावेळीं व्यायाम व योग्यप्रकारचे मनोरंजनाचे प्रकार, बैठे खेळ वगैरे खेळण्यासाठींच ते निघाले. परंतु अखेरीस सवंग दर लावून बिलीयर्ड अगर असेच जुगारासारखे खेळ खेळण्याचे अड्ड्यांचें त्यांस रूपांतर प्राप्त झालें! आजपर्यंत अशा प्रकारें हिंदु तरुणांनीं आपल्या जन्माचें मातेरें करून घेतलें आहे! पण तो काळ आतां पालटला आहे व आजचे तरुण आपलें शरीर व मन ह्यांच्या जोपासनेकडे कमीअधिक लक्ष पुरवूं लागले आहेत असें वाटतें. आज पूर्वींच्या सदाचाराचें तत्त्व ध्यानांत घेऊन व आधुनिक काळीं जें नवें ज्ञान प्राप्त होत आहे त्यास अनुसरून आपलें एकंदर जीवन व्यवस्थित करण्याचा व राखण्याचा प्रयत्न झाला पाहिजे.